श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचित

# व्याकरणमहाभाष्य

## मूळ आणि मराठी भाषांतर

भाग चौथा (अध्याय ४ व ५)

भाषांतरकार

महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर

संपादक

प्राध्यापक काशिनाथ वासुदेव अभ्यंकर

डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणें.

भाद्रपद शुद्ध ५ शके १८७४ ] [ २५ ऑगष्ट सन १९५२

# प्रास्ताविक निवेदन



सुमारें अकरा वर्षांपूर्वी व्याकरणमहाभाष्याचे भाग १ व २ प्रसिद्ध झाल्यानंतर महायुद्धजन्य परिस्थितीमुळें व इतर अडचणींमुळें पुढील भाग प्रकाशित करण्याचें काम स्थगित झालें होतें. तीन वर्षांपूर्वी पुन्हां कामास सुरवात झाली व जानेवारी सन १९५१ मध्यें शेवटचा म्हणजे ६ वा भाग ( पूर्वसंकल्पित ५ वा भाग ) प्रसिद्ध झाला आणि आक्टोबर सन १९५१ मध्यें तिसरा भाग प्रसिद्ध झाला. आज चार व पांच या अध्यायांचा चौथा भाग प्रसिद्ध करीत आहों. प्रकाशनाचे सोयीसाठीं संकल्पित ५ भागांऐवजीं एकंदर सहा भाग करण्याचें ठरवून तिसऱ्या भागामध्यें संपूर्ण तिसरा अध्याय, चौथ्या भागांत ४ व ५ अध्याय, पांचव्या भागामध्यें ६ वा अध्याय, सहाव्या भागांत ७ व ८ अध्याय व यांशिवाय प्रस्तावनेचा स्वतंत्र भागही देण्याचें योजिलें आहे.

दुर्दैवानें भाग १ व २ यांशिवाय बाकीच्या भागांचें काम शास्त्रीबुवांचे द्रष्टृत्वाखालीं होऊं शकलें नाहीं तरी त्यांचे चिरंजीव सेवानिवृत्त प्राध्यापक काशिनाथ वासुदेव अभ्यंकर यांनीं तें काम आपले अंगावर घेऊन संस्थेस उपकृत केलें हें नमूद करण्यास मला आनंद वाटतो. राहिलेल्या भागांचें काम त्यांचेंच द्रष्टृत्वाखालीं चालूं असून लवकरच राहिलेला पांचवा भाग व प्रस्तावनाखंड प्रसिद्ध होतील अशी आशा आहे.

पुणें विद्यापीठानें या भागाचे प्रकाशनाला मदतीदाखल रु. १००० मदत दिली व पुढें प्रकाशित होणाऱ्या भागांनाही त्याप्रमाणेंच मदत देण्याचें आश्वासन दिलें आहे. याबद्दल पुणें विद्यापीठाचेंही अंतःकरणपूर्वक आभार मानितों.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें.
ता. २५ ऑगष्ट १९५२

चिंतामण रामचंद्र देवधर,
सेक्रेटरी, डे. ए. सोसायटी.



श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचितम्

# व्याकरणमहाभाष्यम्

**ङ्याप्प्रातिपदिकात्** ॥ ४ । १ । १ ॥

ङ्याप्प्रातिपदिकग्रहणं किमर्थम् । ङ्याप्प्रातिपदिकात् स्वादयो यथा स्युर्धातोर्मा भूवन्निति । नैतदस्ति प्रयोजनम् । धातोस्तव्यदादयो विधीयन्ते तेऽपवादत्वाद्बाधका भविष्यन्ति। तिङन्तात्तर्हि मा भूवन्निति । एकत्वादिष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते ते चात्र तिङोक्ता एकत्वादय इति कृत्वोक्तार्थत्वान्न भविष्यन्ति । टाबादयस्तर्हि तिङन्तान्मा भूवन्निति । स्त्रियां टाबादयो विधीयन्ते न च तिङन्तस्य स्त्रीत्वेन योगोस्ति ॥ अणादयस्तर्हि तिङन्तान्मा भूवन्निति । अपत्यादिष्वर्थेष्वणादयो विधीयन्ते । न च तिङन्तस्याप-

---

(सू. १) ङ्याप्प्रातिपदिकात् हा अधिकार कशाकरितां केला आहे ?

पुढील सूत्रांनीं सांगितलेले सु, औ, जस् वगैरे प्रत्यय ङी-प्रत्ययान्त आप्-प्रत्ययान्त आणि प्रातिपदिक यांहूनच झाले पाहिजेत. धातूहून होऊं नयेत याकरितां केला आहे.

हा या अधिकाराचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, धातूहून तव्यत् (३। १। ९६) वगैरे प्रत्यय सांगितले आहेत ते अपवाद म्हणून ह्या सु, औ, जस् वगैरे प्रत्ययांचा बाध करतील.

तर मग तिङ्–प्रत्ययान्ताच्या ( क्रियापदाच्या ) पुढें सु, औ वगैरे प्रत्यय हाऊं नयेत हा या अधिकाराचा उपयोग समजावा.

पण हे सु, औ,जस् वगैरे प्रत्यय एकत्व, द्वित्व वगैरे संख्या या अर्थी सांगितले आहेत आणि ती संख्या तर क्रियापदामध्यें तिङ् प्रत्ययांनींच दाखविली जाते. तेव्हां संख्या हा अर्थ उक्तच होत असल्यामुळें पुनः त्या अर्थी हे सु, औ, जस् वगैरे प्रत्यय होणारच नाहींत.

तर मग क्रियापदाच्या पुढें टाप् (४।१।४) वगैरे प्रत्यय होऊं नयेत याकरितां हा अधिकार पाहिजे.

पण टाप् वगैरे प्रत्यय स्त्रीलिंगाची विवक्षा असतांना सांगितले आहेत; आणि क्रियापदाच्या अर्थाला तर स्त्रीलिंगाचा संबंध मुळींच संभवत नाहीं.

तर मग क्रियापदाच्या पुढें अण् (४।१।८३) वगैरे तद्धित प्रत्यय होऊं नयेत याकरितां हा अधिकार पाहिजे.

पण ते अण् वगैरे प्रत्यय अपत्य वगैरे अर्थी सांगितले आहेत. आणि क्रियापदाच्या अर्थाला

---

१—( सू. १ ) हें अधिकार-सूत्र आहे. ङी-प्रत्ययान्त आप-प्रत्ययान्त, आणि प्रातिपदिक यांहून पुढील प्रत्यय होतात. उदा० नदी, रमा, रामः.

२—अध्याय चार आणि पांच यांतील सूत्रांनीं.

त्यादिभिर्योगोस्ति । अथापि कथंचिद्योगः स्यात् । एवमपि न दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न तिङन्तादणादयो भवन्तीति यदयं कचित्तद्धितविधौ तिङ्ग्रहणं करोति । अतिशायने तमबिष्ठनौ तिङश्च [ ५.३.५५; ५६ ] इति ॥ अत उत्तरं पठति ।

ङ्याप्प्रातिपदिकग्रहणमङ्गभपदसंज्ञार्थम् ॥ १ ॥

ङ्याप्प्रातिपदिकग्रहणं क्रियतेऽङ्गभपदसंज्ञार्थम् । अङ्गभपदसंज्ञा ङ्याप्प्रातिपदिकस्य यथा स्युरिति ॥

क पुनरिहाङ्गभपदसंज्ञार्थेन ङ्याप्प्रातिपदिकग्रहणेनार्थः । टाबादिषु । नैतदस्ति प्रयोजनम् । ग्रहणवद्भ्यष्टावादयो विधीयन्ते । उगितो ङीब्भवति । अतष्टाब्भवतीति । यत्तच्छब्दरूपं गृह्यते तस्मादुत्पत्तिस्तस्यैताः संज्ञा भविष्यन्ति । अथापि काश्चिदग्रहणः । एवमपि न दोषः । स्त्रियां टाबादयो विधीयन्ते । यत्तच्छब्दरूपं स्त्रियां वर्तते तस्मादुत्पत्तिस्तस्यैताः संज्ञा भविष्यन्ति ॥ अणादिषु तर्हि । अणादयोपि

---

^३^तरें अपत्य वगैरे अर्थाशीं संबंध संभवत नाहीं. आतां कांहीं तद्धित प्रत्ययांच्या अर्थाशीं क्रियेचा संबंध संभवत असला तरीही दोष नाहीं. कारण कांहीं तद्धित प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रांमध्यें आचार्य तिङः असें मुद्दाम म्हणतात. उदाहरणार्थ ' अतिशायने तमबिष्ठनौ ' (५।३।५५) या सूत्राच्या पुढें 'तिङश्च' असें सूत्र केलें आहे. तेव्हां ज्या अर्थी तमप् वगैरे प्रत्यय मुद्दाम तिङन्ताहून सांगितले आहेत त्या अर्थी सर्वसाधारण सांगितलेले असे अण् वगैरे तद्धित प्रत्यय तिङन्ताहून होत नाहींत. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतात.

(वा. १) ङी-प्रत्ययान्त, आप्-प्रत्ययान्त आणि प्रातिपदिकें यांहून असा जो येथें प्रकृतीचा निर्देश केला आहे तो प्रकृतीला सांगितलेल्या अंग-संज्ञा, भसंज्ञा आणि पदसंज्ञा ह्या ङी-प्रत्ययान्त, आप्-प्रत्ययान्त आणि प्रातिपदिकें यांनाच झाल्या पाहिजेत म्हणून केला आहे.

अशा ह्या प्रकृतींना कोठें बरें ह्या संज्ञा झाल्या पाहिजेत ?

टाप् वगैरे प्रत्यय पुढें असतांना.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण टाप् वगैरे प्रत्यय हे विशेष प्रकारच्या प्रकृतींहूनच सांगितले आहेत. उदा० उगित् शब्दाहून ङीप् होतो (४।१।६); अकारान्त शब्दाहून टाप् होतो (४।१।४). तेव्हां तेथें उगित्, अकारान्त अशा तऱ्हेचा ज्या प्रकृतींचा निर्देश केला असेल त्या प्रकृतींहून ते प्रत्यय होतील; आणि त्या प्रकृतींना त्या संज्ञा होतील.

आतां एखादा प्रत्यय मोघम सांगितला असला तरी देखील दोष येत नाहीं. कारण टाप् वगैरे प्रत्यय हे स्त्रीलिंगीं सांगितले आहेत. तेव्हां जो शब्द स्त्रीलिंगी असेल त्याहून तो प्रत्यय उत्पन्न होईल व त्या स्त्रीलिंगी शब्दाला अंग वगैरे संज्ञा होतील.

तर मग अण् वगैरे प्रत्यय पुढें असतांना अंग वगैरे संज्ञा होण्याकरितां हा अधिकार पाहिजे.

अण् वगैरे प्रत्यय देखील कांहींतरी विशेष प्रकृतीचा निर्देश करूनच सांगितले आहेत.

---

३—क्रियांचा समुदाय हा अर्थ ( ४।२।३७ ) संभवेल. निदान स्वार्थी सांगितलेले जे तद्धित प्रत्यय ते क्रियापदाच्या पुढें प्राप्त होतातच. तेव्हां हा अधिकार नसला तर दोष येणारच.

४—कारण, अमुक प्रकृतीहून अमुक प्रत्यय होतो असा प्रत्यय-विधायक शास्त्रामध्यें ज्या प्रकृतीचा निर्देश केला असतो त्या प्रकृतीलाच अंग वगैरे ( १।४।१३ ) संज्ञा सांगितल्या आहेत.

५—वयसि प्रथमे ( ४।१।२० ) या सूत्रामध्यें अतः या पदाची अनुवृत्ति केली नाहीं तरी ' अंग वगैरे संज्ञा होणार नाहींत ' हा दोष येणार नाहीं असा अभिप्राय आहे.

ग्रहणवद्भ्यो विधीयन्ते। गर्गादिभ्यो यञ् [४.१.१०५] नडादिभ्यः फक् [९९] इति। यत्तच्छब्दरूपं गृह्यते तस्मादुत्पत्तिस्तस्यैताः संज्ञा भविष्यन्ति। अथापि कश्चिदग्रहणः। एवमपि न दोषः। अपत्यादिष्वर्थेष्वणादयो विधीयन्ते। यत्तच्छब्दरूपमपत्यादिष्वर्थेषु वर्तते तस्मादुत्पत्तिस्तस्यैताः संज्ञा भविष्यन्ति॥ स्वार्थिकेषु तर्हि। स्वार्थिका अपि ग्रहणवद्भ्यो विधीयन्ते। यावादिभ्यः कन् [५.४.२९] प्रज्ञादिभ्योऽणिति। यत्तच्छब्दरूपं गृह्यते तस्मादुत्पत्तिस्तस्यैताः संज्ञा भविष्यन्ति। यस्तर्ह्यग्रहणः। शुक्लतरः कृष्णतर इति। अत्रापि न यावच्छुक्लस्तावच्छुक्लतरः प्रकृष्टः शुक्लः शुक्लतरः। यत्तच्छब्दरूपं प्रकृष्टे वर्तते तस्मादुत्पत्तिस्तस्यैताः संज्ञा भविष्यन्ति॥ स्वादिषु तर्हि। एकत्वादिष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते। यत्तच्छब्दरूपमेकत्वादिष्वर्थेषु वर्तते तस्मादुत्पत्तिस्तस्यैताः संज्ञा भविष्यन्ति॥ कथं पुनरिहोच्यमानाः स्वादय एकत्वादिष्वर्थेषु

उदा०–गर्गादिभ्यो यञ् (४।१।१०५) नडादिभ्यः फक् (४।१।९९). तेव्हां तेथें ज्या शब्दांचा निर्देश केला असेल त्या शब्दांहून ते प्रत्यय होतील व त्या शब्दांना अंग वगैरे संज्ञा होतील.

आतां एखाद्या ठिकाणीं प्रत्यय मोघम सांगितला असेल तरी देखील दोष येत नाहीं. कारण, अण् वगैरे प्रत्यय अपत्य वगैरे अर्थीं सांगितले आहेत (४।१।९२, ४।२।१). तेव्हां ज्या शब्दांचे अर्थ अपत्य वगैरे अर्थांशीं जुळत असतील त्या शब्दांहून ते प्रत्यय होतील व त्या शब्दांना अंग वगैरे संज्ञा होतील.

तर मग स्वार्थिक प्रत्यय पुढें असतांना अंग वगैरे संज्ञा होण्याकरिता हा अधिकार पाहिजे.

स्वार्थिक प्रत्यय देखील कांहीं तरी विशेष प्रकृतीचा निर्देश करूनच सांगितले आहेत. उदा० यावादिभ्यः कन् (५।४।२९) प्रज्ञादिभ्योऽण् (५।४।३८) तेव्हा तेथें ज्या शब्दाचा निर्देश केला आहे त्यांहून ते प्रत्यय होतील व त्या शब्दांना अंग वगैरे संज्ञा होतील.

आतां जेथें प्रत्यय मोघम सांगितले आहेत उदा. शुक्लतरः शुक्लतमः तेथेंही एखाद्या पांढऱ्या पदार्थाला ज्या अवस्थेत नुसता पांढरा एवढेंच म्हणतां येत नाहीं तर त्याच्या पलीकडल्या अवस्थेत असलेला जेव्हां पांढरा रंग दिसतो तेव्हां त्याला शुक्लतर म्हणतात. प्रकृष्टः शुक्लः शुक्लतरः अशी त्याची व्युत्पत्ति आहे. तेव्हां ज्या शब्दाच्या अर्थाचा अतिशय या अर्थाशीं संबंध संभवत असेल त्या शब्दाहून ते प्रत्यय होतील व त्या शब्दाना अंग वगैरे संज्ञा होतील.

तर मग सु, औ, जस् वगैरे प्रत्यय पुढें असतांना अंग वगैरे संज्ञा होण्याकरितां हा अधिकार पाहिजे.

पण सु, औ, जस् वगैरे प्रत्यय एकत्व द्वित्व वगैरे सख्या या अर्थीं सांगितले आहेत. तेव्हां ज्या शब्दांच्या अर्थाचा एकत्व वगैरे संख्येशीं संबंध होऊं शकतो त्या शब्दांहून सु औ वगैरे प्रत्यय उत्पन्न होतील व त्या शब्दांना अंग वगैरे संज्ञा होतील.

पण येथें पुढील सूत्रानें सु, औ, जस् वगैरे प्रत्यय नुसते सांगितले आहेत. तेव्हां एकत्व द्वित्व वगैरे संख्या त्यांचा अर्थ आहे असें कसें समजतां येईल?

६—येथे शुक्ल शब्दाहून तमप् प्रत्यय अतिशय या अर्थीं झाला आहे. (५।३।५५) शुक्ल शब्दाच्या अर्थापेक्षां निराळा अर्थ या तम प्रत्ययानें दाखविला जात नाहीं. म्हणून या प्रत्ययाला स्वार्थिक प्रत्यय म्हणतात. फक्त त्याच अर्थाचा अतिशय दाखविला जातो म्हणून या प्रत्ययाला अत्यन्त स्वार्थिक असें म्हणत नाहींत.

शक्या विज्ञातुम्। एकवाक्यत्वात्। एकं वाक्यं तच्चेदं च। यद्येकं वाक्यं तच्चेदं च किमर्थं नानादेशस्थं क्रियते। कौशलमात्रमेतदाचार्यो दर्शयाति यदेकं वाक्यं सन्नानादेशस्थं करोत्यन्यदपि किंचित् संग्रहीष्यामीति ॥

यच्छयोश्च लुगर्थम् ॥ २ ॥

यच्छयोस्तर्हि लुगर्थं ङ्याप्प्रातिपदिकग्रहणं क्रियते। कंसीयपरशव्ययोर्यञञौ लुक् च [४.३.१६८] इति ङ्याप्प्रातिपदिकस्य लुग्यथा स्यात्। अक्रियमाणे हि ङ्याप्प्रातिपदिकग्रहणे प्रकृतेरपि लुक् प्रसज्येत ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम्। यथापरिभाषितं प्रत्ययस्य लुक्श्लुलुपो भवन्तीति प्रत्ययस्य भविष्यति। एवमप्युकारसकारयोः प्रसज्येत। कमेः स कंसः। परान्शृणातीति परशुरिति। उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि ॥

वृद्धावृद्धावर्णस्वरद्व्यज्लक्षणे च प्रत्ययविधौ तत्संप्रत्ययार्थम् ॥३॥

वृद्धावृद्धावर्णद्व्यज्लक्षणे तर्हि प्रत्यय-

एकवाक्यतेमुळे तसें समजणें शक्य आहे. हें पुढील सूत्र आणि बहुषु बहुवचनम्, द्व्येकयोर्द्विवचनैकवचने (१।४।२०, २१) हीं दोन सूत्रें मिळून एकच वाक्य आहे.

पण जर त्या सूत्रांची ह्या पुढील सूत्राशीं एकवाक्यता आहे तर मग तीं सूत्रें दूर देशामध्यें म्हणजे पहिल्या अध्यायामध्यें कां घातलीं आहेत ! येथेंच कां घातलीं नाहींत ?

त्या सूत्रांची पुढील सूत्राशीं एकवाक्यता असूनही तीं सूत्रें येथें घातलीं नाहींत त्यांत आचार्यांचें एक प्रकारचें कौशल्य आहे. तें असें कीं तसें करण्यांत त्यांना दुसरी एक गोष्ट साधावयाची आहे[७].

(वा. २) तर मग यत् आणि छ यांचाच लुक् व्हावा याकरितां हें प्रकृत अधिकारसूत्र केलें आहे असें समजावें. 'कंसीयपरशव्ययोर्यञञौ लुक् च' (४।३।१६८) या सूत्रानें कंसीय शब्दाहून त्याचा विकार या अर्थी यञ् प्रत्यय सांगून त्याच्याबरोबर सांगितलेला लुक् ङ्याप्-प्रातिपदिकात् हा अधिकार तेथें आहे म्हणून कंस या प्रातिपदिकाच्या पुढील प्रत्ययाचा (ईय याचा) होतो. तसेंच परशव्य शब्दाहून अञ् प्रत्यय सांगून त्याच्या बरोबर सांगितलेला लुक् या अधिकारामुळेंच परशु या प्रातिपदिकाच्या पुढील यत् प्रत्ययाचा होतो. तेव्हां प्रातिपदिकाच्या पुढील भागाचाच लुक् झाला पाहिजे हा ह्या अधिकाराचा उपयोग आहे. जर हा ङ्याप्-प्रातिपदिकात् अधिकार केला नाहीं तर कंसीय आणि परशव्य या सबंध प्रकृतीचाही लुक् होऊं लागेल.

हाही या अधिकाराचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण लुक्, श्लु आणि लुप् हे प्रत्ययाचेच होतात (१।१।६१) अशी परिभाषा आचार्यांनीं ठरविलीच आहे. तेव्हा तेथें कंसीय आणि परशव्य या सबंध प्रकृतीचा लुक् न होता त्यांतील प्रत्ययाचाच होईल.

तरी पण त्यांतील उकार व सकार हे प्रत्ययाचे आहेत त्यांचा लुक् होऊं लागेल, कारण कंसीय यांतील कंस शब्द कम् धातूपासून स प्रत्यय (उणा. ३।६२) करून साधला आहे. तसेंच परशव्य यांतील परशु हा शब्द पर शब्द उपपद असतांना शॄ धातूहून उ प्रत्यय (उणा. १।३३) करून साधला आहे. परान् शृणातीति परशुः.

हा दोष येत नाहीं. कारण उणादि प्रत्यय करून साधलेलीं प्रातिपदिकें अव्युत्पन्नच समजलीं जातात.

(वा. ३) तर मग वृद्ध, अवृद्ध, अवर्ण, स्वर

७—जसे सुप् प्रत्यय सांगणाऱ्या पुढील सूत्राशीं 'बहुषु०' आणि 'द्व्येकयोः०' या दोन सूत्रांचीं एकवाक्यता होते तशी तिङ् प्रत्यय सांगणाऱ्या सूत्राशीं (३।४।७८) सुद्धां त्यांची एकवाक्यता आचार्यांना इष्ट आहे. म्हणून सुप् व तिङ् या कोणत्याही प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें न घालतां तीं सूत्रें दूरच ठेवलीं आहेत.

विधौ तत्संप्रत्ययार्थं ङ्याप्प्रातिपदिकग्रहणं क्रियते। वृद्धात् अवृद्धात् अवर्णान्तात् अनुदात्तादेः द्व्यचः इत्येतानि प्रातिपदिकविशेषणानि यथा स्युरिति ॥ अथाक्रियमाणे ङ्याप्प्रातिपदिकग्रहणे कस्यैतानि विशेषणानि स्युः। समर्थविशेषणानि। तत्र को दोषः। उदीचां वृद्धादगोत्रात् [४.१.१६७] इह च प्रसज्येत। ज्ञानां ब्राह्मणानामपत्यमिति। एतद्धि समर्थं वृद्धम्। इह च न स्यात्। ज्ञयोर्ब्राह्मण्योरपत्यमिति। एतच्च समर्थमवृद्धम्। वृद्ध ॥ अवृद्ध। प्राचामवृद्धात्फिन्बहुलम् [४.१.१६०] इह च प्रसज्येत। ज्ञयोर्ब्राह्मण्योरपत्यमिति। एतद्धि समर्थमवृद्धम्। इह च न स्यात्। ज्ञानां ब्राह्मणानामपत्यमिति। एतद्धि समर्थं वृद्धम्। अवृद्ध ॥ अवर्ण। अत इञ् भवतीतीहैव स्यात्। दक्षस्यापत्यं दाक्षिरिति। एतद्धि समर्थमकारान्तम्। इह च न स्यात्। दक्षयोरपत्यम् दक्षाणामपत्यमिति। एतद्धि समर्थमनवर्णान्तम्। अवर्ण। स्वर। अनुदात्तादेरञ् भवतीतीह च प्रसज्येत। वाचो विकारः त्वचो विकार इति। एतद्धि समर्थमनुदात्तादि। इह च न स्यात्। सर्वेषां विकार इति।

---

आणि द्व्यच् ह्यापैकीं कोणत्याही निमित्तानें ज्या शास्त्रामध्यें प्रत्यय सांगितले आहेत तेथें ते वृद्ध वगैरे कोण घ्यावेत हें समजण्याकरितां ङ्याप्-प्रातिपदिकात् हा अधिकार केला पाहिजे. म्ह. वृद्ध, अवृद्ध, अवर्णान्त, अनुदात्तादि स्वर, आणि द्व्यच् हीं विशेषणें ङी, आप् व प्रातिपदिक यांचीं झालीं पाहिजेत.

पण हा अधिकार केला नाहीं तर तीं कोणाचीं बरें विशेषणें होतील ?

समर्थाचीं[8] विशेषणें होतील.

मग तसें झालें तर दोष काय येईल ?

दोष असा येईल कीं उदीचां वृद्धादगोत्रात् (४।१।१५७) या सूत्रानें अपत्य या अर्थी सांगितलेला फिञ् प्रत्यय 'ज्ञानां ब्राह्मणानां अपत्यम्' येथें होऊं लागेल. कारण येथें ज्ञानाम् हें समर्थ वृद्ध (१।१।७३) आहे. आणि 'ज्ञयोर्ब्राह्मण्योरपत्यम्' येथें होणार नाहीं. कारण येथें ज्ञयोः हें समर्थ वृद्ध नाहीं. तसेंच, प्राचामवृद्धात्फिन् बहुलम् (४।१।१६०) या सूत्रानें अपत्य या अर्थी सांगितलेला फिन् प्रत्यय 'ज्ञयोर्ब्राह्मण्योरपत्यम्' येथें होऊं लागेल; कारण येथें ज्ञयोः हें समर्थ अवृद्ध आहे. आणि ज्ञानां ब्राह्मणानामपत्यम् येथें होणार नाहीं; कारण, येथें ज्ञानाम् हें समर्थ वृद्ध आहे. तसेंच अवर्णान्ताहून अपत्य या अर्थी सांगितलेला इञ् प्रत्यय (४।१।९५) दक्षस्य अपत्यं दाक्षिः येथेंच होईल. कारण येथें दक्षस्य हें समर्थ अकारान्त आहे आणि दक्षयोरपत्यम् व दक्षाणामपत्यम् येथें होणार नाहीं. कारण येथें दक्षयोः तसेंच दक्षाणाम् हें समर्थ अवर्णान्त नाहीं. तसेंच अनुदात्तादि शब्दांहून सांगितलेला विकार या अर्थी अञ् प्रत्यय (४।३।१४०) वाचः विकारः व त्वचः विकारः येथें होऊं लागेल; कारण येथें वाचः तसेंच त्वचः हें जें समर्थ तें अनुदात्तादि आहे. आणि

---

८—अन्वययोग्य जें सुप्-प्रत्ययान्त शब्दस्वरूप त्याला समर्थ म्हणतात. समर्थपरिभाषेमुळें (२।१।१) तद्धित प्रत्यय हे समर्थाहूनच होत असतात.

९—वृद्ध हें 'ङ्याप्प्रातिपदिक' याच विशेषण असलें म्हणजे ज्ञ या पुल्लिंगी प्रातिपदिकाहून फिञ् प्रत्यय होत नाहीं. कारण ज्ञ हें प्रातिपदिक वृद्ध नाहीं आणि स्त्रीलिंगी ज्ञा हें आप्-प्रत्ययान्त वृद्ध आहे म्हणून त्याहून फिञ् प्रत्यय होत असतो.

१०—वाच् आणि त्वच् या शब्दांच्या पुढील षष्ठी एकवचन ङस् प्रत्ययाला उदात्त (६।१।१६८) झाला आहे. तेव्हा शेष निघातानें (६।१।१५८) वाच् आण त्वच् शब्दांमधील अच् अनुदात्त आहे.

एतद्धि समर्थमुदात्तादि । स्वर ॥ द्व्यज्लक्षण । द्व्यचष्ठनितीह च प्रसज्येत । वाचा तरति त्वचा तरतीति । एतद्धि समर्थं द्व्यच् । इह च न स्यात् । घटेन तरतीति । एतद्धि समर्थमद्व्यच् ॥ अस्ति पुनः समर्थविशेषणे सति किंचिदिष्टं संगृहीतं भवत्याहोस्विद्दोषान्तमेव । अस्तीत्याह । किम् । साम्ना तरति वेम्ना तरतीति । एतद्धि समर्थमपि व्यज् ङ्याप्प्रातिपदिकमपि ॥

अथ ङ्याब्ग्रहणं किमर्थं न प्रातिपदिकादित्येव सिद्धम् । न सिध्यति । अप्रत्यय इति प्रातिपदिकसंज्ञायाः प्रतिषेधः प्राप्नोति । यद्येष ङ्याब्ग्रहणे हेतुस्त्यूङ्ग्रहणमपि कर्तव्यं तावपि हि प्रत्ययौ । तिग्रहणे तावद्वार्तम् । तद्धितः प्रातिपदिकमिति प्रातिपदिकसंज्ञा भविष्यति । ऊङ्ग्रहणे चापि वार्तम् । उवर्णान्तादूङ् विधीयते । तत्रैकादेश एकादेशे कृतेऽन्तादिवद्भावात् प्रातिपदिकसंज्ञा भविष्यति ॥ यद्येष ऊङोऽग्रहणे हेतुराब्ग्रहणमपि न कर्तव्यम् । आबपि ह्यकारान्ताद्विधीयते तत्रैकादेश

सर्वेषां विकारः येथे होणार नाहीं; कारण, येथें सर्वेषाम् [11] जें समर्थ तें उदात्तादि आहे. तसेंच द्व्यच्क म्हणजे ज्यामध्यें दोन अच् आहेत त्याहून ठन् प्रत्यय (४।४।७) सांगितला आहे तो वाचा तरति तसेंच त्वचा तरति येथें होऊं लागेल. कारण तेथें वाचा तसेंच त्वचा हें समर्थ द्व्यच्क आहे. आणि घटेन तरति येथें होणार नाहीं. कारण येथें घटेन हें समर्थ द्व्यच्क नाहीं. पण येथें द्व्यच् हें विशेषण समर्थाचें झालें तर एखादें तरी इष्ट उदाहरण साधत आहे काय किंवा फक्त दोषच येतात ?

दोषच येतात असें नाहीं; कांहीं इष्ट उदाहरणेंही साधत आहेत. तीं कोणतीं ? साम्ना तरति, वेम्ना तरति वगैरे. येथें साम्ना तसेंच वेम्ना हें जें समर्थ तें द्व्यच्क आहे आणि सामन् तसेंच वेमन् हें जें प्रातिपदिक तेंही द्व्यच्क आहे.

आतां येथें ङ्याप् हें कशाकरितां म्हटलें आहे ? तें म्हणावयास नको. फक्त प्रातिपदिकात् एवढाच अधिकार केला तरी उदाहरणें सिद्ध होतात.

सिद्ध होणार नाहींत. कारण ङी–प्रत्ययान्त आणि आप्–प्रत्ययान्त यांना 'अप्रत्ययः' (१।२।४५) असा प्रातिपदिक संज्ञेचा निषेध प्राप्त होत आहे.

पण येथें ङ्याप् शब्द घालण्याचे हेंच जर प्रयोजन असेल तर ति आणि ऊङ् हेही शब्द येथें घातले पाहिजेत. कारण ङी व आप् यांप्रमाणें तेही प्रत्ययच आहेत.

'ति शब्द येथें घालावा' या म्हणण्यांत तर कांहींच अर्थ दिसत नाहीं. कारण तो 'ति' प्रत्यय (४।१।७७) तद्धित आहे. तेव्हां तद्धित-प्रत्ययान्ताला जी प्रातिपदिक संज्ञा (१।२।४६) सांगितली आहे ती प्रातिपदिक संज्ञा युवति या ति–प्रत्ययान्ताला होईलच. तसाच येथें ऊङ् शब्द घालण्यांतही कांहीं अर्थ दिसत नाहीं. कारण ऊङ् हा प्रत्यय उवर्णान्ताहून सांगितला (४।१।६६) आहे. तेव्हां ऊङ् प्रत्ययाचा त्याच्या मागील उकाराबरोबर एकादेश (६।१।१०१) होतो, आणि तो एकादेश झाला म्हणजे पूर्वान्तवद्भावानें (६।१।८५) कुरू इत्यादि ऊङ्-प्रत्ययान्तांना प्रातिपदिक संज्ञा होईल. पण येथें ऊङ् हा शब्द न घालण्याचें जर हेंच कारण असेल तर येथें 'आप्' हा शब्दही घालावयास नको. कारण आप् प्रत्ययही अकारान्ताहून सांगितला आहे. तेव्हां त्या आप् प्रत्ययाचा त्याच्या मागील अकारा-

११—सर्व शब्द मूळचा अन्तोदात्त (६।१।१६०) आहे. तेव्हां शेष–निघात होऊन सर्व शब्द अनुदात्तादि होतो. परंतु सर्वेषाम् हें जें समर्थ तें मात्र अनुदात्तादि नाहीं. कारण त्याला आद्युदात्त(६।१।१९१) झाला आहे

**एकादेशे कृतेऽन्तादिवद्भावात् प्रातिपदिकसंज्ञा भविष्यति । यस्तर्ह्यनकारान्तात् कुञ्चा उष्णिहा देवविशेति । अत्राप्यकारान्ताद् वृत्तिर्लक्ष्यते । कुञ्चानालभेत । उष्णिहककुभौ । देवविशं च मनुष्यविशं चेति ॥ इह तावदुष्णिहककुभावित्याप एवैतदौत्तरपदिकं ह्रस्वत्वम् । इह खल्वपि देवविशं च मनुष्यविशं चेति नास्ति विशेषोऽकारान्तादम उत्पत्तौ सत्यां व्यञ्जनान्ताद्वेति ॥ यत्तावदुच्यत इह तावदुष्णिहककुभावित्याप एवौत्तरपदिकं ह्रस्वत्वमिति संज्ञाछन्दसोरित्येवं तन्न चैषा संज्ञा नापीदं छन्दः । यदप्युच्यत इह खल्वपि देवविशं च मनुष्यविशं चेति नास्ति विशेषोकारान्तादम उत्पत्तौ सत्यां व्यञ्जनान्ताद्वेति । स्वरे विशेषः । यद्यत्र व्यञ्जनान्तादुत्पत्तिः स्याद् देवविशमित्येवं स्वरः प्रसज्येत देवविशामिति चेष्यते'**

बरोबर एकादश होणारच; आणि तो एकादेश झाला म्हणजे पूर्वान्तवद्भावानें अजा रमा इत्यादि आप्-प्रत्ययान्त शब्दांना प्रातिपदिक संज्ञा होईल.

पण अकारान्तांशिवाय इतर प्रातिपदिकांहून आप् प्रत्यय जो होतो त्याकरितां येथें आप् शब्द घातला पाहिजे. उदा० कुञ्चा, उष्णिहा व देवविशा. येथेंही अकारान्ताहूनच आप् प्रत्यय केला आहे असें दिसतें. कारण, 'कुञ्चान् आलभेत,' 'उष्णिहककुभौ', 'देवविशं च मनुष्यविशं च' असे त्या शब्दांचे अकारान्त प्रयोग दृष्टीस पडतात.

हे जे प्रयोग दाखविले त्यांवरुन ते अकारान्त शब्द आहेत अशी खात्री पटत नाहीं. कारण, उष्णिहककुभौ येथें उष्णिह् या हलन्ताहून टाप् प्रत्यय झाल्यानंतर त्याला उत्तरपद पुढें असतांना ऱ्हस्व (६।३।६३) झालाआहे. देवविशम् व मनुष्यविशम् येथे तर अकारान्तच शब्द असले पाहिजेत असा कांहींच विशेष दिसत नाहीं. देवविश या अकारान्ताहून अम् प्रत्यय केला काय किंवा देवविश् या व्यंजनान्ताहून केला काय देवविशम् असे सारखेंच रूप होतें.

आतां उष्णिहककुभौ येथें उष्णिहा या आबन्ताला उत्तरपदामुळे ऱ्हस्व झाला आहे असें जें म्हटले आहे ते बरोबर दिसत नाहीं. कारण त्या ऱ्हस्व सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'संज्ञाछन्दसोः' असें म्हटले आहे. आणि उष्णिहककुभौ येथें संज्ञा नाहीं आणि हा वैदिक प्रयोगही नव्हे. तसेंच 'देवविशम् व मनुष्यविशम्' येथें अकारान्त शब्दाहून अम् प्रत्यय झाला काय आणि शकारान्ताहून अम् प्रत्यय झाला काय त्यांत कांहींच फरक होत नाहीं' असें जें म्हटले आहे तेंही बरोबर नाही. कारण रूपामध्यें जरी फरक होत नाही तरी स्वरामध्यें फरक होतो. जर येथें देवविश् या व्यंजनान्ताहून अम् प्रत्यय केला तर देवविशम् असा विश् शब्दामधील इकार उदात्त होऊं लागेल आणि देवविशम् असा अम् प्रत्ययांतील अकार हा उदात्त असणे इष्ट आहे. तेव्हा अशा ठिकाणीं क प्रत्ययच (३।२।५ वा.२) झाला आहे असें मानलें

१२—अजादि गणामध्यें जो 'कुञ्चा, उष्णिहा, देवविशा' असा पाठ आहे तो हलन्ताहून टाप् प्रत्यय होण्याकरितां केला आहे असें समजूं नये; तर कुञ्च उष्णिह असे अच् प्रत्यय (३।१।१३४) करून साधलेले जे अकारान्त शब्द त्याहून ङीप् प्रत्यय (४।१।६३) प्राप्त होतो, तो न होता टाप् प्रत्यय झाला पाहिजे म्हणून त्या गणामध्यें पाठ केला आहे. देवविश हाही शब्द क प्रत्यय करून साधलेला अकारान्तच आहे. त्याचाही या अजादि गणामध्यें पाठ ङीप् प्रत्ययाच्या बाधाकरिताच केला आहे.

१३—विश् धातूहून क्विप् प्रत्यय केला म्हणजे उत्तरपद-प्रकृतिस्वरानें (६।२।१३९) विश् या उत्तर पदांतील इकार उदात्त होईल. पुढील अम् प्रत्यय अनुदात्त (३।१।४) झाल्यावर त्याला स्वरित (८।४।६६) होईल. आणि विश् धातूहून क प्रत्यय केला म्हणजे विश या उत्तर पदांतील अन्त्य अकार उदात्त(६।२।१४४)होतो. पुढें अम् प्रत्ययातील अनुदात्त अकाराशीं पूर्वरूप (६।१।१०७)एकादेश झाला तरी तो उदात्तच (८।२।५) होता.

तस्मात्क एष एवंविषयः ॥ इदं तर्हि पादोन्यतरस्यां टाबृचि [४.१.८;९] इति। ऋचीत्युच्यते तत्र च्छान्दसत्वाद्भविष्यति। ऋचीति नेदं छन्दो विवक्षितं काठकं कालापकं मौदकं पैप्पलादकं वा। किं तर्हि। प्रत्ययार्थविशेषणमेतत्। ऋक् चेत्प्रत्ययार्थो भवतीति। एतदपि नास्ति प्रयोजनम्। पदशब्दः पादशब्दसमानार्थोऽकारान्तश्छन्दसि दृश्यते। तस्याः सप्ताक्षरमेकं पदम्। एकः पाद इत्यर्थः। तस्माद्दुत्पत्तिर्भविष्यति। इदं तर्हि डाबुभाभ्यामन्यतरस्याम् [४.१.१३] इति। बहुराजा बहुराजे बहुराजा इति ॥

## ङ्याब्ग्रहणमनर्थकं प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणात् ॥४॥

ङ्याब्ग्रहणमनर्थकम्। किं कारणम्। प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणात्। प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीत्येषा परिभाषा

---

पाहिजे.

तर मग पादोऽन्यतरस्याम् (४।१।८) याच्या पुढील 'टाबृचि' या सूत्रानें हलन्ताहून टाप् प्रत्यय होतो त्याकरितां येथें आप् शब्द घातला पाहिजे.[14]

पण येथें ऋचि असें म्हटलें आहे ना? आणि ऋचेमध्यें म्हणजे वैदिक प्रयोगामध्यें वाटेल तें कार्य होतें.

काठक, कालापक, मौदक, पैप्पलादक, इत्यादि जे ऋक्समुदायात्मक वेदभाग त्यांतील प्रयोग साधण्याकरितां हें सूत्र केलें आहे असें समजूं नये. तर, येथें ऋचि हे टाप् प्रत्ययाच्या अर्थाचें विशेषण आहे, म्हणजे 'ऋचा' या पदार्थाचें स्त्रीत्व दाखविणारा टाप् प्रत्यय होतो असा येथें अर्थ आहे.

प्रकृत सूत्रांतील आप्ग्रहणाचा हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण पाद शब्दाच्या अर्थींच पद असा अकारान्त शब्द वेदामध्यें दृष्टीस पडतो. उदा० 'तस्याः सप्ताक्षरमेकं पदम्'. येथे सात अक्षरांचा एक पाद असा अर्थ आहे. द्विपदा ऋक् येथें तो पद शब्द घेऊन द्विपद शब्दाहून टाप् प्रत्यय होईल.[15]

तर मग आतां येथील आप्—ग्रहणाचा उपयोग असा कीं बहुराजा, बहुराजे, बहुराजाः येथें 'डाबुभाभ्यामन्यतरस्याम्' (४।१।१३) या सूत्राने डाप् प्रत्यय केल्यानंतर त्याहून सु, औ, जस् वगैरे प्रत्यय व्हावे.[16]

(वा.४) येथें ङी आणि आप् हे दोन्ही शब्द निरुपयोगी आहेत.

काय कारण?

कारण असे की ज्या शब्दानें प्रातिपदिकाचें ग्रहण होते त्या शब्दानें त्या प्रातिपदिकाच्या पुढें लिंगबोधक प्रत्यय जास्त असला तरी त्यासहित त्या प्रातिपदिकाचें ग्रहण होतें.

तर मग 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्' अशी परिभाषा केली पाहिजे.

---

१४—द्विपदा ऋक् येथे द्विपदा या आप्-प्रत्ययान्ताहून सु, औ, जस् वगैरे प्रत्यय झाले पाहिजेत हा येथे आप् शब्द घालण्याचा उपयोग आहे. दोन आहेत पाद जीचे अशी ऋचा हा अर्थ आहे. येथें द्वि आणि पाद या शब्दांचा बहुव्रीहि झाल्यानंतर पाद शब्दांतील शेवटच्या अकाराचा लोप (५।४।१४०) झाला आहे. पुढे टाप् प्रत्यय झाल्यानंतर पाद् शब्दाला पद् आदेश (६।४।१३०) झाला आहे.

१५—आणि तसा झाला म्हणजे सवर्णदीर्घ एकादेश होऊन पूर्वान्तवद्भावानें द्विपदा हे प्रातिपदिक समजलें जाईल. तेव्हां त्याकरितांही येथे आप्—ग्रहण नको.

१६—कारण, डाप् प्रत्यय डित् असल्यामुळें राजन् यांतील अन् या टि भागाचा लोप होतो. तेव्हां येथें एकादेश नसल्यामुळें बहुराजा हे पूर्वान्तवद्भावानें प्रातिपदिक समजलें जाणार नाही.

कर्तव्या ॥ कः पुनरत्र विशेष एषा वा परिभाषा क्रियते ङ्याब्ग्रहणं वा । अवश्यमेषा परिभाषा कर्तव्या । बहून्येतस्याः परिभाषयाः प्रयोजनानि । कानि ।

प्रयोजनं सर्वनामस्वरसमासतद्धित-विधिलुगलुगर्थम् ॥५॥

सर्वनामविधिः प्रयोजनम् । सर्वनाम्नः सुडिहैव स्यात् तेषाम् येषाम् । तासाम् यासामित्यत्र न स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । अवर्णान्ताट्टाब्विधीयते तत्रैकादेश एकादेशे कृतेऽन्तादिवद्भावात्सुड् भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । सर्वनाम्नस्तृतीया च [२-३-२७] इहैव स्यात् भवता हेतुना भवतो हेतोरिति । भवत्या हेतुना भवत्या हेतोरित्यत्र न स्यात् । सर्वनाम ॥ स्वर । कुशूलकूपकुम्भशालं बिले [६-२-१०२] इहैव स्यात् कूशूलबिलम् । कुशूलीबिलमित्यत्र न स्यात् । स्वर ॥ समास । द्वितीया श्रितादिभिः सह समस्यते । इहैव स्यात् कष्टं श्रितः कष्टश्रितः । कष्टं श्रिता कष्टश्रितेत्यत्र न स्यात् ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । श्रितशब्दोऽकारान्तस्तत्रैकादेश एकादेशे कृतेऽन्तादिवद्भावाद्

---

पण यांत काय बरें फरक आहे? ही परिभाषा तरी केली पाहिजे किंवा ङ्याप्-ग्रहण तरी केले पाहिजे.

ही परिभाषा अवश्य केलीच पाहिजे. कारण ह्या परिभाषेचीं प्रयोजने पुष्कळच आहेत.

ती कोणती ?

(वा. ५) सर्वनामाला सांगितलेला विधि होणें हा या परिभाषेचा उपयोग होय. आमि सर्वनाम्नः सुट् (७।१।५२) या सूत्रानें सर्वनामाच्या पुढील आम् प्रत्ययाला सांगितलेला सुट् आगम ही परिभाषा नसल्यास येषाम् व तेषाम् येथेंच होईल. यासाम् व तासाम् येथ हाणार नाहीं.[१७]

हा या परिभाषेचा उपयोग बरोबर नाहीं. कारण टाप् प्रत्यय हा अकारान्ताहून सांगितला आहे तेव्हां त्या अकाराबरोबर टाप् प्रत्ययाला एकादेश झाला असतां पूर्वान्तवद्भावानें (६।१।८५) या एवढें सर्वनाम समजल्यामुळें सुट् आगम होईल.

तर मग त्या परिभाषेचा उपयोग असा समजावा कीं सर्वनाम्नस्तृतीया च (२।३।२७) या सूत्रानें सर्वनाम शब्दाहून सांगितलेल्या तृतीया आणि षष्ठी या विभक्ती ही परिभाषा नसल्यास भवता हेतुना, भवतः हेतोः येथेंच झाल्या असत्या; आणि 'भवत्या हेतुना,' 'भवत्याः हेतोः' येथें झाल्या नसत्या. या परिभाषेमुळें येथेंही भवती हें सर्वनाम समजून त्या विभक्ती होतात

आतां स्वराविषयीं उपयोग :—'कुशूलकूपकुम्भशालं बिले' (।६।२।१०२) या सूत्रानें बिल शब्द पुढें असतांना कुशूल वगैरे शब्दांना सांगितलेला अन्त-उदात्त स्वर ही परिभाषा नसल्यास कुशूलबिलम् येथेंच होईल; कुशूलीबिलम् येथ होणार नाहीं. या परिभाषेनें येथेंही तो अन्त-उदात्त स्वर होतो.

तसेंच द्वितीयान्त शब्दाचा श्रित वगैरे शब्दांबरोबर सांगितलेला (२।१।२४) द्वितीयातत्पुरुष समास ही परिभाषा नसल्यास कष्टं श्रितः कष्टश्रितः येथेंच होईल. कष्टं श्रिता कष्टश्रिता येथें होणार नाहीं.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, श्रित हा शब्द अकारान्त आहे. तेव्हां त्या अकाराला पुढील टाप् या स्त्री-प्रत्ययाबरोबर एकादेश केला असतां पूर्वान्तवद्भावानें (६।१।८५) श्रिता हा शब्द श्रित शब्द आहे

---

१७—कारण, सर्वनाम जो यद् शब्द त्याच्या पुढें आम् प्रत्यय नाहीं. मध्य टाप प्रत्ययानें व्यवधान आहे. यासाम् येथ यद् शब्दाहून आम् प्रत्यय, दकाराला अकार ७।२।१०२), टाप् प्रत्यय (४।१।४), सवर्णदीर्घ (६।१।१०१) व सुट् आगम अशीं कार्यें झालीं आहेत.

भविष्यति ॥ इदं तर्हि । पूर्वसदृश [२-१-३१] इतीहैव स्यात् । पित्रा सदृशः पितृसदृशः । पित्रा सदृशी पितृसदृशीत्यत्र न स्यात् । समास ॥ तद्धितविधि । अचित्तहस्तिधेनोष्ठक् । [४-२-४७] इहैव स्यात् हस्तिनां समूहो हास्तिकम् । हस्तिनीनां समूहो हास्तिकमित्यत्र न स्यात् ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । पुंवद्भावेनैतत्सिद्धम् । इदं तर्हि । प्रमाणे द्वयसच् [५-२-३७] यथेह भवति हस्तिद्वयसम् हस्तिमात्रमेवं हस्तिनीद्वयसम् हस्तिनीमात्रमित्यपि यथा स्यात् । तद्धितविधि ॥ लुक् । नेन्सिद्धबध्नातिषु च [६-३-१९] इहैव स्यात् स्थण्डिलशायी । स्थण्डिलशायिनीत्यत्र न स्यात् । लुक् ॥ अलुक् । शयवासवासिष्वकालात् [१८] इहैव स्यात् । ग्रामेवासी । ग्रामेवासिनीत्यत्र न स्यात् ॥

## मानिनि च विधिप्रतिषेधार्थम् ॥६॥

मानिनि च विधिप्रतिषेधार्थं प्रयोजनम् । विध्यर्थं तावत् । क्यङ्मानिनोश्च [६-३-३६] इहैव स्यात् दर्शनीयमानी । दर्शनीयमानिनीत्यत्र न स्यात् । प्रतिषेधार्थमपि । वक्ष्यति स्वाङ्गाच्चेतोऽमानिनि । तस्मिन्क्रियमाण इहैव स्यात् दीर्घमुखमानी । दीर्घमुखमानिनीत्यत्र न स्यात् ॥

## प्रत्ययग्रहणोपचारेषु च ॥७॥

प्रत्ययग्रहणोपचारेषु च प्रयोजनम् ।

---

असें समजून समास होईल.

तर मग 'पूर्वसदृश०' (२।१।३१) या सूत्रानें सांगितलेला तृतीया-तत्पुरुष समास ही परिभाषा नसल्यास पित्रा सदृशः पितृसदृशः येथेंच होईल आणि पित्रा सदृशी पितृसदृशी येथें होणार नाहीं.

तसेंच 'अचित्तहस्तिधेनोष्ठक्' (४।२।४७) या सूत्रानें हस्तिन् शब्दाहून सांगितलेला ठक् प्रत्यय ही परिभाषा नसल्यास हस्तिनां समूहः हास्तिकम् येथेंच होईल. आणि हस्तिनीनां समूहः हास्तिकम् येथें होणार नाहीं.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण येथें हस्तिनी या शब्दाला पुंवद्भावानें (६।३।३५ वा. ११) हस्तिन् असें स्वरूप प्राप्त झाल्यावर ठक् प्रत्यय होईलच.

तर मग 'प्रमाणे द्वयसज्दघ्नञ्मात्रचः' (५।२।३७) या सूत्रानें सांगितलेला द्वयसच् प्रत्यय जसा हस्तिद्वयसम् व हस्तिमात्रम् येथें होतो तसा हस्तिनीद्वयसम् व हस्तिनीमात्रम् येथेंही झाला पाहिजे तो या परिभाषेनें होतो. तसेंच 'नेन्सिद्धबध्नातिषु च' (६।३।१९) यानें इन्-प्रत्ययान्त शब्द पुढें असतांना सांगितलेला सप्तमी अलुक्-समासाचा निषेध ही परिभाषा नसल्यास स्थण्डिलशायी येथें होईल; स्थण्डिलशायिनी येथें होणार नाहीं.

तसेंच 'शयवासवासिष्वकालात्' (६।३।१८) यानें वासिन् शब्द पुढें असताना सांगितलेला सप्तमीचा अलुक् ही परिभाषा नसल्यास ग्रामेवासी येथेंच होईल; ग्रामेवासिनी येथें होणार नाहीं.

(वा. ६) तसेंच मानिन् शब्द पुढें असतांना सांगितलेला पुंवद्भाव आणि त्याचा निषेध हे मानिनी शब्द पुढें असतांनाही झाले पाहिजेत हाही या परिभाषेचा उपयोग आहे. स्पष्टीकरण करणें झाल्यास —'क्यङ्मानिनोश्च' (६।३।३६) या सूत्रानें मानिन् शब्द पुढें असतांना सांगितलेला पुंवद्भाव ही परिभाषा नसल्यास दर्शनीयमात्मानं मन्यते दर्शनीयमानी येथेंच होईल; दर्शनीयामात्मानं मन्यते दर्शनीयमानिनी येथें होणार नाहीं. तसेंच 'स्वाङ्गाच्चेतोऽमानिनि' (६।३।४०) यानें मानिन् शब्द पुढें असतांना सांगितलेला पुंवद्भाव-निषेधाचा निषेध ही परिभाषा नसल्यास दीर्घमुखमात्मानं मन्यते दीर्घमुखमानी येथेंच होईल. दीर्घमुखीमात्मानं मन्यते दीर्घमुखमानिनी येथें होणार नाहीं. तो या परिभाषेनें होतो.

(वा. ७) प्रत्यय-ग्रहण आणि उपचार या विषयींही या परिभाषेचा उपयोग होतो. उदा०

तृजकाभ्यां कर्तरि [२.२.१५] इहैव स्यात् अपां स्रष्टा। अपां स्रष्ट्रीत्यत्र न स्यात् ॥ उपचार। अतः कृकमिकंसकुम्भ [८-३-४६] इहैव स्यात् अयस्कुम्भः। अयस्कुम्भीत्यत्र न स्यात् ॥

एतान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि यदर्थमेषा परिभाषा कर्तव्या। एतस्यां च सत्यां नार्थो ङ्याब्ग्रहणेन ॥

अतिप्रसङ्ग उपपदविधौ ॥८॥

उपपदविधावतिप्रसङ्गो भवति। द्विषत्परयोस्तापेः [३.२.३९] यथेह भवति द्विषंतप इत्येवं द्विषतीताप इत्यत्रापि स्यात्।

यञिञोः फकि ॥९॥

यञिञोः फक्यतिप्रसङ्गो भवति। यथेह भवति गार्ग्यायणः दाक्षायण एवं गार्गेयः दाक्षेय इत्यत्रापि स्यात् ॥ नैष दोषः। ढगत्र बाधको भविष्यति ॥

समासान्तेषु च ॥१०॥

समासान्तेषु चातिप्रसङ्गो भवति। राजाहःसखिभ्यष्टच् [५.४.९१] यथेह भवति मद्रराजः कश्मीरराज एवं मद्रराज्ञी कश्मीरराज्ञीत्यत्रापि स्यात् ॥ न वा भवति मद्रराजीति। भवति यदा

---

तृजकाभ्यां कर्तरि (२।२।१५) येथें तृच् आणि अक या प्रत्ययांचें ग्रहण केलें आहे. त्या सूत्रानें सांगितलेला षष्ठीतत्पुरुषसमासाचा निषेध ही परिभाषा नसल्यास अपां स्रष्टा येथेंच होईल. आणि अपां स्रष्ट्री येथें होणार नाहीं. या परिभाषेनें तो होतो. तसेंच 'अतः कृकमि०' (८।३।४६) या सूत्रानें सांगितलेला उपचार (म्ह. विसर्गाचे स्थानी होणारा सकार) अयस्कुम्भः येथेंच होईल आणि अयस्कुम्भी येथें होणार नाहीं. तो या परिभाषेनें होतो.

अशीं या परिभाषेचीं प्रयोजनें आहेत की ज्यांकरितां ही परिभाषा केलीच पाहिजे आणि ही परिभाषा केली म्हणजे येथें प्रकृत सूत्रांत ङ्याप्–ग्रहणाचा कांहींच उपयोग नाहीं.

(वा. ८) ही परिभाषा घेतली असतां उपपद विधीच्या ठिकाणीं दोष येतो. 'द्विषत्परयोस्तापेः' (३।२।३९) या सूत्रानें द्विषत् शब्द उपपद असतांना तापि या णिजन्त धातूहून सांगितलेला खच् प्रत्यय जसा द्विषंतपः येथें होतो तसा द्विषतीतापः येथेंही होऊं लागेल.

(वा. ९) तसेंच, ही परिभाषा घेतली असतां यञ्–प्रत्ययान्त आणि इञ्–प्रत्ययान्त यांहून सांगितलेला जो फक् प्रत्यय त्याचे ठिकाणीं दोष येतो. तो फक् प्रत्यय जसा गार्ग्यायणः व दाक्षायणः येथे होतो (४।१।१०१) तसा ही परिभाषा घेतल्यास गार्गेयः व दाक्षेयः येथें गार्गी व दाक्षी या स्त्री–प्रत्ययान्तांहून तो होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण ह्या फक् प्रत्ययाचा येथें ढक् (४।१।१२०) प्रत्यय बाध करील.

(वा. १०) तसाच समासान्त प्रत्ययांचे ठिकाणींही दोष येतो. 'राजाहःसखिभ्यष्टच्' (५।४।९१) यानें सांगितलेला समासान्त टच् प्रत्यय जसा मद्रराजः कश्मीरराजः येथें होतो तसा तो मद्रराज्ञी कश्मीरराज्ञी येथेंही होऊं लागेल. आणि त्यामुळें मद्राणां राज्ञी मद्रराजी असें होऊं लागेल.

मग मद्रराजी असा प्रयोग होतच नाहीं कां?

---

१८—येथें अण् प्रत्यय (३।२।१) होत असतो. खच् प्रत्यय झाला तर ह्रस्व (६।४।९४) व मुम् आगम (६।३।६७) होऊं लागतील.

९—राज्ञी याच्या पुढें टच् प्रत्यय झाला तर पुंवद्भावानें (६।१।३५ वा ११) राज्ञी याला राजन् असें रूप येऊन नंतर अन् या भागाचा लोप (६।४।१४४) होऊन मद्रराजी असें रूप होऊं लागेल.

समासान्तादीकारः । लिङ्गविशिष्टग्रहणे स्त्रीकारान्तात्समासान्तः प्रसज्येत । तत्र को दोषः । पुंवद्भावष्टिलोपश्च । तत्र मद्रराजीत्येतद्रूपं स्यान्मद्रराज्ञीति चेष्यते ॥

महदात्त्वे प्रियादिषु ॥११

महदात्त्वे प्रियादिष्वतिप्रसङ्गो भवति । आन्महतः समानाधिकरणजातीययोः [६-३-४६] इति यथेह भवति महान्प्रियोऽस्य महाप्रिय एवं महती प्रियास्य महतीप्रिय इत्यत्रापि स्यात् ॥ किमुच्यते प्रियादिष्विति। यत्र पुंवद्भावः प्रतिषिध्यते । यत्र तु न प्रतिषिध्यते भवितव्यमेव तत्रात्त्वेनेति ॥

ञ्नित्स्वरे ॥१२॥

ञ्नित्स्वरेऽतिप्रसङ्गो भवति । ञ्नित्यादिरुदात्तो भवति । यथेह भवति दाक्षिः अहिचुम्बकायनिरेवं दाक्षी अहिचुम्बकायनीत्यत्रापि स्यात् ॥

राज्ञः स्वरे ब्राह्मणकुमारयोः ॥१३॥

राज्ञः स्वरे ब्राह्मणकुमारयोरतिप्रसङ्गो भवति । राजा च ब्राह्मणकुमारयोरिति यथेह भवति राजकुमारः राजब्राह्मण एवं राजकुमारी राजब्राह्मणीत्यत्रापि स्यात् ॥

---

तसा प्रयोग होतो. जेव्हां समासान्त टच् प्रत्यय करून नंतर मद्रराज या शब्दाहून ङीष् प्रत्यय (४।१।४८) होतो तेव्हां मद्रराजस्य स्त्री या अर्थी मद्रराजी असा प्रयोग होतो. पण 'प्रातिपदिकग्रहणे०' या परिभाषेनें राजन् शब्दानें राज्ञी शब्दाचें ग्रहण झालें तर राज्ञी या ईकारान्ताहून समासान्त टच् प्रत्यय होऊं लागेल.

तसा झाला तर दोष काय येईल ?

पुंवद्भाव आणि टिलोप होऊन मद्रदेशाचें राज्य करणारी या अर्थी मद्रराजी असा प्रयोग होऊं लागेल आणि त्या अर्थी मद्रराज्ञी असें रूप इष्ट आहे.

(वा.११ आन्महतः समानाधिकरण० (६।३।४६) या सूत्रानें जें महत् शब्दाला आत्त्व सांगितलें आहे तें प्रिय वगैरे शब्द पुढें असतांना महती शब्दाला होऊं लागेल असा ही परिभाषा घेतली असता दोष येतो तेव्हां महान् प्रियः यस्य महाप्रियः येथें, बहुव्रीही समास केला असतां जसें आत्त्व होतें तसे महती प्रिया यस्य महतीप्रियः येथेंही होऊं लागेल.

पण येथें दोष दाखवितांना 'प्रिय वगैरे शब्द पुढें असतांना' असें कां म्हटलें आहे ?

प्रिय वगैरे शब्द पुढें असताना पुंवद्भावाचा निषेध सांगितला आहे (६।३।३४). ज्या ठिकाणीं पुंवद्भावाचा निषेध नसतो तेथें पुंवद्भाव होऊन आत्त्व होतेंच[२०].

(वा. १२) तसेंच ही परिभाषा घेतली असतां ञ्नित्स्वराचे ठिकाणीं दोष येतो. ञित्-प्रत्ययान्त आणि नित्-प्रत्ययान्त शब्दांना आदि उदात्त (६।१।१९७) सांगितला आहे. तो जसा दाक्षिः[२१] व अहिचुम्बकायनिः येथें होतो तसा दाक्षी व अहिचुम्बकायनी या स्त्रीप्रत्ययान्त रूपांमध्येंही होऊं लागेल.

(वा. १३) तसेंच कर्मधारय समासामध्यें ब्राह्मण किंवा कुमार हे शब्द उत्तरपद पुढें असताना राजन् या पूर्वपदाला जो प्रकृतिस्वर विकल्पानें सांगितला आहे त्या ठिकाणीं ही परिभाषा घेतली असता दोष येतो. ब्राह्मण किंवा कुमार शब्द पुढें असतांना 'राजा च' (६।२।५९) या सूत्रानें सांगितलेला प्रकृतिस्वर जसा राजब्राह्मणः व राजकुमारः येथें होतो तसा ही परिभाषा घेतल्यास राजब्राह्मणी व राजकुमारी येथेंही होऊं लागेल.

---

२०—उदा० महती जङ्घा यस्य स महाजङ्घः.

२१—दाक्षिः येथें दक्ष शब्दाहून अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय (४।१।९५) झाला आहे. अहिचुम्बकायनिः येथें अहिचुम्बक शब्दाहून अपत्य अर्थी फिञ् प्रत्यय (४।१।१६०) झाला आहे.

**समाससंघातग्रहणेषु च ॥ १४ ॥**

समाससंघातग्रहणेषु चातिप्रसङ्गो भवति। बहोर्नञ्वदुत्तरपदभूम्नि [६.२.१७५] यथेह भवति बहुगोमान् बहुयवमानेवं बहुगोमती बहुयवमतीत्यत्रापि स्यात् ॥ किमुच्यते समाससंघातग्रहणेष्विति । यदवयवग्रहणं प्रयोजनमेव तदस्याः परिभाषायाः । कुशूलकूपकुम्भशालं बिले [६.२.१०२] कुशूलीबिलमिति यथा ॥

**विभक्तौ चोक्तम् ॥ १५ ॥**

किमुक्तम् । न वा विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणादिति ॥

एतेऽस्याः परिभाषाया दोषा एतानि च प्रयोजनानि स्युः। एते दोषाः समा भूयांसो वा तस्मान्नार्थोऽनया परिभाषया। न हि दोषाः सन्तीति परिभाषा न कर्तव्या लक्षणं वा न प्रणेयम्। न हि भिक्षुकाः सन्तीति स्थाल्यो नाधिश्रीयन्ते न च मृगाः सन्तीति यवा नोप्यन्ते। दोषाः खल्वपि साकल्येन परिगणिताः प्रयोजनानामुदाहरणमात्रम्। कुत एतत् । न हि दोषाणां लक्षणमस्तीति । तस्माद्यान्येतस्याः परिभाषायाः

---

(वा. १४) तसेंच ही परिभाषा घेतली असता समाससघातग्रहणाचे ठिकाणीं दोष येतो. 'बहु शब्दाच्या पुढील जे बहु या अर्थाचें बोधक उत्तरपद तदन्तसमासाला नञ् पूर्वपद असलेल्या समासाप्रमाणे स्वर होतो' असा 'बहोर्नञ्वदुत्तरपदभूम्नि' (६।२।१७५) या सूत्रानें सर्व समासाला सांगितलेला स्वर जसा बहुगोमान् व बहुयवमान् येथें होतो तसा बहुगोमती[२२] व बहुयवमती येथेंही होऊ लागेल.

येथें समाससंघातग्रहणेषु असे का म्हटलें आहे ?

जेथे समासांतील अवयवाला कार्य सांगितले असेल तेथें या परिभाषेचा उपयोगच असतो. उदा० कुशूलकूपकुम्भशालं बिले (६।२।१०२) या सूत्राने कुशूल वगैरे पूर्वपदांला सांगितलेला अन्तोदात्त स्वर कुशूलीबिलम् यथ या परिभाषेमुळेंच होतो. या परिभाषेचें ते उदाहरणच आहे.

(वा. १५) विभक्तीला मानून सांगितलेल्या कार्याविषयीं ही परिभाषा येत नाहीं असें विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणात् (७।१।१ वा. १३) सांगितलेंच आहे.

याप्रमाणें या परिभाषेचे दोष दाखविले आहेत व प्रयोजनही दाखविली आहेत. हे दोष प्रयोजनाइतकेच असतील किंवा ज्यास्तही असतलि. एकंदरींत ही परिभाषा घेण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

हा विचार बरोबर नाही. कारण दोष आहेत म्हणून परिभाषा करूं नये की काय किंवा शास्त्र करूं नये की काय ? लोकामध्यें-ही पाहिलें असतां याचक लोक आहेत म्हणून भाताचें भांडे चुलीवर चढवावयाचें नाहीं असें कोणीही करीत नाहीं. तसेंच शेतामध्यें हरणें आहेत म्हणून शेतामध्यें यव वगैरे धान्य पेरावयाचे नाही असेंही कोणी करीत नाहीं. शिवाय येथे या परिभाषेवर येणारे दोष सगळेच दाखविले आहेत, आणि प्रयोजनांची मात्र फक्त दिशा दाखविली आहे.

असें कशावरून ?

अशावरून की अमुक तऱ्हेचे दोष येतात असा दोषांचा अनुगम न करतां फक्त व्यक्तिशः दोष दाखविले आहेत. तात्पर्य इतकेंच कीं जीं या परिभाषेचीं प्रयोजनें दाखविलीं आहेत त्याकरितां ही परिभाषा केली.

---

२२—बहव: गोमन्तः यस्यां सा बहुगोमती नगरी असा बहुव्रीहि झाला आहे.

२३—तेव्हां या परिभाषेनेच नदी बहुराजा इत्यादि ठिकाणी सु, औ, जस् वगैरे प्रत्यय होतील, म्हणून येथें त्याकरितां ङ्याप् ग्रहण करावयास नको.

प्रयोजनानि तदर्थमेषा परिभाषा कर्तव्या प्रतिविधेयं च दोषेषु ॥

तद्धितविधानार्थं तु ॥ १६ ॥

तद्धितविधानार्थं तु ङ्याब्ग्रहणं कर्तव्यम्। ङ्याबन्तात्तद्धितोत्पत्तिर्यथा स्यात्। कालितरा हरिणितरा। खट्वातरा मालातरा ॥ किं पुनः कारणं न सिध्यति।

विप्रतिषेधाद्धि तद्धितबलीयस्त्वम् ॥ १७ ॥

विप्रतिषेधाद्धि तद्धितोत्पत्तिः प्राप्नोति ॥

तत्र समासान्तषु दोषः ॥ १८ ॥

तत्र समासान्तेषु दोषो भवति। बहुगोमत्का बहुयवमत्का। समासान्ता अपि ङ्याबन्तात्स्युः ॥

त्यूङोश्च ग्रहणम् ॥ १९ ॥

त्यूङोश्चापि ग्रहणं कर्तव्यं भवति। युवतिका ब्रह्मबन्धुकेति ॥ ऊङ्ग्रहणेन तावन्नार्थः। नास्त्यत्र विशेष उकारान्तादुत्पत्तौ सत्यामूङन्ताद्वा ॥ इदं तर्हि। युवतितरा ब्रह्मबन्धुतरेति ॥

तदन्तस्य च प्रत्ययार्थेनायोगात्तद्धितानुत्पत्तिः ॥ २० ॥

तदन्तस्य च ङ्याबन्तस्य प्रत्ययार्थेनायोगात्तद्धितोत्पत्तिर्न प्राप्नोति। कालितरा

---

आतां जे दोष येत असतील तेथें त्यांचा कांहींतरी प्रतिकार करावा.

(वा. १६) पण ङी–प्रत्ययान्त आणि आप् प्रत्ययान्त शब्दांहून तद्धित प्रत्ययाचें विधान करण्याकरितां येथे ङ्याप्–ग्रहण केलें आहे. कारण कालितरा, हरिणितरा, खट्वातरा व मालातरा येथे अगोदर ङी व आप् हे प्रत्यय होऊन त्यांच्या पुढें तरप् हा तद्धित प्रत्यय झाला पाहिजे[२४].

पण ङ्याप्–ग्रहण केलें नाहीं तर येथें तद्धित प्रत्ययाच्या अगोदर ङी व आप् हे स्त्री प्रत्यय कां बरें होणार नाहीत?

(वा. १७) स्त्री प्रत्यय आणि तद्धित प्रत्यय हे एकदम प्राप्त झाले असतां विप्रतिषेधामुळें तद्धित प्रत्यय हे परत्वास्तव ज्यास्त बलवान् आहेत म्हणून तेच अगोदर होतील.

(वा. १८) आणि तसें झालें असतां समासान्त प्रत्ययांचे ठिकाणीं दोष येतो. उदा० बहुगोमत्का, बहुयवमत्का येथें समासान्त प्रत्यय देखील अगोदर ङी व आप् प्रत्यय झाल्यानंतरच होतील[२५].

(वा. १९) तसेंच ङी व आप् यांप्रमाणें ति आणि ऊङ् हे प्रत्ययही तद्धित प्रत्ययांच्या अगोदर व्हावे म्हणून येथें त्यूङ् असें म्हटलें पाहिजे. उदा०—युवतिका, ब्रह्मबन्धुका[२६].

पण येथें ऊङ्–ग्रहण करण्याचा कांहीं उपयोग दिसत नाहीं. कारण ब्रह्मबन्धुका येथें अगोदर ऊङ् प्रत्यय न करतां ब्रह्मबन्धु या उकारान्ताहून क प्रत्यय झाला काय किंवा अगोदर ऊङ् प्रत्यय करून त्याच्या पुढें क प्रत्यय झाला काय त्यांत कांहींच फरक होत नाही.

तर मग युवतितरा तसेंच ब्रह्मबन्धुतरा हें तरप् प्रत्ययाचे उदाहरण घ्यावें[२७].

(वा २०) ङी, आप् वगैरे स्त्रीप्रत्यय शेवटीं असलेले जे शब्द त्यांच्या अर्थाचा तद्धित

---

२४—येथें प्रस्तुत सूत्रांत ज्या अर्थी जरूर नसतांही ङ्याप्–ग्रहण केलें आहे त्या अर्थी त्याच्या सामर्थ्यास्तव ज्या ठिकाणीं ङी व आप् हे प्रत्यय प्राप्त होतील तेथें ते केल्यानंतरच तद्धित प्रत्यय होतात असे म्हणतां येतें.

२५—त्यामुळें बह्वः गोमन्तः यस्याम् या अर्थी बहुव्रीहि केला असतां बहुगोमतीका असा प्रयोग होऊं लागेल.

२६—येथें क प्रत्यय झाल्यानंतर मागील दीर्घ ऊकाराला ऱ्हस्व ( ७।४।१३ ) झाला आहे.

२७—येथें ऱ्हस्वाचा विकल्प ( ६।३।४४ ) असल्यामुळे अगोदर ऊङ् प्रत्यय केला असतां रूपामध्यें फरक दिसून येतो.

हरिणितरा। खट्वातरा मालातरेति। किं कारणम्। ङ्याबन्तमेतत्स्त्रीप्रधानं न च स्त्रीत्वस्य प्रकर्षाप्रकर्षौ स्तः॥ नैष दोषः। न हि किंचिदुच्यत एवंजातीयकादुत्पत्तव्य-मेवंजातीयकान्नेति। एतावदुच्यतेऽतिशा-यने तमबिष्ठनौ तिङश्च [५.३.५५;५६] इति यस्य च प्रकर्षोऽस्ति तस्य प्रकर्षे प्रत्ययो भविष्यत्यस्ति चाप्रधानस्य गुणस्य प्रकर्षः। इह खल्वपि शुक्लतरः कृष्णतर इति द्रव्यं प्रधानं गुणस्य च प्रकर्षे प्रत्यय उत्पद्यते॥

उक्तं वा॥२१॥

किमुक्तम्। सिद्धं तु स्त्रियाः प्रातिपदिकविशेषणत्वात्स्वार्थे टाबाद्य इति। प्रातिपदिकविशेषणं स्त्रीग्रहणं स्वार्थिकाष्टा-बादयः। नैवं विज्ञायते स्त्रियामभिधेया-यामिति नापि स्त्रीसमानाधिकरणात्प्राति-पादिकादिति। कथं तर्हि। यत्स्त्रियां प्राति-पदिकं वर्तते तस्माट्टाबादयो भवन्ति। कस्मिन्नर्थे। स्वार्थ इति॥ ननु चोक्तं तत्र

---

प्रत्ययाच्या अर्थाशीं संबंध संभवत नाहीं म्हणून स्त्रीप्रत्ययान्ताहून तद्धित प्रत्ययाची प्राप्तीच येणार नाहीं, उदा०—कालितरा, हरिणितरा, खट्वातरा, मालातरा.

काय कारण ?

कारण असे कीं काली, हरिणी इत्यादि स्त्री-प्रत्ययान्त शब्दांमध्यें प्रत्ययार्थ जें स्त्रीत्व म्हणजे स्त्रीलिंग त्याला मुख्यत्व आहे आणि त्या स्त्रीत्वामध्यें कांहींही न्यूनाधिकभाव दिसेत नाहीं !

हा दोष येत नाहीं. कारण तर वगैरे प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रांमध्यें अमुक प्रकारच्या शब्दा-हून ते प्रत्यय उत्पन्न होतात आणि अमुक प्रकारच्या शब्दाहून ते प्रत्यय उत्पन्न होत नाहींत, असा कांहींच विशेष सांगितला नाहीं. फक्त अतिशय ह्या अर्थीं तमप् आणि इष्ठन् हे प्रत्यय होतात व तिङन्ताहूनही ते प्रत्यय होतात (५।३।५५, ५६) एवढेंच तेथें म्हटलें आहे. तेव्हां प्रकृतीच्या अर्थांपैकीं कोणाचाही अति-शय गम्यमान असेल तर त्या अर्थीं प्रकृतीच्या पुढें ते प्रत्यय होतील. आणि कालितरा वगैरे शब्दांमध्यें कृष्णवर्ण हा गुण मुख्य नसला तरी त्याचा अतिशय गम्यमान आहे. तेव्हां तेथें तद्धित प्रत्यय होण्यास कांहींच अडचण नाहीं. शुक्लतरः, कृष्णतरः या पुंल्लिंगी उदाहरणामध्यें तरी हीच स्थिति आहे. शुक्ल याच्या अर्थामध्यें पाढऱ्या पदार्थाला मुख्यत्व आहे. त्यांतील पांढरा वर्ण हा जो गुण त्याला मुख्यत्व नाहीं; तरी पण त्या पांढऱ्या वर्णाचा अतिशय दाख-विणारा 'तर' हा तद्धित प्रत्यय तेथें होत असतोच.

(वा. २१) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

सिद्धं तु स्त्रियाः प्रातिपदिकविशेषणत्वा-त्स्वार्थे टाबादयः (४।१।३ वा. ५) असें सांगि-तलेंच आहे. टाप् ङीप् इत्यादि प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रांमध्यें स्त्रियाम् हें प्रातिपदिकाचें विशेषण आहे. आणि ते टाप् वगैरे प्रत्यय तर स्वार्थींच होतात. ते प्रत्यय स्त्रीत्व या अर्थीं होतात असें समजलें जात नाहीं; तसेंच स्त्रीस-मानाधिकरणें जें प्रातिपदिक त्याहून ते प्रत्यय होतात असेंही पण नाहीं. फक्त जें प्रातिपदिक स्त्रीत्व या अर्थीं आहे त्याहून टाप् वगैरे प्रत्यय होतात. आता ते प्रत्यय कोणत्या अर्थीं होतात असें म्हणाल तर ते स्वार्थीं होतात असें समजावें.

---

२८—तेव्हां काली, हरिणी इत्यादि स्त्री–प्रत्ययान्त शब्दांहून अतिशय या अर्थीं तर प्रत्यय करतां येणार नाही.

२९—स्त्री शब्दाशीं समानाधिकरण जें प्रातिपदिक तें स्त्रीसमानाधिकरण प्रातिपदिक होय. जसें–ब्राह्मणी स्त्री.

३०—ङी, आप् वगैरे प्रत्यय अगोदर होऊन नंतर तद्धित प्रत्यय व्हावे याकरितां ङ्याप्–ग्रहण केलें आहे. या सिद्धान्तावर जे दोष दाखविले आहेत त्यांपैकीं शेवटचा दोष(वा. २०) येथे दूर केला आहे. कारण, स्त्री प्रत्यय स्वार्थींच होत असल्यामुळे त्यांच्या अर्थाला प्राधान्यच नसतें.

समासान्तेषु दोष इति । समासान्ता अपि स्वार्थिका उभयोः स्वार्थिकयोः परत्वात्समासान्ता भविष्यन्ति ॥ कथं कालिकेति । प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्येत्त्वं भविष्यति ॥ कथं हरिणिकेति । हरिणशब्दः प्रकृत्यन्तरमस्ति॥ कथं लोहिनिकेति । वक्ष्यत्येतल्लोहितालिङ्गबाधनं वेति ॥

## [ स्वौजसमौट्छष्टाभ्यांभिस्ङेभ्यांभ्यस्ङसिभ्यांभ्यस्ङसोसाम्ङ्योस्सुप् ॥ ४।१।२॥ ]

आतां समासान्तविषयीं जो दोष दाखविला आहे तोही येत नाहीं. कारण स्त्रीप्रत्ययांप्रमाणें समासान्त प्रत्ययही स्वार्थीच होतात. तेव्हां तेथें त्या दोन्ही स्वार्थिक प्रत्ययांमध्यें परत्वास्तव समासान्त होतील.

तर मग कालिका हें उदाहरण कसें साधलें जाईल?

येथें ङीप् प्रत्ययाचा बाध करून क प्रत्यय झाला तरी प्रत्ययस्थात्०' ( ७।३।४४ ) यानें मागील अकाराला इत्त्व होईल.

तरी पण हरिणिका हें उदाहरण कसें साधलें जाईल[२] ?

हरित या अर्थाचा हरिण असा स्वतंत्र शब्द आहे. त्याचें हें रूप होईल. तरी पण लोहिनिका हा प्रयोग कसा व्हावा ?

लोहितालिङ्गबाधनं वा (५।४।३० वा.१)

३१—कारण, तेथें काल शब्दाहून ङीप् प्रत्ययाचा परत्वास्तव बाध करून क प्रत्यय होऊं लागेल.

३२—येथें हरित शब्दाहून ङीप् प्रत्यय आणि त्याच्याबरोबर तकाराला नकार ( ९ ) होत असतो. म्हणून या ठिकाणीं ङीपाचा बाध करून क प्रत्यय झाला तर इत्त्व होऊन हरितिका असें होऊं लागेल.

३३—कारण येथें लोहित या अर्थाचा लोहिन असा स्वतंत्र शब्द नाहीं.

१ ( सू. २ )—सु, औ, जस; अम्, औट्, शस्; टा, भ्याम्, भिस्; ङे, भ्याम्, भ्यस्; ङसि, भ्याम्, भ्यस्; ङस्, ओस्, आम्; ङि, ओस्, सुप्; हे प्रत्यय प्रथमा, द्वितिया वगैरे सात विभक्तींचें प्रत्येकीचे एकवचन,द्विवचन आणि बहुवचन असे तीन मिळून एकंदर एकवीस आहेत. प्रथमेचे जे प्रत्यय तेच संबोधनाचे प्रत्यय होत. ङी-प्रत्ययान्त आप्-प्रत्ययान्त आणि प्रातिपदिक यांहून हे प्रत्यय होतात. उदा० नदी, रमा, रामः.

## स्त्रियाम् ॥ ४ । १ । ३ ॥

स्त्रियामित्युच्यते का स्त्री नाम । लोकत एते शब्दाः प्रसिद्धाः स्त्री पुमान्नपुंसकमिति । यल्लोके दृष्ट्वैतदवसीयत इयं स्त्र्ययं पुमानिदं नपुंसकमिति सा स्त्री स पुमांस्तन्नपुंसकमिति ॥ किं पुनर्लोके दृष्ट्वैतदवसीयत इयं स्त्र्ययं पुमानिदं नपुंसकमिति । लिङ्गम् । किं पुनस्तत् ।

स्तनकेशवती स्त्री स्याल्लोमशः पुरुषःस्मृतः ।
उभयोरन्तरं यच्च तदभावे नपुंसकम् ॥१॥

असें तेथें स्वतंत्र वचन सांगावयाचेंच आहे.

(सू.३) येथें स्त्रियाम् असें म्हटलें आहे. पण स्त्री असे कोणाला म्हणावे ? स्त्री, पुमान् व नपुंसक हे शब्द लोकांमध्यें प्रसिद्धच आहेत. तेव्हां लोकांमध्ये जें कांहीं पाहिलें असतां ही स्त्री, हा पुमान् , हें नपुंसक असें म्हटलें जातें तसेंच येथेंही ती स्त्री, तो पुमान् , आणि तें नपुंसक असें समजावें. पण लोकांमध्यें तरी ही स्त्री, हा पुमान्, आणि हें नपुंसक असें जें म्हणतात तें काय बरें पाहून म्हणतात ?

लिंग पाहून म्हणतात.

तें लिंग तरी कसें समजावें ?

(श्लो.१) प्रशस्त स्तन आणि केश जिला आहेत ती स्त्री होय. आणि प्रशस्त लव ज्याच्या अंगावर आहे तो पुरुषच होय. आणि हीं दोन्ही प्रकारचीं चिन्हें नसून फक्त त्यांच्यासारखा जो

१ ( सू.३)—हे अधिकार-सूत्र आहे, याच्या पुढील टाप् प्रत्ययापासून ष्यङ् प्रत्यया-( ४।१।८१ ) पर्यंत जे प्रत्यय ते स्त्री-प्रत्यय होत.

लिङ्गात्स्त्रीपुंसयोर्ज्ञाने भ्रूकुंसे टाप्प्रसज्यते ।

लिङ्गात्स्त्रीपुंसयोर्ज्ञाने सति भ्रूकुंसे टाप्प्राप्नोति । यद्धि लोके दृष्ट्वैतदवसीयत इयं स्त्रीत्यस्ति तद् भ्रूकुंसे ॥

नत्वं खरकुटीः पश्य

इह चञ्चाः पश्य वध्रिकाः पश्य खरकुटीः पश्येति तस्माच्छसो नः पुंसि [६. १. १०३] इति नत्वं प्राप्नोति । यद्धि लोके दृष्ट्वैतदवसीयतेऽयं पुमानित्यस्ति तद्वध्रिकादिषु ॥

खट्वावृक्षौ न सिध्यतः ॥ २ ॥

खट्वावृक्षयोश्च लिङ्गं न सिध्यति । यद्धि लोके दृष्ट्वैतदवसीयत इयं स्त्र्ययं पुमानिति न तत्खट्वावृक्षयोरस्ति ॥ किं तर्हि तयोर्लिङ्गं न्याय्यम् ।

नापुंसकं भवेत्तस्मिन्

नापुंसकं खट्वावृक्षयोर्लिङ्गं न्याय्यम् । किमिदं नापुंसकमिति । नपुंसके भवं नापुंसकम् ।

तदभावे नपुंसकम् ।

तदभावे स्त्रीपुंसलिङ्गाभावे नपुंसकलिङ्गं न्याय्यम् ॥

असत्तु मृगतृष्णावत्

असत्तु खट्वावृक्षयोर्लिङ्गं द्रष्टव्यम् । कथं पुनरसन्नाम लिङ्गं शक्यं द्रष्टुम् । मृगतृष्णावत् । तद्यथा । मृगास्तृषिता अप धाराः पश्यन्ति न च ताः सन्ति ॥

---

दिसतो तो नपुंसक होय.

(श्लो.२) परंतु असें बाह्य चिन्हांवरून स्त्रीपुरुषांचें ज्ञान होत असेल तर भ्रूकुंस शब्दाहून टाप् प्रत्यय होऊं लागेल. कारण, लोकांमध्यें जें बाह्य चिन्ह पाहून ही स्त्री अशी ओळखली जाते तें चिन्ह भ्रूकुंसाचे ठिकाणी आहे.

तसेंच चञ्चाः पश्य, वध्रिकाः पश्य व खरकुटीः पश्य येथें 'तस्माच्छसो नः पुंसि' (६।१।१०३) या सूत्रानें नत्व प्राप्त होतें. कारण, लोकांमध्यें जें बाह्यचिन्ह पाहून 'हा पुमान्' असें ओळखिलें जातें तें चिन्ह चञ्चाः वध्रिकाः वगैरे ठिकाणीं आहे.

तसेंच खट्वा येथें स्त्रीलिंग आणि वृक्षः येथें पुंलिंग सिद्ध होत नाहीं. कारण, जें बाह्य चिन्ह पाहून ही स्त्री अथवा हा पुमान् असें ओळखिलें जातें तें बाह्य चिन्ह खट्वा व वृक्ष यांमध्यें दिसत नाहीं.

तर मग खट्वा व वृक्ष यांना लिंग तरी कोणतें बरें असावें ?

(श्लो. ३) खट्वा व वृक्ष यांना नापुंसकलिंग समजणें न्याय्य होईल.

नापुंसकलिंग याचा अर्थ काय ?

'नपुंसके भवं नापुंसकम्' अशी त्या शब्दाची व्युत्पत्ति आहे. स्त्री आणि पुरुष या दोघांचीं चिन्हें नसतील तेथें नपुंसकलिंग समजणें ओघानेंच प्राप्त होतें.

पण, तेथें जें स्त्रीलिंग किंवा पुंल्लिंग भासतें तें वस्तुतः असतच होय.

जर असत् असेल तर तेथें तें भासतें कसें ?

मृगतृष्णेप्रमाणें भासतें. उदा० रानामध्यें तृषित मृगांना दुरून पाण्याच्या धारा दिसतात. वस्तुतः त्या तेथें नसतातच.

---

२—स्त्रीवेषधारी नटाला भ्रूकुंस म्हणतात. स्त्रीचा वेष घेतला असल्यामुळें प्रशस्त स्तन व केश दुरून दिसतात.

३—चञ्चा, खरकुटी, व वध्रिका या शब्दांहून 'त्यांच्या सारखा मनुष्य' या अर्थी झालेल्या कन् प्रत्ययाचा (५।३।९६) लुप् (५।३।९८) झाला आहे. चञ्चा म्हणजे गवताची बाहुली. वध्रिका म्ह. वादी. खरकुटी म्ह. नापिताचें घर किंवा गाढवाच्या शरीराचा सांगाडा.

४—नपुंसक वस्तूचे ठिकाणीं असलेलें लिंग म्हणजे अर्थात् नपुंसकलिंगच होय.

गन्धर्वनगरं यथा ॥ ३ ॥

यथा गन्धर्वनगराणि दूरतो दृश्यन्त उपसृत्य च नोपलभ्यन्ते तद्वत्खट्वावृक्षयोरसल्लिङ्गं द्रष्टव्यम् ॥

आदित्यगतिवत्सन्न

अथवा यथादित्यस्य गतिः सती नोपलभ्यन्ते तद्वत्खट्वावृक्षयोः सल्लिङ्गं नोपलभ्यते ॥

वस्त्रान्तर्हितवच्च तत् ॥

यथा वस्त्रान्तर्हितानि द्रव्याणि नोपलभ्यते तद्वत्खट्वावृक्षयोः सल्लिङ्गं नोपलभ्यते ॥ विषम उपन्यासः । वस्त्रान्तर्हितानि द्रव्याणि वस्त्रापाय उपलभ्यन्ते खट्वावृक्षयोः पुनर्येऽप्येते रथकारा वाशीवृक्षादनहस्ता मूलात्प्रभृत्याग्राद् वृक्षांस्तक्ष्णुवन्ति तेऽपि तयोर्लिङ्गं नोपलभन्ते । केनैतदवसीयते खट्वावृक्षयोः सल्लिङ्गं नोपलभ्यत इति ॥ षड्भिः प्रकारैः सतां भावानामनुपलब्धिर्भवत्यतिसांनिकर्षादतिविप्रकर्षान्मूर्त्यन्तरव्यवधानात्तमसावृतत्वादिन्द्रियदौर्बल्यादतिप्रमादादिति । अतोऽत्र कश्चिद्धेतुर्द्रष्टव्यो येन खट्वावृक्षयोः सल्लिङ्गं नोपलभ्यते । केनैतदवसीयते खट्वावृक्षयोः सल्लिङ्गं नोपलभ्यत इति ॥

तयोस्तु तत्कृतं दृष्ट्वा

स्त्रीकृतं शब्दं दृष्ट्वा स्त्रीत्यवसीयते पुंस्कृतं दृष्ट्वा पुमानिति ॥

यथाकाशेन ज्योतिषः ॥। ४ ॥

---

किंवा जसें आकाशामध्यें एखादे वेळीं गंधर्वनगर नसूनच केवळ पित्तामुळें दुरून भासतें, पण जवळ जाऊन पाहिलें असतां वस्तुतः तेथें कांहींच नसतें तीच स्थिति खट्वा व वृक्ष येथें लिंगाची समजली पाहिजे.

(श्लो.४) अथवा जशी सूर्याची गति असून उपलब्ध होत नाहीं तसेंच खट्वा व वृक्ष येथेंही स्त्रीलिंग व पुंलिंग असून उपलब्ध होत नाहीं. अथवा वस्त्रानें आच्छादित झालेली वस्तु जशी उपलब्ध होत नाहीं तसेंच खट्वा व वृक्ष येथेंही स्त्रीलिंग व पुंलिंग असूनच उपलब्ध होत नाहीं.

पण हा दृष्टान्त बरोबर दिसत नाहीं. कारण वस्त्रानें आच्छादित झालेली वस्तु वस्त्र दूर केलें कीं स्पष्ट दिसते. पण खट्वा व वृक्ष यांचे संबंधानें पाहिलें तर सुतार लोक हे वाकस किंवा कुऱ्हाड हातांत घेऊन मुळापासून शेंड्यापर्यंत वृक्ष तोडून व तासून बारीक करतात तरी पण त्यांना आंत असलेल्या लिंगाचा थांग लागत नाहीं.

बरें, पण खट्वा व वृक्ष येथें स्त्रीलिंग व पुंलिंग असूनच उपलब्ध होत नाहीं असें तुम्ही तरी कशावरून म्हणतां?

पदार्थ विद्यमान असून त्याची उपलब्धि न होण्याचीं कारणें लोकामध्यें सहा प्रकारचीं दृष्टीस पडतात. तीं अशीं: (१) अत्यंत संनिकर्ष असल्यामुळें आपल्या डोळ्यांत घातलेलें काजळ आपल्याला दिसत नाहीं. (२) आकाशांत उंच उडालेला पक्षी अत्यंत दूर असल्यामुळें दिसत नाहीं. (३) भिंत वगैरेंच्या पलीकडील पदार्थ व्यवधानामुळें दिसत नाहीं. (४) अंधकारामुळें अंधारांतील पदार्थ दिसत नाहीं. (५) इन्द्रियांमधील शक्ति कमी झाल्यामुळें म्हाताऱ्याला सुईचें बारीक छिद्र दिसत नाहीं. (६) आणि मन दुसरीकडे गुंतलें असल्यामुळें कोण आला नि कोण गेला तें कळत नाहीं. तेव्हां खट्वा व वृक्षः येथें स्त्रीलिंग व पुंलिंग असून जें उपलब्ध होत नाहीं त्याचें कारण ह्या सहांपैकीं कांहीं तरी असलें पाहिजे. तेव्हां खट्वा व वृक्षः येथें लिंग असूनही उपलब्ध होत नाहीं याचें काय बरें कारण असावें?

खट्वा येथें टाप् प्रत्यय केलेला दिसतो, वृक्षान् येथें नत्व केलेलें (६।१।१०३) दिसतें; तें पाहून स्त्रीलिंग व पुंलिंग यांचें अनुमान होतें.

तद्यथा । आकाशं दृष्ट्वा ज्योतिरत्रेति गम्यते ज्योतिर्निमित्तं ह्याकाशम् ॥

**अन्योऽन्यसंश्रयं त्वेतत्**

अन्योऽन्यसंश्रयं त्वेतद्भवति । स्त्रीकृतः शब्दः शब्दकृतं च स्त्रीत्वम् । एतदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते ॥

**प्रत्यक्षेण विरुध्यते ॥**

प्रत्यक्षेण खल्वपि स विरुध्यते य आह खट्वावृक्षयोः सलिङ्गं नोपलभ्यत इति । तत्र स्वेन्द्रियविरोधः कृतो भवति न च नाम स्वेन्द्रियविरोधिना भवितव्यम् ॥

**तटे च सर्वलिङ्गानि दृष्ट्वा**
**कोऽध्यवसास्यति ॥ ५ ॥**

तटे च खल्वपि सर्वाणि लिङ्गानि दृष्ट्वा तटः तटी तटमिति कस्तदध्यवसातुमर्हतीयं स्त्र्ययं पुमानिदं नपुंसकमिति ॥

तस्मान्न वैयाकरणैः शक्यं लौकिकं लिङ्गमास्थातुम् । अवश्यं च कश्चित्स्वकृतान्त आस्थेयः । कोऽसौ स्वकृतान्तः ।

**संस्त्यानप्रसवौ लिङ्गमास्थेयौ**
**स्वकृतान्ततः ।**

संस्त्यानप्रसवौ लिङ्गमास्थेयौ । किमिदं संस्त्यानप्रसवाविति ।

**संस्त्याने स्त्यायतेर्ड्रट् स्त्री सूतेः**
**सप्प्रसवे पुमान् ॥ ६ ॥**

---

जसें सूर्य चंद्र वगैरे ज्योती प्रत्यक्ष दिसल्या नाहींत तरी आकाशांतील उजेड पाहून सूर्य चंद्र वगैरे ज्योतींचें अनुमानानें ज्ञान होतें. कारण ज्योतीमुळेंच आकाश स्पष्ट दिसतें.

(श्लो. ५) परंतु, जर टाप् पाहून त्यावरून स्त्रीत्वाचें अनुमान होतें, त्याशिवाय स्त्रीत्वाचें ज्ञान होण्याला इतर कांहीं साधन नसेल तर 'स्त्रीत्व समजल्यामुळें टाप् प्रत्यय करतां येतो आणि टाप् प्रत्यय पाहून स्त्रीत्व समजतें' असा इतरेतराश्रय दोष येतो; आणि असा इतरेतराश्रय दोष जेथें येतो तेथें दोहोंपैकीं कांहींच सिद्ध होत नाहीं.

शिवाय, 'खट्वा व वृक्षः येथें ज्या अर्थीं लिंग दिसत नाहीं त्या अर्थीं तेथें लिंग नाहींच' असा अभावाचा अनुभव सूक्ष्म द्रष्ट्यालाही होत आहे. तेव्हां 'लिंग असून उपलब्ध होत नाहीं' हें म्हणणें प्रत्यक्ष प्रमाणाशीं विरुद्ध होत आहे. कारण असें म्हणणारा हा आपल्याच इंद्रियांशीं आपण विरोध करतो असें होतें आणि असा आपणच आपल्या इंद्रियांशीं विरोध कोणी तरी करतो काय ?

शिवाय तटः तटी तटम् अशीं तिन्ही लिंगांचीं कार्यें दृष्टीस पडलीं तरी त्यावरून ही स्त्री आहे, हा पुमान् आहे, आणि हें नपुंसक आहे, अशा रीतीनें 'तट शब्दाला सर्व लिंगें आहेत' असें कोण बरें अनुमानानें निश्चय करील ?

एकंदरींत ही लौकिक लिंगाची व्याख्या वैयाकरण लोकांनी आपल्या शास्त्रामध्यें घेणें शक्य नाहीं. तर त्यांनीं आपल्या शास्त्रापुरता लिंगासंबंधानें स्वतंत्र सिद्धान्त मानला पाहिजे.

तर मग तो सिद्धान्त कोणता ?

(श्लो ६.) वैयाकरणांनीं आपल्या सिद्धान्ताप्रमाणें स्त्रीचें 'संस्त्यान' हे लिंग, आणि पुरुषाचें 'प्रसव' हें लिंग आहे असें समजावें.

संस्त्यान आणि प्रसव म्हणजे काय ?

'संस्त्यान' म्हणजे 'एका ठिकाणीं जुळणें' या अर्थाच्या स्त्यै धातूला ड्रट् प्रत्यय ( उणा. ४। १६५ ) लागून स्त्री हा शब्द सिद्ध होतो. तसेंच 'प्रसव' म्हणजे 'उत्पत्ति' या अर्थाच्या सू धातूला ड्मुसुन् प्रत्यय लागून आणि धातूच्या सकाराला पकार व ऊकाराला ऱ्हस्व होऊन पुमान् हा शब्द सिद्ध होतो.

---

५—तदभावे नपुंसकम् ( पृ. १९६ पं. ५ ) असें म्हटलें असल्यामुळें स्त्रीलिंग आणि पुल्लिंग यांच्याशीं नपुंसकलिंग विरुद्ध होतें. आणि विरुद्ध अशा अनेक पदार्थांचें एके ठिकाणीं अनुमान होत नाहीं.

**इति । ननु च लोके ऽपि स्त्यायतेरेव स्त्री सूतेश्च पुमान् । अधिकरणसाधना लोके स्त्री । स्त्यायत्यस्यां गर्भ इति । कर्तृसाधनश्च पुमान् । सूते पुमानिति । इह पुनरुभयं भावसाधनम् । स्त्यानं स्त्री प्रवृत्तिश्च पुमान् । कस्य पुनः स्त्यानं स्त्री प्रवृत्तिर्वा पुमान् । गुणानाम् । केषाम् । शब्दस्पर्शरूपरसगन्धानाम् । सर्वाश्च पुनर्मूर्तय एवमात्मिकाः संस्त्यानप्रसवगुणाः शब्दस्पर्शरूपरसगन्धवत्यः । यत्राल्पीयांसो गुणास्तत्रावरतस्त्रयः शब्दः स्पर्शो रूपमिति । रसगन्धौ न सर्वत्र । प्रवृत्तिः खल्वपि नित्या । न हीह कश्चित्स्वस्मिन्नात्मनि मुहूर्तमप्यवतिष्ठते । वर्धते वा यावदनेन वर्धितव्यमपायेन वा युज्यते । तच्चोभयं सर्वत्र । यद्युभयं सर्वत्र कुतो व्यवस्था । विवक्षातः । संस्त्यानविवक्षायां स्त्री प्रसवविवक्षायां पुमानुभयोरविवक्षायां नपुंसकम् ॥**

---

पण लोकामध्यें स्त्यै धातूपासून स्त्री शब्द सिद्ध होतो आणि सू धातूपासून पुमान् हा शब्द सिद्ध होतो असेंच समजतें ना ?

जरी स्त्री शब्द तसाच साधला आहे तरी तेथें प्रत्ययाचा अर्थ अधिकरण समजला जातो. 'स्त्यायति गर्भ:अस्याम्' असा विग्रह लोक समजतात. तसा पुमान् या शब्दामध्यें प्रत्ययाचा कर्ता हा अर्थ आहे. 'सूते इति पुमान्' असा विग्रह लोक समजतात. आणि आम्ही तर येथें स्त्री व पुमान् या दोन्ही शब्दांमध्यें प्रत्ययाचा अर्थ भाव घेत आहों. संस्त्यान हाच अर्थ स्त्री या लिंगबोधक शब्दाचा आहे. आणि पुमान् या पुंलिंगबोधक शब्दाचा अर्थ प्रवृत्ति हाच आहे.

पण कोणाच्या संस्त्यानाला स्त्री असें म्हणावें आणि कोणाच्या प्रवृत्तीला पुमान् म्हणावें ?

गुणांच्या संस्त्यानाला ( म्ह. जुळण्याला ) स्त्री असें म्हणावें. आणि गुणांच्याच प्रवृत्तीला पुमान् म्हणावें.

हे गुण कोणते बरें ?

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गन्ध हे ते गुण होत. जगांतल्या यच्च यावत् सर्व वस्तू अशाच आहेत कीं ज्यांच्यामध्यें ज्या गुणांचें संस्त्यानही आहे आणि प्रवृत्तीही आहे अशा प्रकारचे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गन्ध हे गुण सर्वत्र आहेतच. ज्या ठिकाणीं ह्या गुणापैकीं कमी गुण असतील तेथें कमींत कमी शब्द,स्पर्श आणि रूप हे तीन तरी असतातच. रस आणि गन्ध हे फक्त दोन गुण सर्व ठिकाणीं नसतात. अशा रीतीनें गुण जरी कमी ज्यास्त असले तरी तेथें प्रवृत्ती ही कायमचीच[६] आहे. कारण अशी वस्तु एकही दिसत नाहीं कीं जी सूक्ष्म रूपानें सुद्धां वृद्धि किंवा ऱ्हास न होतां क्षणभर आपल्या स्वरूपानेंच राहते. उलट ज्या वस्तूची जितकी वाढ असेल तोंपर्यंत ती हळूहळू वाढत असणारच व इतर अंशानें कमी होत असणारच. तात्पर्य, वृद्धि व ऱ्हास[७] हे सर्वत्र आहेतच.

पण असे जर सर्वच वस्तूंमध्यें वृद्धि व ऱ्हास म्हणजे पुंल्हिंग आणि स्त्रीलिंग आहेत तर त्या त्या विशेष कार्योंची व्यवस्था कशी व्हावी?

विवक्षेमुळें व्यवस्था होते. संस्त्यानाची विवक्षा असेल तर स्त्रीलिंगाचें कार्य करावें. प्रसवाची विवक्षा असेल तर पुंल्हिंगाचें कार्य करावें. आणि त्या दोहोंच्या साम्याची विवक्षा असेल तर नपुंसकलिंगाचें कार्य करावें.

---

६—शब्द, स्पर्श वगैरे जे गुण त्यांच्या मुळाशीं सत्त्व रज आणि तम हे तीन गुण आहेत. आणि 'चलं गुणवृत्तम्' म्हणजे सत्त्व वगैरे गुणांचें वर्तन चंचल आहे. एखाद्या गुणाची वृद्धि इतर दोन गुणांचा ऱ्हास व यांमध्येंही कमजास्तपणा ही स्थिति सदोदित चालूच आहे.

७—वृद्धीलाच उपचय म्हणतात, व विकास व प्रसव असेंही म्हणतात. हेंच पुंल्हिंग होय. आणि ऱ्हासाला अपचय, संकोच व संस्त्यान म्हणतात. हेंच स्त्रीलिंग होय. आणि साम्यावस्थेला नपुंसकलिंग म्हणतात.

## तस्योक्तौ लोकतो नाम

तस्योक्तौ च वचने लोकतो नामैतद्भवति स्त्री पुमान्नपुंसकमिति ॥

## गुणो वा लुपि युक्तवत् ॥

वध्रिकादिषु भूयान्परिहारः । लुपि युक्तवद्व्यक्तिवचने [१. २. ५१] इत्येवमत्र गुणो भवति ॥ न चैतन्मन्तव्यं स्वमनीषिकयोच्यत इति । पठिष्यति ह्याचार्यो लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्येति । पुनः पठिष्यत्येकार्थे शब्दान्यत्वाद् दृष्टं लिङ्गान्यत्वमवयवान्यत्वाच्चेति ॥

संस्त्याने स्त्यायतेर्ड्रट् स्त्री सूतेः सप्प्रसवे पुमान् ।
तस्योक्तौ लोकतो नाम गुणो वा लुपि युक्तवत् ॥

कथं पुनरिदं विज्ञायते । स्त्रियामभिधेयायां टाबादयो भवन्तीति । आहोस्वित्स्त्रीसमानाधिकरणात्प्रातिपदिकादिति । कश्चात्र विशेषः ।

## स्त्रियामिति स्त्र्यर्थाभिधाने चेट्टाबादयो द्विवचनबहुवचनानेकप्रत्ययानुपपत्तिः ॥१॥

स्त्रियामिति स्त्र्यर्थाभिधाने चेट्टाबादयो भवन्ति द्विवचनबहुवचनयोरनुपपत्तिः । कुमार्यौ कुमार्यः । किशोर्यौ किशोर्यः । किं कारणम् । एको ऽयमर्थः स्त्रीत्वं नाम तस्यैकत्वादेकवचनमेव प्राप्नोति ॥ अनेकप्रत्ययानुपपत्तिश्च । अनेकश्च प्रत्ययो नोपपद्यते। गार्ग्यायणी कारीषगन्ध्या कालितरेति । किं कारणम् । एकत्वात्स्त्रीत्वस्य ।

---

( श्लो. ७ ) तेव्हां भाषेमध्यें हें पुंलिंग हें स्त्रीलिंग आणि हें नपुंसकलिंग ही व्यवस्था लौकिक प्रयोगावरून समजावी.

वध्रिका वगैरे शब्दांचे ठिकाणीं तर चांगलाच परिहार आहे. तेथें स्त्रीलिंग मानण्याला ' लुपि युक्तवद् व्यक्तिवचने ' (१।२।५१) हें शास्त्र प्रमाण आहे, हा तेथें अधिक गुणच होय.

आतां येथें ' हें आम्ही आपल्याच कल्पनेनें कांहीं तरी बोलतों' असें मात्र समजूं नये. कारण आचार्य वार्तिककार ' लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य ' (४।१।९२ वा. १) असें सांगणार आहेत. तसेंच त्याच्या पुढें पुनः आणखी ' एकार्थे शब्दान्यत्वाद् दृष्टं लिङ्गान्यत्वम्', 'अवयवान्यत्वाच्च ' (४।१।९२ वा. ६।७) असेंही सांगणार आहेत.

आतां येथें स्त्रीत्व या अर्थीं टाप् वगैरे प्रत्यय होतात असा अर्थ आहे किंवा स्त्रीसमानाधिकरण जें प्रातिपदिक त्याहून टाप् वगैरे प्रत्यय होतात असा अर्थ आहे ?

या दोन अर्थांमध्यें काय बरें फरक आहे ?

( वा. १ ) स्त्रीत्व या अर्थीं टाप् वगैरे प्रत्यय होतात असें म्हटलें तर कुमार्यौ, कुमार्यः, किशोर्यौ, किशोर्यः, येथें स्त्रीप्रत्ययान्ताच्या पुढें द्विवचन आणि बहुवचन प्रत्यय उत्पन्न होणार नाहींत.

काय कारण ?

कारण असें कीं स्त्रीत्व म्हणून जें काय आहे तें एकच आहे. तेव्हां तें एकच असल्यामुळें त्याच्या पुढें एकवचन-प्रत्ययच होईल. तसेंच अनेक स्त्रीप्रत्यय एकाच उदाहरणामध्यें जे होतात ते होणार नाहींत. उदा० गार्ग्यायणी, कारीषगन्ध्या, कालितरा.

काय कारण ?

---

८—तेव्हां भ्रकुंसाचे ठिकाणीं लौकिक स्त्रीलिंग जरी दृष्टीस पडलें तरी शास्त्रीय पुल्लिंग घेतां येईल आणि त्यामुळेंच टाप् होत नाहीं असें म्हणतां येईल. तसेंच चञ्चा, वध्रिका येथेंही लौकिक पुल्लिंग जरी दृष्टीस पडलें

९—गार्ग्यायणी येथें ष्य ( ४।१।१७ ) आणि ङीष् ( ४।१।४१ ) असे दोन स्त्रीप्रत्यय झाले आहेत. तसेंच कारीषगन्ध्या येथें ष्यङ् ( ४।१।७८ ) आणि चाप् ( ४।१।७४ ), व कालितरा येथें ङीप् ( ४।१।४२ ) आणि

एकोऽयमर्थः स्त्रीत्वं नाम तस्यैकेनोक्तत्वाद् द्वितीयस्य प्रयोगेण न भवितव्यम् । किं कारणम् । उक्तार्थानामप्रयोग इति ॥

स्त्र्यर्थस्य च प्रातिपदिकार्थत्वात्त्रियामिति लिङ्गानुपपत्तिः ॥ २ ॥

स्त्र्यर्थस्य च प्रातिपदिकार्थत्वात्स्त्रियामितीकारो न प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि स्त्रीसमानाधिकरणात्प्रातिपदिकादिति ।

स्त्रीसमानाधिकरणादिति चेद्भूतादिष्वतिप्रसङ्गः ॥ ३ ॥

स्त्रीसमानाधिकरणादिति चेद् भूतादिष्वतिप्रसङ्गो भवति । भूतमियं ब्राह्मणी । कारणमियं ब्राह्मणी । आवपनमियमुष्ट्रिकेति ॥ स्त्र्यर्थाभिधाने पुनष्टाबादिषु सत्स्विह तावद् भूतामियं ब्राह्मणीति नात्र स्त्रीत्वं विवक्षितम् । किं तर्हि । पौतन्यम् । कारणमियं ब्राह्मणीति नात्र स्त्रीत्वं विवक्षितम् । किं तर्हि । प्राधान्यम् । आवपनमुष्ट्रिकेति नात्र स्त्रीत्वं विवक्षितम् । किं तर्हि । संभवनम् ॥

षट्संज्ञकेभ्यश्च प्रतिषेधः ॥ ४ ॥

षट्संज्ञकेभ्यश्च प्रतिषेधो वक्तव्यः । पञ्च ब्राह्मण्यः । दश ब्राह्मण्यः ॥ स्त्र्यर्थाभिधाने पुनष्टाबादिषु सत्सु नात्र स्त्रीत्वं विवक्षितम् । किं तर्हि । भेदो विवक्षितः संख्या ॥ इह च स्त्री ईकारो न प्राप्नोति । न हि तेनैव तस्य सामाना-

कारण असें कीं स्त्रीत्व म्हणून जें कांहीं आहे तें एकच आहे. तेव्हां तें एका प्रत्ययानें उक्त होत असल्यामुळें त्या अर्थी पुनः दुसऱ्या प्रत्ययाचा प्रयोग होऊं नये.काय कारण?

कारण असें कीं जो अर्थ एका शब्दानें उक्त झाला तेथें त्याच अर्थीं पुनः दुसऱ्या शब्दाचा प्रयोग होत नाहीं असा न्यायच आहे.

(वा. २) तसेंच, स्त्री या शब्दामध्यें स्त्र या प्रातिपदिकानें स्त्रीत्व (संस्त्यान) उक्त होत असल्यामुळें त्याहून स्त्रीत्व या अर्थीं ईकार (४।१।१५) प्राप्त होत नाहीं.

तर मग आतां स्त्री-समानाधिकरण जें प्रातिपदिक त्याहून टाप् वगैरे प्रत्यय होतात हाच पक्ष असू दे.

(वा. ३) स्त्री-समानाधिकरण जें प्रातिपदिक त्याहून टाप् वगैरे प्रत्यय होतात असें मानलें तर भूतमियं ब्राह्मणी, कारणमियं ब्राह्मणी, आवपनमियमुष्ट्रिका इत्यादि उदाहरणांमध्यें भूत, कारण, आवपन इत्यादि शब्दांहून स्त्री-प्रत्यय होऊं लागतील. 'स्त्रीत्व या अर्थीं टाप् वगैरे प्रत्यय होतात' असा पक्ष घेतला म्हणजे मात्र येथें दोष येत नाहीं. कारण भूतमियं ब्राह्मणी येथें भूत शब्दानें पौतन्य (म्ह. शुद्धत्व) दाखवावयाचें आहे; तेथें स्त्रीत्वाची विवक्षा नाहीं. तसेंच कारणमियं ब्राह्मणी येथें कारण शब्दानें मुख्यत्व दाखवावयाचें आहे; तेथें स्त्रीत्वाची विवक्षा नाहीं. तसेंच आवपनमियं उष्ट्रिका येथें आवपन शब्दानें बीं पेरण्याचें भांडें दाखवावयाचें आहे तेथेंही स्त्रीत्वाची विवक्षा नाहीं.

(वा. ४) तसेंच स्त्रीसमानाधिकरण प्रातिपदिकाहून टाप् वगैरे प्रत्यय होतात या पक्षीं षट्-संज्ञक (१।१।२४) शब्दांहून टाप् वगैरे प्रत्यय होत नाहींत असा निषेध सांगितला पाहिजे. उदा०—पञ्च ब्राह्मण्यः, दश ब्राह्मण्यः. स्त्रीत्व या अर्थीं टाप् वगैरे प्रत्यय होतात असा पक्ष घेतला म्हणजे मात्र दोष येत नाहीं. कारण येथें स्त्रीत्वाची विवक्षा नाहीं.

तर मग कशाची विवक्षा आहे?

येथें पञ्च या म्हणण्यानें चार किंवा सहा नाहीत अशी न्यूनाधिक संख्येची व्यावृत्ति विवक्षित आहे. तसेंच स्त्रीसमानाधिकरण जें प्रातिपदिक त्याहून टाप् वगैरे प्रत्यय होतात या पक्षीं स्त्री या शब्दामध्यें ईकार (४।१।१५)

झाले आहेत.

१०—मागें (४।१।१ टी. २९) पहा. 'ब्राह्मणी स्त्री' असें ब्राह्मणी याचें स्त्री शब्दाशीं सामानाधिकरण्य संभवतें. तेव्हां येथें ब्राह्मणी शब्दाशीं समानाधिकरण जो भूत शब्द त्याचेंही स्त्रीशब्दाशीं सामानाधिकरण्य संभवणारच.

धिकरण्यमस्ति ॥

**सिद्धं तु स्त्रियाः प्रातिपदिकविशेषणत्वात्स्वार्थे टाबादयः ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रातिपदिकविशेषणत्वात् । प्रातिपदिकविशेषणं स्त्रीग्रहणं स्वार्थिकाष्टाबादयः । नैवं विज्ञायते स्त्रियामभिधेयायामिति नापि स्त्रीसमानाधिकरणादिति । कथं तर्हि । स्त्रियां यत्प्रातिपदिकं वर्तते तस्माट्टाबादयो भवन्ति । कस्मिन्नर्थे । स्वार्थ इति ॥ अथवा पुनरस्तु स्त्रियामभिधेयायामिति । ननु चोक्तं स्त्रियामिति स्त्र्यर्थाभिधाने चेट्टाबादयो द्विवचनबहुवचनानेकप्रत्ययानुपपत्तिः स्त्र्यर्थस्य च प्रातिपदिकार्थत्वात्स्त्रियामिति लिङ्गानुपपत्तिरिति । नैष दोषः । यत्तावदुच्यते द्विवचनबहुवचनयोरनुपपत्तिरिति

**गुणवचनस्य चाश्रयतो लिङ्गवचनभावात् ॥ ६ ॥**

गुणवचनानां हि शब्दानामाश्रयतो लिङ्गवचनानि भवन्ति । तद्यथा । शुक्लं वस्त्रम् शुक्ला शाटी शुक्लः कम्बलः शुक्लौ कम्बलौ शुक्लाः कम्बला इति । यदसौ द्रव्यं श्रितो भवति गुणस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तद् गुणस्यापि भवति । एवमिहापि यदसौ द्रव्यं श्रितं भवति स्त्रीत्वं तस्य यल्लिङ्गं वचनं च तत्स्त्रीत्वस्यापि भविष्यति ॥ यदप्युच्यतेऽनेकप्रत्ययानुपपत्तिरिति

**भावस्य च भावयुक्तत्वात् ॥ ७ ॥**

---

होणार नाहीं. कारण स्त्री शब्दाला स्त्री शब्दाचें आपलेंच आपल्याला सामानाधिकरण्य संभवत नाहीं.

( वा. ५ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें कीं स्त्रियाम् हें प्रातिपदिकाचें विशेषण आहे. आणि टाप् वगैरे प्रत्यय हे स्वार्थींच होतात. म्हणजे स्त्रीत्व या अर्थीं टाप् वगैरे प्रत्यय होतात असें आम्ही समजत नाहीं. तसेंच स्त्रीसमानाधिकरण प्रातिपदिकाहून टाप् वगैरे प्रत्यय होतात असेंही आम्ही समजत नाहीं.

तर मग कसें समजतां ?

असें समजतों कीं—स्त्रीत्व या अर्थीं असलेलें जें प्रातिपदिक त्याहून टाप् वगैरे प्रत्यय होतात. ते कोणत्या अर्थीं होतात असा प्रश्न उद्भवला तर त्याचें उत्तर ' ते प्रत्यय स्वार्थीं होतात ' हें होय.

अथवा स्त्रीत्व या अर्थींच टाप् वगैरे प्रत्यय होतात असाच पक्ष असूं दे. पण 'स्त्रीत्व या अर्थीं टाप् वगैरे प्रत्यय होतील तर पुढें द्विवचन व बहुवचन प्रत्यय होणार नाहींत, तसेंच एका ठिकाणीं अनेक स्त्रीप्रत्ययही होणार नाहींत आणि स्त्री शब्दामध्यें प्रातिपदिकार्नेंच स्त्रीत्व उक्त असल्यामुळें ईकार होणार नाहीं' असे त्या पक्षावर दोष दाखविले आहेत ना ?

हे दोष येत नाहींत. त्यांपैकीं द्विवचन व बहुवचन प्रत्यय होणार नाहींत असें जें म्हटलें आहे त्याचें उत्तर असें कीं—

(वा. ६) गुणवाचक शब्दाला जे लिंग व वचन दाखविणारे प्रत्यय लागतात ते त्या गुणांच्या आश्रयावरून लागतात. उदा०—शुक्लं वस्त्रम्, शुक्ला शाटी, शुक्लः कम्बलः, शुक्लौ कम्बलौ, शुक्लाः कम्बलाः. येथें शुक्ल शब्द हा पांढरा रंग या गुणाचा वाचक आहे. त्या गुणाचा आश्रय जें वस्त्र वगैरे द्रव्य त्याचीं लिंगवचनें त्या शुक्ल शब्दाला लागलीं आहेत. त्याप्रमाणें येथेंही स्त्रीत्व या गुणाचा कुमारी व किशोरी हा आश्रय आहे. त्या आश्रयाचें जें द्विवचन तसेंच बहुवचन तें त्या स्त्रीत्ववाचक शब्दाला लावतां येईल. तसेंच, एकाच उदाहरणामध्यें अनेक स्त्रीप्रत्यय होणार नाहींत असें जें म्हटलें आहे त्याचें उत्तर—

भावो भावेन युज्यते। तद्यथा। इषिरिषिणा निमन्त्रिश्च निमन्त्रिणा॥ विषम उपन्यासः। युक्तं तत्रान्यत्वं साधनभेदात्कालभेदाच्च। उक्तं तत्रैकस्य बाह्यं साधनं सर्वकालश्च प्रत्ययोऽपरस्याभ्यन्तरं साधनं वर्तमानकालश्च प्रत्यय इति। इह पुनरेकं स्त्रीत्वम्॥ अथैकमप्युपलभ्यते। किं चातः। यद्येकमुपलभ्यते द्वितीयमप्युपलभ्यताम्। अथैकमप्यनुमानगम्यं द्वितीयमप्यनुमानाद्गम्यताम्॥ कस्य तावद्भवानेतं गुणं न्याय्यं मन्यते स्त्रीत्वं नाम। द्रव्यस्य। द्रव्ये च भवतः कः संप्रत्ययः। यदि तावद् गुणसमुदायो द्रव्यं का गतिर्यएते भावाः कृदभिहितास्तद्धिताभिहिताश्च। चिकीर्षा गोतेति। अथ मतमेतत्कृदभिहितो भावो द्रव्यवद्भवतीति स्त्रीत्वमपि स्त्रीत्वेनाभिहितं द्रव्यवद्भविष्यति॥ क्व च तावद्दोषः स्यात्। दृष्टस्य हि दोषस्य सुसुखः परिहारो गार्ग्यायणी कारीषग-

(वा. ७) भावाचा भावाशीं संबंध होतो. उदा०—एषितुमिच्छति एषिषिषति. येथें इष् धातूचा अर्थ जी इच्छा तिचा इच्छेशींच संबंध होतो. निमन्त्रयेत् येथें निमन्त्रण या धात्वर्थाचा निमन्त्रणाशींच संबंध होऊन लिङ् प्रत्यय होतो. तसें येथें एका प्रत्ययानें स्त्रीत्व उक्त झालें तरी त्याचा पुनः स्त्रीत्वाशींच संबंध होऊन दुसरा स्त्री—प्रत्यय होईल.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण, भिन्न भिन्न कारकांमुळें आणि भिन्न भिन्न कालांमुळें भावांमध्यें भेद भासतो तें युक्त आहे. एषितुम् इच्छति येथें एषितुम् या इच्छेचें कर्मकारक भोजन वगैरे कांहीं तरी बाह्य आहे, आणि तुमुन् प्रत्यय हा कालसामान्य या अर्थी आहे. तसेंच इच्छति या इच्छेचें कर्मकारक आभ्यन्तर म्हणजे एषितुम् ही इच्छाच आहे, व पुढील प्रत्यय वर्तमानकालीं केलेला आहे. पण येथें पाहावें तर स्त्रीत्व एकच आहे. तेव्हां आपला आपल्याशीं संबंध होत नसल्यामुळें दोन स्त्रीप्रत्यय होणार नाहींत.

पण येथें एकच स्त्रीत्व आहे असें जें म्हणतां तें एक स्त्रीत्व तरी तुम्हाला प्रत्यक्ष उपलब्ध होत आहे कां?

मग यांत तुम्हाला काय करावयाचें आहे?

जर एक स्त्रीत्व प्रत्यक्ष उपलब्ध होतें असें म्हणाल तर दुसरेंही तसेंच उपलब्ध होतें असें कबूल करावें लागेल. आतां एकस्त्रीत्वही अनुमानानें समजतें असें म्हणाल तर दुसरेंही अनुमानानें समजतें असें म्हणावें लागेल.

शिवाय स्त्रीत्व हें येथें एकच आहे असें जें तुम्ही म्हणतां तो स्त्रीत्व हा गुण कोणाचा आहे असें योग्य रीतीनें तुम्हांला वाटतें?

तो गुण द्रव्याचा आहे.

बरें; आतां द्रव्याच्या स्वरूपाविषयीं तुमची काय समजूत आहे?

जर रूप वगैरे गुणांच्या समुदायालाच द्रव्य म्हणत असाल तर चिकीर्षा वगैरे उदाहरणांमध्यें अ (३।३।१०२) वगैरे कृत् प्रत्ययांनीं आणि गोता वगैरे उदाहरणांमध्यें तल् (५।१।११९) वगैरे तद्धित प्रत्ययांनीं प्रतिपादन केलेले जे भाव त्यांची काय वाट लावाल?

आतां कृत् प्रत्ययानें प्रतिपादन केलेला भाव हा द्रव्यासारखा प्रतीत होतो असें जर मत असेल त स्त्रीत्व हें देखील 'स्त्रीत्व' या शब्दानें प्रतिपादन केलेलें द्रव्यासारखें समजतां येईल.[११]

शिवाय, एका उदाहरणांत अनेक स्त्रीप्रत्यय होणार नाहींत म्हणून दोष तरी कोठें येणार आहे? ज्या ठिकाणीं दोष दाखविला आहे

११—द्रव्यासारखें समजलें म्हणजे त्या स्त्रीत्वाला पुनः लिंगाशीं योग होण्यास अडचण नाहीं. तेव्हां अनेक स्त्रीप्रत्यय करतां येतील.

न्ध्या कालितरेति । इह तावद्गार्ग्यायणीति षित्करणसामर्थ्यान्ङीष्भविष्यति । कारीषगन्ध्येति वचनाच्चाब्भविष्यति । कालितरेति न यावत्काली तावत् कालितरा । किं तर्हि । प्रकृष्टा काली कालितरा । यत्तच्छब्दरूपं प्रकर्षे वर्तते तस्यानुक्तं स्त्रीत्वमिति कृत्वा टाब्भविष्यति ॥ यदप्युच्यत इह च स्त्री ईकारो न प्राप्नोतीति निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । स्त्रियामवन्तिकुन्तिकुरुभ्यश्च [४.१.१७६] इति ॥

## स्त्रीविषये ङ्याबोरप्रसिद्धिरकारान्तादर्शनात् ॥ ८ ॥

स्त्रीविषये ङ्याबोरप्रसिद्धिः । खट्वा माला । किं कारणम् । अकारान्तादर्शनात् । न ह्यकारान्तता दृश्यते । ननु चेयं दृश्यते । अतिखट्वः अतिमाल इति । नैषाकारान्तता । आप एवैतद् ह्रस्वत्वम् ॥

## सर्वेषां तु स्वरवर्णानुपूर्वीज्ञानार्थ उपदेशः ॥ ९ ॥

सर्वेषामेव तु प्रातिपदिकानां स्वरवर्णानुपूर्वीज्ञानार्थ उपदेशः कर्तव्यः । शशः । षष इति मा भूत् । पलाशः । पलाष इति मा भूत् । मञ्चकः । मञ्जक इति मा भूत् ॥

## तस्मात्सिद्धम् ॥ १० ॥

---

तेथें तर त्याचा चांगलाच परिहार होत आहे. गार्ग्यायणी येथें ष्फ हा स्त्रीप्रत्यय झाल्यानंतर दुसरा स्त्रीप्रत्यय ङीष् न होईल तर ष्फ प्रत्ययाचा षकार व्यर्थ होईल; तेव्हां त्याच्या सामर्थ्यास्तवच तेथें ङीष् होईल. कारीषगन्ध्या येथें तर ष्यङ् प्रत्ययानंतर त्याहून मुद्दाम चाप् प्रत्यय सांगितला असल्यामुळेंच तो होईल. कालितरा येथें एकाचा दोन स्त्रीत्वांशीं संबंध नाहींच. असें पहा की जी साधारण काळी आहे तिला कालितरा म्हणतच नाहींत, तर अत्यंत काळीलाच कालितरा म्हणतात. तेव्हां येथें अत्यंत काळेपणा दाखविणारें जें कालितर हें शब्दस्वरूप त्याहून त्याचें स्त्रीत्व दाखविणारा टाप् प्रत्यय होईलच. कारण, काली या ङीष् प्रत्ययानें त्याचें स्त्रीत्व उक्त झालेंच नाहीं. त्याप्रमाणेंच स्त्री या शब्दामध्यें स्त्री या प्रातिपदिकानेंच संख्यान (स्त्रीत्व) उक्त होत असल्यामुळें पुनः त्या अर्थी ङीप् प्रत्यय होणार नाहीं असा जो दोष दिला आहे तोही येत नाहीं. कारण निपातनावरूनच इष्टरूप सिद्ध होत आहे.

तें निपातन कोणतें बरें?

स्त्रियामवन्तिकुन्तिकुरुभ्यश्च (४।१।१७५) येथें स्त्रियाम् असें जे आचार्यांनीं उच्चारलें आहे तें निपातन होय.

(वा. ८) खट्वा माला इत्यादि नित्य-स्त्रीलिंगी शब्दांमध्यें ङी व आप् प्रत्यय केले आहेत असें म्हणतां येत नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं खट्व व माल असे हे ऱ्हस्व-अकारान्त शब्द कोठेंच दृष्टी पडत नाहींत.

पण अतिखट्वः अतिमालः येथें ते शब्द ऱ्हस्व-अकारान्त दृष्टीस पडतात ना?

तेथें ते शब्द ऱ्हस्व-अकारान्त आहेत असें समजूं नये. तर खट्वा व माला या आकारान्त शब्दांना तेथें ऱ्हस्व (१।१।४८) झाला आहे.

(वा. ९) प्रत्येक प्रातिपदिकामध्यें स्वर कोणते आहेत, वर्ण कोणते आहेत, त्यांचा क्रम कसा आहे वगैरे समजण्याकरितां सर्वच प्रातिपदिकांचा उपदेश केला पाहिजे. कारण शश या प्रातिपदिकाच्या ऐवजीं कोणी षष म्हणूं नये, पलाश शब्दाच्या ऐवजीं पलाष असें कोणीं म्हणूं नये, तसेंच मञ्चक शब्दाच्या ऐवजी मञ्जक असें कोणीं म्हणूं नये.

तस्मात्सिद्धमेतद्भवति ॥ अथवेयमकारान्तता दृश्यते । पञ्चभिः खट्वाभिः क्रीतः पटः पञ्चखट्वः दशखट्वः ॥

## अजाद्यतष्टाप् ॥ ४।१।४ ॥

## शूद्रा चामहत्पूर्वा ॥ १ ॥

शूद्रा चामहत्पूर्वेति वक्तव्यम् । शूद्रा । अमहत्पूर्वेति किमर्थम् । महाशूद्री ॥

## जातिः ॥ २ ॥

जातिरिति वक्तव्यम् । या हि महती शूद्रा महाशूद्रा सा भवति ॥

शूद्रशब्दोऽजादिषु पठ्यते तत्र कः प्रसङ्गो यन्महत्पूर्वात्स्यात् । नैव प्राप्नोति नार्थः प्रतिषेधेन । तदन्तविधिना प्राप्नोति । ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिः प्रतिषिध्यते । एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यो भवतीह तदन्तविधिरिति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । भवती अतिभवती महती अतिमहती अत्र तदन्तविधिः सिद्धो भवति । जातिरिति च वक्ष्यामीति ॥ यद्येतज्ज्ञाप्यते पञ्चाजी दशाजी अत्रापि प्राप्नोति ।

(वा. १०) तेव्हां खट्व व माल याही प्रातिपदिकांचा उपदेश केला असल्यामुळें त्यांहून टाप् वगैरे प्रत्यय होऊन हें सिद्ध होईल. अथवां खट्व असा अकारान्त शब्द दृष्टीस पडतो. उदा.—पञ्चभिः खट्वाभिः क्रीतः पञ्चखट्वः' दशखट्वः.

(सू. ४ वा. १) महत् शब्द मागें नसेल तर नुसत्या शूद्र शब्दाहून स्त्रीत्व या अर्थी टाप् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा.—शूद्रा. अमहत्पूर्वा म्हणजे महत् शब्द मागें नसला पाहिजे असें म्हटल्यामुळें महाशूद्री येथें टाप् होत नाहीं.

(वा. २) अमहत्पूर्वा हा निषेध जाति ही वाच्य असतांनाच होतो असें म्हणावें. मोठ्या योग्यतेची शूद्र स्त्री या अर्थी महाशूद्रा असें होतेंच.

पण येथें अजादि गणामध्यें नुसता शूद्र शब्द उच्चारला आहे. तेव्हां महाशूद्र शब्दाहून टाप् प्रत्ययाची प्राप्ति तरी कशी येणार ? अर्थात् प्राप्तीच येत नाहीं. तेव्हां अमहत्पूर्वा हा निषेध व्यर्थच दिसतो.

पण शूद्र शब्दाच्या मागें कोणताही शब्द असला तरी तदन्तविधीनें (१।१।७२) त्या विशिष्ट शब्दाहून टाप् प्रत्यय प्राप्त होत आहे ना ?

सूत्रामध्यें उच्चारलेलें जें प्रातिपदिक त्यानें तदन्ताचें ग्रहण होत नाहीं (१।१।७२ वा. ३).

तर मग आतां असें असतांना ज्या अर्थी येथें अमहत्पूर्वा असा निषेध आचार्य करतात त्या अर्थी ते असें सुचवितात कीं—ह्या स्त्रीप्रत्ययप्रकरणामध्यें कोणत्याही शब्दाहून प्रत्यय सांगितला तरी तो तदन्ताहून होतो.

या ज्ञापनाचा काय बरें उपयोग आहे ?

भवती महती वगैरे ठिकाणीं जो ङीप् प्रत्यय होतो (४।१।६) तो तेथें तदन्तविधि झाल्यामुळें अतिभवती अतिमहती येथेंही सिद्ध होतो. (तसेंच महती शूद्रा महाशूद्रा येथें या ज्ञापकामुळें टाप् प्रत्यय होतो). जाति असें सांगावयाचें आहे म्हणून (अमहत्पूर्वा हा निषेध येत नाहीं.)

पण जर हें ज्ञापक घेतलें तर पञ्चाजी, दशाजी

---

१२—शिवाय, खट्व (उणा. १।१४९) माल (उणा. २।२९) हे शब्द शाकटायनानें सिद्ध केले आहेत.

१३—येथें टाप् प्रत्ययाला ऱ्हस्व झालेला नाहीं. तर पञ्चखट्वा याहून 'तेन क्रीतम्' या अर्थी ठक् प्रत्यय (५।१।३७) व त्याचा लुक् (५।१।५८) व टाप् त्ययाचा लुक् (१।२।४९) होऊन मूळचा ऱ्हस्व-अकारान्त खट्व शब्द राहिला आहे.

१ (सू. ४)—अज वगैरे अजादि गणांतील प्रातिपदिकें आणि ऱ्हस्व-अकारान्त प्रातिपदिकें यांहून स्त्रीत्व या अर्थी टाप् प्रत्यय होतो. अजादि गणांतील प्रातिपदिकांहून इतर स्त्री प्रत्यय होत नाहींत. उदा०—अजा, खट्वा.

२—गवळी जातीच्या स्त्रीला महाशूद्री असें म्हणतात.

नैष दोषः । अजादिभिरत्र स्त्रियं विशेषयिष्यामः । अजादीनां या स्त्रीति ॥

## [ऋन्नेभ्यो ङीप् ॥ ४ । १ । ५ ॥]

## उगितश्च ॥ ४।१।६ ॥

कथमिदं विज्ञायते । उगितः प्रातिपदिकादिति । आहोस्विदुगिदन्तात्प्रातिपदिकादिति । किं चातः । यदि विज्ञायते उगितः प्रातिपदिकादिति सिद्धं भवती महती अतिभवती अतिमहतीति न सिध्यति । तदन्तविधिना भविष्यति । ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिः प्रतिषिध्यते ॥ अथ विज्ञायत उगिदन्तात्प्रातिपदिकादिति सिद्धमतिभवती अतिमहती भवती महतीति न सिध्यति । व्यपदेशिवद्भावेन भविष्यति । व्यपदेशिवद्भावो ऽप्रातिपदिकेन ॥ उभयथा च निर्गोमती निर्यवमतीति न सिध्यति । किं कारणम् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीति ॥ यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावदुगितः प्रातिपदिकादिति । कथमतिभवती अतिमह-

---

येथेंही प्रकृत सूत्रानें टाप् प्रत्यय होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण सूत्रोच्चारित जे अज वगैरे शब्द त्याचा 'स्त्रियाम्' याच्याकडे संबंध करतां येईल. म्हणजे अज वगैरेंचें जें स्त्रीत्व त्या अर्थी अज वगैरे शब्दांहून आणि तदन्ताहून टाप् प्रत्यय होतो असा अर्थ होईल.

(सू. ६) येथें उगित् जें प्रातिपदिक असा अर्थ समजावा किंवा उगिदन्त जें प्रातिपदिक असा अर्थ समजावा ?

पण दोहोंमध्यें काय फरक आहे ?

उगित् जें प्रातिपदिक त्याहून ङीप् प्रत्यय होतो असा अर्थ असेल तर भवती व महती हीं रूपें सिद्ध होतात, पण अतिभवती व अतिमहती हीं रूपें सिद्ध होत नाहींत.

पण तदन्तविधि झाल्यामुळें अतिभवत् व अतिमहत् यांहून ङीप् प्रत्यय होईल.

सूत्रामध्यें उच्चारलेलें जें प्रातिपदिक त्यानें तदन्ताचें ग्रहण होत नाहीं, असा निषध आहे.

आतां उगिदन्त जें प्रातिपदिक त्याहून ङीप् प्रत्यय होतो असा अर्थ घेतला तर अतिभवती व अतिमहती हीं रूपें सिद्ध होतात पण भवती व महती हीं रूपें सिद्ध होत नाहींत.

परंतु भवती व महती येथें व्यपदेशिवद्भावानें ( १ । १ । २१ वा. २ ) ङीप् प्रत्यय होईल.

पण 'प्रातिपदिकाशीं संबंध असतांना व्यपदेशिवद्भाव होत नाहीं,' अशी परिभाषा आहे. शिवाय, या दोन अर्थांपैकीं कोणताही अर्थ घेतला तरी निर्गोमती, व निर्यवमती हीं उदाहरणें साधत नाहींतच.

काय कारण ?

कारण असें कीं 'प्रत्ययाचें ग्रहण ज्या शास्त्रामध्यें केलें असेल तेथें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल त्या प्रकृतीला आरंभ करून तो प्रत्यय संपेतोंपर्यंत जो समुदाय त्याचें ग्रहण होतें' ( १ । ४ । १३ वा. ७) अशी परिभाषा[2] आहे.

तर मग आतां येथें तुला वाटेल तसा अर्थ असूं दे. उगित् जें प्रातिपदिक त्याहून ङीप् प्रत्यय होतो असा कां अर्थ असेना ? असूं दे.

पण तसा अर्थ घेतला तर अतिभवती व

---

१ ( सू. ५ )—ह्रस्व ऋकारान्त आणि नकारान्त जीं प्रातिपदिकें त्यांहून स्त्रीत्व या अर्थी ङीप् प्रत्यय होतो. उदा० कर्त्री, दण्डिनी.

१ ( सू. ६ )—उगित् म्हणजे उ, ऋ, अथवा ऌ हे वर्ण ज्याचे इत्संज्ञक आहेत असें प्रातिपदिक त्याहून आणि तदन्ताहून स्त्रीत्व या अर्थी ङीप् प्रत्यय होतो उदा० भवती, अतिभवती.

२—तेव्हां येथें मतुप् हा उगित् प्रत्यय 'गो' व 'यव' यांहून केला असल्यामुळें गोमत् आणि यवमत् एवढ्यालाच उगिदन्त म्हणतां येईल. निर्गोमत्, व निर्यवमत् एवढ्याला उगिदन्त म्हणतां येणार नाहीं.

तीति । तदन्तविधिना भविष्यति । ननु चोक्तं ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिः प्रतिषिध्यत इति। नैतत्प्रातिपदिकग्रहणम् । प्रातिपदिकाप्रातिपदिकयोरेतद् ग्रहणम्॥अथवा पुनरस्तूगिदन्तात् प्रातिपदिकादिति । कथं भवती महतीति । व्यपदेशिवद्भावेन भविष्यति । ननु चोक्तं व्यपदेशिवद्भावो ऽप्रातिपदिकेनेति । नैतत्प्रातिपदिकग्रहणम् । प्रातिपदिकाप्रातिपदिकयोरेतद् ग्रहणम् ॥ यदप्युच्यत उभयथा निर्गोमती निर्यवमतीति न सिध्यति किं कारणं प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीति नैतत्प्रत्ययग्रहणम् । प्रत्ययाप्रत्यययोरेतद् ग्रहणम् । कथम् । वर्णोऽप्युगित्प्रत्ययोऽप्युगित्प्रातिपदिकमप्युगित् ॥

**धातोरुगितः प्रतिषेधः ॥१॥**

धातोरुगितः प्रतिषेधो वक्तव्यः । उखास्रद् ब्राह्मणी । पर्णध्वद् ब्राह्मणी ॥

**अञ्चतेश्चोपसंख्यानम् ॥२॥**

अञ्चतेश्चोपसंख्यानं कर्तव्यम् । प्राची

---

अतिमहती येथें ङीप् कसा होईल?

हा दोष येत नाहीं. तदन्तविधि झाल्यामुळें अतिभवत् व अतिमहत् यांहून ङीप् प्रत्यय होईल.

पण सूत्रामध्यें उच्चारलेलें जें प्रातिपादिक त्यानें तदन्ताचें ग्रहण होत नाहीं असा निषेध आतांच दाखविला आहे ना?

तो निषेध येथें येत नाहीं. कारण उगित् हे प्रातिपदिकाचेंच ग्रहण नव्हे. उगित् हें प्रातिपदिकही असतें आणि प्रातिपदिकाशिवाय धातु, प्रत्यय हेही उगित् असतात.

तर मग आतां उगिदन्त जें प्रातिपदिक त्याहून ङीप् प्रत्यय होतो असाच अर्थ असूं दे.

पण तसा अर्थ घेतला तर भवती व महती येथें ङीप् प्रत्यय कसा होईल?

व्यपदेशिवद्भावानें तेथेंही ङीप् प्रत्यय होईल.

पण व्यपदेशिवद्भाव प्रातिपदिकाशीं होत नाहीं अशी परिभाषा आतांच दाखविली आहे ना?

ती परिभाषा उगितासंबंधीं येत नाहीं. कारण, उगित् हें प्रातिपदिकाचेंच ग्रहण नव्हे. उगित् हें प्रातिपदिकही असतें आणि प्रातिपदिकाशिवाय धातु व प्रत्यय हेही उगित् असतात.

तसेंच कोणताही अर्थ घेतला तरी निर्गोमती, व निर्यवमती येथें ङीप् प्रत्यय होणार नाहीं असें जें म्हटलें आहे—

पण तें तसें म्हणण्याचें काय बरें कारण दाखविलें आहे?

प्रत्ययाचें ग्रहण ज्या ठिकाणीं केलें आहे त्या ठिकाणीं तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल त्या प्रकृतीला आरंभ करून तो प्रत्यय संपेतोंपर्यंत जो समुदाय त्याचेंच ग्रहण होतें अशी परिभाषा कारण म्हणून दाखविली आहे.

पण ती परिभाषाच मुळीं येथें येत नाहीं. कारण उगित् हें प्रत्ययग्रहणच नव्हे; उगित् हे प्रत्ययही असतात आणि प्रत्ययाशिवाय इतरही असतात.

तें कसें?

असें पहा कीं तृ येथील तकार हा वर्णही (६।४।१२७) उगित् आहे. शतृ, व मतुप् हे प्रत्ययही उगित् आहेत, भवतु हें प्रातिपदिकही उगित् आहे.

(वा. १) उगित् जो धातु त्याहून हा ङीप् प्रत्यय होत नाहीं असा निषेध सांगावा. उदा० उखास्रत्[३] ब्राह्मणी, पर्णध्वत् ब्राह्मणी.

(वा. २) अञ्चु हा धातु जरी उगित्

---

३—स्रंसु व ध्वंसु या धातूंचा उकार इत्संज्ञक आहे. त्या धातूंहून क्विप् प्रत्यय केला आहे. त्या क्विप् प्रत्ययापैकीं एकही वर्ण शिल्लक राहत नसल्यामुळें स्रंस व ध्वंस् या धातूंना कृत्-प्रत्ययान्त समजून प्रातिपदिक संज्ञा (१।२।४६) होते. येथें पुढें दकार आदेश (८।२।७२) झाला आहे.

प्रतीची ॥

**उगित्यञ्चतिग्रहणात्सिद्धमधातोः ॥३॥**

उगित्यञ्चतिग्रहणादधातोः सिद्धम् । अञ्चतिग्रहणं नियमार्थं भविष्यति । अञ्चतेरेवोगितो धातोर्नान्यस्योगितो धातोरिति॥

**वनो र च ॥ ४ । १ । ७ ॥**

इह कस्मान्न भवति । निःशुनी अतियूनीति । अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येति ॥ एवमपि मघोनी अत्र प्राप्नोति । मघवन्शब्दोऽव्युत्पन्नं प्रातिपदिकम् ॥

**वनो न हशः ॥ १ ॥**

वनो र चेत्यत्र हशन्तान्न भवतीति वक्तव्यम् । इह मा भूत् । सहयुध्वा ब्राह्मणीति ॥ यदि न हश इत्युच्यते शर्वरीति न सिध्यति । विहितविशेषणं हश्ग्रहणम् । हशन्ताद्यो विहित इति ॥ एवमपि प्रेत्वरीति न सिध्यति । कथं चात्र तुगागमः । छान्दसत्वात् । ङीब्रावपि

आहे तरी त्याहून ङीप् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० प्राची, प्रतीची.

(वा.३) उगिताला नुम् आगम सांगणाऱ्या सूत्रामध्यें (७।१।७०) अञ्च् धातूचें ग्रहण केलें आहे त्यावरून उगिताला सांगितलेलें कार्य धातुभिन्नालाच होईल. तेथें जें अञ्च् धातूचें ग्रहण केलें आहे तें नियमार्थ होईल. तो नियम असा कीं—उगिताला सांगितलेलें कार्य धातूला जर करावयाचें असेल तर फक्त अञ्च् ह्या एकट्याच उगित् धातूला करावें; इतर उगित् धातूंना करूं नये.

(सू. ७) ह्या सूत्रानें निःशुनी, अतियूनी येथें ङीप् प्रत्यय आणि रेफ आदेश हे कां होत नाहींत ?

अर्थवानाचें ग्रहण संभवत असतांना अनर्थकाचें ग्रहण करूं नये, या परिभाषेमुळें ते होत नाहींत.

तरी पण मघोनी येथें प्रकृत सूत्रानें ङीप् व रेफ आदेश प्राप्त होतातच.

मघवन् शब्द हा अव्युत्पन्न प्रातिपदिक आहे.

(वा. १) प्रकृत सूत्रामध्यें वन् हा हशन्त धातूच्या पुढील नसावा असें म्हणावें. कारण, सहयुध्वा ब्राह्मणी येथें ङीप् व रेफ आदेश न झाले पाहिजेत.

पण जर हशन्त धातूच्या पुढील वन् नसावा असें म्हटलें तर शर्वरी येथें प्रकृत सूत्रानें ङीप् आणि र आदेश होणार नाहींत.

हशः हें विहितविशेषण समजावें म्हणजे तो वन् प्रत्यय हशन्ताहून केलेला नसावा.

तरी पण प्रेत्वरी[६] येथें प्रकृत सूत्रानें ङीप् व र आदेश होणार नाहींत.

पण ऱ्हस्वाला सांगितलेला तुक् आगम (६।१।७१) येथें कसा बरें झाला आहे ?

हा वैदिक प्रयोग आहे म्हणून तुक् आगम झाला आहे.

---

१ (सू. ७)—वन् प्रत्ययान्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्वविवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो आणि त्याच्या बरोबर वन् प्रत्ययाच्या नकाराला रेफ आदेश होतो. उदा० धीवरी.

२—शुनः सकाशात् निर्गता, युवानमतिक्रान्ता, अशा तऱ्हेचा विग्रह आहे. श्वन् शब्दाचा निर् शब्दाबरोबर पञ्चमीतत्पुरुष, आणि युवन् शब्दाचा अति शब्दाबरोबर द्वितीयातत्पुरुष (२।२।१८ वा. ४) झाला आहे. श्वन् आणि युवन् शब्दांतील वन् याला अर्थ नाहीं.

३—तेव्हां मघवन् शब्दामध्यें प्रकृति-प्रत्यय-कल्पना नसल्यामुळें त्यांतलि वन् हा अनर्थकच आहे.

४—शॄ धातूहून वनिप् प्रत्यय (३।२।७५) ऋकाराला गुण (७।३।८४) होऊन शर्वन् असें प्रातिपदिक होतें. येथें शर् या हशन्ताच्या पुढें वन् आहे.

५—येथें शॄ याहून वन् प्रत्यय केला आहे. शर् हें हशन्त जरी आहे तरी तें मूळचे हशन्त नव्हे. तें गुणानें हशन्त झालें आहे.

६—येथें प्र उपसर्गपूर्वक इर् धातूहून वनिप् प्रत्यय केला आहे.

तर्हि च्छान्दसत्वादेव भविष्यतः ॥

बहुलं छन्दसि ङीब्रौ वक्तव्यौ । यज्वरीरिषः । यज्वनीरिषः ॥

**रविधाने बहुव्रीहेरुपसंख्यानं प्रतिषिद्धत्वात् ॥२॥**

रविधाने बहुव्रीहेरुपसंख्यानं कर्तव्यम् । बहुधीवरी बहुपीवरी । किं पुनः कारणं न सिध्यति । प्रतिषिद्धत्वात् । अनो बहुव्रीहेः [४.१.१२] इति प्रतिषेधः प्राप्नोति॥

**अनो बहुव्रीहिप्रतिषेधे वोपधालोपिनो वावचनम् ॥ ३॥**

अनो बहुव्रीहिप्रतिषेधे वोपधालोपिनो वेति वक्तव्यम् ॥ अन्यथा कृत्वा चोदितमन्यथा कृत्वा परिहारः । यथोपसंख्यानं चोदितं तथा नित्याभ्यां ङीब्राभ्यां भवितव्यम् । यथा परिहारस्तथा विभाषया भवितव्यम् ॥ यथोपसंख्यानं चोदितमेवमपि विभाषया भवितव्यं न ह्यत्र ङीब्दुर्लभः । सिद्धोऽत्र ङीबन उपधालोपिनोऽन्यतरस्याम् [४.१.२८] इति । ङीप्संनियोगेन र उच्यमानो ऽन्येन सति न स्यादित्येवमर्थमुपसंख्यानं चोद्यते । किं पुनः कारणं ङीप्संनियोगेन र उच्यते । इह मा भूत् । सुपर्वा चारुपर्वेति ॥ तत्तर्ह्युपसंख्यानं

---

असें जर आहे तर मग हा वैदिक प्रयोग आहे म्हणूनच ङीप् व र आदेश हेंही होतील.

हे ङीप् व र आदेश वैदिक प्रयोगामध्यें बाहुल्येंकरून होतात असें म्हणावें. उदा० यज्वनीरिषः, यज्वरीरिषः.

( वा. २ ) प्रकृत सूत्रानें सांगितलेले ङीप् व र आदेश हे वन् प्रत्ययान्ताबरोबर बहुव्रीहि समास केला असतांना तेथेंही होतात असें उपसंख्यान करावें. उदा० बहुधीवरी, बहुपीवरी.

पण येथें मूळ सूत्रानेंच ङीप् व र आदेश कां बरें होणार नाहींत ?

अनो बहुव्रीहेः (४।१।१२) हा निषेध आहे म्हणून होणार नाहींत.

( वा. ३ ) अथवा अनो बहुव्रीहेः या निषेधाच्या पुढें ' उपधालोपिनो वा ' असें म्हणावें.

हें काय हो ? तुम्हाला विचारलें एक आणि तुम्हीं उत्तर दिलें भलतेंच. असें पहा कीं अनन्त बहुव्रीहीहून ङीप् आणि र आदेश नित्य व्हावेत अशा दृष्टीनें उपसंख्यान करावें असें आम्हीं म्हटलें आणि त्यावर जें तुम्हीं उत्तर दिलें आहे त्या दृष्टीनें पाहिलें तर तेथें ङीप् व र आदेश विकल्पानें होणार आहेत.

असें नाहीं. तुम्हीं उपसंख्यान करावें असें जें विचारलें त्या दृष्टीनेंही तेथें ङीप् व र आदेश विकल्पानेंच होणार आहेत. कारण, तशा ठिकाणीं ङीप् होत नाहीं असें मुळींच नाहीं. अन उपधालोपिनो० (४।१।२८) यानें ङीप् होतच आहे. प्रकृत सूत्रानें जो ङीप् प्रत्ययाच्या बरोबर सांगितलेला र आदेश तो फक्त दुसऱ्या सूत्रानें ङीप् प्रत्यय असतां होणार नाहीं, म्हणून उपसंख्यान करावें असें तुम्हीं म्हटलें आहे.

पण येथें ङीप् प्रत्ययाच्या बरोबरच र आदेश कशाकरितां सांगितला आहे.

सुपर्वा व चारुपर्वा या बहुव्रीहीच्या उदाहरणांमध्यें ङीप् व र आदेश होऊं नयेत म्हणून तसें सांगितलें आहे.

तर मग एकंदरीत तसें येथें उपसंख्यान केलें पाहिजे.

---

७—तेव्हां अनन्त बहुव्रीहीहून ङीप् झाला असतां तेथें त्या उपसंख्यानानें फक्त र आदेश होणार आहे असें एका ' र ' आदेशाचें विधान केलें म्हणजे लाघवही आहे. शिवाय ङीप आणि र या दोघांचें अपूर्वविधान मानलें तर सुपर्वा येथेंही ङीप् व र आदेश होऊं लागतील असा दोषही येतो. तेव्हां उपसंख्यान केलें तरी ङीप् प्रत्ययाचा विकल्प होणारच.

कर्तव्यम् । न कर्तव्यम् । वक्ष्यति डाबुभाभ्यामन्यतरस्याम् [४.१.१३] इत्यत्रान्यतरस्यांग्रहणस्य प्रयोजनं डाप्प्रतिषेधाभ्यां मुक्ते ङीन्नावपि यथा स्यातामिति ॥

[ पादोऽन्यतरस्याम् ॥ ४।१।८ ॥
टाबृचि ॥ ४।१।९ ॥ ]

न षट्स्वस्रादिभ्यः ॥४।१।१०॥

कस्यायं प्रतिषेधः । ङीबनन्तरस्तस्य प्रतिषेधः ॥ अथेदानीं ङीपि प्रतिषिद्धे

षट्संज्ञानामन्ते लुप्ते टाबुत्पत्तिः

कस्मान्न स्यात् ।

अत इति प्राप्नोति । असिद्धो नलोपस्तस्यासिद्धत्वान्न भविष्यति । परिगणितेषु कार्येषु नलोपो ऽसिद्धो न चेदं तत्र परिगण्यते । इदमपि तत्र परिगण्यते । कथम् ।

प्रत्याहाराच्चापा सिद्धम्

सुबिति नेदं प्रत्ययग्रहणम् । किं तर्हि । प्रत्याहारग्रहणम् । क संनिविष्टानां प्रत्याहारः । प्रथमैकवचनात्प्रभृत्या चापः पका-

---

उपसंख्यान करावयास नको. कारण 'डाबुभाभ्यामन्यतरस्याम्' (४।१।१३) या सूत्रामध्यें अन्यतरस्याम् हा जो शब्द घातला आहे त्याचा उपयोग असा सांगावयाचा आहे कीं-अन्नन्त बहुव्रीहीहून एकदां डाप् आणि एकदां ङीपाचा निषेध हे दोन्ही होत नाहींत तेव्हां एकदां ङीप् आणि र आदेश होऊन तिसरें रूप झालें पाहिजे.

(सू. १०) टाप् व ङीप् यांपैकीं कोणाचा हा निषेध आहे ?

ङीप् प्रत्यय ज्याचेजवळ आहे त्याचाच हा निषेध आहे.

तर मग आतां ङीप् प्रत्ययाचा निषेध झाल्यानंतर—

(श्लो. १) पञ्चन् वगैरे षट्संज्ञक शब्दांच्या शेवटच्या नकाराचा लोप (८।२।७) झाला असतां उरलेल्या अकारान्ताहून टा॒ प्रत्यय कां बरें होत नाहीं? अजाद्यतः. (४।१।४) योनें तो प्राप्त होत आहे.

पण त्रैपादिक नलोप असिद्ध (८।२।१) आहे. तेव्हां तो असिद्ध असल्यामुळें पञ्च हें नकारान्तच आहे असें समजून टाप् होणार नाहीं.

सुप्-विधि (८।२।२) वगैरे कांहीं ठराविक कार्यें कर्तव्य असतांनाच नलोप असिद्ध होतो असतो. आणि टा॒ प्रत्यय हें कार्य त्या ठराविक कार्यांमध्यें गणलेलें नाहीं.

टाप् हें कार्य त्यांमध्यें गणलेलें आहे.

तें कसें ?

सुप्-विधि म्हणून जें त्या कार्यांमध्यें गणलें आहे तेथें सुप् शब्दानें फक्त सप् प्रत्ययांचेंच ग्रहण आहे असें समजूं नये.

तर मग काय समजावयाचें ?

सुप् हा निराळाच एक प्रत्याहार आहे असें समजावें.

पण हा प्रत्याहार कोठपासून कोठपर्यंत आहे ?

प्रथमा एकवचन सु (४।१।२) प्रत्ययाला

---

१ ( सू. ८ )—पाद शब्दाच्या अकाराचा लोप-समासान्त ( ५।४।१३८ ) झाल्यानंतर जो पाद् असा शब्द होतो तदन्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्व–विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा० द्विपदी द्विपात्.

१ (सू. ९)—समासान्त केलेला जो पाद् शब्द तदन्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्व–विवक्षा असतांना टाप् प्रत्यय होतो. परंतु एकंदर शब्दाचा संबंध ऋचेकडे असला पाहिजे. उदा० द्विपदा ऋक्.

१ ( सू. १० )—षट्संज्ञक शब्द ( १।१।२४ ) आणि स्वसृ, तिसृ, चतसृ, ननान्दृ, दुहितृ, यातृ व मातृ हे जे सात शब्द त्यांहून स्त्रीत्व विवक्षा असतांना टाप् अथवा ङीप् कोणताच स्त्रीप्रत्यय होत नाहीं. उदा० पञ्च स्त्रियः, स्वसा.

रात् ॥ यदि प्रत्याहारग्रहणं

दोषस्त्वित्त्वे

इत्त्वे दोषो भवति । बहुचर्मिका । प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्यात:[७.३.४४] इतीत्त्वं न प्राप्नोति ॥

तस्मान्नोभौ ॥

तस्मात्षट्संज्ञकेभ्यः उभौ न भवत इति वक्तव्यम् ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । स्त्रियाम् [४.१.३] इति वर्तते स्त्रियां यत्प्राप्नोति तस्य प्रतिषेधः ॥

षट्संज्ञानामन्ते लुप्ते टाबुत्पत्तिः कस्मान्न स्यात् । प्रत्याहाराच्चापा सिद्धं दोषस्त्वित्त्वे तस्मान्नोभौ ॥

[ मनः ॥४।१।११॥

अनो बहुव्रीहेः ॥४।१।१२॥ ]

डाबुभाभ्यामन्यतरस्याम् ॥ ४।१।१३॥

किमर्थमुभाभ्यामित्युच्यते । उभाभ्यां योगाभ्यां डाब्यथा स्यान्मनन्तादनन्ताच्च बहुव्रीहेः ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृतमुभयमनुवर्तते ॥

अथान्यतरस्यांग्रहणं किमर्थम् । अन्यतरस्यां डाब्यथा स्याड्डापा मुक्ते प्रतिषेधोपि

---

आरंभ करून चाप् (४।१।७४) प्रत्ययाच्या पकारापर्यंत हा सुप् प्रत्याहार[२] आहे.

पण जर येथें सुप् हें अशा प्रत्याहाराचें ग्रहण असेल तर—

इत्त्वाविषयीं दोष येतो. बहुचार्मिका[३], बहुवर्मिका येथें 'प्रत्ययस्थात् कात्०'(७।३।४४) या सूत्रानें जें इत्त्व होत असतें तें होणार नाहीं.

तेव्हां प्रकृत सूत्रानें जो हा षट्-संज्ञकाच्या पुढें स्त्री-प्रत्ययाचा निषेध सांगितला आहे तो टाप् व ङीप् या दोघांचाही होतो असें म्हणावें.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण स्त्रियाम् अशी अनुवृत्ति येथें येत आहे; तेव्हां स्त्रीत्व या अर्थी जे जे प्रत्यय प्राप्त होतात त्या सर्वांचा हा निषेध होईल.

(सू. १३) येथें उभाभ्याम् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

मन् शब्द शेवटीं असलेलें प्रातिपदिक आणि अन् शब्द शेवटीं असलेला बहुव्रीहि या दोघांहूनही डाप् प्रत्यय झाला पाहिजे म्हणून म्हटलें आहे.

हा याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, मागून त्या दोघांचीही अनुवृत्ति येईल.

आतां येथें अन्यतरस्याम् असें कशाकारितां म्हटलें आहे ?

डाप् प्रत्यय विकल्पानें झाला पाहिजे. एकदां डाप् होत नाहीं त्या वेळीं ङीप् प्रत्ययाचा निषेध झाला पाहिजे.

---

२—टाप् हा त्या सुप् प्रत्याहारामध्यें आहे. म्हणून टाप् हा सुप्-विधि या शब्दानें घेतां येतो.

३—'प्रत्ययस्थात्०' यानें सांगितलेल्या इत्त्वाला टाप् प्रत्यय निमित्त आहे आणि टाप् प्रत्यय हा सुप् प्रत्याहारामध्यें आहे. तेव्हां टाप् प्रत्ययाच्या निमित्तानें होणाऱ्या इत्त्वाला सुप्–विधि असे म्हणतां येतें. म्हणून त्या इत्त्वाच्या दृष्टीनें नलोप असिद्ध (८।२।२) होईल आणि त्या नकारानें व्यवधान येत असल्यामुळें प्रत्ययस्थ ककाराच्या पूर्वी ऱ्हस्व अकार नाहीं म्हणून त्याला इत्त्व होणार नाहीं.

१ (सू. ११)—मन् शब्द शेवटीं असलेल्या प्रातिपदिकाहून ङीप् प्रत्यय होत नाहीं.

१ (सू. १२)—अन् शब्द शेवटीं असलेल्या बहुव्रीहीहून ङीप प्रत्यय होत नाहीं उदा० सुपर्वा, सुपर्वाणौ.

१ (सू. १३)—मन् शब्द शेवटीं असलेलें प्रातिपदिक आणि अन् शब्द शेवटीं असलेला बहुव्रीहि यांहून स्त्रीत्व–विवक्षा असतांना एकदां डाप् प्रत्यय होतो. उदा० सीमा, सीमे; सुपर्वा, सुपर्वे.

यथा स्यादिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । इह डाबप्युच्यते प्रतिषेधोऽपि त.वुभौ वचनाद्भविष्यतः ॥ इदं तर्हि प्रयोजनं डाप्प्रतिषेधाभ्यां मुक्ते ङीबपि यथा स्यात् । सिद्धोऽत्र ङीबन उपधालोपिनो ऽन्तरस्याम् [४.१.२८] इति ॥ अथ तदन्यतरस्यांग्रहणं शक्यमकर्तुम्। बाढं शक्यम् । इह डाबप्युच्यते प्रतिषेधोऽपि ङीबपि तत्सर्वं वचनाद्भविष्यति । नैवं शक्यं विज्ञातुम् । अक्रियमाणे हि तत्रान्तरस्यांग्रहणे ऽनवकाशो ङीब्डाप्प्रतिषेधौ बाधेत । डाप्प्रतिषेधावप्यनवकाशौ तौ वचनाद्भविष्यतः । सावकाशौ डाप्प्रतिषेधौ। कोऽवकाशः । सुपर्वा चारुपर्वेति । तस्मात्तदन्यतरस्यांग्रहणं कर्तव्यम् ॥ इदं तु खल्वन्यतरस्यांग्रहणं शक्यमकर्तुम् । इदमप्यवश्यं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । डाप्प्रतिषेधाभ्यां मुक्ते ङीब्रावपि यथा स्यातामिति । रविधाने बहुव्रीहेरुपसंख्यानं चोदितं तन्न वक्तव्यं भवति ॥

---

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण ह्या प्रकृत सूत्रानें डाप् प्रत्यय सांगितला आहे, आणि पूर्वींच्या दोन सूत्रांनीं ङीप् प्रत्ययाचा निषेध सांगितला आहे. तेव्हां दोघांचाही उपयोग व्हावा म्हणून पाळीपाळीनें दोघेही होतील.

तर मग अन्यतरस्याम् याचा उपयोग असा समजावा कीं डाप् आणि ङीपाचा निषेध हे दोन्हीही न होतां एकदां ङीप् प्रत्यय होऊन तिसरें रूप झालें पाहिजे.

पण तसें तिसरें रूप 'अन उपधालोपिनो॰' (४।१।१२८) या सूत्रानें सिद्ध होत आहेच.

तर मग आतां त्या 'अन उपधालोपिनो॰' या सूत्रामध्यें 'अन्यतरस्याम्' हा शब्द घातला नाहीं तरी चालेल काय ?

होय खास चालेल.

तें कसें ?

तें असें कीं—ह्या प्रकृत सूत्रानें डा् प्रत्यय सांगितला आहे. पूर्वींच्या सूत्रानें ङीपाचा निषेध सांगितला आहे. आणि 'अन उपधालोपिनो॰' यानें ङीप्ही सांगितला आहे. तेव्हां असें निरनिराळें तिघांचें विधान केलें असल्यामुळें तीन रूपें होतील.

असें होणें शक्य दिसत नाहीं. कारण जर 'अन उपधालोपिनो॰' या सूत्रामध्यें अन्यतरस्याम् हा शब्द घातला नाहीं तर अनवकाश असा तो ङीप् प्रत्यय येथील डाप् व ङीपाचा निषेध या दोघांचाही बाध करील.

पण हा डाप् व ङीपाचा निषेध हेही अनवकाशच आहेत. तेव्हां तेही एकदां पाळीपाळीनें होतीलच.

असें नाहीं. कारण डा् व ङीपाचा निषेध यांना त्या ङीपाची प्राप्ति नसतांना अवकाश आहे.

तसा अवकाश कोठें बरें आहे ?

सुपर्वा व चारुपर्वा येथें डाप् व ङीपाचा निषेध यांना अवकाश आहे. तेव्हां त्या ङीपानें, डाप् व ङीपाचा निषेध यांचा बाध होऊन बहुराज्ञी असें एकच रूप होईल; तें न व्हावें व तीन रूपें व्हावीं याकरितां तेथें 'अन्यतरस्याम्' असें म्हटलेंच पाहिजे.

आतां प्रकृत सूत्रामध्यें मात्र 'अन्यतरस्याम्' हा शब्द घातला नाहीं तरी चालेल.

चालणार नाहीं. येथेंही 'अन्यतरस्याम्' हा शब्द अवश्य घातलाच पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं डाप् व ङीपाचा निषेध हे दोन्ही होत नाहीत त्या वेळी वन्–प्रत्ययान्त बहुव्रीहि असेल तर तेथें एकदां ङीप् व र आदेश होऊन तिसरें रूप झालें पाहिजे. आणि तसें झालें असतां 'वनो र च' येथें जें 'रविधाने बहुव्रीहेरुपसंख्यानम्' (४।१।१७ वा. २) असें म्हटलें आहे तें म्हणावयास नको.

---

२—कारण, ते शब्द उपधालोपी नव्हेत. तेथें उपधालोपाचा निषेध (६।४।१३७) आहे.

अथेह कथं भवितव्यम् । बहवः श्वानोऽस्यां रथ्यायाम् बहवो युवानोऽस्यां शालायामिति । बहुशूका बहुयूकेति भवितव्यम् । का रूपसिद्धिः । डाप्टिलोपः प्रसारणं प्रसारणपरपूर्वत्वं नद्यृतश्चेति कप् ॥ कपा तावन्न भवितव्यम् । किं कारणम् । नद्यन्तानां यो बहुव्रीहिरित्येवं तद्विज्ञायते न चैष नद्यन्तानां बहुव्रीहिः ॥ प्रसारणेनापि न भवितव्यम् । वक्ष्यत्येतत् । श्वादीनां प्रसारणे नकारान्तग्रहणमनकारान्तप्रतिषेधार्थमिति । परपूर्वत्वेन चापि न भवितव्यम् । वक्ष्यत्येतत् । संप्रसारणपूर्वत्वे समानाङ्गग्रहणमसमानाङ्गप्रतिषेधार्थमिति ॥ तस्माद्बहुश्वा बहुयुवेति भवितव्यम् ॥

## अनुपसर्जनात् ॥ ४ । १ । १४ ॥

अनुपसर्जनादिति किमर्थम् । बहुकुरुचरा मथुरा । प्रियकुरुचरा मथुरा ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । कुरुचरशब्दात्प्रत्ययो विधीयते तत्र कः प्रसङ्गो यद्बहुकुरुचरशब्दात्स्यात् । नैव प्राप्नोति नार्थः प्रतिषेधेन ।

---

आतां बहवः श्वानः यस्यां रथ्यायाम्, तसेंच बहवः युवानः यस्यां शालायाम् असा बहुव्रीहि केला तर तेथें त्याचें स्त्रीलिंगी रूप कसें व्हावें ?

बहुशूका व बहुयूका अशीं रूपें व्हावीं असें वाटते.

तशी रूपें कशी बरें साधतील ?

अशीं साधतील की बहुश्वन् व बहुयुवन् यांहून प्रकृत सूत्रानें डाप् प्रत्यय, अन् या टिसंज्ञक भागाचा लोप (६।४।१४३), संप्रसारण (६।४।१३३), पुढील डापाबरोबर पूर्वरूप[३] (६।१।१०८) व नंतर 'नद्यृतश्च' (५।४।१५३) याने समासान्त कप् प्रत्यय होऊन ही रूपें साधतील.

परंतु येथे कप् प्रत्यय तर होऊं नयेच.

काय कारण ?

कारण असे की नद्यन्त जो बहुव्रीहि असा तेथे अर्थ नाहीं, तर नद्यन्तांचा जो बहुव्रीहि असा तेथें अर्थ आहे आणि येथें तर नद्यन्तांचा बहुव्रीहि नाहीं. तसेंच येथें संप्रसारणही होऊं नयेच. कारण 'श्वादीनां संप्रसारणे नकारान्तग्रहणमनकारान्तप्रतिषेधार्थम्' (६।४।१३३ वा. १) असें तेथें वार्तिककार सांगणारच आहेत. तसेंच पुढील डाप् प्रत्ययाच्या आकाराबरोबर पूर्वरूपही येथें होऊं नयेच. कारण 'संप्रसारणपूर्वत्वे समानाङ्गग्रहणमसमानाङ्गप्रतिषेधार्थम्' (६।१।१०८ वा. १) असें तेथें वार्तिककार सांगणारच आहेत. तेव्हां बहुश्वा, व बहुयुवा अशींच रूपें येथें व्हावी.

(सू. १४) अनुपसर्जनात् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

बहुकुरुचरा मथुरा येथें पुढील सूत्रानें ङीप् प्रत्यय होऊ नये याकरितां म्हटलें आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण कुरुचर शब्दांहून ङीप् प्रत्यय सांगितला आहे तो बहुकुरुचर याहून कसा बरें होईल ? त्याहून ङीप् प्रत्ययाची प्राप्तीच येत नाहीं. तेव्हां

---

३—पूर्वरूपानंतर संप्रसारणाला दीर्घाची--(६।४।२) ही कल्पना करावी.

१ (सू. १४)—हे अधिकार-सूत्र आहे. पुढे 'नि' प्रत्यया-(४।१।७७) पर्यंत प्रत्येक सूत्रामध्ये याचा संबंध आहे.

२—कुरुषु चरतीति कुरुचरी स्त्री कुरु शब्द उपपद असताना चर् धातूहून ट प्रत्यय (३।२।१६) झाला आहे. तो ट प्रत्यय टित् आहे म्हणून 'टिड्ढाणञ्०' या पुढील सूत्राने ङीप् होतो. बहुत आहेत कुरुचर जीमध्यें अशा अर्थी बहुव्रीहि केला असतां अन्य पदार्थ स्त्रीलिंगी आहे म्हणून तेथे टाप् प्रत्यय होतो; ङीप होत नाही. कारण, कुरुचर याला बहुव्रीहीमध्यें उपसर्जनसंज्ञा (१।२।४३) आहे.

३—ट हा प्रत्यय वस्तुतः टित् आहे. पण त्याला धातूची जरूर आहे व त्याचे मागें सप्तम्यन्त उपपदही अवश्य पाहिजे. म्हणून उपपद व धातु यांसह प्रत्ययाला म्हणजे कुरुचर याला टित् म्हणण्याचा प्रघात आहे.

तदन्तविधिना प्राप्नोति ॥ अत उत्तरं पठति ।

**अनुपसर्जनग्रहणमनर्थकं प्रातिपदिकेन तदन्तविधिप्रतिषेधात् ॥ १ ॥**

अनुपसर्जनग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । प्रातिपदिकेन तदन्तविधिप्रतिषेधात् । ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिः प्रतिषिध्यते ॥

**ज्ञापकं तु पूर्वत्र तदन्ताप्रतिषेधस्य ॥ २ ॥**

एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यः पूर्वत्र तदन्तविधिप्रतिषेधो न भवतीति ॥ किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । भवती अतिभवती महती अतिमहतीत्यत्र तदन्तविधिः सिद्धो भवति । नैतदस्ति प्रयोजनम् । उक्तमेतद्वर्णोऽप्युगित्प्रत्ययोऽप्युगित्प्रातिपदिकमप्युगिदिति ॥ इदं तर्हि । बहुधीवरी बहुपीवरीति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । अत्राप्युक्तं रविधाने बहुव्रीहेरुपसंख्यानं प्रतिषिद्धत्वादिति । इदं तर्हि । अतिधीवरी अतिपीवरी ॥

**पूर्वसूत्रनिर्देशो वापिशलमधीत इति ॥ ३ ॥**

पूर्वसूत्रनिर्देशो वा पुनरयं द्रष्टव्यः । पूर्वसूत्रे ऽप्रधानस्योपसर्जनमिति संज्ञा क्रियते । यावद् ब्रूयात्प्रधानादुत्पत्तव्यमप्रधानान्नेति तावदनुपसर्जनादिति । किं

---

त्याकरिता अनुपसर्जनात् हा निषेध नको.

पण तदन्तविधीनें (१।१।७२) बहुकुरुचर याहून ङीप् प्रत्यय प्राप्त होत आहे ना ?

हें मनांत घेऊन वार्तिककार म्हणतात.

(वा. १) अनुपसर्जनग्रहण निरर्थक आहे.

काय कारण ?

कारण असें कीं प्रातिपदिकाशी तदन्तविधीचा निषेध आहे. सूत्रामध्ये उच्चारलेलें जें प्रातिपदिक त्याच्याशीं तदन्तविधी होत नाहीं. (१।१।७२ वा. ३).

( वा. २ ) तर मग ज्याअर्थी अनुपसर्जनात् अशा अधिकार आचार्य करतात त्याअर्थी असे ज्ञापित होतें कीं ह्या स्त्रीप्रत्ययप्रकरणामध्यें या सूत्राच्या पूर्वी तदन्तविधीचा निषध लागू होत नाहीं.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

'उगितश्च' ( ४।१।६ ) येथें तदन्तविधि झाल्यामुळें भवती अतिभवती, महती अतिमहती या उदाहरणांमध्यें ङीप् प्रत्यय होतो.

हा या ज्ञापकाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण वर्णही उगित् आहे, प्रत्ययही उगित् आहे आणि प्रातिपदिकही उगित् आहे असें सांगितलेंच आहे. ( ४।१।६ पृ. २०२ पं. ११ ).

तर मग 'वनो र च' ( ४।१।७ ) येथें ज्ञापकामुळे तदन्तविधि होऊन बहुधीवरी व बहुपीवरी येथें ङीप् व र आदेश होतात हा या ज्ञापकाचा उपयोग होय.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'रविधाने बहुव्रीहेरुपसंख्यान प्रतिषिद्धत्वात्' ( ४।१।७ वा. २ ) असे तेथें वार्तिककारांनीं सांगितलेंच आहे.

तर मग अतिधीवरी, अतिपीवरी येथें तत्पुरुषसमासाहून ङीप् प्रत्यय होतो हा या ज्ञापकाचा उपयोग होय.

( वा. ३ ) अथवा येथें आचार्यांनीं अनुपसर्जनात् हा जो निर्देश केला आहे तो पूर्वीच्या आचार्यांना अनुसरून केला आहे असे समजावें. पूर्वीच्या आचार्यांनीं अप्रधानाला उपसर्जन अशी संज्ञा केली आहे. तेव्हां प्रधानाहून स्त्रीप्रत्यय उत्पन्न होतो. अप्रधानाहून होत नाहीं असें जें येथें म्हणावयाचें त्याच अर्थानें अनुपसर्जनात् असें येथे म्हटलें आहे.

अशा अर्थानें तरी या अधिकाराचा काय

---

४—तेव्हां हें नुसत्या प्रातिपदिकाचेंच ग्रहण नसल्यामुळें तदन्तविधीचा निषेध येत नाहीं. तेव्हां तदन्तविधि ( १।१।७२ ) सहजच सिद्ध होत असल्यामुळे त्याकरितां ज्ञापक नको.

५—तेव्हां येथे उपसर्जन शब्दानें शास्त्रीय उपसर्जन ( १।२।४३, ४४ ) घ्यावयाचें असें समजूं नये.

प्रयोजनम् । आपिशलमधीत इति । आपिशलमधीते ब्राह्मणी आपिशला ब्राह्मणी । अणन्तादितीकारो मा भूदिति ॥ अथानुपसर्जनादित्युच्यमाने कस्मादेवात्र न भवति । अणन्तं ह्येतदनुपसर्जनम् । नानुपसर्जनग्रहणेनाणन्तं विशेष्यते । अणन्तादनुपसर्जनादिति । किं तर्हि । अणेव विशेष्यते । अण्योऽनुपसर्जनामिति ॥

**जातिशब्देभ्यस्त्वतिप्रसङ्गः ॥ ४ ॥**

जातिशब्देभ्यस्त्वतिप्रसङ्गो भवति । अवन्ती कुन्ती गान्धारी ॥

**सिद्धं तु जातेरनुपसर्जनत्वात् ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अनुपसर्जनादित्युच्यते न च जातिरुपसर्जनम् ॥

एतदपि नास्ति प्रयोजनम् । स्त्रियाम् [ ४.१.३ ] इति वर्तते तेनाणं विशेषयिष्यामः । स्त्रियां योऽण्विहित इति । एवमपि काशकृत्स्निना प्रोक्ता मीमांसा काशकृत्स्नी

---

उपयोग येत आहे ?

आपिशलमधीते ब्राह्मणी आपिशला ब्राह्मणी येथें अण्-प्रत्ययान्ताहून सांगितलेला ङीप् प्रत्यय न झाला पाहिजे.

पण अनुपसर्जनात् हा अधिकार केला तरी येथें ङीप् प्रत्यय कां होत नाहीं ? आपिशल हें अण्प्रत्ययान्तही आहे व अनुपसर्जनही आहे.

'अनुपसर्जन जें अण्प्रत्ययान्त' असें अण्-प्रत्ययान्ताचें विशेषण म्हणून अनुपर्सन हें पद समजूं नये; तर तें अण् प्रत्ययाचेंच विशेषण आहे. अनुपसर्जन जो अण् प्रत्यय तदन्ताहून ङीप प्रत्यय होतो असा तेथें अर्थ आहे.

( वा. ४ ) उपसर्जन शब्दाचा अप्रधान असा अर्थ घेतला तर अवन्ती, कुन्ती, गान्धारी येथें या जाति-शब्दांहून ङीप् प्रत्यय होणार नाहीं, असा दोष येतो.

( वा. ५ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

येथें अनुपसर्जनात् असें म्हटलें आहे. आणि अवन्ती वगैरे उदाहरणांमध्यें जाति ही उपसर्जन नाहींच.

ह्या अधिकाराचा आपिशला ब्राह्मणी येथें जो उपयोग दाखविला आहे तो बरोबर नाहीं. कारण स्त्रियाम् अशी अनुवृत्ति येत आहे; त्या 'स्त्रियाम्' या पदाचा अण् प्रत्ययाकडे संबंध केला म्हणजे स्त्रीत्व-विशिष्ट अर्थी केलेला जो अण् तदन्ताहून ङीप् होतो असा अर्थ होईल.

तरी पण 'काशकृत्स्निना प्रोक्ता मीमांसा काश-

---

६—आपिशलि शब्दाहून प्रोक्त या अर्थी अण् प्रत्यय ( ४।३।१०१ ) व त्याच्या पुढे त्या आपिशलीने सांगितलेल्या व्याकरणाचें अध्ययन करणारी या अर्थी पुन: दुसरा अण् प्रत्यय ( ४।२।५९ ) होऊन पुढें स्त्रीलिंगी टाप् प्रत्यय झाला आहे. येथें दुसऱ्या अण् प्रत्ययाचा लुक् ( ४।२।६४ ) झाला आहे. तेव्हां येथें पहिला अण् प्रत्यय घेऊन ङीप् प्रत्यय करावयाचा परंतु त्या अण् प्रत्ययाचा प्रोक्त हा अर्थ येथें उपसर्जन म्हणजे अप्रधान आहे. 'अध्ययन करणारी' हा दुसऱ्या अण् प्रत्ययाचा अर्थ प्रधान आहे.

७—पहिला अण् प्रत्यय कायम असल्यामुळें आपिशल हा शब्द अण्-प्रत्ययान्त आहेच. आणि दुसऱ्या अण् प्रत्ययाचा लुक् झाल्यामुळें त्याचा अर्थ त्या अण् प्रत्ययान्तालाच आलेला आहे. आणि तो अर्थ तर मुख्यच आहे.

८—दुसरा अण् प्रत्यय लुप्त झाल्यामुळें त्याचा अर्थ उरलेल्या भागाला मानावयाचा तो आपिशल एवढ्याला मानला जातो. त्यांतील नुसत्या पहिल्या अण् प्रत्ययाला मानावयाचा नाहीं. तेव्हां त्या अण् प्रत्ययाचा अर्थ प्रोक्त एवढाच आहे. आणि तो अप्रधानच आहे. म्हणजे उपसर्जनच होत आहे. म्हणून ङीप् प्रत्यय होत नाहीं.

९—अवन्ति आणि कुन्ति या शब्दांहून 'त्याची मुलगी' या अर्थी ष्यङ् प्रत्यय ( ४।१।७१ ) व त्याचा लुक् ( ४।१।१७७ ) झाला आहे. येथें मूळ प्रकृतीचा अर्थ प्रत्ययाच्या अर्थाला विशेषण असल्यामुळें ङीप् प्रत्यय ( ४।१।६५ ) होणार नाहीं.

१०—जाति असें अपत्य प्रत्ययान्ताला म्हणतात. ( ४।१।६३ वरील टीप पहा. )

११—आपिशलीने प्रोक्त व्याकरण या अर्थी अण् प्रत्यय केला आहे. तेव्हां त्याला स्त्रीत्व नाहीं.

काशकृत्स्नीमधीते काशकृत्स्ना ब्राह्मणी अत्र प्राप्नोति । नैष दोषः । अध्येत्र्यामभिधेयायामण ईकारेण भवितव्यं यश्चात्राध्येत्र्यामभिधेयायामणुक्तो लुप्तः स यश्च श्रूयत उत्पन्नस्तस्मादीकार इति कृत्वा पुनर्न भविष्यति ॥

इदं तर्हि प्रयोजनं प्रधानेन तदन्तविधिर्यथा स्यात् । कुम्भकारी नगरकारी । अत्र हि प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीत्यवयवादुत्पत्तिः प्राप्नोति । कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणं भवतीति संघातादुत्पत्तिर्भविष्यति । कृद्ग्रहण इत्युच्यते न चैतत्कृद्ग्रहणम् । कृदकृद्ग्रहणमेतत् । कृदप्ययमणतद्धितोऽपि । एवं तर्हीकारान्तेन समासो भविष्यति । यद्येवं लभ्येत कृतं स्यात्तत्तु न लभ्यम् । किं कारणम् । अत्र

---

कृत्स्नी' म्हणजे काशकृत्स्नि ऋषीनें सांगितलेली मीमांसा. काशकृत्स्नीमधीते काशकृत्स्ना ब्राह्मणी म्हणजे त्या मीमांसेचें अध्ययन करणारी ब्राह्मणी. अनुपसर्जनात् हा अधिकार नसेल तर काशकृत्स्ना ब्राह्मणी येथें ङीप् प्रत्यय होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण, अध्ययन करणारी जी ब्राह्मणी तिचें स्त्रीत्व दाखविणारा ङीप् प्रत्यय येथें व्हावयाचा; पण अध्ययन करणारी या अर्थीं जो येथें अण् प्रत्यय केला होता तो लुप्त झाला आहे. आतां प्रोक्ता या अर्थीं केलेला जो अण् प्रत्यय तो लोप न होतां शिल्लक राहिला आहे त्याहून ङीप् प्रत्यय काशकृत्स्नी मीमांसा असा पूर्वीं झालेलाच आहे. तेव्हां पुनः त्याहून ङीप् होणार नाहीं.

तर मग अनुपसर्जनात् या अधिकाराचा उपयोग असा कीं सूत्रामध्यें उच्चारलेले जे टित् वगैरे ते ज्या ठिकाणीं मुख्य असतील तेथें विशिष्टाहून प्रत्यय होण्याकरितां तदन्तविधि झाला पाहिजे. उदा० कुम्भकारी, नगरकारी. तदन्तविधि असेल तर 'प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला त्या प्रकृतीपासूनच समुदाय घ्यावा' या परिभाषेनें 'कार' या आंतील एका भागावरूनच ङीप् प्रत्यय होऊं लागेल.

परंतु 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम्' (६।२।४९ भाष्य) या परिभाषेनें कुम्भकार एवढें अण्–प्रत्ययान्त समजून त्याहून ङीप् होईल.

पण तेथें 'कृद्ग्रहणे' असें म्हटलें आहे. आणि अण् हें कृद्ग्रहण नव्हे. कृत् व अकृत् या उभयतांचें येथें ग्रहण आहे. कारण, येथें अण् प्रत्यय कृत्ही घेतला जातो आणि तद्धितही घेतला जातो.

तर मग कार एवढ्यावरून ङीप् प्रत्यय झाला तर त्याच्याशींच कुम्भ शब्दाचा समास होईल.

जर तसें झालें तर कामच होईल. पण तसें होणें मात्र शक्य दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं गति, कारक आणि उपपद

---

१२—कुम्भं करोतीति कुम्भकारी. कुम्भ हें कर्म उपपद असतांना 'कृ' धातूहून अण प्रत्यय (३।२।१) झाला आहे. अण् प्रत्ययान्ताहून पुढील सूत्रानें ङीप प्रत्यय करावयाचा तो कार एवढ्यावरूनच होईल. कारण अण् प्रत्यय कृ धातूहून केला असल्यामुळे कृ या त्याच्या प्रकृतीपासून पुढील समुदायच अण्–प्रत्ययान्त म्हणून घेतां येतो. आता या प्रकृत सूत्रानें तदन्त-विधीचें ज्ञापक केलें म्हणजे पुनः दुसरा तदन्त–विधि होऊन कुम्भकार एवढ्याहून ङीप प्रत्यय होतो. अण्-प्रत्ययान्त जरी कार एवढेंच आहे तरी तें कार अन्तीं असलेलें कुम्भकार हेंही होतें. हें तदन्तविधिज्ञापनाचें फल होय. आतां तदन्त–विधीमुळें बहुकुरुचर या बहुव्रीहीहून ङीप प्रत्यय होऊं लागेल. याकरितां अनुपसर्जनात् हा अधिकार केला पाहिजे. हें ज्ञापनानंतरचें चारितार्थ्य होय.

हि गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासो भवतीति समास एव तावद्भवति समासे च कृतेऽवयवादुत्पत्तिः प्राप्नोति । अवयवादुत्पत्तौ सत्यां को दोषः । कौम्भकारेयो न सिध्यति । अवयवस्य वृद्धिस्वरौ स्याताम् । तस्मादनुपसर्जनाधिकारः ॥

**अनुपसर्जनाधिकारे जातेर्ङीष्विधाने सुपर्ण्या उपसंख्यानम् ॥ ६ ॥**

अनुपसर्जनाधिकारे जातेर्ङीष्विधाने सुपर्ण्या उपसंख्यानं कर्तव्यम् । सुपर्णी ॥

**न वा समासस्यानुपसर्जनत्वाज्जातिवाचकत्वाच्च शब्दस्य सामान्येन ङीष्विधानम् ॥ ७॥**

न वैष दोषः । किं कारणम् । समासस्यानुपसर्जनत्वात् । समासोऽत्रानुपसर्जनम् । स च जातिवाचकः । समासस्यानुपसर्जनत्वात्तस्य च जातिवाचकत्वाच्छब्दस्य सामान्येन ङीष्भविष्यति । जातेरस्त्रीविषयादयोपधात् [ ४.१.६३ ] इति ॥ कथं कृत्वा चोदितं कथं कृत्वा परिहारः । बहुव्रीहिरिति कृत्वा चोदितं तत्पुरुष इति कृत्वा परिहारः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये चतुर्थस्याध्यायस्य प्रथमे पादे प्रथममाह्निकम् ॥

---

याचा कृत्—प्रत्ययान्ताबरोबरच समास होतो या परिभाषेनें ङीप् प्रत्ययाच्या अगोदरच समास होईल आणि तो समास झाल्यानंतर त्यांतील 'कार' याहून ङीप् प्रत्यय होऊं लागेल.

पण, समासांतील, 'कार' या उत्तरपदाहून ङीप् प्रत्यय झाला तर काय बिघडेल ?

कौम्भकारेयः हें रूप साधणार नाहीं. कारण, 'कारी' एवढ्याहून ढक् प्रत्यय झाला[१३] तर त्या ढक् प्रत्ययामुळें होणारी वृद्धि (७।२।११८) आणि अन्तोदात्त स्वर ( ६।१।६५ ) हे 'कारी' एवढ्यालाच होतील. तेव्हां एकंदरीत अनुपसर्जनात् हा अधिकार केला पाहिजे.

( वा. ६ ) 'अनुपसर्जनात्' ह्या अधिकारामध्यें जातिवाचक शब्दाहून जो ङीष् प्रत्यय (४।१।६४) सांगितला आहे तेथें सुपर्ण शब्दाहून ङीष् होतो असें म्हणावें. उदा. सुपर्णी.

(वा. ७) अथवा हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं सुपर्ण हा समास कांहीं उपसर्जन[१५] नव्हे; तो समास जातिवाचक आहे. तेव्हां सुपर्ण हा सामासिक शब्द उपसर्जन नसून जातिवाचक आहे म्हणून त्याहून 'जातेरस्त्रीविषयात्०' (४।१।६३) या सामान्य सूत्रानेंच ङीष् प्रत्यय होईल.

पण येथें प्रश्न करणाऱ्याचा काय बरें हेतु असावा आणि उत्तर देणाऱ्याचा तरी काय असावा ?

'अनुपसर्जनात्' हा बहुव्रीहि समजून प्रश्न केला आहे. आणि तत्पुरुष समजून उत्तर दिलें आहे.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्या या चवथ्या अध्यायाच्या पहिल्या पादांताल पहिले आन्हिक समास झालें.

---

१३—कार शब्दाहून ङीब प्रत्यय झाला असतां स्त्रीप्रत्ययान्त कारी एवढ्याला म्हणतां येईल. व स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न ( ६।१।१३ भाष्य ) या परिभाषेने कुम्भकारी एवढ्यालाही म्हणतां येईल. तेव्हां विशिष्टाहून ढक प्रत्यय होऊन कौम्भकारेय हे उदाहरण साधलें तरी एकदां कारी शब्दाहूनही ढक प्रत्यय होऊन कुम्भकारेय असें भलतेंच रूप होऊं लागेल.

१४—अनुपसर्जनात् हा वास्तविक नञ्तत्पुरुष आहे तो मनांत न घेतां न उपसर्जनं यस्मिन् असा बहुव्रीहि समास गृहीत धरून ही शंका केली आहे. कारण या शब्दामध्यें पर्ण हें उपसर्जन आहे.

१५—तेव्हां न उपसर्जनम् अनुपसर्जनम् असा हा नञ्तत्पुरुषच आहे.

अध्याय ४ पाद १ आन्हिक १ समाप्त.

## टिड्ढाणञ्द्वयसज्दघ्नञ्मात्रच्तयप्ठक्ठञ्कञ्क्वरपः ॥ ४ । १ । १५ ॥

### ढग्रहणे सानुबन्धकस्योपसंख्यानम् ॥ १ ॥

ढग्रहणे सानुबन्धकस्योपसंख्यानं कर्तव्यम् । कारिकेयी हारिकेयी ॥ किं पुनः कारणं न सिध्यति ।

### अननुबन्धकग्रहणे हि न सानुबन्धकस्य ॥ २ ॥

अननुबन्धकग्रहणे हि सानुबन्धकस्य ग्रहणं न भवतीत्येषा परिभाषा कर्तव्या । कान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि । तव्यग्रहणे तव्यद्ग्रहणं मा भूत् । दिव्ग्रहणे दिवुग्रहणं मा भूत् ॥ ननु चेयमपि कर्तव्या तदनुबन्धकग्रहणेऽतदनुबन्धकग्रहणं नेति । कान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि । यद्ग्रहणे ण्यद्ग्रहणं मा भूत् । अङ्ग्रहणे चङ्ग्रहणं मा भूत् । अच्ग्रहणे णच्ग्रहणं मा भूत् ॥ तद् द्वे एते परिभाषे कर्तव्ये । न कर्तव्ये । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत एते परिभाषे यदयं वामदेवाड्ड्यड्ड्यौ [४. २. ९] इति ययतौ डितौ करोति ॥ तत्तर्ह्युपसं-

(सू. १५ वा. १) ह्या सूत्रामध्ये जे ढ असें म्हटलें आहे त्याऐवजी ढकाराला ककार वगैरे एखादें व्यंजन इत्संज्ञक जोडून त्याचा उच्चार करावा; कारण कारिकेयी हारिकेयी इत्यादि ठिकाणी ङीप् प्रत्यय झाला पाहिजे.

पण प्रकृत सूत्रामध्यें ढ असें उच्चारलें असतां कारिकेयी हारिकेयी इत्यादि उदाहरणांमध्यें ङीप् प्रत्यय का बरें होणार नाही ?

(वा. २) 'सूत्रामध्यें अनुबन्धैरहिताचें ग्रहण केलें असेल तर तेथें अनुबन्धसहिताचें ग्रहण होत नाही' अशी परिभाषा आहे; आणि ती केलीच पाहिजे.

कोणतीं बरें त्या परिभाषेची प्रयोजनें आहेत ?

तव्य प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे तेथें (३।१।९६) तव्यत् प्रत्ययाचें ग्रहण न झालें पाहिजे. तसेंच दिव् असें उच्चारलें आहे तेथें (७।१।८४) दिवु याचें ग्रहण न झालें पाहिजे.

पण 'सूत्रामध्यें एका अनुबंधानें सहित अशाचें ग्रहण केलें असेल तर त्या ठिकाणीं तो अनुबंध असून आणखी दुसरा अनुबंध असलेल्याचें ग्रहण होत नाहीं' अशीही परिभाषा केली पाहिजे.

कोणती बरें या परिभाषेची प्रयोजनें आहेत ?

यत् प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे तेथें (६।१।११३) ण्यत् प्रत्ययाचें ग्रहण न झालें पाहिजे. अङ् प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे तेथें (७।४।१६) चङ् प्रत्ययाचें ग्रहण न झालें पाहिजे. तसेंच, अच् प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथें (२।४।९४) णच् प्रत्ययाचें ग्रहण न झालें पाहिजे.

तेव्हां या दोन्ही परिभाषा केल्या पाहिजेत.

करावयास नकोत. कारण ह्या दोन्ही परिभाषा आचार्यांच्या कृतीवरूनच सूचित होत आहेत. 'वामदेवाड्ड्यड्ड्यौ' (४।२।९) या सूत्रामध्यें ड्य आणि ड्यत् या दोन्ही प्रत्ययांना

१ (सू. १५)—अनुपसर्जन जे टित् वगैरे शब्द तदन्त प्रातिपदिकांहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीप प्रत्यय होतो. उदा० नदट् नदी. टित्, ढ, अण्, अञ्, द्वयसच्, दघ्नच्, मात्रच्, तयप्, ठक्, ठञ्, कञ्, आणि क्वरप् हे टित् वगैरे होत.

२—कारिका व हारिका या टाप्-प्रत्ययान्त स्त्रीलिंगी शब्दांहून 'त्यांची मुलगी' या अर्थी ठक् (४।१।१२०) प्रत्यय व त्यानंतर प्रकृत सूत्रानें ङीप् प्रत्यय झाला आहे.

३—अनुबन्ध म्हणजे इत्संज्ञक वर्ण.

ख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । अननुबन्धको ढशब्दः स्त्रियां नास्तीति कृत्वा सानुबन्धकस्य ग्रहणं विज्ञास्यते । ननु चायमस्ति शिलाया ढः [ ५.३.१०२ ] इति । नैष स्त्रियां वर्तते । अयं तर्हि सभाया यः ढश्छन्दसि [४.४.१०५;१०६] इति । एषोऽपि न स्त्रियां वर्तते । किं कारणम् । तत्र साधुः [ ४.४.९८ ] इति वर्तते कथं स्त्री नाम सभायां साध्वी स्यात्॥

अञ्ग्रहणमनर्थकं तदन्ताद्धि ङीन्विधानम् ॥ ३ ॥

अञ्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । तदन्ताद्धि ङीन्विधानम् । तदन्ताद्धि अञन्तान्ङीन्विधीयते । शार्ङ्गरवाद्यञो ङीन् [ ४.१.७३ ] इति । न चास्ति विशेषोऽञन्तान्ङीनो वा ङीपो वा । तदेव रूपं स एव स्वरः ॥

न वा जात्यधिकारात् ॥ ४ ॥

न वानर्थकम् किं कारणम् । जात्यधिकारात् । जातेरिति तत्रानुवर्तते ऽजा-

---

अनुबंध ङकार जो जोडला आहे त्यावरूनच ह्या परिभाषा सूचित होतात. एकंदरीत कारिकेयी हारिकेयी इत्यादि उदाहरणांमध्यें ङीप् प्रत्यय होण्याकरितां प्रकृत सूत्रामध्यें ढ प्रत्ययाला अनुबंध जोडला पाहिजे.

अनुबंध जोडावयास नको. कारण, अनुबंधरहित जो ढ प्रत्यय आहे त्यानें साधलेला शब्द स्त्रीलिंगी नाहीं. म्हणून येथील ढ या शब्दानें आपोआपच अनुबंधसहिताचें ग्रहण होईल.

पण 'शिलाया ढः' (५।३।१०२) यानें अनुबंधरहित असा ढ प्रत्यय सांगितला आहे ना?

सांगितला आहे खरा, परंतु त्या प्रत्ययानें झालेला शैलेय शब्द स्त्रीलिंगी नाही.

तर मग 'सभाया यः' (४।४।१०५) या सूत्राच्या पुढील 'ढश्छन्दसि' या सूत्रानें अनुबंधरहित असा नुसता ढ प्रत्यय सांगितला आहे तो घ्यावा.

त्या ढ प्रत्ययानें साधिलेला जो वैदिक सभ्य शब्द[५] तोही स्त्रीलिंगी नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं 'ढश्छन्दसि' (४.४.१०६) येथें 'तत्र साधुः' (४।४।९८) या पदांची अनुवृत्ति आहे. आणि 'सभेमध्यें साध्वी' अशी स्त्री कशी बरें असूं शकेल ?

( वा. ३ ) ह्या सूत्रामध्यें अञ् प्रत्ययाचें जे ग्रहण केलें आहे तें व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें की—अञ् प्रत्ययान्ताहून स्त्रीलिंगी 'ङीन्' प्रत्यय 'शार्ङ्गरवाद्यञो ङीन्' (४।१।७३) यानें सांगितला आहे. आणि अञ्-प्रत्ययान्ताच्या पुढें ङीन् प्रत्यय केला काय आणि ङीप् प्रत्यय केला काय रूप सारखेंच होणार आणि स्वरही सारखाच[६] होणार.

( वा. ४ ) प्रकृत सूत्रामध्यें अञ्ग्रहण व्यर्थ नाही.

काय कारण ?

कारण असें कीं—त्या ङीन् प्रत्यय सांगणाऱ्या शास्त्रामध्यें 'जातेः' अशी अनुवृत्ति आहे. तेव्हां जाति वाच्य नसेल अशा ठिकाणीं अञ् प्रत्ययान्ताहून ङीप् प्रत्यय होण्याकरितां येथें आहे.

---

४—ङकार जोडण्यांत सूत्रकारांच्या मनांतलि हतु असा आहे कीं यथतोश्चातदर्थे (६।२।१५६) या सूत्रामध्यें य आणि यत् या पदांनीं क्रमानें ञ्य आणि ञ्यत् या प्रत्ययांचें ग्रहण होऊं नये, परंतु ह्या परिभाषा नसतील तर ङकार जोडला तरी त्याचें तेथे ग्रहण होणारच. तेव्हां ङकार व्यर्थ होईल.

५—यज्ञसभेमध्यें विद्वान् अशाच पुरुषांना अधिकार

६—अञ् प्रत्ययान्ताचा आदि उदात्त (६।१।१९७) होतो. त्यापुढें ङीप् केला तर तो अनुदात्त (३।१।४) असल्यामुळें पूर्वीचा आदि उदात्तच कायम राहणार आणि ङीन् केला तरी नित् स्वरानें (६।१।१९७) तोच होणार.

त्यर्थोऽयमारम्भः । औत्सी औदपानी ॥ तच्चावश्यं जातिग्रहणमनुवर्त्यम् ।

**अनधिकारे हि पुंयोगादाख्यायां ङीन्प्रसङ्गः ॥ ५ ॥**

अननुवर्तमाने हि जातिग्रहणे पुंयोगादाख्यायां ङीन्प्रसज्येत । बैदस्य स्त्री बैदीति ॥ यदि तर्ह्यस्य निबन्धनमस्तीदमेव कर्तव्यम् । तदप्यवश्यं कर्तव्यम् । अक्रियमाणे हि तस्मिन् बैदस्य भगिनी बैदी परत्वाज्जातिलक्षणो ङीष् ङीपं बाधेत । ङीनि पुनः सति परत्वान्ङीन्ङीपं बाधते ॥

**ख्युन उपसंख्यानम् ॥ ६ ॥**

ख्युन उपसंख्यानं कर्तव्यम् । आढ्यंकरणी सुभगंकरणी ॥

अत्यल्पमिदमुच्यते ख्युन इति । नञ्स्नञीकक्ख्युंस्तरुणतलुनानामुपसंख्यानम् । नञ्स्नञीकक्ख्युंस्तरुणतलुनानामुपसंख्यानं कर्तव्यम् । नञ् स्नञ् । स्त्रैणी पौंस्नी । ईकक् । शाक्तीकी याष्टीकी । ख्युन् । आढ्यंकरणी सुभगंकरणी । तरुण तलुन । तरुणी तलुनी ॥

---

अञ् ग्रहण केलें आहे. उदा०—औत्सी, औदपानी[७]. आणि त्या सूत्रांत 'जातेः' या पदाची अनुवृत्ति तर अवश्य केलीच पाहिजे.

(वा. ५) तेथें 'जातेः' याची अनुवृत्ति केली नाहीं तर जो पुरुषवाचक शब्द पुरुषाच्या संबंधानें त्याच्या स्त्रीला लागतो तशा अण्-प्रत्ययान्त शब्दाहून 'त्याची स्त्री' या अर्थीं त्या सूत्रानें ङीन् प्रत्यय होऊं लागेल. उदा०—बैदस्य स्त्री बैदी[८].

आतां जर असें प्रकृत सूत्रामध्यें अञ् ग्रहण करण्याचें कारण दिसतें तर येथेंच अञ्-ग्रहण असूं दे. ङीन् प्रत्यय सांगणाऱ्या शास्त्रामध्यें ( ४।१।७३ ) अञ्—ग्रहण करूं नये.

तेथेंही पण अञ् ग्रहण केलेंच पाहिजे. केलें नाहीं तर बैदस्य भगिनी बैदी येथें ङीन् प्रत्यय होणार नाही. प्रकृत सूत्रानें ङीप् प्रत्यय प्राप्त होत आहे. तरी पण जातिशब्दाहून सांगितलेला ङीप् प्रत्यय परत्वास्तव या ङीपाचा बाध करील. आणि तेथें अ —ग्रहण केलें म्हणजे मात्र तो अण्—प्रत्ययान्ताहून सांगितलेला ङीन् या ङीषाचा बाध करूं शकतो.

(वा. ६) ख्युन्-प्रत्ययान्ताहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—आढ्यंकरणी[९], सुभगंकरणी.

येथे जें ख्युन् प्रत्ययान्ताहून ङीप्—प्रत्यय सांगावा असें म्हटलें आहे ते फारच थोडें आहे. खरें पाहिलें तर सौनाग वैयाकरणांनीं सांगितल्याप्रमाणे 'नञ्स्नञीकक्ख्युंस्तरुणतलुनानामुपसंख्यानम्' म्हणजे नञ्[१०] स्नञ् ईकक् व ख्युन् हे प्रत्यय केलेले शब्द आणि तरुण व तलुन हे शब्द यांहून स्त्रीत्व विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो असें येथें म्हणावें. उदा०—स्त्रैणी पौंस्नी शाक्तीकी याष्टिकी आढ्यंकरणी सुभगंकरणी तरुणी तलुनी.

---

७—उत्स व उदपान या शब्दांहून तत्र भवः या प्राग्दीव्यतीय अर्थीं अञ् प्रत्यय ( ४।१।८६ ) व त्यानंतर प्रकृत सूत्रानें ङीप् प्रत्यय झाला आहे.

८—बिदस्य गोत्रापत्यं बैदः. येथें बिद शब्दाहून अञ् प्रत्यय ( ४।१।१०४ ) होतो. अपत्य-प्रत्ययान्त शब्दाला जातिशब्द म्हणतात. त्या बैदाची बहीण ही स्वतः बिदाचें गोत्रापत्यच असल्यामुळे त्या अर्थी तो जातिशब्द होतो. आतां जेव्हां त्या बैदाची स्त्री असा अर्थ विवक्षित असेल तेव्हां मात्र ती स्त्री बिदाचें अपत्य नसल्यामुळें जातिशब्द म्हणता येत नाहीं. तिच्या भर्त्याचा जो बैद हा शब्द तो फक्त त्याच्या संबंधामुळेंच तिला लागतो.

९—आढ्य, सुभग वगैरे शब्द उपपद असतांना कृ धातूहन ख्युन् प्रत्यय ( ३।२।५६ ) सांगितला आहे.

१०—नञ्, स्नञ् ( ४।१।८७ ) आणि ईकक् ( ४।४।५९ ) हे तद्धित प्रत्यय आहेत.

## यञश्च ॥ ४ । १ । १६ ॥

आपत्यग्रहणं कर्तव्यं द्वीपाद्यञः प्रतिषेधार्थम् । इह मा भूत् । द्वैप्येति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नैवं विज्ञायते कञ्करपो यञश्चेति । कथं तर्हि । कञ्करपो ऽयञश्चेति ॥

## प्राचां ष्फ तद्धितः ॥ ४ । १ । १७॥

तद्धितवचनं किमर्थम् ।

**तद्धितवचनं षितः प्रातिपदिकादीकारार्थम् ॥ १ ॥**

तद्धितवचनं क्रियते षितः प्रातिपदिकादीतीकारो यथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । षित्करणसामर्थ्यादेवात्रेकारो भविष्यति । यथैव तर्हि षित्करणसामर्थ्यादप्रातिपदिकादपीकारो भवत्येवं प्रातिपदिकादित्यस्यानुवर्तनसामर्थ्यादषितोऽपि प्रातिपदिकादीकारः स्यात् । अस्त्यन्यत्प्रातिपदिकानुवृत्तौ प्रयोजनम् । किम् । उत्तरार्थम् । अत इञ् [ ४.१.९५] दाक्षिः॥

## सर्वत्र लोहितादिकतन्तेभ्यः ॥ ४ । १ । १८ ॥

सर्वत्रग्रहणं किमर्थम् । प्राचामेव हि

---

(सू. १६) या सूत्रामध्यें ' अपत्य या अर्थी केलेला जो यञ प्रत्यय' असें म्हणावें. कारण, द्वीप शब्दाहून केलेला जो यञ् प्रत्यय ( ४।३। १० ) तदन्ताहून ङीप् प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण 'कञ्करपो' यञश्च ! असा जो मूळ संहिता पाठ आहे तेथें कञ्करपः यञश्च असा पदच्छेद नाहीं. तर्थ कञकरपः अयञश्च असा पदच्छेद आहे.

( सू. १७ ) येथें तद्धित-ग्रहण कशाकरितां केलें आहे ?

( वा. १ ) येथें तद्धित—ग्रहण अशाकरितां केलें आहे कीं ष्फ—प्रत्ययान्ताला प्रातिपदिक संज्ञा ( १।२।४६ ) होऊन प्रातिपदिकाहून सांगितलेला ङीष् प्रत्यय त्या ष्फ—प्रत्ययान्ताहून झाला पाहिजे.

तद्धित ग्रहणाचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, ष्फ प्रत्ययाला जो षकार लावला आहे तो ङीष् प्रत्यय होण्याकरितांच लावला आहे. तेव्हां त्या षकाराच्या जोरावर प्रातिपदिक संज्ञा नसली तरी ङीष् होईल.

तर मग येथें जसा प्रातिपदिक संज्ञा नसली तरी इत्संज्ञक षकाराच्या जोरावर ङीष् प्रत्यय होतो तसा प्रातिपदिकात् याची जी येथें अनुवृत्ति केली आहे तिच्या जोरावर इत्संज्ञक षकार नसला तरी प्रातिपदिकाहून ङीष् होऊं लागेल.

पण प्रातिपदिकात् या अनुवृत्तीचा दुसरा उपयोग आहे ना ?

तो कोणता ?

अत इञ् ( ४।१।९५ ) वगैरे पुढील सूत्रांमध्यें अनुवृत्ति झाली पाहिजे हा. उदा० दक्षस्यापत्यं दाक्षिः.

( सू. १८ ) येथें ' सर्वत्र ' असें कशाकरितां म्हटलें आहे.

तें नाहीं म्हटलें तर प्राचाम् या पदाचा येथें

---

१ ( सू. १६ )—यञ्-प्रत्ययान्ताहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो. उदा० गार्गी.

२—गर्गादिभ्योऽयञ् येथें अयञ् असा अकारेत्संज्ञक प्रत्यय सांगितला आहे त्याचाच येथें प्रकृत सूत्रामध्यें अयञः असा निर्देश केला आहे. तेव्हां द्वैप्या येथील यञ प्रत्ययाला अकार इत्संज्ञक नसल्यामुळें येथें त्याचें ग्रहण होत नाहीं.

१ ( सू. १७ )—प्राचीनांच्या मतानें यञ् प्रत्ययान्ताहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ष्फ प्रत्यय होतो आणि त्या ष्फ प्रत्ययाला तद्धित संज्ञा होते. उदा० गार्ग्यायणी.

१ ( सू. १८ )—लोहित शब्दापासून कत शब्दापर्यंत जे गर्गादि गणांतील शब्द त्यांहून अपत्य अर्थी यञ् प्रत्यय केला असतां त्याच्या पुढें स्त्रीलिंगी ष्फ प्रत्यय सर्वांच्याच मतानें होतो. उदा० लौहित्यायनी,

स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धं प्राचां पूर्वेण । इदं तर्हि प्रयोजनं सर्वेषां यथा स्यात् । आवट्यायनी । चापं बाधित्वा ष्फो यथा स्यात् ॥

लोहितादिषु शाकल्यस्योपसंख्यानम् ॥ १ ॥

लोहितादिषु शाकल्यस्योपसंख्यानं कर्तव्यम् । शाकल्यायनी ॥ यदि पुनरयं शकलशब्दो लोहितादिषु पठ्येत । नैवं शक्यम् । इह हि शाकल्यस्य छात्राः शाकलाः कण्वादिभ्यो गोत्रे [४.२.१११] इत्यण्न स्यात् ॥ एवं तर्हि

कण्वात्तु शकलः पूर्वः

कण्वशब्दाच्छकलशब्दः पूर्वः पठितव्यः॥

कतादुत्तर इष्यते ।

कतशब्दाच्छकलशब्द उत्तरः पठितव्यः ॥

पूर्वोत्तरौ तदन्तादी

पूर्वोत्तरौ गणौ तदन्तादी द्रष्टव्यौ । ये कण्वादयस्ते शकलादयः । ये कतपर्यन्तास्ते शकलपर्यन्ताः ॥ किं प्रयोजनम् ॥

ष्फाणौ तत्र प्रयोजनम् ॥

तत्रैवं सति ष्फाणौ सिद्धौ भवतः ॥

कण्वात्तु शकलः पूर्वः कतादुत्तर इष्यते। पूर्वोत्तरौ तदन्तादी ष्फाणौ तत्र प्रयोजनम् ॥

---

संबंध होऊन पूर्वेकडील वैयाकरणांच्या मतानेंच येथें ष्फ प्रत्यय होईल.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण पूर्वेकडील वैयाकरणांच्या मतानें ष्फ प्रत्यय पूर्वसूत्रानेंच सिद्ध होत आहे.

तर मग येथें सर्वत्र शब्दाचा उपयोग असा समजावा कीं ष्फ प्रत्ययाची प्राप्ति ज्या ठिकाणीं येईल त्या त्या सर्व ठिकाणीं ष्फ प्रत्ययच झाला पाहिजे. उदा० आवट्यायनी. येथें परत्वास्तव चाप् प्रत्यय (४।१।७५) होईल तो न होतां तेथें ष्फ प्रत्ययच झाला पाहिजे.

(वा. १) ह्या सूत्रामध्यें शाकल्य या यञ्-प्रत्ययान्त शब्दाहून स्त्रीलिंगी ष्फ प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० शाकल्यायनी.

आतां जर हा शाकल शब्द गर्गादि गणामध्येंच, पण लोहितादि गणाच्या पुढें कण्वादि गणामध्यें आहे तो तेथून काढून लोहितादि गणामध्येंच घातला तर प्रस्तुत सूत्रानेंच इष्ट रूप सिद्ध होईल खरें; परंतु असें करणें शक्य नाहीं. कारण शाकल्यस्य छात्राः शाकलाः येथें कण्वादिभ्यो गोत्रे (४।२।१११) यानें शाकल्य या यञन्ताहून जो अण् प्रत्यय होत असतो तो होणार नाहीं.

तर मग आतां—

शकल हा शब्द गर्गादि गणामध्येंच, पण कण्व शब्दाच्या पूर्वीं आणि कत शब्दाच्या पुढें घालावा.

त्या गर्गादिगणामधील पूर्वीचा लोहितादि गण कत शब्दापर्यंतच न समजतां शकल शब्दापर्यंत समजावा आणि पुढील कण्वादिगण हा कण्व शब्दापासूनच न समजतां शकल शब्दापासून समजावा.

असें करण्याचा काय उपयोग?

तसा पाठ केला म्हणजे शकल हा शब्द दोन्ही गणांमध्यें सांपडतो म्हणून शाकल्यायनी येथें ष्फ प्रत्यय, आणि शाकल्यस्य छात्राः शाकलाः येथें अण् प्रत्यय हे दोन्ही सिद्ध होतात.

---

२—येथें पूर्वेकडील वैयाकरणांच्या मतानें पूर्वसूत्रानं प्राप्त झालेला ष्फ प्रत्ययच होतो. इतरांच्या मतीं आवट्या असा चाप प्रत्यय होतोच. सर्वत्र या शब्दाचा पूर्वसूत्रामध्यें संबंध करावा असें तात्पर्य आहे.

३—शकल हा शब्द गर्गादि गणामध्यें (४।१।१०५) आहे. परंतु त्या गर्गादि गणांतील अन्तर्गण जो लोहितादि गण त्यामध्यें नाहीं. लोहितादि गण संपल्यानंतर पुढें गर्गादि गणामध्येंच अन्तर्गण जो कण्वादि गण आहे त्यामध्यें आहे. त्यामुळें शाकलस्य छात्राः शाकलाः येथें अण् प्रत्यय (४।२।१११) होतो.

**कौरव्यमाण्डूकाभ्यां च ॥ ४ । १ । १९ ॥**

**कौरव्यमाण्डूकयोरासुरेरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

कौरव्यमाण्डूकयोरासुरेरुपसंख्यानं कर्तव्यम् । आसुरायणी ॥

**छश्च ॥ २ ॥**

छश्चेति वक्तव्यम् । आसुरीयः कल्पः ॥

**वयसि प्रथमे ॥ ४।१।२० ॥**

वयस्यचरम इति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । वधूटी चिरण्टीति ॥

इह कस्मान्न भवति । उत्तानशया लोहितपादिका द्विवर्षा त्रिवर्षेति । नैतानि वयोवाचीनि । कथं तर्हि वयो गम्यते । संबन्धात् ॥ यदि तर्हि यत्र संबन्धाद्वयो गम्यते तत्र न भवतीहापि न प्राप्नोति । कुमारीति । अत्रापि संबन्धाद्वयो गम्यते । कोऽसौ संबन्धः । योऽसौ पुंसाऽसंप्रयोगः ॥

---

( सू. १९ वा. १ ) ह्या सूत्रामध्यें आसुरि या शब्दाहूनही ष्फ प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० आसुरायणी.[2]

( वा. २ ) आसुरि शब्दाहून शैषिक अर्थी तद्धित प्रत्यय अण् ( ४।२।११२ ) प्राप्त होतो तो न होतां तेथें छ प्रत्यय होतो असें म्हणावें.[3] उदा० आसुरीयः कल्पः.

( सू. २० ) 'वयस्यचरम इति वक्तव्यम्' म्हणजे येथें प्रथमे या शब्दाच्या ऐवजीं अचरमे असा शब्द घालावा. कारण वधूटी व चिरण्टी येथेंही ङीप् प्रत्यय झाला पाहिजे.

आतां उत्तानशया, लोहितपादिका, द्विवर्षा व त्रिवर्षा येथें प्रकृत सूत्रानें ङीप् कां होत नाहीं[3] ?

उत्तान वगैरे शब्द वयोवाचक नव्हेतच.

तर मग ह्या शब्दांचा प्रयोग केला असतां वयाची प्रतीति कशी होते ?

ह्या शब्दांच्या अर्थाचा वयाशीं संबंध असल्यामुळें वयाची प्रतीति होते.

पण अशी संबंधामुळें ज्या ठिकाणीं वयाची प्रतीति होते त्या ठिकाणीं जर प्रकृत सूत्रानें ङीप् प्रत्यय होत नाहीं तर कुमारी येथेंही ङीप् प्रत्यय होणार नाहीं. कारण तेथेंही संबंधामुळेंच वय गम्यमान होत आहे.

तो संबंध कोणता ?

पुरुषाशीं संबंध न होणें या अर्थाचा संबंध होय.

---

१—( सू. १९ ) कौरव्य आणि मांडूक्य या शब्दांहून स्त्रीत्व विवक्षा असतांना ष्फ प्रत्यय होतो. उदा० कौरव्यायणी, माण्डूक्यायनी. कुरुशब्दाहून ण्य प्रत्यय (४।१।१५१) केल्यानंतर कौरव्य शब्द सिद्ध होतो तेथें टाप् प्राप्त होतो. आणि मण्डूक शब्दाहून अण् प्रत्यय (४।१।११९) केल्यानंतर माण्डूक शब्द सिद्ध होतो. त्याहून ङीप् प्रत्यय ( ४।१।१५ ) प्राप्त होतो. दोघांचाही बाध करून ष्फ प्रत्यय होतो.

२—असुरस्य गोत्रापत्यं स्त्री या अर्थी असुर शब्दाहून इञ् प्रत्यय ( ४।१।९५ ), व पुढें हा ष्फ प्रत्यय झाला आहे.

३. आसुरि शब्दाच्या प्रसंगानें हे येथे वार्तिक कारांनीं सांगितलें आहे.

१—( सू. २० ) प्रथम वय जें बाल्य तद्वाचक शब्दाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो. उदा० कुमारी.

२—चरम म्ह० शेवटच. अचरम म्हटलें असतां त्यामध्यें बाल्य व तारुण्य या दोघांचा संग्रह होतो. वधूटी व चिरण्टी या शब्दांचा तरुणी असा अर्थ आहे.

३—उत्तानशया म्हणजे उताणी अशीच शयन करणारी म्हणजे अजून जी पालथी वळत नाहीं ती. उत्तानशया शब्दावरून अशा रीतीनें २ । ३ महिन्यांची अशी प्रतीति होते. लोहितपादिका म्हणजे जिचे तळपाय लाल आहेत अशी, म्हणजे अजून पायावर उभी न राहणारी. अशा रीतीनें लोहितपादिका शब्दावरून वर्षाच्या आंतली अशी प्रतीति होते. द्विवर्षा व त्रिवर्षा येथें तद्धितार्थी द्विगुसमास ( २।१।५१ ) होऊन पुढील तद्धित प्रत्ययाचा लुक् ( ५।१।८९ ) झाला आहे.

संबन्धादेवात्र वयो गम्यत इह पुनः संबन्धसंबन्धात् । इह तावदुत्तानशयेति यदा कर्तृत्वं विशेषितं भवति तत उत्तरकालं वयो गम्यते । लोहितपादिकेति यदा बहुव्रीह्यर्थो विशेषितस्तत उत्तरकालं वयो गम्यते । द्विवर्षा त्रिवर्षेति यदा द्विग्वर्थो विशेषितस्तत उत्तरकालं वयो गम्यते ॥ यदि तर्हि यत्र संबन्धादेव वयो गम्यते तत्र भवतीहापि तर्हि प्राप्नोति । कन्येति । निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । कन्यायाः कनीन च [४.१.११६] इति ॥

[ द्विगोः[1] ॥ ४।१।२१ ॥]

अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यो न तद्धितलुकि ॥ ४।१।२२॥

इमौ द्वौ प्रतिषेधावुच्येते तत्रैकः शक्योऽवक्तुम् । कथम् । एवं वक्ष्यामि । परिमाणान्तात्तद्धितलुकि ङीब्भवतीति । तन्नियमार्थं भविष्यति । परिमाणान्तादेव तद्धितलुकि ङीब्भवति नान्यत इति । ततो बिस्ताचितकम्बल्येभ्यो नेति । तद्धितलुकीत्येव ॥

---

कुमारी येथें अशा संबंधामुळें वय गम्यमान होतें हें खरें; पण उत्तानशया येथें तसें नाहीं. तर तेथें संबंधाच्या संबंधामुळें वय गम्यमान होणार आहे. अर्से पहा कीं उत्तानशया कुमारी म्हटलें असतां उत्तानशया कोण तर कुमारी अशी विशेष रूपानें जेव्हां व्यक्ति मनांत येईल तेव्हांच तिच्या विशेष वयाची कल्पना मनांत येते. तसेंच लोहितपादिका या बहुव्रीहीचा अर्थ जिचे तळ-पाय लाल आहेत अशी परंतु ती कोण तर कुमारी, अशी विशेष रूपानें व्यक्ति मनांत आल्यानंतरच तिच्या वयाची कल्पना होणार आहे. तसेंच द्विवर्षा व त्रिवर्षा येथें तद्धितार्थीं द्विगुसमास झाला आहे. दोन वर्षांची असा अर्थ आहे. येथेंही दोन वर्षांची कोण तर ती कुमारी अशी विशेष रूपानें व्यक्ति मनांत आल्यानंतरच वयाची कल्पना होते.

आतां जर संबंधानेंच वय जेथें गम्यमान होतें तेथें ङीप् होतो असें असेल तर कन्या येथें ङीप् प्रत्यय कां होत नाहीं ?

कन्या शब्दामध्यें ङीप् न करतां जो टाप् प्रत्यय केला आहे तो निपातनावरून सिद्ध होत आहे.

तें निपातन कोणतें ?

'कन्यायाः कनीन च' ( ४।१।११६ ) येथें जो कन्या असा शब्द उच्चारला आहे तें निपातन होय.

( सू. २२ ) ह्या सूत्रामध्यें जे दोन नञ् उच्चारले आहेत त्यांपैकीं एक उच्चारला नाहीं तरी चालेल.

तो कसा ?

असा कीं 'परिमाणान्तात्तद्धितलुकि' असें सूत्र करावें. 'परिमाणवाचक शब्द शेवटीं असलेल्या द्विगूहून ङीप् प्रत्यय होतो तद्धित प्रत्ययाचा लुक् झाला असतांना' असा त्याचा अर्थ होईल. पूर्वसूत्रानें सिद्ध असत हें सूत्र नियमार्थ होईल. तो नियम असा कीं—तद्धित प्रत्ययाचा लुक् झाला असतांना जर पूर्वसूत्रानें द्विगूहून ङीप् प्रत्यय होईल तर तो द्विगु परिमाणान्त असेल तरच होईल. त्याच्या पुढें 'बिस्ताचितकम्बल्येभ्यो न' असें सूत्र करावें. तेथें तद्धितलुकि याची अनुवृत्ति आहेच.

---

१—( सू. २१ ) ऱ्हस्व-अकारान्त जो द्विगुसमास त्याहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो. उदा० पञ्चनली.

१—( सू. २२ ) परिमाण-भिन्न कोणताही शब्द आणि परिमाणांपैकीं बिस्त, आचित आणि कम्बल्य हे शब्द शेवटीं असलेला जो द्विगु त्यांहून तद्धित प्रत्ययाचा लुक् झाला असेल तर ङीप् प्रत्यय होत नाहीं. उदा० पञ्चभिरश्वैः क्रीता पञ्चाश्वा.

**[ काण्डान्तात् क्षेत्रे ॥४।१।२३॥ पुरुषात् प्रमाणेऽन्यतरस्याम् ॥ ४।१।२४ ॥ ]**

**बहुव्रीहेरूधसो ङीष् ॥ ४।१।२५ ॥**

**ऊधसो नकारो लिङ्गाधिकारे ॥१॥**

ऊधसो नकारो लिङ्गाधिकारे कर्तव्यः । इह मा भूत् । महोधाः पर्जन्य इति ॥

**न वा समासान्ताधिकारे स्त्रीग्रहणात् ॥२॥**

न वा लिङ्गाधिकारे नकारः कर्तव्यः । किं कारणम् । समासान्ताधिकारे स्त्रीग्रहणात् । समासान्ताधिकारे स्त्रीग्रहणं कर्तव्यम् ॥

**इतरथा हि कब्विधिप्रसङ्गः ॥३॥**

इतरथा हि कब्विधिः प्रसज्येत ॥ कस्यां पुनरवस्थायां कप्प्राप्नोति । प्राङ्ङीषुत्पत्तेः । प्राक्तावन्न प्राप्नोति । किं कारणम् । न हि ङीष्विभाषा । उत्पन्ने तर्हि ङीषि प्राप्नोति । उत्पन्ने चापि न प्राप्नोति । किं कारणम् । नद्यन्तानां यो बहुव्रीहिरित्येवं तन्न चैष नद्यन्तानां बहुव्रीहिः । प्रागेव

---

। (सू. २५ वा. १ ) (समासान्त प्रकरणामध्यें नङ् आदेश (५।४।१३१) न सांगतां) प्रस्तुत स्त्री-प्रत्यय प्रकरणामध्येंच या ङीष् प्रत्ययाबरोबर ऊधस् शब्दाच्या सकाराला नकार होतो असें म्हणावें. कारण महोधाः पर्जन्यः येथें नकार न झाला पाहिजे.

(वा. २ ) अथवा येथें नकार आदेश सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं—समासान्ताः (५।४।६८) या अधिकारामध्यें जो नकार आदेश (५।४।१३१) सांगितला आहे तेथेंच स्त्रियाम् असे म्हणावें.

(वा. ३) तेथें स्त्रियाम् असें न म्हणतां येथेंच ङीष् प्रत्ययाबरोबर नकार सांगितला तर घटोघ्नी ह्या प्रकृत सूत्राच्या उदाहरणामध्यें समासान्त कप् प्रत्यय होऊं लागेल.

पण हा समासान्त कप् प्रत्यय केव्हां होईल असें तुम्हाला वाटतें ? ङीष् उत्पन्न झाला नाहीं त्याच वेळीं समासान्त (५।४।१५४) होईल असें म्हणाल तर ङीष् प्रत्यय उत्पन्न झाला नाहीं तोच समासान्त होईल असें म्हणतां येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ङीष् प्रत्यय कांहीं विकल्पानें सांगितला नाहीं.

तर मग ङीष् प्रत्यय झाल्यानंतर समासान्त होईल.

ङीष् प्रत्यय झाल्यानंतरही होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं— नद्यन्त शब्दांचा जो बहुव्रीहि त्याहून तो सांगितला आहे आणि कुण्डोघ्नी व घटोघ्नी येथें तर नद्यन्त शब्दांचा बहुव्रीहि नाहीं.

तर मग ङीष् प्रत्यय करण्याचे पूर्वींच समासान्त (५।४।१५४) होऊं लागेल असेंच

---

१—(सू. २३ ) काण्ड शब्द शेवटीं असलेला जो द्विगु त्याहून ङीप् प्रत्यय होत नाहीं, तद्धित प्रत्ययाचा लुक् झाला असतांना, आणि क्षेत्र अर्थ गम्यमान असतांना. उदा० द्वे काण्डे प्रमाणमस्याः द्विकाण्डा क्षेत्रभक्तिः. काण्ड हे एक प्रमाण आहे. सोळा हात म्हणजे एक काण्ड होय.

१—( सू. २४ ) प्रमाण या अर्थाला दाखविणारा जो पुरुष शब्द तदन्त द्विगूहून ङीप् प्रत्यय विकल्पानें होतो तद्धित प्रत्ययाचा लुक् झाला असतांना. उदा० द्वौ पुरुषौ प्रमाणमस्याः द्विपुरुषी, द्विपुरुषा परिखा. हा खंदक दोन पुरुष खोल आहे असा अर्थ होय.

१—( सू. २५ ) ऊधस् शब्दान्त जो बहुव्रीहि त्याहून स्त्रीत्व विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. उदा०— घटोघ्नी गाः. जिची कास घटासारखी आहे अशी गाय असा अर्थ आहे.

तर्हि प्राप्नोति । ननु चोक्तं न हि ङीष्विभाषेति । यद्यपि न ङीष्विभाषा कप्तु विभाषा । कपोऽवकाशः । अन्यो बहुव्रीहिः । अयवकः अव्रीहिकः । ङीषोऽवकाशः । विभाषा कब्यदा न कप्सोऽवकाशः । कुण्डोघ्नी घटोघ्नी । कप्प्रसङ्ग उभयं प्राप्नोति परत्वात्कप्स्यात् । तस्मात्सुष्ठूच्यते न वा समासान्ताधिकारे स्त्रीग्रहणादितरथा हि कब्विधिप्रसङ्ग इति ॥

[ संख्याऽव्ययादेर्ङीप् ॥४।१।२६॥]

दामहायनान्ताच्च ॥४।१।२७॥

दामहायनान्तात्संख्यादेः ॥ २ ॥

दामहायनान्तात्संख्यादेरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । उद्दामा वडवेति ॥

तत्पुरुषविज्ञानाद्वा सिद्धम् ॥ २ ॥

बहुव्रीहेरिति वर्तते तत्पुरुषश्चायम् । उत्क्रान्ता दाम्न उद्दामेति । भवेत्सिद्धं यदा तत्पुरुषः । यदा तु खलु बहुव्रीहिस्तदा न सिध्यति । उत्क्रान्तं दामास्या इति । ननु च चेतनावत एतद्भवत्युत्क्रमणं वापक्रमणं वा दाम चाचेतनम् । अचेतनेष्वपि चेतनावदुपचारो दृश्यते । तद्यथा । स्रस्तान्यस्या बन्धनानि । स्रस्यन्ते ऽस्या बन्धनानीति ॥ तत्तर्हि संख्यादेरिति वक्त-

---

आम्ही ( ५।४।१५३ ) म्हणतों.

पण ङीष् कांहीं विकल्पानें सांगितला नाहीं असें आताच सांगितलें आहे ना?

जरी ङीष् प्रत्यय विकल्पानें सांगितला नाहीं तरी हा समासान्त कप् प्रत्यय तर विकल्पानें सांगितला आहेच. आतां त्या कप् प्रत्ययाला अयवकः अव्रीहिकः इत्यादि ठिकाणीं इतर शब्दांच्या बहुव्रीहिमध्यें अवकाश आहे. आणि कप् प्रत्यय विकल्पानें सांगितला असल्यामुळें जेव्हां कप् प्रत्यय केला नाहीं त्या वेळीं कुण्डोघ्नी व घटोघ्नी येथें ङीष् प्रत्ययाला अवकाश आहे. आणि याच उदाहरणामध्यें कप् प्रत्यय करावयाचा असा पक्ष घेतला म्हणजे ङीष् आणि कप् या दोहोंची प्राप्ति येते तेव्हां तेथें परत्वास्तव ङीष् प्रत्ययाचा बाध करून कप् प्रत्यय होऊं लागेल. एकंदरीत 'न वा समासान्ताधिकारे स्त्रीग्रहणात्', 'इतरथा हि कब्विधिप्रसङ्गः' असें जें वार्तिककारांनीं म्हटलें आहे तेंच बरोबर आहे.

( सू. २७ वा. १ ) दामन्-शब्दान्त आणि हायन-शब्दान्त बहुव्रीहीहून हा जो ङीप् प्रत्यय सांगितला आहे तो त्या बहुव्रीहिच्या आरंभीं संख्या शब्द असेल तरच होतो असं म्हणावें. कारण उद्दामा वडवा येथें ङीप् प्रत्यय न झाला पाहिजे.

( वा. २ ) तत्पुरुष घेतला म्हणजे हें सिद्ध होत आहे. प्रकृत सूत्रामध्यें बहुव्रीहेः या पदाची अनुवृत्ति आहे. आणि उद्दामा वडवा येथें दाम्नः सकाशात् उत्क्रान्ता म्हणजे दाव्यांतून निसटलेली घोडी असा तत्पुरुष समास आहे.

पण असा तत्पुरुष घेतला असतां इष्ट रूप सिद्ध होईल पण उत्क्रान्तं दाम यस्याः म्हणजे मागें सरलेलें आहे दावें जिचें असा बहुव्रीहि घेतला असतां तें सिद्ध होणार नाहीं.

येथें बहुव्रीहि होणार नाहीं. कारण मागें सरणें, बाजूला सरणें, ह्या क्रिया चेतनच करूं शकतो. आणि 'दावें' हा पदार्थ तर अचेतन आहे.

पण अचेतन वस्तूचे ठिकाणींही चेतनासारखा व्यवहार झालेला दिसतो. 'हिचीं

---

१—(सू. २६) ऊधस् शब्दान्त जो बहुव्रीहि त्याच्या आरंभीं संख्या किंवा अव्यय असेल तर त्या बहुव्रीही हून ङीप् प्रत्यय होतो. पूर्वसूत्रानें तेथें ङीष् करूं नये. द्व्यूध्नी, अत्यूध्नी.

१-( सू. २७ ) दामन् किंवा हायन शब्द शेवटीं असलेला आणि संख्यावाचक शब्द आरंभीं असलेला जो बहुव्रीहि त्याहून ङीप् प्रत्यय होतो. उदा०—द्विदाम्नी, द्विहायनी गौः.

व्यम् । न वक्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । संख्याव्ययादेर्ङीप् [४.१.२६] । इति । यदि तदनुवर्तते ऽव्ययादेरपि प्राप्नोति । नैष दोषः । संख्यादेरित्यनुवर्तते ऽव्ययादेरिति निवृत्तम् । कथं पुनरेकयोगनिर्दिष्टयोरेकदेशोऽनुवर्तेत एकदेशो न । एकयोगनिर्दिष्टानामप्येकदेशानुवृत्तिर्भवति । तद्यथा । तस्य पाकमूले पील्वादिकर्णादिभ्यः कुणब्जाहचौ [५.२.२४] । पक्षात्तिः [२५] इत्यत्र मूल इत्यनुवर्तते पाक इति निवृत्तम् ॥

अथेह कथं भवितव्यम् । द्वौ हायनावस्याः शालाया द्विहायना त्रिहायनेति ।

हायनो वयसि स्मृतः ।

वयोवाचिनो हायनशब्दस्य ग्रहणं न चैष वयोवाची ॥ अथ णत्वं कस्मान्न भवति । णत्वमपि वयोवाचिन एव ॥

[[1] अन उपधालोपिनोऽन्यतरस्याम् ॥ ४।१।२८ ॥
[1]नित्यं संज्ञाछन्दसोः ॥४।१।२९॥]

---

बंधनें सुटून गेलीं आहेत', 'हिचीं बंधनें सुटून दूर [2]जातील' असें म्हणण्यांत येतें.

तेव्हां संख्यादेः असें म्हटलें पाहिजे.

संख्यादेः असें म्हणावयास नको. कारण मागून अनुवृत्ति आहे. मागें संख्यादेः असें पद कोठेंसे आहे ?

'संख्याव्ययादेर्ङीप्' या पूर्व सूत्रांतच आहे.

पण तें पद अनुवृत्त होईल तर त्याच्या बरोबर अव्ययादेः हें पदही अनुवृत्त होणारच. तेव्हां उद्दामा येथें ङीप् होऊं लागेल हा दोष येतोच.

हा दोष येत नाहीं. कारण संख्यादेः एवढ्याचीच अनुवृत्ति आहे. अव्ययादेः याची नाहीं.

पण असें कसें बरें करतां येईल कीं एकाच सूत्रामध्यें संख्या आणि अव्यय हे दोन्ही शब्द बरोबरीनें निर्दिष्ट केले असतां त्यांपैकीं एकाचीच अनुवृत्ति करावयाची, आणि दुसऱ्याची नाहीं ?

एका सूत्रामध्यें बरोबरीनें अनेक शब्द निर्दिष्ट असले तरी त्यांपैकीं एकाचीच अनुवृत्ति होऊं शकते. उदा० 'तस्य पाकमूले पील्वादिकर्णादिभ्यः कुणब्जाहचौ' (५।२।२४). येथें पाक आणि मूल हे दोन शब्द बरोबरीनें निर्दिष्ट आहेत तरी त्यांतील मूल हा एकच शब्द 'पक्षात्तिः' या पुढील सूत्रामध्यें अनुवृत्त होतो आणि पाक हा शब्द अनुवृत्त होत नाहीं.

आतां द्वौ हायनौ यस्याः सा द्विहायना शाला, त्रिहायना शाला येथें प्रकृत सूत्रानें ङीप् प्रत्यय व्हावा कीं न व्हावा ?

प्रकृत सूत्रामध्यें हायन हा शब्द वय या अर्थाचाच घ्यावयाचा आहे आणि द्विहायना शाला येथें तर हायन शब्दाचा वय हा अर्थ नाहीं.

आतां त्रिहायना येथें णत्व (त्रिचतुर्भ्यो हायनस्य० या वार्तिकानें) कां बरें होत नाहीं ?

णत्व देखील वय अर्थाच्याच हायन शब्दाला होतें.

---

२—तेव्हां उद्दामा येथें बहुव्रीहि करतां येत असल्यामुळें तेथें ङीप् होऊं लागेल हा दोष येतो.

१—(सू. २८) ज्या शब्दाच्या उपधा अकाराचा लोप (६।४।१३४) होत असतो असा जो अन्-शब्दान्त बहुव्रीहि त्याहून ङीप् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—बहुराज्ञी, बहुराजा; बहुराजा, बहुराजे, बहुराजानौ.

१—(सू. २९) पूर्वसूत्राचा विषय असतांना जर संज्ञा शब्द असेल किंवा वैदिक प्रयोग असेल तर तेथें ङीप् प्रत्यय नित्य होतो. उदा०—सुराज्ञी नाम नगरी, पञ्चदाम्नी.

**केवलमामकभागधेयपापापरसमानार्यकृतसुमङ्गलभेषजाच्च ॥४।१।३०॥**

मामकग्रहणं किमर्थं नाणन्तादित्येव सिद्धम् । नियमार्थोऽयमारम्भः । मामकशब्दात्संज्ञाछन्दसोरेव । क मा भूत् । मामिका बुद्धिरिति ॥

**रात्रेश्चाजसौ ॥४।१।३१॥**

अजसादिष्विति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । रात्रिं रात्रिं स्मरिष्यन्तः । रात्रिं रात्रिमजानतः । सर्वां रात्रिं सहोषित्वा । वृत्यामेकान्तरात्रिम् ॥

**अन्तर्वत्पतिवतोर्नुक् ॥४।१।३२॥**

अन्तर्वत्पतिवदिति गर्भभर्तृसंयोगे ॥१॥

अन्तर्वत्पतिवदिति गर्भभर्तृसंयोग इति वक्तव्यम् । इह मा भूत् । प्रथते त्वया पतिमती पृथिवीति ॥

अथान्तःशब्दस्यागर्भसंयोगे किं प्रत्यु-

---

(सू. ३०) येथें मामक शब्द कशाकरितां घातला आहे ? तो घालावयास नको. कारण अण् प्रत्ययान्ताहून ज्या सूत्रानें ङीप् प्रत्यय (४।१।१५) सांगितला आहे त्यानेंच मामक शब्दाहून ङीप् प्रत्यय होईल.

मामक शब्द नियमार्थ उच्चारला आहे. तो नियम असा कीं– संज्ञा शब्द किंवा वैदिक प्रयोग या दोन ठिकाणींच मामक शब्दाहून ङीप् प्रत्यय होतो.

ह्या नियमानें कोठें बरें ङीप् प्रत्यय न झाला पाहिजे ?

मम इयं मामिका बुद्धिः येथें ङीप् प्रत्यय होत नाहीं.

(सू. ३१.) अजसादिषु असें येथें म्हणावें. कारण, रात्रिं रात्रिं स्मरिष्यन्तः, रात्रिं रात्रिमजानन्तः, रात्रिं रात्रिं सहोषित्वा, वृत्यामेकान्तरात्रिम् या उदाहरणांमध्यें ङीप् प्रत्यय न झाला पाहिजे.

(सू. ३२ वा १) गर्भाचा संयोग असतांना अन्तर्वत् शब्दाला आणि भर्त्याचा संयोग असतांना पतिवत् शब्दाला ङीप् प्रत्यय आणि नुक् आगम् होतात असें म्हणावें. कारण 'प्रथते त्वया पतिमती पृथिवी' येथें ते न झाले पाहिजेत.

आतां गर्भसंयोग नसेल तेथें अन्तर्वत्

---

१–(सू. ३०) संज्ञा शब्दांमध्यें किंवा वैदिक प्रयोगांमध्यें केवल, मामक, भागधेय, पाप, अपर, समान, आर्यकृत, सुमङ्गल आणि भेषज या शब्दांहून स्त्रीत्व--विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो. उदा०– केवली, मामकी इत्यादि.

२–मम इयं मामकी. अस्मद् शब्दाहून 'तस्येदम्' (४।३।१२०) या अर्थी अण् प्रत्यय केला असतां अस्मद् शब्दाला ममक आदेश (४।३।३) झाला आहे.

१–(सू. ३१) संज्ञा--शब्दामध्यें किंवा वैदिक प्रयोगामध्ये रात्रि शब्दाहून ङीप् प्रत्यय होतो. परंतु पुढें प्रथमा-बहुवचन जस् प्रत्यय करावयाचा नसला पाहिजे. उदा०–रात्री सृष्टा, रात्रीभिः.

२– आदि शब्द घातला म्हणजे जस् प्रत्ययापुढील अम् प्रत्यय कर्तव्य असतांनाही ङीप् होत नाही.

१–(सू. ३२) अन्तर्वत् आणि पतिवत् या शब्दांहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो आणि त्याच्याबरोबरच त्या शब्दांना नुक् असा आगम होतो. उदा०–अन्तर्वत्नी गर्भिणी, पतिवत्नी सुवासिनी. अन्तः म्ह. जिच्या उदरांत गर्भ आहे. येथें आहे या 'अस्ति' क्रियेचा कर्ता गर्भ आहे म्हणून गर्भ शब्दाहून मतुप् प्रत्यय (५।२।९४) होईल. तो गर्भ कोठें तें दाखविणारा अन्तः हा शब्द आहे तेव्हां त्याहून मतुप् प्रत्यय होणार नाहीं. तो येथें अन्तर्वत् अशा निपातनामुळें होतो. पतिवत् येथें मतुप् प्रत्यय होईल परंतु त्या मतुपाच्या मकाराला वकार आदेश पतिवत् अशा निपातनामुळें होतो.

२–'हे राजा तुझ्यामुळें आज ही पृथिवी पतिमती आहे असा अर्थ आहे. येथें पति शब्दाचा अर्थ स्वामी (मालक) असा आहे. मतुपाच्या मकाराला वकार हा निपातनामुळेंच होणारा असल्यामुळें तोही येथें होत नाहीं.

दाह्रियते । अन्तरस्यां शालायामस्तीति । किं पुनः कारणं वाक्यमेव प्रत्युदाह्रियते न पुनर्मतुप् । अस्तिसामानाधिकरण्ये मतुब्विधीयते न चात्रास्तिसामानाधिकरण्यम् । इहापि तर्हि न प्राप्नोति । अन्तर्वत्नीति । एवं तर्हि

**अन्तर्वत्पतिवतोस्तु मतुब्वत्वे निपातनात्।**
**अन्तर्वदिति मतुन्निपात्यते वत्वं सिद्धम् । पतिवदिति वत्वं निपात्यते मतुप्सिद्धः ॥**

किमविशेषेण । नेत्याह ।

**गर्भिण्यां जीवपत्यां च**
**एतस्मिन्विषये ॥**
**वा च च्छन्दसि नुग्भवेत् ॥ १ ॥**

वा च च्छन्दसि नुग्वक्तव्यः । सान्तर्वेती देवानुपैत् । सान्तर्वत्नी देवानुपैत् । पतिवती तरुणवत्सा ॥

**पत्युर्नो यज्ञसंयोगे ॥ ४।१।३३ ॥**

यज्ञसंयोग इत्युच्यते तत्रेदं न सिध्यति। इयमस्य पत्नी । क तर्हि स्यात् । पत्नीसंयाज इति यत्र यज्ञसंयोगः । नैष दोषः ।

---

शब्दाचें कसें रूप होईल ?

अन्तरस्यां शालायामस्ति (घटः) असें वाक्यच राहील.

पण तेथें वाक्यच राहील असें कां म्हणतां? अन्तर् शब्दाहून मतुप् प्रत्यय कां होणार नाहीं?

अस्ति याचा जो कर्ता त्याहून मतुप् प्रत्यय सांगितला आहे. आणि अन्तर् या शब्दाचा जो 'आंत' हा अर्थ तो अस्ति या क्रियेचा कर्ता होऊं शकत नाहीं.

तर मग गर्भसंयोग असतांना जें अन्तर्वत्नी असें रूप होतें तेथेंही अन्तर् शब्दाहून मतुप् प्रत्यय प्राप्त होत नाहीं. तर मग—

( श्लो. १) अन्तर्वत् या शब्दामध्यें ह्या निपातनास्तवच मतुप् प्रत्यय होतो, मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार मात्र (८।२।९ ) सिद्ध आहे. आणि पतिवत् या शब्दामध्यें मतुप् प्रत्यय (५।२।९४) सिद्धच आहे, फक्त त्याच्या मकाराला वकार आदेश या निपातनामुळेंच होतो.

पण निपातनामुळें ह्या दोन शब्दांमध्यें क्रमानें होणारे मतुप् प्रत्यय आणि वकार आदेश हे त्या शब्दाचा अर्थ कोणताही असला तरी करावयाचे कीं काय ?

वाटेल त्या अर्थीं करावयाचे नाहींत. तर गर्भिणी आणि नवरा जिवंत असलेली असे त्या दोन शब्दांचे अर्थ क्रमानें असले पाहिजेत.

हा जो प्रकृत सूत्रानें ङीप् प्रत्ययाबरोबर नुक् आगम सांगितला आहे तो वेदामध्यें विकल्पानें होतो असें म्हणावें. उदा०—सान्तर्वती देवानुपैत्, सान्तर्वत्नी देवानुपैत्; पतिवती तरुणवत्सा, पतिवत्नी तरुणवत्सा.

( सू. ३३ ) येथें 'यज्ञसंयोगे' असें म्हटलें आहे. तेव्हां ' इयमस्य पत्नी ' ह्या वाक्यामध्यें यज्ञसंयोग गम्यमान होत नसल्यामुळें नकार आदेश होणार नाहीं.

तर मग प्रस्तुत सूत्रानें नकार कोठें होईल?

ज्या वाक्यामध्यें यज्ञाचा संयोग गम्यमान होत असेल तेथें होईल. उदा० पत्नीसंयाजाः.

हा दोष येत नाहीं. कारण, पति हा शब्द

---

१—( सू. ३३ ) यज्ञसंबंध दाखविणारा जो पति शब्द त्याच्या इकाराला नकार आदेश होतो स्त्रीत्वविवक्षा असतांना. विवाहित जे स्त्रीपुरुष त्या दोघांना मिळून यज्ञाचा अधिकार असतो. यज्ञाचें फलही दोघांना मिळतें. यज्ञफलाचा उपभोग घेणें हें जें ऐश्वर्य तें येथें पति शब्दाचें प्रवृत्ति-निमित्त आहे. हा शब्द सापेक्ष आहे. जसें—अरुन्धत्याः पतिर्वसिष्ठः. ज्या यज्ञाचा अधिकार अरुन्धतीला आहे त्या यज्ञाचें फल भोगणारा वसिष्ठ असा त्याचा अर्थ होतो. तसेंच उलट ज्या यज्ञाचा अधिकार वसिष्ठाला आहे त्या यज्ञाचें फल भोगणारी अरुन्धती अशा अर्थीं वसिष्ठस्य पत्नी अरुन्धती असें वाक्य होतें. येथें पति शब्दाच्या इकाराला प्रकृत सूत्रानें नकार झाला म्हणजे पुढें नकारान्त म्हणून ङीप् प्रत्यय [ ४।१।५ ] होतो.

२—'पत्नीसंयाज' हें यज्ञ-विशेषाचें नांव आहे.

पतिशब्दोऽयमैश्वर्यवाची । सर्वेण च गृहस्थेन पञ्च महायज्ञा निर्वर्त्या यच्चादः सायंप्रातर्होमचरुपुरोडाशान्निर्वपति तस्यासावीष्टे ॥ एवमपि तुषजकस्य पत्नीति न सिध्यति । उपमानात्सिद्धम् । पत्नीव पत्नीति ॥

## विभाषा सपूर्वस्य ॥ ४।१।३४ ॥

### पत्युः सपूर्वादुपसर्जनसमास उपसंख्यानम् ॥ १ ॥

पत्युः सपूर्वादुपसर्जनसमास उपसंख्यानं कर्तव्यम् । वृद्धपतिः वृद्धपत्नी । स्थूलपतिः स्थूलपत्नी ॥ वचनाद्भविष्यति । अस्ति वचने प्रयोजनम् । किम् । आशापतिः आशापत्नी ॥

### सिद्धं तु पत्युः प्रातिपदिकविशेषणत्वात् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । पत्युः प्रातिपदिक विशेषणत्वात् । नैवं विज्ञायते अस्त्यस्मात्पतिशब्दात्पूर्वः सोऽयं सपूर्वः सपूर्वात्पतिशब्दादनुपसर्जनादिति । कथं तर्हि । अस्त्यस्मिन्प्रातिपदिके पूर्वस्तदिदं सपूर्वम् सपूर्वात्प्रातिपदिकात्पत्यन्तादनुपसर्जनादिति ॥

---

ऐश्वर्यद्योतक[३] आहे. गृहस्थाश्रमी अशा सर्वच त्रैवर्णिकांनीं पांच महायज्ञ केले पाहिजेत. तेव्हां त्यांपैकीं सायंप्रातर्होमामध्यें जो चरुपुरोडाशांचा निर्वाप करतो त्याचा तो ईश्वर होतो म्हणजे फलोपभोग घेणारा होतो.

तरी पण तुषजकस्य पत्नी हा प्रयोग सिद्ध होत नाहीं.

खरी पत्नी नसतांनाच ' जी पत्नीसारखी ती पत्नी ' अशा अर्थाचा औपचारिक 'पत्नी' हा शब्द तेथें योजिला आहे.

( सू. ३४ वा. १ ) सपूर्वक अशा पति शब्दाला जो हा नकार आदेश सांगितला आहे तो उपसर्जन–समास म्हणजे बहुव्रीहि केला असतांही होतो असें म्हणावें. उदा० वृद्धपतिः, वृद्धपत्नी; स्थूलपतिः, स्थूलपत्नी.

पण, या सूत्राच्या सामर्थ्यास्तव पति शब्द उपसर्जन असतांनाही तो होईल.

या सूत्राला दुसरीकडे उदाहरण आहे.

तें कोणतें ?

आशा[२]पतिः आशापत्नी हें तें उदाहरण होय.

( वा २ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं येथें पति शब्द प्रातिपदिकाचें विशेषण आहे. ' ज्या ह्या पति शब्दाच्या पूर्वीं कांहीं तरी पद आहे त्या पति शब्दाला सपूर्व म्हणावयाचें, आणि तसला जो सपूर्व पति शब्द तो अनुपसर्जन पाहिजे ' असें समजूं नये.

तर मग कसें समजावें ?

' ज्या प्रातिपदिकामध्यें पति शब्दाच्या पूर्वीं कांहीं तरी पद आहे त्या प्रातिपदिकाला सपूर्व म्हणावयाचें, आणि तसलें जें पति-शब्दान्त सपूर्व प्रातिपदिक तें अनुपसर्जन पाहिजे ' असें समजावें.

---

३–पति या शब्दाचा ईश्वर हा अर्थ प्रसिद्धच आहे. पञ्चमहायज्ञांचें फल भोगणें हें येथें ऐश्वर्य होय. तेव्हां येथें पति शब्दाच्याच अर्थापासून यज्ञसंबंध गम्यमान होतो. तो दाखविण्याकरितां दुसऱ्या शब्दाची जरूर लागत नाहीं.

४–कारुण, तुषजक म्ह. शूद्र हा त्रैवर्णिकांच्या बाहेर असल्यामुळें त्याला पंचमहायज्ञांचा अधिकार नाहीं.

१–(सू. ३४) ज्या प्रातिपदिकामध्यें पति शब्दाच्या पूर्वीं कांहीं तरी पद आहे असें जे पति-शब्दान्त अनुपसर्जन प्रातिपदिक त्यांतील शेवटच्या इकाराला स्त्रीत्वविवक्षा असतांना विकल्पानें नकार आदेश होतो. उदा० वृद्धः पतिर्यस्याः सा वृद्धपतिः स्त्री, वृद्धपत्नी स्त्री. येथें पति-शब्द उपसर्जन आहे तरी पति-शब्दान्त जे वृद्धपति हे प्रातिपदिक तें अनुपसर्जनच आहे.

२ आशायाः पतिः असा षष्ठीतत्पुरुष आहे. पति म्ह. स्वामिनी. यज्ञसंयोग नसल्यामुळें पूर्वसूत्रानें नकार आदेश झाला नाहीं.

**[¹नित्यं सपत्न्यादिषु ॥४।१।३५॥]**

**पूतक्रतोरै च ॥४।१।३६॥**

**पूतक्रत्वादीनां पुंयोगप्रकरणे वचनम् ॥ १ ॥**

पूतक्रत्वादयः पुंयोगप्रकरणे वक्तव्याः। पूतक्रतोः स्त्री पूतक्रतायी । यया हि पूताः क्रतवः पूतक्रतुः सा भवति ॥

**लिङ्गसंनियोगेन सर्वत्रागमादेशानां वचने लिङ्गलुकि तत्कृतप्रसङ्गः ॥२॥**

लिङ्गसंनियोगेन सर्वत्रागमादेशानां वचने लिङ्गलुकि तत्कृतं प्राप्नोति । पञ्चेन्द्राण्यो देवता अस्य पञ्चेन्द्रः । पञ्चाग्निः दशाग्निः । किमुच्यते सर्वत्रेति । अन्यत्रापि नावश्यमिहैव । कान्यत्र । पञ्चभिर्धीवरीभिः क्रीतः पञ्चधीवा दशधीवेति ॥ लिङ्गग्रहणेन नार्थः । सर्वत्रागमादेशानां वचने लुकि तत्कृतप्रसङ्ग इत्येव । इदमपि सिद्धं भवति । पञ्चमेन गृह्णाति पञ्चकः ।

(सू. ३६ वा. १) ह्या सूत्राला आरंभ करून तीन सूत्रें पुंयोग प्रकरणामध्यें असल्यासारखीं समजावीं. पूतक्रतूची स्त्री पूतक्रतायी. आतां ' जिनें स्वतःच क्रतू पवित्र केले आहेत ' असा अर्थ विवक्षित असेल तेव्हां ती ' पूतक्रतु ' च होय. तेथें ङीष् व ऐकार कांहींही होत नाहीं.

(वा. २) या स्त्रीप्रत्यय प्रकरणामध्यें सर्व ठिकाणीं स्त्रीप्रत्ययाच्या बरोबर जे आगम व आदेश सांगितले आहेत ते त्या स्त्रीप्रत्ययाचा कांहीं ठिकाणीं लुक् झाला तरी कायम राहूं लागतील. उदा० पञ्च इन्द्राण्यः देवता अस्य पञ्चेन्द्रः, पञ्चाग्निः, दशाग्निः. पण येथें वार्तिककारांनीं सर्वत्र म्हणजे सर्व ठिकाणीं असें काय म्हटलें आहे ? त्याचा अर्थ काय ?

हा दोष येथेंच येतो असें नाहीं तर इतर ठिकाणींही येतो म्हणून तसें म्हटलें आहे.

इतर ठिकाणीं म्हणजे कोठें बरें ?

पञ्चभिः धीवरीभिः क्रीता पञ्चधीवी, दशधीवा.

येथें दोष दाखवितांना वार्तिककारांनीं जो लिङ्ग शब्द उच्चारला आहे त्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. ' सर्वत्रागमादेशानां लुकि तत्कृतप्रसङ्गः ' असा सामान्य शब्दानेंच दोष दाखवावा. कारण तसें करण्यांत पञ्चमेन गृह्णाति

१-(सू. ३५) सपत्नी वगैरे शब्दांमध्यें पति शब्दाच्या इकाराला नकार आदेश नित्य होतो. उदा० सपत्नी.

१-(सू. ३६) पूतक्रतु शब्दापासून 'त्याची स्त्री' या अर्थी ङीप् प्रत्यय होतो आणि त्याच्याबरोबर पूतक्रतु शब्दांतील शेवटच्या उकाराला ऐकार आदेश होतो. उदा० पूतक्रतोः स्त्री पूतक्रतायी.

२—पूताः क्रतवः येन स पूतक्रतुः. ज्याच्यामुळें क्रतु पवित्र होतात इतका तो पुण्यशील आहे असा त्या मनुष्याचा मोठेपणा या शब्दानें दाखविला आहे. हें सामर्थ्य त्याच्या स्त्रीमध्यें विवक्षित नाहीं तरी तिला त्याची स्त्री एवढ्याच संबंधामुळें पूतक्रतु शब्द लावावयाचा असतो; म्हणून पूतक्रतायी असें रूप होतें.

३-पांच इन्द्राणी ह्या ज्याची देवता आहेत ' या अर्थी पञ्चन् व इन्द्राणी या दोन शब्दांचा तद्धितार्थी द्विगु समास ( २।१।५१ ) करून पुढें अण् प्रत्यय ( ४।२।२४ ), त्याचा लुक् [ ४।१।८८ ], नंतर ङीप् प्रत्ययाचा लुक् [ १।२।४९ ] झाल्याबरोबर ङीप् प्रत्ययाच्या बरोबर इन्द्र शब्दाला झालेला जो आनुक् [ ४।१।४९ ] आगम तो निघून जातो. तो जाण्याचें कारण काय ? तसेंच, पञ्चन् व आग्नेयी यांचा द्विगु समास वगैरे पूर्वीप्रमाणेंच समजावें. येथें अग्नि शब्दाच्या पुढील ङीप् प्रत्ययाचा लुक् झाला कीं त्या ङीप् प्रत्ययाच्या बरोबर पुढील सूत्रानें झालेला ऐकार आदेश निघून जातो. त्याचें पण कारण काय ?

४—पञ्चन् व धीवरी यांचा तद्धितार्थी द्विगु, पुढें क्रीता या अर्थी झालेल्या ठक् प्रत्ययाचा लुक् (५।१।२८), नंतर स्त्रीप्रत्ययाचा लुक् झाला कीं त्या स्त्रीप्रत्ययाच्या बरोबर झालेला रेफ आदेश निघून जाऊन पञ्चधीवा रूप साधलें आहे.

नैतदस्ति। मडयं परादिः स डटो ग्रहणेन ग्राहिष्यते। इदं तर्हि प्रयोजनम्। षष्ठेन गृह्णाति षट्कः इति॥

**सिद्धं त्वागमादेशानामङ्गतः स्त्रीप्रकरणे वचनात्॥३॥**

सिद्धमेतत्। कथम्। आगमादेशा य इह स्त्रीप्रकरण उच्यन्ते तेऽङ्गाधिकारे वक्तव्याः॥ स्त्रीप्रकरणग्रहणेन नार्थः। सिद्धं त्वागमादेशानामङ्गतो वचनादित्येव। इदमपि सिद्धं भवति। षष्ठेन गृह्णाति षट्क इति॥

**लिङ्गलुकि वा प्रकृतिप्रत्यापत्तिवचनम्॥४॥**

अथवा लिङ्गलुक्येव प्रकृतिप्रत्यापत्तिर्वक्तव्या॥ लिङ्गग्रहणेन नार्थः। लुकि वा प्रकृतिप्रत्यापत्ति वचनोमेत्यव। इदमपि सिद्धं भवति। षष्ठेन गृह्णाति षट्क इति॥ किं पुनरत्र ज्यायः। लुकि प्रत्यापत्तिवचनमित्येव

---

पञ्चकः याचाही संग्रह होतो.

हें उदाहरण बरोबर दिसत नाहीं. कारण मट् आगम हा त्या प्रत्ययाचाच आद्यावयव आहे. तेव्हां येथें पूरण प्रत्यय जो डट् त्यानेंच त्या आगमासकट 'म' एवढ्याचें ग्रहण होणार आहे.

तर मग षट्केन गृह्णाति 'षट्कः' हें उदाहरण समजावें.

(वा. ३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं ह्या स्त्रीप्रत्यय प्रकरणामध्यें जे आगम व आदेश सांगितले आहेत ते 'अङ्गस्य' या अधिकारामध्यें सांगावे.

ह्या वार्तिकामध्यें वार्तिककारांनीं जें 'स्त्रीप्रत्ययांच्या प्रकरणामध्यें' असें म्हटलें आहे त्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. तर 'सिद्धं त्वागमादेशानामङ्गतो वचनात्' एवढेंच म्हणावें. तसें मोघम म्हटलें म्हणजे षष्ठेन गृह्णाति षट्कः हेंहीं साधतें.

(वा. ४) अथवा स्त्री–प्रत्ययाचा लुक् झाला असतां मागील शब्दाला मूळ प्रकृतीचें स्वरूप प्राप्त होतें असें म्हणावें.

येथेंही वार्तिककारांनीं जो लिङ्ग शब्द उच्चारला आहे त्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. तो वगळून 'लुकि वा प्रकृतिप्रत्यापत्तिवचनम्' एवढेंच म्हणावें. म्हणजे षष्ठेन गृह्णाति षट्कः हेंही सिद्ध होतें.

पण आतां येथें हे आगम व आदेश अङ्गस्य या अधिकारामध्यें सांगावे किंवा लुक् झाला असतां तेथें मागील शब्दाला मूळ प्रकृतीचें स्वरूप प्राप्त होतें असें म्हणावें यांत बरें कोणतें ?

---

५–पञ्चम या पूरण–प्रत्ययान्ताहून 'गृह्णाति' या अर्थी कन् प्रत्यय आणि पूरण प्रत्ययाचा लुक् सांगितला [५।२।७७ वा. २] आहे. येथें डट् [५।२।४८] या पूरण प्रत्ययाचा लुक् झाला कीं मट् आगम–[५।२।४९] ही निघून जातो.

६–येथें षष्ठ या शब्दाहून कन् प्रत्यय आणि पूरण प्रत्यय जो डट् त्यांचा लुक् होतो. तो लुक् झाला कीं षष् शब्दाला झालेला थुक् आगम–[५।२।५१] ही निघून जातो.

७–स्त्री-प्रत्ययाच्या बरोबर सांगितलेले जे आनुक् व ऐकार हे तेथें न सांगतां स्त्री-प्रत्ययाच्या निमित्तानें अङ्गस्य [६।४।१] या अधिकारांत सांगितले म्हणजे ज्या उदाहरणामध्यें स्त्रीप्रत्ययाचा लुक् होतो तेथें निमित्तच नसल्यामुळें आपोआप होणार नाहींत. प्रत्ययलक्षणानें–[१।१।६२] ही स्त्रीप्रत्यय पुढें आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण लुक् झाल्यामुळें प्रत्ययलक्षणाचा निषेध [१।१।६३] आहे. अशा रीतीनें पञ्चेन्द्रः वगैरे उदाहरणांची सिद्धि होते.

८.–येथें थुक् आगमही 'अङ्गस्य' या अधिकारांत सांगितला पाहिजे.

९—पञ्चेन्द्रः येथें ङीप् या स्त्री–प्रत्ययाचा लुक् झाल्यावर मागील इन्द्रान् या भागाला इन्द्र हें मूळ स्वरूप प्राप्त झालें म्हणजे पञ्चेन्द्रः साधतें. अशींच इतरही उदाहरणें साधावीं.

न्यायः । इदमपि सिद्धं भवति । पञ्चभिः पट्वीभिः क्रीतः पञ्चपटुः दशपटुरिति ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । संनियोगशिष्टानामन्यतरापाय उभयोरप्यभावः। तद्यथा । देवदत्तयज्ञदत्ताभ्यामिदं कर्म कर्तव्यम् । देवदत्तापाये यज्ञदत्तो ऽपि न करोति ॥

[ वृषाकप्यग्निकुसितकुसिदानामुदात्तः ॥ ४।१।३७॥
मनोरौ वा ॥ ४।१।३८ ]
वर्णादनुदात्तात्तोपधात्तो नः ॥
४ । १ । ३९ ॥

असितपलितयोः प्रतिषेधः ॥ १ ॥

असितपलितयोः प्रतिषेधो वक्तव्यः । असिता पलिता ॥

छन्दसि क्नमेके ॥ २ ॥

छन्दसि क्नमेक इच्छन्ति । असिक्न्यस्योषधे । पलिक्नीरिद्युवतयो भवन्ति ॥

वर्णान्ङीब्विधाने पिशङ्गादुपसंख्यानम् ॥ ३ ॥

वर्णान्ङीब्विधाने पिशङ्गादुपसंख्यानं कर्तव्यम् । पिशङ्गी ॥

---

' लुक् झाला असतां मागील शब्दाला मूळ प्रकृतीचें स्वरूप प्राप्त होतें ' हेंच सांगणें [१०]बरें. कारण तसें सांगितलें असतां पञ्चभिः पट्वीभिः क्रीतः पञ्चपटुः तसेंच दशपटुः हींही उदाहरणें साधतात.

तर मग आतां तसें सांगितलें पाहिजे.

तसें सांगावयास नको. कारण 'ज्या दोघांचें बरोबर विधान केलें आहे त्यांपैकीं एकाचा अपाय झाला असतां दोघांचाही अपाय ( म्ह. नाश ) होतो ' या परिभाषेनेंच काम भागेल. उदा. देवदत्त आणि यज्ञदत्त या दोघांनीं मिळून अमुक कार्य करावें असें सांगितलें असतां जर तेथें त्यांपैकीं एक नसला तर तेथें तें कार्य दुसराही करूं शकत नाहीं.

( सू. ३९ वा. १ ) असित आणि पलित या वर्णवाचक शब्दांहून ङीप् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. उदा० असिता, पलिता.

( वा. २ ) वेदामध्यें असित आणि पलित या शब्दांहून स्त्रीत्वविवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो आणि त्याच्याबरोबर त्या शब्दांतील तकाराला क्न असा आदेश होतो असें कांहीं लोक म्हणतात. उदा.—असिक्न्यस्योषधे, पलिक्नीरिद्युवतयो भवन्ति.

( वा. ३ ) हा जो येथें वर्णवाचक शब्दाहून ङीप् प्रत्यय सांगितला आहे तो पिशङ्ग शब्दाहूनही होतो असें म्हणावें. उदा० — पिशङ्गी.

---

१०—येथें ङीष् प्रत्ययाचा लुक् झाला की मागील पट्व याला पटु असें मूळ स्वरूप प्राप्त होतें.

११—पञ्चपटुः येथें मात्र ङीष् प्रत्ययाचा लुक् होणार म्हणून अगोदर यण् (६।१।७७) होतच नाहीं.

१ ( सू. ३७ )—वृषाकपि, अग्नि, कुसित आणि कुसिद या शब्दांहून त्यांची स्त्री या अर्थीं ङीप् प्रत्यय होतो, आणि त्यांच्याबरोबर ह्या शब्दांच्या शेवटच्या वर्णाला उदात्त ऐकार आदेश होतो. उदा० वृषाकपेः स्त्री वृषाकपायी.

१ ( सू. ३८ )—मनु शब्दाहून त्याची स्त्री या अर्थी ङीप् प्रत्यय विकल्पानें होतो आणि त्याच्या बरोबर मनु शब्दाच्या उकाराला उदात्त औकार व उदात्त ऐकार हे आदेश पाळीपाळीनें होतात. उदा० मनोः स्त्री मनावी, मनायी, मनुः

१ ( सू. ३९ )—अनुदात्त स्वर शेवटीं असलेलें, आणि उपधेला तकार असलेलें असें जें वर्णवाचक प्रातिपदिक त्याहून स्त्रीत्व—विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय विकल्पानें होतो आणि ङीप् प्रत्यय करतेवेळीं त्या उपधातकाराला नकार आदेश होतो. उदा० एनी, एता.

२—येथें हा ङीप् प्रत्यय सांगितला नसता तर पुढील सूत्रानें ङीष् प्रत्यय झाला असता, आणि अन्तोदात्त शब्द झाला असता.

**[अन्यतो ङीष् ॥ ४।१।४० ॥**

**[1]षिद्गौरादिभ्यश्च ॥ ४।१।४१ ॥]**

**जानपदकुण्डगोणस्थलभाजनागकालनीलकुशकामुककबराद्वृत्त्यमत्रावपनाकृत्रिमाश्राणास्थौल्यवर्णानाच्छादनायोविकारमैथुनेच्छाकेशवेशेषु ॥ ४।१।४२ ॥**

**नीलादोषधौ ॥ १ ॥**

नीलादोषधाविति वक्तव्यम् । नील्योषधिः ॥

**प्राणिनि च ॥ २ ॥**

प्राणिनि चेति वक्तव्यम् । नीली गौः । नीली वडवा ॥

**वा संज्ञायाम् ॥ ३ ॥**

वा संज्ञायामिति वक्तव्यम् । नीली नीला ॥

**[शोणात् प्राचाम् ॥ ४।१।४३ ॥]**

**[1]वोतो गुणवचनात् ॥ ४।१।४४ ॥**

गुणवचनादित्युच्यते को गुणो नाम ।
सत्त्वे निविशतेऽपैति पृथग्जातिषु दृश्यते ।
आधेयश्चाक्रियाजश्च सोऽसत्त्वप्रकृतिर्गुणः ॥

---

(सू. ४२ वा. १) नील शब्दाहून आच्छादन-भिन्न असा अर्थ असतांना सांगितलेला ङीष् प्रत्यय ओषधि अर्थ असतांनाच होतो असें म्हणावें. उदा. नीली ओषधिः.

(वा. २) प्राणी अर्थ असतांनाच नील शब्दाहून ङीष् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा.—नीली गौः, नीली वडवा.

(वा. ३) संज्ञा-शब्दामध्यें नील शब्दाहून ङीष् प्रत्यय विकल्पानें होतो असें म्हणावें. उदा.—नीली नीला वा काचित्.

(सू. ४४) येथें गुणवचनात् असें म्हटलें आहे. पण गुणवचन म्हणजे काय?

(श्लो. १) जो पदार्थ नेहमीं द्रव्यावरच अवलंबून असतो, कदाचित् नाशही पावतो, विजातीय अशा अनेक द्रव्यांवर दिसतो, मूळपासूनही असतो किंवा मागूनही उत्पन्न होतो व जो स्वभावतः द्रव्य नव्हे अशा पदार्थाला गुण म्हणतात.

---

१ (सू. ४०)—अनुदात्त स्वर शेवटीं असलेलें आणि उपधेला तकार नसलेलें असें जे वर्णवाचक प्रातिपदिक त्याहून स्त्रीत्व विवक्षा असतांना ङीष्-प्रत्यय होतो. कल्माषी, सारङ्गी.

१ (सू. ४१)—ज्याचा षकार इत्संज्ञक आहे असें किंवा गौरादि गणांत असलेलें असें जें प्रातिपदिक त्याहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. उदा० नर्तकी. येथें ष्वुन् प्रत्यय (३।१।४५) झाला आहे. त्याचा षकार इत्संज्ञक आहे. गौरी.

१ (सू. ४२)—जानपद, कुण्ड, गोण, स्थल, भाज, नाग, काल, नील, कुश, कामुक आणि कबर या अकरा शब्दांहून स्त्रीत्व विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. परंतु त्यांपासून क्रमानें वृत्ति, पात्र, आवपन, अकृत्रिमा, श्राणा (पक्वा), स्थौल्य, वर्ण, अनाच्छादन, अयोविकार, मैथुनेच्छा आणि केशसंनिवेशविशेष (वेणी) हे अकरा अर्थ गम्यमान असले पाहिजेत. उदा० जानपदी वृत्तिः, कुण्डी पात्रविशेषः, गोणी आवपनम्, स्थली अकृत्रिमा भूमिः; भाजी पक्वा, नागी स्थूला, काली कृष्णा, नीली ओषधिः, कुशी लोहाग्रम्, कामुकी मैथुनेच्छावती, कबरी वेणिः.

१ (सू. ४३)—पूर्व दिशेकडील आचार्यांचे मतानें शोण शब्दाहून स्त्रीत्व विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. उदा० शोणी वडवा. इतरांच्या मतानें शोणा वडवा.

१ (सू. ४४)—ह्रस्व उकारान्त जो गुणवाचक शब्द त्याहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा० पट्वी, पटुः; मृद्वी, मृदुः.

२—हिरवा पांढरा वगैरे रंग, मृदुत्व, कठिनत्व हे गुण होत. उदा० हिरवा रंग घ्या. तो नेहमीं अंबा, पेरू, केळें वगैरे द्रव्यांला धरूनच असतो. अंबा पिकला म्हणजे तो रंग नाहींसा होतो. अंबा, केळें वगैरे फळें, पानें, साडी वगैरे वस्त्रें, राघूचें शरीर इत्यादि अनेक जातींच्या द्रव्यांवर तो दिसतो. अंबा वगैरे कांहीं फळांना आरंभापासूनच तो असतो. पानाला आरंभीं नसलेला नंतर येतो. आणि तो रंग हा कांहीं स्वतः द्रव्य नव्हे.

अपर आह ।
उपैत्यन्यज्जहात्यन्यद् दृष्टो द्रव्यान्तरेष्वपि । वाचकः सर्वलिङ्गानां द्रव्यादन्यो गुणः स्मृतः ॥

**गुणवचनान्ङीबाद्युदात्तार्थम् ॥ १ ॥**

गुणवचनान्ङीब्वक्तव्यः । किं प्रयोजनम् । आद्युदात्तार्थम् । आद्युदात्ताः प्रयोजयन्ति । वस्वी ॥

**खरुसंयोगोपधप्रतिषेधश्च ॥ २ ॥**

खरुसंयोगोपधानां च प्रतिषेधो वक्तव्यः। खरुरियं ब्राह्मणी । पाण्डुरियं ब्राह्मणी ॥

**[ [1]बह्वादिभ्यश्च ॥ ४।१।४५॥**

**[1]नित्यं छन्दसि ॥ ४।१।४६॥**

**भुवश्च ॥ ४।१।४७॥ ]**

**[1]पुंयोगादाख्याम् ॥ ४। १।४८॥**

गोपालिकादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । गोपालिका पशुपालिका ॥

किं पुनरिहोदाहरणम् । प्रष्ठी प्रचरी । कथं पुनरयं प्रष्ठशब्दोऽकारान्तः स्त्रियां वर्तते । तस्येदमित्यनेनाभिसंबन्धेन । यथैव ह्यसौ तत्कृतान्स्नानोद्वर्तनपरिषेकाँल्लभत एवं प्रष्ठशब्दमपि लभते ॥ यद्येवं

**पुंयोगादाख्यायायां तद्धितलुग्वचनम् । १ ।**

---

दुसऱ्या एका वैयाकरणानें हीच गुणाची व्याख्या निराळया शब्दांत दिली आहे.—

( श्लो. २ ) जो पदार्थ एखाद्या द्रव्याचा आश्रय करतो, एखादें सोडतो, विजातीय अशा अनेक द्रव्यांवर दिसतो, सर्व लिंगीं चालतो असा जो द्रव्याहून निराळा पदार्थ त्याला गुण म्हणतात.

( वा. १ ) गुणवाचक शब्दाहून ङीप् प्रत्यय होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

स्त्री-प्रत्ययान्त गुणवाचक शब्द आद्युदात्त दृष्टीस पडतात; त्यामुळें ङीप् प्रत्यय सांगावा लागत आहे. उदा. वस्वी[1], पट्वी.

( वा. २ ) खरु हा शब्द आणि उपधेला संयोग असलेले शब्द यांहून स्त्रीप्रत्यय कोणताच होत नाहीं असें म्हणावें. उदा०— खरुः ( ठेंगणी ) इयं ब्राह्मणी. पाण्डुः इयं ब्राह्मणी.

( सू. ४८ ) गोपालक वगैरे शब्दांहून संयोगीं सांगितलेला ङीष् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. उदा०—गोपालिका, पशुपालिका.

पण अगोदर या सूत्राचें उदाहरण कोणतें तें सांगा.

षष्ठी, प्रचरी वगैरे उदाहरणें होत.

पण येथें पुरुष या अर्थाचा प्रष्ठ शब्द आहे. तेव्हां त्याला स्त्री अर्थ कसा असेल ?

‘ तस्येदम् म्हणजे ’ त्याची स्त्री असा तिचा पुरुषाशीं संबंध आहे म्हणून त्याचें नांव तिला मिळेल. जसें स्नान, स्नानसाधन पदार्थ, उद्वर्तन वगैरे त्याला मिळणाऱ्या गोष्टी त्याच्यामुळें तिला मिळतात, तसेंच त्याचें प्रष्ठ हें नांवही तिला मिळेल.

पण जर असाच संबंध असेल तर—

(वा. १) याच अर्थी तस्येदम् (४।३।

---

१—वस्वी म्हणजे स्थिरा.

१ ( सू. ४५ )—बहु वगैरे शब्दांहून स्त्रीत्वविवक्षा असतांना ङीष् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा० बह्वी, बहुः.

१ ( सू.४६ )—बहु वगैरे शब्दांहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना वेदामध्यें ङीष् प्रत्यय नित्य होतो. उदा०- बह्वीषु हित्वा

१ ( सू. ४७ )—भू-शब्दान्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्व विवक्षा असतांना वेदामध्यें नित्य ङीप् प्रत्यय होतो. उदा०— विभ्वी.

१( सू. ४८ )—जें पुरुषाचें नांव त्याच्या संबंधामुळें त्याच्या स्त्रीला लावलें असेल तेथें त्या अकारान्त शब्दाहून ङीष् प्रत्यय होतो. उदा०— प्रष्ठस्य स्त्री प्रष्ठी. तसेंच प्रचरी. प्रष्ठ व प्रचर या शब्दांचा अर्थ पुढारी असा आहे. पांचरथाकाही प्रचर म्हणतात.

पुंयोगादाख्यायां तद्धितस्य लुग्वक्तव्यः। तस्येदम् [ ४.३.१२० ] इति प्राप्नोति। न तर्हीदानीमिदं भवति प्राष्ठ्य इमाः प्राचर्य इमा इति। भवति च। विभाषा लुग्वक्तव्यः। यदा लुक्तदा प्रष्ठी यदा न लुक्तदा प्राष्ठी॥ यद्येवं नार्थो लुका। विभाषा तद्धितोत्पत्तिः। यदा तद्धितोत्पत्तिस्तदा प्राष्ठी यदा न तद्धितोत्पत्तिस्तदा प्रष्ठी। एवमपि लुग्वक्तव्यो न ह्यन्तरेण तद्धितस्य लुकं परार्थे शब्दो वर्तते॥

यदि पुनस्तस्यामेव प्रष्ठशब्दो वर्तेत। कथं पुनस्तस्यामप्रतिष्ठमानायां प्रष्ठशब्दो वर्तते। यथैव ह्यसावकुर्वती किंचित्पापं तत्कृतान्वधबन्धनपरिक्लेशाँल्लभत एवं प्रष्ठशब्दमपि लभते॥

**सुबन्तसमासवचनाच्चाकारान्तानुपपत्तिः॥ २॥**

सुबन्तसमासवचनाच्चाकारान्तता नोपपद्यते। सुबन्तानां समासस्तत्रान्तरङ्गत्वाट्टाप्। टाप्युत्पन्ने समासः। स्थाशब्दः

१००) यानें सांगितलेला तद्धित प्रत्यय प्राप्त होतो त्याचा लुक् सांगितला पाहिजे..

तर मग आतां 'प्रष्ठस्य इमाः प्राष्ठ्यः' 'प्रचरस्य इमाः प्राचर्यः' असे तद्धित-प्रत्ययान्त प्रयोग होत नाहींतच कीं काय?

तसे प्रयोग होतात. हा लुक् विकल्पानें सांगावा. म्हणजे जेव्हां लुक् होईल तेव्हां प्रष्ठी असें होईल आणि जेव्हां लुक् न होईल तेव्हां प्राष्ठी असें होईल.

असेंच जर असेल तर लुक् मुळींच सांगावयास नको. कारण, तद्धित प्रत्यय विकल्पानें सांगितलाच आहे. तेव्हां ज्या वेळीं तद्धित प्रत्यय होतो त्या वेळीं प्राष्ठी आणि ज्या वेळीं तद्धित प्रत्यय होत नाहीं त्या वेळीं प्रष्ठी अशीं दोन रूपें होतीलच.

तरी पण तद्धित प्रत्ययाचा लुक् सांगितलाच पाहिजे कारण लुक् न सांगतां तद्धित प्रत्ययच जर केला नाहीं तर 'प्रष्ठाची स्त्री' हा निराळा अर्थ प्रष्ठ शब्दापासून मनांत येणार नाहीं.

पण जर त्याच अर्थाचा प्रष्ठ शब्द असेल तर—

प्रष्ठ म्हणजे पुढारी, आणि प्रष्ठाच्या स्त्रीमध्यें तर पुढारीपणा नाहीं. तेव्हां स्त्री हा अर्थ 'प्रष्ठ' शब्दाचा कसा बरें असूं शकेल?

पण जसें स्त्रीला कांहीं एक न करतांच भर्त्यानें केलेलें पाप लागतें व त्यामुळें बंधन, क्लेश वगैरे भोगावे लागतात तसा तिच्या स्वतःमध्यें पुढारीपणा नसतांही भर्त्याचा प्रष्ठ शब्द तिला मिळेल.

( वा. २ ) शिवाय, सुबन्ताबरोबर समास होणार असल्यामुळें प्रष्ठ हा शब्द ङीप् प्रत्यय करतांना अकारान्त असला पाहिजे तो मिळत नाहीं. कारण सुप् प्रत्यय झाल्यानंतर त्या सुबन्ताबरोबर समास (२।१।१९) होणार, आणि त्या सुप् प्रत्ययाच्या पूर्वींच अंतरंगत्वास्तव स्त्री-प्रत्यय टाप् होईल. आणि तो

२—स्वार्थ, द्रव्य, लिंग, संख्या आणि कारक हे पांच प्रातिपदिकाचे अर्थ आहेत. उदा०—'गौः' शब्द घ्या. पशूमधील जो धर्म पाहून गोशब्दाचा प्रयोग धर्मी या अर्थी होतो तो धर्म स्वार्थ होय; व तो धर्मी द्रव्य होय. तेव्हां धर्म हा प्रथम मनांत येतो नंतर तो पदार्थ धर्मी या नात्यानें मागून मनांत येतो. तो धर्मी पदार्थ मनांत आल्यावर त्याच्या वरील लिंग, संख्या आणि कारक हे क्रमानें मनांत मागून येतात. लिंग हें मनांत येण्याला दुसऱ्या कशाची अपेक्षा लागत नाहीं म्हणून तें प्रथम मनांत येतें. संख्येला दुसऱ्या सजातीय पदार्थांची अपेक्षा असते: दुसरा बैल पाहून द्वित्व संख्या मनांत येते आणि दुसरा बैल नाहीं असें पाहून एकत्व संख्या मनांत येते. कारक हा अर्थ सर्वांच्या मागून मनांत येतो. कारण त्याला विजातीय अशा क्रियेची अपेक्षा असते. याप्रमाणें स्वार्थ, द्रव्य, लिंग, संख्या आणि कारक या पांच अर्थांची क्रमानें उपस्थिति होते. तेव्हां अर्थातच संख्याबोधक 'सुप्' प्रत्ययापेक्षां लिंग-बोधक स्त्री-प्रत्यय अंतरंग होतो.

समस्येत । तत्र पुंयोगादाख्यायामकारान्तादितीकारो न प्राप्नोति ॥

**सिद्धं तु स्त्रियाः पुंशब्देनाभिधानात् ।३।**

सिद्धमेतत् । कथम् । स्त्रियाः पुंशब्देनाभिधानात् । स्त्री पुंशब्देनाकारान्तेनाभिधीयते ॥ ननु चोक्तं पुंयोगादाख्यायां तद्धितलुग्वचनमिति । नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नातस्तद्धितोत्पत्तिर्भवतीति यदयं पुंयोगादाख्यायामितीकारं शास्ति ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । ये ऽनीकाराः स्त्रीप्रत्ययास्तदर्थमेतत्स्यात् ॥ यत्तर्ह्याख्याग्रहणं करोति। न हि तद्धितान्तमाख्या भवति ॥

अथवा पुनरस्तु तस्येदमित्यनेनाभिसंबन्धेन । ननु चोक्तं पुंयोगादाख्यायां तद्धितलुग्वचनमिति । नैष दोषः । नावश्यमयमेवाभिसंबन्धो भवति तस्येदमिति । अयमप्यभिसंबन्धोऽस्ति सोऽयमिति । कथं पुनरतस्मिन्स इत्येतद्भवति । चतुर्भिः प्रकारैरतस्मिन्स इत्येतद्भवति तात्स्थ्यात्ताद्धर्म्यात्तत्सामीप्यात्तत्साहचर्यादिति । ता-

---

टाप् प्रत्यय झाल्यानंतर पुढें सुप् होऊन नंतर समास होणार. तो त्या टाप्–प्रत्ययान्त 'स्था' शब्दाबरोबर होईल. तेव्हां प्रकृत सूत्रानें ऱ्हस्व अकारान्ताहून सांगितलेला ङीष् प्रत्यय प्राप्त होत नाहीं.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे ?

ते कसें ?

असें कीं–पुरुषवाचक जो प्रष्ठ वगैरे आकारान्त शब्द त्यानेंच त्याच्या स्त्रीचें प्रतिपादन केलें जातें.

पण 'त्याची स्त्री' याच अर्थीं तद्धित प्रत्यय प्राप्त होतो त्याचा लुक् सांगितला पाहिजे असें आतांच सांगितलें आहे ना ?

हा दोष् येत नाहीं ? कारण, ज्या अर्थीं 'पुंयोगादाख्यायाम्' या सूत्रानें 'त्याची स्त्री' हा अर्थ विवक्षित असतांना ङीष् हा स्त्रीप्रत्यय सांगितला आहे त्या अर्थी याच आचार्यांच्या कृतीवरून असें ज्ञापित होतें कीं 'त्याची स्त्री' या अर्थीं तद्धित प्रत्यय होत नाहीं.

हें ज्ञापक जमत नाहीं. कारण प्रकृत सूत्राचा उपयोग निराळ्या प्रकारचा संभवतो[३]. तो असा कीं–ज्या तद्धित प्रत्ययान्ताच्या पुढें स्त्रीप्रत्यय ईकार प्राप्त होत नाहीं तेथें स्त्रीप्रत्यय ईकार हा इष्ट नसला तरी तो होण्याकरितां प्रकृत सूत्र केलें आहे असें म्हणतां येईल.

पण प्रकृत सूत्राचा तसा उपयोग देतां येणार नाहीं. कारण, येथें आख्या शब्द घातला आहे, आणि तद्धित–प्रत्ययान्त शब्द हा कांहीं आख्या म्हणजे नांव होऊं शकत नाहीं.

अथवा, प्रष्ठ वगैरे मूळ शब्दाच्या अर्थाचा 'त्याची स्त्री' असाच त्याच्या स्त्रीशीं संबंध असो.

पण तसा संबंध असेल तर त्या अर्थीं तद्धित प्रत्यय प्राप्त होतो त्याचा लुक् सांगितला पाहिजे असें सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण, प्रष्ठ वगैरे मूळ शब्दाच्या अर्थाचा 'त्याची स्त्री' असाच संबंध असतो असें नाहीं. तर 'तोच ही' असाही त्याचा स्त्रीबरोबर संबंध असतो.

पण वस्तुतः तो नसून त्याला तो असें कसें बरें म्हणतां येईल ?

कां बरें? तो नसून त्याला तो असें चार प्रकारांनीं म्हणतां येतें. ते चार प्रकार म्हणजे– १ तात्स्थ्य, २ ताद्धर्म्य, ३ तत्सामीप्य, ४ तत्साहचर्य.

---

३–'तस्येदम्'[ ४।३।१२० ] म्हणजे 'त्याची ही वस्तु' या अर्थी तद्धित प्रत्यय केल्यानंतर त्या वस्तूचें स्त्रीत्व विवक्षित असेल तेथे टाप् ङीप् वगैरे प्रत्यय प्राप्त होतील तसे ते होत असतात. तेव्हां त्यांमध्यें ज्या ठिकाणीं टाप् प्रत्यय होतो.–उदा० भानोः इयं भानवीया दीप्तिः–तेथें टाप् प्रत्ययाचा बाध करून प्रकृत सूत्रानें ङीष् प्रत्यय होऊं लागेल असा प्रकृत सूत्राचा उपयोग संभवतो.

तत्स्थ्यात्तावत् । मञ्चा हसन्ति । गिरिर्दह्यते । ताद्धर्म्यात् । जटिनं यान्तं ब्रह्मदत्त इत्याह । ब्रह्मदत्ते यानि कार्याणि जटिन्यपि तानि क्रियन्त इत्यतो जटी ब्रह्मदत्त इत्युच्यते । तत्सामीप्यात् । गङ्गायां घोषः । कूपे गर्गकुलम् । तत्साहचर्यात् । कुन्तान्प्रवेशय । यष्टीः प्रवेशयेति ॥

अथवा पुनरस्तु तस्यामेव प्रष्ठशब्दः । ननु चोक्तं सुबन्तसमासवचनाद्ध्रस्वाकारान्तानुपपत्तिरिति । नैष दोषः ।

**गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनम् ॥ ४ ॥**

गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासो भवतीत्येषा परिभाषा कर्तव्या ॥ कान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि ।

**प्रयोजनं क्तादल्पाख्यायाम् ॥ ५ ॥**

अभ्रविलिप्ती सूपविलिप्ती । सुबन्तानां समासः । तत्रान्तरङ्गत्वाट्टाप् । टाप्युत्पन्ने

---

तात्स्थ्याचें उदाहरण-मञ्चाः हसन्ति. येथें माच्यावर बसणारे लोक मञ्च नसून त्यांना मञ्च असें म्हटलें आहे. तसेंच गिरिर्दह्यते येथें गिरि म्ह. पर्वत, त्यावर असलेलीं झाडें वगैरे हीं स्वतः गिरि नसून त्यांना गिरि असें म्हटलें आहे. ताद्धर्म्याचें उदा०-एखादा जटाधारी मनुष्य स्वतः ब्रह्मदत्त नव्हे तरी त्याला पाहून 'हा ब्रह्मदत्त' असा प्रयोग होतो. ब्रह्मदत्त आला असतां जीं त्याला उद्देशून पूजा, गोप्रदान वगैरे कार्यें करावयाचीं तीं कार्यें त्यालाही करतां येतात या अभिप्रायानें जटाधारी मनुष्याला ब्रह्मदत्त असें म्हटलें आहे. तत्सामीप्याचें उदा० गङ्गायां घोषः ( गंगेवर गवळवाडा आहे. ) कूपे गर्गकुलम् ( विहिरीवर गर्गांचें घर आहे. ) तत्साहचर्याचें उदा० कुन्तान् प्रवेशय, यष्टीः प्रवेशय.

अथवा प्रष्ठाची स्त्री ही वस्तुतः जरी पुढारी नाहीं तरी तिचा भर्ता पुढारी आहे म्हणून तिलाही पुढारी समजूनच प्रष्ठ शब्द लावला आहे असेंच असूं दे

• पण सुबन्ताशीं समास होणार असल्यामुळें त्याच्या पूर्वींच टाप् प्रत्यय होईल आणि प्रकृत सूत्रानें ङीष् प्रत्यय करतांना 'ऱ्हस्व अकारान्त प्रष्ठ असें मिळत नाहीं' असा दोष दाखविला आहे त्याची वाट काय ?

हा दोष येत नाहीं.

( वा. ४ ) 'गति, कारक आणि उपपद यांचा जो उत्तरपदाबरोबर तत्पुरुष समास सांगितला आहे तो त्या उत्तरपदामध्यें धातूहून कृत् प्रत्यय केला कीं लगेच त्या कृत्प्रत्ययान्ताबरोबरच होतो, सुप् प्रत्ययाची वाट पाहण्याचें कारण नाहीं' अशी परिभाषा [६] करावी.

या परिभाषेचीं प्रयोजनें तरी कोणतीं आहेत ?

( वा. ५ ) अभ्रविलिप्ती व सूपविलिप्ती हीं प्रयोजनें. येथें विलिप्त या उत्तरपदाहून सुप् प्रत्यय करून समास (२।१।३२) होणार; पण त्या सुप् प्रत्ययाच्या पूर्वीं अंतरंगत्वास्तव स्त्रीप्रत्यय होईल. तो टाप् प्रत्यय झाल्यावर व त्या-

---

४-येथें गंगेचा तीर हा गंगा नसून गंगेच्या जवळ असल्यामुळें त्याला गंगा असे म्हटलें आहे तसेंच तळ्याचा जवळचा प्रदेश हा तळें नसून त्याला तळें असें म्हटलें आहे.

५-कुन्त म्ह. भाला, यष्टि म्ह. काठी. हे भाले व काठ्या घेऊन लोक चालले आहेत. यांना आंत आण असें येथें तात्पर्य आहे. येथें ते लोक हे स्वतः भाले नव्हेत व काठ्याही नव्हेत. तथापि त्यांनाच कुन्त व यष्टि असें म्हटलें आहे. कारण भाले व काठ्या यांचें त्या लोकांशीं साहचर्य आहे. तसेंच भर्त्याचें साहचर्य त्याच्या स्त्रीला असतें म्हणून तिला प्रष्ठ असें म्हटलें आहे.

६--तेव्हां प्र-उपसर्गपूर्वक स्था धातूहून क प्रत्यय [ ३।१।१३६ ] केला कीं लगेंच त्या क-प्रत्ययान्ताबरोबरच प्र याचा समास [ २।२।१९ ] झाला म्हणजे त्याला प्रातिपदिक संज्ञा [ १।२।४६ ] होऊन प्रकृत सूत्रानें अकारान्त प्रातिपदिकाहून ङीष् करतां येतो.

समासः । विलिप्ताशब्दः समस्येत । तत्र क्रादल्पाख्यायामकारान्तादिति ङीष्न प्राप्नोति ॥

## जातेर्ङीष्विधाने ॥ ६ ॥

जातेर्ङीष्विधाने प्रयोजनम् । व्याघ्री कच्छपी । सुबन्तानां समासः । तत्रान्तरङ्गत्वाट्टाप् । टाप्युत्पन्ने समासः । घ्राशब्दः समस्येत । तत्र जातेरस्त्रीविषयादयोपधाद्कारान्तादिति ङीष्न प्राप्नोति ॥

## समासान्तस्य णत्वे ॥ ७ ॥

समासान्तस्य णत्वे प्रयोजनम् । वक्ष्यति* प्रातिपदिकान्तस्य णत्वे समासान्तग्रहणमसमासान्तप्रतिषेधार्थमिति । तस्मिन्क्रियमाणे माषवापिणी व्रीहिवापिणी सुबन्तानां समासः । तत्रान्तरङ्गत्वान्नकारान्तत्वान्ङीप् । ङीप्युत्पन्ने समासः । वापिनीशब्दः समस्येत । तत्र समासान्तस्येति णत्वं न प्राप्नोति ॥

## कृदन्तात्तद्धिते वृद्धिस्वरौ च ॥ ८ ॥

कृदन्तात्तद्धिते वृद्धिस्वरौ च प्रयोजनम् । सांकूटिनम् व्यावक्रोशी । अत्रावयवादुत्पत्तिः प्रसज्येत । गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासो भवतीति न दोषो भवति ॥ सत्यामप्येतस्यां परिभाषायामवयवादु-

---

नंतर सुप्-प्रत्यय झाल्यावर समास होईल. तो विलिप्ता या टाप्-प्रत्ययान्त उत्तरपदांबरोबर होईल. आणि तसें झाल्यास त्या नंतर ऱ्हस्व-अकारान्त प्रातिपदिक नसल्यामुळें 'क्रादल्पाख्यायाम्' (४।१।५१) यानें ङीष् प्रत्यय होणार नाहीं. तो होणें हा या परिभाषेचा उपयोग आहे.

(वा. ६) जातिवाचक शब्दाहून ङीष् प्रत्यय (४।१।६३) सांगितला आहे. तेथें या परिभाषेचा उपयोग होतो. ही परिभाषा नसेल तर व्याघ्री व कच्छपी येथें क-प्रत्ययान्त[७] उत्तरपदाहून सुप् प्रत्यय झाल्यानंतर समास होणार, पण त्या सुप् प्रत्ययाच्या पूर्वी अंतरंगत्वास्तव अगोदर टाप् प्रत्यय होऊन नंतर पुढें सुप् प्रत्यय होऊन घ्रा व पा या उत्तरपदांबरोबर समास होईल; व त्यानंतर ऱ्हस्व अकारान्त शब्द नसल्यामुळें जातेरस्त्रीविषयात्० (४।१।६३) यानें ङीष् होणार नाहीं.

(वा. ७) समासान्ताला सांगितलेल्या णत्वाविषयीं या परिभाषेचा उपयोग आहे. 'प्रातिपदिकान्तस्य णत्वे समासान्तग्रहणमसमासान्तप्रतिषेधार्थम्' (८।४।११ वा. १) असें (वार्तिककार) पुढें सांगणार आहेत. आणि तसें सांगितलें असतां माषवापिणी, व व्रीहिवापिणी येथें सुप्-प्रत्ययान्ताबरोबर समास होईल. पण त्या सुप् प्रत्ययाचे पूर्वी अंतरंगत्वास्तव नकारान्ताहून सांगितलेला ङीप् प्रत्यय (४।१।५) होईल. आणि तो ङीप् प्रत्यय (४।१।५) केल्यानंतर सुप् प्रत्यय होऊन वापिनी या उत्तरपदाबरोबर समास (२।२।१९) होऊं लागेल. तेव्हां समासाच्या अंतीं असलेल्या नकाराला सांगितलेलें णत्व होणार नाहीं.

(वा. ८) कृत्-प्रत्ययान्ताहून तद्धित प्रत्यय केला असतां तेथें वृद्धि आणि इष्ट स्वर साधतात हें या परिभाषेचें फल होय. उदा० सांकूटिनम्, व्यावक्रोशी. येथें कूटिन् आणि क्रोश एवढ्या भागावरूनच तद्धित प्रत्यय झाला असता. पण 'गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनम्' ही परिभाषा घेतली म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

पण 'गतिकारकोपपदानाम्' ही परिभाषा घेतली तरी सुद्धां कूटिन् व क्रोश एवढ्यां-

---

७—वि व आ हे उपसर्ग पूर्वी असलेल्या घ्रा धातूहून क प्रत्यय [ ३।१।१३६ ] आणि कच्छ उपपद असतांना पा धातूहून 'सुपि' [ ३।२।४ ] या योगविभागानें क प्रत्यय असे येथें प्रत्यय झाले आहेत.

८—मागें (१।४।१३ टीप २३) पहा. संकूटिन् व व्यवक्रोश एवढ्याहून तद्धित प्रत्यय झाल्यामुळें त्या तद्धित प्रत्ययामुळें होणारा स्वर सांकूटिन व व्यावक्रोश एवढ्याला होतो.

त्पत्तिः प्राप्नोति । किं कारणम् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीति । कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणं भवतीति संघातादुत्पत्तिर्भविष्यति ॥ यदि तर्ह्येषा परिभाषास्ति नैतदस्याः परिभाषायाः प्रयोजनं भवति । एतयैव सिद्धम् । न सिध्यति । किं कारणम् । अप्रातिपदिकत्वात् । कृत्त्वात्प्रातिपदिकसंज्ञा भविष्यति । ननु चेदानीं प्रातिपदिकसंज्ञायामप्येतया परिभाषयेह शक्यमुपस्थातुम् । नेत्याह । इह हि मूलकेनोपदंशं भुङ्क्ते इति वाक्येऽपि लुक्प्रसज्येत । स्वरे च दोषः स्यात् । प्रकारकः प्रकरणम् । गतिकारकोपपदात्कृदन्तमुत्तरपदं प्रकृतिस्वरं भवतीत्येष स्वरो

---

वरूनच तद्धित प्रत्यय होणार आहे.

काय कारण ?

कारण असें कीं प्रत्ययाचें ग्रहण जेथें केलें असेल तेथें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल त्या प्रकृतीला आरंभ करूनच त्या प्रत्ययान्ताचें ग्रहण होतें अशी परिभाषा आहे.

पण त्या परिभाषेचा अपवाद असलेली 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम्' ( १।४।१३ वा. ९. ) अशी परिभाषा आहे. त्यामुळें संकूटिन् व तसाच व्यवक्रोश हा समुदाय कृत्–प्रत्ययान्त समजून त्याहून तद्धित प्रत्यय होईल.

तर मग 'कृद्ग्रहणे०' ही जर परिभाषा आहे तर तिनेंच सांकूटिनम् व व्यावक्रोशी हीं उदाहरणें साधतील. तेव्हां 'गतिकारकोपपदानाम्०' या परिभाषेचीं तीं प्रयोजनें नव्हेत.

'कृद्ग्रहणे०' ही परिभाषा घेतली तरी जोंपर्यंत 'गतिकारकोपपदानाम्०' ही परिभाषा घेतली नाहीं तोंपर्यंत तीं उदाहरणें साधणार नाहींत.

काय कारण ?

कारण असें कीं 'संकूटिन्' एवढ्याला प्रातिपदिक संज्ञा नाहीं म्हणून त्याहून तद्धित प्रत्यय होणार नाहीं.

पण समास न झाल्यामुळें संकूटिन् एवढ्याला प्रातिपदिक संज्ञा न झाली तरी 'कृद्ग्रहणे०' या परिभाषेनेंच 'विशिष्टकृत्-प्रत्ययान्त' म्हणून तेवढ्या समुदायाला प्रातिपदिक संज्ञा होईल.

अशा रीतीनें प्रातिपदिक संज्ञेविषयीं 'कृद्ग्रहणे०' ही परिभाषा आणणें शक्य आहे काय ?

तसें शक्य नाहीं. कारण 'मूलकेनोपदंशं भुङ्क्ते' येथें समास केला नाहीं त्या वेळीं (२।२।२१) 'कृद्ग्रहणे०' या परिभाषेमुळें वाक्याला प्रातिपदिक संज्ञा झाली तर मूलकेन ह्यांतील तृतीया-प्रत्ययाचा लुक् (२।४।७१) होऊं लागेल. शिवाय 'प्रकारकः' व 'प्रकरणम्' येथें स्वराच्या संबंधानें दोष येतो. तो असा कीं-प्रकारक एवढ्याला समासाच्या पूर्वींच 'कृद्-ग्रहणे०' या परिभाषेनें प्रातिपदिक संज्ञा होईल आणि कारक याहून सुप् प्रत्यय न झाल्यामुळें समास होणार नाहीं. आणि गति, कारक व उपपद यांच्या पुढील कृत्–प्रत्ययान्त उत्तर-पदाला सांगितलेला प्रकृतिस्वर (६।२।१३९) होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण प्रकारक या

---

९—तेव्हां कूटिन् एवढेंच इनुण्–प्रत्ययान्त समजलें जाईल. संकूटिन् एवढें समजलें जाणार नाहीं. म्हणून अण् हा तद्धित प्रत्यय ( ५।४।१५ ) कूटिन् एवढ्यावरूनच होईल. तसेंच व्यावक्रोशी येथेंही क्रोश एवढेंच णच् प्रत्ययान्त समजलें जाईल व तेवढ्यावरूनच अञ् हा तद्धित प्रत्यय ( ५।४।१४ ) होऊं लागेल.

१०—कारण, 'गतिकारकोपपदानाम्०' ही परिभाषा नसल्यामुळें प्रातिपदिक संज्ञा होऊन सुप् प्रत्यय होऊन नंतर समासाची प्राप्ति येणार आहे.

११—कारण, समास झाल्याशिवाय उत्तर-पद म्हणतां येत नाहीं.

न स्यात् । नैष दोषः । द्वे अत्र प्रातिपदिकसंज्ञे अवयवस्यापि समुदायस्यापि । तत्रावयवस्य या प्रातिपदिकसंज्ञा तदाश्रयः स्वरो भविष्यति । इहापि तर्हि सांकूटिनम् व्यावक्रोशीति द्वे अत्रापि प्रातिपदिकसंज्ञे अवयवस्यापि समुदायस्यापि । तत्रावयवस्य या प्रातिपदिकसंज्ञा तदाश्रयात्तयवादुत्पत्तिः प्रसज्येत । अवयवादुत्पत्तौ सत्यां को दोषः । कौम्भकारेयो न सिध्यति । अवयवस्य वृद्धिस्वरौ स्याताम् ॥ तस्मात्प्रयोजनमेवैतदस्याः परिभाषाया उभाभ्यां तु खलु सिध्यति ॥

**अवदातायां तु ङीप्प्रसङ्गः ॥ ९ ॥**

अवदातायां तु ङीप्प्राप्नोति । अवदाता ब्राह्मणी । वर्णादनुदात्तात्तोपधात्तो नः [४.१.३९] इति ॥ नैष वर्णवाची । किं तर्हि । विशुद्धवाची । आतश्च विशुद्धवाच्येवं ह्याह

त्रीणि यस्यावदातानि विद्या योनिश्च कर्म च ।
एतच्छिवे विजानीहि ब्राह्मणाग्र्यस्य लक्षणमिति ॥

---

समुदायालाही प्रातिपदिक संज्ञा होईल आणि कारक ह्या अवयवालाही होईल दोघांनाही येथें प्रातिपदिक संज्ञा होतील. त्यांतील कारक या अवयवाला झालेल्या प्रातिपदिक संज्ञेमुळें सुप् प्रत्यय होऊन समास होऊन स्वरही होईल.

तर मग त्याप्रमाणेंच सांकूटिनम् व व्यावक्रोशी येथेंही समुदाय आणि अवयव या दोघांना प्रातिपदिक संज्ञा होईल आणि त्यांमध्यें कूटिन् व क्रोश या अवयवाला जी प्रातिपदिक संज्ञा होईल तिच्यामुळें तेवढ्याहून तद्धित प्रत्यय होऊं लागेल.

मग अवयवाहून तद्धित प्रत्यय झाला तर कोणता दोष येतो ?

अवयवाहून तद्धित प्रत्यय झाला तर कौम्भकारेय हें रूप सिद्ध होणार नाहीं; कारण 'अवयवालाच वृद्धि आणि स्वर होतील' असा दोष पूर्वी (पृ. २०६ पं. १९) दिला आहे तसा सांकूटिनम् व व्यावक्रोशी येथेंही येईल. तेव्हां एकंदरीत 'गतिकारकोपपदानाम्०' या परिभाषेचीं सांकूटिनम् व व्यावक्रोशी हीं प्रयोजनें आहेतच. आतां ही परिभाषा आणि 'कृद्ग्रहणे०' ही परिभाषा ह्या दोन्ही परिभाषा घेतल्या असतां सांकूटिनम् व व्यावक्रोशी हीं उदाहरणें सिद्ध होतात असें समजावें.

(वा. ९) अवदाता ब्राह्मणी या उदाहरणामध्यें 'वर्णादनुदात्तात्तोपधात्तो नः' (४।१।३९) या सूत्रानें ङीप् प्राप्त होतो.

अवदात हा शब्द वर्णवाचक नव्हे तर त्याचा अर्थ शुद्ध असा आहे. शिवाय शुद्ध या अर्थी अवदात शब्दाचा प्रयोगही आहे. तो असा—

त्रीणि यस्यावदातानि विद्या योनिश्च कर्म च ।
एतच्छिवे विजानीहि ब्राह्मणाग्र्यस्य लक्षणम् ॥

याचा अर्थ—हे शिवे ज्या ब्राह्मणाची विद्या, वंश आणि कर्म या तीन गोष्टी अवदात म्हणजे शुद्ध आहेत तो श्रेष्ठ ब्राह्मण समजावा.

---

१२—अवदात एवढा सबंद शब्द गौरवर्ण या अर्थाचा वाचक आहे असें गृहीत धरून ही शंका केली आहे. गतिकारकोपपदानाम्० ही परिभाषा नसली म्हणजे दात याहून सुप् प्रत्ययाच्या पूर्वी अंतरंगत्वास्तव टाप् प्रत्यय होईल. दात या शब्दाचा गौरवर्ण हा अर्थ नसल्यामुळें ङीप् होणार नाहीं; आणि मागून समास झाल्यानंतर अवदाता हा शब्द वर्णवाचक आहे तरी ह्रस्व अकारान्त नसल्यामुळें ङीप् प्रत्यय होत नाहीं. परंतु 'गतिकारकोपपदानाम्० ही परिभाषा घेतली म्हणजे मात्र टाप् प्रत्ययाच्या अगोदर समास होऊन ङीप् होऊं लागेल हा दोष येतो.

सूर्याद्देवतायां चाब्वक्तव्यः । सूर्यस्य स्त्री सूर्या । देवतायामिति किमर्थम् । सूरी ॥

## इन्द्रवरुणभवशर्वरुद्रमृडहिमारण्ययवयवनमातुलाचार्याणामानुक् ॥ ४ । १ । ४९ ॥

### हिमारण्ययोर्महत्त्वे ॥ १ ॥

हिमारण्ययोर्महत्त्व इति वक्तव्यम् । महद्धिमं हिमानी । महदरण्यमरण्यानी ॥

### यवाद्दोषे ॥ २ ॥

यवाद्दोष इति वक्तव्यम् । दुष्टो यवो यवानी ॥

### यवनाल्लिप्याम् ॥ ३ ॥

यवनाल्लिप्यामिति वक्तव्यम् । यवनानी लिपिः ॥

### उपाध्यायमातुलाभ्यां वा ॥ ४ ॥

उपाध्यायमातुलाभ्यां वेति वक्तव्यम् । उपाध्यायी उपाध्यायानी । मातुली मातुलानी ॥

### मुद्गलाच्छन्दसि लिच्च ॥ ५ ॥

मुद्गलाच्छन्दसि लिच्चेति वक्तव्यम् । रथीरभून्मुद्गलानी ॥

### आचार्यादणत्वं च ॥ ६ ॥

आचार्यादणत्वं चेति वक्तव्यम् । आचार्यानी ॥

### आर्यक्षत्रियाभ्यां वा ॥ ७ ॥

आर्यक्षत्रियाभ्यां वेति वक्तव्यम् । आर्या आर्याणी । क्षत्रिया क्षत्रियाणी ॥

---

'सूर्याद्देवतायां चाप् वक्तव्यः' म्हणजे सूर्य शब्दाहून 'त्याची स्त्री' हा अर्थ विवक्षित असतांना चाप् प्रत्यय होतो असें म्हणावें, परंतु ती स्त्री देवता असली पाहिजे. उदा०—सूर्याची स्त्री देवता या अर्थी 'सूर्या'.

येथें देवता असली पाहिजे असें कशाकरितां म्हटलें आहे ?

कुन्ती ही सूर्याची स्त्री आहे पण देवता नव्हे. तेथें सूर्यस्य स्त्री सूरी असा ङीप् प्रत्ययच होतो.

( सू. ४९ वा. १ ) हिम व अरण्य या शब्दांहून त्यांचें महत्त्व हा अर्थ असतांना ङीप् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० मोठें हिम या अर्थी हिमानी; मोठें अरण्य या अर्थी अरण्यानी.

( वा. २ ) यव शब्दाहून त्याचा दोष हा अर्थ असतांना ङीप् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—दुष्ट यव या अर्थी यवानी.

( वा. ३ ) यवन शब्दाहून त्यांची लिपी या अर्थी ङीप् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा. यवनांची लिपि या अर्थी यवनानी.

( वा. ४ ) उपाध्याय आणि मातुल या शब्दांहून 'त्याची स्त्री' या अर्थी ङीप् प्रत्यय केला असतां त्या शब्दांना आनुक् आगम विकल्पानें होतो असें म्हणावें. उदा० उपाध्यायस्य स्त्री उपाध्यायी, उपाध्यायानी. मातुलस्य स्त्री मातुली, मातुलानी.

( वा. ५ ) वेदामध्यें मुद्गल शब्दाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो, तो लित् होतो आणि मुद्गल शब्दाला आनुक् आगम होतो असें म्हणावें. उदा. रथीरभून्मुद्गलानी.

( वा. ६ ) आचार्य शब्दाहून ङीप् प्रत्यय आणि आचार्य शब्दाला आनुक् आगम केला असतां त्याच्या नकाराला णत्व ( ८।४।२ ) होत नाहीं असें म्हणावें. उदा० आचार्यस्य स्त्री आचार्यानी.

( वा. ७ ) आर्य आणि क्षत्रिय या शब्दांहून 'त्याची स्त्री' या अर्थी ङीष् प्रत्यय आणि आनुक् आगम हे विकल्पानें होतात असें म्हणावें. आर्या, आर्याणी; क्षत्रिया, क्षत्रियाणी.

---

१ ( सू. ४९ )—इन्द्र, वरुण, भव, शर्व, रुद्र, मृड, मातुल आणि आचार्य या शब्दांहून 'त्याची स्त्री' या अर्थी ङीप् प्रत्यय होतो. तसेंच हिम, अरण्य, यव आणि यवन या शब्दांहून स्त्रीत्व--विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. आणि या सर्वच शब्दांना आनुक् असा आगम होतो. उदा०—इन्द्राणी, वरुणानी इत्यादि.

**क्रीतात्करणपूर्वात्** ॥ ४ । १ । ५० ॥

करणपूर्वादिति किमर्थम् । गवा क्रीता । अश्वेन क्रीता । करणपूर्वादित्युच्यमानेऽप्यत्र प्राप्नोति । एषोऽपि हि क्रीतशब्दः करणपूर्वः । विभक्त्या व्यवहितत्वान्न भविष्यति । यदि तर्हि विभक्तिरपि व्यवधायिका भविष्यति मनसाक्रीतीति न सिध्यति ॥ एवं तर्हि नैवं विज्ञायते करणं पूर्वमस्मात्क्रीतशब्दात्सोऽयं करणपूर्वस्तस्मात्करणपूर्वात्क्रीतशब्दादनुपसर्जनादिति । कथं तर्हि । करणमस्मिन्प्रातिपदिके पूर्वं तदिदं करणपूर्वम् तस्मात्करणपूर्वात्प्रातिपदिकात्क्रीतान्तादनुपसर्जनादिति ॥

[क्तादल्पाख्यायाम् ॥ ४।१।५१ ॥]

**बहुव्रीहेश्चान्तोदात्तात्** ॥ ४ । १ । ५२ ॥

**अन्तोदात्ते जातप्रतिषेधः ॥ १ ॥**

अन्तोदात्ते जातस्य प्रतिषेधो वक्तव्यः । दन्तजाता स्तनजाता ॥

**पाणिगृहीत्यादीनां विशेषे ॥ २ ॥**

पाणिगृहीत्यादीनां विशेष इति वक्तव्यम् । पाणिगृहीती भार्या । यस्या हि यथाकथंचित्पाणिर्गृह्यते पाणिगृहीता सा भवति ॥

---

(सू. ५०) येथें करणपूर्वात् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

गवा क्रीता व अश्वेन क्रीता या वाक्यांमध्यें ङीष् प्रत्यय न झाला पाहिजे म्हणून म्हटलें आहे.

पण 'करणपूर्वात्' असें म्हटलें तरी येथें ङीष् प्रत्यय प्राप्त होतोच. कारण येथेंही क्रीत शब्दाच्या पूर्वी गो हें करण आहेच.

गो हें करण जरी आहे तरी त्याच्या पुढील तृतीया विभक्तीनें व्यवधान असल्यामुळें येथें ङीष् होणार नाहीं.

पण जर विभक्ति-प्रत्ययामुळेंसुद्धां व्यवधान होत असेल तर मनसाक्रीती येथें ङीष् प्रत्यय होणार नाहीं.

तर मग करण आहे. पूर्वी ज्याहून असा क्रीत शब्द असा अर्थ येथें समजूं नये, तर करण आहे पूर्वपद ज्या प्रातिपदिकामध्यें असें जें अनुपसर्जन क्रीत शब्द अंतीं असलेलें प्रातिपदिक त्याहून स्त्रीत्व विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो असा अर्थ समजावा.

(सू. ५२ वा. १) जात शब्द उत्तरपद असलेल्या बहुव्रीहीहून प्रकृत सूत्रानें ङीष् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. उदा०—दन्तजाता, स्तनजाता.

(वा. २) पाणिगृहीती वगैरे शब्दांमध्यें जो ङीष् प्रत्यय होतो तो विशेष अर्थ असतांना होतो असें म्हणावें. उदा० 'पाणिगृहीती' भार्या. ज्या स्त्रीचा हात कोणीतरी सहज धरला असेल अशी स्त्री या अर्थी 'पाणिगृहीता' असाच प्रयोग होतो.

---

१ (सू. ५०)--ज्या प्रातिपदिकामध्यें करण पूर्वपद आहे अशा क्रीतशब्दान्त-प्रातिपदिकाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय होतो. उदा०—वस्त्रेण क्रीता वस्त्रक्रीती, गवा क्रीता गोक्रीती.

२ 'मनसाक्रीत' हा अलुक् समास (६।३।४) आहे. येथें मनसाक्रीत याला प्रातिपदिक संज्ञा आहे.

१ (सू. ५१)--ज्या प्रातिपदिकांतील पूर्वपद करण आहे अशा क्त-प्रत्ययान्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्वविवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. परंतु धात्वर्थाचा संबंध थोड्या ठिकाणीं असला पाहिजे. उदा०—अभ्रलिप्ती द्यौः

१ (सू. ५२)—ज्या बहुव्रीहीचें उत्तरपद क्त-प्रत्ययान्त आहे अशा अन्तोदात्त बहुव्रीहीहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. उदा०—ऊरुभिन्नी. येथें भिन्न याला परनिपात (२।२।३६ वा. १) झाला आहे आणि 'जातिकाल०' (६।२।१७०) या सूत्रानें अन्तोदात्त झाला आहे.

२—विवाहामध्यें भर्त्यानें विधिपूर्वक केलेलें स्त्रीचें पाणिग्रहण हा विशेष अर्थ होय.

**बहुलं तणि ॥ ३ ॥**

बहुलं तणीति वक्तव्यम् । किमिदं तणीति । संज्ञाछन्दसोर्ग्रहणम् । किं प्रयोजनम् ।

**प्रबद्धविलूनाद्यर्थम् ॥ ४ ॥**

प्रबद्धविलूनी प्रबद्धविलूना ॥

**अन्तोदात्तादबहुनञ्सुकालसुखादिपूर्वात् ॥ ५ ॥**

अन्तोदात्तादबहुनञ्सुकालसुखादिपूर्वादिति वक्तव्यम् । बहु । बहुकृता । नञ् । अकृता । सु । सुकृता । काल । मासजाता संवत्सरजाता । सुखादि । सुखजाता दुःखजाता ॥

**जातिपूर्वाद्वा ॥ ६ ॥**

अथवा जातिपूर्वादिति वक्तव्यम् ॥

**[ अस्वाङ्गपूर्वपदाद्वा ॥ ४।१।५३ ॥]**

**स्वाङ्गाच्चोपसर्जनादसंयोगोपधात् ॥ ४ । १ । ५४ ॥**

स्वाङ्गाच्चोपसर्जनादित्युच्यते किं स्वाङ्गं नाम ।

अद्रवं मूर्तिमत्स्वाङ्गं प्राणिस्थमविकारजम् ।
अतत्स्थं तत्र दृष्टं च तस्य चेत्तत्तथा युतम् ॥

अप्राणिनोऽपि स्वाङ्गम् ॥ अद्रवमिति किमर्थम् । बहुलोहिता । नैतदस्ति । बह्वचो

(वा. ३) येथें बहुलं तणि असें म्हणावें.

तणि म्हणजे काय ?

'तणि' या शब्दानें संज्ञा शब्द आणि वेद या दोघांचें ग्रहण होतें तेव्हां त्या दोन ठिकाणीं बाहुल्येंकरून ङीष् प्रत्यय होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

(वा. ४) प्रबद्धविलूना[3] येथें ङीष् प्रत्यय बाहुल्येंकरून होतो हा त्याचा उपयोग होय.

(वा. ५) बहु, नञ्, सु, कालवाचक शब्द आणि सुखादिगणपठित शब्द हे पूर्वपद असतील तर त्या अंतोदात्त बहुव्रीहीहून हा ङीष् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. उदा०—बहुकृता, अकृता, सुकृता, मासजाता, संवत्सरजाता, सुखजाता, दुःखजाता.

(वा. ६) अथवा बहुव्रीहीमधील पूर्वपद जाति शब्द पाहिजे असें म्हणावें.

(सू. ५४) येथें स्वाङ्गाच्चोपसर्जनात् असें म्हटलें आहे. पण येथें स्वाङ्ग म्हणजे काय ?

(श्लो. १) जो पदार्थ पातळ नसून मूर्त आकाराचा आहे आणि विकारापासून झालेला नव्हे असा प्राण्याच्या शरीरांतील जो मुख, हात, पाय वगैरे अवयव तो स्वाङ्ग होय. प्राणिभिन्नाचे ठिकाणींही असलेला स्वाङ्ग होय.

येथें स्वाङ्ग ज्याला म्हणतात तो पदार्थ पातळ नसावा असें कशाकरितां म्हटलें आहे ?

बहुलोहिता येथें ङीष् प्रत्यय होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण येथें लोहित[2] हें स्वांग आहे असें समजून ङीष् प्राप्त झाला तरी स्वाङ्गवाचक शब्दामध्यें बहुत अच् असतील तर ङीष् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—सुरापीती, सुरापीता.

३—जिचे बंध तुटले आहेत अशी. येथें बन्ध् धातूहून भावी क्त प्रत्यय केला आहे.

४—असें म्हटलें म्हणजे पूर्वींचें वार्तिक (५) करावयास नको. कारण बहु नञ् वगैरे शब्द हे जातिशब्द नव्हेत.

१ (सू. ५३)—ज्या बहुव्रीहीचे पूर्वपद स्वाङ्गभिन्न आहे आणि उत्तरपद क्त—प्रत्ययान्त आहे अशा अन्तोदात्त बहुव्रीहीहून स्त्रीत्व—विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय विकल्पानें होतो.

१ (सू. ५४)—उपधेला संयोग नसलेला जो उपसर्जन स्वाङ्गवाचक शब्द तदन्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्व—विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—चन्द्रमुखी, चन्द्रमुखा.

२—लोहित म्ह. रक्त. तें येथें पातळ आहे म्हणून येथें त्याला स्वाङ्ग म्हणतां येत नाहीं.

नेति प्रतिषेधो भविष्यति । इदं तर्हि । बहुकफा ॥ मूर्तिमदिति किमर्थम् । बहुबुद्धिः बहुमनाः । नैतदस्ति । अत इति वर्तते । इदं तर्हि । बहुज्ञाना ॥ प्राणिस्थमिति किमर्थम् । श्लक्ष्णमुखा शाला ॥ अविकारजमिति किमर्थम् । बहुगडुः बहुपिटका । नैतदस्ति । इह तावद् बहुगडुरित्यत इति वर्तते । बहुपिटकेति बह्वचो नेति प्रतिषेधो भविष्यति । इदं तर्हि । बहुशोफा ॥ अतत्स्थं तत्र दृष्टं च । अप्राणिस्थं प्राणिनि दृष्टं च स्वाङ्गसंज्ञं भवति । दीर्घकेशी रथ्येति ॥ तस्य चेत्तत्तथा युतमप्राणिनोऽपि स्वाङ्गसंज्ञं भवतीति । दीर्घनासिक्यर्चा । तुङ्गनासिक्यर्चेति ॥

अथोपसर्जग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । शिखा ।

**उपसर्जनग्रहणमनर्थकं बहुव्रीह्यधिकारात् ॥ १ ॥**

उपसर्जनग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । बहुव्रीह्यधिकारात् । बहुव्रीहेरिति वर्तते । क

होत नाहीं (४।१।५६) असा त्याचा निषेध होईल.

तर मग बहुकफा[३] हें उदाहरण घ्या.

आतां स्वांग ज्याला म्हणतात तो पदार्थ मूर्त आकाराचा असावा असें कशाकरितां म्हटलें आहे. ?

बहुबुद्धिः बहुमनाः वगैरे ठिकाणीं ङीष् प्रत्यय होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण येथें अतः याची अनुवृत्ति आहे तेव्हां ह्रस्व-अकारान्त प्रातिपदिकाहूनच हा ङीष् प्रत्यय होणारा आहे.

तर मग बहुज्ञाना हें उदाहरण घ्या.

आतां स्वाङ्ग ज्याला म्हणतात तो पदार्थ प्राण्याच्या शरीरांतील पदार्थ असला पाहिजे असें कशाला म्हटलें आहे ?

श्लक्ष्णमुखा शाला येथें ङीष् प्रत्यय होऊं नये म्हणून म्हटलें आहे ?

आतां स्वाङ्ग ज्याला म्हणतात तो पदार्थ विकारापासून झालेला नसावा असें कशाकरितां म्हटलें आहे ?

बहुगडुः बहुपिटका वगैरे ठिकाणीं ङीष् प्रत्यय होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

हे उपयोग बरोबर दिसत नाहींत. त्यांपैकीं बहुगडुः येथें तर गडु हें प्रातिपदिक अकारान्त नाहीं आणि येथें तर अतः अशी अनुवृत्ति आहे. तसेंच बहुपिटका येथें पिटक शब्दामध्यें बहुत अच् असल्यामुळें ङीष् प्रत्ययाचा निषेध होईल.

तर मग बहुशोफा[६] हें उदाहरण घ्या.

तसेंच जो प्राण्याच्या शरीरामध्यें दृष्ट पदार्थ तो इतर ठिकाणीं असला तरी स्वाङ्ग होय. उदा० दीर्घकेशी रथ्या.

तसाच जो प्राण्याचा शरीरामधील पदार्थ प्राण्याच्या शरीरांत जसा संयुक्त असतो तसाच तो प्राणिभिन्नाचे ठिकाणीं संयुक्त असेल तर तोही स्वांग होय. उदा० दीर्घनासिकी अर्चा[७], तुङ्गनासिकी अर्चा.

आतां येथें उपसर्जन-ग्रहण कशाकरितां केलें आहे ?

शिखा या उदाहरणामध्यें ङीष् प्रत्यय न व्हावा म्हणून केलें आहे.

(वा. १) ह्या सूत्रामध्यें उपसर्जन-ग्रहण करण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं बहुव्रीहि पदाची मागून अनुवृत्ति येथें येत आहे.

३–कफ हा पातळ पदार्थ असल्यामुळें स्वाङ्ग नव्हे.

४–आणि बुद्धि व मनस् हे शब्द ह्रस्व–अकारान्त नाहींत.

५–गडु म्ह. गळू; व पिटक म्ह. फोड. हे विकारामुळें होणारे पदार्थ आहेत.

६–शोफ म्हणजे सूज.

७–अर्चा म्हणजे प्रतिमा.

प्रकृतम्। बहुव्रीहेश्चान्तोदात्तात् [४.१.५२] इति ॥ बह्वजर्थं तर्ह्युपसर्जनग्रहणं कर्तव्यम् । बह्वचो नेति प्रतिषेधं वक्ष्यति तद्बह्वज्ग्रहणमुपसर्जनविशेषणं यथा विज्ञायेत। बह्वच उपसर्जनान्नेति। अथाक्रियमाण उपसर्जनग्रहणे कस्य बह्वज्ग्रहणं विशेषणं स्यात्। बहुव्रीहेरिति वर्तते बहुव्रीहिविशेषणं विज्ञायेत। अस्ति चेदानीं कश्चिदबह्वज्बहुव्रीहिर्यदर्थो विधिः स्यात् । अस्तीत्याह। स्वडा स्वडीति ॥

बह्वजर्थमिति चेत्स्वाङ्गग्रहणात्सिद्धम् ॥ २ ॥

स्वाङ्गग्रहणं क्रियते तद्बह्वज्ग्रहणेन विशेषयिष्यामः । स्वाङ्गाद्बह्वचो नेति ॥ एवं तर्ह्यन्तोदात्तादिति वर्तते ऽनन्तोदात्तार्थो ऽयमारम्भः ।

अनन्तोदात्तार्थमिति चेत्सहादिकृतत्वात्सिद्धम् ॥ ३ ॥

यदयं सहनञ्विद्यमानपूर्वाच्च [४.१.५७] इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो

---

मागें कोठें बरें बहुव्रीहि पद आहे ?

बहुव्रीहेश्चान्तोदात्तात् (४।१।५२) येथें आहे.

तर मग बह्वचाकरितां उपसर्जन-ग्रहण केलें पाहिजे. प्रातिपदिक जर बह्वच् असेल तर तेथें ङीष् प्रत्यय होत नाहीं असा निषेध पुढें (४।१।५६) सांगणार आहेत. तेव्हां तें बह्वच् हें उपसर्जनाचें विशेषण आहे असें समजलें पाहिजे. तेव्हां ज्यामध्यें बहुत अच् आहेत अशा उपसर्जन स्वाङ्गाहून ङीष् होत नाहीं असा त्याचा अर्थ होतो.

पण येथें उपसर्जन-ग्रहण केलें नाहीं तर बह्वच् हें कोणाचें बरें विशेषण होईल ?

मागून बहुव्रीहेः या पदाची अनुवृत्ति येत आहे. तेव्हां तें बहुव्रीहीचें विशेषण होईल.

पण ज्यामध्यें बहुत अच् नाहींत असा एखादा तरी बहुव्रीहि आहे काय कीं ज्याकरितां बह्वच् हें बहुव्रीहीचें विशेषण दिलें जात आहे असें म्हणतां येईल?

होय, आहे तर. उदा० स्वडा, स्वडी.

(वा. २) 'बह्वच् कोण' तें समजण्याकरितां उपसर्जन-ग्रहण केलें असेल तर तें कार्य स्वाङ्ग-ग्रहणानेंच सिद्ध होत आहे. येथें स्वाङ्गात् असें म्हटलें आहे त्यालाच बह्वच् हें विशेषण लावतां येईल. म्हणजे ज्यामध्यें बहुत अच् आहेत अशा स्वाङ्गवाचक शब्दाहून ङीष् प्रत्यय होत नाहीं असा अर्थ होईल.

तर मग आतां अन्तोदात्तात् असें मागून चालू आहे तेव्हां अन्तोदात्त नसतांनाही ङीष् प्रत्यय होण्याकरितां येथें उपसर्जन-ग्रहण केलें आहे असें म्हणतां येईल.

(वा. ३) अन्तोदात्त नसला तरी तेथें ङीष् प्रत्यय होण्याकरितां उपसर्जन-ग्रहण केलें आहे असें असेल तर तेंही बरोबर नाहीं. कारण, सह वगैरे शब्द पूर्वी असतांना जो निषेध केला आहे त्यावरूनच तें सिद्ध होत आहे. असें पहा कीं 'सहनञ्विद्यमानपूर्वाच्च' (४।१।५७) या सूत्रानें अन्तोदात्त नसतांही जो ङीष् प्रत्ययाचा निषेध आचा-

---

८—अड म्ह. विंचवाची नांगी. येथें प्रकृत सूत्रानें ङीष् प्रत्यय विकल्पानें होतो.

९—बहुव्रीहीची अनुवृत्ति आली म्हणजे तेथें स्वाङ्ग हें उपसर्जन असणारच असें असतांही जें येथें उपसर्जन-ग्रहण केलें आहे त अशाकरितां कीं— बहुव्रीहीबरोबर अन्तोदात्तात् याचा संबंध होईल, तो होऊं नये. अन्तोदात्त असो अथवा नसो, फक्त स्वाङ्ग हें उपसर्जन असलें म्हणजे तेथें ङीष् प्रत्यय झाला पाहिजे.

१०—सहनासिका वगैरे बहुव्रीहींमध्यें पूर्वपदाला प्रकृतिस्वर (६।२।१) झाला असतां शेष-निघातानें (६।१।१५८) बाकीचे अच् अनुदात्त होत असल्यामुळें तेथें बहुव्रीहि अन्तोदात्त होत नाहीं.

ऽनन्तोदात्तादपि भवतीति ॥

**स्वाङ्गसमुदायप्रतिषेधार्थं तु ॥ ४ ॥**

स्वाङ्गसमुदायप्रतिषेधार्थं तर्ह्युपसर्जनग्रहणं कर्तव्यम् । स्वाङ्गाद्यथा स्यात्स्वाङ्गसमुदायान्मा भूत् । कल्याणपाणिपादा ॥ अथ क्रियमाणे ऽप्युपसर्जनग्रहणे कस्मादेवात्र न भवति स्वाङ्गं ह्येतदुपसर्जनम् । न स्वाङ्गसमुदायः स्वाङ्गग्रहणेन गृह्यते यथा जनपदसमुदायो जनपदग्रहणेन न गृह्यते । काशिकोसलीया इति । जनपदतदवध्यो-रिति वुञ्न भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । अस्वाङ्गपूर्वपदादिति वर्तते तेन स्वाङ्गं विशेषयिष्यामः । अस्वाङ्गपूर्वपदात्परं यत्स्वाङ्गं तदन्ताद्बहुव्रीहेरिति । न चात्रा स्वाङ्गपूर्वपदात्परं न तदन्तो बहुव्रीहिर्यदन्तश्च बहुव्रीहिर्न तद स्वाङ्गपूर्वपदात्परं स्वाङ्गम् ॥ ननु च तत्पूर्वस्मिन्योगे बहुव्रीहिविशेषणम् । नेत्याह । पूर्वपदविशेषणं तत् । न स्वाङ्गमस्वाङ्गम् पूर्वं पदं पूर्वपदम् अस्वाङ्गं पूर्वपदमस्वाङ्गपूर्वपदम् अस्वाङ्गपूर्वपदादिति । यद्येवं पूर्वस्मिन्योगे बहुव्रीहिरविशेषितो भवति । बहुव्रीहिश्च विशेषितः । कथम् ।

योंनीं केला आहे त्यावरून ते असें सुचवितात कीं अन्तोदात्त नसला तरी प्रकृत सूत्रानें ङीष् प्रत्यय होतो.

( वा. ४ ) स्वाङ्गवाचक शब्द अनेक असतील तेथें ङीष् प्रत्यय न होण्याकरितां येथें उपसर्जन-ग्रहण केलें पाहिजे. स्वाङ्गवाचक शब्द एकच असेल तेथेंच ङीष् प्रत्यय झाला पाहिजे. कल्याणपाणिपादा असा स्वाङ्गवाचक पाणिपाद वगैरे शब्दांचा समुदाय असेल तेथें होऊं नये.

पण येथें उपसर्जन-ग्रहण केलें तरी कल्याणपाणिपादा येथें ङीष् प्रत्यय कां बरें होत नाहीं ? येथें पाणिपाद हें स्वाङ्ग उपसर्जन आहेच.

येथें ङीष् प्रत्यय न होण्याचें कारण असें कीं पाणि आणि पाद हे दोन्ही मिळून स्वाङ्ग नव्हे. उदा० जनपदांच्या समुदायाला मिळून कांहीं जनपद म्हणत नाहींत. म्हणूनच कौशिकोसलीयाः येथें 'जनपदतदवध्योश्च' (४।२।१२४) हा वुञ् प्रत्यय होत नाहीं.

हाही येथें उपसर्जन-ग्रहणाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं, कारण पूर्वसूत्रांतून अस्वाङ्गपूर्वपदात् याची अनुवृत्ति येथें आहे. त्याचा स्वाङ्गाकडे संबंध करूं. तेव्हां अस्वाङ्ग अशा पूर्वपदाच्या पुढील जो स्वाङ्गवाचक शब्द तदन्त बहुव्रीहीहून ङीष् प्रत्यय होतो असा येथें अर्थ होईल. तेव्हां कल्याणपाणिपादा येथें अस्वाङ्ग अशा कल्याण या पूर्वपदाच्या पुढील जो स्वाङ्गवाचक शब्द पाणि हा आहे तदन्त बहुव्रीहि नाहीं; आणि बहुव्रीहीच्या शेवटीं जो स्वाङ्गवाचक पाद हा शब्द तो अस्वाङ्ग अशा कल्याण या पूर्वपदाच्या पुढें नाहीं.

पण, पूर्वसूत्रामधील ' अस्वाङ्गपूर्वपदात् ' या शब्दामध्यें कर्मधारय समास करून पूर्वपदाकडेच त्याचा संबंध करावयाचा आहे. तो असाः—'न स्वाङ्गम् अस्वाङ्गम् पूर्वं च तत् पदं च पूर्वपदम्, अस्वाङ्गं च तत् पूर्वपदं च' म्हणजे अस्वाङ्ग असें जें पूर्वपद त्याच्यापुढें असाच तेथें अर्थ आहे.

पण पूर्वसूत्रामध्यें असेंच असेल तर तेथें बहुव्रीहीला कांहींच विशेषण नाहीं असें होतें.

बहुव्रीहीलाही विशेषण तेथें आहे.

११–' काशयश्च कोशलाश्च ' अशा अर्थी काशिकोशल हा द्वंद्व करून पुढें 'तत्र भवः' या अर्थी छ प्रत्यय (४।२।११४) झाला आहे. काशि व कोशल या नांवाचे जनपद निरनिराळे आहेत. परंतु येथें जर त्यांच्या समुदायाला जनपद म्हटलें तर जनपदवाचकांहून सांगितलेला वुञ् प्रत्यय (४।२।१२५) छ प्रत्ययाचा बाध करून होऊं लागेल.

कादिति वर्तते तेन बहुव्रीहिं विशेषयिष्यामः । अस्वाङ्गात्पूर्वपदात्परं यत्क्तान्तं तदन्ताद्बहुव्रीहेरिति ॥

इदं तर्हि प्रयोजनम् । बहुव्रीहेरिति वर्तत उपसर्जनमात्राद्यथा स्यात् । निष्केशी यूका । अतिकेशी मालेति ॥

## नासिकोदरौष्ठजङ्घादन्तकर्णशृङ्गाच्च ॥ ४ । १ । ५५ ॥

### नासिकादीनां विभाषायां पुच्छाच्च ॥ १ ॥

नासिकादीनां विभाषायां पुच्छाच्चेति वक्तव्यम् । कल्याणपुच्छी कल्याणपुच्छा ॥

### कवरमणिविषशरेभ्यो नित्यम् ॥ २ ॥

कवरमणिविषशरेभ्यो नित्यमिति वक्तव्यम् । कवरपुच्छी मणिपुच्छी विषपुच्छी शरपुच्छी ॥

### उपमानात्पक्षाच्च ॥ ३ ॥

उपमानात्पक्षाच्च पुच्छाच्चेति वक्तव्यम् । उलूकपक्षी शाला । उलूकपुच्छी सेनेति ॥

### नासिकादिभ्यो विभाषायाः सहनञ्विद्यमानपूर्वेभ्यः प्रतिषेधो विप्रतिषेधेन ॥ ४ ॥

नासिकादिभ्यो विभाषायाः सहनञ्विद्यमानपूर्वेभ्यः प्रतिषेधो भवति विप्रतिषेधेन । नासिकादिभ्यो विभाषाया अवकाशः । कल्याणनासिकी कल्याणनासिका । सहनञ्विद्यमानपूर्वलक्षणस्य प्रतिषेधस्यावकाशः । समुखा अमुखा विद्यमानमुखेति ।

---

तें कसें ?

तेथें मागून क्तात् या पदाची अनुवृत्ति आहे. त्याचा बहुव्रीहीकडे संबंध करूं. म्हणजे एकंदर त्याचा अर्थ असा होतो कीं :—अस्वाङ्ग अशा पूर्वपदाच्या पुढील जें क्त—प्रत्ययान्त उत्तरपद तदन्त बहुव्रीहीहून ङीष् प्रत्यय विकल्पानें होतो.

तर मग आतां येथें जें उपसर्जन-ग्रहण केलें आहे त्याचा उपयोग असा समजावा कीं, बहुव्रीहीची अनुवृत्ति येत असतांना ज्या अर्थी येथें उपसर्जन ग्रहण केलें आहे त्या अर्थी बहुव्रीहीची अपेक्षा न धरतां फक्त उपसर्जन असलें कीं तेथें ङीष् प्रत्यय होतो असें आचार्यांच्या मनांत आहे. उदा० केशेभ्यः निष्क्रान्ता निष्केशी यूका, केशान् अतिक्रान्ता अतिकेशी माला.

(सू. ५५ वा. १) हा जो नासिका वगैरे शब्द अन्तीं असलेल्या प्रातिपदिकाहून विकल्पानें ङीष् प्रत्यय सांगितला आहे तेथें पुच्छ शब्दही ज्यास्त घालावा. उदा० कल्याणपुच्छी, कल्याणपुच्छा.

(वा. २) कवर, मणि, विष आणि शर या शब्दांच्या पुढील जो पुच्छ शब्द तदन्त प्रातिपदिकाहून ङीष् प्रत्यय नित्य होतो असें म्हणावें. उदा० कवरपुच्छी, मणिपुच्छी, विषपुच्छी, शरपुच्छी.

(वा. ३) उपमानवाचक शब्दाच्या पुढील जो पक्ष शब्द किंवा पुच्छ शब्द तदन्त प्रातिपदिकाहून ङीष् प्रत्यय नित्य होतो असें म्हणावें. उदा. उलूकपक्षी शाला, उलूकपुच्छी सेना.

(वा. ४) हा जो नासिका वगैरे शब्द अन्तीं असलेल्या प्रातिपदिकाहून विकल्पानें ङीष् प्रत्यय सांगितला आहे त्याचा, ‘सहनञ्विद्यमानपूर्वाच्च’ हा पुढील निषेध विप्रतिषेधामुळें परत्वास्तव बाधक होतो. कल्याणनासिकी व कल्याणनासिका येथें प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या विकल्पाला अवकाश आहे. तसेंच समुखा अमुखा व विद्यमानमुखा येथें ‘सहनञ्विद्य०’ या

---

१ (सू. ५५)—नासिका, उदर, ओष्ठ, जङ्घा, दन्त, कर्ण आणि शृङ्ग हे जे स्वाङ्गवाचक उपसर्जन शब्द तदन्त प्रातिपदिकांहून स्त्रीत्व--विवक्षा असतांना विकल्पानें ङीष् प्रत्यय होतो. उदा०—तुङ्गनासिकी, तुङ्गनासिका.

इहोभयं प्राप्नोति । सनासिका अनासिका विद्यमाननासिकेति । सहनञ्विद्यमानपूर्वेभ्यः प्रतिषेधो भवति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः । अयं विधिः स प्रतिषेधो विधिप्रतिषेधयोश्चायुक्तो विप्रतिषेधः ॥ अयमपि विधिर्न मृदूनामिव कार्पासानां कृतः प्रतिषेधविषय आरभ्यते । स यथैव बह्वज्लक्षणं संयोगोपधलक्षणं च प्रतिषेधं बाधत एवं सहनञ्विद्यमानलक्षणमपि बाधेत ॥ का तर्हि गतिः । इह तावन्नासिकोदरेति बह्वज्लक्षणश्च प्रतिषेधः प्राप्नोति सहनञ्विद्यमानपूर्वलक्षणश्च । पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन् बाधन्त इत्येवमियं विभाषा बह्वज्लक्षणं प्रतिषेधं बाधिष्यते सहनञ्विद्यमानलक्षणं न बाधिष्यते । ओष्ठजङ्घादन्तकर्णशृङ्गाश्चेति संयोगोपधलक्षणश्च प्रतिषेधः प्राप्नोति सहनञ्विद्यमानपूर्वलक्षणश्च । मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन् बाधन्त इत्येवमियं विभाषा संयोगोपधलक्षणं प्रतिषेधं बाधिष्यते सहनञ्विद्यमानपूर्वलक्षणं न बाधिष्यते ॥

## [ न क्रोडादिबह्वचः ॥ ४।१।५६ ॥

निषेधाला अवकाश आहे. आणि सनासिका अनासिका व विद्यमाननासिका येथें दोघांचीही प्राप्ति येते, तेव्हां तेथें विप्रतिषेधामुळें 'सहनञ्विद्यमानपूर्वाच्च' हा निषेध परत्वास्तव बाधक होतो.

पण येथें विप्रतिषेधच मुळीं संभवत नाहीं. कारण हा विधि आहे आणि तो निषेध आहे आणि विधि व निषेध यांमध्यें विप्रतिषेध आहे असें म्हणणें योग्य नाहीं.

येथें कांहीं हा विधि जणूं काय मऊ कापसाचा बनविला आहे असें समजूं नये, तर निषेधाच्या विषयामध्यें निषेधाला बाजूला सारण्याकरितांच मुद्दाम बनविला आहे. तेव्हां हा जसा 'नासिका, उदर वगैरे शब्दांविषयीं बह्वच् प्रातिपदिकाहून ङीष् होत नाहीं' या पुढील सूत्रानें सांगितलेल्या निषेधाचा बाध करतो आणि ओष्ठ वगैरे शब्दांविषयीं 'असंयोगोपधात्' या पूर्वसूत्रामध्येंच असलेल्या निषेधाचा बाध करतो तसा 'सहनञ्विद्यमानपूर्वाच्च' या निषेधाचाही बाध करील.

तर मग आतां येथें उपाय तरी काय योजावा?

उपाय असा कीं नासिका व उदर शब्दांविषयीं बह्वच् म्हणून पुढील सूत्रानें निषेध प्राप्त होतो, तसाच त्याच्या पुढील 'सहनञ्विद्यमानपूर्वाच्च' हाही निषेध प्राप्त होतो. तेव्हां 'पूर्वी पठित असलेला अपवाद हा जवळच्या विधीचा बाध करतो. त्याच्या पलीकडील विधीचा बाध करीत नाहीं' या न्यायानें प्रकृत सूत्रानें सांगितलेला हा विकल्प बह्वच् म्हणून सांगितलेल्या जवळच्या निषेधाचा बाध करील; 'सहनञ्विद्यमान०' या निषेधाचा बाध करणार नाहीं. तसेंच ओष्ठ, जङ्घा, दन्त, कर्ण आणि शृङ्ग या पांच शब्दांविषयीं उपधेला संयोग असल्यामुळें असंयोगोपधात् हा पूर्वसूत्रांतील निषेध प्राप्त होतो, आणि 'सहनञ्०' हाही निषेध प्राप्त होतो. तेव्हां तेथें 'मध्यें पठित असलेला अपवाद हा पूर्वविधीचा बाध करतो, पुढील विधीचा बाध करीत नाहीं' या न्यायानें प्रकृत सूत्रानें सांगितलेला हा विकल्प 'असंयोगोपधात्' या पूर्वीच्या निषेधाचाच बाध करील, 'सहनञ्०' या पुढील निषेधाचा बाध करणार नाहीं.

२—निषेध हा जसा विधिला दूर सारण्याकरितांच अवतीर्ण झालेला असतो तसा कांहीं विधि हा निषेधाला दूर सारण्याकरितां अवतीर्ण झालेला नसतो. तेव्हां निषेध हा प्रबल असल्यामुळें विधि आणि निषेध यांची बरोबरी नसते. म्हणून विप्रतिषेध संभवत नाहीं.

१ (सू. ५६)—क्रोडादिगणपठित जे शब्द आणि ज्यांमध्यें बहुत अच् आहेत असे जे स्वाङ्गवाचक शब्द तदन्त प्रातिपदिकांहून ङीष् प्रत्यय होत नाहीं. उदा० कल्याणक्रोडा, पृथुजघना. क्रोड म्ह. अश्वाचें उरःस्थल.

**सहनञ्विद्यमानपूर्वाच्च ॥४।१।५७।**
**नखमुखात्संज्ञायाम् ॥४।१।५८॥**
**'दीर्घजिह्वी च च्छन्दसि ॥४।१।५९॥]**

**दिक्पूर्वपदान्ङीप् ॥ ४।१।६० ॥**

**दिक्पूर्वपदान्ङीषोऽनुदात्तत्वम् ॥ १ ॥**

दिक्पूर्वपदान्ङीषोऽनुदात्तत्वं वक्तव्यम्। प्राङ्मुखी प्रत्यङ्मुखी ॥

**ङीब्विधाने ह्यन्यत्रापि ङीष्विषयान्ङीप्प्रसङ्गः ॥ २ ॥**

ङीब्विधाने हि सत्यन्यत्रापि ङीष्विषयान्ङीप्प्रसज्येत । प्राग्गुल्फा प्रत्यग्ललाटा ॥ ननु चैते विशेषा अनुवर्तेरन्नसंयोगोपधाद्बह्वचो नेति । यद्यप्येते विशेषा अनुवर्तेरन्संयोगोपधाद्बह्वचो नेत्येवमपि दिक्पूर्वपदान्ङीपा मुक्ते ङीष्प्रसज्येत । नैष दोषः। उक्तमेतद्यत्रोत्सर्गापवादं विभाषा तत्राप्रवादेन मुक्त उत्सर्गो न भवतीति ॥ अथवा ङीष आदेशो ङीप् करिष्यते । तर्हि ङीषो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । अन्यतो ङीष् [ ४.१.४० ] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । दिक्पूर्वपदादित्येषा

---

(सू. ६० वा. १) येथें ङीप् प्रत्यय न सांगतां 'दिग्वाचक पूर्वपदाच्या पुढील जो स्वाङ्गवाचक शब्द तदन्ताहून केलेल्या ङीप् प्रत्ययाला अनुदात्त होतो' असें सांगावें. उदा० प्राङ्मुखी, प्रत्यङ्मुखी.

(वा. २) स्वतंत्र ङीप् प्रत्यय सांगितला तर ङीष् जेथें होत नाहीं तेथेंही ङीप् प्रत्यय होऊं लागेल. उदा०—प्राग्गुल्फा, प्रत्यग्ललाटा.

पण या उदाहरणांमध्यें ङीष् प्रत्यय न होण्याचीं जीं कारणें असंयोगोपधात् बह्वचः न इत्यादि पूर्वीं निर्दिष्ट केलीं आहेत त्यांची येथें अनुवृत्ति केली असतां ङीप्ही होणार नाहीं.

जरी असंयोगोपधात् बह्वचः न इत्यादि पदांची अनुवृत्ति केली असतां काम भागेल तरी हा वैकल्पिक ङीप् प्रत्यय ज्या वेळीं केला नाहीं त्या वेळीं प्राङ्मुखी असा टाप् प्रत्यय इष्ट आहे, तेथें एकदां ङीष् प्रत्यय-( ४।१।५४ ) ही होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण मागें ( २।१।३ पृ. ३३३ पं. ३-५ ) असें सांगितलें आहे कीं उत्सर्ग आणि अपवाद हे दोन्ही जेथें विकल्पानें सांगितले असतील तेथें अपवाद केला नाहीं त्या वेळीं उत्सर्गही होत नाहीं. अथवा, प्रकृत सूत्रानें ङीष् प्रत्ययाचे स्थानीं ङीप् हा आदेश सांगतां येईल.

तर मग तसा अर्थ होण्याकरतां येथें ङीषः असें पद घातलें पाहिजे.

तसें पद घालावयास नको. कारण मागून अनुवृत्ति येत आहे.

मागें कोठें बरें ङीषः असें पद आहे ?

अन्यतो ङीष् ( ४।१।४० ) येथें आहे.

आहे खरें, पण तें तेथें ङीष् असें प्रथमान्त उच्चारलें आहे. आणि आम्हाला तर ङीषः असें षष्ठयन्त पाहिजे आहे.

---

१ (सू. ५७)—सह, नञ्, आणि विद्यमान हे शब्द पूर्वीं असलेलें जे प्रातिपदिक त्याहून ङीष् प्रत्यय होत नाहीं. उदा० सकेशा, अकेशा, विद्यमानकेशा.

१ (सू. ५८)—संज्ञाशब्दामध्यें नख किंवा मुख शब्द शेवटीं असलेल्या प्रातिपदिकाहून ङीष् प्रत्यय होत नाहीं. उदा०—शूर्पणखा; गौरमुखा.

१ (सू. ५९)—दीर्घजिह्वी असा ङीष्-प्रत्ययान्त शब्द वेदामध्यें निपातन केला जातो. उदा० दीर्घजिह्वी.

१ (सू. ६०)—दिग्वाचक पूर्वपदाच्या पुढील जो स्वाङ्गवाचक शब्द तदन्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्वविवक्षा असतांना जो ङीष् प्रत्यय प्राप्त होतो तो न होतां त्याच्या ऐवजीं ङीप् प्रत्यय होतो. उदा०—प्राङ्मुखी, प्राङ्मुखा. ङीष् झाला असतां प्रत्यय-स्वरामें ( ३।१।३ ) प्राङ्मुखी असा अन्तोदात्त होईल; आणि ङीप् केला म्हणजे तो अनुदात्त (३।१।४) होतो आणि पूर्वपद-प्रकृतिस्वरानें (६।२।१) प्राङ्मुखी असा आद्युदात्त होतो.

पञ्चमी ङीषिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [ १. १. ६७ ] इति । प्रत्ययविधिरयं न च प्रत्ययविधौ पञ्चम्यः प्रकल्पिका भवन्ति । नायं प्रत्ययविधिः । विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते ॥

[ वाहः ॥ ४।१।६१ ॥
सख्यशिश्वीति भाषायाम्
॥ ४ । १ । ६२ ॥ ]

जातेरस्त्रीविषयादयोपधात्
॥ ४ । १ । ६३ ॥

जातेरित्युच्यते का जातिर्नाम ।
आकृतिग्रहणा जातिर्लिङ्गानां च न सर्वभाक्।
सकृदाख्यातनिर्ग्राह्या गोत्रं च चरणैः सह ॥
अपर आह ।
प्रादुर्भावविनाशाभ्यां सत्त्वस्य युगपद्गुणैः ।
असर्वलिङ्गां बह्वर्थां तां जातिं कवयो विदुः ॥

---

ही अडचण येणार नाहीं. कारण, 'दिक्पूर्वपदात्' अशी जी येथें पञ्चमी उच्चारली आहे ती 'तस्मादित्युत्तरस्य' ( १।१।६७ ) या परिभाषेच्या साहाय्यानें ङीष् या पदामध्यें प्रथमेच्या ऐवजीं षष्ठीची कल्पना करील.

पण हा प्रत्ययविधि आहे ना ? आणि प्रत्ययविधिमध्यें तर पंचमीच्या जोरावर प्रत्याच्या पुढील प्रथमेला षष्ठीची कल्पना होत नसते.

हा त्या प्रत्ययाचा विधि नव्हेच. ङीष् हा प्रत्यय पूर्वींच सांगितला आहे. येथें फक्त त्याची अनुवृत्ति आहे.

( सू. ६३ ) येथें 'जातेः' असें म्हटलें आहे. पण जाति म्हणजे काय ?

( श्लो. १ ) विशेष प्रकारच्या आकारामुळें जी समजली जाते ती जाति होयः हत्ती, घोडा, उंट, बैल, कुमार, तरुण, वृद्ध हे जाति शब्द होत (१). जो धर्म एका ठिकाणीं समजला असतां त्याच्या संबंधानें इतर कांहीं ठिकाणी तो सहज समजला जातो तो धर्म जाति होय; ह्या जातीचे दर्शक शब्द सर्वलिंगी नसावेत. उदा० ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे शब्द हे जातिशब्द होत (२). औपगव वगैरे अपत्य-प्रत्यान्त शब्द आणि विशेष शाखेचें अध्ययन करणारा या अर्थाचे कठ बह्वृच् वगैरे शब्द हेही जाति शब्द होत (३).

येथें दुसऱ्या एका वैयाकरणानें जातीचें लक्षण असें सांगितलें आहे.—

( श्लो. २ ) पदार्थ उत्पन्न झाला कीं लगेच जसे त्याचे गुण दिसूं लागतात तसा जो धर्म दिसतो, आणि तो पदार्थ नष्ट झाला कीं लगेच जसे त्याचे गुण दिसेनासे होतात तसा जो धर्म दिसेनासा होतो त्या धर्माला जाति म्हणतात. उदा० हत्ती, घोडा, इत्यादि शब्द हे जाति शब्द होत. ( १ ) अनेक पदार्थांचे ठिकाणीं असणाऱ्या धर्मालाही जाति म्हणतात; ह्या जातीचा दर्शक शब्द सर्वलिंगी नसावा. उदा. ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे शब्द हे जाति शब्द होत.

---

२—नाहीं तर 'गुप्तिज्किद्भ्यः सन्' ( ३।१।५ ) येथेंही सनः अशी षष्ठीची कल्पना होऊन सन् प्रत्ययाचें विधान नाहीं असें झालें असतें.

३—तेव्हां येथें ङीप् या प्रथमान्त पदामध्यें षष्ठीची कल्पना आम्ही करीत नाहीं. ङीष् या पदामध्यें करतों. तेथें कांहींच हरकत दिसत नाही.

१ (सू. ६१)—वाह् असा जो ण्वि-( ३।२।६४ ) प्रत्ययान्त शब्द तदन्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. उदा०—दित्यौही.

१ ( सू. ६२ )—सखी आणि अशिश्वी हे दोन ङीष्-प्रत्ययान्त शब्द फक्त लौकिक प्रयोगामध्यें निपातन केले जातात. उदा० सखी; न शिशुर्यस्याः सा अशिश्वी.

१ ( सू. ६३ ) जो शब्द नित्य-स्त्रीलिंगी नव्हे, आणि ज्या शब्दाच्या उपधेला यकार नाहीं अशा जाति शब्दाहून स्त्रीत्व—विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. उदा० कुक्कुटी, सूकरी, नाडायनी, कठी.

गोत्रं च चरणानि च ॥

कः पुनरेतयोर्जातिलक्षणयोर्विशेषः । यथा पूर्वं जातिलक्षणं तथा कुमारीभार्य इति भवितव्यम् । यथोत्तरं तथा कुमारभार्य इति भवितव्यम् ॥

अथास्त्रीविषयादिति कथमिदं विज्ञायते । समानायामाकृतौ यदस्त्रीविषयामिति । आहोस्वित्कचिद्यदस्त्रीविषयमिति । किं चातः । यदि विज्ञायते समानायामाकृतौ यदस्त्रीविषयामिति द्रोणी कुटी पात्रीति न सिध्यति । अथ विज्ञायते कचिद्यदस्त्रीविषयमिति माला बलाका अत्रापि प्राप्नोति । अस्तु कचिद्यदस्त्रीविषयामिति । कथं माला बलाकेति । अजादिषु पाठः करिष्यते ॥

अयोपधादिति किमर्थम् । इभ्या क्षत्रिया॥ अत्यल्पमिदमुच्यते ऽयोपधादिति । अकोपधादित्यपि वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् चटका मूषिकेति ॥ यद्यकोपधादित्युच्यते

---

( २ ) तसेंच औपगव वगैरे अपत्य-प्रत्ययान्त शब्द आणि विशेष शाखेचें अध्ययन करणारा या अर्थाचे शब्द कठ बह्वृच् वगैरे हेही जाति शब्द होत.

हीं जीं दोन प्रकारची जातीचीं लक्षणें सांगितलीं त्यांमध्यें फरक काय बरें आहे ?

फरक असा आहे कीं—पूर्वींचें लक्षण घेतलें असतां कुमारीभार्यः असें रूप व्हावें, आणि दुसरें लक्षण घेतलें असतां कुमारभार्यः असें व्हावें.

आतां येथें अस्त्रीविषयात् म्हणजे तो शब्द इतर लिंगीं असावा असें जें म्हटलें आहे त्याचा अर्थ कसा समजावा ? जाति शब्द हा ज्या अर्थानें जाति शब्द होतो त्याच अर्थीं तो इतर लिंगी असावा, किंवा कोणत्याही अर्थीं तो शब्द इतर लिंगीं असावा ?

या दोन अर्थांमध्यें काय बरें फरक आहे ?

ज्या अर्थानें तो जाति शब्द होतो त्याच अर्थीं तो इतर लिंगीं असावा असें म्हटलें तर द्रोणी[३], कुटी व पात्री येथें प्रकृत सूत्रानें ङीष् प्रत्यय होणार नाहीं. आतां कोणत्याही अर्थीं तो शब्द इतर लिंगीं चालणारा असावा असें म्हटलें तर मालो व बलाका येथेंही ङीष् प्रत्यय होऊं लागेल.

तर मग कोणत्याही अर्थीं तो शब्द इतर लिंगीं चालणारा असावा असाच अर्थ असूं दे. पण असा अर्थ घेतला तर माला व बलाका येथें ङीष् प्रत्यय होऊं लागेल त्याची वाट काय ?

अजादि गणामध्यें (४।१।४) पाठ केला असतां त्या शब्दांहून ङीष् प्रत्ययाचा बाध करून टाप् प्रत्यय होईल.

आतां यकार उपधेला नसावा असें येथें कशाकरितां म्हटलें आहे ?

इभ्या व क्षत्रिया येथें ङीष् प्रत्यय होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

यकार उपधेला नसावा हें फारच थोडें येथें म्हटलें आहे. ककार उपधेला नसावा असेंही येथें म्हटलें पाहिजे. कारण चटका, मूषिका वगैरे ठिकाणीही हा ङीष् प्रत्यय न झाला पाहिजे.

पण जर ककार उपधेला नसावा असें म्हटलें तर काकी, कोकी, पिकी, शुकी, उलूकी वगैरे

---

२—कुमारी भार्या यस्य असा बहुव्रीहि केला असतां पहिल्या लक्षणानें कुमार हा जाति शब्द होतो; म्हणून पुंवद्भाव होत नाही. ( ६।३।४१ ) भाष्यकारांना पहिलेंच लक्षण मान्य आहे.

३—द्रोणी म्हणजे एक प्रकारची ओषधि या अर्थीं हा शब्द नित्य स्त्रीलिंगी आहे, पुंल्लिंगी नाहीं; परिमाण या इतर अर्थीं पुंल्लिंगी आहे.

४—कारण, ' माळरान ' या अर्थीं माल हा शब्द नपुंसकलिंगी आहे. तसेंच बला म्हणजे बला नांवाची विद्या. तिला सांगणारा या अर्थीं बलाक हा शब्द इतर लिंगीं चालतो.

काकी कोकी पिकी शुकीति न सिध्यति । अस्तु तर्ह्ययोपधादित्येव । कथं चटका मूषिकेति । अजादिषु पाठः कर्तव्यः ॥

**योपधप्रतिषेधे गवयहयमुकयमनुष्यमत्स्यानामप्रतिषेधः ॥ १ ॥**

योपधप्रतिषेधे गवयहयमुकयमनुष्यमत्स्यानां प्रतिषेधो न भवतीति वक्तव्यम् । गवय गवयी । हय हयी । मुकय मुकयी । मनुष्य मनुष्यी । मत्स्य मत्सी ॥

**पाककर्णपर्णपुष्पफलमूलवालोत्तरपदाच्च ॥ ४।१।६४ ॥**

**सदकाण्डप्रान्तशतैकेभ्यः पुष्पात्प्रतिषेधः ॥ १ ॥**

सदकाण्डप्रान्तशतैकेभ्यः पुष्पात्प्रतिषेधो वक्तव्यः । सत्पुष्पा प्राक्पुष्पा काण्डपुष्पा प्रान्तपुष्पा शतपुष्पा एकपुष्पा ॥

**संभस्त्राजिनशणपिण्डेभ्यः फलात् ॥ २ ॥**

संभस्त्राजिनशणपिण्डेभ्यः फलात्प्रतिषेधो वक्तव्यः । सम् । संफला । सम् ॥ भस्त्रा । भस्त्राफला । भस्त्रा ॥ अजिन । अजिनफला । अजिन ॥ पिण्ड । पिण्डफला । पिण्ड ॥ शण । शणफला ॥

श्वेताच्चेति वक्तव्यम् । श्वेतफला ॥

**त्रेश्च ॥ ३ ॥**

त्रेश्च प्रतिषेधो वक्तव्यः । त्रिफला ॥

**मूलान्नञः ॥ ४ ॥**

मूलान्नञः प्रतिषेधो वक्तव्यः । अमूला ॥

**इतो मनुष्यजातेः ॥ ४।१।६५ ॥**

जातेरिति वर्तमाने पुनर्जातिग्रहणं किमर्थम् । अयोपधादिति वर्तते योपधादपि

---

ठिकाणीं ङीष् प्रत्यय होणार नाहीं.

तर मग यकार उपधेला नसावा एवढेंच येथें म्हणावें.

पण एवढेंच म्हटलें तर चटका, मूषिका येथें ङीष् प्रत्यय होऊं लागेल ना ?

अजादि गणामध्यें पाठ केला असतां तेथें ङीष् प्रत्ययाचा बाध करून टाप् प्रत्यय होईल.

(वा. १) यकार उपधेला नसावा असा जो प्रकृत सूत्रामध्यें निषेध केला आहे तो गवय, हय, मुकय, मनुष्य आणि मत्स्य या शब्दांना लागू होत नाहीं असें म्हणावें. उदा० हयी, गवयी, मुकयी, मनुष्यी, मत्स्यी.

(श्लो. ६४ वा. १) 'सत्, अञ्च् धातुपासून साधलेला अच् हा शब्द, काण्ड, प्रान्त, शत आणि एक या शब्दांच्या पुढील जो पुष्प शब्द तदन्त–प्रातिपदिकाहून ङीष् प्रत्यय होत नाहीं' असा प्रतिषेध सांगावा. उदा० सत्पुष्पा, प्राक्पुष्पा, काण्डपुष्पा, प्रान्तपुष्पा, शतपुष्पा, एकपुष्पा.

(वा. २) 'सम्, भस्त्रा, अजिन, शण आणि पिण्ड या शब्दांच्या पुढील जो फल शब्द तदन्त प्रातिपदिकाहून ङीष् प्रत्यय होत नाहीं' असा प्रतिषेध सांगावा. उदा० संफला, भस्त्रफला, अजिनफला, शणफला, पिण्डफला.

हा फल शब्द श्वेत शब्दाच्या पुढें आला तरी तेथेंही तदन्त प्रातिपदिकाहून ङीष् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० श्वेतफला.

(वा. ३) त्रि शब्दाच्या पुढील जो फल शब्द तदन्त प्रातिपदिकाहूनही ङीष् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. उदा० त्रिफला.

(वा. ४) नञ् या अव्ययाच्या पुढील जो मूल शब्द तदन्त प्रातिपदिकाहून ङीष् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. उदा० अमूला.

(सू. ६५) जातेः या पदाची अनुवृत्ति येत असतांना पुनः येथें जातेः असें कशाला म्हटलें आहे ?

---

१ (सू. ६४)—पाक, कर्ण, पर्ण, पुष्प, फल, मूल, आणि वाल हे शब्द ज्यांमध्यें उत्तरपद आहेत अशा सामासिक प्रातिपदिकांहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. उदा० ओदनपाकी वगैरे. हे सर्व शब्द ओषधिविशेष या अर्थाचे नित्य स्त्रीलिंगी आहेत.

१ (सू. ६५)—मनुष्यजातिवाचक जें ह्रस्व इकारान्त प्रातिपदिक त्याहून स्त्रीत्व–विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो. उदा० दाक्षी, अवन्ती.

यथा स्यात् । औदमेयी ॥

इतो मनुष्यजातेरिञ उपसंख्यानम् ॥१॥

इतो मनुष्यजातेरिञ उपसंख्यानं कर्तव्यम् । सौतंगमी मौनिचिती ॥

ऊङुतः ॥ ४।१।६६ ॥

किमर्थो ङकारः । विशेषणार्थः । क विशेषणार्थेनार्थः । नोङ्धात्वोः [ ६.१.१७५ ] इति । नोधात्वोरित्युच्यमाने यवाग्वा यवाग्वै इत्यत्रापि प्रसज्येत ॥

अथ दीर्घोच्चारणं किमर्थं न उङुत इत्येवोच्येत । का रूपसिद्धिः ब्रह्मबन्धूः धीवबन्धूरिति । सवर्णदीर्घत्वेन सिद्धम् । न सिध्यति । गोस्त्रियोरुपसर्जनस्य [१.२.४८] इति ह्रस्वत्वं प्रसज्येत । इह च ब्रह्मबन्धूछत्त्रम् ब्रह्मबन्धूच्छत्त्रम् षत्वतुकोरसिद्धः [६.१.८६] इत्येकादेशस्यासिद्धत्वान्नित्यस्तुक्प्रसज्येत । इह च ब्रह्मबन्धूः धीवबन्धूः नद्यृतः कबिति कप्प्रसज्येत ॥ नैष दोषः । यत्तावदुच्यते ब्रह्मबन्धूः धीवबन्धूरिति गोस्त्रियोरुपसर्जनस्येति

तें 'जातेः' ' हें पद 'अयोपधात्' या पदाशीं संबद्ध झालेलें आहे. आणि येथें तर यकार उपधेला असला तरी त्याहून ङीष् प्रत्यय झाला पाहिजे. उदा० औदमेयी.

( वा. १ ) इञ् प्रत्ययाहून स्त्रीत्व–विवक्षा असतांना ङीष् प्रत्यय होतो असें येथें उपसंख्यान करावें. उदा.–सौतंगमी, मौनिचिती [२].

( सू. ६६ ) येथें ऊङ् प्रत्ययाला ङकार कशाकरितां लावला आहे ?

ङकारेत्संज्ञक असें विशेषण ऊकाराला लावतां यावें म्हणून येथें ङकार लावला आहे.

अशा तऱ्हेनें विशेषण लागून कोठें बरें उपयोग होत आहे ?

नोङ्धात्वोः (६।१।१७५) येथें उपयोग होत आहे. जर तेथें ङकार न उच्चारतां 'नोधात्वोः' असें म्हटलें तर यवाग्वा व यवाग्वै येथेंही विभक्ति प्रत्ययाला होणाऱ्या उदात्ताचा (६।१।१७४) त्यानें निषेध होऊं लागेल.

आतां येथें ऊङ् हा प्रत्यय दीर्घ कशाकरितां सांगितला आहे ? तसा सांगू नये. तर 'उङुतः' असा ह्रस्वच उङ् प्रत्यय सांगावा.

पण तसा सांगितला तर ब्रह्मबन्धूः व धीवबन्धूः हीं उदाहरणें कशीं साधतील ?

सवर्ण-दीर्घ ( ६।१।१०१ ) केला म्हणजे साधतील.

तशीं साधणार नाहींत. कारण 'गोस्त्रियोः०' (१।२।४८) यानें ऱ्हस्व होऊं लागेल. तसेंच ब्रह्मबन्धूछत्त्रम् ब्रह्मबन्धूच्छत्त्रम् येथें 'छे च' (६।१।७३) यानें नित्य तुक् आगम होऊं लागेल. कारण षत्वतुकोरसिद्धः (६।१।८६) या शास्त्रानें तुक् आगमाच्या दृष्टीनें सवर्णदीर्घ एकादेश असिद्ध असल्यामुळें तेथें ह्रस्व उकार आहे अशी कल्पना होईल. तसेंच ब्रह्मबन्धूः व धीवबन्धूः येथें नद्यृतश्च (५।४।१५३) यानें समासान्त कप् प्रत्यय होऊं लागेल.

हे दोष येत नाहींत. ब्रह्मबन्धूः व धीवबन्धूः येथें 'गोस्त्रियोः०' यानें ऱ्हस्व होऊं लागेल

२—सुतंगम व मुनिचित या शब्दांहून 'त्यानें निर्माण केलेली नगरी' या अर्थी इञ् प्रत्यय (४।२।८०) झाला आहे.

१ ( सू. ६६ )—ज्याच्या उपधेला यकार नाहीं अशा ऱ्हस्व–उकारान्त मनुष्यजातिवाचक प्रातिपदिकाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ऊङ् प्रत्यय होतो. उदा० कुरूः, ब्रह्मबन्धूः

२—ऊङ् प्रत्ययाच्या दीर्घ उच्चारणाच्या जोरावर ब्रह्मबन्धूः वीरबन्धूः वगैरे ठिकाणीं 'गोस्त्रियोः०' यानें ऱ्हस्व होत नसतो आणि क प्रत्ययही होत नसतो असा अभिप्राय आहे. ब्रह्म बन्धुर्यस्याः, तसाच वीरः बन्धुर्यस्याः असा बहुव्रीहि समास येथें आहे.

ह्रस्वत्वं प्रसज्येतेत्युभयत आश्रये नान्तादिवत् । यदप्युच्यते ब्रह्मबन्धूछत्त्रम् ब्रह्मबन्धूच्छत्त्रम् षत्वतुकोरसिद्ध इत्येकादेशस्यासिद्धत्वान्नित्यस्तुक्प्रसज्येतेति पदान्तपदाद्योरेकादेशोऽसिद्धो न चैष पदान्तपदाद्योरेकादेशः । यदप्युच्यत इह च ब्रह्मबन्धूः धीवबन्धूरिति नद्यृतः कबिति कप्प्रसज्येतेति नद्यन्तानां यो बहुव्रीहिरित्येवं तन्न चैष नद्यन्तानां बहुव्रीहिः ॥ शेषलक्षणस्तर्हि कप्प्राप्नोति । तस्माद्दीर्घोच्चारणं कर्तव्यम् ॥

ऊङ्प्रकरणेऽप्राणिजातेश्चारज्ज्वादीनाम् ॥ १ ॥

ऊङ्प्रकरणेऽप्राणिजातेश्चारज्ज्वादीनामिति वक्तव्यम् । अलाबूः कर्कन्धूः ॥ अप्राणिजातेरिति किमर्थम् । कृकवाकुः ॥ अरज्ज्वादीनामिति किमर्थम् । रज्जुः हनुः ॥

[बाह्वन्तात्संज्ञायाम् ॥ ४।१।६७ ॥

पङ्गोश्च ॥ ४।१।६८ ॥

---

असा जो दोष दाखविला तो तर येत नाहींच. कारण 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्'[3] अशी परिभाषा आहे. तसेंच ब्रह्मबन्धूछत्त्रम्, ब्रह्मबन्धूच्छत्त्रम् येथें 'षत्वतुकोरसिद्धः' यानें एकादेश असिद्ध असल्यामुळें नित्य तुक् आगम होऊं लागेल असा जो दोष दिला आहे तोही येत नाहीं. कारण मागील पदाच्या शेवटचा एक वर्ण आणि पुढील पदाच्या आरंभींचा एक वर्ण अशा दोन वर्णांच्या स्थानीं झालेला जो एकादेश तोच त्या शास्त्रानें असिद्ध होत असतो. आणि ब्रह्मबन्धूः येथें दोन उकारांचे स्थानीं सवर्णदीर्घ एकादेश झाला आहे. ते दोन उकार पदाच्या शेवटचा आणि पदाच्या आरंभींचा असे नाहींत. तसेंच ब्रह्मबन्धूः व वीरबन्धूः येथें नद्यृतश्च यानें कप् प्रत्यय होऊं लागेल असा जो दोष दिला आहे तोही बरोबर नाहीं. कारण नद्यन्त पदाचा जो बहुव्रीहि असा तेथें अर्थ आहे. आणि ब्रह्मबन्धू हा बहुव्रीहि तर नद्यन्त पदाचा झालेला नाहीं.

तर मग ब्रह्मबन्धूः येथें शेषाद्विभाषा (५।४।१५४) यानें कप् प्रत्यय होऊं लागेल असा दोष येतो. त्याकरितां येथें ऊङ् असा दीर्घच प्रत्यय सांगितला पाहिजे.

ह्या ऊङ् प्रकरणामध्यें प्राणिभिन्न जातिवाचक ऱ्हस्व-उकारान्त शब्दाहून ऊङ् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. पण तो उकारान्त शब्द रज्जु वगैरे गणांतील नसावा. उदा०—अलाबूः, कर्कन्धूः.

येथें प्राणिभिन्न असें कशाकरितां म्हटलें आहे ?

कृकवाकुः (कोंबडी) येथें ऊङ् प्रत्यय होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

रज्जु वगैरे शब्द नसावेत असें कशाकरितां म्हटलें आहे ?

रज्जुः हनुः येथें ऊङ् प्रत्यय होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

---

३—अन्तादिवच्च ( ६।१।८५ ) यानें पूर्वान्तवद्भाव आणि परादिवद्भाव हे दोन्ही एकाच कार्याकरितां एकदम होत नाहींत असा त्या परिभाषेचा अर्थ आहे. आणि येथें ब्रह्मबन्ध् हें पूर्वान्तवद्भावानें प्रातिपदिक आणि ऊ हा परादिवद्भावानें स्त्री-प्रत्यय असे ऱ्हस्वाकरितां दोन्ही एकदम समजावे लागतात.

४—मागे पहा ( ३।१।१११ पृ. १८६ पं. ५ )

५—येथें ब्रह्मबन्धु या बहुव्रीहीच्या पुढें ऊङ् हा नदी प्रत्यय झालेला आहे.

१ ( सू. ६७ )—बाहु-शब्दान्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ऊङ् प्रत्यय होतो परंतु तो ऊङ्-प्रत्ययान्त शब्द कोणाचो तरी संज्ञा पाहिजे. उ० भद्रबाहूः.

१ ( सू. ६८ )—पङ्गु शब्दाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ऊङ् प्रत्यय होतो. उदा० पङ्गूः.

**ऊरूत्तरपदादौपम्ये ॥ ४।१।६९॥]**

**संहितशफलक्षणवामादेश्च ॥ ४।१।७० ॥**

**सहितसहाभ्यां चेति वक्तव्यम् ।** सहितोरूः सहोरूः ॥

**कद्रुकमण्डल्वोश्छन्दसि ॥ ॥ ४।१।७१ ॥**

अत्यल्पमिदमुच्यते कद्रुकमण्डल्वोरिति। कद्रुकमण्डलुगुग्गुलुमधुजतुपतयालूनामिति वक्तव्यम् । कद्रूः कमण्डलूः गुग्गुलूः मधूः जतूः पतयालूः ॥

**[ संज्ञायाम् ॥४।१।७२ ॥**

**शार्ङ्गरवाद्यञो ङीन् ॥ ४।१।७३ ॥]**

**यङश्चाप् ॥ ४।१।७४ ॥**

**षाच्च यञश्चाप् ॥ १ ॥**

षाच्च यञश्चाब्वक्तव्यः । शार्कराक्ष्या पौतिमाष्या ॥ तत्रायमप्यर्थो गौकक्ष्यशब्दः क्रौड्यादिषु पठ्यते स न पठितव्यो भवति । यदि न पठ्यते गौकक्षीपुत्र इति

---

(सू. ७०) 'सहितसहाभ्यां चेति वक्तव्यम्' म्हणजे सहित आणि सह या शब्दांच्या पुढील जो ऊरु शब्द तदन्त प्रातिपदिकाहूनही ऊङ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० सहितोरूः, सहोरूः .

(सू. ७१) वेदामध्यें कद्रु आणि कमण्डलु या दोन शब्दांहून जो ऊङ् प्रत्यय सांगितला आहे तो फारच थोडा आहे. तर कद्रु, कमण्डलु, गुग्गुलु, मधु, जतु, आणि पतयालु या शब्दांहून वेदामध्यें ऊङ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—कद्रूः, कमण्डलूः, गुग्गुलूः, मधूः, जतूः, पतयालूः.

(सू. ७४ वा. १) षकाराच्या पुढील जो यञ् प्रत्यय तदन्त-प्रातिपदिकाहून स्त्रीत्वविवक्षा असतांना चाप् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—शार्कराक्ष्या, पौतिमाष्या. हें वचन करण्यांत दुसरा एक सहज फायदा असा होतो कीं क्रौड्यादि गणामध्यें (४।१।८०) जो गौकक्ष्य शब्द घातला आहे तो घालावयास नको.

---

१ (सू. ६९)-ज्या प्रातिपदिकामध्यें ऊरु शब्द उत्तरपद आहे त्या प्रातिपदिकाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ऊङ् प्रत्यय होतो उपमा गम्यमान असतांना. उदा० कदलीस्तम्भोरूः-

१ (सू. ७० -)ज्या प्रातिपदिकामध्यें संहित, शफ, लक्षण आणि वाम हे शब्द आरंभीं आहेत आणि ऊरु शब्द अन्तीं आहे त्या प्रातिपदिकाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ऊङ् प्रत्यय होतो. उदा० संहितोरूः.

१ (सू. ७१)—वेदामध्यें कद्रु आणि कमण्डलु या शब्दांहून स्त्रीत्व—विवक्षा असतांना ऊङ् प्रत्यय होतो. उदा० कद्रूः.

१ (सू. ७२)—भाषेमध्यें कद्रु आणि कमण्डलु या शब्दांहून स्त्रीत्व—विवक्षा असतांना ऊङ् प्रत्यय होतो, पण तो संज्ञा शब्द असला पाहिजे. उदा० कद्रूः नाम काचित्.

१ (सू. ७३)-शार्ङ्गरवादि गणामधील शब्द आणि अञ-प्रत्ययान्त शब्द यांहून स्त्रीत्व—विवक्षा असतांना ङीन् प्रत्यय होतो. उदा० शार्ङ्गरवी, बैदी

१ (सू. ७४)-यङ्-प्रत्ययान्त प्रातिपदिकाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना चाप् प्रत्यय होतो. उदा०-आम्बष्ठ्या, कारीषगन्ध्या. आम्बष्ठ्या येथें आम्बष्ठ शब्दाहून ञ्यङ् प्रत्यय (४।१।१७१) झाला आहे. आणि कारीषगन्ध्या येथें करीषगन्धि शब्दाच्या पुढील अण् प्रत्ययाचे (४।१।९२) स्थानी ष्यङ् आदेश (४।१।७८) झाला आहे.

२--शर्कराक्ष व पूतिमाष या शब्दांहून गोत्रापत्य स्त्री या अर्थी यञ् (४।१।१०५) झाला आहे.

३-कारण गोकक्षशब्दाहून गोत्रापत्य स्त्री या अर्थी यञ् (४।१।१०५) प्रत्यय केला असतां तदन्ताहून प्रकृत वार्तिकानें चाप् प्रत्यय होऊन गौकक्ष्या हें रूप

संप्रसारणं न प्राप्नोति । इष्टमेवैतत्संगृहीतम् । गौकक्ष्यापुत्र इत्येव भवितव्यम् । एवं हि सौनागाः पठन्ति ष्यङः संप्रसारणे गौकक्ष्यायाः प्रतिषेध इति ॥

## आवट्याच्च ॥ ४।१।७५ ॥

### अन उपधालोपिन ऊधसो ङीष्पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ १ ॥

अन उपधालोपिनोऽन्यतरस्याम् [४.१.२८] इत्येतस्मादूधसो ङीष्भवति पूर्वविप्रतिषेधेन । अन उपधालोपिनोऽन्यतरस्यामित्येतस्यावकाशः । बहुराज्ञी बहुतक्ष्णी । ऊधसो ङीष्भवतीत्यस्यावकाशः । विभाषा ङीब्यदा न ङीप्सोऽवकाशः । ङीप्प्रसक्त उभयं प्राप्नोति । ऊधसो ङीष्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । अन उपधालोपिनोऽन्यतरस्यामित्यत्रोधसो ङीष्भवतीत्येतदनुवर्तिष्यते ॥

### आवट्याद्यञः ष्फश्चापः ॥ २ ॥

आवट्याद्यञः ष्फश्चापो भवति पूर्वविप्रतिषेधेन। आवट्याद्यञश्चापोऽवकाशः। उदीचाम् । आवट्या । ष्फस्यावकाशः । अन्यानि यञन्तानि । गार्ग्यायणी वात्स्यायनी । आवट्यशब्दात्प्राचामुभयं प्राप्नोति । आवट्यायनी । ष्फो भवति पूर्वविप्रतिषे-

---

पण जर गौकक्ष्य शब्द क्रौड्यादि गणामध्यें घातला नाही तर गौकक्ष्यायाः पुत्रः गौकक्षीपुत्रः येथें ष्यङ् प्रत्यय न झाल्यामुळें संप्रसारण (६।१।१३) होणार नाहीं.

हा दोष नव्हे; उलट इष्टच साधत आहे. संप्रसारण न होतां गौकक्ष्यापुत्रः असेंच रूप येथें झालें पाहिजे. कारण सौनाग वैयाकरण 'ष्यङ् प्रत्ययाला सांगितलेलें संप्रसारण गौकक्ष्या शब्दाला होत नाहीं' असा स्पष्ट निषेधच करीत आहेत.

(सू. ७५ वा. १) अन उपधालोपिनोऽन्यतरस्याम् (४।१।२८) या ङीप् प्रत्ययापेक्षां बहुव्रीहेरूधसो ङीष् (४।१।२५) हा ङीष् प्रत्यय पूर्वविप्रतिषेधानें होतो. 'अन उपधालोपिनोऽन्यतरस्याम्' याला बहुराज्ञी व बहुतक्ष्णी येथें अवकाश आहे. तसेंच अन उपधालोपिनो० यानें ङीप् प्रत्यय विकल्पानें सांगितला असल्यामुळें ज्या वेळीं तो ङीप् प्रत्यय होत नाहीं त्या वेळीं 'बहुव्रीहेरूधसो ङीष्' याला अवकाश आहे. आतां ज्या वेळीं तो ङीप् प्रत्यय होतो त्या वेळीं कुण्डोध्नी येथें दोघांची प्राप्ति येते तेथें बहुव्रीहेरूधसो ङीष् हा ङीष् पूर्व विप्रतिषेधानें होतो.

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण 'अन उपधालोपिनोऽन्यतरस्याम्' येथें 'बहुव्रीहेरूधसो ङीष्' या सर्व पदांची अनुवृत्ति आणून स्वतंत्र वाक्यार्थ केला म्हणजे काम भागलें.

(वा. २) आवट्य या यञन्त शब्दाहून सांगितलेल्या या चाप् प्रत्ययापेक्षां ष्फ प्रत्यय (४।१।१७) पूर्वविप्रतिषेधानें होतो. आवट्य या यञन्त शब्दाहून सांगितलेल्या चाप् प्रत्ययाला उत्तरेकडील आचार्यांच्या मतानें आवट्या येथें अवकाश आहे. तसेंच गार्ग्यायणी व वात्स्यायनी येथें यञ्- प्रत्ययान्त इतर शब्दांमध्यें ष्फ प्रत्ययाला अवकाश आहे. आणि पूर्वेकडील आचार्यांच्या मतानें आवट्य शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेव्हां तेथें आवट्यायनी असा पूर्वविप्रतिषेधानें ष्फ प्रत्य-

---

सार्थे.

१-(सू. ७५) आवट्य या यञ्-प्रत्ययान्त शब्दाहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना चाप् प्रत्यय होतो.

उदा०-आवट्या. अवट शब्द गर्गादि गणामध्यें (४।१।१०५) आहे. अवटस्य गोत्रापत्यं स्त्री आवट्या.

धेन ॥ आवटयग्रहणेन नार्थः । यञः ष्फश्चाप इत्येव । इदमपि सिद्धं भवति । शार्कराक्ष्यायणी पौतिमाष्यायणी ॥ यञ्ग्रहणेन नार्थः । ष्फश्चाप इत्येव । गौकक्ष्यशब्दः क्रौड्यादिषु पठ्यते । इदमपि सिद्धं भवति गौकक्ष्यायणी ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । एवं वक्ष्यामि । प्राचां ष्फ तद्धितः सर्वत्र । क सर्वत्र । यत्र ष्फश्चान्यश्च प्राप्नोति ष्फ एव तत्र भवतीति । ततो लोहितादिकतन्तेभ्यः सर्वत्र । क सर्वत्र । प्राचां चोदीचां च ॥

[ तद्धिताः ४।१।७६॥
यूनस्तिः ॥ ४।१।७७ ॥]

अणिञोरनार्षयोर्गुरूपोत्तमयोः ष्यङ्गोत्रे ॥ ४।१।७८ ॥

इह कस्मान्न भवति । दाक्षी प्लाक्षीति । आतिशायिकेनायं तमशब्देन निर्देशः क्रियते स च त्रिप्रभृतिषु वर्तते त्रिप्रभृतीनामभावात् ॥ यद्येवं

---

यच होतो. ह्या वार्तिकामध्यें आवट्यात् असें म्हणण्यांत अर्थ नाहीं. 'यञः ष्फश्चापः' एवढेंच म्हणावें. म्हणजे आवट्य शब्दाशिवाय इतर ठिकाणींही शार्कराक्ष्यायणी व पौतिमाष्यायणी येथें पूर्वविप्रतिषेधानें ष्फ प्रत्यय सिद्ध होतो. तसेंच ह्या वार्तिकामध्यें यञः असें म्हणण्यांतही कांहीं अर्थ दिसत नाहीं. 'ष्फश्चापः' एवढेंच म्हणावें. त्याचा उपयोग असा होतो कीं गौकक्ष्य असा जो क्रौड्यादि गणामध्यें शब्द आहे त्या ष्यङ्–प्रत्ययान्त शब्दाहूनही चाप् प्रत्ययापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें ष्फ प्रत्यय सिद्ध होतो.

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण 'प्राचां ष्फ तद्धितः सर्वत्र' (४।१।३७) असें तें सूत्र करतां येईल.

सर्वत्र म्हणजे कोठें?

ज्या ठिकाणीं ष्फ प्रत्यय आणि इतर प्रत्यय प्राप्त होतात अशा सर्व ठिकाणीं ष्फ प्रत्ययच होतो. त्याच्या पुढें 'लोहितादिकतन्तेभ्यः' असें सूत्र होय तेथें सर्वत्र या पदाची अनुवृत्ति आहे.

तेथें सर्वत्र म्हणजे कोठें?

पूर्वेकडील आणि उत्तरेकडील अशा सर्वच आचार्यांच्या मतीं असा तेथें सर्वत्र याचा अर्थ समजावा.[2]

(सू. ७८ वा. १) दाक्षी[2] व प्लाक्षी येथें ष्यङ् आदेश कां होत नाहीं?

उत्तम हा शब्द अतिशय या अर्थी तमप् (५।३।५५) प्रत्यय करून येथें उच्चारला आहे आणि अतिशय तर तीन पासून पुढें अच्

---

२–पुढील 'सर्वत्र लोहितादि०' (४।१।१८) या सूत्रांतील सर्वत्र हा शब्द पूर्वसूत्रांत घालतां येईल (मागें ४।१।१८ पृ. ४३० पं २ पहा.)

१ (सू. ७६)–हें अधिकारसूत्र आहे. ह्या पुढील 'ति' या प्रत्ययाला आरंभ करून पांचवा अध्याय संपेपर्यंत जे प्रत्यय सांगितले आहेत त्या सर्व प्रत्ययांना 'तद्धित' अशी संज्ञा आहे.

१ (सू. ७७)–युवन् शब्दाहून स्त्रीत्व–विवक्षा असतांना ति प्रत्यय होतो. उदा०–युवतिः.

१ (सू. ७८)–ज्या प्रातिपदिकामध्यें कमीत कमी तीन अच् आहेत आणि त्यांतील शेवटच्या अचाच्या मागील अच् गुरु आहे असें जें अण्-प्रत्ययान्त किंवा इञ्–प्रत्ययान्त प्रातिपदिक त्यांतील अण् आणि इञ् यांचें स्थानीं स्त्रीत्व–विवक्षा असतांना ष्यङ् आदेश होतो, पण ते अण् व इञ् हे प्रत्यय गोत्रापत्य या अर्थीं केलेले असले पाहिजेत. आणि ते गोत्रापत्य ऋषीचें नसलें पाहिजे. उदा०–कुमुदस्येव गन्धोऽस्य कुमुदगन्धिः. येथें इकार (५।४।१३५) झाला आहे. कुमुदगन्धेः गोत्रापत्यं स्त्री कौमुदगन्ध्या. येथें अण् प्रत्ययाचे (४।१।११२) स्थानीं ष्यङ् आदेश व पुढें चाप् प्रत्यय (४।१।७४) झाला आहे. तसेंच वराहस्य गोत्रापत्यं स्त्री वाराह्या. येथें वराह शब्दाहून केलेल्या इञ् प्रत्ययाचे (४।१।९५) स्थानीं ष्यङ् आदेश होऊन पुढें चाप् प्रत्यय झाला आहे.

२-दक्ष व प्लक्ष या शब्दांहून इञ् प्रत्यय (४।१।९५) झाला आहे. हा गोत्रापत्य या अर्थीं होतो.

प्रकर्षे चेत्तमं कृत्वा दाक्ष्या नोपोत्तमं गुरु ।

आम्विधिः केन ते न स्यात्प्रकर्षे यद्ययं तमः ॥ १ ॥

प्रकर्षे चेत्तमं कृत्वा दाक्ष्या नोपोत्तमं गुर्वित्युच्यत आम्विधिः केन तव न स्यात् । अव्ययघादिति प्राप्नोति । प्रकर्षे यद्ययं तमः । यद्ययं तमः प्रकर्षे वर्तते ॥

उद्गतस्य प्रकर्षोऽयं गतशब्दोऽत्र लुप्यते ।

उद्गतस्यायं प्रकर्षः । गतशब्दस्यात्र लोपो भवति ॥

नाव्ययार्थप्रकर्षोऽस्ति धात्वर्थोऽत्र प्रकृष्यते ॥ २ ॥

नायमव्ययार्थस्य प्रकर्षः । कस्य तर्हि । धात्वर्थस्य ॥

उद्गतोऽपेक्षते किंचित्त्रयाणां द्वौ किलोद्गतौ ॥

अनुद्गतमपेक्ष्योद्गत इत्येतद्भवति । त्रयाणां द्वौ किलोद्गतौ । त्रयाणां किल द्वावुद्गतौ भवतः ॥

चतुष्प्रभृतिकर्तव्यो वाराह्यायां न सिध्यति ॥ ३ ॥

चतुष्प्रभृतिषु ष्यङ्कर्तव्यो वाराह्यायां न सिध्यति । वाराह्यायां न प्राप्नोति । किं

---

असतील तर संभवतो. तेव्हां दाक्षी व प्लाक्षी येथें तीनांपेक्षां ज्यास्त अच् नाहींत. दोनच अच् आहेत म्हणून होत नाहीं.

पण असें असेल तर—

(श्लो. १) उत्तम शब्दामधील तमप् प्रत्यय प्रकर्ष म्ह. अतिशय या अर्थी आहे असें गृहीत धरून दाक्षी शब्दामधील जो पहिला गुरु अकार तो उत्तमाच्या जवळचा नसल्यामुळें ष्यङ् होत नाहीं. पण प्रकर्ष या अर्थाचा हा तमप् प्रत्यय जर असेल तर त्या उत्तम शब्दाहून आम् प्रत्यय (५।४।११) कां केला नाहीं ?

(श्लो. २) येथें गत शब्द उच्चारला नाहीं. उत् याचाच उद्गत असा अर्थ आहे. आणि त्याचाच येथें प्रकर्ष आहे.

तेव्हां येथें उत् या अव्ययाच्या अर्थाचा प्रकर्ष नाहीं तर त्यांतील गम् धातूचा अर्थ जी उच्चारणक्रिया तिचा प्रकर्ष आहे.

उद्गत म्हणजे 'पुढें उच्चारलेला' असें जेव्हां कोणा एखाद्याला म्हणावयाचें असतें तेव्हां त्याच्या मागें कोणी तरी अच् असला पाहिजे अशी अपेक्षा असतेच. अनुद्गताच्या मानानेंच उद्गत असें म्हणतां येतें. आणि जेथें तीन अच् असतील तेथें त्या तिघांतील पुढील दोहोंना उद्गत म्हणतां येतें.

तेव्हां ज्या ठिकाणीं चार पांच वगैरे अच् असतील तेथेंच ष्यङ् प्रत्यय करावा. तेव्हां वाराह्या या उदाहरणामध्यें ष्यङ् प्रत्यय होणार नाहीं.

काय कारण ?

---

३–निदान तीन अच् जेथें आहेत तेथेंच पुढें उच्चारलेले असें विशेषण दुसरा आणि तिसरा या दोन अचांना देतां येतें. कारण त्यांच्या मागें अच् असतो. अतिशय हा त्यांतील तिसऱ्या अचाला संभवतो. तेव्हां दोनच अच् जेथे आहेत तेथें उत्तम म्हणतां येणार नाहीं.

४ उच्चारण--क्रियेच्या प्रकर्षाच्या द्वारानें उच्चारलेल्या वर्णाचा प्रकर्ष होतो. तेव्हां हा द्रव्याचा प्रकर्ष असल्यामुळे आम् प्रत्यय होत नाहीं. कारण त्या आम् सांगणाऱ्या सूत्रामध्ये (५।४।११) अद्रव्यप्रकर्षे असें म्हटल आहे.

५--तेव्हां त्या दोहोंमधील शेवटच्या अचाला फार तर उत्तर असा तरप्--प्रत्ययान्त शब्द लावतां येईल. उत्तम शब्द लावणें झाल्यास निदान चार अच् असले पाहिजेत. म्हणजे पहिला अनुद्गत, दुसरा उद्गत, तिसरा उत्तर आणि चवथा उत्तम असें म्हणतां येईल.

कारणम् । चतुष्प्रभृतीनामभावात् ॥

भिद्यतेऽस्य स्वरस्तेन विधिश्चामो न लक्ष्यते ।

भिद्यते खल्वस्य स्वरस्तेनातिशायिकेन तमशब्देनोत्तमस्य । विधिश्चामो न लक्ष्यते । विधिश्चामो न कचिदपि लक्ष्यते ॥

शब्दान्तरमिदं विद्याद् दृष्टमभ्यन्तरं त्रिषु ॥४॥

एवं तर्ह्यन्योऽयमातिशायिकेन समानार्थस्तमब्रिप्रभृतिषु वर्तते ॥

किं पुनरयमणिञोरादेश आहोस्विदणिञ्भ्यां परः । कश्चात्र विशेषः ।

ष्यङ्यनादेशे यलोपवचनम् ॥ १ ॥

ष्यङ्यनादेशे यलोपो वक्तव्यः । औदमेघ्यायाश्छात्रा औदमेघाः ॥

द्विराण्विधिः ॥ २ ॥

द्विश्चाण्विधेयः । औदमेघ्यायाश्छात्रा औदमेघाः । औदमेघ्यानां संघ औदमेघः । इञ इत्यण्न प्राप्नोति ॥ अस्तु तर्ह्यादेशः ।

आदेशे नलोपवचनम् ॥ ३ ॥

यद्यादेशो नलोपो वक्तव्यः। औडुलोम्या शारलोम्येति । ये चाभावकर्मणोः [ ६.४.१६८ ] इति प्रकृतिभावः प्रसज्येत ॥

न वा ष्यङो लोपनिमित्तत्वात् ॥ ४ ॥

---

कारण असे कीं वाराह्या येथें चार अथवा पांच असे ज्यास्ती अच् नाहींत; फक्त तीनच आहेत.

(श्लो.४) शिवाय, अतिशय या अर्थी होणाऱ्या तमप् प्रत्ययाच्या स्वरापेक्षां ह्या उत्तम शब्दाचा स्वर निराळाच दृष्टीस पडतो. तसेंच ह्या उत्तम शब्दापुढें आम् प्रत्यय झालेला कोठेंही दृष्टीस पडत नाहीं.

तर मग येथील तम हा अतिशय अर्थी सांगितलेल्या तमप् प्रत्ययासारख्या अर्थाचा निराळाच शब्द आहे. आणि तो शब्द कमींत कमी तीन अच् असले तरी तेथें शेवटच्याला लागतो.

पण काय हो ह्या सूत्रानें सांगितलेला ष्यङ् हा अण् आणि इञ् यांचे स्थानीं आदेश होतो, किंवा अण्-प्रत्ययान्त आणि इञ्-प्रत्ययान्त यांच्या पुढें प्रत्यय होतो ?

या दोहोंमध्यें फरक काय बरें होणार आहे ?

(वा. १) ष्यङ् हा जर आदेश केला नाहीं तर औदमेघ्यायाश्छात्राः औदमेघाः[६] येथें ष्यङ् प्रत्ययाच्या यकाराचा लोप सांगितला पाहिजे.

(वा. २) ष्यङ्-प्रत्ययान्ताहून अण् प्रत्यय होतो असें दोन ठिकाणीं विधान केलें पाहिजे. उदा० औदमेघ्यायाश्छात्राः औदमेघाः, औदमेघ्यानां संघः औदमेघः ह्या दोन उदाहरणांमध्यें इञ्-प्रत्ययन्ताहून सांगितलेला अण् प्रत्यय (४।२।११२, ४।३।१२७) होत असतो[७] तो होणार नाहीं.

असें असेल तर मग हा ष्यङ् प्रत्यय अण् आणि इञ् यांचे स्थानीं आदेशच असूं दे.

(वा. ३) ष्यङ् हा जर आदेश असेल तर औडुलोम्या व शारलोम्या येथें अन् याचा लोप सांगितला पाहिजे. नाहीं तर तेथें ये चाभावकर्मणोः (६।४।१६८) यानें प्रकृतिभाव होऊं लागेल.

---

६—उदमेघस्य गोत्रापत्यं स्त्री औदमेघ्या. उदमेघ शब्दाहून केलेल्या इञ्-प्रत्ययाचे (४।१।९५) स्थानीं ष्यङ् झाला म्हणजे तो ष्यङ् प्रत्यय अपत्य या अर्थाचा प्रत्यय होतो; म्हणून पुढें अण् प्रत्यय (४।२।११२) होतो, आणि त्या ष्यङ् प्रत्ययांतील यकाराचा लोप (६।४।१५१) होतो.

७—कारण, इञ् प्रत्ययाचे स्थानीं ष्यङ् हा आदेश झाला म्हणजे स्थानिवद्भावानें (१।१।५६) तो इञ् प्रत्यय आहे असें समजतां येतें.

न वैष दोषः । किं कारणम् । ष्यङो लोपनिमित्तत्वात् । लोपनिमित्तः ष्यङ् । नाकृते लोपे ष्यङ् प्राप्नोति । किं कारणम् । गुरूपोत्तमयोरित्युच्यते न चाकृते लोपे गुरूपोत्तमं भवति ॥

अथवा पुनरस्तु परः । ननु चोक्तं ष्यङ्यनादेशे यलोपवचनं द्विरण्विधिरिति । नैष दोषः । यत्तावदुच्यते यलोपवचनमित्यदोष एषः । किं कारणम् । पुंवद्भावाद्यजादौ तद्धिते । यजादौ तद्धिते पुंवद्भावो भविष्यति भस्याढे तद्धिते पुंवद्भवतीति ॥ अयं तर्हि दोषो द्विरण्विधिरिति । नैष दोषः । सिद्धश्च प्रत्ययविधौ । स च सिद्धः प्रत्ययविधौ ॥

उभयमिदमुक्तमादेशः पर इति च । किमत्र न्याय्यम् । आदेश इत्येतन्न्याय्यम् । कुत एतत् । एवं चैव हि कृत्वाचार्येण सूत्रं पठितं षष्ठ्या च निर्देशः कृतः । अत एष पक्षो निर्दोषः । ननु च परस्मिन्नपि सति ये दोषास्ते परिहृताः । पुंवद्भावेन यलोपः

(वा. ४) अथवा हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं तेथें लोप हा ष्यङ् प्रत्ययाचें निमित्तच आहे. तेथें अन् याचा लोप जर झाला नाहीं तर ष्यङ् प्रत्ययाची प्राप्तीच येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं येथें गुरूपोत्तमयोः असें म्हटलें आहे, आणि औडुलोम्या व शारलोम्या येथें गुरु वर्ण जो ओकार तो अन् याचा लोप झाल्यानंतरच्च उपोत्तम होणार आहे. तेव्हां अन् याचा लोप झाला नाहीं तोंपर्यंत औडुलोम इन् येथें उपोत्तम म्ह. अन्त्य इकाराच्या जवळचा अकार हा गुरु नाहीं.

अथवा येथें ष्यङ् हा आदेश न होतां पुढें होणारा प्रत्ययच असूं दे.

पण आदेश न केला तर 'यकाराचा लोप सांगितला पाहिजे, आणि दोन ठिकाणीं अण् प्रत्ययाचें विधान केलें पाहिजे' असें म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. औदमेध्यायाश्छात्राः औदमेघाः येथें यकाराचा लोप होणार नाहीं असा जो दोष दिला आहे तो तर येत नाहींच ?

काय कारण ?

कारण असें कीं यकारादि किंवा अजादि तद्धित प्रत्यय पुढें असतांना पुंवद्भाव होत असतो. भस्याढे तद्धिते ( ६।३।३५ वा. ११ ) यानें पुंवद्भाव होऊन औदमेध्या या ष्यङ्-प्रत्ययान्ताला पुंलिंगासारखें औदमेधि असें रूप प्राप्त होतें.

तर मग अण् प्रत्ययाचें दोन ठिकाणीं विधान केलें पाहिजे हा तर दोष आहे ना ?

हाही दोष येत नाहीं. कारण तो पुंवद्भाव अण् हा तद्धित प्रत्यय करण्याचे पूर्वीच होत आहे[८].

येथें ष्यङ् हा आदेश करणें, आणि पुढें प्रत्यय करणें असे दोन पक्ष सांगितले आहेत, पण त्यांमध्यें कोणता पक्ष घेणें न्याय्य आहे ?

आदेशपक्ष हाच न्याय्य पक्ष होय. आदेश मनांत धरूनच आचार्यांनीं हें सूत्र केलें आहे. कारण, 'अणिञोः' असें षष्ठ्यन्त पद येथें उच्चारलें आहे. तेव्हां हाच पक्ष निर्दुष्ट समजला पाहिजे.

पण प्रत्ययपक्षावरही आलेले दोष दूर केलेच आहेत ना ?

दूर केले आहेत खरे, पण सर्वथा दूर होत नाहींत. यलोपाचा दोष पुंवद्भावानें घाल-

८—'भस्याढे०' यानें तद्धित प्रत्ययाची विवक्षा असतांना अगोदरच पुंवद्भाव सांगितला आहे.

ऽन्यः। ञ्नितीत्याद्युदात्तत्वं मा भूदितोऽन्त दात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यादिति ॥ तथापि तर्हि ष्यङोक्तत्वात्स्त्री- त्वस्य टाप्न प्राप्नोति ॥ नैष दोषः ।

उक्तेऽपि हि भवन्त्येते ।

उक्तेऽपि तु स्त्रीत्वे भवन्त्येते टाबादयः । कमेतत्स्वार्थिकाष्टाबादय इति ॥ ममापि र्हि सानुबन्धकस्यादेश इत्कार्यं नेति ॥

तेन चिन्न भविष्यति ॥ ५ ॥

स्थानिवत्त्वे दोषस्ते वृद्धिरत्र न सिध्यति ।

अस्थानिवत्त्वे दोषो वृद्धिस्ते न प्राप्नोति । औडुलोम्या शारलोम्येति । न चेदानीमर्ध- जरतीयं लभ्यं वृद्धिर्मे भविष्यति स्वरो नेति । तद्यथा । अर्धं जरत्याः कामयते ऽर्धं नेति ॥

त्वयाप्यत्र विशेषार्थं कर्तव्यं स्याद्विशेष- णम् ॥ ६ ॥

त्वयाप्यत्र विशेषणार्थोऽनुबन्धः कर्तव्यः क विशेषणार्थेनार्थः । ष्यङः संप्रसारण- मिति ॥

---

तर मग आदेशपक्ष घेणाऱ्या तुझ्या मतीं टाप्ना इत्यादि ठिकाणीं अन्तोदात्त स्वर ग्याकरितां चाप् प्रत्यय सांगितला पाहिजे. हीं तर इञ् या ञित् प्रत्ययाचे स्थानीं ङ् आदेश झाल्यामुळें 'ञ्नित्यादि०' ।१।१९७) यानें आद्युदात्त होईल. तो झाला पाहिजे; आणि चित् प्रत्यय अन्तो- त होतो (६।१।१६३) तो अन्तोदात्त ला पाहिजे.

पण प्रत्ययपक्ष घेणाऱ्या तुझ्या मतींही ङ् प्रत्ययानें स्त्रीत्व उक्त असल्यामुळें पुनः अर्थी टाप् प्रत्यय होणार नाहीं. म्हणून चाप् प्रत्यय सांगितलाच पाहिजे.

हा दोष येत नाहीं. पुनः स्त्रीप्रत्यय याकरितां कांहीं चाप् सांगावयास नको. स्त्रीत्व हा अर्थ उक्त असला तरी पुनः वगैरे प्रत्यय होतातच. कारण टाप् रे प्रत्यय स्वार्थी होतात असें मागें ।१।३ वा. ५ ) सांगितलेंच आहे.

तर मग आदेश मानणाऱ्या माझ्या मतींही आदेश इञ् या अनुबंधसहिताला सांगि- त आहे. आणि अनुबंधसहिताला आदेश गेतला असेल तेथें स्थानीच्या अनुबंधाचें कार्य आदेश झाल्यावर होत नाहीं असें मागें (२।४।४९ वा. २) सांगितलेंच आहे.

त्यामुळें ष्यङ् आदेश ङित् समजला जाणार नाहीं.

(श्लो.६) पण जर स्थानीच्या अनुबंधाचें कार्य आदेश झाल्यावर होत नाहीं तर तुझ्या मतीं वृद्धी-(७।२।११७) ही होणार नाहीं. उदा० औडुलोम्या, शारलोम्या. आणि 'स्थानीचें कार्य आदेशाला वृद्धी तेवढी मला करतां येईल आणि स्वर मात्र मी करणार नाहीं' असें अर्धवट तुला कसें म्हणतां येईल? लोका- मध्येंही 'स्त्री म्हातारी झाली कीं तिच्या मुखाची तेवढी इच्छा करीत नाहींत आणि इतर भागाची इच्छा करतात' असें कधींहि होत नाहीं.

प्रत्ययपक्ष घेणाऱ्या तुझ्या मतींही षका- रेत्संज्ञक तसेंच ङकारेत्संज्ञक असें विशेषण लागण्याकरितां ष्यङ् प्रत्ययाला अनुबंध जोड- लेच पाहिजेत.

असें विशेषण लावल्यामुळें कोठें बरें उपयोग होत आहे.

'ष्यङः संप्रसारणम्०' (६।१।१३) येथें उपयोग होत आहे[13].

---

१२—प्रत्ययपक्ष घेतला असतां ष्यङ् प्रत्ययाच्या नें—(३।१।३)च वारा्या येथें अन्तोदात्त सिद्ध ो.

१३—आम्बष्ठ्यापुत्रः येथें ष्यङ् प्रत्यय ( ४।१। १७१ ) झाला असतां तेथें संप्रसारण होत नाहीं. कारण, ष्यङः असें तेथें षकारेत्संज्ञकाचें उच्चारण केलें आहे.

**अक्रियैव विशेषोऽत्र सानुबन्धो विशेषवान् ।**

अक्रियैव मम विशेषः सानुबन्धस्तु विशेषवान् ॥

**पाश्यायां ते कथं न स्यात्**

पाश्यापुत्र इत्यत्र कस्मान्न भवति ॥

**एको मे स्याद्विशेषणम् ॥ ७ ॥**

एको मम विशेषणार्थः । त्वया पुनर्द्वौ कर्तव्यौ ॥ अथैकस्मिन्नपि सति कः करिष्यते । किं चातः ।

**अन्यस्मिन्सूत्रभेदः स्यात्**

यद्येताभ्यामन्यः क्रियते सूत्रभेदः कृतो भवति ॥

**षिति लिङ्गं प्रसज्यते ।**

अथ षित्क्रियते षित इतीकारः प्राप्नोति॥

**ङिति चेक्रीयिते दोषः**

अथ ङित्क्रियते चेक्रीयिते दोषो भवति । लोलूयापुत्रः लोलूयापतिरिति ॥

**व्यवधानान्न दुष्यति ॥ ८ ॥**

अकारेण व्यवहितत्वान्न दोषो भवति ॥

**योऽनन्तरो न धातुः सः**

धातोरिति वर्तते यश्चात्रानन्तरो नासौ

---

(श्लो ७) पण येथें कांहीं एक अनुबंध न लावणें हाच विशेष मला समजतां येईल[१४]. आणि ज्याला अनुबंध जोडले आहेत तो अर्थातच ह्यापेक्षां निराळा समजला जाईल.

तसें केलें तर तुझ्या मतीं पाश्यापुत्रः[१५] येथें संप्रसारण कां बरें होणार नाहीं ?

प्रत्ययपक्ष घेणाऱ्या माझ्या मतीं विशेषणार्थ एक अनुबन्ध लावला म्हणजे काम होईल. पण आदेशपक्ष घेणाऱ्या तुझ्या मतीं मात्र यङश्चाप् येथें सामान्य-ग्रहणाकरितां दोन्ही अनुबंध जोडले पाहिजेत.

पण आतां एका अनुबंधानें काम भागेल म्हणतोस तो एक अनुबंध कोणता बरें लावतोस? कोणताही लावला तरी काय फरक होईल ?

(श्लो.८) षकार आणि ङकार या दोघांपेक्षां निराळाच कोणता तरी लावशील तर सूत्रभेद होईल.

जर षकार लावशील तर त्याच्या पुढें स्त्रीप्रत्यय ङीप् ( ४।१।४१ ) होऊं लागेल[१६].

आतां ङकारच एकटा अनुबंध लावला तर लोलूयापुत्रः व लोलूयापतिः येथें यङ्—प्रत्यान्त स्थलीं दोष येतो.

लोलूयापुत्रः येथें यङ्-प्रत्ययान्त आणि पुत्र शब्द यांच्यामध्यें अकारानें व्यवधान असल्यामुळें संप्रसारण होत नाहीं म्हणून दोष नाहीं[१७].

(श्लो.९)ष्यङः संप्रसारणम्० येथें धातोः याची अनुवृत्ति आहे. आतां कौमुदगन्धीपुत्रः इत्यादि ठिकाणीं पुत्र शब्दाच्या मागें अव्यवहित जो

---

१४—प्रकृत सूत्रामध्यें नुसता य असाच उच्चारावा आणि 'ष्यङः संप्रसारणं०' येथेंहीं षकार व ङकार काढून य एवढाच उच्चारावा म्हणजे तेथें याचेंच ग्रहण होईल; ष्यङ् या प्रत्ययाला अनुबंध असल्यामुळें त्याचें ग्रहण होणार नाहीं.

१५—पाशानां समूहः पाश्या. पाश शब्दाहून य प्रत्यय (४।२।४९) झाला आहे.

१६—प्रत्ययपक्ष घेणाऱ्याच्या मतीं यङश्चाप् येथें ष्य प्रत्ययाचें ग्रहण होत नाहीं;. तेव्हां चाप् प्रत्ययानें ङीष् प्रत्ययाचा बाध होईल असें म्हणतां येत नाहीं. आदेशपक्ष घेणाऱ्यानें दोन्ही अनुबंध ठेवले असल्यामुळें चाप प्रत्यय प्राप्त होतो. तेव्हां त्यानें ङीष प्रत्ययाचा बाध होईल.

१७—लोलूय या यङ्—प्रत्ययान्त लू धातूहून अ प्रत्यय ( ३।३।१०२ ), यङाच्या अकाराचा लोप (६।४।४८), टाप् व पुढें पुत्र शब्दाबरोबर समास झाला आहे. येथें यङ् प्रत्ययाच्या अकाराचा पुढील अकाराशीं एकादेश झालेला नाहीं. कारण, यङ् प्रत्ययापैकीं फक्त यकार हें व्यञ्जनच उरलें आहे. तेव्हां पुढें जो अ प्रत्यय आणि टाप् यांचा एकादेश झाला आहे त्या अकारानें व्यवधान येत आहे.

१८—'आदेच उपदेशे०' (६।१।४५) येथें 'लिटि धातोः.' (६।१।८) या सूत्रांतून धातोः या पदाची अनुवृत्ति गोम्याम् येथें आत्व न होण्याकरितां केली आहे.

धातुः ।

यो धातुः सोऽनन्तरः ।
यश्च धातुर्नासावनन्तरः ।
न चेदुभयतः साम्यमुभयत्र प्रसज्यते ॥ ९ ॥

न चेदुभयतः साम्यमुभयत्र प्राप्नोति ॥ यदि पुनर्यङा धातुर्विशेष्येत ।

यङा विशेष्येत यदीह धातु-
र्यङ् धातुना वा यदि तुल्यमेतत् ।

यद्येव यङा धातुर्विशेष्यते ऽथापि धातुना यङ् तुल्यमेतद्भवति ॥

उभौ प्रधानं यदि नात्र दोषः

अथोभौ प्रधानं भवतो नात्र दोषो भवति ॥

तथा प्रसार्येत तु वाक्पतिस्ते ॥ १० ॥

तथा सति वाक्पतिः वाक्पुत्र इत्यत्र प्रसारणं प्राप्नोति ॥

धातुप्रकरणस्येह न स्थानमिति निश्चयः ।

धातुप्रकरणस्येह स्थानं नास्तीति कृत्वैष निश्चयः क्रियते ॥ अवश्यमात्त्वार्थं धातुग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । गोभ्याम् गोभिः नौभ्याम् नौभिः ॥

आत्त्वार्थं यदि कर्तव्यं तत्रैवैतत्करिष्यते ॥ ११ ॥

उपदेशे यदेजन्तं तस्य चेदात्त्वमिष्यते ।
उद्देशो रूढिशब्दानां तेन गोर्न भविष्यति ॥ १२ ॥

एष तर्ह्युपदेश इत्युच्यत उद्देशश्च प्रातिपदिकानां नोपदेशः ॥

---

आहे तो यङन्त धातु नव्हे. आणि लोलूया येथें जो लोलूय् हा यङन्त धातु आहे तो पुत्र शब्दाच्या मागें अव्यवहित नाहीं आणि अशा रीतीनें दोन्ही गोष्टी दोन्ही ठिकाणीं जुळत नाहींत म्हणून सूत्रसामर्थ्यास्तव संप्रसारण होईल तें दोन्ही ठिकाणीं होऊं लागेल.

पण जर येथें यङ् हें धातूचें विशेषण केलें तर—

(श्लो. १०) आतां येथें यङ् हें धातूचें विशेषण करून यङन्त धातु असा अर्थ केला काय आणि धातु हें यङाचें विशेषण करून धातूचा अवयव जो यङ् असा अर्थ केला काय वरील अडचण सारखीच.

पण जर त्या दोहोंचा संबंध न करतां दोन्हीही स्वतन्त्र मानले तर मात्र लोलूयापुत्रः येथें दोष येणार नाहीं.

परंतु वाक्पुत्रः व वाक्पतिः येथें संप्रसारण होऊं लागेल हा[१९] दोष येतो.

(श्लो. ११) ङकार या एकाच अनुबंधानें काम भागेल असें जें आम्ही प्रत्ययपक्षवादी म्हणतों तें ष्यङः संप्रसारणम्० येथें धातुग्रहणाचा संभवच नाहीं असें समजूनच म्हणत आहों.

पण गोभ्याम् गोभिः नौभ्याम् नौभिः येथें आत्व ( ६।१।४५ ) न होण्याकरितां 'धातोः' असें त्या प्रकरणामध्यें म्हटलेंच पाहिजे ना ?

गोभ्याम् वगैरे ठिकाणीं आत्व न होण्याकरितां जर धातुग्रहणाची जरूर असेल तर त्या आत्व सांगणाऱ्या सूत्रामध्येंच धातुग्रहण करावें.

(श्लोक १२) शिवाय उपदेशीं जें एजन्त त्याला जर तें आत्व सांगितलें आहे तर गोभ्याम् वगैरे ठिकाणीं आत्वाचें नांवच काढावयास

---

तेव्हां अर्थातच 'ष्यङः संप्रसारणम्०' ( ६।१।१३ ) या मधल्या सूत्रामध्यें धातोः याची अनुवृत्ति होणारच. परंतु ष्यङ्—प्रत्ययान्त धातु कोठेंच नसल्यामुळें त्याचा संबंध होत नाहीं. आतां जर ष्यङः याच्या ऐवजीं यङः असें केलें तर यङ्-प्रत्ययान्त धातु संभवत असल्यामुळें तेथें धातोः याचा संबंध होणारच. तेव्हां पुत्र व पति शब्द पुढें असतांना अव्यवहित जो यङ्—प्रत्ययान्त धातु असा अर्थ होईल.

१९—पुत्र व पति शब्द पुढें असतांना अव्यवहित अशा यङ्—प्रत्ययान्ताला आणि धातूला संप्रसारण होतें असा अर्थ होईल आणि लोलूयापुत्रः येथें अकारानें व्यवधान असल्यामुळें होणार नाहीं. पण जसें कौमुदगन्ध्यापुत्रः येथें अव्यवहित यङन्त असल्यामुळें संप्रसारण होतें तसें वाक्पतिः येथें वाक् हा अव्यवहित वच् धातु असल्यामुळें तेथें संप्रसारण होऊं लागेल हा दोष येतो.

**गोत्रावयवात् ॥ ४।१।७९ ॥**

किमर्थमिदमुच्यते । गोत्रावयवादगोत्रार्थम् । गोत्रावयवादित्युच्यते ऽगोत्रार्थोऽयमारम्भः ।

**गोत्रावयवादगोत्रार्थमिति चेत्तदनिष्टम् ॥ १ ॥**

गोत्रावयवादगोत्रार्थमिति चेत्तदनिष्टं प्राप्नोति । इहापि प्राप्नोति । आहिच्छत्त्री कान्यकुब्जीति ॥ एवं तर्हि गोत्रादेव गोत्रावयवात् ।

**गोत्रादिति चेद्वचनानर्थक्यम् ॥ २ ॥**

गोत्रादिति चेद्वचनमनर्थकम् । सिद्धं गोत्रे पूर्वेणैव ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । गुरूपोत्तमयोरित्युच्यते ऽगुरूपोत्तमार्थोऽयमारम्भः ।

**अगुरूपोत्तमार्थमिति चेत्सर्वेषामवयवत्वात्सर्वप्रसङ्गः ॥ ३ ॥**

अगुरूपोत्तमार्थमिति चेत्सर्वेषामवयव-

---

नको. कारण गो वगैरे रूढि-शब्द असले तरी त्यांचा उद्देश आहे, उपदेश नाही. तेव्हां अर्थांतच गो वगैरे शब्दांना आत्व होणार नाहींच.

(सू. ७९) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

गोत्रावयवात् एवढेंच येथें म्हटलें आहे तेव्हां तो जो गोत्रावयव म्हणजे प्रसिद्ध गोत्र नसून त्या सारख्या अर्थाचा जो शब्द त्याच्या पुढील अण् व इञ् प्रत्यय गोत्रापत्य या अर्थी नसले तरी ष्यङ् तेथें होण्याकरितां हें सूत्र केलें आहे.

(वा. १) गोत्रावयव शब्दाच्या पुढील अण् व इञ् प्रत्यय गोत्रापत्य या अर्थी नसेल तरी तेथें ष्यङ् होण्याकरितां हें सूत्र केलें असेल तर आहिच्छत्री कान्यकुब्जी वगैरे ठिकाणीं ष्यङ् होऊं लागेल; आणि तो तर तेथें इष्ट नाहीं.

तर मग गोत्रावयव शब्दाच्या पुढील गोत्रापत्य या अर्थी केलेलेच अण् व इञ् प्रत्यय पाहिजेत असेंच असूं दे.

(वा. २) गोत्रापत्य या अर्थी केलेलेच अण् व इञ् प्रत्यय येथें अपेक्षित असतील तर हें सूत्रच मुळीं व्यर्थ होईल. कारण गोत्रापत्य हा अर्थ असेल तर पूर्व सूत्रानेंच ष्यङ् होईल.

तर मग आतां ह्या सूत्राचा उपयोग असा कीं अण् व इञ् प्रत्ययांच्या मागील अच् गुरु असला पाहिजे असें पूर्व सूत्रामध्यें म्हटलें आहे. तेव्हा जेथें अण् व इञ् प्रत्ययाच्या मागील अच् गुरु नसेल त्या ठिकाणीं ष्यङ् होण्याकरितां हें सूत्र केलें आहे.

(वा. ३) अण् व इञ् प्रत्ययांच्या मागील

---

२०—'प्रत्यक्षमाख्यानम् उपदेशः' आणि 'गुणैः प्रापणम् उद्देशः' अशीं या शब्दांचीं लक्षणे आहेत. भू, एध्, स्पर्ध् हें प्रत्यक्ष आख्यान होय. तें त्या धातूंचें स्वरूपज्ञान होण्याकरितांच केलें आहे. तसें प्रातिपदिकांचें प्रत्यक्ष आख्यान कोठें नाहीं. सर्वादि गणामध्यें सर्व, विश्व वगैरे प्रातिपदिकें प्रत्यक्ष उच्चारलीं आहेत तीं त्यांचें स्वरूपज्ञान होण्याकरितां उच्चारलीं नाहींत तर त्यांचीं स्वरूपें सिद्ध आहेत असें गृहीत धरून त्यांना सर्वनाम संज्ञा होण्याकरितां फक्त तेथें त्यांचा अनुवाद केला आहे. प्रातिपदिकांच्या स्वरूपाचें ज्ञान, प्रातिपदिकांचें स्वरूप प्रत्यक्ष न उच्चारतां धातूहून कृत् प्रत्यय सांगणें तसेंच प्रातिपदिकाहून तद्धित प्रत्यय सांगणें किंवा समास सांगणें अशा उपायांनीं आचार्यांनीं करून दिलें आहे. हेंच गुणैः प्रापणं होय.

१(सू. ७९)—गोत्र म्हणजे प्रवराध्याय—प्रसिद्ध गोत्र. त्याचे अवयव म्ह.प्रत्यक्ष ते नव्हेत तरी पण त्यांपैकींच त्या सारखे समजले जाणारे. उदा०-एकादा पुरुष सदाचारसंपन्न, ज्ञानी व कर्ता असेल तर त्याच्या नांवानेंच त्याचें कुल लोकामध्यें प्रसिद्धीला आलेलें असतें. कुणिक मुणिक वगैरे पुरुष तसे होत. तशा शब्दाहून गोत्रापत्य या अर्थी केलेल्या अण् किंवा इञ् प्रत्ययाचे स्थानीं स्त्रीत्व—विवक्षा असतांना ष्यङ् आदेश होतो. पुणिकस्य गोत्रापत्यं स्त्री पौणिक्या. येथें अन्त्य वर्णाच्या जवळचा इकार हा गुरु नसल्यामुळें ष्यङ् होत नाहीं

२—अहिच्छत्र व कान्यकुब्ज या शब्दांहून तत्र जाता या अर्थी अण् प्रत्यय ( ४।३।२५ ) झाला आहे.

त्वात्सर्वत्र प्राप्नोति । अष्टाशीतिः सहस्राण्यूर्ध्वरेतसामृषीणां बभूवुस्तत्रागस्त्याष्टमैः ऋषिभिः प्रजनोऽभ्युपगतः । तत्रभवतां यदपत्यं तानि गोत्राणि । अतो ऽन्ये गोत्रावयवाः । तत उत्पत्तिः प्राप्नोति तच्चानिष्टम् । तस्मान्नार्थोऽनेन योगेन ॥ कथं येभ्यो ऽगुरूपोत्तमेभ्य इष्यते ।

**सिद्धं तु रौढ्यादिषूपसंख्यानात् ॥ ४ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । रौढ्यादिषूपसंख्यानात् । रौढ्यादिषूपसंख्यानं कर्तव्यम् । के पुना रौढ्यादयः । ये क्रौड्यादयः ॥

भारद्वाजीयाः पठन्ति । सिद्धं तु कुलाख्याभ्यो लोके गोत्राभिमताभ्य इति । सिद्धमेतत् । कथम् । कुलाख्या लोके गोत्रावयवा इत्युच्यन्ते ॥

अथवा गोत्रावयवः को भवितुमर्हति । यो गोत्रादवयुतः । कश्च गोत्रादवयुतः । योऽनन्तरः । दैवदत्त्या याज्ञदत्त्येति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये चतुर्थस्याध्यायस्य प्रथमे पादे द्वितीयमाह्निकम् ॥

---

अच् गुरु नसेल त्या ठिकाणीं ष्यङ् होण्याकरितां हें सूत्र केलें असेल तर सर्वच गोत्रावयव असल्यामुळें सर्वत्र ष्यङ् होऊ लागेल. असें पहा कीं ऊर्ध्वरेतस्[३] म्हणजे जितेन्द्रिय असे अठ्याऐंशी हजार ऋषि झाले. त्यांपैकीं कश्यप वगैरे सात आणि अगस्त्य आठवा एवढ्यांनींच प्रजनाचा[४] स्वीकार केला. त्या आठ ऋषींच्या अपत्यालाच गोत्र म्हणतात. तेव्हां त्याशिवाय ते सर्वच गोत्रावयव होत. तेव्हां त्या सर्वच शब्दांहून ष्यङ् होऊं लागेल आणि तो तर इष्ट नाहीं. तेव्हां एकंदरीत प्रकृत सूत्र करण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

पण हें सूत्र केलें नाहीं तर अण् व इञ् प्रत्ययांच्या मागील अच्[५] गुरु नाहीं अशा पुणिक वगैरे ज्या शब्दांहून ष्यङ् इष्ट आहे त्यांची वाट काय ?

( वा. ४ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं त्या पुणिक वगैरे शब्दांचें रौढ्यादि गणामध्यें उपसंख्यान करावें म्हणजे झालें.

पण रौढ्यादि गण हा कोणत्या सूत्रामध्यें बरें निर्दिष्ट केला आहे ?

पुढील सूत्रामध्यें जो क्रौड्यादि गण निर्दिष्ट केला आहे तेथील जे क्रौड्यादि शब्द तेच रौढ्यादिक शब्द होत. येथें भारद्वाजीय वैयाकरण म्हणतात "सिद्धं तु कुलाख्याभ्यो लोके गोत्राभिमताभ्यः" म्हणजे 'सिद्ध होत आहे, तें कसें तर कुलाला जें नांव पडतें तें लोकामध्यें गोत्रासारखें मान्य असल्यामुळें त्यालाच गोत्रावयव म्हणतात.' अथवा गोत्रावयव म्हणण्याला तोच योग्य होतो कीं जो गोत्रांतून बाहेर पडतो.

कोण बरें गोत्रांतून बाहेर पडतो ?

जो साक्षात् अपत्य असेल[६] तो. जसें देवदत्तस्यापत्यं स्त्री दैवदत्त्या. देवदत्ताची साक्षात् मुलगी. यज्ञदत्तस्य अपत्यं स्त्री याज्ञदत्त्या.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या चवथ्या अध्यायाच्या पहिल्या पादाचें दुसरें आन्हिक समाप्त झालें.

---

३—संतति होणें किंवा न होणें ही गोष्ट ज्यांच्या ताब्यांत आहे अशांना ऊर्ध्वरेतस् म्हणतात.

४—योग्य कालीं प्रजोत्पादन करणें याला प्रजन म्हणतात.

५—तेव्हां प्रकृत सूत्र करावें आणि पुणिक भुणिक वगैरे जे गोत्रावयव—वाचकशब्द त्यांहूनच ष्यङ् प्रत्यय करावा.

६—कारण, गोत्र हें नांव पौत्रापासून पुढच्याला आहे ( ४।१।१६२ ).

अध्याय ४ पाद १ आह्निक २ समाप्त.

[ क्रौड्यादिभ्यश्च ॥ ४।१।८० ॥ ]

[ दैवयज्ञिशौचिवृक्षिसात्यमुग्रिकाण्ठेविद्धिभ्योऽन्यतरस्याम् ॥ ४।१।८१ ॥ ]

समर्थानां प्रथमाद्वा ॥ ४।१।८२ ॥

समर्थवचनं किमर्थम् । समर्थादुत्पत्तिर्यथा स्यात् । उपगोरपत्यम् । असमर्थान्मा भूदिति । कम्बल उपगोरपत्यं देवदत्तस्येति ।

समर्थवचनमनर्थकं न ह्यसमर्थेनार्थाभिधानम् ॥ १ ॥

समर्थवचनमनर्थकम् । किं कारणम् । न ह्यसमर्थेनार्थाभिधानम् । न ह्यसमर्थादुत्पद्यमानेन प्रत्ययेनार्थाभिधानं स्यात् । अनभिधानात्तत्र उत्पत्तिर्न भविष्यति ॥

अथ प्रथमवचनं किमर्थम् । प्रथमवचनं प्रकृतिविशेषणार्थम् । प्रथमात्प्रत्ययोत्पत्तिर्यथा स्यादप्रथमान्मा भूत् । उपगोरपत्यमित्यपत्यशब्दात् ।

---

• (सू. ८२) येथें समर्थग्रहण कशाकरितां केलें आहे?

उपगूचें अपत्य अशा अर्थाची विवक्षा असतांना उपगु या समर्थ शब्दाहूनच प्रत्यय झाला पाहिजे. कांबळें उपगूचें अपत्य देवदत्ताचें अशा अर्थाची विवक्षा असतांना केवळ 'उपगूचें अपत्य' हे शब्द जवळ असल्यामुळें उपगु शब्दाहून प्रत्यय न झाला पाहिजे.

(वा. १) येथें समर्थ-ग्रहणाचा कांहीं उपयोग दिसत नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं ज्याचा प्रत्ययार्थाशीं अन्वय नाहीं अशा शब्दाच्या पुढें प्रत्यय केला तर त्या प्रत्ययान्त शब्दापासून अर्थाचें अभिधान होणें शक्यच नाही. तेव्हां अनभिधानामुळेंच तशा ठिकाणीं प्रत्यय होणार नाहीं.

आतां प्रथमात् असें येथें कशाकरितां म्हटलें आहे?

कोणत्या शब्दाच्या पुढें प्रत्यय करावा तें समजण्याकरितां म्हटलें आहे. कारण, तस्य आणि अपत्यम् या दोन शब्दांमध्यें तस्य हें प्रथमतः उच्चारलें असल्यामुळें त्याहूनच प्रत्यय होतो असें समजण्याकरितां तें केलें आहे. अपत्यय हा शब्द मागून उच्चारला असल्यामुळें उपगूचें अपत्य असा अर्थ विवक्षित असतांना अपत्यवाचक शब्दाहून प्रत्यय न झाला पाहिजे.

---

१(सू. ८०)—क्रौडि व्याडि वगैरे क्रौड्यादिगणांतील शब्दांहून स्त्रीत्व-विवक्षा असतांना ष्यङ् प्रत्यय होतो. उदा०—क्रौड्या, व्याड्या.

(सू. ८१)—दैवयज्ञि, शौचिवृक्षि, सात्यमुग्रि आणि काण्ठेविद्धि या शब्दाहून स्त्रीत्व-विविक्षा असतांना ष्यङ् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०-दैवयज्ञ्या, दैवयज्ञी. येथें देवयज्ञ शब्दाहून इञ् प्रत्यय (४।१।९५) केला आहे. तो गोत्राप्रत्य या अर्थी केला तर अणिञोः० (४।१।७८) यानें नित्य ष्यङ् प्राप्त होतो, आणि साक्षात् अपत्य या अर्थी केला तर मुळींच ष्यङ् प्रत्यय प्राप्त होत नाहीं. त्या दोन्हीं ठिकाणीं प्रकृत सूत्रानें विकल्प प्राप्त होतो. असेंच इतर तीन शब्दांविषयीं समजावें.

१(सू. ८२)—हें अधिकारसूत्र आहे. समर्थ म्हणजे अर्थ प्रतिपादन करण्याच्या कामीं समर्थ म्ह. संधिकार्य वगैरे होऊन तयार झालेला शब्द. प्रथम म्ह. सूत्रामध्यें अर्थनिर्देश करतांना प्रथमतः उच्चारलेला शब्द. तस्य अपत्यम् (४।१।९२) ह्या दोन शब्दांनीं प्रत्ययाच्या अर्थाचा निर्देश केला आहे. त्यांमध्यें तस्य हें पद प्रथमतः उच्चारलें आहे. म्हणून उपगूचें अपत्य या अर्थी उपगु शब्दाहून प्रत्यय होतो. कारण तस्य या शब्दानें उपगूच गृहीत धरला आहे. जर हा उपगु अपत्य शब्दानें गृहीत धरला तर 'उपगुः अपत्यं तस्य' असें वाक्यच राहतें.

२—प्रत्ययार्थाशीं अन्वय पावलेले असा समर्थ शब्दाचा अर्थ गृहीत धरून हा विचार केला आहे.

३—उपगूचें अपत्य भानु अशा त्या दोहोंमध्यें असलेला संबंध 'उपगोः अपत्यम् औपगवः भानुः' अशा औपगव शब्दापासूनच प्रतीत झाला पाहिजे. 'भानुः अपत्यं तस्य मानवः उपगुः' अशा मानव शब्दापासून तो संबंध प्रतीत न झाला पाहिजे.

**प्रथमवचनमनर्थकं न ह्यप्रथमेनार्थाभिधानम् ॥ २ ॥**

प्रथमवचनमनर्थकम् । किं कारणम् । न ह्यप्रथमेनार्थाभिधानम् । न ह्यप्रथमादुत्पद्यमानेन प्रत्ययेनार्थाभिधानं स्यात् । अनाभिधानात्तत उत्पत्तिर्न भविष्यति ॥

अथ वावचनं किमर्थम् । वाक्यमपि यथा स्यात् । उपगोरपत्यमिति ।

**वावचने चोक्तम् ॥ ३ ॥**

किमुक्तम् । तत्र तावदुक्तं वावचनानर्थक्यं च तत्र नित्यत्वात्सन इति । इहापि वावचनमनर्थकम् । किं कारणम् । तत्र नित्यत्वात्प्रत्ययस्य। इह द्वौ पक्षौ वृत्तिपक्षश्चावृत्तिपक्षश्च । स्वभावतश्चैतद्भवति वाक्यं च वृत्तिश्च । तत्र स्वाभाविके वृत्तिविषये नित्ये प्रत्यये प्राप्ते वावचनेन किमन्यच्छक्यमभिसंबन्द्धुमन्यदतः संज्ञायाः । न च संज्ञाया भावाभावाविष्येते । तस्मान्नार्थो वावचनेन ॥

अथैतत्समर्थग्रहणं नैव कर्तव्यम् । कर्तव्यं च । किं प्रयोजनम् । समर्थादुत्पत्तिर्यथा स्यादसमर्थान्मा भूत् । किं पुनः

(वा. २) येथें 'प्रथमात्' याचा कांहीं उपयोग दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं जें पद अर्थनिर्देश करतांना प्रथमतः उच्चारलेलें नाहीं त्याच्या पुढें प्रत्यय केला तर त्या प्रत्ययान्त शब्दापासून अर्थाचें अभिधान होणें शक्यच नाहीं. तेव्हां अनभिधानामुळेंच तशा अर्थी प्रत्यय होणार नाहीं.

आतां येथें वा शब्द कशाकरितां घातला आहे ?

प्रत्यय न होतां त्या अर्थाचें वाक्यही एकदां राहिलें पाहिजे म्हणून घातला आहे. उदा० उपगोः अपत्यम्.

(वा. ३) वा शब्दासंबंधानें मागें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

वावचनानर्थक्यं च तत्र नित्यत्वात्सनः (३।१।७ वा. ९) असें मागें सांगितलेंच आहे. येथेंही वा शब्दाचा कांहीं उपयोग दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं वृत्तीमध्यें प्रत्यय नित्यच इष्ट आहे. तें असें:—वृत्तिपक्ष आणि अवृत्तिपक्ष असे दोन पक्ष आहेत. वाक्य आणि वृत्ति या दोन गोष्टी स्वभावतःच होतात. त्यांत वृत्तिपक्ष घेतला असतां तेथें प्रत्यय हा स्वभावतःच नित्य होतो. म्हणून तेथें 'वा' या शब्दाचा संबंध कोणीकडे करावा असा विचार उत्पन्न झाला असतां त्या प्रत्ययाला होणारी जी प्रत्यय संज्ञा तिला सोडून दुसरे कोणीकडे बरें त्या 'वा' शब्दाचा संबंध करणें शक्य होईल ? आणि ती संज्ञा तर एकदां करणें आणि एकदां न करणें असें मुळींच इष्ट नाहीं. तात्पर्य, येथें वा शब्दाचा उपयोग नाहीं. असो.

आतां येथें पूर्वी सांगितल्याप्रमाणें समर्थग्रहण करूं नयेच कीं काय ?

असें नाहीं. येथें समर्थग्रहण करावें.

त्याचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं जें समर्थ प्रातिपदिक असेल त्याहून प्रत्यय झाला पाहिजे; समर्थ नसेल त्याहून न झाला पाहिजे.

मग समर्थ म्हणजे काय समजावें ?

जें प्रातिपदिक आपला अर्थ दाखविण्याच्या कामीं समर्थ असतें तेंच समर्थ होय.

४—व्याकरणशास्त्रावरून कांहीं नवीन प्रयोग करावयाचे नाहींत, तर प्रयोग हे मूळचेच आहेत. फक्त ज्या अर्थी जो प्रयोग मूळचा झालेला आहे त्या प्रयोगापासून तो अर्थ मनांत यावा या हेतूनें आचार्य पाणिनीनें ही प्रकृति—प्रत्ययाची कल्पना केली आहे.

समर्थम् । अर्थाभिधाने यत्समर्थम् । किं पुनस्तत् । कृतवर्णानुपूर्वीकं पदम् । सौतिथितिः वैक्षमाणिरिति ॥ अथ तद्वावचनं नैव कर्तव्यम् । कर्तव्यं च । किं प्रयोजनम् । नित्याः शब्दाः । नित्येषु शब्देषु वाक्यस्यानेन साधुत्वमन्वाख्यायते ॥

**प्राग्दीव्यतोऽण् ॥ ४।१।८३ ॥**

अयुक्तोऽयं निर्देशो न हि तत्र कश्चिद्दीव्यच्छब्दः पठ्यते । कस्तर्हि । दीव्यति शब्दः । कथं तर्हि निर्देशः कर्तव्यः प्राग्दीव्यतेरिति ॥ स तर्हि तथा निर्देश कर्तव्यः प्राग्दीव्यतेरिति । न कर्तव्यः दीव्यतिशब्दे दीव्यच्छब्दोऽस्ति तस्माद्दे पञ्चमी । किं पुनः कारणं विकृतनिर्देश क्रियते । एतज्ज्ञापयत्याचार्यो भवत्ये परिभाषैकदेशविकृतमनन्यवद्भवतीति । वि

---

अमुक एक प्रातिपदिक तसें आहे असें कशावरून बरें समजावें ?

ज्या प्रातिपदिकांतील वर्णांची आनुपूर्वी संधि वगैरे होऊन बरोबर जुळून आलेली आहे तें समर्थ होय उदा० सौतिथितिः, वैक्षमाणिः

आतां पूर्वीं सांगितल्याप्रमाणें येथें 'वा' हा शब्द घालूं नयेच कीं काय ?

असें नाहीं. वा हा शब्द येथें घालावा.

त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं शब्द हे मूळचे नित्यच आहेत. व्याकरणशास्त्र हे फक्त साधुत्व कळविणारें आहे. तेव्हां येथें वा शब्द नसेल तर फक्त 'औपगव' या वृत्तीलाच साधुत्व समजलें जाईल. उपगोः अपत्यम् या वाक्याला साधुत्व समजणार नाहीं तें समजावें याकरितां येथें वा शब्द घातला पाहिजे.

( सू. ८३ ) येथे 'दीव्यतः' असें म्हटलें आहे तें योग्य दिसत नाहीं. कारण पुढें कोणत्याही सूत्रामध्यें दीव्यत् असा शब्द उच्चारलेल दिसत नाहीं.

तर मग कोणता शब्द आचार्यांच्या मना असावा ?

'दीव्यति' ( ४।४।२ ) हा तो शब्द होय

तर मग आचार्यांनीं येथे कसें म्हट पाहिजे ?

'प्राग्दीव्यतेः' असें म्हटलें पाहिजे.

तर मग 'प्राग्दीव्यतेः' असें येथें म्हणावें.

तसें म्हणावयास नको. त्या दीव्यति शब्दतीलच 'दीव्यत्' एवढा जो भाग तो ये घेऊन त्याला पंचमीचा प्रत्यय लावून दीव्यत असें उच्चारलें आहे.

पण येथें पुढील इकार सोडून दीव्यत् अस विकृत भाग कां बरें घेतला आहे ?

मुद्दाम विकृत भाग घेण्यामध्यें आचार्यांच असा उद्देश आहे कीं ' विकृत भाग हा मू स्वरूपापेक्षां निराळा समजूं नये अशी परिभाषाच सुचवावयाची आहे.

---

५—सूत्थितस्य अपत्यम् सौत्थितिः. सूत्थित शब्दापासून अपत्य या अर्थीं इञ् प्रत्यय ( ४।१।९५ ) झाला आहे. येथें सु उत्थित अशा अवस्थेंत संधिकार्य ( ६।१। १०१ ) करण्याच्यापूर्वीं इञ् प्रत्यय झाला तर सु यांतील उकाराला वृद्धि (७।२।११७) होऊन सावुत्थितिः असें मलतेंच रूप होईल. परतु सुउत्थित हें समर्थ नाहीं. म्हणून त्याहून इञ् प्रत्यय होत नाहीं. संधिकार्य करून सिद्ध झालेल्या शब्दापासूनच लोकामध्यें अर्थबोध होतो, सु उत्थित यापासून होत नाहीं; अपत्यं वैक्षमाणिः येथे असेंच समजावें. वि· ईक्षमाण ये दीर्घ झाला आहे.

१ (सू. ८३.)—' दीव्यति ' या अर्थाचा निर्देश पुढें ( ४।४।२ ) केला आहे. त्याच्या पूर्वीपर्यंत जो जो अर्थाचा निर्देश केला आहे त्या सर्व अर्थीं अण् प्रत्यय होतो. उदा०--तस्यापत्यम् ( ४।१।९२ ) तेन रक्तम् ( ४।२।१ ) इत्यादि अर्थ असताना उपगोः अपत्यम् औपगवः या ऐवजीं व कषायेण रक्तं वस्त्रम् या ऐवजी काषायम् असे शब्द होतात.

मेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । एकदेशविकृते- षूपसंख्यानं चोदितं तन्न कर्तव्यं भवति ॥ अथवा प्राक्शब्दोऽयं दिक्शब्दो दिक्शब्दैश्च योगे पञ्चमी भवति तत्राप्रथमासमाना- धिकरण इति शता भविष्यति ॥

अथ प्राग्वचनं किमर्थम् ।

**प्राग्वचनं सकृद्विधानार्थम् ॥१॥**

प्राग्वचनं क्रियते सकृद्विधानार्थम् । सकृद्विहितः प्रत्ययो विहितो यथा स्यात् । योगे योगे तस्य ग्रहणं मा कार्षमिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । अधिकारादप्येतत्सि- द्धम् । अधिकारः प्रतियोगं तस्यानिर्देशार्थ इति योगे योग उपतिष्ठते ।

**अधिकारात्सिद्धमिति चेदपवाद- विषयेऽणप्रसङ्गः ॥ २ ॥**

अधिकारात्सिद्धमिति चेदपवादविषये- ऽण्प्राप्नोति । अत इञ् [४.१.९५] अण्चे- त्यणपि प्राप्नोति ॥

**तस्मात्प्राग्वचनम् ॥ ३ ॥**

तस्मात्प्राग्वचनं कर्तव्यम् ॥ अथ क्रिय- माणेऽपि प्राग्वचने कथमिदं विज्ञायते । प्राग्दीव्यतो याः प्रकृतय इति । आहोस्वि-

---

ही परिभाषा सुचविण्यांत काय बरें फायदा आहे ?

एकदेशविकृतस्योपसंख्यानम् ( १।१।५६ वा. ९ ) असें जें पूर्वी म्हटलें आहे तें म्हणा वयास नको.

अथवा प्राक् हा येथें दिग्वाचक शब्द आहे; आणि दिग्वाचक शब्दांचा योग असतांना पंचमी सांगितली ( २।३।२९ ) आहे. तेव्हां प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असल्यामुळें शतृ प्रत्यय[२] झाला आहे.

आतां येथें प्राग्दीव्यतः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

( वा. १ ) येथें एकाच ठिकाणीं अण् प्रत्ययाचें विधान करण्याकरितां ' प्राग्दीव्यतः ' असें येथें म्हटलें आहे. स्पष्टीकरण करावयाचें म्हटल्यास येथें एका ठिकाणीं अण् प्रत्यय सांगितला म्हणजे पुढील त्या त्या अर्थी अण् प्रत्ययाचें विधान केलें असें होईल. नाहींतर त्या त्या प्रत्येक सूत्रामध्यें अण्-ग्रहण करण्याचा प्रसंग येईल.

' प्राग्दीव्यतः ' याचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, 'अण्' याचा येथें अधि- कार केला म्हणजे पुढें प्रत्येक ठिकाणीं त्याचा संबंध होईल. ' अधिकारः प्रतियोगं तस्या- निर्देशार्थः ' ( १।१।११ वा. १ ) असें मागें म्हटलेंच आहे. तेव्हां दर एक शास्त्रामध्यें अण् हें पद उपस्थित होईलच.

( वा. २ ) अधिकार केला म्हणजे सिद्ध होईल असें म्हणाल तर अपवादाच्या विषया- मध्येंही अण् प्रत्यय प्राप्त होईल. उदा० ' अत इञ् ( ४।१।९५ ) येथेंही अण् प्रत्ययाचा संबंध होईल. आणि ' अकारान्त शब्दाहून अपत्य या अर्थी इञ् आणि अण् प्रत्यय होतात' असा अर्थ होऊन तेथें अण् प्रत्ययही होऊं लागेल.

( वा. ३ ) म्हणून ' प्राग्दीव्यतः ' असें येथें म्हटलें पाहिजे.

आतां प्राग्दीव्यतः असें येथें म्हटलें तरी त्याचा अर्थ कसा समजावयाचा ? दीव्यति शब्दाच्या पूर्वी प्रत्यय सांगण्याकरितां ज्या ज्या

---

२—दीव्यति शब्दापैकीं इकार सोडून त्याच्या मागील दीव्यत् हा भाग येथें घेतला आहे असें समजूं नये; तर दीव्यति हा शब्दच येथें घेतला आहे. पण तो घेतांना शास्त्रामुळें त्यांत थोडा फेरफार सहज झाला आहे. येथें प्रथमान्ताशीं सामानाधिकरण्य असल्यामुळें लटाचें स्थानीं शतृ प्रत्यय ( ३।२।१२४ ) न होतां तिङ् प्रत्यय होऊन दीव्यति असें क्रियापद झालें आहे, आणि येथें पंचमी होत असल्यामुळें प्रथमान्ताशीं सामाना- धिकरण्य नाहीं म्हणून शतृ प्रत्यय होऊन दीव्यत् असा शब्द बनला आहे व त्याची दीव्यतः ही पंचमी आहे

त्प्राग्दीव्यतो येऽर्था इति। किं चातः। यदि विज्ञायते प्राग्दीव्यतो याः प्रकृतय इति स एव दोषो ऽपवादविषये ऽण्प्रसङ्ग इति। अथ विज्ञायते प्राग्दीव्यतो येऽर्था इति न दोषो भवति। समानेऽर्थे प्रकृतिविशेषादुत्पद्यमान इञणं बाधते॥ यथा न दोषस्तथास्तु। प्राग्दीव्यतो येऽर्था इति विज्ञायते। कुत एतत्। तथा ह्ययं प्राधान्येनार्थं प्रतिनिर्दिशति। इतरथा बह्वयस्तत्र प्रकृतयः पठ्यन्ते ततो यां कांचिदेव निमित्तत्वेनोपाददीत॥ अथवा पुनरस्तु प्राग्दीव्यतो याः प्रकृतय इति। ननु चोक्तमपवादविषयेऽण्प्रसङ्ग इति।

न वा क्वचिद्वावचनात्॥ ४॥

न वैष दोषः। किं कारणम्। क्वचिद्वावचनात्। यदयं क्वचिद्वावचनं करोति पीलाया वा [४.१.११८] उदश्वितो ऽन्यतरस्याम् [४.२.१९] इति तज्ज्ञापयत्याचार्यो नापवादविषये ऽण्भवतीति॥ यद्येतज्ज्ञाप्यते नार्थः प्राग्वचनेन। अधि-

---

शब्दांचा निर्देश केला असेल त्या त्या सर्व शब्दांहून अण् प्रत्यय होतो असा अर्थ घ्यावयाचा, किंवा दीव्यति या अर्थाच्या पूर्वी जो जो अर्थाचा निर्देश केला असेल त्या त्या सर्व अर्थी अण् प्रत्यय होतो असा अर्थ घ्यावयाचा?

या दोन अर्थांमध्यें काय बरें फरक होतो?

फरक असा होतो कीं दीव्यति शब्दाच्या पूर्वी प्रत्यय सांगण्याकरितां ज्या ज्या शब्दांचा निर्देश केला असेल असा अर्थ घेतला तर वर सांगितलेलाच दोष येतो. म्हणजे इञ् वगैरे अपवाद प्रत्ययांच्या विषयांमध्यें अण् प्रत्यय होऊं लागेल. आतां 'दीव्यति' शब्दाच्या पूर्वी जो जो अर्थाचा निर्देश केला असेल त्या त्या सर्व अर्थी अण् प्रत्यय होतो असा अर्थ घेतला म्हणजे मात्र तो दोष येत नाहीं, कारण त्या एकाच अर्थी अकारान्त वगैरे विशेष शब्दांहून सांगितलेले इञ् वगैरे अपवाद प्रत्यय अण् प्रत्ययाचा बाध करतील.

तर मग ज्या पक्षीं दोष येत नाहीं तोच पक्ष येथें घ्यावा म्हणजे 'दीव्यति' शब्दाच्या पूर्वी जो जो अर्थाचा निर्देश केला असेल असाच 'प्राग्दीव्यतः' याचा अर्थ समजावा.

पण तसाच अर्थ घेण्याला प्रमाण काय?

प्रमाण असें कीं—येथें प्राक् याला अवधि म्हणून दीव्यतः असा अर्थाच्या दृष्टीनें निर्देश केला आहे. नाहीं तर पुढें पुष्कळच शब्द सूत्रामध्यें निर्दिष्ट केले आहेत त्यांपैकीं एखादा शब्द घेऊन तो येथें अवधि म्हणून दाखविला असता[1].

अथवा 'दीव्यति' शब्दाच्या पूर्वी प्रत्यय सांगण्याकरितां ज्या ज्या शब्दांचा निर्देश केला असेल त्या त्या सर्व शब्दांहून अण् प्रत्यय होतो असाच कां अर्थ असेना?

पण तसा अर्थ घेतला तर इञ् वगैरे अपवाद प्रत्ययांच्या विषयांमध्यें अण् प्रत्यय होऊं लागेल असा दोष दिला आहे ना?

(वा. ४) हा दोष येत नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं कांहीं ठिकाणीं 'वा' असें म्हटलें आहे. 'पीलाया वा' (४।१।११८) 'उदश्वितोऽन्यतरस्याम्' (४।२।१९) येथें 'अन्यतरस्याम्', 'वा' असे जे शब्द आचार्य उच्चारीत आहेत त्यांवरून ते असें सुचवितात कीं अपवादाच्या विषयामध्यें अण् प्रत्यय होत नाहीं.

पण अशा रीतीनें ज्ञापकानें सिद्ध होत असेल तर 'प्राग्दीव्यतः' हेंही म्हणावयास नको. अण् असा अधिकार केला म्हणजे सर्व साधतें.

---

[1] —कुलत्थ शब्द पुढें (४।४।४) सूत्रामध्यें आहे. तेव्हां येथें 'प्राक्कुलत्थादण्' असें म्हटलें असतें

कारात्सिद्धम् । ननु चोक्तमधिकारात्सिद्धमिति चेदपवादविषये ऽणप्रसङ्ग इति । नैष दोषः । परिहृतमेतन्न वा कचिद्वावचनादिति ॥ किं पुनः कारणमियानवधिर्गृह्यते न प्राक्ठक इत्येवोच्येत । एतज्ज्ञापयत्यर्थेष्वयं भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । प्रकृतिविशेषादुत्पद्यमान इञणं बाधते ॥

## [ अश्वपत्यादिभ्यश्च ॥ ४।१।८४॥]

## दित्यदित्यादित्यपत्युत्तरपदाण्ण्यः ॥ ४।१।८५ ॥

### वाङ्मतिपितृमतां छन्दस्युपसंख्यानम् ॥ १ ॥

वाङ्मतिपितृमतां छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । वाक् । वाच्यः । वाक् ॥ मति । मात्यः । मति ॥ पितृमत् । पैतृमत्यः ॥

### पृथिव्या ञाञौ ॥ २ ॥

पृथिव्या ञाञौ वक्तव्यौ । पार्थिवा पार्थिवी ॥

### देवस्य यञञौ ॥ ३ ॥

देवस्य यञञौ वक्तव्यौ । दैव्यम् दैवम् ॥

### बहिषष्टिलोपश्च यञ्च ॥ ४ ॥

बहिषष्टिलोपश्च यञ्च वक्तव्यः । बहिर्भवो बाह्यः ॥

---

अधिकारानें जर सर्व सिद्धि होत असेल तर इञ् वगैरे अपवादाच्या विषयांमध्यें अण् होऊं लागेल असा दोष येत आहे ना ?

हा दोष येत नाहीं. त्याचा परिहार 'पीलाया वा' येथील 'वा' शब्दावरून ज्ञापन करून आतांच केला आहे.

पण काय हो, येथें 'दीव्यतः' असा जो अवधीचा निर्देश केला आहे तो काय म्हणून ? तसा करूं नये. त्यापेक्षां 'प्राक् ठकः' असा अवधि म्हणून प्रत्ययाचाच सरळ रीतीने निर्देश करावा.

अवधि म्हणून दीव्यतः असा निर्देश करण्यानें सूत्रकार असें सुचवितात कीं दीव्यति या अर्थाच्या पूर्वीं निर्दिष्ट केलेल्या अर्थीं अण् प्रत्यय होतो.

असें सुचविल्यापासून काय फायदा होत आहे?

फायदा असा होतो कीं अकारान्त शब्दाहून सांगितलेले इञ् वगैरे प्रत्यय हे ह्या अण् प्रत्ययाचा सरळच बाध करतात.

( सू. ८५ वा. १ ) वाच्, मति आणि पितृमत् या शब्दांहून 'प्राग्दीव्यतीय' या अर्थीं वेदामध्यें ण्य प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा.—वाच्यः, मात्यः, पैतृमत्यः.

( वा. २ ) पृथिवी शब्दाहून 'प्राग्दीव्यतीय' या अर्थीं ञ आणि अञ् असे प्रत्यय होतात. उदा.—पार्थिवा, पार्थिवी.

( वा. ३ ) देव शब्दाहून 'प्राग्दीव्यतीय' या अर्थीं यञ् आणि अञ् हे प्रत्यय होतात. उदा.—दैव्यम्, दैवम्.

( वा. ४ ) बहिस् या शब्दाहून प्राग्दीव्यतीय' या अर्थीं यञ् प्रत्यय होतो आणि बहिस् शब्दांतील इस् या भागाचा लोप होतो. उदा.—बहिर्भवः बाह्यः

---

४—नाहींतर 'अपवादाच्या विषयामध्यें अण् प्रत्यय होत नाहीं' ही गोष्ट ज्ञापनावरून ध्यावी लागली असती.

१ ( सू. ८४ )—अश्वपत्यादि गणांतील अश्वपति वगैरे शब्दांहून अपत्य वगैरे प्राग्दीव्यतीय अर्थांपैकीं संभवेल त्या त्या अर्थीं अण् प्रत्यय होतो. उदा०—अश्वपतेः अपत्यम् आश्वपतः. याप्रमाणेंच अश्वपतिना निर्वृत्तम्, अश्वपतेर्निवासः, अश्वपतेरिदम् इत्यादि संभवणाऱ्या अर्थीं अण् प्रत्ययच होतो.

१ ( सू. ८५ )—दिति, अदिति, आदित्य, आणि पतिशब्द उत्तर पद असलेला सामासिक शब्द यांहून अपत्य वगैरे प्राग्दीव्यतीय अर्थी ण्य प्रत्यय होतो. उदा० दितेरपत्यं दैत्यः. प्राग्दीव्यतीय अर्थांपैकीं संभवणाऱ्या अर्थींही दैत्य असाच शब्द होतो.

२—अञ् प्रत्यय केला म्हणजे स्त्रीत्व विवक्षा असतांना पुढें ङीप ( ४।१।१५ ) होतो.

## ईकक्च ॥ ५ ॥

ईकक्च वक्तव्यः । बाहीकः ॥

## ईकञ्छन्दसि ॥ ६ ॥

ईकञ्छन्दसि वक्तव्यः । बाहीकमस्तु भद्रं वः ॥

## स्थाम्नोऽकारः ॥ ७ ॥

स्थाम्नोऽकारो वक्तव्यः । अश्वत्थामः ॥

## लोम्नोऽपत्येषु बहुषु ॥ ८ ॥

लोम्नोऽपत्येषु बहुष्वकारो वक्तव्यः । उडुलोमाः शरलोमाः । बहुष्विति किमर्थम् । औडुलोमिः शारलोमिः ॥

## सर्वत्र गोरजादिप्रसङ्गे यत् ॥ ९ ॥

सर्वत्र गोरजादिप्रसङ्गे यद्वक्तव्यः । गवि भवं गव्यम् । गोरिदं गव्यम् । गोः स्वं गव्यम् । गौर्देवतास्य स्थालीपाकस्य गव्यः स्थालीपाकः ॥

## ण्यादयोऽर्थविशेषलक्षणादणपवादात्पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ १० ॥

ण्यादयोऽर्थविशेषलक्षणादणपवादाद्भवन्ति पूर्वविप्रतिषेधेन । ण्यादीनामवकाशः दितिर्देवतास्य दैत्यः । अर्थविशेषलक्षणस्याणपवादस्यावकाशः । दुलेरपत्यं दौलेयः बालेयः । इहोभयं प्राप्नोति । दितेरपत्यं दैत्यः ॥ अपरस्यार्थविशेषलक्षणस्याणपवा-

---

(वा. ५) बहिस् शब्दाहून ईकक् प्रत्यय होतो आणि त्यांतील इस् या भागाचा लोप होतो. उदा.—बाहीकः

(वा. ६) बहिस् शब्दाहून वेदामध्यें ईकञ् प्रत्यय होतो आणि त्यांतील इस् भागाचा लोप होतो. उदा.—बाहीकमस्तु भद्रं वः.

(वा. ७) स्थामन् शब्दान्त प्रातिपदिकाहून 'प्राग्दीव्यतीय' अर्थी अकार प्रत्यय होतो. असें म्हणावें. उदा.—अश्वत्थामः

(वा. ८) लोमन्-शब्दान्त प्रातिपदिकाहून बहुत अपत्यें या अर्थी अकार प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा.—उडलोमाः, शरलोमाः

येथें बहुत अपत्यें असें कशाकरितां म्हटलें आहे ?

औडुलोमिः शारलोमिः येथें अकार प्रत्यय न झाला पाहिजे, म्हणून म्हटलें आहे.

(वा. ९) 'प्राग्दीव्यतीय' अर्थामध्यें संभवणाऱ्या सर्व अर्थी गो शब्दाहून जो प्रत्यय प्राप्त होईल तो जर अजादि असेल तर तो न करतां 'यत्' प्रत्यय करावा. उदा.—गवि भवं गव्यम्, गोरिदं गव्यम्, गोः स्वं गव्यम्, गौर्देवताऽस्य गव्यः स्थालीपाकः.

(वा. १०) प्राग्दीव्यतीय अर्थी सांगितलेले हे ण्य वगैरे प्रत्यय अपत्य वगैरे त्या त्या विशेष अर्थी अण् प्रत्ययाचा बाध करून प्राप्त झालेल्या प्रत्ययापेक्षां पूर्व-विप्रतिषेधानें होतात. 'दितिः देवता अस्य दैत्यः' या उदाहरणामध्यें ह्या ण्य वगैरे प्रत्ययांना अवकाश आहे, आणि विशेष अर्थी सांगितलेल्या व अण् प्रत्ययाचा बाध करून होणाऱ्या प्रत्ययांना दुलेः अपत्यं 'दौलेयः' तसेंच बालेयः येथें अवकाश आहे; पण, दितेरपत्यं दैत्यः येथें दोघांची प्राप्ति येते; तेथें पूर्वविप्रतिषेधानें ण्य प्रत्ययच होतो. दुसरें उदाहरण असें कीं अचित्तहस्तिधेनोष्ठक् ( ४।२।४७ ) या सूत्रानें

---

३—ईकञ् प्रत्यय केला म्हणजे बाहीक शब्दांतील आदि आकार उदात्त ( ६।१।१९७ ) होतो.

४—उडुलोमन् शब्दाहून बहुत अपत्यें या अर्थी अ प्रत्यय झाला आहे आणि अन् भागाचा लोप (६।४।१४४) झाला आहे. बहुत अपत्यांची विवक्षा नसेल तेव्हां उडुलोम्नः अपत्यम् औडुलोमिः असें रूप होतें. येथें इञ् प्रत्यय ( ४।१।९६ ) होतो.

५—येथें तत्र भवः ( ४।३।५३ ) तस्येदम् ( ४।३।१२० ) साऽस्य देवता ( ४।२।२४ ) ह्या सूत्रांनीं अण् प्रत्यय प्राप्त झाला आहे. अण् हा प्रत्यय अजादि आहे.

६—येथें दुलि व बलि या इकारान्त शब्दांहून अपत्य याअर्थी ढक् (४।१।१२२) प्रत्यय झाला आहे. तो अण् (४।१।९२) प्रत्ययाचा अपवाद आहे.

दस्यावकाशः । अचित्तहस्तिधेनोष्ठक् [ ४. २.४७ ] आपूपिकम् शाष्कुलिकम् । ण्यादीनामवकाशः । बार्हस्पत्यम् प्राजापत्यम् । इहोभयं प्राप्नोति । वनस्पतीनां समूहो वानस्पत्यम् । ण्यादयो भवन्ति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । इष्टवाची परशब्दः । विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवति । दितिवनस्पतिभ्यामपत्यसमूहयोः ॥

## उत्सादिभ्योऽञ् ॥ ४।१।८६ ॥

अञ्प्रकरणे ग्रीष्मादच्छन्दसि ॥ १ ॥

अञ्प्रकरणे ग्रीष्मादच्छन्दसीति वक्तव्यम् । ग्रैष्मम् । अच्छन्दसीति किम् । त्रिष्टुब्ग्रैष्मी ॥ यद्यच्छन्दसीत्युच्यते ग्रैष्मावेतौ मासौ अत्र न प्राप्नोति । अच्छन्दसीत्युच्यते नैतच्छन्दः समीक्षितं काठकं कालापकं मौदकं पैप्पलादकं वा । किं तर्हि । प्रत्ययार्थविशेषणमेतत् । न चेच्छन्दः प्रत्ययार्थो भवतीति ॥

## स्त्रीपुंसाभ्यां नञ्स्नञौ भवनात् ॥ ४।१।८७ ॥

समूह या विशेष अर्थीं अण् प्रत्ययाचा ( ४।२।३७ ) बाध करून ठक् प्रत्यय सांगितला आहे. त्याला आपूपिकम् शाष्कुलिकम् इत्यादि ठिकाणीं अवकाश आहे. आणि बार्हस्पत्यम् प्राजापत्यम् इत्यादि उदाहणांमध्यें ह्या ण्य वगैरे प्रत्ययांना अवकाश आहे. पण वनस्पतीनां समूहः वानस्पत्यम् येथे त्या दोघांची प्राप्ति येते. तेथें पूर्वविप्रतिषेधानें ण्य वगैरे प्रत्यय होतात.

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध येथें सांगितला पाहिजे.

सांगावयांस नको कारण, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' ( १।४।२ ) येथें पर हा शब्द इष्ट या अर्थाचा आहे. दोन शास्त्रांचा विरोध आला असतां त्यांमध्यें जे पर म्हणजे इष्ट असेल तेंच होतें. तेव्हां दिति शब्दाहून अपत्य या अर्थीं आणि वनस्पति शब्दाहून समूह या अर्थीं ण्य प्रत्ययच होतो.

( सू. ८६ वा. १ ) उत्सादिगणांतील ग्रीष्म शब्दाहून जो हा अञ् प्रत्यय होतो तो प्रत्ययान्त शब्दापासून वृत्त हा अर्थ गम्यमान होत नसेल तरच होतो असें म्हणावें. उदा० ग्रैष्मम्.

वृत्त हा अर्थ नसावा असें कशाकरितां म्हटलें आहे ?

त्रिष्टुप्[2] ग्रैष्मी.

पण जर अच्छन्दसि असें म्हटलें तर ग्रैष्मौ एतौ मासौ या वैदिक प्रयोगामध्यें अञ् प्रत्यय होणार नाहीं.

अच्छन्दसि असें आहे त्यांतील छन्दस् हा शब्द काठक, कालापक, मौदक, पैप्पलादक वगैरे वेदभाग या अर्थानें घातला नाहीं.

तर मग आचार्योनीं त्याचा काय अर्थ मनांत धरला आहे ?

प्रत्ययार्थाचें तें विशेषण आहे. म्हणजे 'छन्द हा अर्थ प्रत्ययाचा होत नसेल तर' असा अर्थ आहे.

१-(सू. ८६) उत्सादि-गण-पठित शब्दांहून प्राग्दीव्यतीय अर्थीं अञ् प्रत्यय होतो. उत्सस्य अपत्यम् औत्सः. प्राग्दीव्यतीय अर्थांपैकीं संभवणाऱ्या इतर अर्थींही अञ् प्रत्ययच होतो.

२—त्रिष्टुप् हें एक प्रकारचें (अकरा अक्षरांचें) वृत्त आहे.

३—छन्दस् या शब्दाचा अर्थ वेद—भाग असा

१ (सू. ८७) अपत्य या अर्थाला आरंभ करून भवन [५।२।१] या अर्थापर्यंत जे अर्थ दिले आहेत त्यांपैकीं कोणत्याही अर्थीं स्त्री शब्दाहून नञ् प्रत्यय होतो आणि पुम्स् शब्दाहून स्नञ् प्रत्यय होतो. उदा०-स्त्रैणः, पौंस्नः. येथें पुम्स् शब्दांतील शेवटच्या सकाराचा लोप [८।२।२३] आणि उकाराला वृद्धि (७।२।११७) झाली आहे.

किमर्थं नञ्स्नञावुच्येते न नञेवोच्येत। का रूपसिद्धिः पौंस्नम्। पुंसिति सकारान्तो नञ्च प्रत्ययः। न सिध्यति। संयोगान्तस्य लोपः [ ८. २. २३ ] इति लोपः प्राप्नोति॥ एवं तर्हि नैवार्थो नञा नापि स्नञा। अञ्प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते नकारश्चागमो वक्तव्यः। अथ नकारागमे सति किं पूर्वान्तः करिष्यत आहोस्वित्परादिः। किं चातः। यदि पूर्वान्तः स्त्रैणाः बहुषु लोपः प्राप्नोति। स्त्रैणानां संघः संघाङ्कलक्षणेष्वञ्यञिञामण् [ ४.३.१२७ ] इत्यण्प्राप्नोति। अथ परादिः पौंस्नम् स एव दोषः संयोगान्तलोपः प्राप्नोति॥ अस्तु पूर्वान्तः। कथं स्त्रैणाः स्त्रैणानां संघ इति। उभयत्र लौकिकस्य गोत्रस्य ग्रहणं न चेदं लौकिकं गोत्रम्। ईकारस्तर्हि प्राप्नोति। इष्टमेवैत-

(सू. ८७) येथें नञ् आणि स्नञ् असे निरनिराळे दोन प्रत्यय कशाकरितां सांगितले आहेत ? तसे सांगावयास नकोत. दोन्ही शब्दांहून नञ् हा एकच प्रत्यय सांगावा.

पुमस् शब्दाहूनही नञ् प्रत्ययच जर झाला तर पौंस्न हा शब्द कसा साधेल ?

येथें तर कांहींच अडचण दिसत नाहीं. कारण पुमस् असा शब्द सकारान्त आहे. आणि नञ् असा तर प्रत्यय आहे.

तरी पण पौंस्न हा शब्द सिद्ध होत नाहीं. कारण संयोगान्तस्य लोपः ( ८।२।२३ ) या सूत्रानें त्या सकाराचा लोप प्राप्त होत आहे ना ?

असें आहे तर मग आतां येथे नञ् प्रत्ययही सांगूं नये आणि स्नञ्ही सांगूं नये. पूर्वसूत्रानें अञ् प्रत्यय सांगितला आहे त्याचीच येथें अनुवृत्ति करावी, आणि येथें त्या अञ् प्रत्ययाच्या बरोबरच नकार आगम अधिक सांगावा म्हणजे झालें.

पण हा आगम सांगितला तर तो नकार काय मागील शब्दाचा अन्तावयव समजावा किंवा पुढील प्रत्ययाचा आद्यावयव समजावा ?

या दोहोंमध्यें फरक काय ?

फरक असा कीं जर हा नकार मागील शब्दाचा अंत्यावयव केला तर स्त्रैणाः अशी बहुत्व–विवक्षा असेल तेव्हां स्त्रैण या अञ्–प्रत्ययान्ताहून संघाङ्कलक्षणेष्वञ्यञिञामण् ( ४।३।१२७ ) या सूत्रानें अण् प्रत्यय होऊं लागेल[२]. बरें, आतां हा नकार आगम प्रत्ययाचा आद्यावयव केला तर पौंस्न शब्दामध्यें संयोगान्तस्य लोपः ( ८।२।२३ ) यानें सकाराचा लोप होऊं लागेल हा पूर्वीचाच दोष येत आहे.

तर मग आतां हा नकार मागील शब्दाचा अन्तावयवच असूं दे.

पण अन्तावयव केला तर स्त्रैणाः येथें अञ् प्रत्ययाचा लोप आणि स्त्रैणानां संघः या अर्थी अण् प्रत्यय होऊं लागेल असे जे दोष दिले आहेत त्यांची वाट काय ?

त्या दोन्ही ठिकाणीं मागील सूत्रांतून ( २।४।६३; ४।३।१२६ ) गोत्र शब्दाची अनुवृत्ति आहे. आणि त्या ठिकाणीं लौकिक गोत्रच घ्यावयाचें आहे. आणि स्त्रैण व पौंस्न या शब्दांपासून कांहीं लौकिक गोत्राचा बोध होत नाहीं.

तर मग आतां प्रकृत सूत्रानें अञ् प्रत्यय सांगितला तर स्त्रीत्व–विवक्षा असतांना ङीप् प्रत्यय (४।१।१५) होऊं लागेल हा दोष येतो.

२—प्रत्ययाचा आद्यावयव नकार केला म्हणजे तो अञ् प्रत्यय अकाररूप नसल्यामुळें हे दोष येत नाहींत असा अभिप्राय आहे. 'अकाररूप जो अञ्' असा अर्थ त्या दोन्ही ठिकाणीं करावा.

३—लौकिक गोत्र म्हणजे ऋषीचें अपत्य होय. स्त्रैण व पौंस्न या शब्दांमध्यें जरी अपत्य या अर्थी प्रत्यय केला व वस्तुतः तें अपत्य ऋषीचें असलें तरी त्या शब्दापासून कांहीं ऋषीचें अपत्य या रूपानें बोध होत नाहीं.

त्संगृहीतं स्त्रैणी पौंस्नीत्येव भवितव्यम्। एवं हि सौनागाः पठन्ति। नञ्स्नञीकक्ख्युंस्तरुणतलुनानामुपसंख्यानमिति। टिलोपस्तर्हि प्राप्नोति। नुग्वचनान्न भविष्यति। भवेदिह नुग्वचनान्न स्यात् स्त्रैणमिति। इह तु खलु पौंस्नमिति नुग्वचनादेव प्राप्नोति॥ तस्मान्नञ्स्नञौ वक्तव्यौ॥

अथेमौ नञ्स्नञौ प्राग्भवनाद्दाहोस्वित्प्राग्वतेः। कश्चात्र विशेषः।

नञ्स्नञौ भवनादिति चेद्वत्यर्थे प्रतिषेधः॥ १॥

नञ्स्नञौ भवनादिति चेद्वत्यर्थे प्रतिषेधो वक्तव्यः। स्त्रीवत् पुंवदिति। किं पुनः कारणं न सिध्यति। इमौ नञ्स्नञौ प्राग्भवनादित्युच्येते तौ विशेषविहितौ सामान्यविहितं वतिं बाधेयाताम्॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। वतेः प्रागिति वक्ष्यामि।

वतेः प्रागिति चेद्भाव उपसंख्यानम्॥२॥

वतेः प्रागिति चेद्भाव उपसंख्यानं कर्त-

---

हा दोष नव्हे, तर उलट इष्टच साधत आहे. स्त्रीत्व—विवक्षा असतांना स्त्रैणी व पौंस्नी अशींच रूपें झालीं पाहिजेत. कारण 'नञ्स्नञीकक्ख्युंस्तरुणतलुनानामुपसंख्यानम्' (४।१।१५ पृ. २०९ पं. ८) असें तेथें ङीप् प्रत्यय होण्याकरितां सौनागांनीं वचन केलें आहे.

तर मग आतां प्रकृत सूत्रानें अञ् प्रत्यय सांगून मागील शब्दाचा अन्तावयव नुक् आगम केला तर टिलोप (६।४।१४४) होईल हा दोष येतो.

टिलोप झाला तर नुक् आगम सांगितलेला व्यर्थ होईल. तेव्हां त्याच्या सामर्थ्यास्तव टिलोप होणार नाहीं.

'नुक् आगमाच्या सामर्थ्यास्तव टिलोप होत नाही' हें उत्तर स्त्रैण शब्दापुरतें जुळेल. पौंस्न शब्दामध्यें जुळत नाहीं. तेथें उलट नुक् आगम केला म्हणूनच टिलोप होऊं लागेल. तेव्हां एकंदरीत आचार्यांनीं येथें नञ् आणि स्नञ् असे जे निरनिराळे दोन प्रत्यय सांगितले आहेत ते तसेच सांगितले पाहिजेत.

पण काय हो, हे नञ् आणि स्नञ् प्रत्यय ज्या अर्थीं होतात ते अर्थ भवनाच्या (५।२।१) पूर्वींचे घ्यावयाचे किंवा वति प्रत्ययाच्या (५।१।११५) पूर्वींचे घ्यावयाचे?

या दोहोंमध्यें काय फरक?

(वा. १) भवनाच्या पूर्वींचे अर्थ घ्यावयाचे असतील तर तेन तुल्यम् या वति प्रत्ययाच्या अर्थीं हे नञ् व स्नञ् प्रत्यय होत नाहींत असें म्हटलें पाहिजे. उदा० स्त्रीवत्, पुंवत्.

पण हीं उदाहरणें न साधण्याचें काय बरें कारण?

कारण असें कीं भवनाच्या पूर्वींच्या अर्थीं हे नञ् व स्नञ् प्रत्यय सांगितले आहेत. ते स्त्री आणि पुंस् या विशेष शब्दांवरून सांगितले असल्यामुळें सामान्यतः सांगितलेल्या वति प्रत्ययाचा (५।१।११५) ते बाध करतील.

तर मग 'तेन तुल्यम्' या अर्थीं हे प्रत्यय होत नाहींत असा निषेध सांगितला पाहिजे.

तसा निषेध सांगावयास नको. कारण प्रकृत सूत्रामध्यें भवनात् याच्या ऐवजीं 'वतेः प्राक्' असें म्हटलें म्हणजे झालें.

(वा. २) 'वतेः प्राक्' अशी मर्यादा घातली तर 'तस्य भावः' या अर्थीं हे नञ् व स्नञ् प्रत्यय होतात असें उपसंख्यान केलें पाहिजे. उदा०

---

४—स्त्रैण शब्दामध्यें स्त्री शब्दाला नुक् आगम झाल्यानंतर नकारान्त झाल्यामुळें ईन् या टि भागाचा लोप होणार, आणि नुक् आगम सांगितलाच नाहीं तर ईकाराचा लोप (६।४।१४८) होऊन तसेंच रूप होणार म्हणून नुक् आगम व्यर्थ होतो.

५—कारण, त्याशिवाय नकारान्तच होत नाहीं. तेव्हां पौंस्न शब्दामध्यें नुक् आगम केला तर टिलोप होईल हा दोष कायम राहतो.

त्नम् । स्त्रीभावः स्त्रैणम् । पुंभावः पौंस्नमिति । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं नञ्स्नञौ भवनादिति चेद्वत्यर्थे प्रतिषेध इति । नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न वत्यर्थे नञ्स्नञौ भवत इति यदयं स्त्रियाः पुंवदिति निर्देशं करोति । एवमपि स्त्रीवदिति न सिध्यति । योगापेक्षं ज्ञापकम् ॥

[1]द्विगोर्लुगनपत्ये ॥ ४।१।८८ ॥

इह कस्मान्न भवति । त्रैविद्यः पाञ्चनदः षाट्कुल इति । इह तावत्त्रैविद्य इति नैवं विज्ञायते तिस्रो विद्या अधीते त्रैविद्य इति । कथं तर्हि । त्र्यवयवा विद्या त्रिविद्या त्रिविद्यामधीते त्रैविद्य इति ॥ इहापि

---

स्त्रीभावः स्त्रैणम्, पुंभावः पौंस्नम्. शिवाय आचार्यांनीं केलेल्या सूत्रांमध्यें बदल होतोच.

तर मग आतां आचार्यांनीं मूळ जसें सूत्र केलें आहे तसेंच असूं दे.

पण नञ्स्नञौ भवनात् अशी मूळची मर्यादा कायम ठेवली तर 'तेन तुल्यम्' या वति प्रत्ययाच्या अर्थीं नञ् व स्नञ् हे प्रत्यय होत नाहींत असा निषेध सांगितला पाहिजे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'स्त्रियाः पुंवत्०' (६।३।३४) या सूत्रामध्यें जो आचार्यांनीं पुंवत् असा शब्द उच्चारला आहे त्याच निपातनावरून ते असे सुचवितात कीं वति प्रत्ययाच्या अर्थीं नञ् व स्नञ् प्रत्यय होत नाहीत.

तरी देखील स्त्रीवत् हा शब्द साधत नाहींच. कारण पुंवत् हें निपातन पुमस् या शब्दापुरतेंच काम करील.

तें निपातन पुम्स् शब्दापुरतें न समजतां प्रकृत सूत्रासंबंधानें समजलें जाईल.

(सू. ८८) त्रैविद्यः, पाञ्चनदः, षाट्कुलः इत्यादि ठिकाणीं प्रकृत सूत्रानें तद्धित प्रत्ययाचा लुक् कां होत नाही ?

लुक् न होण्याचें कारण असें कीं त्रैविद्यः येथें तिस्रो विद्याः अधीते असा विग्रह आम्ही करीत नाहीं.

तर मग कसा विग्रह करतां ?

त्र्यवयवा विद्या त्रिविद्या त्रिविद्यामधीते त्रैविद्यः असा विग्रह करतों. पाञ्चनदः येथेंही

---

६—तेन तुल्यम् या अर्थीं प्रकृत सूत्र प्रवृत्त होत नाहीं अशी कल्पना त्या निपातनावरून करतां येईल.

१ (सू. ८८)—द्विगूला कारणीभूत असा जो प्राग्दीव्यतीय अर्थीं होणारा अजादि तद्धित प्रत्यय त्याचा लुक् होतो, तो प्रत्यय अपत्य अर्थाचा नसावा. उदा०--पञ्चसु कपालेषु संस्कृतः पुरोडाशः पञ्चकपालः. येथें संस्कृत अर्थीं जो पुढें अण् प्रत्यय (४।२।१६) होणार आहे त्याच्या निमित्तानें पञ्चन् आणि कपाल या शब्दांचा द्विगु समास (२।१।५१) झाला आहे व नंतर त्याच्यापुढें झालेल्या अण् प्रत्ययाचा लुक् झाला आहे.

२—त्रि आणि अवयव या शब्दांचा बहुव्रीहि करून त्या त्र्यवयव शब्दाचा विद्या शब्दाबरोबर कर्मधारय करून बहुव्रीहींतील उत्तरपद जो अवयव शब्द त्याचा लोप झाला आहे. नंतर पुढें अधीते या अर्थीं अण् प्रत्यय (४।२।५९) झाला आहे. तेव्हां येथें तद्धितार्थीं द्विगु (२।१।५१) नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें तद्धित प्रत्ययाचा लुक् होत नाहीं. आतां जेव्हां तद्धितार्थीं द्विगु केला जाईल तेव्हां प्रकृत सूत्रानें तद्धित प्रत्ययाचा लुक् होऊन भलतेंच रूप होईल असा दोष येतो. परंतु येथें अव्यविकन्यायानें तद्धितार्थीं द्विगु होतच नाहीं असें समजावें. अविः एव अविकः. अवि शब्दाहून स्वार्थीं क प्रत्यय होतो, म्हणून अवि आणि अविक हे दोन शब्द एकाच अर्थाचे होतात. परंतु पुढें 'त्याचें मांस' या अर्थीं तद्धित प्रत्यय मात्र अविक शब्दाहूनच होतो, अवि शब्दाहून होत नाहीं. आणि त्याचा विग्रह अवि शब्दानेंच दाखवावयाचा, अविक शब्दानें दाखवावयाचा नाहीं. तेव्हां 'अवेः मांसम् आविकम्' असेच वृत्ति व विग्रह होतात. हाच अव्यविकन्याय होय.

पाञ्चनद इति नैवं विज्ञायते पञ्चसु नदीषु भवः पाञ्चनद इति। कथं तर्हि। पञ्चानां नदीनां समाहारः पञ्चनदम् पञ्चनदे भवः पाञ्चनद इति॥ षाट्कुल इति नैवं विज्ञायते षट्सु कुलेषु भवः षाट्कुल इति। कथं तर्हि। षण्णां कुलं षट्कुलम् षट्कुले भवः षाट्कुल इति॥

अजादिग्रहणं च कर्तव्यम्। इह मा भूत। पञ्चगर्गरूप्यम् पञ्चगर्गमयम्॥

द्विगोर्लुकि तन्निमित्तग्रहणम्॥ १॥

द्विगोर्लुकि तन्निमित्तग्रहणं कर्तव्यम्। द्विगुनिमित्तं यस्तद्धितस्तस्य लुग्भवतीति वक्तव्यम्। इह मा भूत्। पञ्चकपालस्येदं खण्डं पाञ्चकपालमिति॥

अर्थविशेषासंप्रत्यये ऽतन्निमित्ताद्पि॥ २॥

अर्थविशेषासंप्रत्यये ऽतन्निमित्तादपीति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। पञ्चसु कपालेषु संस्कृतः पञ्चकपालः। पञ्चकपाल्यां संस्कृत इत्यपि विगृह्य पञ्चकपाल इत्येव यथा स्यात्॥ अथ क्रियमाणेऽपि तन्निमित्तग्रहणे कथमिदं विज्ञायते। तस्य निमित्तं

---

पञ्चसु नदेषु भवः पाञ्चनदः असा विग्रह करीत नाहीं.

तर मग कसा विग्रह करतां?

पञ्चानां नदीनां समाहारः पञ्चनदम् पञ्चनदे भवः पाञ्चनदः असा विग्रह करतों. तसेंच षाट्कुलः येथेंही षट्सु कुलेषु भवः षाट्कुलः असा विग्रह करीत नाहीं.

तर मग कसा विग्रह करतां?

षण्णां कुलं षट्कुलम् षट्कुले भवःषाट्कुलः असा विग्रह करतों.

प्रकृत सूत्रानें सांगितलेला हा लुक् अजादि प्रत्ययाचाच होतो असें म्हणावें. कारण पञ्चगर्गरूप्यम् व पञ्चगर्गमयम् येथें रूप्य व मय या प्रत्ययांचा लुक् न झाला पाहिजे.

(वा.१)द्विगूच्या पुढील ज्या तद्धित प्रत्ययाचा लुक् होतो तेथें तन्निमित्त–ग्रहण करावें. म्हणजे तो तद्धित प्रत्यय त्या द्विगुसमासाला कारणीभूत असला पाहिजे, असें म्हणावें. कारण पञ्चकपालस्येदं खण्डं पाञ्चकपालम् येथें अण् प्रत्ययाचा (४।३।१२०) लुक् न झाला पाहिजे.

(वा.२) द्विगूला कारणीभूत तद्धित प्रत्यय द्विगूहून केला असतां आणि द्विगूला कारणीभूत नसलेला तद्धित प्रत्यय द्विगूहून केला असतां जर त्या दोहोंच्या अर्थामध्यें फरक होत नसेल तर द्विगूला कारणीभूत नसलेल्याही तद्धितप्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लुक् होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग?

उपयोग असा कीं पञ्चसु कपालेषु संस्कृतः असा विग्रह केला असतां प्रकृत सूत्रानें तद्धित प्रत्ययाचा लुक् होऊन जसें पञ्चकपालः असें रूप होतें तसें पञ्चानां कपालानां समाहारः पञ्चकपाली पञ्चकपाल्यां संस्कृतः असा विग्रह केला असतांही प्रकृत सूत्रानें लुक् होऊन पञ्चकपालः असेंच झालें पाहिजे.

पण जें येथें तन्निमित्त–ग्रहण करावें असें म्हटलें आहे त्या तन्निमित्त शब्दाचा अर्थ तरी काय आहे?

'त्या तद्धित प्रत्ययाचा निमित्त असा जो द्विगु' तो 'तन्निमित्त' समजावा किंवा 'तो

---

१—पञ्चन् आणि नदी या शब्दांचा समाहार या अर्थी अव्ययीभाव समास (२।१।२०), नंतर पुढें 'कृष्णोदक्पाण्डुपूर्वाया भूमेरच् प्रत्ययः स्मृतः। गोदावर्याश्च नद्याश्च संख्याया उत्तरे यदि' या वचनानें समासान्त अच् प्रत्यय झाला आहे. येथेंही तद्धितार्थीं द्विगु नसल्यामुळें लुक् होत नाहीं.

४—पञ्चभ्यः गर्गेभ्यः आगतम् असा अर्थ आहे. येथें पञ्चन् आणि गर्ग या शब्दांचा तद्धितार्थी द्विगु होऊन पुढें रूप्य आणि मयट् प्रत्यय (४।३।८१,८२) झाले आहेत.

तन्निमित्तम् तन्निमित्तादिति । आहोस्वित्स निमित्तमस्य सोऽयं तन्निमित्तः तन्निमित्तादिति । किं चातः । यदि विज्ञायते तस्य निमित्तं तन्निमित्तम् तन्निमित्तादिति क्रियमाणेऽपि तन्निमित्तग्रहणे ऽत्र प्राप्नोति पञ्चकपालस्येदं खण्डमिति । अथ विज्ञायते स निमित्तमस्य सोऽयं तन्निमित्तः तन्निमित्तादिति न दोषो भवति । यथा न दोषस्तथास्तु । स निमित्तमस्य सोऽयं तन्निमित्तः तन्निमित्तादिति विज्ञायते । कुत एतत् । यदयमाहार्थविशेषासंप्रत्यये ऽतन्निमित्तादपीति ॥

तत्तर्हि तन्निमित्तग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । द्विगोरिति नैषा पञ्चमी । का तर्हि । संबन्धषष्ठी । द्विगोस्तद्धितस्य लुग्भवति । किं च द्विगोस्तद्धितः । निमित्तम् । यस्मिन्द्विगुरित्येतद्भवति । कस्मिंश्चैतद्भवति । प्रत्यये ॥ इदं तर्हि वक्तव्यमर्थविशेषासंप्रत्यये ऽतन्निमित्तादपीति । एतच्च न वक्तव्यम् । इहास्माभिस्त्रैशब्द्यं साध्यम् । पञ्चसु कपालेषु संस्कृतः । पञ्चकपाल्यां संस्कृतः । पञ्चकपालः दशकपाल इति । तत्र द्वयोः शब्द-

---

तद्धित प्रत्यय आहे निमित्त ज्याचा असा जो द्विगु' तो 'तन्निमित्त' समजावा ?

या दोन अर्थांमध्यें काय बरें फरक आहे ?

फरक असा कीं 'त्या तद्धित प्रत्ययाचा निमित्त असा जो द्विगु' असा अर्थ असेल तर तन्निमित्त–ग्रहण केलें तरी पञ्चकपालस्येदं खण्डं पाञ्चकपालम् येथें लुक् प्राप्त होतोच. आतां 'तो तद्धित प्रत्यय आहे निमित्त ज्याचा असा जो द्विगु' असा अर्थ असेल तर मात्र हा दोष येत नाहीं.

तर मग जो अर्थ घेतला असतां दोष येत नाहीं तोच अर्थ असूं दे, म्हणजे तो तद्धित प्रत्यय आहे निमित्त ज्याचा असा जो द्विगु तो तन्निमित्त द्विगु होय.

दोष येत नाहीं हें खरें, पण तसाच अर्थ घेण्याला प्रमाण काय ?

प्रमाण असें कीं हे आचार्य वार्तिककार पूर्व वार्तिकानें सिद्ध होत नाहीं म्हणून 'अर्थविशेषासंप्रत्ययेऽतन्निमित्तादपि' असें दुसरें वार्तिक करतात.

तर मग आतां एकंदरीत तन्निमित्त–ग्रहण केलें पाहिजे.

तन्निमित्त–ग्रहण करावयास नको. कारण कीं ह्या सूत्रामध्यें द्विगोः ही सूत्रकारांनीं पञ्चमी घातली आहे असें समजूं नये.

पंचमी नाहीं तर ही विभक्ति कोणती आहे?

सामान्यतः संबंध दाखविणारी षष्ठी आहे. म्हणजे द्विगूचा जो तद्धित त्याचा लुक् होतो असा अर्थ आहे.

द्विगूचा तद्धित म्हणजे कसा ?

द्विगूचा जो निमित्त तो द्विगूचा तद्धित होय. जो पुढें असतांना द्विगु अशी संज्ञा होते तो.

कोण पुढें असतांना द्विगु अशी संज्ञा होते ?

प्रत्यय पुढें असतांना द्विगु अशी संज्ञा होते.

तर मग आतां 'अर्थविशेषासंप्रत्ययेऽतन्निमित्तादपि' असें म्हटलें पाहिजे.

तेंही म्हणावयास नको. असें पहा कीं येथें एकंदर तीन तऱ्हेचे प्रयोग साधले पाहिजेतः (१) पञ्चसु कपालेषु संस्कृतः (२) पञ्चकपाल्यां संस्कृतः अशीं दोन तऱ्हेचीं वाक्यें, आणि (३) पञ्चकपालः दशकपालः अशी तद्धित प्रत्यय होऊन झालेली वृत्ति. ती जीं सारख्या अर्थाचीं वाक्यें त्यांपैकीं एका तऱ्हेच्या (२) वाक्यानें पञ्चकपालः या वृत्तीचा विग्रह फक्त दाखविला

---

५–जर तद्धित प्रत्ययाचा निमित्त द्विगु असा अर्थ असता तर पञ्चानां कपालानां समाहारः पञ्चकपाली, पञ्चकपाल्यां संस्कृतः असा विग्रह केला तरी तेथें तन्निमित्त द्विगु असल्यामुळें पूर्व वार्तिकानेंच सिद्धि होते म्हणून दुसर वार्तिक करावयाची जरूर नव्हती.

योः समानार्थयोरेकेन विग्रहो ऽपरस्मादुत्पत्तिर्भविष्यत्यविराविकन्यायेन । तद्यथा। अवेर्मांसमिति विगृह्य अविकशब्दादुत्पत्तिर्भवति आविकमिति । एवं पञ्चसु कपालेषु संस्कृत इति विगृह्य पञ्चकपाल इति भविष्यति पञ्चकपाल्यां संस्कृत इति विगृह्य वाक्यमेव । त्रैशब्द्यं चेह साध्यं तच्चैवं सति सिद्धं भवति ॥

## गोत्रे ऽलुगचि ॥४।१।८९॥

**गोत्रे ऽलुगचीति चेदितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः ॥ १ ॥**

गोत्रे ऽलुगचीति चेदितरेतराश्रयत्वादप्रसिद्धिः। केतरेतराश्रयता । अलुग्निमित्तोऽजादिरजादिनिमित्तश्चालुक्तदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते॥

**विप्रतिषेधात्तु लुकश्छविधानम् ॥ २ ॥**

विप्रतिषेधात्तु लुकश्छो भविष्यति । लुकोऽवकाशः । गर्गाः वत्साः । बिदाः उर्वाः । छस्यावकाशः । शालीयः मालीयः। गार्गीयः वात्सीयः । इहोभयं प्राप्नोति । गर्गाणां छात्रा गार्गीयाः वात्सीयाः । छो भवति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः ।

**भूम्नीति च लुक्प्राप्तो**

---

जाईल, आणि तद्धित प्रत्ययाची उत्पत्ति ही अव्यविक न्यायानें पञ्चकपाल, या तद्धितार्थी केलेल्या द्विगूहूनच होईल. उदा० अवेर्मांसम् असा विग्रह अवि शब्दानें दाखविला तरी अवि शब्दाहूनच तद्धित अण् प्रत्यय होऊन आविकम् अशीच वृत्ति होते. तसें येथें पञ्चकपाल्यां संस्कृतः असा फक्त विग्रहच पञ्चकपाली शब्दानें दाखविला जाईल आणि पञ्चकपाल शब्दाहूनच तद्धित अण् प्रत्यय होऊन वृत्ति होईल. पञ्चाकपाल्यां संस्कृतः असें फक्त पञ्चकपाली शब्दानें विग्रहवाक्य होईल. तेव्हां जे तीन तऱ्हेचे प्रयोग इष्ट आहेत ते अशा रीतीनें सिद्ध होतातच.

(सू. ८९ वा. १ ) गोत्रेऽलुगचि असा हा अजादि प्रत्यय येथें निमित्त म्हणून जर धरला तर इतरेतराश्रय दोष येतो. म्हणून कांहींच सिद्ध होणार नाहीं.

इतरेतराश्रय येथें कसा बरें येतो ?

अलुक् हा अजादि प्रत्ययाचें निमित्त आहे. आणि अजादि प्रत्यय हा येथें अलुकाचें निमित्त धरला आहे. अशा रीतीनें येथें इतरेतराश्रय दोष येतो. आणि असा इतरेतराश्रय दोष ज्या कार्यामध्यें येतो तेथें कांहींच सिद्ध होत नाहीं.

( वा. २ ) विरोध असल्यामुळें लुकाचा परत्वास्तव बाध करून अगोदर छ प्रत्यय होईल. गर्गाः वत्साः बिदाः उर्वाः येथें लुकाला ( २।४।६४ ) अवकाश आहे आणि शालीयः मालीयः येथें छ प्रत्ययाला ( ४।२।११४ ) अवकाश आहे. पण गर्गाणां छात्राः गार्गीयाः, तसेंच वात्सीयाः येथें दोघांची प्राप्ति येते तेव्हां त्यांमध्यें विप्रतिषेधानें छ प्रत्यय होतो.

येथें विप्रतिषेध मानणें बरोबर दिसत नाहीं. कारण—

( श्लो. १ ) गोत्रापत्य प्रत्ययाचा जो येथें लुक् प्राप्त होतो त्याला फक्त अपत्यांचें बहुत्व विवक्षित असलें पाहिजें एवढेंच निमित्त असल्यामुळें तो अंतरंग आहे आणि 'त्याचे छात्र'

---

६—तेव्हां पञ्चकपाली या समाहार द्विगूहून उत्पन्न झालेल्या तद्धित प्रत्ययाचा लुक् होण्याकरितां जें दुसरें वार्तिक केलें आहे तें नको असें सिद्ध झालें.

१ (सू. ८९ )—गोत्रापत्य या अर्थी केलेल्या प्रत्ययान्ताहून पुढें प्राग्दीव्यतीय अर्थी अजादि तद्धित प्रत्यय कर्तव्य असेल तर. गर्गस्य गोत्रापत्यानि गर्गाः, गर्गाणां छात्राः गार्गीयाः.

**वाह्ये चार्थे विधीयते ऽजादिः ।**
**बहिरङ्गमन्तरङ्गाद्**
**विप्रतिषेधादयुक्तं स्यात् ॥ १ ॥**

**भूम्नि प्राप्तस्य लुको**
**यदजादौ तद्धिते ऽलुकं शास्ति ।**
**एतद् ब्रवीति कुर्वन्**
**समानकालावलुग्लुक्च ॥ २ ॥**

यदयं भूम्नि प्राप्तस्य लुको ऽजादौ तद्धिते ऽलुकं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यः समानकालावेतावलुग्लुकाविति ॥

**यदि वा लुकः प्रसङ्गे**
**भवत्यलुक्छस्तथा प्रसिद्धोऽस्य ।**

यदि वा लुकः प्रसङ्गे ऽलुग्भवति तथास्य च्छः प्रसिद्धो भवति । पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः ॥

**लुग्वालुकः प्रसङ्गं**
**प्रतीक्षते छे ऽलुगस्य तथा ॥ ३ ॥**

लुग्वा पुनरलुकः प्रसङ्गं यदि प्रतीक्षते तथास्य च्छेऽलुक्सिद्धो भवति । प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते ॥

**गोत्रस्य बहुषु लोपिनो बहुवचनान्तस्य प्रवृत्तौ द्व्येकयोरलुक् ॥ ३ ॥**

गोत्रस्य बहुषु लोपिनो बहुवचनान्तस्य प्रवृत्तौ द्व्येकयोरलुग्वक्तव्यः । बिदानामपत्यं माणवको बैदः । बैदौ । किमर्थमिदं नाचीत्येवालुक्सिद्धः।अचीत्युच्यते न चात्राजादिं

वगैरे बाह्य अर्थी अजादि प्रत्यय सांगितला असल्यामुळें तो बहिरंग आहे. तेव्हां तो बहिरंग अजादि प्रत्यय अंतरंग लुकापेक्षां विप्रतिषेधानें होतो हें म्हणणें योग्य दिसत नाहीं.

(श्लो. २) बहुत्वाची विवक्षा असतांना प्राप्त होणाऱ्या लुकाचा बाधक म्हणून जो हा अजादि तद्धित प्रत्ययाच्या निमित्तानें आचार्य अलुक् सांगत आहेत त्या आचार्यांच्या ह्या कृतीवरून अलुक् आणि लुक् हे समानकालीं प्राप्त होणारे आहेत असें ते सुचवीत आहेत.

(श्लो. ३) 'पूर्वी अपवाद मनांत येतात आणि मागून उत्सर्ग मनांत येतात' या न्यायाला अनुसरून जर लुक् प्राप्त होतो त्याच वेळीं अलुक् या अपवादाचा संभव आहे किंवा नाहीं हा विचार केला असतां अपवादाचा विषय आहे असें समजून उत्सर्ग मागें सरला तर छ प्रत्यय सहजच होईल.

अपवादाच्या विषयाची कल्पना करून तो अपवादाचा विषय सोडून इतर ठिकाणीं उत्सर्ग होतो या न्यायाला अनुसरून जर येथें पूर्वी प्राप्त झालेला लुक् अपवादाची प्राप्ति येते कीं नाहीं ती वाट पहात बसेल तरी देखील छ–प्रत्यय होऊन अलुक् प्राप्त होतोच.

( वा. ३ ) बहुत्व–विवक्षा असतांना ज्या गोत्र प्रत्ययाचा लुक् सांगितला आहे अशा बहुवचनान्त शब्दाहून पुढें युवापत्य अर्थी प्रत्यय कर्तव्य असेल व तें युवापत्य एक किंवा दोन अशी विवक्षा असेल तर त्या गोत्र प्रत्ययाचा लुक् होत नाहीं असें म्हणावें. उदा०—बिदस्य गोत्रापत्यानि बिदाः; बिदानामपत्यं माणवकः बैदः, माणवकौ बैदौ.

हें वचन कशाकरितां केलें आहे? तें करूं नये. प्रकृत सूत्रानेंच तेथें लुक् सिद्ध आहे.

पण प्रकृत सूत्रामध्यें अचि असें म्हटलें आहे ना? आणि बैदः बैदौ येथें तर अजादि प्रत्यय दृष्टीस पडत नाहीं.

२—उलट लुक् हा अगोदरच प्राप्त होत असल्यामुळें तोच अजादि प्रत्ययापेक्षां ज्यास्त बलवान् होणार आहे.

३—लुक् पूर्वीच येतो. आणि मागाहून छ प्रत्यय केल्यानंतर अलुक् येतो. असें असतांही ते दोघे समान कालीं प्राप्त होतात अशी कल्पना दोन तऱ्हेनें संभवते: लुकाच्या वेळींच अलुक् किंवा अलुकाच्या वेळीं लुक्. ह्यांपैकीं पहिली तऱ्हा म्हणजे लुक् प्राप्त होतो त्याच वेळी अलुकाचा संभव आहे कीं नाहीं तें पाहणें; आणि दुसरी तऱ्हा म्हणजे लुक् पूर्वी प्राप्त झाला तरी त्याला अलुकाची प्राप्ति येईपर्यंत थोपवून धरणें.

४—बिद शब्दाहून गोत्रापत्य या अर्थी अञ् प्रत्यय (४।१।१०४), त्याचा लुक् (२।४।६४) प्राप्त झाला आहे. त्याच्या पुढें केलेला जो इञ् (४।१।९५) हा युव–प्रत्यय त्याचा लुक् (२।४।५८) झाला आहे.

पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम् ॥

## एकवचनद्विवचनान्तस्य प्रवृत्तौ बहुषु लोपो यूनि ॥ ४ ॥

एकवचनद्विवचनान्तस्य प्रवृत्तौ बहुषु लोपो यूनि वक्तव्यः । बैदस्यापत्यं बहवो माणवका बिदाः । बैदयोर्बिदाः । अञ्यो बहुषु यञ्यो बहुष्वित्युच्यमानो लुग्न प्राप्नोति । मा भूदेवमञ्यो बहुषु यञ्यो बहुष्विति । अञन्तं यद्बहुषु यञन्तं यद्बहुष्वित्येवं भविष्यति । नैवं शक्यम् । इह हि दोषः स्यात् । काश्यपप्रतिकृतयः काश्यपा इति ॥

नैष दोषः । यत्तावदुच्यते गोत्रस्य बहुषु लोपिनो बहुवचनान्तस्य प्रवृत्तौ द्व्येकयोरलुग्वक्तव्य इति न वक्तव्यः । अचीत्येवालुक्सिद्धः । अचीत्युच्यते न चात्राजादिं पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । ननु चोक्तं वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणमिति । यदि वा कानिचिद्वर्णाश्रयाण्यपि प्रत्ययलक्षणेन

इञ् ह्या युव-प्रत्ययाचा लुक् झाला असला तरी प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) तो अजादि प्रत्यय पुढें आहे असें समजतां येईल.

वर्णाच्या मिमित्तानें सांगितलेलें कार्य कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असा निषेध आहे.

(वा. ४) एकत्वाची किंवा द्वित्वाची विवक्षा असतांना ज्या गोत्र प्रत्ययाचा लुक् होत नाहीं त्या शब्दाहून पुढें युवापत्य या अर्थी प्रत्यय कर्तव्य असेल व त्या युवापत्यांचें बहुत्व विवक्षित असेल तर त्या गोत्रप्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें. उदा०—बिदस्य गोत्रापत्यं बैदः, बैदौ. बैदस्य युवापत्यानि बिदाः. माणवकाः, बैदयोर्युवापत्यानि बिदाः माणवकाः, बहुत गोत्रापत्यें या अर्थाचा जो अञ् प्रत्यय आणि बहुत गोत्रापत्यें या अर्थाचा जो यञ् प्रत्यय त्यांचा सांगितलेला जो लुक् (२।४।६४) तो येथें प्राप्त होत नाहीं.

बहुत गोत्रापत्यें या अर्थाचा जो अञ् आणि बहुत गोत्रापत्यें या अर्थाचा जो यञ् त्यांचा लुक् होतो या अर्थानें येथें लुक् झाला नाहीं तरी न होऊं दे. अञ्-प्रत्ययान्ताच्या अर्थाचें बहुत्व असतांना तसेंच यञ्-प्रत्ययान्ताच्या अर्थाचें बहुत्व असतांना त्या प्रत्ययांचा लुक् होतो अशा अर्थानें येथें लुक् होईल.

त्या सूत्राचा तसा अर्थ घेणें शक्य नाहीं. कारण तसा अर्थ घेतला तर कश्यपस्य 'गोत्रापत्यं काश्यपः कश्यपस्य प्रतिकृतयः काश्यपाः येथें लुक् होईल असा दोष येतो.

हीं दोन्ही वार्तिकें करावयास नकोत. बैदः बैदौ बिदाः येथें दोष येत नाहीं. युवापत्य एक किंवा दोन अशी विवक्षा असतांना तेथें गोत्रापत्याच्या बहुत्वाची विवक्षा असली तरी लुक् होत नाहीं असें जें म्हटलें आहे तें म्हणावयास नको. प्रकृत सूत्रानेंच तेथें लुकाचा निषेध सिद्ध आहे.

पण प्रकृत सूत्रामध्यें अचि असें म्हटलें आहे ना ? आणि बैदः बैदौ येथें तर अजादि प्रत्यय दृष्टीस पडत नाहीं.

इञ् हा अजादि युव-प्रत्यय प्रत्ययलक्षणानें पुढें आहे असें समजतां येतें.

पण वर्णाच्या निमित्तानें सांगितलेलें कार्य कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षणाचा निषेध आहे ना?

कांहीं ठिकाणीं वर्णाच्या निमित्तानें सांगि-

५ - प्रकृत सूत्रामध्यें अचि असें म्हटलें असल्यामुळें ह्या कार्याला वर्ण निमित्त आहे असें समजतें.

६—कश्यप शब्दाहून गोत्रापत्य या अर्थी कन् प्रत्यय (४।१।१०४), नंतर त्याची प्रतिकृति या अर्थी कन् कार्यें झालीं आहेत. त्यामुळें प्रतिकृति हा अर्थ अञ्-प्रत्ययान्तालाच आलेला आहे. अशा अनेक प्रतिकृती येथें विवक्षित आहेत.

७—मागें (१।१।६२ वा. १३) पाहणें.

भवन्ति तथा चेदमपि भविष्यति ॥ अथवा-विशेषेणालुकमुक्त्वा हलि नेति वक्ष्यामि । अविशेषेणालुकमुक्त्वा हलि नेत्युच्यते बिदानामपत्यं बहवो माणवका बिदाः अत्रापि प्राप्नोति । अस्तु । पुनरस्य युवबहुत्वे वर्तमानस्य लुग्भविष्यति । पुनरलुकस्मान्न भवति । समर्थानां प्रथमस्य गोत्रप्रत्ययान्तस्यालुगुच्यते न चैतत्समर्थानां प्रथमं गोत्रप्रत्ययान्तम् । किं तर्हि । द्वितीयमर्थमुपसंक्रान्तम् । अवश्यं चैतदेवं विज्ञेयमात्रिभरद्वाजिका वसिष्ठकश्यपिका भृग्वङ्गिरसिका कुत्सकुशिकिकेत्येवमर्थम् ।

गर्गभार्गविकाग्रहणं वा नियमार्थम् ॥५॥

अथवा गर्गभार्गविकाग्रहणं नियमार्थं

---

तलेलीं हीं कार्ये जर प्रत्यय लक्षणानें होतात तर त्याप्रमाणें येथेंही प्रत्ययलक्षणानें लुकाचा निषेध होईल.

अथवा, प्रकृत सूत्रामध्यें अचि असें न म्हणतां मोघमच लुकाचा निषेध सांगावा. आणि पुढें 'हलि न' म्हणजे हलादि प्रत्यय पुढें असतांना हा निषेध होत नाहीं असें म्हणावें.

पण, जर लुकाचा निषेध मोघम सांगून पुढें 'हलि न' असें म्हटलें तर बिदस्य गोत्रापत्यानि बिदाः याच्या पुढें युवापत्य अर्थी बिदानामपत्यं बहवो माणवकाः बिदाः असा इञ् प्रत्यय केला असतां त्याचा लुक् होतो ( २।४।४८ ) तेथें त्या अञ् प्रत्ययाच्या लुकाचा प्रकृत सूत्रानें निषेध होऊं लागेल.

त्या वेळीं आलेल्या लुकाचा निषेध झाला तर होऊं दे पण पुढें त्याच अञ् प्रत्ययान्ताला युवापत्यें हा अर्थ प्राप्त झाल्यानंतर त्या निमित्तानें अञ् प्रत्ययाचा लुक् होईल.

पण त्या निमित्तानें पुनः प्राप्त झालेल्या लुकाचाही प्रकृत सूत्रानें निषेध कां होत नाहीं.

समर्थांमध्यें प्रथम जें गोत्र–प्रत्ययान्त तेथेंच प्रकृत सूत्रानें लुकाचा निषेध होतो. आणि येथें बैद हें समर्थांमध्यें प्रथम गोत्र–प्रत्ययान्त नव्हे. तर ह्या अञ् प्रत्ययान्ताला येथें गोत्र हा अर्थ दुसरा प्राप्त झाला आहे. आणि असें तर अवश्य मानलेंच पाहिजे. कारण, अत्रिभरद्वाजिका, वसिष्ठकश्यपिका, कुत्सकुशिकिका हीं उदाहरणें साधणें जरूर आहे.

(वा. ५) अथवा गर्गभार्गविका या शब्दाचें ग्रहण करावें तें नियमार्थ होईल. तो नियम असा कीं—ज्या गोत्र–प्रत्ययान्ताला दुसरा

---

८—तेव्हां या निषेधाला वर्ण हा निमित्त नसल्यामुळें प्रत्ययलक्षणाचा निषेध होणार नाही आणि गर्गस्य गोत्रापत्यानि गर्गाः, गर्गेभ्य आगतं गर्गरूप्यम् येथें गोत्रापत्य या अर्थी केलेल्या यञ् प्रत्ययाचा लुक होतो. कारण रूप्य हा प्रत्यय (४।३।८१) हलादि आहे.

९—युवापत्य अर्थी केलेल्या इञ प्रत्ययाचा लुक् (२।४।५८) झाल्यानंतर पुष्कळ युवापत्यें हा अर्थ पूर्वीच्या अञ् प्रत्ययान्तालाच प्राप्त होतो आणि युवापत्याला लौकिक गोत्रसंज्ञा आहेच. आणि लुष् सांगणाऱ्या शास्त्रामध्यें लौकिक गोत्राचें ग्रहण केलें आहे.

१०—अत्रि शब्दाहून बहुत गोत्रापत्यें या अर्थी ढक् (४।१।१२२) पुढें बहुत युवापत्यं या अर्थी इञ् (४।१।९५), त्या इञ् प्रत्ययाचा लुक् (२।४।५८) आणि ढक् प्रत्ययाचाही लुक् (२।४।६५) अशीं कार्ये झालीं आहेत. तसेंच भरद्वाज शब्दाहून गोत्रापत्य अर्थी अञ् प्रत्यय (४।१।१०४), पुढें युवापत्य अर्थी इञ् प्रत्यय, त्या दोन्ही प्रत्ययांचे लुक् पुढें अत्रि आणि भरद्वाज यांचा द्वंद्व करून नंतर त्यांची मैथुनिका (दांपत्यसंबंध) या प्राग्दीव्यतीय अर्थी वुञ् प्रत्यय (४।३।१२५) अशीं कार्ये झालीं आहेत. येथें प्रकृत सूत्रानें लुकाचा निषेध न व्हावा म्हणून प्रथम गोत्र-प्रत्ययान्त असें म्हटलें पाहिजे. याप्रमाणें पुढील सर्व उदाहरणांत समजावें. वसिष्ठ, भृगु, अङ्गिरस आणि कुत्स यांहून गोत्रापत्य अर्थी अण् (४।१।११४) कश्यप व कुशिक यांहून गोत्रापत्य अर्थी अञ् प्रत्यय (४।१।१०४) पुढें युवापत्य अर्थी इञ् प्रत्यय त्याचा लुक् वगैरे, वगैरे.

भविष्यति । एतस्यैव द्वितीयमर्थमुपसंक्रान्तस्यालुग्भवति नान्यस्येति ॥ यदप्युच्यत एकवचनद्विवचनान्तस्य च प्रवृत्तौ बहुषु लोपो यूनि वक्तव्योऽञ्यो बहुषु यञ्यो बहुष्वित्युच्यमानो लुग्न प्राप्नोतीति मा भूदेवमञ्यो बहुषु यञ्यो बहुष्वित्यञन्तं यद्बहुषु यञन्तं यद्बहुष्वित्येवं भविष्यति । ननु चोक्तं नैवं शक्यमिह हि दोषः स्यात्काश्यपप्रतिकृतयः काश्यपा इति । नैष दोषः । लौकिकस्य तत्र गोत्रस्य ग्रहणं न चैतल्लौकिकं गोत्रम् ॥ यद्यञन्तं यद्बहुषु यञन्तं यद्बहुष्वित्येवमुच्यते बिदानामपत्यं माणवको बैदः बैदौ अत्रापि प्राप्नोति । अलुगत्र लुकं बाधिष्यते ऽलुकि च कृते पुनर्लुको निमित्तं नास्तीति कृत्वा पुनर्लुग्न भविष्यति ॥

उक्तं वा ॥ ६ ॥

किमुक्तम् । आपत्यो वा गोत्रं परमप्रकृतेश्चापत्य आपत्याज्जीवद्वंश्यात्स्वार्थे द्वितीयो युवसंज्ञः स चास्त्रियामेकोगोत्रग्रहणानर्थक्यं च बहुवचनलोपिषु च सिद्धमिति । तत्र

---

गोत्रापत्य हा अर्थ प्राप्त होतो त्या ठिकाणीं जर प्रकृत सूत्रानें दुसरा गोत्रापत्य या अर्थामुळें गोत्रापत्यवाचक समजून लुकाचा निषेध होईल तर फक्त गर्गभार्गविका या शब्दामध्येंच होतो, इतर ठिकाणीं होत नाही.

तसेंच 'युवापत्यांचें बहुत्व विवक्षित असेल तर तेथें गोत्रापत्यांचें बहुत्व विवक्षित नसलें तरी त्या गोत्रापत्य प्रत्ययाचा लुक् होतो' असें जें म्हटलें आहे तेंही म्हणावयास नको.

पण बहुत गोत्रापत्यें या अर्थाचा जो अञ् प्रत्यय आणि त्याच अर्थाचा जो यञ् प्रत्यय त्यांचा लुक् सांगितला असल्यामुळें तो प्राप्त होत नाहीं असें म्हटलें आहे ना ?

बहुत गोत्रापत्यें या अर्थाचा जो यञ् अथवा अञ् त्याचा लुक् होतो या अर्थानें लुक् होत नसेल तर न होऊं दे. बहुत गोत्रापत्यें या अर्थाचें जें अञ्–प्रत्ययान्त अथवा यञ्–प्रत्ययान्त शब्दस्वरूप त्यांतील अञ् अथवा अञ् प्रत्ययाचा लुक् होतो असा अर्थ घेतला असतां लुक् होईल[११].

पण तसा अर्थ घेणें शक्य नाहीं कारण तसा अर्थ घेतला तर कश्यपस्य गोत्रापत्यं काश्यपः काश्यपस्य प्रतिकृतयः काश्यपाः येथें अञ् प्रत्ययाचा लुक् होऊं लागेल असा दोष दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण लुक् सांगणाऱ्या शास्त्रामध्यें लौकिक गोत्राचें ग्रहण केलें आहे. आणि येथें प्रतिकृतींचें बहुत्व आहे. प्रतिकृति कांहीं गोत्र नव्हेत.

पण बहुत गोत्रपत्यें या अर्थाचे जें अञ् प्रत्ययान्त अथवा यञ्–प्रत्ययान्त असा अर्थ घेतला तर बिदस्य बहूनि गोत्रापत्यानि बिदाः बिदानामयमपत्यं माणवकः बैदः येथें तसेंच बैदौ येथेंही लुक् होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण, प्रकृत सूत्रानें सांगितलेला अलुक् हा लुकाचा बाध करील आणि अलुक् केल्यानंतर युवापत्य या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् झाल्यामुळें त्या अञ्-प्रत्ययान्ताला तो अर्थ असला तरी तेथें बहुत्व हें निमित्त नसल्यामुळें पुनः लुकाची प्राप्ति येणार नाहीं.

(वा. ६) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे.

आपत्यं वा गोत्रम् परमप्रकृतेश्चापत्यः. आपत्याज्जीवद्वंश्यात्स्वार्थे द्वितीयो युवसंज्ञः स चास्त्रियाम् एको गोत्रग्रहणानर्थक्यं च बहुषु च नलोपिषु च सिद्धम्. (४।१।१६३ वा. ४–९) या वार्तिकांमध्यें जें सांगावयाचें तें सांगितलेंच आहे. या वार्तिकांचा अर्थः— साक्षात् किंवा परंपरेनें अपत्याचें जें अपत्य तें आपत्य

---

११—युवापत्य या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर तो अर्थ मागील अञ्–प्रत्ययान्ताला प्राप्त होतो. आणि युवापत्याला लौकिक गोत्र संज्ञा आहेच.

बिदानामपत्यं माणवक इति विगृह्य बिद-शब्दाद् द्व्येकयोरुत्पत्तिर्भविष्यति बिदा इत्यविरविकन्यायेन ॥

## यूनि लुक् ॥ ४।१।९० ॥

### यूनि लुगचीति चेत्प्रत्ययस्यायथेष्टप्रसङ्गः ॥ १ ॥

यूनि लुगचीति चेत्प्रत्ययस्यायथेष्टं प्राप्नोति । अनिष्टे प्रत्यये ऽवस्थिते लुक् । अनिष्टप्रत्ययस्य श्रवणं प्रसज्येत ॥

### सिद्धं त्वविशेषेण लुग्वचनं हलि च प्रतिषेधः ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । अविशेषेण लुक-मुक्त्वा हलि नेति वक्ष्यामि । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं यूनि लुगचीति चेत्प्रत्ययस्यायथेष्ट-प्रसङ्ग इति । नैष दोषः । अचीति नैषा

---

होय. त्याला गोत्र म्हणतात. गोत्र या अर्थाची विवक्षा असेल तेथें त्या अर्थी एकदम मूळ प्रकृतीहूनच प्रत्यय होतो. जीवद्वंश्य (५।१।-१६३) वगैरे निमित्तानें युव संज्ञा असेल तेथें अपत्याचें अपत्य या अर्थी एकदम केलेल्या प्रत्ययाच्या पुढें युवसंज्ञक जो दुसरा प्रत्यय तो स्वार्थींच होतो. तो स्त्रीत्व–विवक्षा असतांना मात्र होत नाहीं. एको गोत्रे (४।१।९३) लोप होतो तेथेंही अशा रीतीनें इष्ट सिद्ध होतें. उदा०–बिदस्य गोत्रापत्यानि बिदाः बिदा-नामपत्यं माणवकः असा विग्रह केला असतां तेथें माणवक एक असो किंवा दोन असोत मूळ बिद शब्दाहूनच एकदम प्रत्यय करून बैदः बैदौ अशीं रूपें होतील. आणि बिदस्य गोत्रा-पत्यं बैदः बैदस्यापत्यानि बहवो माणवकाः असा विग्रह केला असतां तेथें मूळ बिद शब्दा-हून एकदम बहुत अपत्यें या अर्थी प्रत्यय करून बिदाः असें रूप होईल. ही गोष्ट अविर-विकन्यायानें सिद्ध होतें.

(सू. ९० वा. १) अजादि प्राग्दीव्यतीय प्रत्यय पुढें असतांना युवापत्य प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हटलें तर युव प्रत्ययान्ताहून अनिष्ट प्रत्यय प्राप्त होतो. तो अनिष्ट प्रत्यय पुढें केल्यानंतर युव प्रत्ययाचा लुक् होईल. आणि तो लुक् होण्याच्या पूर्वी केलेला अनिष्ट प्रत्यय राहूं लागेल.

(वा. २) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं अजादि प्रत्यय पुढें असतांना असें न म्हणतां मोघमच प्रकृत सूत्रानें लुक् सागून हलादि प्रत्यय पुढें असेल तर तो लुक् होत नाहीं असा निषेध करावा म्हणजे झालें.

अशा रीतीनें सिद्ध होईल. पण सूत्रामध्यें फिरवाफिरव करावी लागते ना ?

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण अजादि प्रत्यय पुढें असतांना युव प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हटलें तर अनिष्ट प्रत्यय होऊं लागेल असा दोष दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं कारण ह्या सूत्रांतील अचि ही परसप्तमी समजूं नये.

---

१२—या न्यायाचें स्वरूप मागील सूत्रांत टीप २ मध्यें सांगितलेंच आहे. तेव्हां विग्रह वाक्यावरून जरी दोन प्रत्यय करावे असें मनांत येतें तरी वृत्तीमध्यें एकच प्रत्यय एकदम त्या अर्थी होतो.

१ (सू. ९०)—युव-प्रत्ययान्ताच्या पुढें जर प्राग्दीव्यतीय अजादि प्रत्यय कर्तव्य असेल तर तो प्रत्यय करण्याच्या पूर्वीच युवप्रत्ययाचा लुक् होतो, उदा०-फाण्टाहृत शब्दाहून गोत्रापत्य या अर्थी इञ् प्रत्यय (४।१।९५), त्याच्यापुढें युवापत्य अर्थी ण प्रत्यय (४।१।१५०) त्याच्या पुढें त्याचे शिष्य या शैषिक अर्थी प्रत्ययाचा लुक् होतो, नंतर मागील शब्द इञ् प्रत्ययान्त असल्यामुळें त्याहून शैषिक अर्थी 'इञश्च' (४।२।११२) या सूत्रानें अण् प्रत्यय होऊन फाण्टाहृताः छात्राः असें होतें.

परसप्तमी । का तर्हि । विषयसप्तमी । अजादौ विषय इति । तत्राचि विषये लुकि कृते यो यतः प्रत्ययः प्राप्नोति स ततो भविष्यति ॥

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि ।

**प्रयोजनं सौवीरगोत्रेभ्यो णठक्छाः ॥३॥**

ण । फाण्टाहृतेरपत्यं माणवकः फाण्टाहृतः । फाण्टाहृतस्य यूनश्छात्राः फाण्टाहृताः । ण ॥ ठक् । भागवित्तेरपत्यं माणवको भागवित्तिकः । भागवित्तिकस्य यूनश्छात्रा भागवित्ताः । ठक् ॥ छ । तैकायनेरपत्यं माणवकस्तैकायनीयः । तैकायनीयस्य यूनश्छात्रास्तैकायनीयाः ॥

**इञ्ण्यौ सर्वत्र ॥ ४ ॥**

इञ्ण्यौ सर्वत्र प्रयोजनम् । औपगवेर्यूनश्छात्रा औपगवीयाः । वृद्धवदतिदेशे सतीञो गोत्र इत्यण्प्राप्नोति ॥ नैष दोषः । प्रत्याख्यायतेऽसावतिदेशः । कथं यानि प्रयोजनानि । तानि ज्ञापकेन सिद्धानि ॥ यत्खच्छान्तात्तर्हीञः प्रयोजनम् । यत् । श्वशुरस्यापत्यं श्वशुर्यः । श्वशुर्यस्यापत्यं

तर मग कोणती समजावी ?

विषयसप्तमी समजावी. अजादि प्रत्ययाची विवक्षा असतांना असा अर्थ आहे. अर्थात् अजादि प्राग्दीव्यतीय प्रत्यय करावयाचा मनांत आणल्याबरोबर अगोदरच युव प्रत्ययाचा लुक् करून नंतर पुढें जो अजादि प्रत्यय प्राप्त होईल तो लुकाचे पूर्वी प्राप्त होत नसला तरी तो होईल.

पण अगोदर ह्या सूत्राचीं प्रयोजनें कोणतीं बरें?

फाण्टाहृतेरपत्यम् या अर्थी फाण्टाहृति या इञन्ताहून युवापत्य अर्थी ण प्रत्यय ( ४।१।१५० ) होतो. त्या फाण्टाहृताचें छात्र या अर्थी छ प्रत्यय प्राप्त होतो. परंतु अगोदरच ण प्रत्ययाचा लुक् झाल्यामुळें त्या छ प्रत्ययाचा बाध करून अण् ( ४।२।११२ ) प्रत्यय होतो. तसेंच भागवित्तीचें अपत्य या अर्थी भागवित्ति या इञ्-प्रत्ययान्ताहून युवापत्य अर्थी ठक् प्रत्यय ( ४।१।१४८ ) होतो. त्या भागवित्तिकाचें छात्र या शैषिक अर्थी छ प्रत्यय प्राप्त होतो. परंतु अगोदरच त्या ठक् प्रत्ययाचा लुक् झाल्यामुळें त्या इञ्-प्रत्ययान्त प्रकृतीहून छ प्रत्ययाचा बाध करून अण् प्रत्यय होतो. तसेंच तैकायनीचें अपत्य या अर्थी तैकायनि या फिञ्-( ४।१।१५४ ) प्रत्ययान्ताहून युवापत्य या अर्थी छ प्रत्यय ( ४।१।१४९ ) होतो. पुढें त्या तैकायनीयाचे छात्र या शैषिक अर्थी छ प्रत्यय ( ४।२।११५ ) होतो. पूर्वीच्या छ प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लुक् होतो.

( वा. ४ ) इञ् ( ४।१।९५ ) आणि ण्य ( ४।१।१७२ ) हे युवापत्य या अर्थी कोणत्याही शब्दाहून केलेले असोत तेथें त्यांचा प्रकृत सूत्रानें लुक् करणें हा उपयोग होतोच. उदा०—उपगोर्गोत्रापत्यम् औपगवः; तस्यापत्यं युवा औपगविः; तस्य च्छात्राः औपगवीयाः. युवापत्य हें गोत्रापत्यासारखें समजावें ( पुढील वा. ५ ) या अतिदेशानें हा इञ् गोत्रापत्यार्थक होतो म्हणून अण् प्रत्यय ( ४।२।११२ ) होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण त्या अतिदेशाचें प्रत्याख्यानच केलें आहे.

पण त्या अतिदेशाचीं जीं उदाहरणें आहेत त्यांची वाट काय ?

तीं उदाहरणें ज्ञापकानें सिद्ध होतात[१].

तर मग, यत्, ख आणि छ हे प्रत्यय केल्यानंतर पुढें युवापत्य या अर्थी केलेल्या इञ् प्रत्ययाचा लुक् होणें हें प्रकृत सूत्राचें प्रयोजन होय. उदा० श्वशुरस्यापत्यं श्वशुर्यः,

२—तसाच कापिञ्जलादेर्गोत्रापत्यं कापिञ्जलादिः, तस्यापत्यं युवा या अर्थी ण्य प्रत्यय होऊन कापिञ्जलाद्यः, हे त्या ण्य प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लुक् झाला म्हणून पुढें तस्य छात्राः या अर्थी इञ् प्रत्ययान्ताहून अण् प्रत्यय ( ४।२।११२ ) होतो.

१—पुढील वार्तिक ५ वरील भाष्य पाहावें.

श्वाशुरिः । श्वाशुरेर्यूनश्छात्राः श्वाशुराः । यञ् ॥ ख । कुलस्यापत्यं कुलीनः । कुलीनस्यापत्यं कौलीनिः । कौलीनेर्यूनश्छात्राः कौलीनाः । ख ॥ छ । स्वसुरपत्यं स्वस्रीयः । स्वस्रीयस्यापत्यं स्वास्रीयिः । स्वास्रीयेर्यूनश्छात्राः स्वास्रीयाः ॥ एतान्यपि हि न सन्ति प्रयोजनानि । अत्रापि यूनि श्वशुर्यः कुलीनः स्वस्रीय इत्येव भवितव्यम् । उक्तमेतदणिञोर्लुक्यब्राह्मणगोत्रमात्राद्युवप्रत्ययस्योपसंख्यानमिति । अब्राह्मणगोत्रमात्रादित्युच्यते न चैतदब्राह्मणगोत्रमात्रम् । अब्राह्मणगोत्रमात्रादिति नायं पर्युदासो यदन्यद्ब्राह्मणगोत्रमात्रादिति । किं तर्हि । प्रसज्यायं प्रतिषेधो ब्राह्मणगोत्रमात्रान्नेति । अवश्यं चैतदेवं विज्ञेयं मायूरिः कापोतिः कापिञ्जलिरित्येवमर्थम् ॥ एवं तर्ह्यण्ण्यौ सर्वत्र प्रयोजनम् । अण् । ग्लुचुकायनेरपत्यं माणवको ग्लौचुकायनः । ग्लौचुकायनस्य यूनश्छात्रा ग्लौचुकायनाः । ण्यश्च कापिञ्जलाद्यर्थम् । कापिञ्जलादेरपत्यं माणवकः कापिञ्जलाद्यः । तस्य यूनश्छात्राः कापिञ्जलादाः ॥

श्वशुर्यस्यापत्यं श्वाशुरिः येथें युवापत्य या अर्थी इञ् प्रत्यय झाला आहे. श्वाशुरेश्छात्राः श्वाशुराः, तसेंच कुलस्यापत्यं कुलीनः कुलीनस्यापत्यं कौलीनिः कौलीनेश्छात्राः कौलीनाः. तसेंच स्वसुरपत्यं स्वस्रीयः, स्वस्रीयस्यापत्यं स्वास्रीयिः, स्वास्रीयेश्छात्राः स्वास्रीयाः.

हींही प्रकृत सूत्राचीं उदाहरणें बरोबर नाहींत. कारण, पुढें शैषिक प्रत्यय केला नाहीं तरी युव प्रत्ययाचा लुक् होऊन त्या अर्थींच श्वशुर्यः कुलीनः व स्वस्रीयः अशीं रूपें झालीं पाहिजेत. कारण ' अणिञोर्लुकि अब्राह्मणगोत्रमात्राद्युवप्रत्ययस्योपसंख्यानम् ' ( २।४।५८ पृ. ४८९ पं. ७ ) असें मागें सामान्यतः लुकाचें विधान केलेंच आहे.

पण तेथें ' अब्राह्मणगोत्रमात्रात् ' असें म्हटलें आहे ना ? आणि श्वशुर्यः कुलीनः व स्वस्रीयः हे शब्द तर ब्राह्मणभिन्नालाच लागतात असें नाहीं.

अब्राह्मणगोत्रमात्रात् हा पर्युदास नव्हे म्हणजे ब्राह्मणगोत्राला लागणारे जे जे शब्द त्यांहून निराळे क्षत्रिय वगैरे असा अर्थ नाहीं. तर हा प्रसज्यप्रतिषेध आहे. म्हणजे ब्राह्मणगोत्रालाच फक्त लागणारे जे शब्द तेथें लुक् होत नाहीं. शिवाय मायूरिः, कापोतिः व कापिञ्जलिः येथें युव–प्रत्ययाचा लुक् होण्याकरितां प्रसज्यप्रतिषेध घेतलाच पाहिजे.

तर मग, अण् आणि ण्य हे प्रत्यय युवापत्य या अर्थी कोणत्याही शब्दाहून केलेले असोत तेथें त्यांचा प्रकृत सूत्रानें लुक् करणें हा उपयोग होतोच.

उदा०–ग्लुचुकायनि या फिन् (४।१।१६०) प्रत्ययान्त शब्दाहून युवापत्य अर्थी अण् प्रत्यय ( ४।१।९२ ) होऊन ग्लौचुकायन असें रूप होतें. पुढें त्याचे छात्र या अर्थी शैषिक प्रत्यय कर्तव्य असतांना प्रकृत सूत्रानें अण् प्रत्ययाचा लुक् झाल्यामुळें ग्लुचुकायनि हे वृद्ध(१।१।७३) नव्हे म्हणून छ प्रत्यय ( ४।२।११४ ) न होतां अण् होऊन ग्लौचुकायनाः असें होतें. तसेंच कापिञ्जलादि शब्दांच्या पुढील ण्य प्रत्ययाचा लुक् होणें हाही प्रकृत सूत्राचा उपयोग होय. कापिञ्जलादि शब्दाहून युवापत्य अर्थी ण्य प्रत्यय (४।१।१०२) होऊन कापिञ्जलाद्य असें होतें. पुढें त्या कापिञ्जलाद्याचे छात्र या अर्थी अण् प्रत्यय होऊन कापिञ्जलादाः असें होतें.

४–पर्युदास घेतला तर ब्राह्मणसदृश क्षत्रिय वगैरेंचें गोत्र विवक्षित असेल तेथेंच लुक् होईल आणि मायूरिः वगैरे उदाहरणांमध्यें पक्ष्यांचीं गोत्रें विवक्षित असल्यामुळें तेथें युवापत्य अर्थी केलेल्या फक् प्रत्ययाचा ( ४।१।१०१ ) लुक् होणार नाहीं.

५–मागील टीप २ पहा.

प्राग्दीव्यतोऽधिकारे यूनो वृद्धवदतिदेशः ॥ ५ ॥

प्राग्दीव्यतोऽधिकारे यूनो वृद्धवदतिदेशः कर्तव्यः। युवा वृद्धवद्भवतीति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। गार्ग्यायणानां समूहो गार्ग्यायणकम्। गार्ग्यायणानां किंचिद्गार्ग्यायणकम्। गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः। गोत्राश्रयो वुञ्यथा स्यात् ॥ यदि वृद्धवदतिदेशः क्रियत औपगवेर्यूनश्छात्त्रा औपगवीया इतीञो गोत्र इत्यण्प्राप्नोति ॥

यदि पुनर्युवा वृद्धवदित्यनेनानुत्पत्तिस्तिदिश्येत। कथं पुनर्युवा वृद्धवदित्यनेनानुत्पत्तिः शक्यातिदेष्टुम्। वतिनिर्देशोऽयं कामचारश्च वतिनिर्देशे वाक्यशेषं समर्थयितुम्। तद्यथा। उशीनरवन्मद्रेषु यवाः। सन्ति न सन्तीति। मातृवदस्याः कलाः। सन्ति न सन्तीति। एवमिहापि युवा वृद्धवद्भवति वृद्धवन्न भवतीत्येवं वाक्यशेषं

(वा. ५) युवापत्य या अर्थी प्रत्यय करून पुढें प्राग्दीव्यतीय अर्थी प्रत्यय कर्तव्य असतांना तें युवापत्य गोत्रापत्यासारखें समजावें असा अतिदेश करावा.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं गार्ग्यायणानां समूहः गार्ग्यायणकम् (४।२।३९) गार्ग्यायणानां किंचित् गार्ग्यायणकम् (४।३।१२६) गार्ग्यायणो भक्तिः अस्य गार्ग्यायणकः (४।३।९९) या तिन्ही ठिकाणीं गोत्र—प्रत्ययान्ताहून सांगितलेला वुञ् प्रत्यय गार्ग्यायण या युव-प्रत्ययान्ताहून (४।१।१०१) झाला पाहिजे.

पण जर युवापत्याला गोत्र प्रत्ययासारखा असा अतिदेश केला तर औपगव या अण् प्रत्ययान्ताहून युवापत्य अर्थी इञ् प्रत्यय केल्यानंतर त्याहून त्याचे शिष्य या शैषिक अर्थी छ प्रत्यय (४।२।११४) न होतां त्याचा बाध करून इञश्च (४।२।११२) या सूत्रानें अण् प्रत्यय होऊं लागेल.

आतां जर 'युवापत्य हें गोत्रापत्यासारखें समजावें' या अतिदेशानें युवापत्य या अर्थी प्रत्ययाची येथें अनुत्पत्तीच होईल (तर मात्र हा दोष येणार नाहीं.)

पण युवापत्य हें गोत्रापत्यासारखें समजावें या अतिदेशानें प्रत्ययाची उत्पत्तीच होत नाहीं असें कसें बरें म्हणतां येईल ?

कां बरें ? येथें वति प्रत्ययाचा निर्देश केला आहे ना ? आणि वति प्रत्ययाचा निर्देश केला असेल त्या ठिकाणीं 'जशी तेथें एखादी गोष्ट होते तशी येथे करणें' किंवा 'जशी एखादी गोष्ट होत नाहीं तशी येथें न करणें' या दोहोंपैकीं कोणताही वाक्यशेष जोडणें हें आपल्या इच्छेवर अवलंबून आहे. उदा. मद्रदेशामध्यें यव हें धान्य उशीनर देशासारखेंच समजावें असें म्हटलें असतां उशीनर देशाप्रमाणें यव हें धान्य मद्र देशामध्यें विपुल आहे, किंवा उशीनर देशाप्रमाणें यव हें धान्य मद्रदेशामध्यें मुळींच नाहीं असा दोन्ही तऱ्हेचा अर्थ प्रतीत होतो. तसेंच ह्या मुलीला कलांचें ज्ञान आईसारखेंच आहे असें म्हटलें असतां तेथें आईला जशी कलांची माहिती आहे तशी हिला आहे, किंवा आईला जशी कलांची माहिती बिलकूल नाहीं तशी हिलाही नाहीं असा दोन्ही तऱ्हेचा अर्थ प्रतीत होतो, तसेंच येथेंही 'युवापत्य हे गोत्रापत्याप्रमाणें समजावें, असें म्हटलें असतां त्याप्रमाणें येथेंही होत नाहीं असा वाक्यशेष जोडतां येईल;

६—औपगवीयाः येथें औपगव या गोत्र—प्रत्ययान्ताहून ज्या युवापत्य अर्थी इञ् प्रत्यय होणार त्या युवापत्याला गोत्रापत्यासारखें समजल्यामुळें त्या अर्थी इञ् प्रत्ययच होत नाहीं. तेव्हां अर्थातच 'इञश्च' यानें अण् प्रत्यय होणार नाहीं. तेव्हां 'औपगवीयः' येथें अतिदेशानें अण् प्रत्यय होऊं लागेल' या शंकेचें निराकरण त्याच अतिदेशाचा तात्पर्यार्थ दुसऱ्या तऱ्हेचा घेऊन केलें आहे.

समर्थयिष्यामहे । यथा गोत्रे युवप्रत्ययो न भवत्येवं प्राग्दीव्यतोऽधिकारे यून्यपि न भवतीति ॥ तद्वक्तव्यम् । यद्यप्येतदुच्यतेऽथवैतर्हि यूनि लुगित्येतन्न क्रियते । कथं तर्हि फक्फिञोरन्यतरस्याम् [ ४.१.९१ ] इति । फक्फिञ्वर्ती युवा वा वृद्धवद्भवतीति वक्ष्यामि । यदा तर्हि न वृद्धवत्तदा गार्ग्यायणानां समूहो गार्ग्यायणकम् गार्ग्यायणानां किंचिद्गार्ग्यायणकम् गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः गोत्राश्रयो वुञ्न प्राप्नोति ॥

यदि पुनर्युवा वृद्धवदित्यनेनार्थोऽतिदिश्येत । प्राग्दीव्यतोऽधिकारे यूनो वृद्धवदर्थो भवतीति । तद्वक्तव्यम् । यद्यप्येतदुच्यतेऽथवैतर्हि यूनि लुगित्येतन्न करिष्यते । कथं फक्फिञोरन्यतरस्यामिति । फक्फिञ्वर्ती युवार्थो वा वृद्धवद्भवतीति वक्ष्यामि । यदा तर्हि न वृद्धवत्तदा गार्ग्यायणानां समूहो गार्ग्यायणकम् गार्ग्यायणानां किंचिद्गार्ग्यायणकम् गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः

---

म्हणजे गोत्रापत्य अर्थीं जसा युवापत्यार्थक प्रत्यय होत नाहीं तसा प्राग्दीव्यतीय अर्थाची विवक्षा असतांना युवापत्य या अर्थींही युवापत्यार्थक प्रत्यय होत नाहीं.

तर मग तसा अतिदेश केला पाहिजे.

जरी तसा अतिदेश करावा लागला तरी अतिदेशाचें तात्पर्य वर सांगितल्याप्रमाणें मानलें असतां यूनि लुक् हें प्रकृत सूत्रच मुळीं करावयास नको हें लाघव आहेच.

जर हें सूत्र न करतां अतिदेश केला तर ‘ फक्फिञोरन्यतरस्याम् ’ या पुढील सूत्राचा अर्थ कसा करावयाचा ?

‘युवापत्य या अर्थीं जर फक् किंवा फिञ् हे प्रत्यय कर्तव्य असतील तर तेथें त्या युवापत्य अर्थाला गोत्रापत्याप्रमाणें समजावें’ हा अतिदेश विकल्पानें समजावा असा त्याचा अर्थ होईल.

पण आतां ज्या वेळीं हा वैकल्पिक अतिदेश येथें घेतला नाहीं त्या वेळीं गार्ग्यायणानां समूहः गार्ग्यायणकम् गार्ग्यायणानां किंचित् गार्ग्यायणकम्, गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः येथें गोत्र प्रत्ययान्ताहून सांगितलेला वुञ् प्रत्यय प्राप्त होत नाहीं.

आतां युवापत्य प्रत्ययाहून प्राग्दीव्यतीय अर्थीं प्रत्यय कर्तव्य असतांना तो युवापत्य हा अर्थ गोत्रापत्य या अर्थासारखा समजावा असा अर्थाचा अतिदेश केला तरी देखील तो अतिदेश घेतला त्या वेळीं युवापत्य अर्थीं फक् प्रत्यय होत नाहीं म्हणून गार्ग्यकम् हें रूप साधतें.

तर मग तसा अतिदेश केला पाहिजे.

जरी तसा अतिदेश करावा लागला तरी अर्थाच्या अतिदेशामुळें यूनि लुक् हें प्रकृत सूत्रच मुळीं करावयास नको हें लाघव आहेच.

पण जर लुक् न सांगतां अर्थाच्या अतिदेशानें काम भागविलें तर ‘फक्फिञोरन्यतरस्याम्’ या पुढील सूत्राचा अर्थ कसा करावयाचा ?

युवापत्य या अर्थीं जर फक् किंवा फिञ् प्रत्यय कर्तव्य असेल तर तेथें त्या युवापत्य या अर्थाला गोत्रापत्य या अर्थाचा अतिदेश विकल्पानें समजावा असा त्याचा अर्थ होईल.

पण आतां ज्या वेळीं हा वैकल्पिक अतिदेश घेतला नाहीं त्या वेळीं गार्ग्यायणानां समूहः गार्ग्यायणकम् गार्ग्यायणानां किंचित् गार्ग्यायणकम् गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः येथें गोत्र प्रत्ययान्ताहून सांगितलेला वुञ् प्रत्यय प्राप्त होत नाहीं.

---

७—अतिदेश घेतला म्हणजे जसा ‘औपगवीयः’ येथें छण् प्रत्यय उत्पन्नच होत नाहीं तसा गार्ग्यकम् येथें फक् प्रत्यय उत्पन्नच होत नाहीं. तेव्हां फक्दां गार्ग्यायणानां समूहः गार्ग्यकम् हें रूप साधतें.

गोत्राश्रयो वुञ्न प्राप्नोति ॥

एवं तर्हि

राजन्याद्वुञ्मनुष्याच्च

ज्ञापकं लौकिकं परम् ॥

यदयं वुञ्विधौ राजन्यमनुष्ययोर्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो लौकिकं परं गोत्रग्रहणमिति। युवा च लोके गोत्रमित्युपचर्यते। किंगोत्रोऽसि माणवक। गार्ग्यायणः। किंगोत्रोऽसि माणवक। वात्स्यायनः॥ यद्येतज्ज्ञाप्यत औपगवेर्यूनश्छात्रा औपगवीयाः गोत्राश्रय इञो गोत्र इत्यण्प्राप्नोति। सामूहिकेषु ज्ञापकम्। यदि सामूहिकेषु ज्ञापकं गार्ग्यायणानां किंचिद्गार्ग्यायणकम् गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः गोत्राश्रयो वुञ्न प्राप्नोति। वुञ्विधौ ज्ञापकम्। यदि वुञ्विधौ ज्ञापकं शालङ्केर्यून-

तर मग आतां—

राजन्य आणि मनुष्य या शब्दांहून जो वुञ् प्रत्यय (४।२।३९) सांगितला आहे त्यावरून ' अपत्याधिकाराच्या पुढें लौकिक गोत्र घ्यावें ' अशा अर्थाचें ज्ञापन होतें. आणि युवापत्य—प्रत्ययान्तापासून अपत्य अर्थाचा बोध होत असल्यामुळें त्याला गोत्र असें लोकांमध्यें म्हणतात. असें पहा कीं हे माणवका तुझें गोत्र काय असा प्रश्न केला असतां त्याचें उत्तर ' मी गार्ग्यायण आहें ' असें तो देतो. तसेंच हे माणवका तुझें गोत्र काय असा प्रश्न केला असतां त्याचें उत्तर मी वात्स्यायन आहे असें देतो.

पण हें ज्ञापक घेतलें तर औपगवेश्छात्राः औपगवीयाः येथें औपगवि या युवापत्यार्थक इञ् प्रत्ययान्ताहून गोत्रापत्यार्थक इञ् प्रत्ययान्ताहून सांगितलेला अण् प्रत्यय होऊं लागेल.

त्या ज्ञापकाचा उपयोग समूह या अर्थी प्रत्यय कर्तव्य असेल तरच करावा अन्यत्र करूं नये.

पण समूह या अर्थी प्रत्यय कर्तव्य असतांनाच या ज्ञापकाचा उपयोग करावयाचा असेल तर गार्ग्यायणानां समूहः गार्ग्यायणकम् हें उदाहरण साधलें तरी गार्ग्यायणानां किंचित् गार्ग्यायणकम् व गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः येथें गोत्र—प्रत्ययान्ताहून सांगितलेला वुञ् प्रत्यय होणार नाहीं.

असें असेल तर मग वुञ् प्रत्यय करण्यापुरतेंच ज्ञापक समजावें.

जर हें ज्ञापक वुञ् प्रत्ययापुरतेंच घेतलें तर युवापत्यवाचक जो शालङ्कि शब्द त्याहून त्याचें छात्र या अर्थी गोत्रापत्यवाचक इञ्—प्रत्ययान्ताहून सांगितलेला अण् प्रत्यय होणार नाहीं.

८—राजन्य आणि मनुष्य हे शब्द अपत्य अर्थी यत् प्रत्यय (४।१।१३७,४।१।१६१) करून साधले आहेत. त्या अपत्यप्रत्ययान्ताला गोत्र संज्ञा असल्यामुळें 'गोत्रोक्षो०' या सूत्रांतील गोत्र शब्दानेंच काम भागत असल्यामुळें त्या सूत्रांतील राजन्य आणि मनुष्य हे शब्द व्यर्थ होतील. त्यांवरून अपत्याधिकाराच्या पुढें लौकिक गोत्र घ्यावें असें ज्ञापक घेतां येतें व तें घेतलें म्हणजे मात्र तेथें सूत्रामध्यें राजन्य व मनुष्य हे शब्द ठेवलेच पाहिजेत. कारण लोकांमध्यें राजन्य व मनुष्य हे शब्द जातिवाचक आहेत. त्यांपासून अपत्य या रूपानें बोध होत नाहीं. म्हणून तेथें जातिशब्दानें काम भागावयाचें नाहीं.

९—तेव्हां उत्तरांतील युव—प्रत्ययान्त शब्दावरून जर लोकांना गोत्र कळतें तर युवापत्य—प्रत्ययान्ताला लौकिक गोत्र संज्ञा आहे असें सिद्ध होतें.

१०—कारण ज्या सूत्रामधील राजन्य व मनुष्य हे शब्द ज्ञापक आहेत त्या सूत्रानें समूह या अर्थीच प्रत्यय सांगितला आहे.

११—कारण, ज्या सूत्रांतील राजन्य व मनुष्य हे शब्द ज्ञापक आहेत त्या सूत्रानें वुञ् प्रत्ययच सांगितला आहे.

१२—शालङ्कि शब्दामध्यें गोत्रापत्य या अर्थी इञ् प्रत्यय (४।१।९६) केला आहे. त्याच्या पुढें युवापत्य या अर्थी केलेल्या फक् प्रत्ययाचा (४।१।१०१)

श्छात्राः शालङ्काः इञो गोत्र इत्यणन्न प्राप्नोति । अस्तु तर्ह्यविशेषेण । कथमौपगवेर्यूनश्छात्रा औपगवीयाः । गोत्रेणेञ्वं विशेषयिष्यामः । गोत्रे य इञ्विहित इति ॥

[ फक्फिञोरन्यतरस्याम् ॥ ४ । १ । ९१ ॥ ]

तस्यापत्यम् ॥ ४।१।९२ ॥

तस्येदमित्यपत्येऽपि

तस्येदम् [४.३.१२०] इत्यपत्येऽप्यण्सिद्धः । तस्येदंविशेषा ह्येते ऽपत्यं समूहो विकारो निवास इति ॥ किमर्थं तर्हीदमुच्यते ।

बाधनार्थं कृतं भवेत् ।

ये तस्य बाधकास्तद्बाधनार्थम् ॥ कथं

---

तर मग तें ज्ञापक मोघमच असूं दे.

पण तसें मोघम ज्ञापक घेतलें तर औपगवेश्छात्राः औपगवीयाः येथें औपगवि या युवापत्यार्थक इञ्–प्रत्ययान्ताहून छ प्रत्ययाचा बाध करून इञश्च ( ४।२।११२ ) यानें अण् प्रत्यय होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण, 'गोत्र या अर्थी सांगितलेला जो इञ् प्रत्यय ' अशा अर्थानें गोत्रे[३] हें इञ् प्रत्ययाचें विशेषण करतां येईल.

( सू. ९२ श्लो. १ ) तस्येदम् ( ४ । ३ । १२० ) या सूत्रानें सांगितलेला अण् प्रत्यय अपत्य अर्थींही होईलच. कारण, ' त्याचें हें ' हा अर्थ सामान्य आहे. अपत्य, विकार, समूह, निवास वगैरे हे त्याचे विशेष आहेत.

तर मग ' बाधनार्थं कृतं भवेत् ' हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

तस्येदम् यानें सांगितलेल्या अण् प्रत्ययाचे जे बाधक प्रत्यय आहेत त्यांचा बाध करून अपत्य याअर्थी अण् प्रत्ययच व्हावा याकरितां हें सूत्र केलें आहे.

पण काय हो अपत्य हा अर्थ उक्त असल्यामुळें शेष नव्हे; तेव्हां त्या अर्थी सांगितलेला प्रत्यय शैषिक नव्हे. आणि तस्येदम् हा अर्थ शेष असल्यामुळें त्या अर्थी सांगितलेला प्रत्यय शैषिक होय. तेव्हां त्या दोघांची एकदम प्राप्तीच येत नाहीं. मग त्यांत एकानें दुसऱ्याचा बाध

---

लुक् ( २।४।५९ ) झाल्यामुळें शालङ्कि असेंच गोत्रापत्याला आणि युवापत्याला म्हणतां येतें. तेव्हां शालङ्कि या इञ्–प्रत्ययान्तालाच युवापत्य हा अर्थ असल्यामुळें तेथें इञ्–प्रत्ययान्त हें गोत्रापत्यवाचक नव्हे. युवापत्याला जरी लौकिक गोत्र म्हणतां येतें तरी तें युञ् प्रत्ययापुरतेंच आहे.

१३–औपगवीयाः येथें युवापत्याला लौकिक गोत्र म्हणतां येत असल्यामुळें तो इञ् प्रत्यय जरी तेथें गोत्रापत्यवाचक झाला तरी तो कांहीं गोत्रापत्य या अर्थी सांगितलेला नाहीं, म्हणून अण् प्रत्यय होत नाहीं.

१ (सू. ९१ )—फक् व फिञ् या युव प्रत्ययांच्या पुढें जर प्राग्दीव्यतीय अजादि प्रत्यय कर्तव्य असेल तर तो प्रत्यय करण्यापूर्वीच त्या फक् व फिञ् या प्रत्ययांचा लुक् विकल्पानें होतो. उदा० - गार्ग्यायणस्य छात्राः गार्गीयाः, गार्ग्यायणीयाः; यास्कायनस्य च्छात्राः यास्कीयाः, यास्कायनीयाः.

१ ( सू. ९२ )—षष्ठी–प्रत्ययान्त प्रातिपदिकाहून ' त्याचें अपत्य' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—उपगोः अपत्यम् औपगव . गोत्रापत्याची विवक्षा असेल तरीही हा प्रत्यय होतो. उपगोः गोत्रापत्यम् औपगवः- उपगु शब्दाहून ङस् हा षष्ठी प्रत्यय करून त्याच्या पुढें प्रकृत सूत्रानें अण् हा तद्धित प्रत्यय केल्यानंतर उप. गु ङस् अ याला प्रातिपदिक संज्ञा ( १।२।४६ ), ङस् प्रत्ययाचा लुक् (२।४।७१) आदिवृद्धि ( ७।२।११७) शेवटच्या उकाराला गुण ( ६।४।१४७ ) आणि अव् आदेश हीं कार्यें होऊन औपगव असा शब्द होतो.

२. –मानोः इदम् मानवीयम् येथें ' तस्येदम् ' याचा बाध करून वृद्धाच्छः [ ४।२।११४ ) यानें छ प्रत्यय होत असतो; पण त्याचा बाध करून मानोः अपत्यम् या अर्थी मानु शब्दाहून अण् प्रत्यय होऊन मानवः असें होतें.

पुनरशैषिकः शैषिकं बाधेत।

उत्सर्गः शेष एवासौ

यो ह्युत्सर्गः सोऽपि शेष एव ॥ अथैतस्मिन्बाधकबाधने सति किं प्रयोजनम्।

वृद्धान्यस्य प्रयोजनम् ॥१॥

वृद्धानि प्रयोजयन्ति। भानोरपत्यं भानवः। श्यामगोरपत्यं श्यामगवः॥ कथं पुनरिच्छताप्यपवादः प्राप्नुवञ्शक्यो बाधितुम्। तस्यग्रहणसामर्थ्यात्। किमिदं भवानध्यारुह्य तस्यग्रहणस्यैव प्रयोजनमाह न पुनः सर्वस्यैव योगस्य। अवश्यमुत्तरार्थमर्थनिर्देशः कर्तव्यः। समर्थविभक्तिरपि तर्ह्यवश्यमुत्तरार्थं प्रतिनिर्देष्टव्या। एवं तर्हि योगविभागकरणसामर्थ्यात्। इतरथा हि तस्यापत्यमत इञ्भवतीत्येव ब्रूयात्॥

पुँल्लिङ्गेनायं निर्देशः क्रियत एकवचनान्तेन च तेन पुँल्लिङ्गादेवोत्पत्तिः स्यादेकवचनान्ताच्च स्त्रीनपुंसकलिङ्गाद्द्विवचनबहुवचनान्ताच्चेदं न स्यात्।

तद्धितार्थनिर्देशे लिङ्गवचनमप्रमाणं तस्याविवक्षितत्वात् ॥१॥

तद्धितार्थनिर्देशे लिङ्गवचनमप्रमाणम्

---

कसा बरें होणार ?

तस्यापत्यम् हें सूत्र नसेल तर सामान्यतः वाटेल त्या शब्दाहून अपत्य अर्थीं प्रत्यय कोणींच सांगितला नसल्यामुळें सामान्यतः अपत्य हा अर्थ शेष होतच आहे.

आतां छ वगैरे जे बाधक प्रत्यय त्यांचा बाध होऊन अण् प्रत्ययच होण्याकरितां हें जें सूत्र केलें त्याचा उपयोग तरी कोठें ?

वृद्धसंज्ञक ( १।१।७३ ) जे शब्द तेथें त्याचा उपयोग होतो. उदा०—भानोरपत्यं भानवः, श्यामगोरपत्यं श्यामगवः.

पण अण् प्रत्ययाचा अपवाद म्हणून मुद्दाम छ प्रत्यय जर सांगितला आहे तर त्या छ प्रत्याचा बाध व्हावा अशी इच्छा असली तरी ती गोष्ट शक्य कशी बरें होईल ?

तस्य असें येथें मुद्दाम म्हटलें आहे त्याच्या जोरावर अपवादाचाही बाध होईल.

पण काय रे, येथें तूं तस्य या शब्दावरच मुख्यतः भिस्त ठेवून त्याचा उपयोग सांगतोस, सर्व सूत्राचा हा उपयोग आहे असें कां बरें सांगत नाहींस ?

अपत्यम् हा अर्थाचा निर्देश उत्तर सूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरितां केलाच पाहिजे. म्हणून मीं 'तस्य म्हणण्याच्या जोरावर' असें म्हटलें.

पण अपत्यम् या अर्थाप्रमाणें त्या अर्थाला योग्य अशी विभक्ति देखील पुढें अनुवृत्त होण्याकरितां येथें उच्चारलीच पाहिजे ना ?

तर मग तस्यापत्यम् हीं दोन्ही पदें पुढील सूत्रांत घालावयाचीं तीं न घालतां जें हें निराळें सूत्र केलें आहे त्याच्या जोरावर छ प्रत्ययाचा बाध होईल. नाहीं तर तस्यापत्यमत इञ् असेंच सूत्र सूत्रकारांनीं केलें असतें.

आतां तस्य हें तद् शब्दाचें पुंलिंगी षष्ठीचें एकवचन उच्चारलें आहे; तेव्हां पुंलिंगी शब्द असेल तरच आणि त्याहून षष्ठीचें एकवचनच जर केलें असेल तरच त्याहून अपत्य या अर्थीं तद्धित प्रत्यय होईल. स्त्रीलिंगी किंवा नपुंसकलिंगी शब्द असेल तर त्याहून तसेंच पुल्लिंगी शब्द असला तरी त्याचे पुढें जर षष्ठीचें द्विवचन किंवा बहुवचन केलें असेल तर त्याहूनही अपत्य या अर्थीं प्रत्यय होणार नाहीं.

( वा. १ ) तद्धित प्रत्ययाच्या अर्थाचा निर्देश केला असेल तेथें लिंग आणि वचन

---

३—तेव्हां अर्थातच तेथें छ प्रत्ययाची प्राप्ति येते. आणि हें प्रकृत सूत्र केलें म्हणजे अपत्य अर्थ हा शेष होत नाहीं म्हणून भानवः येथें छ प्रत्ययाची प्राप्तीच येत नाहीं. हाच छ प्रत्ययाचा बाध होय.

४—सुमातुः अपत्यम् सौमात्रः, क्षमस्यापत्यं क्षात्रिः येथें होणार नाहीं. तसेंच उपग्वोरपत्यम् उपगूनामपत्यम् अशी विवक्षा असेल तेथेंही होणार नाहीं.

किं कारणम् । तस्याविवक्षितत्वात् । नात्र निर्देशस्तन्त्रम् । कथं पुनस्तेनैव च नाम निर्देशः क्रियते तथातन्त्रं स्यात् । तत्कारी च भवांस्तद्द्वेषी च । नान्तरीयकत्वादत्र पुँल्लिङ्गेन निर्देशः क्रियत एकवचनान्तेन च । अवश्यं कयाचिद्विभक्त्या केनचिद्वचनेन निर्देशः कर्तव्यः । तद्यथा । कश्चिदन्नार्थी शालिकलापं सतुषं सपलालमाहरति नान्तरीयकत्वात् । स यावदादेयं तावदादाय तुषपलालान्युत्सृजति । तथा कश्चिन्मांसार्थी मत्स्यान्सशकलान्सकण्टकानाहरति नान्तरीयकत्वात् । स यावदादेयं तावदादाय शकलकण्टकान्युत्सृजति । एवमिहापि नान्तरीयकत्वात्पुँल्लिङ्गेन निर्देशः क्रियत एकवचनान्तेन च । न ह्यत्र निर्देशस्तन्त्रम् ॥

सर्वनामनिर्देशे विशेषासंप्रत्ययः सामान्यनिर्देशात् ॥ २ ॥

सर्वनामनिर्देशे विशेषस्यासंप्रत्ययः । किं कारणम् । सामान्यनिर्देशात् । सर्वनाम्नायं निर्देशः क्रियते सर्वनाम च सामान्यवाचि । तेन सामान्यवाचिन एवोत्पत्तिः स्याद्विशेषवाचिनो न स्यात् ॥

सामान्यचोदनास्तु विशेषेषु ॥ ३ ॥

सामान्यचोदनास्तु विशेषेष्ववतिष्ठन्ते । तद्यथा । गौरनुबन्ध्यो ऽजोऽग्नीषोमीय इत्याकृतौ चोदितायां द्रव्य आरम्भणा-

---

प्रमाण समजूं नये.

काय कारण ?

कारण असें कीं तेथें त्यांचा निर्देश हा विवक्षित नसतो.

पण येथें तस्य हें सूत्रकारांनींच पुंल्लिंगी एकवचन उच्चारलें आहे ना? मग त्यांच्याच मतीं त्याची अविवक्षा कशी बरें होईल? आणि असें असेल तर जें तूं करतोस त्याचाच तूं द्वेष करतोस असें नाहीं कां होत ?

सूत्रकारांनीं जो येथें पुंल्लिंगाचा आणि एकवचनाचा निर्देश केला आहे तो नाइलाजास्तव केला आहे; मुद्दाम केलेला नव्हे. कारण, कोणताही शब्द उच्चारावयाचा म्हणजे त्याला कोणती तरी विभक्ति आणि कोणतें तरी वचन अवश्य लावावेंच लागतें. उदा० अन्नाची इच्छा करणारा मनुष्य प्रथमतः नाइलाजास्तव कोंड्यासकट, भुशासकट भाताची रास आणतो; मग त्यांतील जेवढा ग्राह्य भाग आहे तेवढा घेऊन कोंडा व भुसा टाकून देतो. तसेंच मांसाची इच्छा करणारा कोणी मनुष्य नाइलाजास्तव प्रथमतः सालासकट, कांट्यांसकट मासे आणतो; पण पुढें त्यांतील जेवढा ग्राह्य भाग आहे तेवढाच घेऊन साल, कांटे वगैरे बाकीचा भाग फेकून देतो. येथेंही त्याप्रमाणें नाइलाजास्तव सूत्रकारांनीं तस्य हा पुंल्लिंगी तद् शब्दाचा एकवचन पुढें लावून निर्देश केला आहे पण तो त्यांनाच विवक्षित नाहीं.

(वा. २) येथें तद् या सर्वनाम शब्दाचा निर्देश केला आहे. त्यापासून उपगु वगैरे विशेष शब्दांचा बोध होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं येथें सामान्य निर्देश आहे. तस्य हा निर्देश तद् या सर्वनाम शब्दाचा आहे, आणि सर्वनामें हीं सामान्यवाचक शब्द असतात. तेव्हां सामान्य शब्दांहूनच तद्धित प्रत्यय उत्पन्न होईल. उपगु वगैरे विशेष शब्दांहून होणार नाहीं.

(वा. ३) सामान्याच्या संबंधानें केलेले विधी विशेष पदार्थालाच लागू होतात. उदा० गौरनुबन्ध्यः म्ह. बैलाचें अनुबंधन करावें; अजोऽग्नीषोमीयः म्ह. अग्नि आणि सोम या देवतांना उद्देशून अज द्यावा. येथें गो व अज या जाति शब्दांनीं त्या त्या जातीसंबंधानें विधि केला असतां आरम्भण, आलम्भन, प्रोक्षण

---

५—समन्त्रक स्पर्श, अनुबन्धन, प्रोक्षण आणि छेदन हे आरम्भण वगैरे शब्दांचे अर्थ होत.

लम्भनप्रोक्षणविशसनादीनि क्रियन्ते ॥ विषम उपन्यासः । अस्ति कारणं येनैतदेवं भवति । किं कारणम् । असंभवात् । आकृतावारम्भणादीनां संभवो नास्तीति कृत्वाकृतिसहचरिते द्रव्य आरम्भणादीनि क्रियन्ते । इदमप्येवंजातीयकमेव । असंभवात्सामान्यवाचिन उत्पत्तौ विशेषवाचिन उत्पत्तिर्भविष्यति ॥

**अपत्याभिधाने स्त्रीपुँल्लिङ्गस्याप्रसिद्धिर्नपुंसकत्वात् ॥ ४ ॥**

अपत्याभिधाने स्त्रीपुँल्लिङ्गस्याप्रसिद्धिः । किं कारणम् । नपुंसकलिङ्गत्वात् । अपत्यं नपुंसकलिङ्गं तेन नपुंसकलिङ्गस्यैवाभिधानं स्यात्स्त्रीपुँल्लिङ्गस्य न स्यात् ॥ ननु चेदं पुरस्तादेव चोदितं परिहृतं च । उत्पत्तिस्तत्र चोद्यत इह पुनरुत्पन्नेनाभिधानं चोद्यते ॥

**सिद्धं तु प्रजनस्य विवक्षितत्वात् ॥५॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रजनस्य विवक्षितत्वात् । प्रजनोऽत्र विवक्षितः स च सर्वलिङ्गः ॥ किं पुनः कारणं समानायां प्रवृत्तावपत्यं नपुंसकलिङ्गं प्रजनः सर्वलिङ्गः ।

---

विशसन वगैरे त्या त्या क्रिया त्या त्या व्यक्तीलाच केल्या जातात.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण आरम्भण वगैरे क्रिया व्यक्तीलाच केल्या जातात याचें कारण निराळेंच आहे.

तें कोणतें कारण ?

तें कारण असें कीं तेथें संभवच नाहीं. म्हणजे आरम्भण वगैरे क्रिया जातीचे ठिकाणीं करतां येत नाहींत. म्हणून त्या त्या जातीचा आश्रय जो पदार्थ त्या ठिकाणीं आरम्भण, आलम्भन, विशसन वगैरे क्रिया केल्या जातात.

मग तीच तऱ्हा येथेंही आहे. सामान्यवाचक शब्दाहून तद्धित प्रत्यय करतां येत नसल्यामुळें उपगु वगैरे विशेष शब्दांहून तद्धिताची उत्पत्ति होईल.

( वा. ४ ) अपत्य या शब्दानें येथें अर्थाचें प्रतिपादन केलें असल्यामुळें स्त्रीलिंगी किंवा पुंल्लिंगी अर्थ असेल तर त्या अर्थीं तद्धित प्रत्यय होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं अपत्य हा नपुंसकलिंगी शब्द सूत्रांत उच्चारला आहे. तेव्हां त्या अर्थीं केलेल्या तद्धित प्रत्ययानें नपुंसक अपत्याचेंच प्रतिपादन होईल. स्त्र्यपत्य किंवा पुमपत्य याचें प्रतिपादन केलें जाणार नाहीं.

पण हा प्रश्न पूर्वींच उपस्थित झाला होता आणि त्याचा परिहारही तेथेंच केला आहे ना ?

तद्धित प्रत्ययाच्या उत्पत्तीसंबंधानें पूर्वी प्रश्न उपस्थित झाला होता. आणि येथें उत्पन्न झालेल्या तद्धित प्रत्ययानें कोणत्या प्रकारच्या अर्थाचें प्रतिपादन केलें जाईल असा प्रश्न उपस्थित झाला आहे.

( वा. ५ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं येथें फक्त प्रजन म्ह. प्रसव विवक्षित आहे. आणि प्रजन हा शब्द तर सर्वलिंगी अर्थांना लागू पडतो.

पण प्रजन व अपत्य या दोन्ही शब्दांची आपला अर्थ दाखविण्याविषयींची प्रवृत्ति सारख्याच तऱ्हेची असतांना अपत्य म्हटलें कीं नपुंसकलिंगीच अर्थ मनांत येतो आणि प्रजन म्हटलें कीं सर्वलिंगी अर्थ मनांत येतो असा फरक कां बरें होतो ?

---

६–अपत्य हा संबन्धि–शब्द आहे. तेव्हां त्याला 'कोणाचें अपत्य ?' अशी दुसऱ्या संबन्धीची आकांक्षा उत्पन्न झाली असतां ती 'उपगूचें' अशा विशेष शब्दानें निवृत्त होते.

७—तद्धित प्रत्यय ज्या शब्दाहून उत्पन्न होतो तो शब्द कोणत्या लिंगीं असावा असा प्रश्न.

एकार्थे शब्दान्यत्वाद् दृष्टं लिङ्गान्यत्वम् ॥ ६ ॥

एकार्थे शब्दान्यत्वाल्लिङ्गान्यत्वं दृश्यते। तद्यथा। पुष्यः तारका नक्षत्रम्। गेहम् कुटी मठ इति ॥

अवयवान्यत्वाच्च ॥ ७ ॥

अवयवान्यत्वाच्च लिङ्गान्यत्वं दृश्यते। तद्यथा। कुटी कुटीरः। शमी शमीरः। शुण्डा शुण्डारः। अवयवान्यत्वात्किल लिङ्गान्यत्वं स्यात्किं पुनर्यत्र शब्दान्यत्वमपि ॥

**ऐको गोत्रे ॥ ४।१।९३ ॥**

किमर्थमिदमुच्यते।

उत्पादयितारं प्रत्यपत्ययोगात्तस्य च विवक्षितत्वादेकवचनं गोत्रे ॥ १ ॥

उत्पादयितोत्पादयितापत्येन युज्यते। तस्य च विवक्षितत्वात्। उत्पादयितुः स चाभिसंबन्धो विवक्षितः। उत्पादयितारं प्रत्यपत्ययोगात्तस्य चाभिसंबन्धस्य विवक्षितत्वादुत्पादयितुरुत्पादयितुरपत्याभिधाने ऽनेकः प्रत्ययः प्राप्नोति। इष्यते चैक एव स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीत्येकवचनं गोत्रे। एवमर्थमिदमुच्यते ॥ कथं पुनर्ज्ञायत उत्पादयितोत्पादयितापत्येन युज्यत इति। एवं हि दृश्यते लोके। पितामहस्योत्सङ्गे दारकमासीनं कश्चित्पृच्छति

---

(वा. ६) अर्थ सारखाच असला तरी शब्द निरनिराळा असल्यामुळें लिंगभेद झालेला दृष्टीस पडतो. उदा० पुष्यः, तारका, नक्षत्रम् हे तिन्ही शब्द सारख्याच अर्थाचे असून लिंग मात्र निराळें दिसतें. तसेंच गेहम्, कुटी, मठः येथेंही समजावें.

(वा. ७) तसेंच ज्या दोन शब्दांमध्यें कांहीं वर्ण सारखे असून कांहीं वर्ण निराळे असतात तेथेंही लिंगभेद झालेला दिसतो. उदा० कुटी, कुटीरः येथें, किंवा शमी, शमीरः, शुण्डा, शुण्डारः. येथें कांहीं थोडे वर्ण निराळे असले तरी तेवढ्यामुळेंही जर लिंगभेद झालेला दिसतो तर शब्दच मुळीं निराळे आहेत तेथें लिंगभेद होईल हें काय सांगावें?

(सू. ९३) हें सूत्र कशाकरितां केलें आहे?

(वा. १) जो जो अपत्य उत्पन्न करणारा असेल त्याचा त्याचा अपत्य या अर्थाशीं संबंध विवक्षित आहे. तेव्हां आपल्याला जो उत्पन्न करणारा त्याला जो उत्पन्न करणारा त्यालाही जो उत्पन्न करणारा त्याचें त्याचें तें तें अपत्य दाखविण्याकरितां एका मूळ शब्दाहून ओळीनें तितके अपत्य अर्थाचे प्रत्यय होऊं लागतील; आणि तशा ठिकाणीं वस्तुतः एकच प्रत्यय इष्ट आहे. तेव्हां ही गोष्ट कांहीं तरी यत्न केल्याशिवाय सिद्ध होणार नाहीं. म्हणून हें सूत्र केलें आहे. म्हणजे तेथें एकाच प्रत्ययाचें प्रतिपादन होतें.

पण जो जो अपत्य उत्पन्न करणारा असेल त्याचा त्याचाच अपत्य अर्थाशीं संबंध होतो असें कशावरून समजावें?

असें पहा कीं लोकांमध्यें आजोबांच्या मांडीवर बसलेल्या मुलाला पाहून कोणी त्यांना हा मुलगा कोणाचा असें विचारलें असतां त्या

---

८–कुटी, शमी आणि शुण्डा या शब्दांहून स्वार्थी र प्रत्यय (५।३।८८) झाला आहे. ऱ्हस्वा कुटी कुटीरः.

१(सू.९३)—गोत्रापत्य हा अर्थ दाखविण्याकरितां प्रत्यय कर्तव्य असेल तर तो एकच एकदम करावा. पौत्रापासून पुढच्या मनुष्याला गोत्र म्हणतात (४।१।१६२)- प्रकृत सूत्रानें हा नियम केल्यामुळें उपगूचा मुलगा या अर्थी अण् प्रत्यय करून पुनः त्याचा मुलगा या अर्थी इञ् प्रत्यय करून उपगूच्या पौत्राला औपगवि असें म्हणतां येत नाहीं; तर त्याकाही औपगव असेंच म्हणावें.

कस्यायमिति । स आह देवदत्तस्य यज्ञदत्तस्य वेति । उत्पादयितारं व्यपदिशति नात्मानम् ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**तत्र प्रत्ययान्ताद्गोत्रे प्रतिषेधो गोत्रे नियतत्वात् ॥ २ ॥**

तत्र प्रत्ययान्ताद्गोत्रे प्रतिषेधो वक्तव्यः । औपगवस्यापत्यमिति । किं कारणम् । गोत्रे नियतत्वात् । गोत्रे ह्ययं नियमः क्रियते तेन यश्चासौ यथाजातीयकश्च गोत्रप्रत्ययः प्राप्नोति स एकः स्यात् । कश्च प्राप्नोति । यः प्रत्ययान्तात् ॥

**परमप्रकृतेश्चोत्पत्तिः ॥ ३ ॥**

परमप्रकृतेश्चोत्पत्तिर्वक्तव्या । अयोगाद्धि न प्राप्नोति ॥

एतयोश्चैव परिहारः पठिष्यति ह्याचार्यो यूनि चान्तर्हिते ऽप्राप्तिरिति तस्य च यथा तत्प्रत्ययान्तम् । यथा तदेव विकारावयवप्रत्ययान्तं द्वितीयं च तृतीयं च विकारं संक्रामत्येवमिहापि तदेवापत्यप्रत्ययान्तं

---

प्रश्नाचें उत्तर देतांना आजोबा आपल्या पुत्राचें म्हणजे त्या मुलाच्या बापाचें नांव घेऊन हा देवदत्ताचा अथवा हा यज्ञदत्ताचा असें म्हणतात. तेथें 'माझा मुलगा' असें ते म्हणत नाहींत.

हा प्रकृत सूत्राचा उपयोग आहे खरा.

मग आतां पुढें तुमचें काय म्हणणें आहे ?

(वा. २) गोत्र अर्थ विवक्षित असतांना त्या अर्थाचा बोध होण्याकरितां जो प्रत्यय करावयाचा तो प्रत्ययान्ताहून करूं नये असा येथें निषेध सांगितला पाहिजे. उदा० औपगवस्य अपत्यम् असें वाक्यच व्हावें. त्या-अर्थीं औपगव याहून प्रत्यय न झाला पाहिजे.

असा प्रतिषेध करण्याचें कारण काय ?

कारण असें कीं जर असा निषेध केला नाहीं तर 'एको गोत्रे' असा नियम करून काम भागत नाहीं. कारण, गोत्र या अर्थीं एकच प्रत्यय होतो असा नियम केला जातो. तेव्हां जो जशा प्रकारचा प्रत्यय एकच करावा असा नियम केला जातो त्या नियमानें तशा प्रकारचा गोत्र प्रत्यय दुसरा करावयाचा नाहीं, तर एकच करावा असा नियम होईल.

कसा बरें दुसरा प्रत्यय प्राप्त झाला असतां त्याची या नियमानें व्यावृत्ति होईल ?

गोत्र प्रत्यय हा प्रत्ययान्ताहून प्राप्त होतो तेव्हां तसला प्रत्यय एकच होईल; दुसरा होणार नाहीं.

(वा. ३) शिवाय, मूळ पुरुषाचा बोधक जो शब्द गृहीत धरला असेल त्याहून एकदम प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण गोत्रापत्य हें मूळ पुरुषाचें प्रत्यक्ष अपत्य नसल्यामुळें त्याहून प्रत्यय प्राप्त होत नाहीं.

ह्या दोन्ही आक्षेपांचा आणि 'यूनि चान्तर्हितेऽप्राप्तिः' (वा. ५) असा जो आचार्य वार्तिककार पुढें आक्षेप घेणार आहेत त्याचाही परिहार असा आहे कीं–विकार व अवयव (४।३।१३४।१३५) या अर्थीं प्रत्यय केल्यानंतर तो प्रत्ययान्त शब्द त्या विकाराचा विकार व त्या अवयवाचा अवयव अशा दुसऱ्या व तिसऱ्या अवस्थेंत पोचलेल्या विकार व अवयव यांनाही दाखवूं शकतो त्याप्रमाणें येथेंही अपत्य या अर्थीं प्रत्यय केल्यानंतर तो प्रत्ययान्त शब्द त्या अपत्याचें अपत्य अशा दुसऱ्या पिढींतील अपत्याला आणि तिसऱ्या पिढींतील अपत्यालाही दाखवील.

---

२–उपगु शब्दाहून अपत्य अर्थीं अण् प्रत्यय केल्यानंतर त्या औपगव शब्दानेंच औपगवाचें अपत्याचाही बोध होत असल्यामुळें औपगव याहून त्या अर्थीं पुनः प्रत्यय करण्याची जरूर नाहीं. तेव्हां हे दोन्ही दोष येत नाहींत. तसेंच गार्ग्यायण या युवापत्य–प्रत्ययान्तानेंच त्याच्या पुढील पिढींतील अपत्याचा बोध होत असल्यामुळें गार्ग्यायण या शब्दाहून पुढें प्रत्यय करण्याची जरूर नाहीं. तेव्हां पुढील (५) वार्तिकानें जो दोष दाखविला आहे तोही येत नाहीं.

द्वितीयं च तृतीयं चापत्यं संक्रमिष्यति ॥ भवेत्सिद्धम् औपगवस्यापत्यमौपगवः यत्र स एवानन्तर इष्यते स एव गोत्रे । इदं तु खलु न सिध्यति गर्गस्यापत्यं गार्ग्य इति । अत्र ह्यन्योऽनन्तर इष्यतेऽन्यो गोत्रे ॥

स्त्रियां चानियमः ॥ ४ ॥

स्त्रियां च युवत्यां नियमो न प्राप्नोति । औपगवी माणविका । नियमाद्धि स्त्री पर्युदस्यत एको गोत्रे गोत्राद्यून्यस्त्रियामिति ॥ कतरस्मिन्पक्षेऽयं दोषः । उत्पादयितर्यपत्ययुक्ते । उत्पादयितरि तावदपत्ययुक्ते न दोषः । उत्पादयितरि ह्यपत्ययुक्ते न सर्वत उत्पत्त्या भवितव्यम् । तत्र नियमो नोपपद्यते । असति नियमे नैष दोषः ॥ सर्वेषु तर्ह्यपत्ययुक्तेष्वयं दोषः । सर्वेषु ह्यपत्ययुक्तेषु सर्वत उत्पत्त्या भवितव्यम् । तत्र नियम उपपन्नो भवति । सति नियम एष दोषः॥ उत्पादयितरि चापत्ययुक्ते स्त्रिया युवत्या

अशा रीतीनें ज्या ठिकाणीं साक्षात् अपत्य अर्थी प्रत्यय करून सिद्ध झालेल्या शब्दानेंच त्या अपत्याच्या अपत्याचाही बोध होणें इष्ट असेल, उदा० औपगवाच्या अपत्यालाही औपगवच म्हणतात, तशा ठिकाणीं इष्ट-सिद्धि होईल. पण गर्गाच्या तशा अपत्याला गार्गि असें न म्हणतां गार्ग्य असें म्हणतात तें सिद्ध होत नाहीं. कारण येथें गर्ग शब्दाहून साक्षात् अपत्य या अर्थीं निराळा प्रत्यय ( इञ् ) इष्ट आहे, आणि त्या अपत्याचें अपत्य म्हणजे गोत्रापत्य या अर्थीं निराळा प्रत्यय ( यञ् ) इष्ट आहे.

( वा. ४ ) शिवाय गोत्र अपत्याचें जें अपत्य तें जर स्त्रीरूपीं असेल तर तेथें एकच प्रत्यय होतो हा नियम लागूं होणार नाहीं. उदा०–उपगूची युवापत्य स्त्री या अर्थी औपगवी असें झालें पाहिजे. कारण एको गोत्रे, गोत्राद्यून्यस्त्रियाम् येथें अस्त्रियाम् असें म्हटलें असल्यामुळे स्त्रीरूपीं अपत्य हें वरील नियमापासून वगळलें जातें.

पण हा दोष कोणत्या पक्षीं येतो ? अपत्य हें पित्याचेंच म्हणतां येतें हा पक्ष घेतला तर. अपत्य हें पित्याचेंच म्हणतां येतें हा पक्ष घेतला तर 'स्त्रियां चानियमः' म्ह. "स्त्रीरूपीं अपत्य असेल तर हा नियम लागू होणार नाहीं" असा दोष तुम्हांला देतां येत नाहीं. कारण, त्या पक्षीं पितृवाचक व पितामहवाचक अशा सर्व प्रकारच्या शब्दांहून अपत्य अर्थीं प्रत्यय प्राप्त होत नाहीं. म्हणून प्रकृत सूत्र विधायकच मानावें लागतें, त्याला नियमार्थ म्हणतां येत नाहीं. तेव्हां नियमच जर नाहीं तर नियम लागू होणार नाहीं असा दोष तुम्हांला देतां येत नाहीं.

तर मग अपत्य हें पित्याचें असेंही म्हणतां येतें व पितामहाचें असेंही म्हणतां येतें, असा पक्ष घेतला असतां हा दोष येतो असें म्हणतो: तसा पक्ष घेतला असतां पितृवाचक व पितामहवाचक अशा सर्वच प्रकारच्या शब्दांहून अपत्य अर्थीं प्रत्यय प्राप्त होतो म्हणून प्रकृत सूत्र नियमार्थ म्हणतां येतें. तेव्हां तो नियम स्त्री-रूपीं अपत्याविषयीं लागू होत नाहीं असा दोष येतो.

तसेंच ' अपत्य हें पित्याचेंच म्हणतां येतें ' ह्या पक्षींहि स्त्रीरूपीं युवापत्याची विवक्षा असतांना त्या अर्थीं एक गोत्र प्रत्यय करतां

३–येथें उपगु शब्दाहून अण् प्रत्यय होऊन पुढें ङीप् प्रत्यय (४।१।१५) झाला आहे.

४–'एको गोत्रे' आणि 'गोत्राद्यूनि०' या दोघांचाही 'अस्त्रियाम्' हा शेष आहे असा अभिप्राय आहे.

५–तर पितामहवाचक उपगु वगैरे शब्दांहून एकदम गोत्रापत्य अर्थी प्रत्यय होण्याकरितां हें प्रकृत सूत्र विधानार्थकच होतें.

अभिधानं न प्राप्नोति । किं कारणम् । गोत्रसंज्ञां युवसंज्ञा बाधते गोत्राद्यूनि चास्त्रियां प्रत्ययो विधीयते ॥

यूनि चान्तर्हिते ऽप्राप्तिः ॥ ५ ॥

यूनि चान्तर्हिते नियमस्याप्राप्तिः । गार्ग्यायणस्यापत्यमिति ॥ कतरस्मिन्पक्षेऽयं दोषः। सर्वेष्वपत्ययुक्तेषु । सर्वेष्वपत्ययुक्तेषु तावन्न दोषः। सर्वेषु ह्यपत्ययुक्तेषु सर्वत उत्पत्त्या भवितव्यम् । तत्र नियम उपपन्नो भवति । सति नियमे नैष दोषः ॥ उत्पादयितरि तह्यपत्ययुक्तेऽयं दोषः । उत्पादयितरि ह्यपत्ययुक्ते परमप्रकृतेरनन्तराद्गोत्राच्चायोगान्न प्राप्नोति । यूनश्च न प्राप्नोति । किं कारणम् । गोत्रादिति नियमात् ॥ सन्तु तर्हि सर्वे ऽपत्ययुक्ता इति । कथं पुनर्ज्ञायते सर्वे ऽपत्ययुक्ता इति । एवं हि याज्ञिकाः पठन्ति । दशपुरुषानूकं यस्य गृहे शूद्रा न विद्येरन्स सोमं पिबेदिति । यदि च सर्वेऽपत्ययुक्ता भवन्ति तत एतदुपपन्नं भवति । कथं यदुक्तं

येणार नाहीं असा दोष येतोच.

काय कारण ?

कारण असें कीं तेथें युवसंज्ञेनें (४।१।१६३) गोत्रसंज्ञेचा (४।१।१६२) बाध होतो.

शिवाय, युवापत्य अर्थीं प्रत्यय गोत्र–प्रत्ययान्ताहून होतो हा विधीही स्त्रीरूपीं अपत्यासंबंधानें लागूं होणार नाहीं.

( वा. ५ ) युवापत्यानें व्यवहित युवापत्य म्हणजे गार्ग्यायणाचें अपत्य, असें युवापत्याचें अपत्य विवक्षित असतांना गोत्राद्यूनि० नियम लागू होणार नाहीं.

पण हा नियम कोणत्या पक्षीं येतो ? अपत्य हें पित्याचेंही म्हणतां येतें व पितामह वगैरेंचेंही म्हणतां येतें या पक्षीं तर दोष येत नाहींच. कारण त्या पक्षीं बाप, आजा, पणजा वगैरे कोणाचाही वाचक शब्द असो त्या सर्वांहून अपत्य अर्थीं प्रत्यय करतां येतो. तेव्हां अर्थातच तेथें 'गोत्राद्यूनि०' हा नियम लागू होतो. आणि नियम लागू झाला म्हणजे अर्थातच दोष येत नाहीं. आतां अपत्य हें पित्याचेंच म्हणतां येतें हा पक्ष घेतला तर मात्र हा दोष येतो. कारण या पक्षीं गर्ग वगैरे मूळ शब्दांहून आणि गार्ग्य या जवळच्या गोत्र–प्रत्ययान्ताहून गार्ग्यायणाचें अपत्य या अर्थीं प्रत्यय प्राप्त होत नाहीं. कारण त्या अपत्याशीं गर्गाचा व गार्ग्याचा साक्षात् संबंध नाहीं. शिवाय गार्ग्यायणाचा त्याच्या अपत्याशीं साक्षात् संबंध असला तरी गार्ग्यायण हें गोत्र-प्रत्ययान्त नसल्यामुळें त्याहूनही प्रत्यय प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं युवापत्य या अर्थीं प्रत्यय गोत्र–प्रत्ययान्ताहूनच होतो असा नियम आहे.

तर मग, अपत्य हें बाप, आजा, पणजा वगैरे सर्वांचेंच म्हणतां येतें या पक्षावर जर हा दोष येत नाहीं तर तोच पक्ष असूं दे.

पण ' अपत्य हें सर्वांचें म्हणतां येतें ' असा एक पक्ष आहे असें कशावरून समजावें ?

अशावरून समजतें कीं ' ज्याच्या कुलामध्यें दहा पुरुषांपर्यंत कोणीही शूद्र स्त्रीशीं विवाह केला नाहीं तो सोम प्राशन करण्याला योग्य होतो ' असें याज्ञिक लोक म्हणतात. हें त्यांचें म्हणणें ' अपत्य हें सर्वांचेंच म्हणतां येतें ' या पक्षींच जुळतें.

१–अपत्याच्या सद्वर्तनापासून त्याच्या कुलांतील पुरुषांचा उद्धार होतो, अधःपात होत नाहीं. जो मनुष्य शूद्र स्त्रीशीं विवाह करतो त्याचा अधःपात होतो आणि त्याच्या संबंधानें त्या कुलांतील दहा पुरुषांना दोष लागतो; ते सोम-प्राशनाला योग्य होत नाहींत. आतां जर अपत्य हें पित्याचेंच म्हणतां येतें असा पक्ष असेल तर दहा पुरुषांपर्यंत दोष लागण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं. तेव्हां यावरून अपत्य हें सर्वांचेंच म्हणतां येतें हा पक्ष सिद्ध होतो.

पितामहस्योत्सङ्गे दारकमासीनं कश्चित्पृच्छति कस्यायमिति स आह देवदत्तस्य यज्ञदत्तस्य वेति उत्पादयितारं व्यपदिशति नात्मानमिति । उत्पत्तिस्तस्य विवक्षिता । सर्वेषां न इदमपत्यं देवदत्तस्त्वस्योत्पादयितेति ॥

अथ सर्वेष्वपत्ययुक्तेषु किमनेन क्रियत एको गोत्र इति ।

**सर्वेषामप्यपत्ययोगात्प्रत्ययान्ताद्गोत्रे प्रतिषेधार्थमेको गोत्रे ॥६॥**

सर्वेषामप्यपत्ययोगात्प्रत्ययान्ताद्गोत्रे प्रतिषेधार्थमेको गोत्र इत्युच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति । न तु ज्ञायते क एको भवति यो वा परमप्रकृतेर्यो वानन्तरादिति ॥

**नियमानुपपत्तिश्च ॥७॥**

नियमश्च नोपपद्यते । किं कारणम् ।

**न ह्येकस्मिन्नपत्येऽनेकप्रत्ययप्राप्तिः॥८॥**

न ह्येकस्मिन्नपत्येऽनेकः प्रत्ययः प्राप्नोति । किं तर्हि ।

**अपत्यान्तरे शब्दान्तरात्प्रत्ययान्तरप्राप्तिः ॥ ९ ॥**

अपत्यान्तरे ऽपत्यान्तरे शब्दान्तराच्छब्दान्तरात्प्रययान्तरं प्रत्ययान्तरं प्राप्नोति ।

---

पण अशा रीतीनें हा पक्ष जर व्यवहारावरून सिद्ध होतो तर 'अपत्य हें पित्याचेंच म्हणतां येतें' या पक्षाला साधक जो लोकांतील व्यवहार दाखविला त्याची काय वाट? तो व्यवहार असा 'आजोबांच्या मांडीवर बसलेल्या मुलाला पाहून कोणी त्याला हा मुलगा कोणाचा असा प्रश्न केला असतां त्याचें उत्तर देतांना आजोबा आपल्या पुत्राचें म्हणजे त्या मुलाच्या बापाचें हा देवदत्ताचा अथवा हा यज्ञदत्ताचा असें नांव सांगतात, हा मुलगा माझा आहे असें म्हणत नाहींत.'

ह्या व्यवहारामध्यें प्रश्न करणारा हा उत्पत्तीसंबंधानें प्रश्न करीत आहे आणि उत्तर देणारा 'हें अपत्य आमचें सर्वांचेंच आहे' असें मनांत धरून 'देवदत्त या मुलाचा जनक आहे' असें उत्तर देत आहे.

आतां सर्वांचेंच अपत्य म्हणतां येत असेल तर 'एको गोत्रे' हें प्रकृत सूत्र कशाकरितां केलें आहे?

(वा. ६) सर्वांचाही अपत्याशीं योग संभवतो म्हणून गोत्रापत्य विवक्षित असतांना प्रत्ययान्ताहूनही प्रत्यय होऊं लागेल त्याचा निषेध होण्याकरितां एको गोत्रे हें सूत्र केलें आहे.

हा या सूत्राचा उपयोग आहे खरा.

मग आतां पुढें तुमचें काय म्हणणें आहे?

म्हणणें असें कीं उपगूच्या गोत्रापत्याची विवक्षा असतांना उपगु शब्दाहून अण् आणि त्याहून इञ् असे दोन प्रत्यय न होतां प्रकृत सूत्रानें एकच प्रत्यय होतो; पण तो कोणता एक प्रत्यय होतो? उपगु या मूळ शब्दाहून प्राप्त झालेला जो अण् तोच गोत्रापत्य अर्थी करावा किंवा औपगव याहून जो प्राप्त झाला तोच करावा हें समजत नाहीं.

(वा. ७) शिवाय नियमही जुळत नाहीं.

काय कारण?

(वा. ८) कारण असें कीं एका अपत्य या अर्थी अनेक प्रत्ययांची प्राप्ति येत नाहीं.

तर मग कशी प्राप्ति येते?

(वा. ९) निरनिराळ्या अपत्य या अर्थी निरनिराळ्या शब्दाहून निरनिराळा

---

७–उपगोः गोत्रापत्यम् औपगवः असा उपगु शब्दाहून एकदम गोत्रापत्यार्थी अण् प्रत्यय होऊन इष्ट रूप साधतें; तरी उपगूचा मुलगा या अर्थी अण् प्रत्यय करून त्या औपगव या प्रत्ययान्ताहून त्याचा मुलगा या अर्थी इञ् प्रत्यय होऊन औपगवि असेंही उपगूच्या गोत्रापत्याला म्हणतां येईल. तें न यावें याकरितां हें सूत्र केलें आहे.

फगन्तादिञिञन्तात्फगिति फगिञोर्दाशतयी प्रत्ययमाला प्राप्नोति ॥ कतरस्मिन्पक्षे ऽयं दोषः । सर्वेष्वपत्ययुक्तेषु । सर्वेष्वपत्ययुक्तेषु तावन्न दोषः। सर्वेषु ह्यपत्ययुक्तेषु सर्वत उत्पत्त्या भवितव्यम् । तत्र नियम उपपन्नो भवति । सति नियमे नैष दोषः॥ उत्पादयितरि तर्ह्यपत्ययुक्ते ऽयं दोषः । उत्पादयितरि ह्यपत्ययुक्ते न सर्वत उत्पत्त्या भवितव्यम् । तत्र नियमो नोपपद्यते । असति नियम एष दोषः ॥ उत्पादयितरि चापत्ययुक्ते न दोषः । कथम् ।

अपत्यं समुदायश्चेन्नियमो ऽत्र समीक्षितः । तस्मिन्सुबहवः प्राप्ता नियमो ऽस्य भविष्यति ॥१॥

अपत्यमित्यनेन सर्वमुपग्वादिपितृकमपत्यं समीक्षितम् । तस्मिन्सुबहवः प्रत्ययाः प्राप्ताः । नियमोऽस्य भविष्यत्येको गोत्र इति ॥

यदप्युच्यते स्त्रियां चानियम इत्येवं वक्ष्यामि गोत्राद्यूनि प्रत्ययो भवति स्त्रियां

---

प्रत्यय प्राप्त होत आहे. तो असा कीं— गार्ग्यायण वगैरे फक्– ( ४।१।१०१ ) प्रत्ययान्त शब्दाहून त्याचें अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय ( ४।१।९५ ), त्या इञ्–प्रत्ययान्त शब्दाहून त्याचें अपत्य या अर्थी फक् प्रत्यय, त्याहून पुनः इञ्, त्याहून पुनः फक् अशी दहावा पुरुष विवक्षित असेल तर दहापर्यंत देखील प्रत्ययांची ओळ लागेल.

पण हा दोष कोणत्या पक्षीं बरें येतो ?

'अपत्य हें बाप, आजा, पणजा वगैरे सर्वांचेंच म्हणतां येतें ' या पक्षीं.

'अपत्य हें बाप आजा पणजा वगैरे सर्वांचेंच म्हणतां येतें ' या पक्षीं तर दोष येत नाहींच. कारण, त्या पक्षीं बाप आजा वगैरे कोणाचाही वाचक शब्द असो, त्या सर्वांहून अपत्य या अर्थी प्रत्यय करतां येतो; तेव्हां अर्थातच तेथें हा नियम लागू होतो आणि नियम लागू झाला म्हणजे कांहीं दोष येत नाहीं. आतां अपत्य हें पित्याचेंच म्हणतां येतें हा पक्ष घेतला तर हा दोष येतो. कारण त्या पक्षीं बाप, आजा वगैरे सर्वांच्या वाचक शब्दांहून अपत्य या अर्थी प्रत्यय प्राप्त होत नाहीं.तेव्हां अर्थातच तेथें नियम लागू होत नाहीं. आणि नियम लागू झाला नाहीं म्हणजे दोष येणारच.

'अपत्य हें पित्याचेंच म्हणतां येतें ' या पक्षींही हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

( श्लो. १ ) उपगूच्या वंशांतील सर्वांचीं अपत्यें अशी अपत्यांची परंपरा जेथें असेल तेथें नियम व्हावा असें आचार्यांनीं मनांत धरलें आहे. तेव्हां अपत्यांची माला असेल तेथें त्या अर्थी प्रत्ययही बहुत प्राप्त होतात व तेथें त्यांचा नियम होईल.

आतां 'स्त्रियां चानियमः' ( वा. ४ ) असा जो दोष दाखविला आहे तोही येत नाहीं. कारण, गोत्र–प्रत्ययान्ताहूनच युवापत्य अर्थी

---

८–उपगूचें गोत्रापत्य विवक्षित असेल त्या ठिकाणीं त्या अर्थी उपगु शब्दाहून एकदम गोत्रापत्य या अर्थी एक प्रत्यय करावा किंवा उपगु शब्दाहून अपत्य अर्थी अण् प्रत्यय, त्याहून अपत्य अर्थी इञ् प्रत्यय असे दोन प्रत्यय करावेत असा अनियम प्राप्त झाला असतां तेथें प्रकृत सूत्रानें नियम प्राप्त केला जातो. तेव्हां 'नियमानुपपत्तिः' ( वा. ७ ) हा दोष येत नाहीं. तसेंच कोणता एक प्रत्यय करावा ही शंकाही येत नाहीं.

९–उपगूपासून शंभरावा पुरुष विवक्षित असेल तर उपगु शब्दाहून अपत्यप्रत्यय, त्याच्या पुढें दुसरा अपत्य प्रत्यय, अशी ९९ प्रत्ययांची माळ लागेल; तेथें असा नियम केला जातो कीं– मूळ पुरुषापासून कितीही दूरचा त्याच्या वंशांतील पुरुष विवक्षित असो, तेथें मूळ पुरुषाचा त्या पुरुषाशीं कितीही परंपरा–संबंध असला तरी तो घेऊन एकच अपत्य प्रत्यय करावा; माळ लावूं नये.

नेति ॥ एवमपि स्त्रिया युवत्या अभिधानं न प्राप्नोति । एवं तर्ह्येवं वक्ष्यामि गोत्राद्यूनि प्रत्ययो भवति स्त्रियां लुक् ॥ एवमप्यौपगवी माणविका अनुपसर्जनादितीकारो न प्राप्नोति । मा भूदेवमण्योऽनुपसर्जनमिति । अणन्तादनुपसर्जनादित्येवं भविष्यति । नैवं शक्यम् । इह हि दोषः स्यात् । काशकृत्स्निना प्रोक्ता मीमांसा काशकृत्स्नी तामधीते काशकृत्स्ना ब्राह्मणी । अणन्तादितीकारः प्रसज्येत । नैष दोषः । अध्येत्र्यामभिधेयायामण ईकारेण भवितव्यं यश्चात्राध्येत्र्यामभिधेयायामण्लुप्तः स यश्च श्रूयत उत्पन्नस्तस्मादीकार इति कृत्वा पुनर्न भविष्यति ॥ इह तर्हि औपगवी माणविका भार्यास्यौपगवीभार्यः जातिलक्षणः पुंवद्भावप्रतिषेधो न प्राप्नोति । मा

---

प्रत्यय होतो अशा नियम 'गोत्राद्यूनि०' यानें केल्यानंतर 'अस्त्रियाम्' यानें तें युवापत्य स्त्रीरूपीं असेल तर त्या नियमाचा बाध केला जाईल.

तरी पण स्त्रीरूपीं युवापत्याला गोत्रसंज्ञा नसल्यामुळें गोत्रापत्य अर्थी केलेल्या प्रत्ययानें त्याचें प्रतिपादन होणार नाहीं हा दोष येतोच

तर मग गोत्रप्रत्ययान्ताहूनच युवापत्य अर्थी प्रत्यय होतो असें सांगितल्यानंतर त्याच्या पुढें तें युवापत्य स्त्रीरूपीं असेल तर त्याचा लुक् सांगावा म्हणजे झालें.

तरी पण औपगवी माणविका येथें अनुपसर्जन अशा अण् प्रत्ययापुढे सांगितलेला ङीप् प्रत्यय ( ४।१।१५ ) होणार नाहीं.

अण् जो अनुपसर्जन तदन्ताहून ङीप् होतो अशा अर्थानें येथें ङीप् प्रत्यय प्राप्त होत नसेल तर न होऊं दे. अण्-प्रत्ययान्त जें अनुपसर्जन त्याहून ङीप् प्रत्यय होतो अशा अर्थानें तो होईल[१२].

पण तसा अर्थ करणें शक्य नाहीं. कारण, तसा अर्थ केला तर 'काशकृत्स्नि ऋषीनें सांगितलेली मीमांसा' या अर्थी अण् प्रत्यय ( ४।३।१०१ ) करून पुढें ङीप् (४।१।१५) केल्यानंतर त्या काशकृत्स्नी शब्दाहून तिचें अध्ययन करणारी या अर्थी अण् प्रत्यय (४।२।५९), त्याचा लुक् (४।२।६४) मागील ङीप् प्रत्ययाचा लुक् (४।२।४९) हीं कार्यें होऊन काशकृत्स्ना (ब्राह्मणी) असें होण्याऐवजीं तेथें अण्-प्रत्ययान्त अनुपसर्जन असल्यामुळें ङीप् प्रत्यय होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण येथें अध्ययन करणारी या अर्थी केलेला जो अण् प्रत्यय त्याचा लुक् झाला आहे. आतां जो मागील अण् प्रत्यय दिसतो त्याहून ङीप् प्रत्यय पूर्वी एकदां झालाच आहे म्हणून पुन्हां होणार नाहीं.

तर मग औपगवी मुलगी ही आहे भार्या ज्याची या अर्थी औपगवीभार्यः असें होतें. येथें जातेश्च (६।३।४१) यानें जो पुंवद्भावाचा (६।३।३४) निषेध होतो तो होणार नाहीं[१३].

येथें 'जातेश्च' यानें पुंवद्भावाचा निषेध

---

१०—लुक् झाला म्हणजे गोत्रापत्य-प्रत्ययान्तानेंच स्त्रीरूपीं युवापत्याचें प्रतिपादन होईल.

११—उपगु शब्दाहून गोत्रापत्य अर्थी अण् प्रत्यय करून त्याच्या पुढें युवापत्य अर्थी केलेल्या इञ् प्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर त्या अण्-प्रत्ययान्ताहून ङीप् होणार नाहीं. कारण त्या अण् प्रत्ययाचा जो गोत्रापत्य हा अर्थ तो युवापत्याला विशेषण आहे. म्हणून तो उपसर्जन होत आहे.

१२—युवापत्य अर्थी केलेल्या इञ् प्रत्ययाचा लुक् झाल्यामुळें तो अर्थ मागील अण्-प्रत्ययान्तालाच आला आहे आणि तो अर्थ तर कोणालाही विशेषण नसल्यामुळें अनुपसर्जनच आहे.

१३—औपगवी यापासून स्त्रीरूपीं युवापत्याचा बोध होतो. युव-संज्ञेनें गोत्र संज्ञेचा बाध होत असल्यामुळें जातिसंज्ञा ( ४।१।६३ पृ. २२५ पं. १९ ) नाहीं म्हणून पुंवद्भावाचा निषेध होणार नाहीं.

भूदेवम्। वृद्धिनिमित्तस्येत्येवं भविष्यति। यस्तर्हि न वृद्धिनिमित्तः। ग्लुचुकायनी माणविका भार्यास्य ग्लुचुकायनीभार्यः॥ तस्मात्स्त्रिया युवत्या युवसंज्ञैव पर्युदसितव्या तस्यां च पर्युदस्तायां गोत्रप्रत्ययान्तमेतद्यूनि वर्तते॥

इहोत्पादयितर्यपत्ययुक्ते प्रत्ययान्तात्प्रतिषेधो वक्तव्यः परमप्रकृतेश्चोत्पत्तिर्वक्तव्या। सर्वेष्वपत्ययुक्तेषु प्रत्ययान्तात्प्रतिषेधो वक्तव्यः।

तस्मात्प्रतिषेधः॥ १०॥

तस्मात्प्रतिषेधो वक्तव्यः॥

संज्ञाकारिभ्यो वा प्रत्ययोत्पत्तिः॥ ११॥

अथवा संज्ञाकारिभ्यः प्रत्ययोत्पत्तिर्वक्तव्या॥ यदि संज्ञाकारिभ्यः प्रत्ययोत्पत्तिरुच्यते कथं गार्ग्यायणः वात्स्यायन इति।

गोत्राद्यूनीति च॥ १२॥

गोत्राद्यूनीत्येतद्वक्तव्यम्॥

तच्च जात्यादिनिवृत्त्यर्थम्॥ १३॥

तच्चावश्यं संज्ञाकारिग्रहणं कर्तव्यम्। किं प्रयोजनम्। जात्यादिनिवृत्त्यर्थम्। जात्यादिभ्य उत्पत्तिर्मा भूदिति। जातिर्न वर्तते। संख्या न वर्तते। सर्वनाम न वर्तते। जातिर्न वर्तते। काकस्यापत्यम्

---

झाला नाहीं तर न होऊ दे 'वृद्धिनिमित्तस्य०' (६।३।३९) यानें निषेध होईल.

तर मग ज्या ठिकाणीं तद्धित प्रत्ययामुळें वृद्धि झाली नसेल तेथें दोष येतो. उदा० 'ग्लुचुकायनी मुलगी ज्याची भार्या आहे' या अर्थी ग्लुचकायनीभार्यः असें होतें.

तेव्हां एकंदरींत स्त्रीरूपीं युवापत्य असेल तेथें त्या अपत्याला मुळीं युवसंज्ञाच होत नाहीं असा निषेध केला पाहिजे. अशा रीतीनें युवसंज्ञा झाली नाहीं म्हणजे गोत्रसंज्ञा कायम असल्यामुळें त्या युवापत्याचा बोध गोत्रप्रत्ययान्तापासूनच होतो.

आतां येथें 'अपत्य हें पित्याचेंच म्हणतां येतें' या पक्षीं अपत्य अर्थी प्रत्यय हा प्रत्ययान्ताहून होत नाहीं असें म्हटलें पाहिजे. शिवाय मूळपुरुषबोधक जो शब्द त्याहून एकदम प्रत्यय होतो असें म्हटलें पाहिजे. आणि 'अपत्य हें बाप आजा वगैरे सर्वांचेंच म्हणतां येतें' या पक्षीं अपत्य अर्थी प्रत्यय हा प्रत्ययान्ताहून होत नाहीं असें म्हटलें पाहिजे.

(वा. १०) एकंदरींत तसा निषेध केला पाहिजे.

(वा. ११) किंवा 'संज्ञाकारि' म्हणजे कुलव्यपदेशहेतु जो मूळ पुरुष म्हणून गृहीत धरलेला त्याहूनच अपत्य अर्थी प्रत्यय होतो असें म्हणावें.

पण जर संज्ञाकारि शब्दाहून अपत्य अर्थी प्रत्यय होतो असें म्हटलें तर गार्ग्यायणः वात्स्यायनः येथें गार्ग्य व वात्स्य यांहून फक प्रत्यय (४।१।१०१) कसा होईल?

(वा. १२) गोत्र–प्रत्ययान्ताहून युवापत्य अर्थी प्रत्यय होतो असें म्हणावें म्हणजे तेथें दोष येणार नाहीं.

(वा. १३) आणि संज्ञाकारि शब्दाहूनच अपत्य अर्थी प्रत्यय होतो असें अवश्य म्हटलें पाहिजे.

त्याचा काय उपयोग?

जाति–शब्द वगैरेंहून अपत्य अर्थी प्रत्यय न झाला पाहिजे हा त्याचा उपयोग होय. जाति शब्दांची तशी ताद्धित वृत्ति होत नाहीं; संख्या शब्दांची ताद्धित वृत्ति होत नाहीं; आणि सर्वनामसंज्ञक शब्दांची ताद्धित वृत्ति होत नाहीं. त्यांपैकीं जाति–शब्दांची अपत्य अर्थी वृत्ति होत नाहीं याचें उदाहरण 'काकस्यापत्यम्', 'कुररस्यापत्यम्' असें वाक्यच राहतें. संख्या

---

१४–ग्लुचुक शब्दाहून गोत्रापत्य अर्थी फिन् (४।१।१६०) प्रत्यय, पुढें युवापत्य अर्थी अण्, त्याचा लुक्, पुढें 'सर्वतोऽक्तिन्नर्थात्०' यानें ङीष् प्रत्यय, व नंतर बहुव्रीहि वगैरे कार्यें झालीं आहेत.

१५–स्त्रीरूपीं युवापत्य असेल तेथें 'गोत्राद्यूनि'० या नियमाचा निषेध करण्यानें किंवा त्या युवापत्य अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् सांगण्यानें काम भागत नाहीं.

कुररस्यापत्यमिति । संख्या न वर्तते । नवानामपत्यम् दशानामपत्यमिति । सर्वनाम न वर्तते । सर्वेषामपत्यम् विश्वेषामपत्यमिति ॥ यत्तावदुच्यते जातिर्न वर्तते काकस्यापत्यम् कुररस्यापत्यमिति येनैव हेतुनैकः काकस्तेनैव हेतुना द्वितीयश्च तृतीयश्च काको भविष्यति। यदप्युच्यते संख्या न वर्तते नवानामपत्यम् दशानामपत्यमिति संख्येयमपेक्ष्य संख्या प्रवर्तते तत्सापेक्षं सापेक्षं चासमर्थं भवतीत्यसामर्थ्यान्न भविष्यति । यदप्युच्यते सर्वनाम न वर्तते सर्वेषामपत्यमिति निर्देश्यमपेक्ष्य निर्देशः प्रवर्तते तत्सापेक्षं सापेक्षमसमर्थं भवतीत्यसमर्थत्वान्न भविष्यति ॥ यत्तावदुच्यते येनैव हेतुनैकः काकस्तेनैव हेतुना द्वितीयश्च तृतीयश्च काको भविष्यतीति नैतद्विवदामहे काको न काक इति । किं तर्हि । येनैव हेतुनैतद्वाक्यं भवति काकस्यापत्यम् कुररस्यापत्यमिति तेनैव हेतुना वृत्तिरपि प्राप्नोति । यदप्युच्यते संख्येयमपेक्ष्य संख्या प्रवर्तते तत्सापेक्षं सापेक्षं चासमर्थं भवतीति

---

शब्दांची अपत्य अर्थी वृत्ति होत नाहीं. याचें उदा०-नवानामपत्यम् दशानामपत्यम् असें वाक्यच राहतें. तसेंच सर्वनाम शब्दांची अपत्य अर्थी वृत्ति होत नाहीं याचें उदाहरण सर्वेषामपत्यम् विश्वेषामपत्यम् असें वाक्यच राहतें.

पण ह्या उदाहरणांमध्यें अपत्य अर्थी वृत्ति न होण्याचें कारण निराळेंच आहे. तें असें कीं काकस्यापत्यम् व कुररस्यापत्यम् येथें मूळ काक हा शब्द ज्या कारणानें एका कावळ्याला लागतो त्याच कारणानें तो शब्द दुसऱ्या व तिसऱ्या कावळ्याला म्ह. कावळ्याच्या अपत्याला लागतोच. तेव्हां तेथें वृत्ति करण्याचें कारणच राहात नाहीं तसेंच संख्यावाचक शब्दांची अपत्य अर्थी वृत्ति होत नाहीं. उदा०—नवानामपत्यम् दशानामपत्यम् असें जें म्हटलें आहे तेथेंही वृत्ति न होण्याचें कारण असें आहे कीं संख्या शब्दांना नेहमीं संख्येय पदार्थांची अपेक्षा असते. तेव्हां सापेक्ष अशा त्या संख्या शब्दांचें इतरत्र सामर्थ्य नाहीं. म्हणजे त्या संख्या शब्दांचा संख्येय सोडून अपत्य वगैरे इतर ठिकाणीं संबंध होत नाहीं. तेव्हां सामर्थ्य नसल्यामुळें वृत्ति होत नाहीं. (२।१।१). तसेंच सर्वेषामपत्यम् विश्वेषामपत्यम् येथें सर्वनाम शब्दांची अपत्य अर्थी वृत्ति होत नाहीं असें जें म्हटलें आहे तेथेंही असें समजावें कीं सर्वनाम शब्दानें ज्या वस्तूंचा निर्देश केला असतो त्या निर्देश्य वस्तूंची त्याला कायमची अपेक्षा असते. तेव्हां त्या सर्वनाम शब्दांचें इतरत्र सामर्थ्य नसल्यामुळें अपत्य अशी वृत्ति होत नाहीं.

काकस्यापत्यम् वगैरे ठिकाणीं वृत्ति न होण्याचीं जीं कारणें दाखविलीं तीं बरोबर दिसत नाहींत. त्यांपैकीं काकस्य अपत्यम् येथें जें म्हटलें आहे कीं ज्या कारणानें एका कावळ्याला काक हा शब्द लागतो त्याच कारणानें दुसऱ्या व तिसऱ्याही कावळ्याला काक असें म्हणतां येईल ही गोष्ट आम्हांलाही कबूल आहेच. कारण तो काक आहे कीं नाहीं असा आम्ही वाद करीत नाहीं. तर फक्त आमचें म्हणणें इतकेंच कीं ज्या कारणानें काकस्यापत्यम् अथवा कुररस्यापत्यम् असें त्याला अपत्य म्हणतां त्याच कारणानें त्या अपत्य अर्थी तद्धित वृत्तीही प्राप्त होते. तसेंच संख्या शब्दाला नेहमीं संख्येय पदार्थांची अपेक्षा असते. तेव्हां सापेक्ष अशा त्या संख्या शब्दांचा संख्येय सोडून दुसरीकडे म्ह. अपत्य वगैरेंकडे संबंध होत नाहीं असें जें म्हटलें आहे तेंही सर्व ठिकाणीं लागू होत नाहीं. ज्या ठिकाणीं

---

१६-तेव्हां त्याकरितां 'संख्याकारिभ्यः०' हें वचन करावयास नको.

भवति वै कस्यचिदर्थोऽप्रकरणाद्वापेक्ष्यं निर्ज्ञातं यदा निर्ज्ञातं तदा वृत्तिः प्राप्नोति । यदप्युच्यते सर्वेषामपत्यम् विश्वेषामपत्यमिति निर्देश्यमपेक्ष्य निर्देशः प्रवर्तते तत्सापेक्षं सापेक्षं चासमर्थं भवतीति भवति वै कस्यचिदर्थोऽप्रकरणाद्वापेक्ष्यं निर्ज्ञातं यदा निर्ज्ञातं तदा वृत्तिः प्राप्नोति ॥ एवं तर्ह्यनभिधानाज्जात्यादिभ्य उत्पत्तिर्न भविष्यति । तच्चावश्यमनभिधानमाश्रयितव्यम् । क्रियमाणेऽपि हि संज्ञाकारिग्रहणे यत्र जात्यादिभ्य उत्पद्यमानेन प्रत्ययेनार्थस्याभिधानं भवति भवति तत्रोत्पत्तिः । तद्यथा ।

कुतश्चरति मायूरिः केन कापिञ्जलिः कृतः ।
आहेयेन च दष्टस्य पाङ्क्तिः सुतसमो मतः ॥२॥

तादायनिः यादायनिः कैमायनिरिति ॥

तदेतदनन्यार्थं संज्ञाकारिग्रहणं वा कर्तव्यं प्रत्ययान्ताद्वा प्रतिषेधो वक्तव्यः ॥ उभयं न कर्तव्यम् । गोत्रग्रहणं न करि-

---

संख्येय पदार्थ अमुक आहे असें अर्थावरून किंवा प्रकरणावरून निश्चित ज्ञान सहजच झालेलें असतें तेथें संख्या शब्दाला सापेक्षता असत नाहीं[17] . तेव्हां त्याची अपत्य अर्थी तद्धित वृत्ति प्राप्त होते. तसेंच सर्वेषामपत्यम् विश्वेषामपत्यम् इत्यादि ठिकाणीं सर्वनाम शब्दानें ज्या वस्तूचा निर्देश केला जातो त्या निर्देश्य वस्तूची त्याला कायमची अपेक्षा असते. तेव्हां तो सर्वनाम शब्द सापेक्ष असल्यामुळें ती निर्देश्य वस्तु सोडून इतर ठिकाणीं म्ह. अपत्य वगैरेशीं संबंध होत नाहीं असें जें म्हटलें आहे ती ही गोष्ट सर्व ठिकाणीं लागू होत नाहीं. ज्या ठिकाणीं निर्देश्य वस्तु अमुक आहे असें अर्थावरून किंवा प्रकरणावरून निश्चित ज्ञान सहजच झालेलें असतें तेथें त्या सर्वनाम शब्दाला सापेक्षता असत नाहीं. तेव्हां त्याची अपत्य अर्थी तद्धित वृत्ति प्राप्त होते.

तर मग, आतां अनभिधानास्तव जाति शब्द, संख्या शब्द, आणि सर्वनाम शब्द यांहून अपत्य अर्थी प्रत्यय होत नाहीं असें समजावें. आणि अनभिधानामुळें अपत्य अर्थी प्रत्यय होत नाहीं असें अवश्य मानलेंच पाहिजे. ( कारण अनभिधान हें कारण मानलें म्हणजे जाति वगैरे शब्दांपैकीं ज्या कांहीं शब्दांहून अपत्य अर्थी प्रत्यय करून अर्थाचें अभिधान होतें तेथें प्रत्यय करावयास मोकळीक मिळते. नाहीं तर ) संज्ञाकारि शब्दाहूनच अपत्य अर्थी प्रत्यय होतो ( वा. ११ ) असें वचन केलें असतां जाति वगैरे शब्दांपैकीं ज्या कांहीं शब्दांहून केलेल्या प्रत्ययानें अर्थाचें अभिधान होतें तेथें अपत्य प्रत्यय होत असतो तो होणार नाहीं. उदा०

कुतश्चरति मायूरिः केन कापिञ्जलिः कृतः ।
आहेयेन च दष्टस्य पाङ्क्तिः सुतसमो मतः ॥

या श्लोकांतील मायूरिः वगैरे प्रयोग पहा. तसेंच तादायनिः, यादायनिः, कैमायनिः वगैरेही प्रयोग पहा. तेव्हां अन्यत्र उपयोगी न पडणारें असें संज्ञाकारिभ्यः हें वचन केवळ प्रत्ययमाला टाळण्याकरितां केलें पाहिजे किंवा अपत्य अर्थी होणारा प्रत्यय हा प्रत्ययान्ताहून होत नाहीं असा प्रतिषेध तरी केला पाहिजे.

ह्या दोन्ही गोष्टी करावयास नकोत. प्रकृत

---

१७–कारण, त्या संख्या शब्दापासूनच तितक्या संख्येय पदार्थांचा बोध होतो.

१८–येथें मयूर व कपिञ्जल या जातिशब्दांहून अपत्य अर्थी इञ् प्रत्यय (४।१।९५) झाला आहे. तसाच अहि शब्दाहून ढक् प्रत्यय (४।१।१२२) झाला आहे. पङ्क्ति या संख्या–शब्दाहून अपत्य अर्थी इञ् (४।१।९६) झाला आहे, तसाच तद्, यद्, किम् या सर्वनाम शब्दांहून अपत्य अर्थी फिञ् (४।१।१५७) झाला आहे. तेव्हां जाति शब्द वगैरेंची अपत्य अर्थी वृत्ति न होण्याकरतां 'संज्ञाकारिभ्यः' हें वचन केलेंच पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं.

ध्यते । एको ऽपत्ये प्रत्ययो भवतीत्येव । यदि चेदानीं प्रत्ययान्तादपि प्रत्ययः स्यान्नैकोऽपत्ये प्रत्ययः स्यात् ॥ यदि गोत्रग्रहणं न क्रियते कथं गार्ग्यायणः वात्स्यायन इति । वक्तव्यमेवैतद्गोत्राद्यून्यस्त्रियामिति ॥ अथापि गोत्रग्रहणं क्रियते । एवमपि न दोषः । नैकग्रहणेन प्रत्ययोऽभिसंबध्यत एको गोत्रे प्रत्ययो भवतीति । किं तर्हि । प्रकृतिरभिसंबध्यते । एका प्रकृतिर्गोत्रे प्रत्ययमुत्पादयति । यदि चेदानीं प्रत्ययान्तादपि प्रत्ययः स्यान्नैका प्रकृतिर्गोत्रे प्रत्ययमुत्पादयेत् ॥ अथवास्थानेऽयं यत्नः क्रियते न हीदं लोकाद्भिद्यते । लोके हि संख्यां प्रवर्तमानामुपचरन्त्येक इति वा प्रथम इति वा । यावद् ब्रूयात्प्रथमो ऽपत्ये प्रत्ययमुत्पादयति तावदेको गोत्र इति ॥

[गोत्राद्यून्यस्त्रियाम् ॥ ४।१।९४॥]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये चतुर्थस्याध्यायस्य प्रथमे पादे तृतीयमाह्निकम् ॥

---

सूत्रामध्यें गोत्र शब्द काढून टाकतां येईल. तेव्हां 'अपत्य अर्थीं प्रत्यय एक होतो' असाच त्याचा अर्थ होईल आणि आतां जर अपत्य-प्रत्ययान्ताहून पुनः अपत्य अर्थीं प्रत्यय केला तर 'अपत्य अर्थीं एक प्रत्यय केला' असें होत नाहीं. म्हणून अपत्य-प्रत्ययान्ताहून पुन्हां अपत्य प्रत्यय होणार नाहीं.

पण जर प्रकृत सूत्रामध्यें गोत्र-ग्रहण केलें नाहीं तर गार्ग्यायणः व वात्स्यायनः येथें गोत्रापत्य अर्थीं यञ् प्रत्यय (४।१।१०५) करून पुढें युवापत्य अर्थीं फक् (४।१।१०१) कसा बरें होईल ?

त्याकरितां 'गोत्राद्यून्यस्त्रियाम्' हें पुढील सूत्र केलेंच पाहिजे; त्यानेंच तें साधेल.

शिवाय प्रकृत सूत्रामध्यें जें आचार्यांनीं गोत्र-ग्रहण केलें आहे तें जसेंच्या तसेंच ठेवलें तरी दोष येत नाहीं. कारण 'गोत्र या अर्थीं एकच प्रत्यय होतो' असा 'एक' या शब्दाचा प्रत्ययाकडे आम्ही संबंध करीत नाहीं तर त्या 'एक' शब्दाचा प्रकृतीकडे संबंध करतों. तेव्हां एका प्रकृतीहूनच गोत्रापत्य या अर्थीं प्रत्यय होतो असा अर्थ होईल. आणि आतां जर गोत्रापत्य विवक्षित असतांना एक प्रत्यय करून त्या प्रकृतीहून पुन्हां दुसरा प्रत्यय केला जाईल तर एका प्रकृतीहूनच प्रत्यय केला असें होत नाहीं.

अथवा, येथें हा सर्व प्रयत्न भलत्याच ठिकाणीं केला असें दिसतें. कारण, शास्त्र म्हणजे कांहीं लोकांपेक्षां निराळें असें मुळींच नाहीं. आणि लोकांमध्यें तर संख्येला प्रारंभ झाला कीं पहिल्यालाच एक असेंही म्हणतात, व प्रथम असेंही म्हणतात. तेव्हां गोत्रापत्य विवक्षित असतांना प्रथम शब्दच अपत्य प्रत्ययाला प्रकृतिभूत होतो अशा अर्थीचेंच 'एको गोत्रे' हें सूत्र होय.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरमहाभाष्यांतील चवथ्या अध्यायाच्या पहिल्या पादाचें तिसरें आन्हिक समाप्त झालें.

---

१(सू.९४)–युवापत्याची विवक्षा असेल तर त्या अर्थीं होणारा प्रत्यय गोत्रापत्य-प्रत्ययान्ताहूनच होतो. तें युवापत्य जर स्त्रीरूपीं असेल तर त्याला युव-संज्ञाच होत नाहीं. तेव्हां अर्थातच स्त्रीरूपीं युवापत्याला गोत्र संज्ञाच (४।१।१६२) कायम राहत असल्यामुळें तेथें पूर्वीचाच नियम लागू होतो.

अध्याय ४ पाद १ आन्हिक ३ समाप्त.

## अत इञ् ॥ ४।१।९५ ॥

### इञो वृद्धावृद्धाभ्यां फिञ्फिनौ विप्रतिषेधेन ॥ १ ॥

इञो वृद्धावृद्धाभ्यां फिञ्फिनौ भवतो विप्रतिषेधेन । इञोऽवकाशः । दाक्षिः प्लाक्षिः । फिञोऽवकाशः । तादायनिः यादायनिः । इहोभयं प्राप्नोति । तापसायनिः सांमितिकायनिः । फिनोऽवकाशः । त्वचायनिः स्रुचायनिः । इञः स एव । इहोभयं प्राप्नोति । ग्लुचुकायनिः म्लुचुकायनिः । फिञ्फिनौ भवतो विप्रतिषेधेन ॥ इह कस्मान्न भवति । दाक्षिः प्लाक्षिः । बहुलवचनात् ॥

### तद्राजश्च ॥ २ ॥

तद्राजश्चेञो भवति विप्रतिषेधेन । तद्राजस्यावकाशः । ऐक्ष्वाकः । इञः स एव । इहोभयं प्राप्नोति । पाञ्चालः वैदेहः वैदर्भः । तद्राजो भवति विप्रतिषेधेन ॥

## बाह्वादिभ्यश्च ॥ ४।१।९६ ॥

### बाह्वादिप्रभृतिषु येषां दर्शनं गोत्रभावे लौकिके ततोऽन्यत्र तेषां प्रतिषेधः ॥ १ ॥

बाह्वादिप्रभृतिषु येषां दर्शनं गोत्रभावे लौकिके ततोऽन्यत्र तेषां प्रतिषेधो वक्तव्यः । बाहोरपत्यं बाहविः । यो हि बहुर्नाम बाहवस्तस्य भवति । नडस्यापत्यं नाडायनः ।

( सू. ९५ वा. १ ) वृद्ध प्रातिपादिकाहून सांगितलेला फिञ् ( ४।१।१५७ ) आणि अवृद्ध प्रातिपदिकाहून सांगितलेला फिन् (४।१।१६०) हे प्रत्यय ह्या इञ् प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें परत्वास्तव होतात. ह्या इञ् प्रत्ययाला दाक्षिः व प्लाक्षिः येथें अवकाश आहे. तादायनिः व यादायनिः येथें फिञ् प्रत्ययाला अवकाश आहे. आणि तापसायनिः व सांमितिकायनिः येथें दोघांची प्राप्ति येते. तसेंच त्वचायनिः व स्रुचायनिः येथें फिन् प्रत्ययाला अवकाश आहे. ह्या इञ् प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे. आणि ग्लुचुकायनिः व म्लुचुकायनिः येथें दोघांची प्राप्ति येते.तेव्हां तेथें विप्रतिषेधानें फिञ् आणि फिन् हे परत्वास्तव होतात.

आतां दाक्षिः व प्लाक्षिः येथें फिन् प्रत्यय का बरें होत नाहीं ?

तो फिन् ( ४।१।१६० ) बाहुल्येंकरून सांगितला असल्यामुळे होत नाहीं.

( वा. २ ) तद्राज-( ४।१।१६८-१७३ ) संज्ञक प्रत्यय ही विप्रतिषेधानें ह्या इञ् प्रत्ययाचा परत्वास्तव बाध करतात. ऐक्ष्वाकः येथें तद्राज प्रत्ययाला अवकाश आहे. ह्या इञ् प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे. आणि पाञ्चालः, वैदेहः, वैदर्भः इत्यादि ठिकाणीं दोघांची प्राप्ति येते. तेव्हां तेथें विप्रतिषेधानें तद्राज प्रत्यय परत्वास्तव होतात.

( सू. ९६ वा. १ ) ह्या बाह्वादि, कुञ्जादि, नडादि वगैरे गणांमध्यें जे शब्द दृष्टीस पडतात त्यांचा अर्थ लोकप्रसिद्ध कुलप्रवर्तक मूळ पुरुष असा असेल तरच ते शब्द त्या त्या गणामध्यें आहेत असें समजावें. त्याशिवाय इतर ठिकाणीं ते प्रत्यय होत नाहींत, असा प्रतिषेध सांगावा. बाहु नांवाचा पुरुष तसा असेल तर बाहोः अपत्यं बाहविः असा प्रकृत सूत्रानें इञ् प्रत्यय होतो. आणि इतर ठिकाणीं म्हणजे एखाद्या मनुष्याचें बाहु असें नांव ठेवलें असेल तर तेथें बाहोः अपत्यं बाहवः असा अण् प्रत्ययच ( ४।१।९२ ) होतो. तसेंच लोकप्रसिद्ध कुलप्रवर्तक जो नड तो अर्थ असेल तर नडस्य गोत्रापत्यं नाडायनः असें

१ (सू. ९५)—ह्रस्व अकारान्त जें प्रातिपदिक त्याहून 'त्याचें अपत्य' या अर्थी इञ् प्रत्यय होतो. उदा०—दक्षस्यापत्यम् दाक्षिः.

१ (सू. ९६)—बाह्वादि गणांतील जे बाहु वगैरे शब्द त्यांहून त्याचें अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय होतो. उदा०— बाहोः अपत्यं बाहविः.

यो हि नडो नाम नाडिस्तस्य भवति ॥

संबन्धिशब्दप्रत्ययानां तत्सदृशात्प्रतिषेधः ॥ २ ॥

संबन्धिशब्दप्रत्ययानां च तत्सदृशात्प्रतिषेधो वक्तव्यः । श्वशुरस्यापत्यं श्वशुर्यः । यो हि श्वशुरो नाम श्वाशुरिस्तस्य भवति ॥ प्रत्ययग्रहणेन नार्थः । संबन्धिशब्दानां तत्सदृशात्प्रतिषेध इत्येव । इदमपि सिद्धं भवति । मातृपितृभ्यां स्वसा [८.३.८४] मातृष्वसा पितृष्वसा । अन्या मातृस्वसेति ॥

## सुधातुरकङ् च ॥ ४ । १ । ९७ ॥

सुधातृव्यासयोः ॥ १ ॥

सुधातृव्यासयोरिति वक्तव्यम् । सौधातकिः । वैयासकिः शुकः ॥ अत्यल्पमिदमुच्यते । सुधातृव्यासवरुडनिषादचण्डालबिम्बानामिति वक्तव्यम् । सौधातकिः । वैयासकिः शुकः । वारुडकिः । नैषादकिः । चाण्डालकिः । बैम्बकिः ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । प्रकृत्यन्तराण्येवैतानि ॥

होतें; आणि नड नांवाचा कोणी तरी असेल तर तेथें नडस्य गोत्रापत्यं नाडिः असा इञ् प्रत्ययच ( ४।१।९५ ) होतो.

( वा. २ ) संबंधि शब्दांहून सांगितलेले जे प्रत्यय ते त्या शब्दांचा अर्थ त्या संबंधींच्या सारखा असा असेल तर होत नाहींत असे म्हणावें. श्वशुराचें अपत्य या अर्थी यत् प्रत्यय (४।१।१३७) होऊन श्वशुर्यः असें रूप होतें. ज्या ठिकाणीं श्वशुर शब्दाचा अर्थ श्वशुरासारखा असा असेल किंवा ज्याचें श्वशुर असें नांवच असेल तेथें त्या श्वशुर शब्दाहून इञ् प्रत्यय होऊन श्वाशुरिः असेंच होतें.

ह्या वार्तिकामध्यें प्रत्यय शब्द घालण्यात कांहीं अर्थ दिसत नाहीं. तर 'संबन्धिशब्दाना तत्सदृशात्प्रतिषेधः' एवढेंच म्हणावें; व तसें म्हटलें म्हणजे त्या निषेधाचा इतर कार्याकडेही उपयोग होतो. म्हणून 'मातृपितृभ्या स्वसा' ( ८।३।८४ ) यानें सांगितलेलें षत्व मातृ वगैरे शब्द प्रसिद्ध अर्थाचे असतील तरच होतें. उदा० मातृष्वसा (मावशी) पितृष्वसा (आत्या ). इतर ठिकाणीं मातृस्वसा, पितृस्वसा अशींच रूपें होतात.

( सू. ९७ वा. १ ) सुधातृ आणि व्यास ह्या दोन शब्दांहून अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय होतो. आणि या दोन्ही शब्दांच्या शेवटच्या वर्णाला अकङ् आदेश होतो असें म्हणावें. उदा०—सौधातकिः, वैयासकिः शुकः.

हें फारच थोडें सांगितलें आहे. 'सुधातृव्यासवरुडनिषादचण्डालबिम्बानामिति वक्तव्यम्' असें सांगावें: सुधातृ, व्यास, वरुड, निषाद, चण्डाल आणि बिम्ब या शब्दांहून अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय होतो आणि या शब्दांच्या शेवटच्या वर्णाला अकङ् आदेश होतो असें म्हणावें. उदा०—सौधातकिः, वैयासकिः शुकः, वारुडकिः, नैषादकिः, चाण्डालकिः, बैम्बकिः.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण ते निराळेच शब्द आहेत.

---

१(सू.९७)—सुधातृ शब्दाहून त्याचें अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय होतो आणि त्याबरोबरच सुधातृ शब्दातील शेवटच्या ऋकाराला अकङ् आदेश होतो. उदा०—सुधातुः अपत्यं सौधातकिः.

२—व्यास, वरुड वगैरे शब्दांहून स्वार्थी कन् प्रत्यय करून व्यासक व वरुडक असे जे शब्द होतात त्याहून इञ् प्रत्यय केला म्हणजे वैयासकिः वारुडकिः वगैरे शब्द सिद्ध होतात. कन् प्रत्यय न करतां व्यास वरुड वगैरे शब्दांहून अण्यादिक न्यायानें इञ् प्रत्यय होत नाहीं असें समजावें.

गोत्रे कुञ्जादिभ्यश्च्फञ्
॥ ४।१।९८ ॥

किमर्थश्चकारः । स्वरार्थः । चितोऽन्त उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यात् । अथ ञकारः किमर्थः । ञकारो वृद्ध्यर्थः । ञ्णितीति वृद्धिर्यथा स्यात् ॥ एकेन ककारेणोभयं सिद्धम् ॥ अवश्यमत्र विशेषणार्थोऽन्योऽनुबन्धः कर्तव्यः । क्व विशेषणार्थेनार्थः । व्रातच्फञोरस्त्रियाम् [५.३.११३] इति । फक इति ह्युच्यमाने नाडायनः अत्रापि प्रसज्येत । अथापि फञ इत्युच्यत एवमप्याश्वायनः अत्रापि प्रसज्येत । तस्माच्चकार एव कर्तव्यो ऽन्तोदात्तत्वमपि यथा स्यात् । चकारे चेदानीं विशेषणार्थे क्रियमाणे ऽवश्यं वृद्ध्यर्थो ऽन्यो ऽनुबन्धः कर्तव्यः । स च ञकार एव कर्तव्यः सूत्रभेदो मा भूदिति ॥ अथ क्रियमाणेऽपि वै चकारे ऽन्तोदात्तत्वं न प्राप्नोति । किं कार-

---

(सू.९८) येथें या च्फञ् प्रत्ययाला चकार अनुबंध कशाकरितां जोडला आहे ?

स्वराकरितां जोडला आहे. चकार इत्संज्ञक असेल तेथें अन्त उदात्त होतो (६।१।१६३) असा सांगितलेला अन्त उदात्त स्वर येथें झाला पाहिजे.

आतां या च्फञ् प्रत्ययाला ञकार अनुबंध कशाकरितां जोडला आहे ?

ञकार हा वृद्धि होण्याकरितां जोडला आहे. ञकारेत्संज्ञक किंवा णकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना सांगितलेली आदिवृद्धि (७।२।११७) येथें झाली पाहिजे.

पण येथें या (फ) प्रत्ययाला फक्त एक ककार अनुबंध जोडला म्हणजे या दोन्ही गोष्टी साधतील.

एक ककार अनुबंध जोडून फक् प्रत्यय जरी येथें सांगितला तरी कांहीं ठिकाणीं याच फक् प्रत्ययाचें ग्रहण होण्याकरितां कांहीं तरी विशेषण लाविलें पाहिजे. आणि तें विशेषण म्हणून या फक् प्रत्ययाला जुळण्याकरितां ककाराशिवाय दुसरा कोणता तरी अनुबंध जोडलाच पाहिजे.

असें विशेषण लावल्यानें कोठें बरें उपयोग होतो ?

याच प्रत्ययापुढें स्वार्थी ञ्य प्रत्यय सांगणाऱ्या 'व्रातच्फञोरस्त्रियाम्' (५।३।११३) या सूत्रामध्यें. तेथें जर फक् असें पद उच्चारलें तर नाडायनः येथेंही पुढील सूत्रानें फक् प्रत्यय केला असल्यामुळें तेथेंही त्याच्यापुढें स्वार्थी ञ्य प्रत्यय होऊं लागेल. आतां येथें फञ् सांगून 'व्रातच्फञो०' या सूत्रामध्यें फञ् असेंच पद उच्चारलें तर आश्वायनः येथें फञ् प्रत्यय (४।१।११०) केला असल्यामुळें तेथेंही त्याच्या पुढें स्वार्थी ञ्य प्रत्यय होऊं लागेल. तेव्हां येथें चकार जोडला पाहिजे. तो चकार 'व्रातच्फञो०' येथें उच्चारला म्हणजे ह्याच प्रत्ययाच्या पुढें स्वार्थी ञ्य प्रत्यय होईल आणि अन्त उदात्तही होईल.

अशा रीतीनें या प्रत्ययाला चकारेत्संज्ञक हें विशेषण जुळण्याकरितां येथें चकार जोडला असतां वृद्धि होण्याकरितां दुसरा अनुबंध ञकार, णकार किंवा ककार यांपैकीं कोणता तरी जोडलाच पाहिजे. तो ञकारच जोडावा. कारण विनाकारण सूत्रामध्यें फिरवाफिरव करण्यांत कांहीं मतलब नाहीं.

पण अशा रीतीनें ञकार जोडला तर अन्त उदात्त होण्याकरितां चकार जोडला तरी अन्त उदात्त स्वर होणार नाहीं.

---

१(सू.९८)—कुञ्ज वगैरे जे कुञ्जादि गणांतील शब्द त्यांहून गोत्रापत्य या अर्थी च्फञ् प्रत्यय होतो. उदा०—कुञ्जस्य गोत्रापत्यम् कौञ्जायन्यः. येथें कुञ्ज शब्दाहून प्रकृत सूत्रानें च्फञ् प्रत्यय, फकाराला आयन् (७।१।२) आदेश आणि पुढें स्वार्थी ञ्य-प्रत्यय (५।३।११३) अशीं कार्यें झालीं आहेत.

णम्। परत्वाञ्ञ्नितीत्याद्युदात्तत्वं प्राप्नोति। चित्करणसामर्थ्यादन्तोदात्तत्वं भविष्यति। ञित्करणसामर्थ्यादाद्युदात्तत्वं प्राप्नोति। अस्त्यन्यञ्ञित्करणे प्रयोजनम्। किम्। वृद्ध्यर्थो ञकारः। चित्करणेऽपि तर्ह्यन्यत्प्रयोजनमस्ति। किम्। विशेषणार्थश्चकारः। शक्योऽत्र विशेषणार्थोऽन्योऽनुबन्ध आसङ्क्तुं तत्र चकारानुरोधादन्तोदात्तत्वं भवति। वृध्यर्थोऽपि तर्ह्यन्यः शक्यो ऽनुबन्ध आसङ्क्तुं तत्र ञकारानुरोधादाद्युदात्तत्वं प्राप्नोति॥ एवं तर्हि स्वरे योगविभागः करिष्यते। इदमस्ति। चितः [६.१.१६३]। चितोऽन्त उदात्तो भवति। ततस्तद्धितस्य। तद्धितस्य च चितोऽन्त उदात्तो भवतीति। किमर्थमिदम्। परत्वाञ्ञ्नितीत्याद्युदात्तत्वं प्राप्नोति तद्बाधनार्थम्। ततः कितः। कितस्तद्धितस्यान्त उदात्तो भवति॥ किं पुनरत्र स्वरार्थेन चकारेणानुबन्धेन यावता च्फञन्ताञ्ञ्यो विधीयते तत्र ञ्नितीत्याद्युदात्तत्वेन भवितव्यम्। नैतदस्ति। बहुषु

---

काय कारण ?

कारण असें कीं 'ञ्निति०' (६।१।१९७) या सूत्रानें परत्वास्तव आद्युदात्त प्राप्त होतो.

पण इत्संज्ञक चकार जोडला आहे त्याच्या सामर्थ्यास्तव अन्त उदात्त होईल.

तर मग तसेंच इत्संज्ञक ञकार जोडला आहे त्याच्या सामर्थ्यास्तव आदि उदात्त होईल.

पण इत्संज्ञक ञकार जोडण्याचा दुसरा उपयोग आहे ना ?

तो कोणता बरें ?

वृद्धि (७।२।११७) होणें हा त्याचा उपयोग आहे.

तर मग इत्संज्ञक चकार जोडण्याचाही दुसरा उपयोग आहेच.

तो कोणता ?

चकारेत्संज्ञक असें विशेषण त्याला जुळून त्याहूनच स्वार्थीं ञ्य प्रत्यय होतो.

पण विशेषण जुळणें हा उपयोग कांहीं चकाराचाच आहे असें नाहीं. त्याकरितां दुसरा कोणताही वर्ण जोडून तसें विशेषण देतां येईल. असें असतां जो येथें चकारच जोडला आहे त्याच्या सामर्थ्यास्तव अन्त उदात्त होईल.

मग तसा वृद्धीकरितां कांहीं ञकारच जोडावयास नको. त्याकरितां दुसरा वर्ण णकार किंवा ककार जोडतां येईल. असें असतां जो येथें ञकारच जोडला आहे त्याच्या सामर्थ्यास्तव आदि उदात्त होईल.

असें आहे तर मग स्वर सांगणाऱ्या सूत्रामध्यें योगविभाग करण्यांत येईल. तो असाः—चितः (६।१।१६३) हें पहिलें सूत्र होय. चित् प्रत्ययान्ताचा अन्त उदात्त होतो असा त्याचा अर्थ होईल. त्यानंतर 'तद्धितस्य' (६।१।१६४) हें दुसरें सूत्र होय. चित् जो तद्धित प्रत्यय तदन्ताचा अन्त उदात्त होतो असा त्याचा अर्थ होईल.

चितः या सूत्रानें अन्त उदात्त सिद्ध होत असतांना पुन्हां तद्धित प्रत्ययाविषयीं हें निराळें सूत्र कशाकरिता केलें आहे ?

ज्या ठिकाणीं चितः याचा परत्वास्तव बाध करून 'ञ्नित्यादिः' (६।१।१९७) यानें आदि उदात्त प्राप्त होतो त्याचा बाध करण्याकरितां हें सूत्र निराळें मुद्दाम केलें आहे. त्याच्या पुढें 'कितः' (६।१।१६५) हें सूत्र होय. कित् जो तद्धित प्रत्यय त्याचा अन्त उदात्त होतो असा त्याचा अर्थ होईल.

पण आतां इत्संज्ञक चकारामुळें अन्त उदात्त स्वर जो होतो त्याचा काय बरें उपयोग ? कारण, जर येथें या च्फञ् प्रत्ययान्ताहून ञ्य प्रत्यय कायमचाच होत आहे तर तो ञ्य प्रत्यय केल्यानंतर मागून आदि उदात्त होणारच.

असें नाहीं; बहुत्व-विवक्षा असतांना कुञ्जस्य

लोपे कृते ञ्न्तोदात्तत्वं यथा स्यात् । कौञ्जायना इति ॥

इह केचिद् द्व्येकयोः ष्यञं विदधति बहुषु च फकं केचिच्च्फञन्ताञ्ञ्यम् । किमत्र न्याय्यम् । ञ्यवचनमेव न्याय्यम् । द्व्येकयोर्हि ष्यञि सति बहुषु च फकि कौञ्जायनानामपत्यं माणवकः कौञ्जायन्यः कौञ्जायन्यौ केन यशब्दः श्रूयेत । द्व्येकयोरित्युच्यमानो न प्राप्नोति । इह कौञ्जायन्यस्यापत्यं बहवो माणवकाः कौञ्जायनाः केन यशब्दो न श्रूयेत । द्व्येकयोरित्युच्यमानः प्राप्नोति ॥ तदेतत्कथं कृत्वा ञ्यवचनं न्याय्यो भवति । यदि तस्मास्यापत्यो वा गोत्रं परमप्रकृतेश्चापत्य आपत्याज्जीवद्वंश्यात्स्वार्थे द्वितीयो युवसंज्ञः स चास्त्रियामेकोगोत्रग्रहणानर्थक्यं च बहुवचनलोपिषु च सिद्धमिति । सति हि तस्मिन्द्व्येकयोरपि ष्यञि सति बहुषु च फकि न दोषो भवति । तत्र कौञ्जायनानामपत्यं माणवक इति विगृह्य कुञ्जशब्दाद् द्व्येकयोरुत्पत्तिर्भविष्यति । कौञ्जायन्यः कौञ्जायन्यौ । कौञ्जायन्यस्यापत्यं बहवो माणवका इति विगृह्य कुञ्जशब्दाद् बहुषूत्पत्तिर्भविष्यति । कौञ्जायना इति ॥

गोत्रापत्यानि कौञ्जायनाः येथें त्या ञ्य प्रत्ययाचा लोप ( २।४।६२ ) केला असतां अन्त उदात्त कायम राहतो त्याकरितां येथें चकार पाहिजे.

येथें पूर्वीचे कांहीं वैयाकरण लोक गोत्रापत्य अर्थीं च्फञ् प्रत्यय आणि पुढें स्वार्थीं ञ्य प्रत्यय असे दोन प्रत्यय न करतां एकच प्रत्यय करतात, तो प्रत्यय मात्र द्वित्व व एकत्व यांची विवक्षा असतांना ष्यञ् असा करतात आणि बहुत्वाची विवक्षा असतांना फक् असा करतात. आणि कांहीं लोक च्फञ् प्रत्यय करून पुढें ञ्य प्रत्यय करतात.

या दोन प्रकारांपैकीं योग्य प्रकार कोणता ?

च्फञ् प्रत्यय करून पुढें ञ्य प्रत्यय करणें हाच प्रकार योग्य होय. कारण द्वित्व व एकत्व यांची विवक्षा असतांना ष्यञ् प्रत्यय आणि बहुत्वविवक्षा असतांना फक् प्रत्यय केला तर कौञ्जायनानामपत्यं माणवकः कौञ्जायन्यः तसेंच कौञ्जायन्यौ या उदाहरणांमध्यें य शब्द कसा दिसेल ? कारण ष्यञ् प्रत्यय द्वित्व किंवा एकत्व यांची विवक्षा असतांनाच सांगितला असल्यामुळें येथें तो प्राप्त होत नाहीं. तसेंच कौञ्जायन्यस्य अपत्यानि बहवो माणवकाः कौञ्जायनाः येथें य शब्द कां दिसणार नाहीं ? कारण द्वित्व व एकत्व यांची विवक्षा असतांना सांगितलेला ष्यञ् प्रत्यय येथें प्राप्त होत आहे.

आतां च्फञ् प्रत्यय करून पुढें ञ्य प्रत्यय करणें हा प्रकार योग्य खरा, पण केव्हां ?

अपत्यो वा गोत्रम् । परमप्रकृतेश्चापत्यः । आपत्याज्जीवद्वंश्यात्स्वार्थे द्वितीयो युवसंज्ञः स चास्त्रियाम् । एकोगोत्रग्रहणानर्थक्यं च । बहुवचनलोपिषु च सिद्धम् (४।१।१६३वा. ४-९) हीं वचनें नसतील तेव्हां. आणि हीं वचनें घेतलीं म्हणजे मात्र द्वित्व व एकत्व यांची विवक्षा असताना ष्यञ् प्रत्यय सांगितला तरी आणि बहुत्व-विवक्षा असतांना फक् प्रत्यय सागितला तरी येथें कांहीं दोष येत नाहीं. कौञ्जायनानामपत्यं माणवकः असा विग्रह केला असतां त्या माणवकाचें द्वित्व किंवा एकत्व विवक्षित असेल तर कुञ्ज शब्दाहून ष्यञ् प्रत्यय होऊन कौञ्जायन्यः कौञ्जायन्यौ हीं रूपें साधतील; आणि कौञ्जायन्यस्य अपत्यानि माणवकाः असा विग्रह केला असतां त्या माणवकांचें बहुत्व विवक्षित असल्यामुळें त्या अर्थीं कुञ्ज शब्दाहून फक् प्रत्यय होऊन कौञ्जायनाः असें रूप होईल.

२-येथें युवापत्य या अर्थीं केलेल्या इञ्-प्रत्ययाचा लुक् (२।४।५८) आणि ञ्यप्रत्ययाचाही जो लुक् (२।४।६२) प्राप्त होतो त्याचा गोत्रेऽलुगचि (४।१। ८९) याने निषेध होतो.

३-मार्गे (४।१।८९ वा. १] पहा.

[नडादिभ्यः फक् ॥ ४।१।९९ ॥
हरितादिभ्योऽञः ॥ ४।१।१०० ॥
यञिञोश्च ॥ ४।१।१०१ ॥
शरद्वच्छुनकदर्भाद् भृगुवत्साग्रायणेषु ॥ ४।१।१०२ ॥
द्रोणपर्वतजीवन्तादन्यतरस्याम्] ॥ ४।१।१०३ ॥
अनृष्यानन्तर्ये बिदादिभ्योऽञ् ॥ ४।१।१०४ ॥

अनृष्यानन्तर्य इत्युच्यते तत्रेदं न सिध्यति कौशिको विश्वामित्र इति । किं कारणम् । विश्वामित्रस्तपस्तेपे नानृषिः स्यामिति । तत्रभवानृषिः संपन्नः । स पुनस्तपस्तेपे नानृषेः पुत्रः स्यामिति । तत्रभवान्गाधिरप्यृषिः संपन्नः । स पुनस्तपस्तेपे नानृषेः पौत्रः स्यामिति । तत्रभवान्कुशिकोऽप्यृषिः संपन्नः । तदेतदृष्यानन्तर्यं भवति तत्रानृष्यानन्तर्य इति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ नैष दोषः । नैवं विज्ञायत ऋष्यानन्तर्ये न भवतीति । कथं तर्हि । ऋषावनन्तरे नेति ।

(सू. १०४) येथें अनृष्यानन्तर्ये असें म्हटलें आहे; तेव्हां कुशिकस्य गोत्रापत्यं कौशिकः विश्वामित्रः हे उदाहरण सिद्ध होत नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं विश्वामित्रानें मी अनृषि म्हणजे ऋषिभिन्न नसावें म्हणून तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येच्या सामर्थ्यानें तो मान्य ऋषि झाला. नंतर 'मी अनृषीचा पुत्र नसावा' म्हणून पुनः तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येच्या सामर्थ्यानें त्याचा पिता जो गाधि तो मान्य ऋषि झाला. नंतर 'मी अनृषीचा पौत्र नसावा' म्हणून पुन्हां तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येच्या सामर्थ्यानें विश्वामित्राचा आजा जो कुशिक तोही मान्य ऋषि झाला. यावरून येथें हें ऋषींचें आनन्तर्य होत आहे. तेव्हां अनृष्यानन्तर्ये हा निषेध येथें प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण 'ऋषींचें आनन्तर्य असतांना हा अञ् प्रत्यय होत नाहीं' असा 'अनृष्यानन्तर्ये' याचा अर्थ आम्ही समजत नाहीं.

तर मग त्याचा अर्थ कसा समजतां?

१ (सू. ९९)–नडादि गणांतील जे नड वगैरे शब्द त्यांहून गोत्रापत्य अर्थी फक् प्रत्यय होतो. उदा०–नडस्य गोत्रापत्यं नाडायनः.

१(सू.१००)–बिदादि गणांतील शब्दांहून गोत्रापत्य अर्थी अञ् प्रत्यय (४।१।१०४) सांगितला आहे. त्या बिदादि गणापैकींच अन्तर्गण जो हरितादि गण त्यांतील हरित वगैरे शब्दांहून गोत्रापत्य अर्थी अञ् प्रत्यय केला असतां त्याहून पुढें युवापत्य अर्थी फक् प्रत्यय होतो. उदा०–हारितस्य अपत्यं हारितायनः.

१ (सू.१०१)–गोत्रापत्य अर्थी केलेले जे यञ् व इञ् हे प्रत्यय तदन्त शब्दाहून युवापत्य अर्थी फक् प्रत्यय होतो. उदा०–गार्ग्यस्यापत्यं गार्ग्यायणः, दाक्षेरपत्यं दाक्षायणः

१ (सू. १०२)–शरद्वत् शब्दाहून गोत्रापत्य अर्थी फक् प्रत्यय होतो, तें गोत्रापत्य भृगु वंशांतील असलें पाहिजे. शुनक शब्दाहून गोत्रापत्य अर्थी फक् प्रत्यय होतो, तें गोत्रापत्य वत्स वंशांतील असलें पाहिजे, आणि दर्भ शब्दाहून गोत्रापत्य अर्थी फक् प्रत्यय होतो तें गोत्रापत्य आग्रायण असलें पाहिजे. उदा०–शारद्वतायनो भार्गवः शौनकायनो वात्स्यः, दार्भायण आग्रायणः.

१ (सू १०३)–द्रोण, पर्वत आणि जीवन्त या शब्दांहून गोत्रापत्य अर्थी फक् प्रत्यय विकल्पानें होतो उदा०– द्रोणस्य गोत्रापत्यम् द्रौणायनः तसेंच द्रौणिः

१ (सू.१०४)–बिद वगैरे बिदादि गणांतील शब्दांहून गोत्रापत्य अर्थी अञ् प्रत्यय होतो. आणि या गणामध्यें जे शब्द ऋषिभिन्न अर्थाचे वाचक असतील त्यांहून साक्षात् अपत्य या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०–बिदस्य गोत्रापत्यं बैदः, पुत्रस्य अपत्यं पौत्रः.

२–ज्या गोत्रापत्य अर्थी हा अञ् प्रत्यय होतो ते गोत्रापत्य ऋषींचें साक्षात् अपत्य होत असेल तर हा अञ् प्रत्यय होत नाहीं असा अनृष्यानन्तर्ये याचा अर्थ गृहीत धरला आहे.

यद्येवम्

**अनृष्यानन्तर्यवचनमनर्थकं संज्ञागोत्राधिकारात् ॥ १ ॥**

अनृष्यानन्तर्यवचनमनर्थकम् । किं कारणम् । संज्ञागोत्राधिकारात् । संज्ञागोत्र इति वर्तते कः प्रसङ्गो यदनन्तरे स्यात् । नैव प्राप्नोति नार्थः प्रतिषेधेन ॥ एवं तर्हि सिद्धे सति यदनृष्यानन्तर्ये इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो विदादिषु ये ऽनृषयः पठ्यन्ते तेषामनन्तरेऽपि वृत्तिर्भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । नानान्द्रः पौत्रः दौहित्र इत्येतत्सिद्धं भवति ॥

**[गर्गादिभ्यो यञ् ॥ ४।१।१०५ ॥**

**मधुबभ्र्वोर्ब्राह्मणकौशिकयोः ॥ ४।१।१०६ ॥**

**कपिबोधादाङ्गिरसे ॥ ४।१।१०७ ]**

**वतण्डाच्च ॥ ४।१।१०८ ॥**

किमर्थमिदमुच्यते न गर्गादिभ्यो यञ् [४.१.१०५] इत्येवं सिद्धम् । लुक् स्त्रियाम् [ १०९ ] इति वक्ष्यामीति । यदि पुनस्तत्रैवोच्येत । नैवं शक्यम् । आङ्गिरसग्रहणं हि विच्छिद्येत ॥

ऋषि असेल तर तेथें साक्षात् अपत्य या अर्थी हा अञ् प्रत्यय होत नाहीं असा अर्थ आहे.

पण अनृष्यानन्तर्ये याचा असाच अर्थ असेल तर—

( वा. १ ) अनृष्यानन्तर्ये असें येथें म्हणावयासच नको.

काय कारण ?

कारण असें कीं गोत्र अशी जी संज्ञा (४।१।१६२) केली आहे त्या अर्थाचा गोत्र शब्द मागून अनुवृत्तीनें येत आहे. तेव्हां येथें साक्षात् अपत्य या अर्थी अञ् प्रत्यय होणार तरी कसा ? तेव्हां साक्षात् अपत्य या अर्थी प्राप्तीच जर येत नाहीं तर ऋषीविषयीं त्याचा निषेध करण्यांत कांहींच अर्थ नाहीं.

तर मग आतां अशा रीतीनें सिद्ध होत असतांनाही आचार्यांनीं जो येथें अनृष्यानन्तर्ये असा निषेध केला आहे त्यावरून ते असें सुचवितात कीं या विदादि गणामध्यें जे शब्द ऋषिभिन्नवाचक आहेत त्यांहून साक्षात् अपत्य या अर्थींही अञ् प्रत्यय होतो.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं नानान्द्रः, पौत्रः, दौहित्रः येथें ननान्दृ पुत्र व दुहितृ या शब्दांहून साक्षात् अपत्य या अर्थी अञ् प्रत्यय सिद्ध होतो.

( सू. १०८ ) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? तें करावयास नको. कारण गर्गादि गणामध्यें वतण्ड शब्दाचा पाठ आहेच. तेव्हां त्यानेंच ( ४।१।१०५ ) यञ् प्रत्यय सिद्ध होत आहे.

या सूत्राच्या पुढें लुक् स्त्रियाम् असें सूत्र आहे. तेथें वतण्ड शब्दाचा संबंध होण्याकरितां येथें हें सूत्र केलें आहे. आतां त्या गणामध्येंच जर वतण्ड शब्दाच्या पुढें लुक् स्त्रियाम् असें म्हणावें तर तसें करणें शक्य नाहीं. कारण तसें केलें तर आङ्गिरसे याचा संबंध सुटेल.

---

१ (सू.१०५)—गर्ग वगैरे गर्गादि गणांतील शब्दांहून गोत्रापत्य अर्थी यञ् प्रत्यय होतो. उदा०—गर्गस्य गोत्रापत्यं गार्ग्यः.

१ (सू. १०६)—मधु व बभ्रु या शब्दांहून गोत्रापत्य अर्थी यञ् प्रत्यय होतो. परंतु त्या प्रत्ययान्त शब्दांपासून क्रमानें ब्राह्मण व कौशिक या अर्थांचा बोध झाला पाहिजे. उदा०—मधोः गोत्रापत्यं माधव्यः ब्राह्मणः; बभ्रोः गोत्रापत्यं बाभ्रव्यः कौशिकः.

१ (सू. १०७)—कपि व बोध या शब्दांहून गोत्रापत्य अर्थी यञ् प्रत्यय होतो. त्या प्रत्ययान्त शब्दापासून आङ्गिरस या अर्थाचा बोध होत असला पाहिजे. उदा० कपेः गोत्रापत्यं काप्यः आङ्गिरसः.

१ (सू. १०८)—वतण्ड शब्दाहून गोत्रापत्य अर्थी यञ् प्रत्यय होतो. त्या प्रत्ययान्त शब्दापासून आङ्गिरस या अर्थाचा बोध होत असला पाहिजे. उदा०—वतण्डस्य गोत्रापत्यं वातण्ड्यः आङ्गिरसः.

[ लुक् स्त्रियाम् ॥ ४।१।१०९ ॥
अश्वादिभ्यः फञ् ॥ ४।१।११० ॥
भर्गात्त्रैगर्ते ॥ ४।१।१११ ॥ ]
शिवादिभ्योऽण् ॥ ४।१।११२ ॥

किमर्थं शिवादिभ्यो ऽण्विधीयते न यथाविहितमित्येवोच्येत । शिवादिभ्यो यथाविहितमितीयत्युच्यमान इञ्प्रसज्येत इञतो यथाविहितः । पुनर्वचनमिदानीं किमथ स्यात् । ये तस्य बाधकास्तद्बाधनार्थम् । स वै नास्ति यस्तं बाधेत तत्रारम्भसामर्थ्याद्यो विहितो न च प्राप्नोति स भविष्यति । कश्चासौ । अणेव ॥ उत्तरार्थं तर्हि । अवृद्धाभ्यो नदीमानुषीभ्यस्तन्नामिकाभ्यः [ ४.१.११३ ] इति । अत्र यथाविहितमितीयत्युच्यमाने ढक्प्रसज्येत । ढगतो यथाविहितः । पुनर्वचनमिदानीं

(सू. ११२) 'येथें शिवादि गणांतील शब्दांहून अण् प्रत्यय होतो' अशा रीतीनें पुन्हां अण् प्रत्यय कां सांगितला आहे ? तो सांगू नये. तर 'ज्याप्रमाणें सांगितलें आहे त्याप्रमाणें' एवढेंच म्हणावें.

पण असें म्हटलें तर इञ् प्रत्यय होऊं लागेल. कारण अकारान्ताहून इञ् प्रत्यय सांगितला आहे.

इञ् प्रत्ययच जर होईल तर पूर्वीं ज्या सूत्रानें सांगितला आहे त्यानेंच होईल, तो येथें पुनः सांगावयाचें कारण कांहींच दिसत नाहीं; तेव्हां त्याचें विधान येथें व्यर्थच होईल. त्या इञ् प्रत्ययाचे जे बाधक प्रत्यय असतील त्यांचा बाध करण्याकरितां येथें पुन्हां त्याचें विधान केलें असें म्हणावें तर तसें म्हणतां येत नाहीं. कारण असा प्रत्ययच कोणता नाहीं कीं जो इञ् प्रत्ययाचा बाध करील. तेव्हां पूर्वीं सांगितलेल्या प्रत्ययाचें जें येथें पुन्हां विधान केलें आहे त्याच्या सामर्थ्यास्तव पूर्वीं सांगितलेल्या प्रत्ययांपैकीं अशा प्रत्ययाचें येथें विधान समजावें कीं जो प्रत्यय पूर्वीं सांगितला आहे खरा, पण त्याचा बाधक प्रत्यय असल्यामुळें येथें त्याची प्राप्ति मात्र येत नाहीं. तेव्हां असा प्रत्यय जो असेल तोच येथें पुनः विधान केल्यामुळें होईल.

असा प्रत्यय शैवः येथें कोणता बरें आहे ?
असा प्रत्यय तेथें अण् हाच आहे.

तर मग ' अवृद्धाभ्यो नदीमानुषीभ्यस्तन्नामिकाभ्यः ' या पुढील सूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरितां येथें अण्-ग्रहण केलें पाहिजे. नाहीं तर सांगितलेला प्रत्यय होतो इतकाच त्या सूत्राचा अर्थ होईल आणि ढक् प्रत्यय होऊं लागेल. कारण, नदी व मानुषी यांहून ढक् प्रत्यय ( ४।१।१२० ) सांगितला आहे.

ढक् प्रत्ययच जर होईल तर ज्या सूत्रानें तो सांगितला आहे त्यानेंच होईल. त्याचें येथें पुन्हां विधान कशाकरितां ?

---

१ (सू.१०९)—पूर्वसूत्रानें केलेल्या यञ् प्रत्ययाचा स्त्रीत्वविवक्षा असतांना लुक् होतो. उदा० वतण्डस्य गोत्रापत्यं स्त्री वतण्डी. येथें ङीन् ( ४।१।७३ ) प्रत्यय झाला आहे.

१ (सू.११०)—अश्व वगैरे अश्वादि गणांतील शब्दांहून गोत्रापत्य अर्थी फञ् प्रत्यय होतो. उदा० अश्वस्य गोत्रापत्यम् आश्वायनः

१ (सू. १११)—भर्ग शब्दाहून गोत्रापत्य अर्थी फञ् प्रत्यय होतो. पण त्या प्रत्ययान्त शब्दापासून त्रैगर्त पुरुषाचा बोध होत असला पाहिजे. उदा०:-भार्गायणः त्रैगर्तः.

१ ( सू. ११२ )—शिव वगैरे शिवादिगणांतील शब्दांहून अपत्य अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—शिवस्य अपत्यम् शैवः.

२--सर्वच शब्दांहून तस्यापत्यम् यानें अण् प्रत्यय सांगितला आहे तोच होईल.

३--शिव वगैरे शब्दांहून तस्यापत्यम् यानें अण् सांगितला आहे खरा पण ' अत इञ् ' यानें त्याचा बाध होत असल्यामुळें येथें तो अण् होणार नाहीं; तो येथें पुनः विधानाच्या जोरावर होईल.

किमर्थं स्यात् । ये तस्य बाधकास्तद्बाधनार्थम् । स वै नास्ति यस्तं बाधेत तत्रारम्भसामर्थ्याद्यो विहितो न च प्राप्नोति स भविष्यति । कश्चासौ । अणेव । उत्तरार्थमेव तर्हि । ऋष्यन्धकवृष्णिकुरुभ्यश्च [ ११४ ] इति । अत्र यथाविहितमितीयत्युच्यमान इञ्प्रसज्येत । इञतो यथाविहितः । पुनर्वचनमिदानीं किमर्थं स्यात् । ये तस्य बाधकास्तद्बाधनार्थम् । स वै नास्ति यस्तं बाधेत तत्रारम्भसामर्थ्याद्यो विहितो न च प्राप्नोति स भविष्यति । कश्चासौ । अणेव ॥ उत्तरार्थमेव तर्हि । मातुरुत्संख्यासंभद्रपूर्वायाः कन्यायाः कनीन च [ ११५; ११६ ] इति । अत्र यथाविहितमितीयत्युच्यमाने ढक्प्रसज्येत ढगतो यथाविहितः । पुनर्वचनमिदानीं किमर्थं स्यात् । मातुरुकारं वक्ष्यामि कन्यायाः कनीनभावमिति । यद्येतावत्प्रयोजनं स्यात्तत्रैवायं ब्रूयात्स्त्रीभ्यो ढक् [ १२० ] मातुरुकारः कन्यायाश्च कनीन इति ॥

त्या ढक् प्रत्ययाचे जे बाधक प्रत्यय असतील त्यांचा बाध करण्याकरितां असें म्हणावें तर तसा प्रत्यय कोणीच नाहीं कीं जो ढक् प्रत्ययाचा बाध करील. तेव्हां येथें पुन्हां जें विधान केलें आहे त्याच्या सामर्थ्यास्तव जो प्रत्यय सांगितला खरा, पण त्याचा बाधक प्रत्यय असल्यामुळें येथें त्याची प्राप्ति मात्र येत नाहीं असा प्रत्यय जो असेल तोच येथें पुन्हां विधान केल्यामुळें होईल.

असा प्रत्यय तेथें कोणता आहे ?

असा प्रत्यय तेथें अण् हाच आहे.

तर मग ऋष्यन्धकवृष्णिकुरुभ्यश्च ( ४।१।११४ ) या सूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरितां येथें अण् ग्रहण केलें पाहिजे. नाहीं तर सांगितलेला प्रत्यय होतो इतकाच त्या सूत्राचा अर्थ होईल आणि इञ् प्रत्यय होऊं लागेल. कारण अकारान्त शब्दाहून इञ् प्रत्यय सांगितला आहे.

इञ् प्रत्ययच जर होईल तर ज्यानें तो सांगितला आहे त्यानेंच होईल मग त्याचें येथें पुनः विधान कशाकरितां ?

त्या इञ् प्रत्ययाचें जे बाधक प्रत्यय असतील त्यांचा बाध करण्याकरितां असें म्हणावें तर तसा प्रत्यय कोणीच नाहीं कीं जो इञ् प्रत्ययाचा त्या ठिकाणीं बाध करील. तेव्हां येथें जें पुन्हां विधान केलें आहे त्याच्या सामर्थ्यास्तव जो प्रत्यय सांगितला आहे खरा, पण त्याचा बाधक प्रत्यय असल्यामुळें येथें त्याची प्राप्ति मात्र येत नाही असा जो प्रत्यय असेल तोच येथें पुन्हां विधान केल्यामुळें होईल.

असा प्रत्यय तेथें कोणता आहे ?

असा प्रत्यय तेथें अण् हाच आहे.

तर मग 'मातुरुत्संख्यासंभद्रपूर्वायाः' (४।१।११५) 'कन्यायाः कनीन च' ( ४।१।११६ ) येथें अनुवृत्ति होण्याकरितां येथें अण्ग्रहण केलें पाहिजे. नाहीं तर सांगितलेला प्रत्यय होतो इतकाच त्या सूत्राचा अर्थ होईल आणि ढक् होऊं लागेल. कारण, त्याहून ढक् प्रत्यय सांगितला आहे.

ढक् प्रत्ययच जर होईल तर तो ज्यानें सांगितला आहे त्यानेंच होईल. मग त्याचें येथें पुन्हां विधान कशाकरितां ?

पुनः येथें विधान अशाकरितां होईल कीं त्या प्रत्ययाच्या बरोबर येथें मातृ शब्दांतील ऋकाराला उकार सांगावयाचा आहे; तसाच कन्या शब्दाला कनीन आदेश सांगावयाचा आहे.

४—अण् प्रत्ययाचा ढक् प्रत्ययानें बाध होतो तेव्हां पुनः विधान केल्यामुळें अणच होईल.

५—तेव्हां ते आदेश ढक् प्रत्ययाशिवाय इतर ठिकाणीं होऊं नयेत याकरितां तेथें पुनः ढक् प्रत्ययाचें विधान केलें असें होईल.

इदं तर्हि प्रयोजनम्। अयमृष्टिषेणशब्दः शिवादिषु पठ्यते। तत्र यथाविहितमितीयत्युच्यमान इञ्प्रसज्येत। तं परत्वात्सेनान्ताण्ण्यो बाधेत। तत्रारम्भसामर्थ्यादिञ्प्रसज्येत। पुनरण्ग्रहणादणेव भवति ॥

[ अवृद्धाभ्यो नदीमानुषीभ्यस्तन्नामिकाभ्यः ॥ ४।१।११३ ॥ ]

ऋष्यन्धकवृष्णिकुरुभ्यश्च ॥ ४।१।११४ ॥

ऋषिस्त्र्यणो ढग्ढ्रकौ विप्रतिषेधेन ॥१॥

ऋष्यणः स्त्र्यणश्च ढग्ढ्रकौ भवतो विप्रतिषेधेन। ऋष्यणोऽवकाशः। वासिष्ठः वैश्वामित्रः। ढकोऽवकाशः। दुलि दौलेयः। बलि बालेयः। इहोभयं प्राप्नोति। अत्रि आत्रेयः॥ स्त्र्यणोऽवकाशः। मकन्दिका माकन्दिकः। ढ्रकोऽवकाशः। काणिकेरः। इहोभयं प्राप्नोति। पौणिकेरः मौद्गलिकेरः॥ ढग्ढ्रकौ भवतो विप्रतिषेधेन॥

द्व्यचो ढको ढ्रग्ढञौ ॥ २ ॥

द्व्यचो ढग्भवतीत्येतस्माड्ढ्रग्ढञौ भवतो

---

जर तेवढाच उपयोग असता तर स्त्रीभ्यो ढक् या सूत्राच्या पुढेंच मातृ शब्दाला उकार व कन्या शब्दाला कनीन आदेश सांगितला असता.

तर मग आतां येथें अण् ग्रहण करण्याचा उपयोग असा समजावा कीं या शिवादि गणामध्यें ऋष्टिषेण असा शब्द आहे. ' सांगितलेला प्रत्यय होतो ' एवढेंच येथें म्हटलें तर त्याहून इञ् प्रत्यय होऊं लागेल; कारण तो सांगितलेला आहे. आणि सेन–शब्दान्ताहून सांगितलेल्या ण्य प्रत्ययानें ( ४।१।१५२ ) त्याचा परत्वास्तव बाध होत असल्यामुळें तो येथें प्राप्त होत नाहीं. तेव्हां येथें पुन्हां विधान केल्यामुळें ण्य प्रत्ययाला मार्गे सारून इञ् होईल. तो न होतां अण् प्रत्ययच झाला पाहिजे म्हणून येथें अण्–ग्रहण केलें पाहिजे.

( सू. ११४ वा. १ ) ऋषिवाचक शब्दाहून प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या अण् प्रत्ययापेक्षां ढक् प्रत्यय आणि मनुष्य स्त्रीवाचक शब्दाहून पूर्वसूत्रानें सांगितलेल्या अण् प्रत्ययापेक्षां ढ्रक् प्रत्यय विप्रतिषेधानें परत्वास्तव होतात. वासिष्ठः वैश्वामित्रः येथें ऋषिवाचक शब्दाहून सांगितलेल्या अण् प्रत्ययाला अवकाश आहे. आणि दुलेरपत्यं दौलेयः, बलेरपत्यं बालेयः, येथें ढक् प्रत्ययाला ( ४।१।१२२ ) अवकाश आहे. आणि अत्रेः अपत्यम् आत्रेयः येथें दोघांची प्राप्ति येते. तसेंच मकन्दिकाया अपत्यं माकन्दिकः येथें पूर्वसूत्रानें मनुष्य स्त्रीवाचक शब्दाहून सांगितलेल्या अण् प्रत्ययाला अवकाश आहे. आणि ढ्रक् प्रत्ययाला (४।१।१३१) काणिकेरः येथें अवकाश आहे. आणि पौणिकेरः व मौद्गलिकेरः येथें दोघांची प्राप्ति येते. तेव्हां या दोन्ही ठिकाणीं विप्रतिषेधानें अण् प्रत्ययाचा परत्वास्तव बाध करून ढक् व ढ्रक् हे प्रत्यय होतात.

(वा. २) द्व्यच्-प्रातिपदिकाहून सांगितलेल्या ढक् प्रत्यया-( ४।१।१२१ ) पेक्षां ढ्रक् (४।१।१३१ ) आणि ढञ् ( ४।१।१३५ ) हे प्रत्यय विप्रतिषेधानें होतात. द्व्यच्–प्रातिपदिकाहून

---

१—तेव्हां ढक् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें न सांगतां ज्या अर्थी हे आदेश येथें निराळ्या ठिकाणीं सांगितले आहेत त्या अर्थी येथें सांगितलेला प्रत्यय म्हणजे अण् हाच घेतां येईल.

१—( सू. ११३ ) वृद्ध संज्ञक ( १।१।७३ ) नव्हेत अशीं जीं नदीचीं किंवा मनुष्यस्त्रीचीं नांवें त्यांहून अपत्य या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—यमुनाया अपत्यं यामुनः; चिन्तितायाः अपत्यं चैन्तितः.

१–( सू. ११४ ) ऋषिविशेषवाचक शब्द आणि अन्धक, वृष्णि व कुरु या वंशांतील पुरुषांचे वाचक शब्द यांहून अपत्य अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा० वासिष्ठः श्वाफल्कः वासुदेवः नाकुलः.

विप्रतिषेधेन। ञ्यचो ढग्भवतीत्यस्यावकाशः। दात्तेयः गौप्तेयः। ढ्रकः स एव। इहोभयं प्राप्नोति। नटी नाटेरः। दासी दासेरः॥ ढञोऽवकाशः। कामण्डलेयः माद्रबाहेयः। ढकः स एव। इहोभयं प्राप्नोति। जम्बू जाम्बेयः। ढ्रग्ढञौ भवतो विप्रतिषेधेन॥

**न वृष्यणः पुनर्वचनमन्यनिवृत्त्यर्थम् ॥ ३ ॥**

न वैष युक्तो विप्रतिषेधो योऽयमृष्यणो ढकश्च। किं कारणम्। ऋष्यणः पुनर्वचनमन्यनिवृत्यर्थम्। सिद्धो ऽत्राणुत्सर्गेणैव तस्य पुनर्वचन एतत्प्रयोजनं येऽन्ये तदपवादाः प्राप्नुवन्ति तद्बाधनार्थम्। स यथैव तदपवादमिञं बाधत एवं ढकमपि बाधेत।

**तस्मादृषिभ्यो ऽण्विधाने ऽत्र्यादिप्रतिषेधः ॥ ४ ॥**

तस्मादृषिभ्यो ऽण्विधाने ऽत्र्यादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः॥ न वक्तव्यः। मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन्बाधन्त इत्येवमयमृष्यणिञं तदपवादं बाधिष्यते ढकं न बाधिष्यते॥

अयं चाप्ययुक्तो विप्रतिषेधो योऽयं ढको ढ्रग्ढञोश्च। किं कारणम्।

---

सांगितलेल्या ढक् प्रत्ययाला दात्तेयः व गौप्तेयः येथें अवकाश आहे. आणि ढ्रक् प्रत्ययाला काणिकेरः येथें अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. पण नट्याः अपत्यं नाटेरः तसेंच दास्याः अपत्यं दासेरः येथें दोघांची प्राप्ति येते. त्याप्रमाणें कामण्डलेयः व माद्रबाहेयः येथें ढञ् प्रत्ययाला अवकाश आहे, ढक् प्रत्ययाला दात्तेयः येथें अवकाश दाखविलाच आहे; पण जाम्बेयः येथें जम्बू शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेव्हां ढक् प्रत्ययाचा बाध करून ढ्रक् व ढञ् हे विप्रतिषेधानें परत्वास्तव होतात.

(वा.३) ऋषिवाचक शब्दाहून सांगितलेल्या अण् प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें ढक् प्रत्यय होतो असा विप्रतिषेध पूर्ववार्तिकानें सांगितला आहे तो बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं, ऋषिवाचक शब्दाहून अण् प्रत्यय 'तस्यापत्यम्' (४।१।९२) या सामान्य सूत्रानेंच सिद्ध होत आहे. तेव्हां त्याचें जें प्रकृत सूत्रानें पुन्हां विधान केलें आहे त्याचा उपयोग असा कीं– त्या अण् प्रत्ययाचे अपवाद असे जे प्रत्यय प्राप्त होतात त्यांचा बाध होऊन पुन्हां अण् प्रत्ययच झाला पाहिजे. तेव्हां ऋषिवाचक शब्दाहून सांगितलेला अण् प्रत्यय हा सामान्य अण् प्रत्ययाचा अपवाद असा इञ् प्रत्ययाचा जसा बाध करतो तसा आत्रेयः येथें ढक् प्रत्ययाचाही बाध करील.

(वा. ४) तेव्हां ऋषिवाचक शब्दाहून जो हा अण् प्रत्यय सांगितला आहे तो आत्रि वगैरे शब्दांहून होत नाहीं असा प्रतिषेध सांगितला पाहिजे.

तसा प्रतिषेध सांगावयास नको. कारण 'मध्येंपठित अपवाद हा पूर्वविधीचाच बाध करतो, पुढील विधीचा करीत नाहीं' या न्यायानें ऋषिवाचक शब्दाहून सांगितलेला हा अण् प्रत्यय सामान्यतः सांगितलेल्या अण् प्रत्ययाचा अपवाद जो पूर्वपठित (४।१।९५) इञ् प्रत्यय त्याचाच बाध करील. पुढें (४।१।१२२) सांगितलेल्या ढक् प्रत्ययाचा बाध करणार नाहीं.

तसेंच ढक् प्रत्ययापेक्षां ढ्रक् आणि ढञ् हे विप्रतिषेधानें होतात असा प्रतिषेध (वा. २) सांगितलेला आहे, तोही बरोबर नाहीं.

काय कारण ?

---

२–तेव्हां दात्तेयः व गौप्तेयः येथें दत्ता व गुप्ता हीं प्रातिपदिकें ञ्यच्क असल्यामुळें अण् प्रत्ययाची प्राप्तिच येणार नाहीं आणि 'स्त्रीभ्यो ढक्' या सामान्य सूत्रानेंच ढक् प्रत्यय होईल, आणि 'ञ्यचः' हें सूत्र मुळींच करूं नये. त्यामुळें नाटेरः व जाम्बेयः येथें ढ्रक् आणि ढञ् प्रत्ययांचा ञ्यचः यानें बाध होईल ही शंकाच उरत नाहीं.

**ढकः पुनर्वचनमन्यानिवृत्त्यर्थम् ॥५॥**

सिद्धोऽत्र ढक् स्त्रीभ्यो ढक् [ ४.१.१२०] इत्येव । तस्य पुनर्वचन एतत्प्रयोजनं येऽन्ये तदपवादाः प्राप्नुवन्ति तद्बाधनार्थम् । स यथैव तदपवादं तन्नामिकाणं बाधत एवं द्रुग्ढञावपि बाधेत ।

**तस्मात्तन्नामिकाण्यद्व्यचः ॥ ६ ॥**

तस्मात्तन्नामिकाण्यद्व्यच इति वक्तव्यम् ॥ न वक्तव्यम् । मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन् बाधन्त इत्येवमयं ढक् तन्नामिकाणं तदपवादं बाधिष्यते द्रुग्ढञौ न बाधिष्यते ॥

**ऋष्यन्धकवृष्णिकुरुभ्यश्च**

(वा. ५) कारण असें कीं ' स्त्रीभ्यो ढक्' (४।१।१२०) यानेंच ढक् प्रत्यय सिद्ध होत आहे. तेव्हां द्व्यचः (४।१।१२१) यानें जे पुन: ढक् प्रत्ययाचें विधान केलें आहे त्याचा उपयोग असा कीं त्या ढक् प्रत्ययाचे अपवाद असे जे प्रत्यय प्राप्त होतात त्यांचा बाध होऊन ढक् प्रत्ययच झाला पाहिजे. तेव्हां दात्तेयः व गौतेयः येथें तो ढक् प्रत्यय स्त्रीभ्यो ढक् याचा जो अपवाद ' अवृद्धाभ्यो० ' यानें सांगितलेला अण् प्रत्यय (४।१।११३) त्याचा जसा बाध करतो तसा नाटेरः व जाम्बेयः येथें द्रक् (४।१।१३१) व ढञ् (४।१।१३५) या प्रत्ययांचाही बाध करील.

(वा. ६) तेव्हां मनुष्य स्त्रीवाचक शब्दाहून जो पूर्वसूत्रानें अण् प्रत्यय सांगितला आहे तेथें अद्व्यचः असें म्हणावें.

तसें म्हणावयास नको. कारण, ' मध्यें पठित अपवाद हा पूर्वीच्या विधीचाच बाध करतो, पुढील विधीचा बाध करीत नाहीं' या न्यायानें द्व्यच् शब्दाहून सांगितलेला हा ढक् प्रत्यय (४।१।१२१) स्त्रीभ्यो ढक् (४।१।१२०) याचा अपवाद जो मनुष्यस्त्रीवाचक शब्दाहून सांगितलेला अण् प्रत्यय (४।१।११३) त्याचाच बाध करील; पुढें सांगितलेल्या द्रक् (४।१।

**सेनान्ताण्ण्यः ॥ ७ ॥**

ऋष्यन्धकवृष्णिकुरुभ्यः सेनान्ताण्ण्यो भवति विप्रतिषेधेन । ऋष्यणोऽवकाशः । वासिष्ठः वैश्वामित्रः । ण्यस्यावकाशः । पारिषेण्यः वारिषेण्यः । जातसेनो नामर्षिस्तस्मादुभयं प्राप्नोति । ण्यो भवति विप्रतिषेधेन । जातसेन्यः ॥ अन्धकाणोऽवकाशः । श्वाफल्कः श्वैत्रकः । ण्यस्य स एव । उग्रसेनो नामान्धकस्तस्मादुभयं प्राप्नोति । ण्यो भवति विप्रतिषेधेन । औग्रसेन्यः ॥ वृष्ण्यणोऽवकाशः । वासुदेवः बालदेवः । ण्यस्य स एव । विष्वक्सेनो नाम वृष्णि-

१३१) व ढञ् (४।१।१३५) यांचा बाध करणार नाहीं.

(वा. ७) ऋषिवाचक शब्द आणि अन्धक, वृष्णि व कुरु या वंशांतील पुरुषांचे वाचक शब्द यांहून प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या अण् प्रत्ययापेक्षां सेनान्त शब्दाहून सांगितलेला ण्य प्रत्यय (४।१।१५२) विप्रतिषेधानें परत्वास्तव होतो. ऋषिवाचक शब्दांहून सांगितलेल्या अण् प्रत्ययाला वासिष्ठः व वैश्वामित्रः येथें अवकाश आहे. सेनान्त शब्दाहून सांगितलेल्या ण्य प्रत्ययाला पारिषेण्यः व वारिषेण्यः येथें अवकाश आहे. आणि जातसेन हें एका ऋषीचें नांव आहे त्याहून दोन्ही प्रत्ययांची प्राप्ति येते. तेथें विप्रतिषेधानें ण्य प्रत्यय होऊन जातसेन्यः असें होतें. अन्धक कुलांतील पुरुषवाचक शब्दाहून सांगितलेल्या अण् प्रत्ययाला श्वाफल्कः, श्वैत्रकः, रान्धसः येथें अवकाश आहे. ण्य प्रत्ययाला पारिषेण्यः येथें अवकाश दाखविलाच आहे. आणि उग्रसेन हा अन्धक कुलांतील पुरुष आहे. त्याहून दोन्ही प्रत्ययांची प्राप्ति येते. तेथें विप्रतिषेधानें ण्य प्रत्यय होऊन औग्रसैन्यः असें रूप होतें. तसेंच वृष्णिकुलांतील पुरुषवाचक शब्दाहून सांगितलेल्या अण् प्रत्ययाला वासुदेवः व बालदेवः येथें अवकाश आहे ण्य प्रत्ययाला पारिषेण्यः येथें अवकाश दाखविलाच आहे. आणि विष्वक्सेन हा वृष्णिकुलांतील पुरुष

स्तस्मादुभयं प्राप्नोति । ण्यो भवति विप्रतिषेधेन । वैष्वक्सेन्यः ॥ कुर्वणोऽवकाशः । नाकुलः साहदेवः । ण्यस्य स एव । भीमसेनो नाम कुरुस्तस्मादुभयं प्राप्नोति । ण्यो भवति विप्रतिषेधेन । भैमसेन्यः ॥ सेनान्ताण्ण्यो भवति विप्रतिषेधेन जातोग्रविष्वग्भीमेभ्य इति वक्तव्यम् ॥

## मातुरुत्संख्यासंभद्रपूर्वायाः ॥ ४।१।११५ ॥

किमर्थं स्त्रीलिङ्गेन निर्देशः क्रियते न संख्यासंभद्रपूर्वस्येत्येवोच्येत । स्त्रीलिङ्गो यो मातृशब्दस्तस्माद्यथा स्यात् । इह मा भूत् । संमिमीते संमाता संमातुरपत्यं सांमात्र इति ।

## कन्यायाः कनीनच ॥ ४।१।११६ ॥

इदं विप्रतिषिद्धम् । को विप्रतिषेधः । अपत्यमिति वर्तते । यदि च कन्या नापत्यमथापत्यं न कन्या । कन्या चापत्यं चेति विप्रतिषिद्धम् ॥ नैतद्विप्रतिषिद्धम् । कथम् । कन्याशब्दोऽयं पुंसाभिसंबन्धपूर्वके संप्रयोगे निवर्तते॥ या चेदानीं प्रागभिसंबन्धात्पुंसा-

---

आहे त्याहून दोन्ही प्रत्ययांची प्राप्ति येते. तेथें विप्रतिषेधानें ण्य प्रत्यय होऊन वैष्वक्सेन्यः असें होतें. तसेंच कुरु कुलांतील पुरुषवाचक शब्दाहून सांगितलेल्या अण् प्रत्ययाला नाकुलः व साहदेवः येथें अवकाश आहे. ण्य प्रत्ययाला पारिषेण्यः येथें अवकाश दाखविलाच आहे. आणि भीमसेन हा कुरु कुलांतील पुरुष आहे. त्याहून दोन्ही प्रत्ययांची प्राप्ति येते. तेथें विप्रतिषेधानें ण्य प्रत्यय होऊन भैमसेन्यः असें रूप होतें. हा जो सेनान्त शब्दाहून अण् प्रत्ययाचा बाध करून विप्रतिषेधानें ण्य प्रत्यय होतो तो जातसेन, उग्रसेन, विष्वक्सेन, आणि भीमसेन या चार शब्दांहूनच होतो असें म्हणावें.

( सू. ११५ ) येथें संख्यासंभद्रपूर्वायाः असा स्त्रीलिंगी निर्देश कशाकरितां केला आहे? तसा करावयास नको. तर 'संख्यासंभद्रपूर्वस्य' असें म्हणावें.

स्त्रीलिंगी जो मातृशब्द म्ह. आई या अर्थाचा, त्याहूनच हा अण् प्रत्यय आणि उकार आदेश झाला पाहिजे संमिमीते इति संमाता म्ह. चांगलें मोजणारा असा जो इसम त्याचें अपत्य या अर्थी सांमात्रः असेंच रूप होतें.

( सू. ११६ ) येथें हें अगदींच विरुद्ध दिसतें.

तें काय बरें विरुद्ध दिसतें ?

येथें अपत्यम् अशी अनुवृत्ति आहे ना ? कन्याच जर असल तर अपत्य नाहीं; आणि जर अपत्य असेल तर ती कन्याच नव्हे. कन्याही आहे आणि तिला अपत्यही आहे हें अगदीं विरुद्ध दिसतें

हें कांहीं विरुद्ध नव्हे.

तें कसें ?

तें असें कीं मुलीचें कन्यात्व हें तिचा पुरुषाशीं विवाह संबंध होऊन त्याच्याशीं संयोग झाल्यानंतर निवृत्त होतें. आणि जिचा विवाह

---

१-( सू. ११५ ) संख्या शब्द, सन् शब्द आणि भद्र शब्द हे ज्याच्या पूर्वी आहेत असा जो स्त्रीलिंगी मातृ शब्द त्याहून अपत्य अर्थी अण् प्रत्यय होतो, आणि त्याच्या बरोबर मातृ शब्दांतील ऋकाराला उकार आदेश होतो. उदा०-षण्णां मातॄणामपत्यं षाण्मातुरः, द्वैमातुरः. येथें उकार आदेश हा रपर (१।१।५१) झाला आहे.

२-येथें सामान्य सूत्रानें (४।१।९२) अण् प्रत्यय झाला आहे. प्रकृत सूत्रानें झाला नाहीं, म्हणून उकार आदेश झाला नाहीं.

१-( सू. ११६ ) कन्या शब्दाहून अपत्य अर्थी अण् प्रत्यय होतो. आणि त्याच्या बरोबर कन्या शब्दाला कनीन असा आदेश होतो. कन्यायाः अपत्यं कानीनः. व्यास व कर्ण हे कानीन होत.

सह संप्रयोगं गच्छति तस्यां कन्याशब्दो वर्तत एव । कन्यायाः कन्योक्तायाः कन्याभिमतायाः सुदर्शनाया यदपत्यं स कानीन इति ॥

[विकर्णशुङ्गच्छगलाद्वत्सभरद्वाजात्रिषु ॥ ४।१।११७ ॥

पीलाया वा ॥ ४।१।११८ ॥

ढक् च मण्डूकात् ॥ ४।१।११९ ॥]

स्त्रीभ्यो ढक् ॥ ४।१।१२० ॥

इदं सर्वेष्वेव स्त्रीग्रहणेषु विचार्यते स्त्रीग्रहणे स्त्रीप्रत्ययग्रहणं वा स्यात्स्त्रीशब्दग्रहणं वा स्त्र्यर्थग्रहणं वा । किं चातः । यदि शब्दग्रहणमर्थग्रहणं वा इडविड् ऐडविडः पृथ् पार्थः उशिज् औशिजः दरद् दारदः अत्रापि प्राप्नोति । अथ प्रत्ययग्रहणं लैखाभ्रेयः वैमात्रेय इति न सिध्यति ॥ अस्तु प्रत्ययग्रहणम् । कथं लैखाभ्रेयः वैमात्रेय इति । शुभ्रादिषु पाठः करिष्यते ॥

वडवाया वृषे वाच्ये

वडवाया वृषे वाच्ये ढग्वक्तव्यः । वड

---

संबंधापूर्वीच पुरुषाशीं संयोग होतो तिचें कन्यात्व कायमच असतें. तेव्हां अशी जी कन्या म्हणून मानली गेलेली व लोकामध्यें कन्या अशी स्पष्ट मिरवणारी तिचें येथें ग्रहण केलें आहे. तिचें जें अपत्य तें कानीन होय.

( सू. १२० ) स्त्री शब्दाचें ग्रहण ज्या ठिकाणीं केलें आहे अशा सर्वच ठिकाणीं असा प्रश्न उत्पन्न होतो कीं तेथें त्या स्त्री–ग्रहणानें फक्त स्त्रीलिंगी शब्दाचे ग्रहण करावयाचें किंवा स्त्री–प्रत्ययाचें ग्रहण करावयाचें अथवा स्त्री या अर्थाचें ग्रहण करावयाचें ?

यात फरक काय ?

फरक असा आहे कीं जर स्त्रीलिंगी शब्दाचें किंवा स्त्री या अर्थाचें ग्रहण येथें होत असेल तर इडविडः अपत्यम् ऐडविडः, पृथः अपत्यम् पार्थः, उशिजः अपत्यम् औशिजः, शरदः अपत्यं शारदः, येथेंही ढक् प्रत्यय होऊं लागेल. आतां स्त्री-प्रत्ययाचें ग्रहण केलें तर लैखाभ्रेयः वैमात्रेयः येथें ढक् प्रत्यय होणार नाहीं.

तर मग आतां येथें स्त्री–प्रत्ययाचेंच ग्रहण असू दे.

पण जर स्त्री–प्रत्ययाचें ग्रहण केलें तर लैखाभ्रेयः व वैमात्रेयः येथें ढक् प्रत्यय कशानें करावा ?

लेखाभ्रू आणि विमातृ या शब्दांचा शुभ्रादि ( ४।१।१२३ ) गणामध्यें पाठ केला म्हणजे त्यांहून ढक् प्रत्यय होईल.

( श्लो. १ ) वडवा शब्दाहून तिचा वृष या अर्थीं ढक् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०

---

१ ( सू. ११७ )–विकर्ण, शुङ्ग आणि छगल या तीन शब्दाहून अपत्य अर्थीं अण् प्रत्यय होतो. परंतु ते तीन क्रमानें वत्स भरद्वाज आणि अत्रि यांच्या कुलातील असले पाहिजेत. उदा०--विकर्णस्य अपत्यम् वैकर्णः वात्स्यः; शुङ्गस्यापत्य शौङ्गः भारद्वाजः, छागलस्य अपत्यम् छागल आत्रेयः

१ ( सू. ११८ )--पीला शब्दाहून अपत्य या अर्थी अण् प्रत्यय विकल्पाने होतो. पीलाया अपत्य पैल पैलेयः. हा अण् प्रत्यय होत नाहीं त्यावेळीं ढक् प्रत्यय ( ४।१।१२१ ) होतो.

१ ( सू. ११९ )–मण्डूक शब्दाहून अपत्य अर्थी ढक् आणि अण् हे प्रत्यय विकल्पानें होतात. मण्डूकस्य अपत्यं माण्डूकेयः, माण्डूकः. हे प्रत्यय होत नाहींत त्या वेळीं इञ् प्रत्यय ( ४।१।९५ ) होतो. माण्डूकिः.

१ ( सू. १२० )–स्त्री-प्रत्ययान्त शब्दाहून अपत्य या अर्थीं ढक् प्रत्यय होतो. उदा०—गङ्गाया अपत्यं गाङ्गेयः.

२—इडविड, पृथ्, उशिज् आणि दरद् हे चारी शब्द स्त्रीलिंगी आहेत आणि त्यांचा अर्थही स्त्रीवाच आहेत.

३—वडवा शब्दाहून अपत्य अर्थीं अण् प्रत्ययच होतो. वडवाया अपत्यं वाडवः.

वाडवा वृषे वाडवेयः ॥

अण्क्रुञ्चाकोकिलात्स्मृतः ।

क्रौञ्चः कौकिलः ॥

आरक्पुंसि ततोऽन्यत्र

ततोऽन्यत्र पुंस्यारग्वक्तव्यः । मूषिकायाः पुमान्मौषिकारः । मृग्याः पुमान्मार्गारः ॥

गोधाया ढ्रग्विधौ स्मृतः ॥

गोधायाः पुमान्गौधेरः ॥

[ द्व्यचः ॥ ४ । १ । १२१ ॥

इतश्चानिञः ॥ ४ । १ । १२२ ॥

शुभ्रादिभ्यश्च ॥ ४ । १ । १२३ ॥

विकर्णकुषीतकात्काश्यपे ॥ ४ । १ । १२४ ॥

भ्रुवो वुक् च ॥ ४ । १ । १२५ ॥

कल्याण्यादीनामिनङ् ॥ ४ । १ । १२६ ॥

कुलटाया वा ॥ ४ । १ । १२७ ॥]

चटकाया ऐरक् ॥ ४ । १ । १२८ ॥

चटकायाः पुँल्लिङ्गनिर्देशः ॥ १ ॥

चटकायाः पुँल्लिङ्गेन निर्देशः कर्तव्यः । इहापि यथा स्यात् । चटकस्यापत्यं चाटकैरः ॥ यदि पुँल्लिङ्गनिर्देशः क्रियते चटकाया अपत्यं चाटकैर इति न सिध्यति । प्राति-

---

वडवाया वृषः वाडवेयः.

क्रुञ्चा व कोकिला या शब्दांहून अपत्य या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा० क्रौञ्चः, कौकिलः.

इतर कांहीं स्त्री-प्रत्ययान्त शब्दांहून तिचा पुरुष या अर्थी आरक् प्रत्यय होतो. उदा०—मूषिकायाः पुमान् मौषिकारः, मृग्याः पुमान् मार्गारः.

आणि गोधा शब्दाहून जो द्रक् प्रत्यय सांगितला आहे तोही गोधा शब्दाहून तिचा पुरुष या अर्थी होतो. गोधायाः पुमान् गौधेरः

( सू. १२८ वा. १ ) येथें चटकायाः असा जो स्त्रीलिंगी निर्देश केला आहे तो चटकात् असा पुंल्लिंगी करावा. कारण, चटकस्य अपत्यम् चाटकैरः येथेंही ऐरक् प्रत्यय झाला पाहिजे.

पण जर पुंल्लिंगी निर्देश केला तर चटकायाः अपत्यं चाटकैरः हें उदाहरण सिद्ध होणार नाहीं.

---

१ ( सू. १२१ )—ज्यामध्ये दोन अच् आहेत. असा जो स्त्रीप्रत्ययान्त शब्द त्याहून अपत्य या अर्थी ढक् प्रत्यय होतो. उदा०—दत्ताया अपत्य-दात्तेयः. अण् प्रत्ययाच्या ( ४।१।११३ ) बाधाकारितां हे सूत्र केलें आहे.

१ ( सू. १२२ )—ऱ्हस्व इकारान्त शब्दाहून अपत्य अर्थी ढक् प्रत्यय होतो. तो शब्द इञ्—प्रत्ययान्त नसावा. उदा०—अत्रेः अपत्यम् आत्रेयः.

१ ( सू. १२३ )—शुभ्र वगैरे जे शुभ्रादि गणांतील शब्द त्यांहून अपत्य अर्थी ढक् प्रत्यय होतो. उदा०—शुभ्रस्यापत्यं शौभ्रेयः.

१ ( सू. १२४ )—विकर्ण आणि कुषीतक या शब्दांहून अपत्य अर्थी ढक् प्रत्यय होतो. परंतु अपत्य काश्यप गोत्रांतील असलें पाहिजे. उदा०—विकर्णस्यापत्यं वैकर्णेयः काश्यपः.

१ ( सू. १२५ )—भ्रू शब्दाहून अपत्य अर्थी ढक् प्रत्यय होतो आणि त्याच्या बरोबर भ्रू शब्दाला वुक् आगम होतो. उदा०—भ्रुवः अपत्य भ्रौवेयः.

१ ( सू. १२६ )—कल्याणी वगैरे जे कल्याण्यादि गणांतील शब्द त्याहून अपत्य अर्थी ढक् प्रत्यय होतो आणि त्याच्या बरोबर त्या शब्दांतील शेवटच्या वर्णाला इनङ् आदेश होतो. उदा०—कल्याण्याः अपत्यं काल्याणिनेयः.

१ ( सू. १२७ )—कुलटा शब्दाहून अपत्य अर्थी ढक् प्रत्यय होतो आणि त्याच्याबरोबर त्या शब्दांतील शेवटच्या आकाराला इनङ् आदेश मात्र विकल्पानें होतो. उदा०—कुलटाया अपत्य कौलटिनेयः, कौलटेयः. भिक्षेकरिता घरोघर हिंडणारी सती स्त्री असा येथें कुलटा शब्दाचा अर्थ आहे.

१ ( सू. १२८ )—चटका शब्दाहून अपत्य अर्थी ऐरक् प्रत्यय होतो. उदा०—चटकाया अपत्यं चाटकैरः.

पदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीत्येवं भविष्यति ॥

स्त्रियामपत्ये लुक् ॥ २ ॥

स्त्रियामपत्ये लुग्वक्तव्यः । चटकाया अपत्यं स्त्री चटका ॥

[ गोधाया ढ्रक् ॥ ४ । १ । १२९ ॥ ]

आरगुदीचाम् ॥ ४ । १ । १३० ॥

आरग्वचनमनर्थकं रका सिद्धत्वात् ॥ १ ॥

आरग्वचनमनर्थकम् । किं कारणम् । रका सिद्धत्वात् । गोधाकारान्ता रक् प्रत्ययः ॥ एवं तर्हि सिद्धे सति यदारकं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो ऽन्येभ्योऽप्ययं भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । मौण्डारः जाडारः पाण्डार इत्येतत्सिद्धं भवतीति ॥

क्षुद्राभ्यो वा ॥ ४ । १ । १३१ ॥

क्षुद्राभ्य इत्युच्यते का क्षुद्रा नाम । अनियतपुंस्काङ्गहीना वा ॥

[पितृष्वसुश्छण् ॥ ४ । १ । १३२॥]

ढकि लोपः ॥ ४ । १ । १३३ ॥

केन विहिते पितृष्वसुर्ढकि लोप इत्युच्यते । एतदेव ज्ञापयति भवति पितृष्वसुर्ढगिति यदयं ढकि लोपं शास्ति ॥

---

' प्रातिपदिकाचें ग्रहण केलें तर तेथें लिंग–प्रत्यय–विशिष्टाचेंही ग्रहण होतें ' या परिभाषेनें चटका शब्दाहूनही ऐरक् प्रत्यय होईल.

( वा. २ ) जर ते अपत्य स्त्रीरूपी असेल तर त्या अपत्य या अर्थी केलेल्या ऐरक् प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें. उदा०— चटकाया अपत्यं स्त्री चटका.

( सू. १३० वा. १ ) येथें आरक् असा प्रत्यय सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं रक् प्रत्यय सांगितला म्हणजे तेवढ्यानेंच गौधेरः हें उदाहरण सिद्ध होत आहे. गोधा शब्द तर दीर्घ आकारान्त आहे आणि पुढें रक् प्रत्यय आहे.

तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांनाही जो येथें आचार्यांनीं आरक् असा प्रत्यय सांगितला आहे त्यावरून ते असें सुचवितात कीं गोधा शब्दापेक्षां इतर शब्दांहूनही हा अपत्य अर्थी आरक् प्रत्यय होतो.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं मौण्डारः जाडारः पाण्डारः हीं उदाहरणें सिद्ध होतात.

( सू. १३१ ) येथें क्षुद्राभ्यः असें म्हटलें आहे. पण क्षुद्रा असें कोणाला म्हणावें ?

ज्या स्त्रीचा नियमित पुरुषाशीं संबंध नाहीं, किंवा जिचा शरीरांतील एखादा भाग कमी आहे तिला क्षुद्रा स्त्री असें म्हणतात.

(सू. १३२) पितृष्वसृ शब्दाहून कोणत्या बरें सूत्रानें ढक् प्रत्यय सांगितला आहे कीं जो पुढें असतांना प्रकृत सूत्रानें सांगितलेला लोप करता येईल ?

ज्या अर्थी आचार्यांनीं ढक् पुढें असतांना पितृष्वसृ शब्दाच्या शेवटच्या वर्णाचा लोप सांगितला आहे त्या अर्थी ते असें सुचवितात कीं पितृष्वसृ शब्दाहून अपत्य अर्थी ढक् प्रत्यय होतो.

---

१ ( सू. १२९ )—गोधा शब्दाहून अपत्य अर्थी ढ्रक् प्रत्यय होतो. उदा०गोधाया अपत्यं गौधेरः.

१ ( सू. १३० )—उत्तर दिशेकडील आचार्यांच्या मतानें गोधा शब्दाहून अपत्य अर्थी आरक् प्रत्यय होतो. उदा०–गोधाया अपत्यं गौधारः.

२ मुण्ड, जण्ड, व पण्ड, हे शब्द दीर्घ आकारान्त नसल्यामुळें हीं उदाहरणें रक् प्रत्ययानें साधत नाहींत.

१ ( सू. १३१ )—क्षुद्रस्त्रीवाचकशब्दाहून अपत्य अर्थी ढ्रक् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—दास्याः अपत्यं दासेरः, दासेयः, काणेरः, काणेयः.

१ ( सू. १३२ )—पितृष्वसृ शब्दाहून अपत्य अर्थी छण् प्रत्यय होतो. उदा०—पैतृष्वस्रीयः

१ ( सू. १३३ )—पितृष्वसृ शब्दांतील शेवटच्या ऋकाराचा लोप होतो. अपत्य अर्थाचा ढक् प्रत्यय पुढें असतांना. उदा०—पैतृष्वसेयः.

## मातृष्वसुश्च ॥ ४।१।१३४ ॥

ढकि लोपः [ १३२ ] इत्युच्यते तत्रेदं न सिध्यति मातृष्वस्रीय इति । नैष दोषः । एवं वक्ष्यामि । पितृष्वसुश्छण् ढकि लोपः [१३२]। ततो मातृष्वसुश्च [१३३]। पितृष्वसुर्यदुक्तं तन्मातृष्वसुर्भवतीति । किं पुनस्तत् । छण्ढकि लोपश्च ॥

## [चतुष्पाद्भ्यो ढञ् ॥ ४।१।१३५॥
## गृष्ट्यादिभ्यश्च ॥ ४ ।१। १३६ ॥]
## राजश्वशुराद्यत् ॥ ४।१।१३७ ॥

## राज्ञोऽपत्ये जातिग्रहणम् ॥ १ ॥

राज्ञो ऽपत्ये जातिग्रहणं कर्तव्यम् । राजन्यो नाम जातिः । क मा भूत् । राजन इति ॥

## [क्षत्राद् घः ॥ ४।१।१३८ ॥
## कुलात् खः ॥ ४।१।१३९॥
## अपूर्वपदादन्यतरस्यां यड्ढकञौ ॥ ४।१।१४० ॥
## महाकुलादञ्खञौ ॥ ४।१।१४१ ॥
## दुष्कुलाड्ढक् ॥ ४।१।१४२ ॥

(सू. १३४) ढक् प्रत्यय पुढें असतांना मातृष्वसृ शब्दांतील शेवटच्या ऋकाराचा लोप येथें सांगितला आहे तेव्हां मातृष्वसेयः हें ढक् प्रत्ययाचें उदाहरण साधलें तरी मातृष्वस्रीयः हें छण् प्रत्ययाचें उदाहरण साधत नाहीं.

हा दोष येत नाहीं. 'पितृष्वसुश्छण् ढकि लोपः' असें एकच सूत्र करूं. त्यानंतर मातृष्वसुश्च हें सूत्र होय. पितृष्वसृ शब्दाला जें सांगितलें आहे तें मातृष्वसृ शब्दालाही होतें असा त्याचा अर्थ होईल.

पितृष्वसृ शब्दाला काय बरें सांगितलें आहे ?

छण् प्रत्यय आणि ढक् प्रत्यय करून तो पुढें असतांना ऋकाराचा लोप सांगितला आहे.

(सू. १३७ वा. १) राजन् शब्दाहून अपत्य या अर्थी जो प्रकृत सूत्रानें यत् प्रत्यय सांगितला आहे. तेथें 'त्या प्रत्ययान्तापासून जातीचा बोध होत असेल तर' असें म्हणावें. उदा० राजन्या नाम जातिः, जातीचा बोध होत असला पाहिजे असें म्हटलें असल्यामुळें राज्ञः अपत्यं राजनः येथें यत् प्रत्यय होत नाहीं.

१ (सू. १३४)—मातृष्वसृ शब्दाहूनही पितृष्वसृ शब्दाप्रमाणेंच प्रत्यय होतात.

१ (सू. १३५)—चार पायांच्या प्राण्यांतील जातिवाचक शब्दाहून अपत्य अर्थी ढञ् प्रत्यय होतो. उदा०—कामण्डलेयः.

१ (सू. १३६)—गृष्टि वगैरे जे गृष्ट्यादि गणांतील शब्द त्याहून अपत्य अर्थी ढञ् प्रत्यय होतो उदा० गार्ष्टेयः.

१ (सू. १३७)—राजन् व श्वशुर या शब्दाहून अपत्य अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०-राजन्यः, श्वशुर्यः.

२—राजन्य शब्दापासून क्षत्रिय जातीचा बोध होतो. आणि राजन् या शब्दापासून पहाचा राजपुत्र व्यक्तीचा बोध होतो.

१ (सू. १३८)—क्षत्र शब्दाहून अपत्य अर्थी घ प्रत्यय होतो. त्या घ-प्रत्ययान्त शब्दापासून जातीचा बोध झाला पाहिजे. उदा० क्षत्रस्य अपत्यं क्षत्रियः.

१ (सू. १३९)—कुल शब्दाहून आणि तदन्त शब्दाहून अपत्य अर्थी ख प्रत्यय होतो. उदा०—कुलीनः आढ्यकुलीनः.

१ (सू. १४०)—केवल कुल शब्दाहून अपत्य अर्थी यत् आणि ढकञ् हे प्रत्यय विकल्पानें होतात. उदा०-कुल्यः, कौलेयकः हे प्रत्यय होत नाहींत त्या वेळीं पूर्व सूत्रानें ख प्रत्यय होतो. उदा० कुलीनः.

१ (सू. १४१)—महाकुल शब्दाहून अपत्य अर्थी अञ् आणि खञ् हे प्रत्यय विकल्पानें होतात. उदा०—माहाकुलः माहाकुलीनः. हे प्रत्यय होत नाहींत त्या वेळीं 'कुलात्खः' या सूत्रानें ख प्रत्यय होतो. उदा० महाकुलीनः

१ (सू. १४२)—दुष्कुल शब्दाहून अपत्य अर्थी ढक् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—दौष्कुलेयः. हा ढक् प्रत्यय होत नाहीं त्या वेळीं 'कुलात्खः' यानें ख प्रत्यय होतो. उदा० दुष्कुलीनः.

**[स्वसुश्छः ॥ ४।१।१४३ ॥**
**भ्रातुर्व्यच्च ॥ ४।१।१४४॥ ]**
**व्यन्सपत्ने ॥ ४।१।१४५ ॥**

**व्यन्वचनमनर्थकं प्रत्ययार्थाभावात् ॥१॥**

व्यन्वचनमनर्थकम् । किं कारणम् । प्रत्ययार्थाभावात् । किमिदं प्रत्ययार्थाभावादिति । अपत्यार्थाभावात् । अपत्यमिति वर्तते ऽनपत्ये चापि सपत्ने भ्रातृव्यशब्दो वर्तते । पाप्मना भ्रातृव्येणेति ॥ अस्तु तावद्यदपत्यं सपत्नश्च तत्र भ्रातृव्य इति । कथं पाप्मना भ्रातृव्येणेति । उपमानात्सिद्धम् । भ्रातृव्य इव भ्रातृव्यः ॥

**[रेवत्यादिभ्यष्ठक् ॥ ४।१।१४६ ॥]**
**गोत्रस्त्रियाः कुत्सने ण च ॥ ४ । १ । १४७ ॥**

किमर्थो णकारः । वृद्ध्यर्थः । ञ्णितीति वृद्धिर्यथा स्यात् । गार्गो जाल्मः ।

**गोत्रस्त्रियाः प्रत्ययस्य णित्करणानर्थक्यं वृद्धत्वात्प्रातिपदिकस्य ॥ १ ॥**

गोत्रस्त्रियाः प्रत्ययस्य णित्करणमनर्थकम् । किं कारणम् । वृद्धत्वात्प्रातिपदिकस्य । वृद्धमेवैतत्प्रातिपदिकम् ॥ लुगर्थस्तर्हि णकारः कर्तव्यः । यल्लुगन्तमवृद्धं तत्र वृद्धिर्यथा स्यात् । वातण्डो जाल्मः ।

---

(सू. १४५ वा. १) येथें हा व्यन् प्रत्यय सांगणें निरुपयोगीं आहे

काय कारण ?

कारण असें कीं येथे प्रत्ययार्थाभाव आहे.

प्रत्ययार्थाभाव म्हणजे काय ?

या ठिकाणीं सूत्रांत अपत्य या अर्थाची अनुवृत्ति आहे; आणि अपत्य अर्थ तर जुळत नाहीं. कारण अपत्य नव्हे असा जो केवळ शत्रू त्या अर्थींही भ्रातृव्य शब्दाचा प्रयोग दिसतो. उदा०—पाप्मना भ्रातृव्येण.

तर मग भ्रात्याचें अपत्य असा जो शत्रू त्याच अर्थीं भ्रातृव्य शब्दाचा प्रयोग असूं दे.

पण तसें म्हटलें तर पाप्मना भ्रातृव्येण या प्रयोगाची वाट काय ?

पाप्मा म्हणजे पाप. तें भ्रातृव्यासारखें म्हणून त्याला तेथें भ्रातृव्य असें म्हटलें आहे.

(सू. १४७) येथें ह्या ण प्रत्ययाला णकार कशाकारिता जोडला आहे ?

वृद्धीकरितां जोडला आहे. ञित् व णित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेली वृद्धि (७।२।११७) झाली पाहिजे. उदा०—गार्गो जाल्मः.

(वा. १) गोत्रस्त्रियाः० या सूत्रानें सांगितलेल्या ण प्रत्ययाला इत्संज्ञक णकार जोडण्याचा कांहीं उपयोग नाहीं.

काय कारण ?

कारण असे कीं गोत्र—प्रत्ययान्त प्रातिपदिक वृद्ध—संज्ञकच आहे.

तर मग ज्या ठिकाणीं गोत्र प्रत्ययाचा लुक् झाला असेल तेथें वृद्धि होण्याकरितां णकार पाहिजे. उदा०—वतण्ड्याः अपत्यम् वातण्डो जाल्मः. येथें गोत्र प्रत्ययाचा लुक् (४।१।१०९) झाल्यामुळें वतण्डी हें गोत्र-प्रत्ययान्त प्रातिपदिक वृद्ध नाहीं. पण येथें वृद्धि झाली पाहिजे.

---

१ (सू. १४३)—स्वसृ शब्दाहून अपत्य या अर्थी छ प्रत्यय होतो. उदा.— स्वसुः अपत्यं स्वस्रीयः.

१ (सू. १४४)—भ्रातृ शब्दाहून अपत्य अर्थी व्यत् आणि छ हे प्रत्यय होतात. उदा०—भ्रातृव्यः, भ्रात्रीयः.

१ (सू. १४५)—भ्रातृ शब्दाहून प्रत्ययान्ताचा अर्थ शत्रु असतांना व्यन् प्रत्यय होतो. उदा०—भ्रातृव्यः शत्रुः.

१ (सू. १४६)—रेवती वगैरे शब्दाहून अपत्य अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा० रैवतिकः.

१ (सू. १४७)—स्त्रीरूप जे गोत्रापत्य तद्वाचक प्रत्ययान्ताहून युवापत्य अर्थी ण आणि ठक् हे प्रत्यय निन्दा गम्यमान असताना होतात. उदा०—गार्ग्याः अपत्य गार्ग्यः जाल्मः, गार्गिकः. येथें हा गार्ग्य म्ह. गार्गीचा मुलगा आहे अशा रीतीने बापाचें नांव माहीत नसल्यामुळें त्याची माहिती आईकडून दिली जाते व त्यामुळें त्याची निंदा गम्यमान होते.

**लुगर्थमिति चेन्न लुक्प्रतिषेधात् ॥ २ ॥**

लुगर्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । लुक्प्रतिषेधात् । प्रतिषिध्यतेऽत्र लुग्गोत्रेऽलुगचि [४.१.८९] इति ॥ व्यवहितत्वादप्रतिषेधः । ईकारेण व्यवहितत्वात्प्रतिषेधो न प्राप्नोति ।

**व्यवहितत्वादप्रतिषेध इति चेन्न पुंवद्भावात् ॥ ३ ॥**

व्यवहितत्वादप्रतिषेध इति चेत्तन्न । किं कारणम् । पुंवद्भावात् । पुंवद्भावोऽत्र भवति । भस्य तद्धिते ऽढे पुंवद्भावो भवतीति ॥

**फिनर्थं तु ॥ ४ ॥**

फिनर्थं तु णकारः कर्तव्यः । यत्फिनन्तमवृद्धं तत्र वृद्धिर्यथा स्यात् । ग्लौचुकायनो जाल्मः ॥

**पुंवद्भावप्रतिषेधार्थं च ॥ ५ ॥**

पुंवद्भावप्रतिषेधार्थं च णकारः कर्तव्यः । गार्गी भार्यास्य गार्गीभार्यः । वृद्धिनिमित्तस्येति पुंवद्भावप्रतिषेधो यथा स्यात् ॥

**गोत्राद्यून्यस्त्रियामिति वचनादप्रयोजनम् ॥ ६ ॥**

गोत्राद्यून्यस्त्रियाम् [ ४. १. ९४ ] इति वचनादप्रयोजनमेतद्भवति । नास्ति गार्गी ॥

**अवंश्यत्वाद्वा स्त्रियाः प्रयोजनम् ॥ ७ ॥**

अवंश्यत्वाद्वा स्त्रियाः प्रयोजनमेतद्भवति । न स्त्री वंश्या । अस्ति गार्गी स्त्री ॥

---

(वा. २) गोत्र प्रत्ययाचा लुक् होतो त्या ठिकाणीं वृद्धि होण्याकरितां णकार पाहिजे असें म्हणतां येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं गोत्रेऽलुगचि (४।१।८९) ह्यानें तेथें लुकाचा निषेध केला आहे.

व्यवहितत्वादप्रतिषेधः म्हणजे गोत्र प्रत्यय आणि अजादि प्राग्दीव्यतीय अर्थी केलेला पुढील प्रत्यय या दोहोंमध्यें ङीप् प्रत्ययाच्या ईकारानें व्यवधान होत असल्यामुळें लुकाचा प्रतिषेध येथें प्राप्त होत नाहीं.

( वा. ३ ) व्यवधान असल्यामुळें लुकाचा निषेध येथें येत नाहीं असें म्हणशील तर तसें नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं तो ङीप् प्रत्यय पुंवद्भावानें निघून जात आहे. भस्याढे तद्धिते (६।३।३५ वा. ११ ) यानें येथें पुंवद्भाव होत आहे.

( वा. ४ ) ज्या ठिकाणीं गोत्र प्रत्यय फिन् केला असेल तेथें वृद्धि होण्याकरितां णकार पाहिजे. फिन्—प्रत्ययान्त प्रातिपदिक जें अवृद्ध असेल त्या ठिकाणी वृद्धि होण्याकरितां या ण प्रत्ययाला णकार पाहिजे. उदा०—ग्लुचुकायन्याः अपत्यं ग्लौचुकायनः जाल्मः.

( वा. ५ ) शिवाय पुंवद्भावाचा निषेध होण्याकरितांही येथें णकार जोडला पाहिजे. गार्गी भार्या यस्य स गार्गीभार्यः. येथें वृद्धिनिमित्तस्य० (६।३।३९) यानें गार्गी या पूर्वपदाला पुंवद्भावाचा निषेध झाला पाहिजे.

( वा. ६ ) हा णकाराचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण गोत्राद्यून्यस्त्रियाम् ( ४।१।९४ ) असें सूत्र असल्यामुळें गार्गी हा शब्दच मुळीं सिद्ध होत नाहीं.

( वा. ७ ) अथवा स्त्री ही वंश्य नसल्यामुळें गार्गी हा उपयोग संभवतो. गर्गाची पौत्री स्त्री ही गर्गाच्या वंशात उत्पन्न झाली असली तरी तिला गर्गाच्या वंशांतली असें म्हणता येत नाहीं. म्हणून तिच्या मुलीला

---

२—गर्ग शब्दाहून गोत्रापत्य अर्थी यञ् प्रत्यय ( ४।१।१०५ ), पुढें ङीप् ( ४।१।१६ ), पुढे युवापत्य अर्थी प्रकृत सूत्राने ण प्रत्यय व पुढे टाप् करून गार्गा असा शब्द साधावयाचा. परंतु स्त्रीरूपी अपत्याला युव संज्ञाच नाहीं. तेव्हा त्या अर्थी प्रकृत सूत्राने ण प्रत्यय करता येणार नाही. कारण युव संज्ञा नसल्यामुळें गोत्र संज्ञा होणार, आणि गोत्रापत्य अर्थी प्रत्यय तर एको गोत्रे ( ४।१।९३ ) या नियमामुळें प्रत्ययान्ताहून होत नाही.

अपर आह । द्वावेव वंशौ मातृवंशः पितृवंशश्च । यावता मातृवंशोऽप्यस्ति नास्ति गार्गी ॥

## वृद्धाट्ठक्सौवीरेषु बहुलम् ॥ ४ । १ । १४८ ॥

गोत्रस्त्रियाः वृद्धाट्ठक् फेश्छ च फाण्टाहृति [१४७–१५०] इमे चत्वारो योगाः । तत्र त्रयः कुत्सने त्रयः सौवीरगोत्रे । आद्यो योगः कुत्सन एव परः सौवीरगोत्र एव ॥

[फेश्छ च ॥ ४ । १ । १४९ ॥]

## फाण्टाहृतिमिमताभ्यां णफिञौ ॥ ४ । १ । १५० ॥

किमर्थो णकारः । वृद्ध्यर्थः । ञ्णितीति वृद्धिर्यथा स्यात् । फाण्टाहृतः ।

**फाण्टाहृतेः प्रत्ययस्य णित्करणानर्थक्यं वृद्धत्वात्प्रातिपदिकस्य ॥ १ ॥**

फाण्टाहृतेः प्रत्ययस्य णित्करणमनर्थकम् । किं कारणम् । वृद्धत्वात्प्रातिपदिकस्य । वृद्धमेवैतत्प्रातिपदिकम् ॥

---

गर्गाच्या संबंधानें गोत्रसंज्ञा³–( ४।१।१६२ ) ही नाहीं. तेव्हां त्या मुलीला गार्गी असें म्हणतां येतें.

येथें दुसरा कोणी वैयाकरण असें म्हणतो कीं वंश हे मातृवंश आणि पितृवंश असे दोनच आहेत. तेव्हां जर मातृवंश आहे तर गार्गी असें रूप होत नाहींच.

( सू. १४८ ) गोत्रस्त्रियाः०, वृद्धाट्ठक्०, फेश्छ च आणि फाण्टाहृति० ( ४।१।१४७–१५० ) हीं चार सूत्रें क्रमानें सूत्रकारांनीं केलीं आहेत. त्यांपैकीं शेवटचें सूत्र सोडून पहिलीं तीन सूत्रें निंदा गम्यमान असतांना प्रवृत्त होतात. तसेंच पहिलें सूत्र सोडून पुढील तीन सूत्रें सौवीर गोत्र असतांना प्रवृत्त होतात. पहिल्या सूत्रामध्यें निंदा हेंच निमित्त आहे; सौवीर गोत्र हें निमित्त नाहीं. तसेंच चवथ्या सूत्रामध्यें सौवीर गोत्र हेंच निमित्त आहे; निंदा हे निमित्त नाहीं.

( सू. १५० ) येथें फाण्टाहृति शब्दाहून हा जो ण प्रत्यय सांगितला आहे त्याला णकार कशाकरितां जोडला आहे ?

वृद्धीकरितां जोडला आहे. ञित् व णित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेली वृद्धि ( ७।२।११७) येथें झाली पाहिजे. उदा० फाण्टाहृतः.

( वा. १ ) फाण्टाहृति शब्दाच्या पुढील प्रत्ययाला इत्संज्ञक णकार जोडण्याची कांहीं जरूर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं फाण्टाहृति हें प्रातिपदिक वृद्ध ( १।१।७३ ) आहेच.

---

३–गोत्र संज्ञा नसल्यामुळें एको गोत्रे हा नियम लागू होत नाहीं तेव्हा गर्गाची पौत्री जी गार्गी त्या गार्गी शब्दाहून तिची मुलगी या अर्थी प्रकृत सूत्रानें ण प्रत्यय होऊन गार्गी असें रूप होईल.

४–गर्गाच्या पौत्रीची जी मुलगी तिचा गर्ग कुल हा मातृवंश होतो. म्हणून तिला गर्गाच्या संबधानें गोत्र संज्ञा होणार आणि एको गोत्रे हा नियम तेथें लागू होणार. तेव्हां यञ्-प्रत्ययान्ताहून अपत्य अर्थी ण प्रत्यय होणार नाहीं. म्हणून गार्गी असें रूपच होणार नाहीं.

१ ( सू. १४८ )–सौवीर गोत्र–प्रत्ययान्त वृद्ध संज्ञक शब्दाहून अपत्य अर्थी बाहुल्येंकरून ठक् प्रत्यय निंदा गम्यमान असतांना होतो. उदा०–भागवित्तेरपत्यं भागवित्तिकः; तार्णबिन्दवस्य अपत्यं तार्णबिन्दविकः.

१ ( सू. १४९ )–सौवीर–गोत्रापत्यार्थक फिञ्-प्रत्ययान्त वृद्ध-संज्ञक शब्दाहून अपत्य अर्थी छ आणि ठक् हे प्रत्यय निंदा गम्यमान असतांना होतात. उदा०–यामुन्दायनेरपत्यं यामुन्दायनीयः, यामुन्दायनिकः. यमुन्द शब्दाहून गोत्रापत्य अर्थी फिञ् प्रत्यय ( ४।१।१५४ ) झाला आहे.

१ ( सू १५० )- सौवीर गोत्रांतील पुरुषवाचक जे फाण्टाहृति व मिमत हे शब्द त्यांहून अपत्य अर्थी क्रमानें ण आणि फिञ् हे प्रत्यय होतात उदा०–फाण्टाहृत, मैमतायनिः. हे दोन्ही प्रत्यय दोन्ही शब्दांहून होतात असें कांहीं लोकांचें मत आहे त्या मतीं फाण्टाहृतायनिः आणि मैमतः अशींही रूपें होतात.

**पुंवद्भावप्रतिषेधार्थं तु ॥ २ ॥**

पुंवद्भावस्य प्रतिषेधार्थो णकारः कर्तव्यः। फाण्टाहृता भार्यास्य फाण्टाहृताभार्यः। वृद्धिनिमित्तस्येति पुंवद्भावप्रतिषेधो यथा स्यादिति ॥

**उक्तं वा ॥ ३ ॥**

किमुक्तम् । गोत्राद्यून्यस्त्रियामिति वचनादप्रयोजनमवंश्यत्वाद्वा स्त्रियाः प्रयोजनमिति ॥

**कुर्वादिभ्यो ण्यः ॥ ४ । १ । १५१ ॥**

**वामरथस्य कण्वादिवत्स्वरवर्जम् ॥ १ ॥**

वामरथस्य कण्वादिवद्भावो वक्तव्यः । किमविशेषेण । नेत्याह । स्वरं वर्जयित्वा । किं प्रयोजनम् । वामरथ्यस्य च्छात्त्रा वामरथाः । कण्वादिभ्यो गोत्रे [४.२.१११] इत्यण्यथा स्यात् ॥ यदि कण्वादिवदित्युच्यते प्रत्ययाश्रयमनतिदिष्टं भवति । तत्र को दोषः । वामरथाः । बहुषु लोपो न प्राप्नोति । वामरथानां संघः । संघाङ्कलक्षणेष्वञ्यञिञामण् [ ४. ३. १२७ ] इत्यण्न प्राप्नोति ॥ यदि पुनर्यञ्वदित्युच्येत । एवमपि प्रकृत्याश्रितमनतिदिष्टं भवति । तत्र को दोषः । वामरथ्यस्य च्छात्त्रा वामरथाः कण्वादिभ्यो गोत्र इत्यण्न प्राप्नोति ॥

---

( वा. २ ) पुंवद्भावाचा निषेध होण्याकरिता णकार जोडला पाहिजे. फाण्टाहृता भार्या यस्य स फाण्टाहृताभार्यः. येथे 'वृद्धिनिमित्तस्य०' ( ६।३।३९ ) यानें पुंवद्भावाचा निषेध झाला पाहिजे.

( वा. ३ ) अथवा हे सांगितलेंच आहे. तें काय सांगितलें आहे ?

गोत्राद्यून्यस्त्रियामिति वचनात् अप्रयोजनम्, अवंश्यत्वाद्वा स्त्रिया प्रयोजनम् ( ४।१।१४७ वा. ६, ७ ) असें सांगितलेंच आहे.

( सू. १५१ वा. १ ) वामरथ हा शब्द कण्वादि गणांतील शब्दासारखा समजावा असा अतिदेश करावा.

हा अतिदेश सर्व ठिकाणी व्यावयाचा कीं काय ?

नाहीं. स्वर-विधीशिवाय सर्व ठिकाणीं हा अतिदेश व्यावयाचा.

ह्या अतिदेशाचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं वामरथ्यस्य छात्राः वामरथाः येथें वामरथ शब्दाहून प्रकृत सूत्रानें अपत्य या अर्थी ण्य प्रत्यय झाल्यानंतर पुढें त्याचे छात्र या शैषिक अर्थी 'कण्वादिभ्यो गोत्रे' (४।२।१११) यानें अण् प्रत्यय झाला पाहिजे.

पण येथे वामरथ शब्द हा कण्वादि गणातील शब्दाप्रमाणे समजावा असा अतिदेश केला आहे. तेव्हा त्या वामरथ शब्दाच्या पुढील प्रकृत सूत्रानें झालेला ण्य प्रत्यय हा कण्व शब्दाहून होणाऱ्या ( ४।१।१०५ ) यञ् प्रत्ययाप्रमाणें समजला जाणार नाहीं.

मग तसें झालें तर दोष काय येतो ?

वामरथस्य गोत्रापत्यानि वामरथाः येथें प्रकृत सूत्रानें केलेल्या ण्य प्रत्ययाचा लुक् ( २।४।६४ ) होणार नाहीं. तसेंच वामरथानां संघः वामरथः येथे संघाङ्कलक्षणेष्वञ्यञिञामण् ( ४।३।१२७ ) या सूत्रानें यञ् प्रत्ययान्ताहून संघ वगैरे अर्थी सांगितलेला अण् प्रत्यय होणार नाहीं.

आता जर ण्य प्रत्यय हा यञ् प्रत्ययाप्रमाणें समजावा असा अतिदेश केला तरी वामरथ हा शब्द कण्वादि गणांतील शब्दाप्रमाणें समजावा असा अतिदेश होणार नाहीं.

मग तसे झालें तर दोष काय येतो ?

वामरथ्यस्य छात्राः वामरथाः येथें 'कण्वादिभ्यो गोत्रे' यानें अण् प्रत्यय होणार नाहीं.

---

१ सू. १५१ )--कुरु वगैरे जे कुर्वादि गणांतील शब्द त्याहून अपत्य या अर्थी ण्य प्रत्यय होतो उदा० कौरव्य..

अस्तु तर्हि कण्वादिवदित्येव । कथं वामरथाः वामरथानां संघ इति । यदयं स्वरवर्जमित्याह तज्ज्ञापयत्याचार्यः प्रत्ययाश्रितमप्यातिदिष्टं भवतीति ॥

[ सेनान्तलक्षणकारिभ्यश्च ॥ ४ । १ । १५२ ॥ ]

उदीचामिञ् ॥ ४ । १ । १५३ ॥

उदीचामिञ्विधौ तक्ष्णोऽण्वचनम् ॥ १ ॥

उदीचामिञ्विधौ तक्ष्णोऽण्वक्तव्यः । ताक्ष्णः ॥ यदि पुनरयं तक्षन्शब्दः शिवादिषु पठ्येत ।

शिवादिरिति चेण्यविधिः ॥ २ ॥

शिवादिरिति चेण्ण्यो विधेयः । ताक्षण्य इति ॥

सिद्धं तूदीचां वा ण्यवचनात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । उदीचां वा ण्यवचनात् । उदीचां वा ण्यो भवतीति वक्तव्यम् । ण्येन मुक्ते यो यतः प्राप्नोति स

---

तर मग वामरथ हा शब्द कण्वादि गणांतील शब्दांप्रमाणें समजावा असाच अतिदेश असूं दे.

पण तसा अतिदेश असेल तर वामरथस्य गोत्रापत्यानि वामरथाः येथें लुक् आणि वामरथानां संघः वामरथः येथें अण् प्रत्यय कसा बरें होईल ?

येथें वार्तिककारांनीं ' स्वरवर्जम् ' असे जें म्हटले आहे त्यावरून त्यांनीं असें सुचविलें आहे कीं या ण्य प्रत्ययाला यञ् प्रत्ययाप्रमाणें कार्य करावें.

( सू. १५३ वा. १ ) तक्षन् हा शब्द शिल्पिवाचक आहे. त्याहून प्रकृत सूत्रानें इञ् प्रत्यय प्राप्त झाला असतां तो न करतां त्याच्या ऐवजीं अण् प्रत्यय होतो असें म्हणावे. उदा० तक्ष्णः अपत्यं ताक्ष्णः.

आतां जर अण् प्रत्यय होण्याकरितां हा तक्षन् शब्द शिवादि गणामध्यें ( ४।१।११२) घातला तर—

( वा. २ ) शिवादि गणामध्यें घातला तर ताक्षण्यः हें उदाहरण सिद्ध होण्याकरितां ण्य प्रत्ययाचें विधान केले पाहिजे[२].

( वा ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

सेनान्त वगैरे शब्दांहून इतर आचार्यांच्या मतानें ण्य प्रत्यय होतो आणि उत्तर दिशेकडील आचार्यांच्या मतानें होत नाहीं असा येथें विकल्प सांगावा. तेव्हां अर्थातच ण्य प्रत्यय होत नाहीं तेव्हा ज्या शब्दाहून जो प्रत्यय प्राप्त होत असेल तो तेथें होईल[३].

---

२--जर हा ण्य प्रत्यय यञ् प्रत्ययाप्रमाणें समजावा असे वार्तिककारांच्या मनात नसतें तर 'ञ्नित्यादि०' (६।१।१९७) यान सांगितलेल्या आद्युदात्त स्वराची येथें प्राप्तीच येत नसल्यामुळें त्यानें स्वरवर्जम् असें त्याकरितां म्हटलें नसतें.

१ (सू १५२ )--सेना शब्द अन्तीं असलेले शब्द लक्षणशब्द आणि शिल्पिवाचक शब्द यांहून अपत्य अर्थी ण्य प्रत्यय होतो. उदा०--हारिषेण्यः, लाक्षण्यः, तान्तुवाय्यः.

१ ( सू १५३ )--पूर्व सूत्राच्या विषयामध्येच उत्तर दिशेकडील आचार्यांच्या मतानें इञ् प्रत्यय होतो उदा०--हारिषेणिः. लाक्षणिः, तान्तुवायिः.

२--तक्षन् शब्दाहून उत्तर दिशेकडील आचार्यांच्या मतानें अण् प्रत्यय आणि इतर आचार्यांच्या मतानें ण्य प्रत्यय होऊन ताक्ष्णः व ताक्षण्यः अशीं रूपें इष्ट आहेत.

३-- सेन शब्द शेवटीं असलेले शब्द लक्षण शब्द आणि शिल्पिवाचक शब्दांपैकीं तन्तुवाय, कुम्भकार वगैरे कांहीं शब्द हे ह्रस्व-अकारान्त आहेत. म्हणून त्याहून इञ् ( ४ । १ । ९५ ) होईल. आणि तक्षन् शब्दाहून अण् प्रत्यय ( ४ । १ । ९२ ) होईल. येथें भाष्यकाराचा अभिप्राय उदीचामञ् असा दाखविला आहे कीं--उदीचामिञ् हें सूत्र मुळींच करूं नये. फक्त त्यांतील उदीचाम् हें पद वा या अर्थानें पूर्व सूत्रांत योजावें.

ततो भविष्यति ॥

**[तिकादिभ्यः फिञ् ॥ ४।१।१५४ ॥]**

**कौसल्यकार्मार्याभ्यां च ॥ ४ । १ । १५५ ॥**

किमिदं कौसल्यकार्मार्ययोर्विकृतयोर्ग्रहणं क्रियते । एवं विकृताभ्यां यथा स्यात् ॥ अत्यल्पमिदमुच्यते कौसल्यकार्मार्याभ्यां चेति ॥

**फिञ्प्रकरणे दगुकोसलकर्मारच्छागवृषाणां युट् च ॥ १ ॥**

फिञ्प्रकरणे दगुकोसलकर्मारच्छागवृषाणां युट् चेति वक्तव्यम् । दगु दागव्यायनिः । कोसल कौसल्यायनिः । कर्मार कार्मार्यायणिः । छाग छाग्यायनिः । वृष वार्ष्यायणिः ।

यदि युट् क्रियते युटि कृते ऽनादित्वादादेशो न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । युट् क्रियतामादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादादेशः । नित्यो युट् । कृतेऽप्यादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । युडप्यनित्यः । अन्यस्य कृत आदेशे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । अन्तरङ्गस्तर्हि युट् । कान्तरङ्गता । उत्पत्तिसंनियोगेन युडुच्यत

---

( सू. १५५ ) येथें ' कोसलकर्माराभ्याम् ' असें मूळ शब्दाचें उच्चारण न करतां कौसल्य कार्मार्य असे विकृत शब्द कां बरें उच्चारले आहेत ?

ह्या इञ् प्रत्ययाच्या मागें मूळ शब्दांचीं अशीं विकृत रूपेंच इष्ट आहत म्हणून उच्चारले आहेत.

येथें जे हे सूत्रकारांनीं दोनच शब्द उच्चारले आहेत ते फारच कमी उच्चारले आहेत.

(वा. १) या फिञ् प्रकरणामध्यें दगु, कर्मार, कोसल, छाग आणि वृष या शब्दांहून अपत्य या अर्थीं फिञ् प्रत्यय होतो आणि त्या फिञ् प्रत्ययाला युट् असा आगम होतो असें म्हणावें. उदा० दागव्यायनिः, कौसल्यायनिः, कार्मार्यायणिः, छाग्यायनिः, वार्ष्यायणिः.

पण जर येथें प्रत्ययाला युट् आगम सांगितला तर तो युट् आगम केल्यानंतर फकाराला प्रत्ययाचा आदि अवयव असें म्हणतां येत नसल्यामुळें त्याला आयन् आदेश ( ७।१।२ ) होणार नाहीं.

येथें अगोदर असा विचार उत्पन्न होतो कीं फकाराला आयन् आदेश अगोदर करावा किंवा युट् आगम करावा.

मग तुमचें काय म्हणणें आहे ?

परत्वास्तव आयन् आदेश अगोदर करावा.

पण युट् आगम नित्य आहे ना ? कारण, आयन् आदेश केल्यानंतरही त्याची प्राप्ति येते आणि तो करण्याच्या पूर्वींही प्राप्ति येते.

तरी पण येथें युट् आगमही अनित्यच आहे. कारण, तो आयन् आदेश केल्यानंतर एका शब्दाला प्राप्त होतो आणि आयन् आदेश करण्याच्या पूर्वीं दुसऱ्या शब्दाला प्राप्त होतो; आणि अशा रीतीनें निरनिराळ्या शब्दाला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो.

तर मग आतां येथें आयन् आदेशापेक्षां युट् आगम अन्तरंग आहे.

तो अंतरंग कसा ?

असा कीं युट् आगम हा प्रत्ययाच्या बरोबरच सांगितला आहे आणि प्रत्यय उत्पन्न

---

१– ( सू. १५४ ) तिक वगैरे जे तिकादि गणांतील शब्द त्यांहून अपत्य या अर्थीं फिञ् प्रत्यय होतो. उदा०– तैकायनिः.

१– ( सू. १५५ ) कोसल आणि कर्मार या शब्दांहून अपत्य या अर्थीं फिञ् प्रत्यय होतो. आणि त्याच्या बरोबरच त्या शब्दांना क्रमानें कौसल्य आणि कार्मार्य असे आदेश होतात. उदा०– कोसलस्य अपत्यं कौसल्यायनिः; कर्मारस्य अपत्यं कार्मार्यायणिः.

उत्पन्ने प्रत्यये प्रकृतिप्रत्ययावाश्रित्याङ्गस्यादेश उच्यते। आदेशोऽप्यन्तरङ्गः। कथम्। वक्ष्यत्येतदायनादिषूपदेशिवद्वचनं स्वरसिद्ध्यर्थमिति। अनवकाशस्तर्हि युट्॥ एवं तर्हि पूर्वान्तः करिष्यते।

यदि पूर्वान्तः क्रियते दागव्यायनिः ओर्गुणो न प्राप्नोति॥ अस्तु तर्हि परादिरेव। ननु चोक्तं युटि कृते ऽनादित्वादादेशो न प्राप्नोतीति। नैष दोषः।

सिद्धं त्वादिष्टस्य युड्वचनात्। सिद्धमेतत्। कथम्। आदिष्टस्य युड्वचनात् युट् चादिष्टस्येति वक्तव्यम्। तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। चेन संनियोगः करिष्यते। युट् च। किं च। यच्चान्यत्प्राप्नोति। किं चान्यत्प्राप्नोति। आदेश इति॥

[अणो द्व्यचः॥४।१।१५६॥
उदीचां वृद्धादगोत्रात्
॥४।१।१५७]
वाकिनादीनां कुक् च
॥४।१।१५८॥

---

झाल्यानंतर प्रकृति आणि प्रत्यय या दोहोंच्या आश्रयाने अंग संज्ञेला कारणीभूत असा प्रत्ययांतील फकाराला आयन् आदेश होणार आहे.

आदेशही अन्तरंग आहे.

तो कसा?

असा कीं, आयनादिषूपदेशिवद्वचनं स्वरसिद्ध्यर्थम् (७।१।२ वा. १) असें पुढें (वार्तिककार) सांगणारच आहेत.

तरी पण युट् आगम हा अनवकाश असल्यामुळें अगोदर होईल.

तर मग मागील शब्दाचा अन्तावयव युक् असा आगम करतां येईल.

पण जर मागील शब्दाचा अन्त अवयव असा आगम केला तर दगोः अपत्यं दागव्यायनिः येथें ओर्गुणः (६।४।१४६) यानें गुण होणार नाहीं.

तर मग युट् असा प्रत्ययाचा आद्यावयवच असूं दे.

पण युट् केल्यानंतर फकार हा प्रत्ययाचा आद्यावयव नसल्यामुळें त्याला आयन् आदेश होणार नाहीं असा दोष येतो ना?

हा दोष येत नाहीं.

हें सिद्ध होत आहे.

तें कसे?

आदेशालाच युट् आगम होतो असें म्हणावें.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. युट् च येथील 'च' शब्दानें युट् आगम आणि आयन् आदेश यांचें बरोबर विधान करतां येईल. युट् च म्हणजे युट् होतो, आणखी—

आणखी काय होतें?

जें कांहीं दुसरें प्राप्त होतें तें.

तें दुसरें काय बरें प्राप्त होतें?

फकाराला आयन् आदेश प्राप्त होतो.

---

२– तेव्हां युट् आगम झाल्यानतर फकार हा प्रत्ययाचा आदि अवयव नसल्यामुळें त्याला आयन् आदेश होणार नाहीं हा दोष कायम राहतो.

१– (सू. १५६) अण्-प्रत्ययान्त जें द्व्यचक प्रातिपदिक त्याहून अपत्य या अर्थी फिञ् प्रत्यय होतो. उदा०– कर्तुः गोत्रापत्यं कार्त्रः. या अण्-प्रत्ययान्ताहून युवापत्य अर्थी प्रकृत सूत्रानें फिञ् प्रत्यय होतो. कार्त्रायणिः.

१– (सू. १५७) गोत्रप्रत्ययान्त-भिन्न जो वृद्धसंज्ञक शब्द त्याहून अपत्य अर्थी उत्तर दिशेकडील आचार्यांच्या मताने फिञ् प्रत्यय होतो. उदा०– आम्रगुप्तायनिः

१– (सू. १५८) वाकिन वगैरे शब्दांहून अपत्य अर्थी फिञ् प्रत्यय होतो. आणि त्याच्याबरोबर वाकिन वगैरे शब्दांना कुक् आगम होतो. उदा०– वाकिनस्यापत्यं वाकिनकायनिः.

यदि पुनरयं कुद् परादिः क्रियेत ।

**कुटि प्रत्ययादेरादेशानुपपत्तिरनादित्वात् ॥ १ ॥**

कुटि सति प्रत्ययादेरादेशो नोपपद्यते । किं कारणम् । अनादित्वात् । कुटि कृते ऽनादित्वादादेशो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि पूर्वान्तः करिष्यते ।

**पूर्वान्ते नलोपवचनम् ॥ २ ॥**

यदि पूर्वान्तः क्रियते नलोपो वक्तव्यः । चार्मिकायणिः वार्मिकायणिः । नलोपः प्रातिपदिकान्तस्य [ ८.२.७] इति नलोपो न प्राप्नोति । परादौ पुनः सति नलोपः प्रातिपदिकान्तस्येति नलोपः सिध्यति ॥ अस्तु तर्हि परादिरेव । ननु चोक्तं कुटि कृते ऽनादित्वादादेशो न प्राप्नोतीति ।

**सिद्धं त्वादिष्टस्य कुड्वचनात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । कुद् चादिष्टस्येति वक्तव्यम् । तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । चेन संनियोगः करिष्यते । कुद् च । किं च । यच्चान्यत्प्राप्नोति । किं चान्यत्प्राप्नोति । आदेशः । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं पूर्वान्ते नलोपवचनमिति । नैष दोषः । क्रियत एतन्न्यास एव चर्मिवर्मिणोर्नलोपश्चेति ॥

---

(सू. १५८) जर येथें प्रत्ययाचा आद्यावयव कुद् असा आगम केला असता तर—

(वा. १) कुद् असा आगम केला तर प्रत्ययाच्या आदि वर्णाला आदेश होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं प्रत्ययाला कुद् आगम झाल्यानंतर फकार हा आद्यावयव नसल्यामुळें त्याला आयन् आदेश होणार नाहीं.

तर मग मागील शब्दाचा अन्तावयव कुक् असाच आगम करतां येईल.

(वा. २) जर मागील शब्दाचा अन्तावयव कुक् असा केला तर चार्मिकायणिः व वार्मिकायणिः येथें चर्मिन् व वर्मिन् या शब्दांच्या नकाराचा'नलोपः प्रातिपदिकान्तस्य'(८।२।७) यानें लोप प्राप्त होत नाहीं; त्याचें येथें विधान केलें पाहिजे. आणि कुद् असा पुढील प्रत्ययाचा आद्यावयव केला म्हणजे'नलोपः प्रातिप०' या सूत्रानेंच नकाराचा लोप साधतो

असें आहे तर मग प्रत्ययाचा आद्यावयव कुद् असाच असूं दे.

पण प्रत्ययाचा आद्यावयव कुद् असा आगम केला तर फकार हा प्रत्ययाचा आद्यावयव नसल्यामुळें त्याला आयन् आदेश होणार नाहीं असा दोष दिला आहे ना ?

(वा. ३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

आदेशालाच कुद् आगम होतो असें म्हणावें.

तर मग तसें सूत्र केलें पाहिजे.

तसें सूत्र करावयास नको. कुद् च यांत च शब्दानें कुद् आगम आणि आयन् आदेश यांचे बरोबर विधान करतां येईल. कुद् च म्हणजे कुद् आगम होतो, आणखी—

आणखी तें काय ?

जें दुसरें प्राप्त होतें तें.

ते दुसरें काय बरें प्राप्त होतें ?

फकाराला आयन् आदेश दुसरा प्राप्त होतो.

अशा रीतीनें सिद्ध होते हें खरें; पण सूत्रामध्यें फिरवाफिरव करावी लागते.

तर मग मूळचें आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण मागील शब्दाचा अंतावयव कुक् असा केला तर चार्मिकायणिः व वार्मिकायणिः येथें नकाराच्या लोपाचें विधान केलें पाहिजे असा दोष दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण सूत्रकारांनीं 'चर्मिवर्मिणोर्नलोपश्च' असें या बाकिनादि गणामध्यें सूत्र केलेंच आहे.

## कारिभ्य इञोऽगोत्रात्फिञ्विप्रतिषेधेन ॥ ४ ॥

कारिभ्य इञ्भवतीत्येतस्मादगोत्रात्फिञ्भवति विप्रतिषेधेन । कारिभ्य इञ्भवतीत्यस्यावकाशः। आयस्कारिः लौहकारिः । फिञोऽवकाशः । तापसायनिः सांमितिकायनिः । इहोभयं प्राप्नोति । नापितायनिः । फिञ्भवति विप्रतिषेधेन ॥

## [पुत्रान्तादन्यतरस्याम् ॥ ४ । १ । १५९ ॥

## प्राचामवृद्धात् फिन् बहुलम् ॥ ४ । १ । १६० ॥]

(वा. ४) शिल्पिवाचक शब्दाहून सांगितलेल्या इञ् प्रत्ययापेक्षां (४।१।१५३) गोत्रप्रत्ययान्तभिन्न वृद्धसंज्ञक शब्दाहून सांगितलेला फिञ् प्रत्यय (४।१।१५७) विप्रतिषेधानें पूर्वी होतो. शिल्पिवाचक शब्दाहून सांगितलेल्या इञ् प्रत्ययाला आयस्कारिः व लौहकारिः येथें अवकाश आहे. तसेंच तापसायनिः व सांमितिकायनिः येथें फिञ् प्रत्ययाला अवकाश आहे. पण नापितायनिः येथे दोघांची प्राप्ति येते. तेथें विप्रतिषेधानें परत्वास्तव फिञ् प्रत्यय होतो.

(सू. १६१ श्लो. १) मनु शब्दाहून अपत्य या अर्थी सामान्यतः सांगितलेला अण् प्रत्यय (४।१।८३) होतो, परंतु तें अपत्य कुत्सित व मूढ असेल तर. शिवाय मनु शब्दांतील नकाराला णकार होतो त्यामुळें माणव

१-- (सू. १५९) पुत्र शब्दान्त जें वृद्धसंज्ञक प्रातिपदिक त्याहून अपत्य अर्थी उत्तर दिशेकडील आचार्यांच्या मतानें फिञ् प्रत्यय होतो; आणि तो फिञ् प्रत्यय केल्यानंतर पूर्वीच्या पुत्रशब्दान्त प्रातिपदिकाला कुक् आगम विकल्पानें होतो. उदा०-- गार्गीपुत्रकायणिः गार्गीपुत्रायणिः. इतर आचार्यांच्या मतानें गार्गीपुत्रिः.

१-- (सू. १६०) वृद्धसंज्ञक-भिन्न जें प्रातिपदिक त्याहून अपत्य या अर्थी फिन् प्रत्यय पूर्वेकडील आचार्यांच्या मतानें बाहुलत्येंकरून होतो. उदा०-- ग्लुचुकायनिः.

## मनोर्जातावञ्यतौ षुक् च ॥ ४ । १ । १६१ ॥

अपत्ये कुत्सिते मूढे मनोरौत्सर्गिकः स्मृतः ।

नकारस्य च मूर्धन्यस्तेन सिध्यति माणवः ॥ १ ॥

यदि षुक्पूर्वान्तः क्रियते मानुषाः बहुषु लोपः प्राप्नोति । मानुषाणां संघः संघाङ्कलक्षणेष्वञ्यञिञामण् [४.३.१२७] इत्यण्प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि परादिः । यदि परादिर्मानुषी अञन्तादितीकारो न प्राप्नोति॥ अस्तु तर्हि पूर्वान्त एव । कथं मानुषाः

शब्द सिद्ध होतो.

आतां येथें जर हा षुक् आगम मनु शब्दाचा अन्तावयव केला आहे तर बहुत्वविवक्षा असतांना मानुषाः येथें अण् प्रत्ययाचा लुक् (२।४।६४) प्राप्त होतो.

तसेंच, मानुषाणां संघः येथें संघाङ्कलक्षणेष्वञ्यञिञामण् (४।३।१२७) या सूत्रानें अञ्-प्रत्ययान्ताहून सांगितलेला अण् प्रत्ययही होऊं लागेल.

तर मग येथें षकार हा प्रत्ययाचा आद्यावयवच असूं दे.

पण जर प्रत्ययाचा आद्यावयव केला तर अञ्-प्रत्ययान्ताहून सांगितलेला ईकार (४।१।७३) प्राप्त होत नाहीं.

तर मग षुक् असा मनु शब्दाचा अंतावयवच असूं दे.

१ -- (सू. १६२) मनु शब्दाहून अपत्य या अर्थी अञ् व यत् हे प्रत्यय होतात. आणि त्यांच्या बरोबर मनु शब्दाला षुक् आगम होतो. त्या प्रत्ययान्त शब्दापासून एक प्रकारच्या जातीचा बोध होत असला पाहिजे. उदा०-- मानुषः, मनुष्यः.

२-- विहित कर्म न करणारा व निषिद्ध कर्म करणारा तो कुत्सित होय. ज्याला विद्या नाहीं तो मूढ होय.

३-- म्हणजे षञ् आणि ष्यत् असेच प्रत्यय सांगावे.

मानुषाणां संघ इति । उभयत्र लौकिकस्य गोत्रस्य ग्रहणं न चैतल्लौकिकं गोत्रम् ॥ किं तर्हि । जातिः ॥ इह तर्हि मानुष्यकमिति हलस्तद्धितस्येति लोपः प्राप्नोति । परादावप्येष दोषः । यद्धि तद्धलस्तद्धितस्येति हल्ग्रहणं न तदङ्गविशेषणं शक्यं विज्ञातुम् । इह हि दोषः स्यात् । वृकाट्टेण्यण् [ ५.३ ११५ ] वार्केणीति । तस्मादुभाभ्यामेव वक्तव्यं प्रकृत्याके राजन्यमनुष्ययुवान इति ॥

## अपत्यं पौत्रप्रभृति गोत्रम्

॥ ४ । १ । १६२ ॥

पौत्रप्रभृतेर्गोत्रसंज्ञायां यस्यापत्यं तस्य पौत्रप्रभृतिसंज्ञाकरणम् ॥ १ ॥

पौत्रप्रभृतेर्गोत्रसंज्ञायां यस्यापत्यविवक्षा तस्य पौत्रप्रभृतेर्गोत्रसंज्ञा भवतीति वक्तव्यम् । गर्गोऽपि हि कंचित्प्रति पौत्रः कुशिकोऽपि तत्र मा भूदिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । समर्थानां प्रथमाद्वा [ ४.१.८२ ] इति वर्तते । समर्थानां प्रथमस्य यदपत्यं पौत्रप्रभृतीति विज्ञायते॥

---

पण लुक् केला तर मानुषाः येथें लुक आणि मानुषाणां संघः येथें अण् कां होत नाही ?

दोन्ही ठिकाणीं लौकिक गोत्राचें ग्रहण केलें आहे. आणि येथें तर मानुष शब्दापासून लौकिक गोत्राची प्रतीति होत नाही.

तर मग त्या मानुष शब्दापासून कशाची प्रतीति होत आहे ?

जातीची प्रतीति होत आहे.

तर मग आतां मानुष्यकम् येथें हलस्तद्धितस्य ( ६।४।१५० ) याच्या पुढील 'आपत्यस्य०' या सूत्रानें यकाराचा लोप होऊं लागेल हा दोष येतो.

प्रत्ययाचा आद्यावयव केला तरी हा दोष आहेच. कारण हलस्तद्धितस्य येथें 'हल्' हें अंगाचें विशेषण करून हलन्त अंग असा अर्थ करणें शक्य नाहीं. तसा अर्थ केला तर वृक शब्दाहून टेण्यण् ( ५।४।११५ ) करून पुढें स्त्रीत्वाची विवक्षा असतांना वार्केणी असें रूप होतें तेथें दोष येईल. तेव्हां येथें हा आगम पूर्वीचा अन्तावयव घेणारे असोत किंवा प्रत्ययाचा आद्यावयव घेणारे असोत दोघां नाही मानुष्यकम् येथें यकाराचा लोप न होण्याकरित 'प्रकृत्याऽके राजन्यमनुष्ययुवानः' ( ६।४।१६३ वा. ३ ) असें वचन करणे जरूर आहे.

( सू. १६२ वा. १ ) ही जी येथें पौत्र वगैरे अपत्यांना गोत्र संज्ञा सांगितली आहे ती गोत्र संज्ञा तें ज्याचें अपत्य अशी विवक्षा असेल त्याच्यामुळेच त्याच्या पौत्र वगैरेंना होते असें म्हणावें. नाहीं तर मूळ पुरुष म्हणून गृहीत धरलेला जो गर्ग तसाच कुशिक तो देखील कोणाचा तरी पौत्र असणारच. म्हणून त्यालाही ही गोत्र संज्ञा होऊं लागेल; पण ती न झाली पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण 'समर्थानां प्रथमाद्वा' ( ४।१।८२ ) अशी येथें अनुवृत्ति आहे. तेव्हां समर्थांमध्ये जो प्रथम उच्चारित त्याचें जें पौत्र वगैरे अपत्य त्याला त्याचें गोत्र म्हणावे, असा अर्थ येथें समजला जातो.

---

४—तर हलः हें यकाराचेंच विशेषण केलें पाहिजे.

१– ( सू. १६२ ) पुत्राचा मुलगा तो पौत्र होय. पौत्र, प्रपौत्र वगैरे अपत्यांना गोत्र अशी संज्ञा होते. फक्त साक्षात् अपत्याला ही शास्त्रीय गोत्र संज्ञा नाहीं, त्यामुळें गोत्र या अर्थी सांगितलेले प्रत्यय ( ४ । १ । ९८ ) साक्षात् अपत्य या अर्थी होत नाहीत. अपत्य या अर्थी सांगितलेले प्रत्यय मात्र संज्ञा असो अथवा नसो त्या अपत्य या अर्थी होतात.

## जीवद्वंश्यं च कुत्सितम् ॥२॥

जीवद्वंश्यं च कुत्सितं गोत्रसंज्ञं भवतीति वक्तव्यम् । गार्ग्यस्त्वमसि जाल्म । वात्स्यस्त्वमसि जाल्म ॥ का पुनरपि कुत्सा । पितृतो लोके व्यपदेशवतास्वतन्त्रेण भवितव्यम् । य इदानीं पितृमान्स्वतन्त्रो भवति स उच्यते गार्ग्यस्त्वमसि जाल्म न त्वं पितृतो व्यपदेशमर्हसि ॥

## जीवति तु वंश्ये युवा ॥ ४ । १ । १६३ ॥

जीवति तु वंश्ये [युवे]ति

## पौत्रप्रभृत्यपेक्षं च ॥१॥

जीवति तु वंश्ये युवेति पौत्रप्रभृत्यपेक्षं चेति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । पौत्रप्रभृतीति वर्तते । एवं तर्ह्यन्वाचष्टे पौत्रप्रभृतीति वर्तते इति । किमेतस्यान्वाख्याने प्रयोजनम् ।

## तच्च दैवदत्त्यर्थम् ॥२॥

देवदत्तस्यापत्यं दैवदत्तिरिति । अनन्तरं यदपत्यं तस्य युवसंज्ञा मा भूदिति ॥ देवदत्तस्य तर्हि पौत्रे युवसंज्ञा प्राप्नोति । एतदपि पौत्रप्रभृति भवति ॥ न पौत्रप्रभृतीत्यनेनापत्यमभिसंबध्यते पौत्र-

---

(वा. २) प्रपौत्र वगैरे अपत्याला त्या अपत्याचा पिता वगैरे कोणी वडील पुरुष जिवंत असल्यास गोत्र संज्ञेचा बाध करून जी युवसंज्ञा पुढील सूत्रानें सांगितली आहे तेथें तें अपत्य जर कुत्सित असें विवक्षित असेल तर त्याला युवसंज्ञा न होतां गोत्रसंज्ञाच होते असें म्हणावें. उदा०—गार्ग्यस्त्वमसि जाल्म, वात्स्यस्त्वमसि जाल्म.

येथे त्या अपत्याची कुत्सा म्ह. निन्दा कशी बरें होते ?

हा पुरुष अमक्याचा मुलगा, अमक्याचा नातू असा लोकांमध्यें व्यवहार ज्या पुरुषाला केला जातो तो पुरुष त्या पित्याच्या किंवा पितामहाच्या अधीन असतो, म्हणजे त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागतो असें गम्यमान होतें. आतां जो पुरुष त्याचा वडील माणूस जिवंत असूनही त्याच्या अधीन असत नाहीं त्याला उद्देशून गार्ग्यस्त्वमसि जाल्म असें म्हटलें जातें. 'तुला गर्गाचें अपत्य म्हणणें शोभत नाहीं' असें या वाक्याचें तात्पर्य आहे.

(सू. १६३ वा. १) वंशांतील पिता वगैरे वडील माणूस जिवंत असतांना सांगितलेली ही युवसंज्ञा पौत्र प्रभृतींच्या अपत्याला होते असें म्हणावें.[1]

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण 'पौत्रप्रभृति' या पदाची अनुवृत्तीच येत आहे.

तर मग 'पौत्रप्रभृत्यपेक्षम्' असें जें वार्तिककारांनीं येथे म्हटलें आहे त्याचा अर्थही पौत्रप्रभृति या पदाची अनुवृत्ति येथें येते असाच समजावा.[3]

पण पौत्रप्रभृति या पदाचा संबंध येथें कशाकरितां केला पाहिजे ?

(वा. २) देवदत्तस्य अपत्यं दैवदत्तिः येथें देवदत्ताचें जें साक्षात् अपत्य त्याला युवसंज्ञा न झाली पाहिजे.

तरी पण देवदत्ताच्या पौत्राला युवसंज्ञा प्राप्त होतेच. कारण पौत्रप्रभृतींमध्यें पौत्राचा संग्रह होणारच.

येथें पौत्रप्रभृति जें अपत्य असा पौत्र-

---

१-(सू. १६३) पौत्र वगैरेंचें जें प्रपौत्र वगैरे अपत्य त्याला गोत्र संज्ञा न होतां युव संज्ञा होते. परंतु त्या अपत्याचा त्याच्या वंशांतील पिता, पितामह, प्रपितामह यापैकीं कोणी वडील माणूस जिवंत असला पाहिजे.

२-- नाहीं तर पुत्राला व पौत्रालाही होऊं लागेल.

३—येथें पौत्रप्रभृति असें नवीन पद घालावें असा वार्तिककारांचा अभिप्राय समजूं नये.

प्रभृति यदपत्यमिति । किं तर्हि । वंश्योऽभिसंबध्यते पौत्रप्रभृतिर्वंश्ये जीवति यदपत्यमिति ॥ एवमपि देवदत्तस्य द्वौ पुत्रौ तयोः कनीयसि युवसंज्ञा प्राप्नोति भ्रातरि च ज्यायसि [ ४. १. १६४ ] इति ॥ एवं तर्ह्यपत्यमेवाभिसंबध्यते न तु पौत्रप्रभृतिसमानाधिकरणमपत्यम् । नैवं विज्ञायते पौत्रप्रभृति यदपत्यमिति । कथं तर्हि । पौत्रप्रभृतेर्यदपत्यमिति ॥

वृद्धस्य च पूजायाम् ॥ ३॥

वृद्धस्य च पूजायां युवसंज्ञा वक्तव्या । तत्रभवन्तो गार्ग्यायणाः । तत्रभवन्तो वात्स्यायनाः ॥ का पुनरिह पूजा । युवत्वं लोके ईप्सितं पूजेत्युपचर्यते । तत्रभवन्तो युवत्वेनोपचर्यमाणाः प्रीता भवन्ति ॥

आपत्यो वा गोत्रम् ॥४॥

अथवापत्यो गोत्रसंज्ञो भवतीति वक्तव्यम् ॥

परमप्रकृतेश्चापत्यः ॥५॥

परमप्रकृतेश्चापत्यो भवतीति वक्तव्यम् ॥

आपत्याज्जीवद्वंश्यात्स्वार्थे द्वितीयो युवसंज्ञः ॥६॥

आपत्याज्जीवद्वंश्यात्स्वार्थे द्वितीयः प्रत्ययो वक्तव्यो युवसंज्ञश्च भवतीति वक्तव्यम् ॥

स चास्त्रियाम् ॥७॥

स चास्त्रियां भवतीति वक्तव्यम् ॥

एकोगोत्रग्रहणानर्थक्यं च ॥८॥

एवं च कृत्वैकोगोत्रग्रहणमनर्थकं भवति ॥

---

प्रभृति याचा अपत्याकडे संबंध करूं नये.

तर मग त्याचा कोणीकडे संबंध करावयाचा?

वंशाकडे संबंध करावयाचा. पौत्रप्रभृति जो वंशांतील पुरुष तो जिवंत असतांना अपत्याला युवसंज्ञा होते असा त्याचा अर्थ होतो.

तरी पण पुढील दोष येतोच. देवदत्ताला दोन पुत्र आहेत त्यांपैकीं थोरला जिवंत असतांना धाकट्या पुत्राला 'भ्रातरि च ज्यायसि' या पुढील सूत्रानें युवसंज्ञा प्राप्त होते.

तर मग आतां पौत्रप्रभृति याचा अपत्याकडेच संबंध करावयाचा, परंतु 'पौत्रप्रभृति जें अपत्य' असा सामानाधिकरण्यानें संबंध करावयाचा नाहीं.

मग कसा करावयाचा?

पौत्रप्रभृतीचें जें अपत्य असा वैयधिकरण्यानें संबंध करावयाचा.

(वा.३) प्रशंसा विवक्षित असेल तर गोत्रापत्याला युवसंज्ञा होते असें म्हणावें. उदा० तत्रभवन्तो गार्ग्यायणाः, तत्रभवन्तो वात्स्यायनाः.

पण येथें गोत्रापत्याची प्रशंसा कशी बरें होते ?

लोकांमध्यें युवत्वाची इच्छा केली जाते. तेव्हां युवा म्हणणें हीच येथें प्रशंसा होय. तेव्हां सद्वर्तनी अशा गर्गाच्या गोत्रापत्यांना ते वस्तुतः तरुण नसून त्यांना तरुण म्हणणें हीच त्यांची प्रशंसा येथें समजावी.

( वा. ४ ) साक्षात् किंवा परंपरेनें अपत्याचें जें अपत्य ते आपत्य होय, त्याला गोत्र म्हणतात.

(वा.५) त्या गोत्र या अर्थी मूळ प्रकृतीहूनच एकदम प्रत्यय होतो असें म्हणावें.

( वा. ६ ) जीवद्वंश्य वगैरे निमित्तानें युवसंज्ञा होत असेल तेथें अपत्याचें अपत्य अशा त्या अर्थी एकदम केलेल्या प्रत्ययाच्या पुढें युवसंज्ञक दुसरा प्रत्यय स्वार्थींच होतो असें म्हणावें.

( वा. ७ ) तो स्वार्थी प्रत्यय स्त्रीत्व-विवक्षा असतांना मात्र होत नाहीं असें म्हणावें.

( वा. ८ ) असें केलें म्हणजे एको गोत्रे ( ४।१।९४ ) हें सूत्र करावयासच नको.

---

४—तरुणाला युवा म्हणतात. येथें युवसंज्ञाही अन्वर्थ आहे.

## बहुवचनलोपिषु च सिद्धम् ॥९॥

बहुवचनलोपिषु च सिद्धं भवति। तत्र बिदानामपत्यं माणवक इति विगृह्य बिदशब्दाद् द्व्येकयोरुत्पत्तिर्भविष्यति। बैदः बैदौ। बैदस्यापत्यं बहवो माणवका इति विगृह्य बिदशब्दाद्बहुषूत्पत्तिर्भविष्यति। बिदा इति ॥

## [भ्रातरि च ज्यायसि ॥४।१।१६४॥]

## वान्यस्मिन्सपिण्डे स्थविरतरे जीवति ॥४।१।१६५॥

अन्यग्रहणं किमर्थम्। भ्रातरीति वर्तते सपिण्डमात्रे यथा स्यात् ॥ अथ स्थविरतरग्रहणं किमर्थम्। उभयतो विशिष्टे यथा स्यात्स्थानतो वयस्तश्च ॥ अथ जीवतीति वर्तमाने पुनर्जीवतिग्रहणं किमर्थम्। जीवतो जीवति यथा स्यान्मृते मा भूत्। मृते हि गार्ग्यो मृत इत्येव भवितव्यम् ॥

अथ गोत्रयूनोः समावेशो भवत्युताहो

---

(वा.९) बहुत गोत्रापत्यें या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा जेथें लोप होतो तेथेंही जशा रीतीनें सिद्ध होतें. तें असें- 'बिदस्य गोत्रापत्यानि बिदाः। बिदानामपत्यं माणवकः' असा विग्रह केला असतां तेथें तो माणवक एक असो किंवा दोन असोत मूळ बिद शब्दाहूनच एकदम प्रत्यय होऊन बैदः बैदौ अशीं रूपें होतील. आणि 'बिदस्य गोत्रापत्यं बैदः बैदस्यापत्यानि बहवो माणवकाः' असा विग्रह केला असतां तेथें मूळ बिद शब्दाहून बहुत अपत्यें या अर्थी एकदम प्रत्यय होऊन बिदाः असें रूप होईल.

(सू. १६५) येथें अन्य शब्द कशाकरितां घातला आहे?

अशाकरितां घातला आहे कीं मागें भ्रातरि असें म्हटलें आहे. आणि ह्या सूत्रानें युवसंज्ञा तर फक्त सपिण्ड जिवत असला तरी झाली पाहिजे.

आतां येथें स्थविरतरे असें कशाकरितां म्हटलें आहे?

मानानें व वयानें अशा दोन्ही बाजूंनीं जो मोठा सपिण्ड पुरुष त्याचा बोध झाला पाहिजे म्हणून म्हटलें आहे.

आतां जीवति असें मागून अनुवृत्त येत असतांना पुनः येथें जीवति असें कशाकरितां म्हटलें आहे?

इतर सपिण्ड पुरुष जिवंत असला तरी ज्या अपत्याला युवसंज्ञा करावयाची तें अपत्य जिवंत असेल तरच त्याला युवसंज्ञा झाली पाहिजे. तें अपत्य जर मृत असेल तर त्याला युवसंज्ञा न झाली पाहिजे. जर तें अपत्य मृत असेल तर गार्ग्यो मृतः असाच प्रयोग झाला पाहिजे.

आतां येथें गोत्रसंज्ञा आणि युवसंज्ञा यांचा

---

५—अविरविकन्यायानें हें सिद्ध होतें (४।१।८९ टीप १२ पहा.)

१—(सू. १६४) पौत्र वगैरेंचें जें प्रपौत्र वगैरे अपत्य त्याला गोत्रसंज्ञा न होतां युवसंज्ञा होते परंतु त्या अपत्याचा थोरला भाऊ जिवंत असला पाहिजे.

१—(सू. १६५) पौत्र वगैरेंचें जें प्रपौत्र वगैरे अपत्य त्याला गोत्र संज्ञा न होतां युवसंज्ञा विकल्पानें होते परंतु त्या अपत्याचा पिता वगैरे वंश्य व थोरला भाऊ जिवंत नसून दुसरा मानानें व वयानें मोठा असा चुलता वगैरे कोणी तरी सपिण्ड मनुष्य जिवंत असला पाहिजे; आणि ज्या अपत्याला युव संज्ञा करावयाची तें अपत्यही जिवन्त असलें पाहिजे.

२—भ्रातरि याचा येथें संबंध होऊं नये याकरितां अन्य हें पद घातलें आहे. नाहीं तर भ्राता जिवंत असून आणखी दुसरा सपिंड जिवंत असेल तर तेथेंच युव संज्ञा विकल्पानें होईल.

३—नाहीं तर ज्यायसि याची अनुवृत्ति येऊन फक्त वयानें मोठा एवढाच अर्थ होईल.

४—युव संज्ञा झाली असती तर गार्ग्यायण शब्दाचा प्रयोग त्याच अर्थी झाला असता.

न । किं च प्राप्नोति । बाढं प्राप्नोति न ह्ययमेकसंज्ञाधिकारः । किं चातः ।

**गोत्रयूनोः समावेशे को दोषस्तत्कृतं भवेत् ।**

गोत्रयूनोः समावेशे को दोषः । तत्कृतं प्राप्नोति । गोत्राश्रया विधयो यून्यपि प्राप्नुवन्ति । यास्कायनयः लाह्यायनयः । यस्कादिभ्यो गोत्रे [ २.४.६३ ] इति लुक्प्राप्नोति॥

**यस्कादिषु न दोषोऽस्ति न यूनीत्यनुवर्तनात् ॥ १ ॥**

यस्कादिषु न दोषः । किं कारणम् । न यूनीत्यनुवर्तनात् । न यूनीति तत्रानुवर्तते । क प्रकृतम् । न तौल्वलिभ्यः [ २.४.६१ ] इति ॥

**दोषोऽत्रिबिदपञ्चाला न यूनीत्यनुवर्तनात् ।**

यदि न यूनीत्यनुवर्तते अत्रयः बिदाः पञ्चाला माणवका इति न सिध्यति ॥ नैष दोषः । संबन्धमनुवर्तिष्यते । न तौल्वलिभ्यः । तद्राजस्य बहुषु तेनैवास्त्रियां लुग्भवति तौल्वलिभ्यो यूनि न । यस्कादिभ्यो गोत्रे लुग्भवति यूनि न । तौल्वलिभ्य

---

समावेश होतो किंवा युवसंज्ञा होईल तेथें तिनें गोत्रसंज्ञेचा बाध होतो ?

पण येथें वस्तुतः कसें बरें असावें ?

खात्रीनें समावेशच झाला पाहिजे. कारण येथें एकच संज्ञा व्हावी(१।४।१) असा अधिकार नाहीं. मग तसा—

( श्लो.१ ) गोत्रसंज्ञा आणि युवसंज्ञा यांचा समावेश झाला तर दोष कोणता ?

युवसंज्ञा झाली असता तेथें गोत्रसंज्ञेचें कार्य म्हणजे गोत्रसंज्ञेमुळें होणारे विधी होऊं लागतील. ते असे कीं–यास्कायनयः व लाह्यायनयः येथें यस्कादिभ्यो गोत्रे ( २।४।६३ ) यानें लुक् होऊं लागेल.

यस्कादि गणांतील शब्दांसंबंधानें दोष मुळींच येणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं तेथें 'न यूनि' या पदांची अनुवृत्ति येत आहे.

'न यूनि' अशीं पदें मागें कोठें बरें आहेत ?

' न तौल्वलिभ्यः (२।४।६१) येथें आहेत.

(श्लो. २) जर ' न यूनि ' अशी अनुवृत्ति पुढें चालू होईल तर अत्रयः, बिदाः, पञ्चालाः येथें लुक् होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. अनुवृत्ति केली तरी ती संबंधासहित अनुवृत्ति होईल. ती अशी — न तौल्वलिभ्यः ( २।४।६१ ) येथें 'तौल्वलिभ्यः ' याचा संबंध ' न यूनि ' याच्याकडे झाला आहे. तशीच पुढें अनुवृत्ति होते. तद्राजस्य बहुषु तेनैवास्त्रियाम् ( २।४।६२ ) ' तद्राज प्रत्ययाचा लुक होतो ' असा या सूत्राचा एक वाक्यार्थ झाल्यानंतर ' युवापत्य अर्थी प्रत्यय केला असतां लुक् होत नाहीं '

---

५—यस्क शब्दाहून गोत्रापत्य अर्थी अण् प्रत्यय ( ४।१।११२ ) व त्याच्यापुढें युवापत्य अर्थी फिञ् प्रत्यय ( ४।१।१५६ ) झाला आहे, त्याचा लुक् होऊं लागेल.

६—' ण्यक्षत्रिया० ' या सूत्रांतून ( २।४।५७ ) ' न तौल्वलिभ्यः ' येथें यूनि अशी अनुवृत्ति आहे. तेव्हां तेथें युवापत्य या अर्थी झालेल्या प्रत्ययाचा लुक् होत नाहीं असा अर्थ आहे. तशीच अनुवृत्ति येथें आणून युवापत्य अर्थी प्रत्यय केला असतां लुक् होत नाहीं असा निराळा वाक्यार्थ करून लुकाचा निषेध करावा.

७—अत्रि शब्दाहून गोत्रापत्य या अर्थी ढक् (४।१।१२२), बिद शब्दाहून अञ् (४।१।१०४) आणि पञ्चाल शब्दाहून 'जनपदशब्दात्' ( ४।१।१६८ ) यानें अञ्, या तिन्ही ठिकाणीं पुढें बहुत युवापत्यें या अर्थी इञ् (४।१।९५) प्रत्यय केला असतां त्या इञ् प्रत्ययाचा लुक् (२।४।५८) झाल्यानंतर मागील ढक व अञ् या प्रत्ययांचा लुक् (२।४।६४, ६५) होतो तो होणार नाहीं.

इति निवृत्तम् । यञञोश्च अत्रिभृगुकुत्सवसिष्ठगोतमाङ्गिरोभ्यश्च लुग्भवति । यूनि नेत्यपि निवृत्तम् ॥

इह तर्हि काण्व्यायनस्य छात्राः काण्व्यायनीयाः कण्वादिभ्यो गोत्रे [ ४.२.१११ ] इत्यण्प्राप्नोति ।

**कण्वादिषु न दोषोऽस्ति न यून्यस्ति ततः परम् ॥ २ ॥**

कण्वादिषु दोषो नास्ति । किं कारणम् । न यून्यस्ति ततः परम् । कण्वादिभ्यो यो विहितस्तदन्तात्प्रातिपदिकादणुच्यते यश्चात्र कण्वादिभ्यो विहितो न तदन्तं प्रातिपदिकं यदन्तं च प्रातिपदिकं नासौ कण्वादिभ्यः ॥

इह तर्ह्यौपगवस्यापत्यमौपगविरित्येको गोत्रे [ ४.१.९३ ] इत्येतस्मान्नियमात्प्रत्ययो न प्राप्नोति ।

**एको गोत्रे प्रतिपदं**

प्रतिपदमत्र प्रत्यया विधीयन्ते गोत्राद्यून्यस्त्रियाम् [ ९४ ] इति । तदन्तात्तर्ह्यनेकः

---

असा निराळा स्वतंत्रच वाक्यार्थ होतो. कारण तेथें 'न यूनि' एवढीच अनुवृत्ति आहे. तौल्वलिभ्यः याची अनुवृत्ति नाहीं. पुढें 'यञञोश्च' (२।४।६४) व 'अत्रिभृगुकुत्सवसिष्ठगोतमाङ्गिरोभ्यश्च' (२।४।६५) या दोन सूत्राचा 'लुक् होतो' असा एकच वाक्यार्थ आहे. कारण तेथे 'यूनि न' या पदांचीही अनुवृत्ति नाहीं.

तर मग आतां गोत्रसंज्ञा आणि युवसंज्ञा यांचा समावेश होईल तर काण्व्यायनीयाः येथें कण्वादिभ्यो गोत्रे (४।२।१११) यानें अण् होऊं लागेल असा दोष येतो

(श्लो. १) कण्व वगैरे शब्दांसंबंधानें दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं युवापत्य अर्थीं केलेला प्रत्यय हा त्या कण्व शब्दाच्या पुढें नाहीं. कण्व वगैरे शब्दांहून केलेला जो गोत्रापत्य अर्थाचा प्रत्यय तदन्त प्रातिपदिकाहून शैषिक अर्थीं अण् प्रत्यय त्यानें सांगितला आहे. आणि काण्व्यायनीयाः येथें कण्व शब्दाहून गोत्रापत्य अर्थीं जो यञ् प्रत्यय केला आहे तदन्त प्रातिपदिक काण्व्यायन हे नव्हे. आणि ज्या—फक्-प्रत्ययान्त काण्व्यायन या प्रातिपदिकाहून अण् प्रत्यय होईल असा दोष दाखविला तो फक् प्रत्यय कण्व याहून पुढें केलेला नव्हे.

तर मग त्या दोन संज्ञांचा जर समावेश होईल तर औपगवस्यापत्यमौपगविः येथें एको गोत्रे (४।१।९३) या नियमामुळें इञ् प्रत्यय होणार नाहीं.

एको गोत्रे असा जरी नियम आहे तरी युवसंज्ञा झाली असेल तेथें मुद्दाम विशेष रूपानें 'गोत्राद्यून्यस्त्रियाम्' (४।१।९४) यानें 'एको गोत्रे' याचा बाध करून प्रत्ययान्ताहून प्रत्यय करण्यास मोकळीक दिली आहे. —

असें असेल तर मग औपगवि याच्या पुढेंही अनेक प्रत्यय होऊं लागतील.

---

८—या वाक्यार्थाचा स्वतंत्र उपयोग नाहीं. फक्त पुढें येणाऱ्या कांहीं पदांची अनुवृत्ति होत आहे. म्हणून येथे अनुवृत्ति करून हा वाक्यार्थ केला आहे.

९—कण्व शब्दाहून गोत्रापत्य अर्थी यञ् (४।१।१०५), पुढें युवापत्य अर्थी फक् (४।१।१०१ व त्याच्या पुढें शैषिक अर्थी छ प्रत्यय (४।२।११४) होतो. त्या छ प्रत्ययाचा बाध करून अण् प्रत्यय होऊं लागेल.

१०—उपगु शब्दाहून गोत्रापत्य अर्थी अण् (४।१।९२) प्रत्यय करून पुढें युवापत्य अर्थी इञ् प्रत्यय (४।१।९५) केला आहे. जर युवापत्याला गोत्रसंज्ञा कायम असेल तर त्या गोत्रप्रत्ययाची विवक्षा असल्यामुळें 'एको गोत्रे' (४।१।९३) या नियमानें इञ् प्रत्यय होणार नाहीं.

प्रत्ययः प्राप्नोति ।

**गोत्राद्यूनि च तत्स्मरेत् ।**

गोत्राद्यून्यस्त्रियामिति तत्स्मरेत् । किम् । एक इत्येव ॥

गोत्रे तद्वल्लुगुक्तः स यून्यपि प्राप्नोति । अस्तु । पूनर्यूनि लुग्भविष्यति । नैवं शक्यम् । फक्फिञोर्दोषः स्यात् । शालङ्के-र्यूनश्छात्राः शालङ्काः । पैलस्य पैलीयाः । फक्फिञोरन्यतरस्याम् [ ४.१.९१ ] इत्यन्यतरस्यां श्रवणं प्रसज्येत । तस्माद्युवसंज्ञायां गोत्रसंज्ञायाः प्रतिषेधो वक्तव्यः ॥ न वक्तव्यः । तुर्नियामकः । तुः क्रियते स नियामको भविष्यति । जीवति तु वंश्ये ऽपत्यं युवसंज्ञमेव भवतीति ॥

यदि तर्हि युवसंज्ञायां गोत्रसंज्ञा न भवति य इष्यन्ते यूनि गोत्राश्रया विधयस्ते

---

गोत्राद्यून्यस्त्रियाम् यानेंही पण तसेंच सांगितलें आहे.

तसें म्हणजे कसें ?

'एको गोत्रे' याप्रमाणें 'गोत्राद्यून्य०' यानेंही एकच युवापत्य प्रत्यय करण्याबद्दल नियम केला आहे.

तर मग आतां युवापत्याला गोत्र संज्ञा असेल तर गोत्र प्रत्ययाच्या लुकाचा जो निषेध सांगितला आहे ( ४।१।८९ ) तो युवापत्य प्रत्ययाच्या लुकाविषयींही प्राप्त होतो.

प्राप्त होत असेल तर होऊं दे. 'यूनि लुक्' ( ४।१।९० ) यानें त्याचा बाध करून लुक् होईल.

असें करणें शक्य नाहीं. कारण फक् व फिञ् प्रत्यय जेथें असतील तेथें दोष येतो. युव-प्रत्ययान्त शालङ्कि शब्दाहून त्याचे शिष्य या अर्थी शैषिक अण् प्रत्यय होऊन शालङ्काः असें रूप होतें. तसेंच युव–प्रत्ययान्त पैल शब्दाहून त्याचे शिष्य या शैषिक अर्थी छ प्रत्यय होऊन पैलीयाः असें रूप होतें. तेथें फक् व फिञ् या युवापत्य प्रत्ययांचा लुक् 'फक्फिञो-रन्यतरस्याम्' ( ४।१।९१ ) यानें विकल्पानें होईल त्याणि त्यामुळें ते प्रत्यय एकदां तेथें राहतील. तेव्हा युव संज्ञेनें गोत्र संज्ञेचा बाध होतो असें येथें वचन करावयास पाहिजे.

तसें वचन करावयास नको कारण तु शब्द हा तसा नियम करील. 'जीवति तु वंश्ये युवा' या युवसंज्ञा सांगणाऱ्या सूत्रामध्यें जो 'तु' शब्द घातला आहे त्यावरून असा नियम होतो कीं–वंशांतील पुरुष जिवंत असतांना पौत्र वगैरेंच्या अपत्याला युव संज्ञाच होते म्हणजे गोत्र संज्ञा होत नाहीं.

आतां जर युव संज्ञा झाली असतां तेथें गोत्र संज्ञा होत नाहीं तर युवापत्य अर्थी प्रत्यय केला असतां तेथें जे गोत्र संज्ञेवर अव-लंबून होणारे विधी इष्ट आहेत ते सिद्ध

---

११—अत्रि शब्दाहून गोत्रापत्य अर्थी ढक् ( ४।१।१२२ ) व त्याचे पुढें युवापत्य अर्थी इञ् प्रत्यय झाल्यानंतर ( ४।१।९५ ) त्याचा जो लुक् होतो ( २।४।५८ ) त्याचा पुढें शैषिक प्रत्यय कर्तव्य असतांना निषेध होऊं लागेल.

१२—पैलादि गणामध्यें ( २।४।५९ ) शालङ्कि असा शब्द आहे तेथें गोत्रापत्य अर्थी इञ् प्रत्यय झाला आहे. त्यापुढें युवापत्य अर्थी केलेल्या फक् प्रत्ययाचा 'पैलादिभ्यश्च' यानें लुक् झाल्यानंतर युवप्रत्ययान्त शालङ्कि शब्द होतो. तसाच गोत्रापत्य अर्थी अण् प्रत्यय ( ४।१।११८ ) केलेला पैल शब्द आहे. त्याहून युवापत्य अर्थी केलेल्या फिञ् ( ४।१।१५६ ) प्रत्ययाचा 'पैलादिभ्यश्च' यानें लुक् झाल्यानंतर युवप्रत्ययान्त पैल शब्द होतो. युवापत्याला गोत्र संज्ञा नसल्यामुळें पैलादिभ्यश्च याचा 'गोत्रेऽलुगचि' हा निषेध होत नाहीं. म्हणून पुढें शैषिक प्रत्यय केला असतां एकच रूप होतें युवापत्याला गोत्र संज्ञा झाली तर आणि त्या वेळीं 'यूनि लुक्' यानें लुक् झाला तर फक् व फिञ् यांचा लुक् विकल्पानें होऊं लागेल हा दोष येतो.

न सिध्यन्ति । गार्ग्यायणानां समूहो गार्ग्यायणकम् । गार्ग्यायणानां किंचिद्गार्ग्यायणकम् । गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः । गोत्राश्रयो वुञ्न प्राप्नोति ॥ एवं तर्हि

राजन्याद् वुञ्मनुष्याच्च ज्ञापकं लौकिकं परम् ॥ ३ ॥

यदयं वुञ्विधौ राजन्यमनुष्ययोर्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो लौकिकं परं गोत्रग्रहणमिति । युवा च लोके गोत्रमित्युपचर्यते । किंगोत्रोऽसि माणवक । गार्ग्यायणः । किंगोत्रोऽसि माणवक । वात्स्यायनः ॥ यद्येतज्ज्ञाप्यत औपगवेर्यूनश्छात्त्रा औपगवीयाः इञो गोत्र इत्यणप्राप्नोति । सामूहिकेषु ज्ञापकम् । यदि सामूहिकेषु ज्ञापकं गार्ग्यायणानां किंचिद्गार्ग्यायणकम् गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः गोत्राश्रयो वुञ् न प्राप्नोति । वुञ्विधौ ज्ञापकम् । वुञ्विधावेतज्ज्ञापकम् । यदि वुञ्विधौ ज्ञापकं शालङ्केर्यूनश्छात्त्राः शालङ्काः इञो गोत्र इत्यण्न प्राप्नोति । अस्तु तर्ह्यविशेषेण । कथमौपगवेर्यूनश्छात्त्रा औपगवीयाः । इञो गोत्र इत्यण्प्राप्नोति । नैष दोषः । गोत्रेणात्रेञ् विशेषयिष्यामः । गोत्रे य इञ्विहित इति ॥

[वृद्धस्य च पूजायाम् ४।१।१६६॥

होणार नाहींत. गार्ग्यायणांनां समूहः गार्ग्यायणकम्, गार्ग्यायणानां किंचित् गार्ग्यायणकम् तसेंच गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः येथें गोत्र प्रत्ययाहून सांगितलेला वुञ् प्रत्यय (४।२। ३९, ४।३।१२६, ४।३।९९) प्राप्त होत नाहीं.

तर मग आतां—

राजन्य आणि मनुष्य या शब्दांहून जो वुञ् प्रत्यय (४।२।३९) सांगितला आहे त्यावरून 'अपत्य अधिकाराच्या पुढें लौकिक गोत्र घ्यावें' अशा अर्थाचें ज्ञापन होतें; आणि युवापत्य-प्रत्ययान्तापासून अपत्य अर्थाचा बोध होत असल्यामुळें त्याला गोत्र असें लोकांमध्यें म्हटलें जातें. असें पहा कीं 'हें माणवका, तुझें गोत्र काय?' या प्रश्नाचें उत्तर 'मी वात्स्यायन आहें' असें दुसरा देतो.

पण हें ज्ञापक घेतलें तर औपगवेश्छात्त्रा औपगवीयाः येथें युवापत्यार्थक औपगवि या इञ्–प्रत्ययान्ताला गोत्रापत्यार्थक इञ्-प्रत्ययान्ताहून सांगितलेला अण् प्रत्यय होऊं लागेल.

त्या ज्ञापकाचा उपयोग समूह या अर्थी प्रत्यय कर्तव्य असेल तरच करावा; अन्यत्र करू नये.

पण समूह या अर्थी प्रत्यय कर्तव्य असतांनाच या ज्ञापकाचा उपयोग करावयाचा असें असेल तर गार्ग्यायणानां किंचित् गार्ग्यायणकम् तसेंच गार्ग्यायणो भक्तिरस्य गार्ग्यायणकः येथें गोत्र–प्रत्ययान्ताहून सांगितलेला वुञ् प्रत्यय होणार नाहीं.

असें असेल तर वुञ् प्रत्यय करण्यापुरतेंच तें ज्ञापक समजावें.

जर तें ज्ञापक वुञ् प्रत्यय करण्यापुरतेंच घेतलें तर युवापत्यवाचक जो शालङ्कि शब्द त्याहून त्याचे छात्त्र या अर्थी गोत्रापत्यवाचक इञ्–प्रत्ययान्ताहून सांगितलेला शैषिक अण् प्रत्यय होणार नाहीं.

तर मग तें ज्ञापक मोघमच असूं दे.

पण तसें मोघम ज्ञापक घेतलें तर औपगवेश्छात्त्राः औपगवीयाः येथें औपगवि या युवापत्यार्थक-प्रत्ययान्ताहून छ प्रत्ययाचा बाध करून 'इञश्च' यानें अण् प्रत्यय होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'गोत्र या अर्थी केलेला जो इञ् प्रत्यय अशा अर्थाचें 'गोत्रे' हें इञ् प्रत्ययाचें विशेषण करतां येईल.

१३–मागें ४।१।९०।१. ११८ प. ८ पाहणे.

१—(सू. १६६) मागें (४।१।१६३ वा. १) पहा. हें वार्तिक तसेंच सू. १६२ वा. २ हीं दोन वार्तिकें सूत्रपाठामध्यें कोणीं तरी घातलीं आहेत.

यूनश्च कुत्सायाम् ॥ ४ । १ । १६७ ॥]

**जनपदशब्दात्क्षत्रियादञ् ॥ ४ । १ । १६८ ॥**

**क्षत्रियादेकराजात्संघप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

क्षत्रियादेकराजादिति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । संघप्रतिषेधार्थम् । संघान्मा भूत् । पञ्चालानामपत्यम् विदेहानामपत्यमिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । न ह्यन्तरेण बहुषु लुकं पञ्चाला इत्येतद्भवति । यस्तस्मादुत्पद्यते युवप्रत्ययः स स्यात् । युवप्रत्ययश्चेत्तस्य लुक्तस्मिंश्चालुग्भविष्यति ॥ इदं तर्हि क्षौद्रकाणामपत्यम् मालवानामपत्यमिति । अत्रापि क्षौद्रक्यः मालव्य इति नैतत्तेषां दासे वा भवति कर्मकरे वा । किं तर्हि । तेषामेव कस्मिंश्चित् । यावता तेषामेव कस्मिंश्चिद्यस्तस्मादुत्पद्यते युवप्रत्ययः स स्यात् । युवप्रत्ययश्चेत्तस्य लुक्तस्मिंश्चालुग्भविष्यति ॥

अथ क्षत्रियग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । विदेहो नाम ब्राह्मणस्तस्यापत्यं वैदेहिः ।

**क्षत्रियग्रहणानर्थक्यं चोक्तम् ॥ २ ॥**

---

( सू. १६८ वा. १ ) क्षत्रिय राजा जर एकच विवक्षित असेल तरच त्याहून प्रत्यय होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं, क्षत्रियांचा संघ असेल तेथें त्याहून प्रत्यय न झाला पाहिजे. उदा०– पञ्चालानामपत्यम् तसेंच विदेहानामपत्यम् या अर्थी अनेक पञ्चालवाचक तसेंच अनेक विदेहवाचक अशा पञ्चाल व विदेह शब्दांहून प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण पञ्चाल शब्दाहून बहुत गोत्रापत्यें या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् झाला म्हणजेच पञ्चाल शब्दाला बहुत पञ्चाल राजे असा अर्थ येणार, त्याहून जर हा प्रत्यय होईल तर तो युवापत्य अर्थींच होईल. आणि असा युवापत्य अर्थी प्रत्यय झाला तर त्याचा लुक् ( २।४।५८ ) होणारच. आणि पूर्वीच्या गोत्रापत्य अर्थी केलेल्या प्रत्ययाच्या लुकाचा निषेधच ( ४।१।८९ ) होणार.

तर मग क्षौद्रकाणामपत्यम् तसेंच मालवानामपत्यम् या अर्थी अनेक क्षौद्रक व अनेक मालव या अर्थाच्या क्षौद्रक व मालव शब्दांहून हा तद्राज प्रत्यय झाला पाहिजे.

येथें देखील क्षौद्रक्य व मालव्य असें कांहीं त्यांच्या नोकरचाकराला म्हणत नाहींत; तर त्यांच्या वंशांतीलच कोणत्या तरी पुरुषाला तसें म्हणता येतें. तेव्हां त्याहून हा तद्राज प्रत्यय होईल; तो युवापत्य अर्थींच होईल; आणि युवापत्य अर्थींच झाला तर पूर्वीप्रमाणें त्या प्रत्ययाचा लुक् व गोत्र प्रत्ययाचा अलुक् होणारच.

आतां या सूत्रामध्यें क्षत्रिय शब्द कशाकरितां घातला आहे ?

विदेह नांवाचा कोणी एक ब्राह्मण आहे. त्या विदेह शब्दाहून अपत्य अर्थी इञ् प्रत्यय ( ४।१।९५ ) होऊन वैदेहिः असेंच रूप होतें. तेथें हा अण् प्रत्यय न झाला पााहिजे.

( वा. २ ) येथें क्षत्रिय ग्रहण व्यर्थ आहे या-

---

१—( सू. १६७ ) मागें ( ४।१।१६२ वा २ ) पहा.

१—( सू. १६८ ) देशविशेषवाचक असा शब्द ज्या देशाच्या क्षत्रिय राजाला लागू पडतो त्याहून अपत्य या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०–पञ्चाल देशाच्या राजाला पञ्चाल म्हणतात. त्याचा पुत्र पाञ्चाल होय.

२—एकंदरींत बहुत पञ्चाल राजे या अर्थी पाञ्चाल असा शब्दच तयार होत नाहीं. आणि पाञ्चाल हा जो शब्द तयार होतो तो जनपद शब्द नव्हे.

३—आणि विदेह म्हणून एक प्रकारचा देशही आहे. तेव्हां विदेह हा जनपद शब्द आहे.

किमुक्तम् । एकं तावदुक्तं बाह्लादिप्रभृतिषु येषां दर्शनं गोत्रभावे लौकिके ततोऽन्यत्र तेषां प्रतिषेध इति । अपरमुक्तमनभिधानादिति ॥

क्षत्रियसमानशब्दाज्जनपदात्तस्य राजन्यपत्यवत् ॥ ३ ॥

क्षत्रियसमानशब्दाज्जनपदात्तस्य राजन्यपत्यवत्प्रत्यया भवन्तीति वक्तव्यम् । पञ्चालानां राजा पाञ्चालः ॥

पूरोरण्वक्तव्यः पौरवः ॥

पाण्डोर्ड्यण्वक्तव्यः । पाण्ड्यः ॥

[ साल्वेयगान्धारिभ्यां च ॥ ४ । १ । १६९ ॥ ]

द्व्यञ्मगधकलिङ्गसूरमसादण् ॥ ४ । १ । १७० ॥

अणो ञ्यङ्ण्येञो विप्रतिषेधेन ॥ १ ॥

अणो ञ्यङ् ण्य इञित्येते भवन्ति विप्रतिषेधेन । अणोऽवकाशः । आङ्गः वाङ्गः । ञ्यङोऽवकाशः । आम्बष्ठ्यः सौवीर्यः । इहोभयं प्राप्नोति । दार्व्यः ॥ ण्यस्यावकाशः । निचक नैचक्यः । अणः स एव । इहोभयं प्राप्नोति । नीप नैप्यः ॥ इञोऽवकाशः । आजमीढिः आजक्रन्दिः । अणः स एव । इहोभयं प्राप्नोति । बुध

---

संबंधानें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

एक तर ' बाह्लादिप्रभृतिषु येषां दर्शनं गोत्रभावे लौकिके ततोऽन्यत्र तेषा प्रतिषेधः ' ( ४।१।९६ वा. १ ) असें सांगितलें आहे; आणि दुसरें 'अनभिधानात्' (३।२।१ वा. ५) असें सांगितलें आहे.

( वा. ३ ) क्षत्रियविशेषवाचक शब्दाहून जे हे अपत्य अर्थी अण् वगैरे तद्राजसंज्ञक प्रत्यय सांगितले आहेत ते प्रत्यय, तोच शब्द देशविशेषवाचक घेतला असेल तेव्हां त्याहून ' त्याचा राजा ' या अर्थी होतात असें म्हणावें. उदा० पञ्चाल देशाचा राजा या अर्थी पञ्चालानां राजा पाञ्चालः असें होतें.

पूरोरण् वक्तव्यः म्हणजे देशविशेषवाचक पूरु शब्दाहून 'त्याचा राजा' या अर्थी अण् प्रत्यय होतो असें म्हणावें; उदा०पौरवः.

तसेंच पाण्डोर्ड्यण् वक्तव्यः म्हणजे देशविशेषवाचक पाण्डु शब्दाहून 'त्याचा राजा' या अर्थी ड्यण् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० पाण्ड्यः.

( सू. १७० वा. १ ) ह्या अण् प्रत्ययापेक्षां पुढील तीन सूत्रांनीं क्रमानें सांगितलेले ञ्यङ्, ण्य, आणि इञ् हे प्रत्यय विप्रतिषेधानें होतात. आङ्गः व वाङ्गः येथें ह्या अण् प्रत्ययाला अवकाश आहे व आम्बष्ठ्यः व सौवीर्यः येथें ञ्यङ् प्रत्ययाला अवकाश आहे. पण दार्वस्यापत्यं दार्व्यः येथें दोघांची प्राप्ति येते. तसेंच निचकस्यापत्यं नैचक्यः येथें ण्य प्रत्ययाला अवकाश आहे; अण् प्रत्ययाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण नीपस्यापत्यं नैप्यः येथें दोघांची प्राप्ति येते. तसेंच, आजमीढिः व आजक्रन्दिः येथें इञ् प्रत्ययाला अवकाश आहे; व अण् प्रत्ययाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण बुधस्यापत्यं बौधिः येथें दोघांची प्राप्ति येते.

---

१—( सू. १६९ ) साल्वेय आणि गान्धारि या दोन्ही शब्दांचे प्रत्येकी दोन अर्थ राजविशेष आणि देशविशेष असे आहेत. त्यापैकीं राजविशेषवाचक अशा त्या शब्दांहून अपत्य अर्थी अञ् प्रत्यय होतो. आणि देशविशेवाचक अशा त्या शब्दाहून त्याचा राजा या अर्थी अञ् प्रत्यय होतो. ञ्यङ् ( ४।१।१७१) प्रत्ययाचा हा अपवाद आहे. उदा०साल्वेयः; गान्धारः.

१—( सू. १७० ) दोन अच् ज्यामध्यें आहेत असे शब्द आणि मगध कलिङ्ग व सूरमस हे शब्द राजा या अर्थाचे घेतले तर त्याहून अपत्य अर्थी आणि देश अर्थाचे घेतले तर त्याहून त्याचा राजा या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा० आङ्गः, मागधः, कालिङ्गः, सौरमसः.

बौधिः ॥ ञ्यङ्ण्यञो भवन्ति विप्रतिषेधेन ॥

ञ्यङः कुरुनादिभ्यो ण्यः ॥ २ ॥

ञ्यङः कुरुनादिभ्यो ण्यो भवति विप्रतिषेधेन । ञ्यङोऽवकाशः । आवन्त्यः कौन्त्यः । ण्यस्य स एव । नैशो नाम जनपदस्तस्मादुभयं प्राप्नोति । ण्यो भवति विप्रतिषेधेन । नैश्यः ॥

[ वृद्धेत्कोसलाजादाञ्ञ्यङ् ॥ ४ । १ । १७१ ॥

कुरुनादिभ्यो ण्यः ॥ ४ । १ । १७२ ॥

साल्वावयवप्रत्यग्रथकलकूटाश्मकादिञ् ॥ ४ । १ । १७३ ॥

ते तद्राजाः ॥ ४ । १ । १७४ ]

कम्बोजाल्लुक् ॥ ४।१।१७५ ॥

कम्बोजादिभ्यो लुग्वचनं चोडाद्यर्थम् ॥ १ ॥

कम्बोजादिभ्यो लुग्वक्तव्यः । किं प्रयोजनम् । चोडाद्यर्थम् । चोडः कडेरः केरलः ।

[ स्त्रियामवन्तिकुन्तिकुरुभ्यश्च ॥ ४ । १ । १७६ ॥ ]

अतश्च ॥ ४ । १ । १७७ ॥

तेव्हां या सर्व ठिकाणीं ञ्यङ्, ण्य व इञ् हे प्रत्यय विप्रतिषेधानें होतात.

(वा. २) पुढील सूत्रानें सांगितलेल्या ञ्यङ् प्रत्ययाचा त्याच्या पुढील सूत्रानें सांगितलेल्या ण्य प्रत्ययानें बाध होतो:—आवन्त्यः कौन्त्यः येथें ञ्यङ् प्रत्ययाला अवकाश आहे; व ण्य प्रत्ययाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण जनपदवाचक नैश शब्दाहून दोघांची प्राप्त येते. तेथें ण्य प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. उदा० नैशस्य राजा नैश्यः.

(सू. १७५) ह्या सूत्रामध्यें एकटा कम्बोज शब्द उच्चारला आहे. तेथें 'कम्बोजादिभ्यः' असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं चोड वगैरे शब्दांच्या पुढील अञ् प्रत्ययाचा लुक् झाला पाहिजे. उदा०—चोडः, कडेरः, केरलः, शकः, यवनः.

---

१—(सू. १७१) वृद्धसंज्ञक शब्द, ह्रस्व इकारान्त शब्द आणि कोसल व अजाद हे शब्द राजवाचक घेतले तर त्याहून अपत्य अर्थी, आणि देशवाचक घेतले तर त्याचा राजा या अर्थी ञ्यङ् प्रत्यय होतो. उदा०—आम्बष्ठ्यः, आवन्त्यः, कौसल्यः, आजाद्यः.

१—(सू. १७२) कुरु शब्द आणि नकार वर्ण आदि असल शब्द, हे राजवाचक घेतले तर त्यांहून अपत्य अर्थी, आणि देशवाचक घेतले तर त्यांहून त्याचा राजा या अर्थी ण्य प्रत्यय होतो. उदा०—कौरव्यः, नैषध्यः.

१—(सू. १७३) साल्व देशांतील जे उदुम्बर वगैरे पोटदेश तद्वाचक जे शब्द आणि प्रत्यग्रथ, कलकूट, व अश्मक हे शब्द यांहून ते जर राजवाचक घेतले तर अपत्य अर्थी आणि देशवाचक घेतले तर त्याचा राजा याअर्थी इञ् प्रत्यय होतो. उदा०-औदुम्बरिः प्रात्यग्रथिः, कालकूटिः, आश्मकिः.

१—(सू. १७४) अञ् प्रत्ययाला (४।१।१६८) आरंभ करून इञ् (४।१।१७३) प्रत्ययापर्यंत जे प्रत्यय त्यांना तद्राज अशी संज्ञा होते. तद्राज संज्ञेमुळें बहुत्व-विवक्षा असताना लुक् (२।४।६२) होतो.

१—(१७५) जनपद शब्दात्० (४।१।१६८ या सूत्रानें कम्बोज वगैरे शब्दांहून केलेल्या अञ् प्रत्ययाचा लुक् होतो. उदा०—कम्बोजः, चोलः.

१—(सू. १७६) अवन्ति व कुन्ति या शब्दांच्या पुढील जो ञ्यङ् हा तद्राज प्रत्यय आणि कुरु शब्दाच्या पुढील जो ण्य हा तद्राज प्रत्यय त्याचा स्त्रीत्व-विवक्षा असतांना लुक् होतो. उदा०—अवन्ती, कुन्ती, कुरूः.

१—(सू. १७७) तद्राज संज्ञक जो 'अ' प्रत्यय त्याचा स्त्रीत्व-विवक्षा असतांना लुक् होतो. उदा० शूरसेनी.

इह कस्मान्न भवति । आम्बष्ठ्या सौवीर्या । अत इत्युच्यते न चैषोऽकारः । तदन्तविधिना प्राप्नोति ॥ अत उत्तरं पठति ।

अत इति तदन्ताग्रहणमवन्त्यादिभ्यो लुग्वचनात् ॥ १ ॥

अत इति तदन्तस्याग्रहणम् । किं कारणम् । अवन्त्यादिभ्यो लुग्वचनात् । यदयमवन्त्यादिभ्यो लुकं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो नात्र तदन्तविधिर्भवतीति ॥

पर्श्वादिभ्यो लुग्वक्तव्यः । पर्शूः रक्षाः असुरी ।

यौधेयादिप्रतिषेधो ज्ञापकः पर्श्वादिलुकः ॥ २ ॥

यदयं न प्राच्यभर्गादियौधेयादिभ्यः [ ४. १. १७८ ] इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवति पर्श्वादिभ्यो लुगिति ॥

[ न प्राच्यभर्गादियौधेयादिभ्यः ॥ ४ । १ । १७८ ॥ ]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये चतुर्थस्याध्यायस्य प्रथमे पादे चतुर्थमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

( सू. १७७ ) आम्बष्ठ्या व सौवीर्या येथें ञ्यङ् प्रत्ययाचा ( ४।१।१७१ ) ह्या प्रस्तुत सूत्रानें लुक् कां होत नाहीं ?

सूत्रामध्यें अतः असें म्हटलें आहे. आणि येथें तर अ एवढाच प्रत्यय नाहीं; तर य प्रत्यय आहे.

पण तदन्तविधि ( १।१।७२ ) होऊन अकारान्ताचा लुक् प्राप्त होतो ना ?

हें मनांत आणून वार्तिककार म्हणतात—

( वा. १ ) सूत्रामध्यें अतः या शब्दानें अकारान्ताचें ग्रहण करावयाचें नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं पूर्व सूत्रानें अवन्ति वगैरे शब्दांच्या पुढील अकारान्त प्रत्ययाचा जो आचार्योंनीं लुक् सांगितला आहे त्यावरून त्यांनीं असें सुचविलें आहे कीं अतश्च या सूत्रामध्यें तदन्तविधि होत नाहीं.

पर्श्वादिभ्यो लुग्वक्तव्यः म्हणजे पर्शू वगैरे जे पर्श्वादि गणांतील शब्द त्यांच्या पुढील तद्राजसंज्ञक अण् प्रत्ययाचा ( ५।३।११७ ) लुक् होतो असें म्हणावें. उदा-पर्शूः, रक्षाः, असुरी.

( वा. २ ) यौधेयादि गणांतील शब्दांच्या पुढील तद्राज-संज्ञक अण् प्रत्ययाच्या (५।३।११७ ) लुकाचा जो 'न प्राच्यभर्गादियौधेयादिभ्यः' या पुढील सूत्रानें आचार्योंनीं निषेध केला आहे, त्यावरून त्यांनीं असें सुचविलें आहे कीं पर्शू वगैरे शब्दांच्या पुढील स्वार्थिक तद्राज प्रत्ययाचाही यानें लुक् होतो.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या चवथ्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील चवथें आन्हिक समाप्त झालें व पादही समाप्त झाला.

---

१ ह्या अपत्यप्रत्यय प्रकरणांत तद्राज प्रत्यय ( ४।१।१६८ ) आहेत, आणि स्वार्थिकप्रत्यय प्रकरणांत तद्राज प्रत्यय ( ५।३।११२ ) आहेत. तसेंच तद्राज प्रत्ययाचा लुकही ( ४।१।१७४ ) ह्या अपत्यप्रत्यय प्रकरणांत सांगितला आहे, आणि दुसऱ्या अध्यायांतही ( २।४।६२) सांगितला आहे. तेव्हां तो लुक् दोन्ही ठिकाणच्या तद्राज प्रत्ययांचा होईल. परंतु ह्या अपत्यप्रत्यय प्रकरणांत सांगितलेला लुक् ह्या प्रकरणांतील जे तद्राज प्रत्यय त्याचाच होईल म्हणून हें वचन केलें आहे.

१—(सू. १७८) पूर्वेकडील देशांचे वाचक शब्द, भर्गादि गणातील शब्द आणि यौधेयादि गणांतील शब्द यांच्या पुढील तद्राज प्रत्ययाचा लुक् होत नाहीं. उदा०–पाञ्चाली, भार्गी, यौधेयी.

अ. ४ पा. १ आ. ४ समाप्त. पाद १ समाप्त.

**तेन रक्तं रागात् ॥ ४ । २ । १ ॥**

रागादिति किमर्थम् । देवदत्तेन रक्तं वस्त्रम् ।

**रक्तादीनामर्थाभिधाने प्रत्ययाविधानादुपाध्यानर्थक्यम् ॥ १ ॥**

रक्तादीनामर्थाभिधाने प्रत्ययविधानादुपाधिग्रहणमनर्थकम् । न ह्यरागादुत्पद्यमानेन प्रत्ययेनार्थस्याभिधानं स्यात् । अनभिधानात्तत उत्पत्तिर्न भविष्यति ॥

**लाक्षारोचनाट्ठक् ॥ ४ । २ । २ ॥**

**ठक्प्रकरणे शकलकर्दमाभ्यामुपसंख्यानम् ॥ १ ॥**

ठक्प्रकरणे शकलकर्दमाभ्यामुपसंख्यानं कर्तव्यम् । शाकलिकम् कार्दमिकम् ॥

**नील्या अन् ॥ २ ॥**

नील्या अन्वक्तव्यः । नील्या रक्तं नीलम् ॥

**पीतात्कन् ॥ ३ ॥**

पीतात्कन्वक्तव्यः । पीतेन रक्तं पीतकम् ॥ पीतकशब्दो वा प्रकृत्यन्तरं तस्माल्लुग्वक्तव्यः ॥

**हरिद्रामहारजनाभ्यामञ् ॥ ४ ॥**

हरिद्रामहारजनाभ्यामञ्वक्तव्यः। हारिद्रम् माहारजनम् ॥

रागादित्युच्यते तत्रेदं न सिध्यति हारिद्रौ कुक्कुटस्य पादौ काषायौ गर्दभस्य

---

(सू. १) येथें रागात् असें कशाकारितां म्हटलें आहे ?

देवदत्तेन रक्तं वस्त्रम् या ठिकाणीं देवदत्त या कार्यकर्त्याहून 'तेन रक्तम्' या अर्थी प्रत्यय न झाला पाहिजे.

(वा. १) रक्त वगैरे अर्थांचें अभिधान होत असेल तेथें त्या अर्थी प्रत्यय सांगितला असल्यामुळें अमुक प्रकारच्या शब्दाहून प्रत्यय होतो असें विशेष निमित्त सांगणें व्यर्थ आहे. कारण, रंगवाचक शब्दांशिवाय इतर शब्दांहून उत्पन्न झालेल्या प्रत्ययानें त्या अर्थाचें प्रतिपादन होत नाहीं. तेव्हां अर्थातच अनभिधानास्तव इतर शब्दांहून प्रत्यय होणारच नाहीं.

(सू. २ वा. १) या ठक् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें शकल व कर्दम या शब्दांहून 'तेन रक्तम्' या अर्थी ठक् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० शाकलिकम् , कार्दमिकम्.

(वा. २) नीली शब्दाहून 'तेन रक्तम्' या अर्थी अन् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० नील्या रक्तम् नीलम्.

(वा. ३) पीत शब्दाहून 'तेन रक्तम्' या अर्थी कन् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० पीतेन रक्तं पीतकम्. अथवा पीत या अर्थीच पीतक असा स्वतंत्र शब्द आहे. त्याहून 'तेन रक्तम्' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् सांगावा.

हरिद्रा आणि महारजन या शब्दांहून 'तेन रक्तम्' या अर्थी अञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० हरिद्रया रक्तं हारिद्रम्, महारजनेन रक्तं माहारजनम्.

पण येथें रागात् असें म्हटलें आहे. तेव्हां 'हारिद्रौ कुक्कुटस्य पादौ', 'काषायौ गर्दभस्य कर्णौ' हीं उदाहरणें साधत नाहींत.

सारखेपणामुळें असे प्रयोग झाले आहेत.

---

१-(सू. १) रंगवाचक शब्दाहून 'त्यानें रंगविलेला' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०-कषायेण रक्तं वस्त्रं काषायम्.

१-(सू. २) लाक्षा आणि रोचना या शब्दांहून 'तेन रक्तम्' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा० लाक्षिकम् , रौचनिकम्.

२-कारण, कोंबड्याचे पाय पिंवळे असले तरी ते कांहीं हळदीनें रंगविलेले नसतात. तसेंच गाढवाचे कान हे तांबडसर असले तरी ते कांहीं त्या रंगानें रंगविलेले नसतात.

कर्णाविति । उपमानात्सिद्धम् । हारिद्राविव हारिद्रौ काषायाविव काषायौ ॥

**नक्षत्रेण युक्तः कालः ॥ ४।२।३॥**

अयुक्तोऽयं निर्देशः । योगो हि नाम भवति ययोः संनिकर्षविप्रकर्षौ स्तो न च कालनक्षत्रयोः संनिकर्षविप्रकर्षौ स्तो नित्ये हि कालनक्षत्रे । कथं तर्हि निर्देशः कर्तव्यः ।

**नक्षत्रेण चन्द्रमसो योगात्तद्युक्तात् काले प्रत्ययविधानम् ॥ १ ॥**

नक्षत्रेण चन्द्रमसो योगात्तद्युक्तात्काले प्रत्ययो भवतीति वक्तव्यम् । पुष्येण युक्तः पुष्ययुक्तः पुष्ययुक्तश्चन्द्रमाः अस्मिन्काले । पौषमहः । पौषी रात्रिः ॥

**तत्रोत्तरपदलोपः ॥ २ ॥**

तत्रैवं सत्युत्तरपदलोपो वक्तव्यः । पुष्ययुक्तशब्दाद्धि प्रत्ययो विधीयते ॥

**लिङ्गवचनानुपपत्तिश्च ॥ ३ ॥**

लिङ्गवचनयोश्चानुपपत्तिः । चन्द्रमसो यल्लिङ्गं वचनं च तद्युक्तवद्भावेन प्राप्नोति ॥

**कालयोगात्सिद्धम् ॥ ४ ॥**

अस्तु नक्षत्रेण युक्तः काल इत्येव ॥ ननु चोक्तमयुक्तोऽयं निर्देशो योगो हि नाम भवति ययोः संनिकर्षविप्रकर्षौ स्तो

---

हळदीनें रंगविलेल्या पदार्थासारखे ते पाय असल्यामुळें त्यांना हारिद्र असें गौण रीतीनें म्हटलें आहे. तसेंच गर्दभाचे कान हे कषायानें रंगविलेल्या पदार्थासारखे असल्यामुळें त्यांना काषाय असें गौण रीतीनें म्हटलें आहे.

( सू. ३ ) हा निर्देश बरोबर दिसत नाहीं. कारण, जे दोन पदार्थ जवळही असतात आणि दूरही होतात त्यांमध्यें एकाचा दुसऱ्याशीं योग झाला असें म्हणतां येतें. आणि काल व नक्षत्र हे दोन पदार्थ एकमेकांच्या जवळ आले किंवा दूर झाले असें कांहींच म्हणतां येत नाहीं. कारण काल व नक्षत्र ह्या दोन्ही पदार्थांची एक प्रकारची कायमचीच स्थिति आहे.

तर मग येथें कसें बरें म्हटलें पाहिजे ?

( वा. १ ) नक्षत्राशीं चंद्राचा योग होतो. तेव्हां नक्षत्रानें युक्त चंद्र या अर्थाच्या शब्दांहून त्यानें युक्त काल या अर्थीं प्रत्यय होतो असें म्हटलें पाहिजे. पुष्य नक्षत्रानें जो युक्त तो पुष्ययुक्त होय. तसा ' पुष्य चंद्र ज्या वेळीं असतो ' या अर्थीं पौषम् अहः, पौषी रात्रिः असे प्रयोग होतात.

( वा. २ ) तेव्हां ' पुष्ययुक्त ' या शब्दाहून प्रत्यय होतो म्हणून त्यांतील उत्तरपदाचा म्हणजे युक्त शब्दाचा लोप होतो असें म्हटलें पाहिजे

( वा. ३ ) शिवाय लिंग आणि वचन हीं जुळत नाहींत. चंद्राचें जें लिंग तसेंच वचन तें युक्तवद्भावानें प्राप्त होतें.

( वा. ४ ) ' नक्षत्रेण युक्तः कालः ' असा जो मूळ सूत्रकारांनीं निर्देश केला आहे तोच असूं दे.

पण हा निर्देश बरोबर दिसत नाहीं. कारण ' जे दोन पदार्थ जवळही असतात व दूरही होतात त्यांमध्यें एकाचा दुसऱ्याशीं योग झाला असें म्हणतां येतें; आणि काल व नक्षत्र हे दोन्ही पदार्थ एकमेकांच्या जवळ आले

---

१—(सू. ३) नक्षत्रवाचक शब्दाहून 'त्यानें युक्त' या अर्थीं अण् प्रत्यय होतो, परंतु जो युक्त तो कालच असला पाहिजे. उदा० पुष्येण युक्तं दिनं पौषम्.

२—नक्षत्रवाचक मघा शब्दाहून त्यानें युक्त काल या अर्थीं केलेल्या अण् प्रत्ययाचा पुढील सूत्रानें लुप् झाल्यानंतर मघा शब्दाचें स्त्रीलिंग व बहुवचन कायम राहतात (१।२।५१). अद्य मघाः असा प्रयोग होतो. आतां जर मघा नक्षत्रानें युक्त चन्द्र या अर्थाच्या मघायुक्त शब्दाहून केलेल्या प्रत्ययाचा लुप् झाला तर मघायुक्त या शब्दाचें पुल्लिंग आणि एकवचन हीं कायम राहूं लागतील.

न च कालनक्षत्रयोः संनिकर्षविप्रकर्षौ स्तो नित्ये हि कालनक्षत्रे इति । नैष दोषः । पुष्यसमीपगते चन्द्रमसि पुष्यशब्दो वर्तते तेन तत्संज्ञकेन कालो विशेष्यते ॥

**तथा च संप्रत्ययः ॥ ५ ॥**

एवं च कृत्वा लोके संप्रत्ययो भवति । पुष्यसमीपगते चन्द्रमसि वक्तारो भवन्ति पुष्येणाद्य मघाभिरद्येति ॥

**लुबविशेषे ॥ ४ । २ । ४ ॥**

इह कस्मान्न भवति । पौषी रात्रिः । पौषमहः । अविशेष इत्युच्यते विशेषश्चात्र गम्यते । रात्रिरित्युक्तेऽहर्नेति गम्यते । अहरित्युक्ते रात्रिर्नेति गम्यते ॥ इहापि तर्हि न प्राप्नोति । अद्य पुष्य इति । अत्रापि हि विशेषो गम्यते । अद्येत्युक्ते न ह्यो न श्व इति ॥ यद्यप्यत्र विशेषो गम्यतेऽविशेषोऽपि गम्यते । अद्येत्युक्ते न ज्ञायते रात्रौ वा दिवा वेति । यतोऽविशेषस्तदाश्रयो लुब्भविष्यति ॥ इहापि तर्हि यद्यपि विशेषो गम्यतेऽविशेषोऽपि तु गम्यते । रात्रिरित्युक्ते न ज्ञायते कदेति । यतोऽविशेषस्तदाश्रयो लुप्प्राप्नोति ॥ एवं

---

किंवा दूर झाले असें कांहींच म्हणतां येत नाहीं; कारण काल व नक्षत्र या दोन्ही पदार्थांची स्थिति कायमची एक प्रकारचीच आहे' असें मागें म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण पुष्य नक्षत्राच्या जवळ असलेला चंद्र असा येथें पुष्य शब्दाचा अर्थ आहे[1]. तेव्हां पुष्य वगैरे शब्दाचा हा जो अर्थ त्या अर्थानें युक्त काल असें कालाला विशेषण देतां येतें.

( वा. ५ ) आणि तसाच लोकांमध्यें बोध होतो. पुष्य नक्षत्राच्या जवळ चंद्र असतांनाच लोक असें बोलतात कीं आज पुष्याशीं योग आहे, आज मघाशीं योग आहे.

( सू. ४ ) ' पुष्येण युक्ता पौषी रात्रिः ' तसेंच ' पुष्येण युक्तं पौषमहः ' येथें ह्या सूत्रानें लुप् कां होत नाहीं ?

सूत्रकारांनीं येथें अविशेषे असें म्हटलें आहे ना ? आणि येथें तर कालाचा विशेष गम्यमान होत आहे. रात्र म्हटली म्हणजे दिवस नव्हे आणि दिवस म्हटला म्हणजे रात्र नव्हे असें मनांत येतें.

असें असेल तर ' अद्य पुष्यः ' येथेंही लुप् होणार नाहीं. कारण येथेंही आज असें म्हटलें म्हणजे ' काल नव्हे व उद्यां नव्हे ' असा विशेष मनांत येतोच.

येथें जरी विशेष मनांत येतो तरी दुसऱ्या दृष्टीनें अविशेषही मनांत येतोच. तो असा कीं आज असें म्हटलें असतां ' दिवसां किंवा रात्रीं ' असा कांहींच विशेष समजत नाहीं. तेव्हा तो अविशेष घेऊन त्यामुळें येथें लुप् होईल.

तर मग आतां ' पौषी रात्रिः ' येथेंही विशेष जरी मनांत येतो तरी दुसऱ्या दृष्टीनें अविशेषही मनांत येतोच. तो असा कीं— रात्रीं असें म्हटलें कीं आवशीं किंवा मध्यरात्रीं अथवा पहाटें असा कांहीं विशेष मनांत येत नाहीं. तसेंच दिवसां असें म्हटलें कीं सकाळीं, दुपारीं किंवा संध्याकाळीं असा विशेष कांहींच समजत नाहीं. तेव्हां तो अविशेष घेऊन तेथेंही लुप् होऊं लागेल.

---

१—ज्या नक्षत्रवाचक शब्दाहून येथें प्रत्यय होतो त्या शब्दाचा ' त्या नक्षत्रानें युक्त चन्द्र ' असा अर्थ गौण रीतीनें घेतला जातो. आणि एखाद्या शब्दाचा गौण रीतीनें दुसरा अर्थ घेतला तरी त्या शब्दाचें मूळचें लिंग व वचन हीं कायम असतात.

१—( सू. ४ ) पूर्व सूत्रानें सांगितलेल्या प्रत्ययाचा लुप् होतो. परंतु प्रत्येक नक्षत्राचा चन्द्राशीं योग सुमारें साठ घटका असतो तसाच तो मोघम दाखवावयाचा असला पाहिजे. त्या साठ घटिका कालाच्या पोटविभागाची प्रतीति नसली पाहिजे. उदा०—अद्य पुष्यः.

तर्हि नक्षत्रेण युक्तः कालः (३) इत्यनुवर्तते। नक्षत्रेण युक्तस्य कालस्याविशेषे। कः पुनः कालो नक्षत्रेण युज्यते। अहोरात्रः॥

## संज्ञायां श्रवणाश्वत्थाभ्याम् ॥४।२।५॥

इह कस्मान्न युक्तवद्भावो भवति। श्रवणा रात्रिः। निपातनादेतत्सिद्धम्। किं निपातनम्। विभाषा फाल्गुनीश्रवणाकार्त्तिकीचैत्रीभ्य [४. २. २३] इति॥

## [द्वंद्वाच्छः ॥४।२।६॥]

## दृष्टं साम ४।२।७॥

## दृष्टं साम कलेर्ढक्॥१॥

दृष्टं सामेत्यत्र कलेर्ढग्वक्तव्यः। कलिना दृष्टं साम कालेयं साम गीयते॥

अपर आह। सर्वत्राग्निकलिभ्यां ढक्। सर्वत्राग्निकलिभ्यां ढग्वक्तव्यः। अग्निना दृष्टं सामाग्नेयम्। अग्नौ भवमाग्नेयम्। अग्नेरागतमाग्नेयम्। अग्नेः स्वमाग्नेयम्। अग्निर्देवतास्याग्नेयः। कलिना दृष्टं साम कालेयम्। कलेरागतं कालेयम्। कलौ भवं कालेयम्। कलेः स्वं कालेयम्। कलिर्देवतास्य कालेयश्चरुः॥

## दृष्टे सामनि जाते चाप्यण् डिद् द्विर्वा विधीयते।

दृष्टे सामनि जाते चाप्यण् डिद् द्विर्वा

---

तर मग 'नक्षत्रेण युक्तः कालः' अशी येथें अनुवृत्ति येत आहे. तेव्हां नक्षत्रानें युक्त जो काल त्यांतील विशेष मनांत न आला पाहिजे असें समजावें.

पण केवढा बरें काल नक्षत्रानें युक्त होऊं शकतो?

अहोरात्र म्हणजे साठ घटिका होऊं शकतो.

(सू. ५) श्रवणा रात्रिः येथें युक्तवद्भाव (१।२।५१) कां होत नाहीं?

निपातनामुळें हें सिद्ध होत आहे.

तें निपातन कोणतें?

विभाषा फाल्गुनीश्रवणाकार्तिकीचैत्रीभ्यः (४।२।२३) येथें श्रवणा असें उच्चारलें आहे तें निपातन होय.

(सूत्र ७ वा. १) कलि शब्दाहून 'त्यानें दृष्ट साम' या अर्थी ढक् प्रत्यय होतो' असें म्हणावें. उदा.—कलिना दृष्टं कालेयं साम. कालेय असें एक प्रकारच्या सामाला म्हणतात. दुसरा कोणी वैयाकरण येथें 'सर्वत्राग्निकलिभ्यां ढक्' असें म्हणतो. त्याचा अर्थः—अग्नि व कलि या दोन शब्दांहून प्राग्दीव्यतीय सर्वच अर्थी ढक् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा.—अग्निना दृष्टमाग्नेयम्, अग्नौ भवमाग्नेयम्, अग्नेः आगतम् आग्नेयम्, अग्नेः स्वम् आग्नेयम्, अग्निर्देवता अस्य आग्नेयः. तसेंच कलिना दृष्टं साम कालेयम्, कलेः आगतम् कालेयम्, कलौ भवम् कालेयम्, कलेः स्वम् कालेयम्, कलिर्देवता अस्य कालेयश्चरुः.

(श्लो. १) 'दृष्टं साम' या अर्थी सांगितलेला, आणि 'तत्र जातः' या अर्थी प्रथमतः सांगून दुसऱ्यानदां सांगितलेला जो अण् प्रत्यय तो विकल्पानें डित् होतो असें म्हणावें. उदा.—उशनस् शब्दाहून त्यानें दृष्ट साम या अर्थी अण् प्रत्यय केल्यानंतर औशनैम्, व

---

१—(सू. ५) श्रवण आणि अश्वत्थ या शब्दांच्या पुढील 'त्यानें युक्त काल' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा एकंदरींत तो शब्द संज्ञा असेल तर लुप् होतो, उदा०—श्रवणा रात्रिः, अश्वत्थो मुहूर्तः.

१—(सू. ६) नक्षत्रवाचक शब्दांच्या द्वंद्वाहून 'त्यानें युक्त काल' या अर्थी छ प्रत्यय होतो. उदा० राधानुराधीया रात्रिः, तिष्यपुनर्वसवीयमहः.

१—(सू. ७) प्रातिपदिकाहून 'त्यानें दृष्ट' या अर्थी अण् प्रत्यय होतो, परंतु जें दृष्ट तें सामच असलें पाहिजे. उदा० वसिष्ठेन दृष्टं वासिष्ठं साम.

२—डित् झाला त्या वेळीं टिसंज्ञक (१।१।६४) भागाचा लोप (६।४।१४३) होतो.

वक्तव्यः । उशनसा दृष्टं साम औशनसम् औशनम् । शतभिषजि जातः शातभिषजः शातभिषः ॥

तीयादीकक्

तीयादीकग्वक्तव्यः । द्वैतीयीकः तार्तीयीकः ॥

न विद्यायाः

विद्याया न भवतीति वक्तव्यम् । द्वितीया विद्या तृतीया विद्येत्येव ॥

गोत्रादङ्कवदिष्यते ॥

औपगवकम् ॥

दृष्टे सामानि जाते चाप्यण् डिद् द्विर्वा विधीयते ।

तीयादीकग्न विद्याया गोत्रादङ्कवदिष्यते ।

[ [1]कलेर्ढक् ॥ ४ । २ । ८ ॥ ]

वामदेवाड्ड्यड्ड्यौ ॥ ४ । २ । ९ ॥

किमर्थो डकारः । डितीति लोपो यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । यस्येति लोपेनाप्येतत्सिद्धम् ॥ एवं तर्हि सिद्धे सति यद्यतौ डितौ करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत एते परिभाषे अननुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य तदनुबन्धकग्रहणे नातदनुबन्धकस्य ग्रहणमिति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । अवामदेव्यमित्येतत्सिद्धं भवति ॥

---

औशनसम् अशीं दोन रूपें होतात. तसेंच, शतभिषज् शब्दाहून त्या नक्षत्रावर झालेला या अर्थी अण् प्रत्यय ( ४।३।२५ ) केल्यानंतर शातभिषः शातभिषजः अशीं दोन रूपें होतात.

तीय-प्रत्ययान्ताहून स्वार्थी ईकक् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—द्वैतीयीकः, तार्तीयीकः. विद्या हा अर्थ असेल तर हा ईकक् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. तेव्हां द्वितीया विद्या, तृतीया विद्या अशींच रूपें होतात.

अपत्य-प्रत्ययान्ताहून अङ्क (४।३।१२७) अर्थी जे प्रत्यय होतात तेच प्रत्यय त्या शब्दाहून ' दृष्टं साम' या अर्थी होतात. उदा०—औपगवकम्, कापटवम्.

(सू. ९) येथें ड्यत् आणि ड्य या प्रत्ययांना डकार अनुबंध कशाकरितां जोडला आहे ?

डकार इत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना टेः ( ६।४।१४३ ) या सूत्रानें सांगितलेला टि-लोप झाला पाहिजे म्हणून.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण यस्येति च ( ६।४।१४८ ) या सूत्रानें लोप झाला तरी हें सिद्ध होत आहे.

तर मग असें असतांही ज्याअर्थी येथें आचार्यांनीं या प्रत्ययांना डकार अनुबंध जोडला आहे त्याअर्थी त्यांनीं असें सुचविलें आहे कीं सूत्रामध्यें अनुबंधरहिताचें ग्रहण केलें असेल तर तेथें अनुबंधसहिताचें ग्रहण करूं नये; आणि सूत्रामध्यें कोणत्याही शब्दाचें एक अनुबंध लावून ग्रहण केलें असेल तर तेथें तो अनुबंध असून दुसरा अनुबंध ज्याला असेल त्याचें ग्रहण करूं नये. अशा रीतीनें ह्या दोन परिभाषा येथें ज्ञापित होतात.

ह्या ज्ञापित केलेल्या परिभाषांचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं ' अवामदेव्यम् ' या

---

२—तत्र जातः ( ४।३।२५ ) यानें प्रथमतः अण् प्रत्यय सांगितलाच आहे. परंतु कालाट्ठञ् ( ४।३।११ ) यानें बाध होतो. म्हणून संधिवेला० ( ४।३।१६ ) या सूत्रानें पुनः जो अण् प्रत्यय सांगितला आहे तो शातभिषः येथें झाला आहे

१—( सू. ८ ) पूर्व सूत्रावरील वार्तिक १ पहा. तें वार्तिक येथें सूत्र-पाठामध्यें घातलें आहे.

१—( सू. ९ ) वामदेव शब्दाहून ' त्यानें दृष्ट साम ' या अर्थी ड्यत् आणि ड्य असे प्रत्यय होतात. उदा०--वामदेवेन दृष्टं साम वामदेव्यम्. ड्यत् प्रत्यय केला म्हणजे प्रत्ययांतील आकार स्वरित ( ६।१।१८५ ) होतो. आणि ड्य प्रत्यय केला म्हणजे वामदेव्यम् हें पद अन्तोदात्त होतें.

सिद्धे यस्येति लोपेन किमर्थं ययतौ हितौ।
ग्रहणं मा तदर्थे भूद्वामदेव्यस्य नञ्स्वरे ॥

**परिवृतो रथः ॥ ४ । २ । १० ॥**

**परिवृतो रथ इति तदेकान्तग्रहणम् ॥ १ ॥**

परिवृतो रथ इत्यत्र तदेकान्तग्रहणं कर्तव्यम्। येन परिवृतो रथो रथैकान्तश्चेत्स भवतीति वक्तव्यम्। इह मा भूत्। पुत्रैः परिवृतो रथः। छात्रैः परिवृतो रथ इति। तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। कस्मान्न भवति पुत्रैः परिवृतो रथः छात्रैः परिवृतो रथ इति। अनभिधानात् ॥

**पाण्डुकम्बलादिनिः ॥ ४।२।११॥**

अयं योगः शक्योऽवक्तुम्। कथं पाण्डुकम्बली पाण्डुकम्बलिनौ पाण्डुकम्बलिन इति ॥ इनिनैतन्मत्वर्थीयेन सिद्धम्। पाण्डुकम्बलोऽस्यास्तीति पाण्डुकम्बली ॥

[द्वैपवैयाघ्रादञ् ॥ ४।२।१२॥]

**कौमारापूर्ववचने ॥ ४ । २ । १३॥**

**कौमारापूर्ववचन इत्युभयतः स्त्रिया अपूर्वत्वे ॥ १ ॥**

कौमारापूर्ववचन इत्यत्रोभयतः स्त्रिया अपूर्वत्व इति वक्तव्यम्। अपूर्वपतिं कुमारीमुपपन्नः कौमारो भर्ता । कुमार्यपूर्वपतिः

---

नञ्-तत्पुरुषामध्यें उत्तर पदाचा अन्त उदात्त ( ६।२।१५६ ) न होतां पूर्व पदाला प्रकृतिस्वर ( ६।२।२ ) सिद्ध होतो.

(सू. १० वा. १.) 'परिवृतो रथः' या सूत्रामध्यें तदेकान्त ग्रहण करावें. म्हणजे ज्या पदार्थानें रथ वेष्टित होतो तो पदार्थ रथापैकींच एक भाग आहे अशी प्रतीति होत असेल तरच प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण, पुत्रैः परिवृतो रथः, तसेंच छात्रैः परिवृतो रथः येथें प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

पण तसें म्हटलें नाहीं तर पुत्रैः परिवृतो रथः, छात्रैः परिवृतो रथः येथें प्रत्यय कां होत नाहीं?

अनभिधानास्तव तेथें होत नाहीं.

( सू. ११ ) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल.

पण सूत्र केलें नाहीं तर पाण्डुकम्बली पाण्डुकम्बलिनौ पाण्डुकम्बलिनः हीं रूपें कशीं बरें साधतील ?

पाण्डुकम्बल शब्दाहून ' तो ज्याचा आहे ' या अर्थी मत्वर्थीय इन् प्रत्यय ( ५।२।११५ ) केला म्हणजे साधतील

(सू. १३ वा. १) कुमारी शब्दाहून 'तीप्रत प्राप्त झालेला पति' या अर्थी आणि स्वार्थी अण् प्रत्यय होतो पण त्या दोन्ही ठिकाणीं त्या स्त्रीचें च अपूर्वत्व गम्यमान असलें पाहिजे. उदा० जिला पूर्वी पति नव्हता अशा कुमारीप्रत प्राप्त झालेला भर्ता तो कौमार होय. आणि जिला पूर्वी पति

---

१—( सू. १० ) प्रतिपादकाहून ' त्यानें वेष्टित ' या अर्थी अण् प्रत्यय होतो, पण तो वेष्टित पदार्थ रथच असला पाहिजे. उदा० वस्त्रैः परिवृतो वास्त्रो रथः.

२— पुत्र, छात्र वगैरे शब्दांहून 'त्यानें वेष्टित रथ' या अर्थी अण् प्रत्यय केला असतां त्या शब्दापासून त्या अर्थाची प्रतीती होत नाहीं.

१—( सू. ११ ) पाण्डुकम्बल शब्दाहून 'त्यानें वेष्टित रथ' या अर्थी इन् प्रत्यय होतो. उदा० पाण्डुकम्बलेन परिवृतः पाण्डुकम्बली रथः.

१—( सू. १२ ) द्वैप आणि वैयाघ्र या शब्दांहून 'त्यानें वेष्टित रथ' या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा० द्वैपेन परिवृतः द्वैपः रथः. द्वैप म्हणजे हत्तीचें कातडें. वैयाघ्र म्हणजे वाघाचें कातडें.

१—( सू. १३ ) कुमारी शब्दाहून तिला 'प्राप्त झालेला पति' या अर्थी अण् प्रत्यय होतो. परंतु अपूर्वोक्ति असली पाहिजे. म्हणजे त्या कुमारीला 'हाच पति प्रथम मिळालेला आहे' असा अर्थ असला पाहिजे. उदा० अपूर्वपति कुमारीम् उपपन्न कौमारः पतिः. शिवाय तशाच प्रकारची कुमारी विवक्षित असेल तर त्या कुमारी शब्दाहून स्वार्थी अण् प्रत्यय याच सूत्रानें होतो. उदा०-कौमारी भार्या.

पतिमुपपन्ना कौमारी भार्या ॥

कौमारापूर्ववचने कुमार्या अण्विधीयते ।
अपूर्वत्वं यदा तस्याः कुमार्यां भवतीति वा॥

अथवा कुमार्यां भवः कौमारः ॥ यद्येवं कौमारी भार्येति न सिध्यति ।

पुंयोगात्स्त्र्यभिधानम् ॥ २ ॥

पुंयोगात् स्त्र्यभिधानं भविष्यति । कौमारस्य भार्या कौमारीति ॥

[तत्रोद्धृतममत्रेभ्यः ॥ ४।२।१४॥

स्थण्डिलाच्छयितरि व्रते ४।२।१५॥

संस्कृतं भक्षाः ॥ ४।२।१६ ॥

शूलोखाद्यत् ॥ ४।२।१७ ॥

दध्नष्ठक् ॥ ४।२।१८ ॥

उदश्वितोऽन्यतरस्याम् ॥४।२।१९॥

क्षीराड्ढञ् ॥ ४।२।२० ॥]

सास्मिन्पौर्णमासीति ॥ ४।२।२१॥

सास्मिन्पौर्णमासीति संज्ञाग्रहणम् ॥ १ ॥

सास्मिन्पौर्णमासीत्यत्र संज्ञाग्रहणं कर्तव्यम् ॥

---

नसून प्रथमतःच पति मिळाला आहे अशी भार्या कौमारी होय.

( श्लो. १ ) कुमारीचें अपूर्वत्व गम्यमान असतांना ' कौमारापूर्ववचने ' या सूत्रानें कुमारी शब्दाहून अण् प्रत्यय सांगितलेला आहे.

अथवा हें सूत्र करूं नये. तर कुमार्यां भवति अशा अर्थाची विवक्षा असतांना कुमारी शब्दाहून 'तिचे ठिकाणीं पतित्वानें असलेला' या अर्थी ' तत्र भवः' ( ४ । ३ । ५३ ) यानें अण् प्रत्यय होईल आणि कौमारी हें रूप साधेल.

पण अशा रीतीनें कौमारी भार्या हें रूप साधत नाहीं.

कौमार अशा त्या पुरुषाच्या संबंधानें कौमारस्य भार्या कौमारी असा ' पुंयोगात्० ' ( ४ । १ । ४८ ) यानें ङीष् प्रत्यय केला म्हणजे तेंही रूप साधेल.

( सू. २१ वा. १ ) 'साऽस्मिन् पौर्णमा-

---

१( सू. १४ )--पात्रवाचक शब्दांहून 'त्यांत काढून ठेवलेला' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा० शरावे उद्धृतः शारावः ओदनः.

१—( सू. १५ ) स्थण्डिल शब्दाहून ' त्याचे ठिकाणीं व्रतामुळें शयन करणारा ' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा० स्थण्डिले शयितुं व्रतमस्य स्थाण्डिलः भिक्षुः.

१—( सू. १६ ) प्रतिपादकाहून ' त्या ठिकाणीं संस्कार केलेलें ' या अर्थी यत् प्रत्यय होतो. परंतु तो संस्कार केलेला पदार्थ खाण्यापैकीं असला पाहिजे. उदा० भ्राष्ट्रे संस्कृताः भ्राष्ट्राः अपूपाः.

१—( सू. १७ ) शूल आणि उखा या शब्दांहून ' त्या ठिकाणीं संस्कार केलेलें या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा० शूले संस्कृतं शूल्यं मांसम्, उखायां संस्कृतम् उख्यम्.

१—( सू. १८ ) दधि शब्दाहून ' त्यात संस्कार केलेलें' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा० दध्नि संस्कृतम् दाधिकम्.

१—( सू. १९ ) उदश्वित् शब्दाहून ' त्यांत संस्कार केलेलें ' या अर्थी ठक् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा० उदश्विति संस्कृतम् औदश्वित्कम् औदश्वितम्. उदश्वित् म्हणजे ताक.

१—( सू. २० ) क्षीरे संस्कृता क्षैरेयी यवागूः.

१—( सू. २१ ) पौर्णमासीविशेषवाचक शब्दाहून ' ती आहे ज्यामध्यें असा मास किंवा अर्धमास ' हा अर्थ विवक्षित असतांना अण् प्रत्यय होतो. उदा०—पुष्य नक्षत्रानें युक्त पौर्णिमेला पौषी ( ४।२।४ ) म्हणतात. त्या पौष शब्दाहून अण् प्रत्यय होऊन पौषः असा शब्द होतो. पौष शब्दाचा हा जो मास किंवा अर्धमास हा अर्थ तो ' पौर्णमासीला संपणारा महिना ' असा लोकप्रसिद्ध व्हावयाचा आहे.

असंज्ञायां गरीयानुपसंयोगः ॥ २ ॥

अक्रियमाणे हि संज्ञाग्रहणे गरीयानुपसंयोगः कर्तव्यः स्यात् । मासार्धमासयोरिति वक्तव्यं स्यात् । इह मा भूत् । पौषी पौर्णमास्यस्मिन्पञ्चदशरात्रे दशरात्र इति । संवत्सरपर्वणीति च वक्तव्यं स्यात् । भृतकमासे मा भूदिति ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इतिकरणः क्रियते । ततश्चेद्विवक्षा ॥

[आग्रहायण्यश्वत्थाट्ठक् ॥ ४।२।२२ ॥

विभाषा फाल्गुनीश्रवणाकार्तिकीचैत्रीभ्यः ॥ ४।२।२३॥

सास्य देवता ॥ ४।२।२४ ॥]

कस्येत् ॥ ४।२।२५॥

यस्येति लोपः कस्मान्न भवति । इकारोच्चारणसामर्थ्यात् ॥

अथ यत्कायं हविः कथं तस्य संप्रैषः

सीति' या सूत्रामध्यें संज्ञा-ग्रहण करावें.

(वा. २) नाहीं तर बऱ्याच निमित्तांनीं सूत्रामध्यें निर्देश करावा लागेल. मास किंवा अर्ध हा अर्थ गम्यमान असतांना असें तर म्हटलेंच पाहिजे. कारण पौषी पौर्णमासी ज्या पंधरवड्यामध्यें आहे किंवा ज्या दशरात्रामध्यें आहे अशा अर्थी पौषी शब्दाहून अण् प्रत्यय न झाला पाहिजे. तसेंच 'संवत्सर[3]पर्वणि' याही निमित्ताचा निर्देश करावा लागेल. कारण भृतकमास विवक्षित असेल तेथेंही पौषी शब्दाहून अण् प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण सूत्रामध्यें इति शब्द घातला आहे. त्यावरून तशी विवक्षा असेल तेथेंच प्रत्यय होईल.

( सू. २५ ) या सूत्रानें इकार आदेश झाल्यानंतर त्याचा यस्येति च ( ६।४।१४८ ) यानें लोप कां होत नाहीं ?

इकार सांगितला आहे म्हणून त्याच्या सामर्थ्यास्तव होत नाहीं.

आतां 'कायं हविः' येथें हवि देण्यापूर्वी अध्वर्यूनें होत्याला जो प्रेष द्यावयाचा असतो

२. पौर्णमासीच्या पूर्वीचे काहीं दिवस आणि पुढील कांहीं दिवस मिळून जे पंधरा किंवा दहा दिवस होतात उदा०—पौष शु. ११ पासून पौष कृ. १० पर्यंत १५ दिवस होतात, किंवा पौष कृ. ५ पर्यंत दहा दिवस होतात तेवढ्या कालाला पौष म्हणावयाचें नाहीं.

३. संवत्सर म्हणजे वर्ष हें बारा महिन्यांचें असतें. तो प्रत्येक महिना ज्या तिथीला पूर्ण होतो त्या तिथीला पौर्णमासी म्हणतात. आणि म्हणून पौर्णमासी ही तिथि पर्व म्हणून गणली जाते. तेव्हा त्या तिथीला संपणारा जो मास किंवा अर्धमास सर्वलोकप्रसिद्ध आहे तोच येथें घ्यावयाचा आहे. नाही तर भृतकमास विवक्षित असतांनाही प्रत्यय होऊं लागेल. पौ. शु. ११ ला कोणी चाकर ठेवला गेला तर माघ शु. ११ ला एक महिना झाला असें म्हणतात. हा भृतक मास होय.

१—(सू. २२) पौर्णमासीविशेषवाचक जे आग्रहायणी व अश्वत्थ हे शब्द त्यांहून 'ती पौर्णमासी आहे ज्या मासामध्यें किंवा अर्धमासामध्ये' या अर्थी ठक् प्रत्यय होतो, उदा० आग्रहायणिकः मासः अर्धमासः; आश्वत्थिको मासः अर्धमासः.

१—(सू. २३) फाल्गुनी, श्रवणा, कार्तिकी आणि चैत्री हे जे पौर्णमासीविशेषवाचक शब्द त्याहून 'ती पौर्णमासी आहे ज्या मासामध्यें,' किंवा अर्धमासामध्यें या अर्थी ठक् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा० फाल्गुनिकः फाल्गुनः. इत्यादि

१—(सू. २४) देवताविशेषवाचक शब्दाहून 'ती आहे देवता ज्याची' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—इन्द्रः देवता अस्य ऐन्द्रः मन्त्रः; ऐन्द्रं हविः.

१—(सू. २५) क म्ह. प्रजापति. त्या क शब्दाहून 'ती आहे देवता ज्याची' या अर्थी अण् प्रत्यय होतो. आणि त्याच्याबरोबरच क शब्दाच्या अकाराला ऱ्हस्व इकार आदेश होतो. उदा०—कः देवता अस्य 'कायम्' हविः.

कर्तव्यः । यदि तावत्किमः कादेशः कस्मा अनुब्रूहीति भवितव्यम् । अथ न किमः कायानुब्रूहीति भवितव्यम् ॥ यद्यपि किमोऽथापि न किम उभयथा कस्मा अनुब्रूहीति भवितव्यम् । सर्वस्य हि सर्वनामसंज्ञा क्रियते सर्वश्च प्रजापतिः प्रजापतिश्च कः ॥

अपर आह । यद्येव किमोऽथापि न किम उभयथा कायानुब्रूहीति भवितव्यम् । संज्ञोपसर्जनयोर्हि सर्वनामसंज्ञा प्रतिषिध्यते संज्ञा चैषा तत्रभवतः ॥

[ शुक्राद् घन् ॥ ४।२।२६ ॥]

अपोनप्त्रपांनप्तृभ्यां घः ॥ ४ । २ । २७ ॥

अथ यदपोनप्त्रियमपांनप्त्रियं हविः कथं तस्य संप्रैषः कर्तव्यः । अपोनपातेऽनुब्रूहि । अपांनपातेऽनुब्रूहि ॥ अपोनप्त्रपांनप्तृभावः कस्मान्न भवति । प्रत्ययसंनियोगेन ऋकारान्तत्वमुच्यते तेनासति प्रत्यये न भवि-

---

तो कसा द्यावयाचा? कारण, कायम् येथें जर किम् शब्दालाच आदेश होत असेल[२] तर 'कस्मै अनुब्रूहि' असें म्हटलें पाहिजे. आणि जर किम् शब्दाला क आदेश नसेल म्हणजे स्वतंत्र क शब्द असेल तर 'काय अनुब्रूहि' असें म्हटलें पाहिजे.

जरी किम् शब्दाला आदेश असला किंवा नसला तरी दोन्ही वेळां कस्मै अनुब्रूहि असेंच म्हटलें पाहिजे. कारण सर्वाला सर्वनाम संज्ञा केली जाते. आणि प्रजापति हा सर्व जगाची प्रकृति असल्यामुळें सर्व आहे. आणि प्रजापति हाच क होय.

येथें दुसऱ्या कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं जरी किम् शब्दाला आदेश असला किंवा नसला तरी दोन्ही वेळां 'काय अनुब्रूहि' असेंच म्हटलें पाहिजे. कारण संज्ञा शब्दाला आणि उपसर्जन झालेल्या शब्दाला सर्वनाम संज्ञेचा निषेध केला आहे (१।१। २७ वा. २) आणि येथें तर किम् ही महात्मा ब्रह्मदेवाची संज्ञाच आहे.

(सू. २७) आतां अपांनप्त्रियम् तसेंच अपोनप्त्रियम् हें हवि देण्याच्या पूर्वी होत्याला प्रेष देतांना अध्वर्यूनें कसें म्हणावें ?

अपोनपाते अनुब्रूहि तसेंच अपांनपाते अनुब्रूहि असें म्हणावें.

येथें या शब्दांना अपोनप्तृ आणि अपांनप्तृ असे आदेश कां होत नाहींत ?

प्रत्ययाच्या बरोबर हे ऋकारान्त आदेश सांगितले आहेत. प्रैषामध्यें नुसतें देवतेचें नांव असल्यामुळें तेथें हे आदेश होत नाहींत.

---

२. येथें दुसरा पक्ष असा आहे कीं कस्येत् या प्रकृत सूत्रामध्यें कस्य हा 'क' शब्दाचा निर्देश नव्हे तर 'किम्' शब्दाचाच आहे. त्या किम् शब्दाला किमः कः (७।२।१०३) यानें क आदेश झाला आहे. किम् शब्दाचा अर्थ प्रजापति हा आहे. तेव्हां असा अर्थ होतो कीं किम् शब्दाहून ती आहे देवता ज्याची या अर्थी अण् प्रत्यय होतो. आणि किम् शब्दाच्या मकाराला इकार आदेश होतो, या वेळीं त्या इकाराचा लोप ही (६।४।१४८) होईल. कारण लोप झाला तरी इकार आदेश व्यर्थ होत नाहीं. लोप होण्याकरितांच इकार आदेश केला आहे असें म्हणतां येतें. लोप झाल्यानंतर मागील इकाराला वृद्धि होऊन आय् आदेश झाल्यामुळें कायम् असें रूप होतें.

३–तेव्हां प्रजापति या सर्वांचे जें 'क' हें नांव आहे तें सर्वनाम होत आहे. सर्वनाम या अन्वर्थ संज्ञेच्या जोरावर प्रजापतिवाचक क या शब्दाला सर्वनाम संज्ञा आहे असा अभिप्राय आहे.

१–(सू. २६) शुक्र शब्दाहून 'ती आहे देवता ज्याची' या अर्थी घन् प्रत्यय होतो. उदा०-शुक्रः देवता अस्य शुक्रियं हविः

१--(सू. २७) अपोनपात् व अपांनपात् या नांवाच्या देवता आहेत. त्या शब्दांहून 'ती आहे देवता ज्याची' या अर्थी घ प्रत्यय होतो, आणि त्या.च्याबरोबर त्या दोन शब्दांना क्रमानें 'अपोनप्तृ' आणि 'अपांनप्तृ' असे आदेश होतात. उदा०--अपोनपात् देवता अस्य अपोनप्त्रियम् हविः, अपांनप्त्रियम्.

तव्यम् ॥

छ च ॥४।२।२८॥

छप्रकरणे पैङ्गाक्षीपुत्रादिभ्य उपसंख्यानम् ॥ २ ॥

छप्रकरणे पैङ्गाक्षीपुत्रादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । पैङ्गाक्षीपुत्रीयम् तार्णबिन्दवीयम् ॥

शतरुद्राद्घ च ॥ १ ॥

शतरुद्राद्घप्रत्ययो वक्तव्यः । छश्च वक्तव्यः । शतरुद्रियम् शतरुद्रीयम् ॥

[महेन्द्राद् घाणौ च ॥४।२।२९॥

सोमाट्ट्यण् ॥ ४।२।३० ॥

वाय्वृतुपित्रुषसो यत् ॥ ४।२।३१॥

द्यावापृथिवीशुनासीरमरुत्वदग्नीषोमवास्तोष्पतिगृहमेधाच्छ च ॥ ४।२।३२ ॥

अग्नेर्ढक् ॥ ४।२।३३ ॥ ]

कालेभ्यो भववत् ॥४ । २ । ३४ ॥

कथमिदं विज्ञायते । भवे ये प्रत्यया विहितास्ते भवन्ति कालेभ्यः सास्य देवतेत्यस्मिन्नर्थ इति । आहोस्वित्कालेभ्यो भवे ये प्रत्यया विहितास्ते भवन्ति सास्य देवतेत्यस्मिन्नर्थ इति । कश्चात्र विशेषः ।

कालेभ्यो भवे प्रत्ययमात्रप्रसङ्गः ॥ १ ॥

---

(सू.२८ वा.१) या छ प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें पैङ्गाक्षीपुत्र वगैरे शब्दांहून ती आहे देवता ज्याची या अर्थीं छ प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० पैङ्गाक्षीपुत्रीयम्, तार्णबिन्दवीयम्.

(वा. २) शतरुद्र शब्दाहून ती आहे देवता ज्याची या अर्थीं घ आणि छ असे प्रत्यय होतात असें म्हणावें. उदा० शतरुद्राः देवता अस्य शतरुद्रियम्, शतरुद्रीयम्.

(सू. ३४) या सूत्राचा अर्थ कसा समजावयाचा आहे? ' कोणत्याही शब्दाहून भव या अर्थीं तेथें उत्पन्न झालेले जे प्रत्यय होतात ते प्रत्यय कालविशेषवाचक शब्दाहून ती आहे देवता ज्याची या अर्थीं होतात' असा अर्थ आहे किंवा ' कालविशेषवाचक शब्दाहून भव या अर्थीं जे प्रत्यय होतात ते प्रत्यय कोणत्याही शब्दाहून ती आहे देवता ज्याची या अर्थीं होतात ' असा अर्थ आहे ?

या दोन अर्थांमध्यें फरक काय ?

---

१-(सू. २८) पूर्वसूत्राच्या विषयामध्यें छ प्रत्ययही होतो. उदा०--अपोनप्त्रीयम् हविः, अपांनप्त्रीयम्.

१--(सू. २९) महेन्द्र शब्दाहून 'ती आहे देवता ज्याची' या अर्थी घ, अण् आणि छ असे प्रत्यय होतात. उदा०--महेन्द्रो देवता अस्य महेन्द्रियं हविः, माहेन्द्रम्, महेन्द्रीयम्

१--(सू. ३०) सोमशब्दाहून ' ती आहे देवता ज्याची' या अर्थी ट्यण् प्रत्यय होतो. उदा०--सोमो देवता अस्य सौम्यं हविः.

१--(सू. ३१) वायु, ऋतु, पितृ आणि उषस् या शब्दांहून 'ती आहे देवता ज्याची' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०-वायुः देवता अस्य वायव्यं हविः, ऋतव्यम्, पित्र्यम्, उषस्यम्.

१-(सू. ३२) द्यावापृथिवी, शुनासीर, मरुत्वत्, अग्नीषोम, वास्तोष्पति आणि गृहमेध या शब्दांहून 'ती आहे देवता ज्याची या अर्थीं छ आणि यत् हे प्रत्यय होतात. उदा०-द्यावापृथिवीयम् द्यावापृथिव्यम्.

१-(सू. ३३) अग्नि शब्दाहून ती आहे देवता ज्याची या अर्थी ढक् प्रत्यय होतो. उदा०-आग्नेयः पुरोडाशः.

१. (सू. ३४) कालविशेषवाचक शब्दाहून तत्र भव. (४।३।५३) या अर्थी जे ठञ् (४।३।११) वगैरे प्रत्यय होतात ते प्रत्यय त्याच शब्दाहून ती आहे देवता ज्याची या अर्थी होतात. उदा०-मासो देवता अस्य मासिकम्.

यदि विज्ञायते भवे ये प्रत्यया विहितास्ते भवन्ति कालेभ्यः सास्य देवतेत्यस्मिन्नर्थे इति प्रत्ययमात्रं प्राप्नोति ॥

यः कालेभ्यो भवे तस्य विधाने प्रातिपदिकमात्रात्प्रसङ्गः ॥ २ ॥

अथ विज्ञायते कालेभ्यो भवे ये प्रत्यया विहितास्ते भवन्ति सास्य देवतेत्यस्मिन्नर्थे इति प्रातिपदिकमात्रात्प्राप्नुवन्ति ॥

सिद्धं तूभयनिर्देशात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । उभयनिर्देशात् । उभयनिर्देशः कर्तव्यः । कालेभ्यो भववत्कालेभ्य इति ॥ स तर्ह्युभयनिर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । भववादिति वतिना निर्देशोऽयम् । यदि च याभ्यः प्रकृतिभ्यो येन विशेषणेन भवे: प्रत्यया विहितास्ताभ्यः प्रकृतिभ्यस्तेन विशेषणेन सास्य देवतेत्यस्मिन्नर्थे भवन्ति ततोऽमी भववत्कृताः स्युः । अथ हि प्रकृतिमात्राद्वा स्युः प्रत्ययमात्रं वा स्यान्नामी भववत्कृताः स्युः ॥

महाराजप्रोष्ठपदाट्ठञ् ॥४।२।३५॥

ठञ्प्रकरणे तदस्मिन्वर्तत इति नवयज्ञादिभ्य उपसंख्यानम् ॥ १ ॥

ठञ्प्रकरणे तदस्मिन्वर्तत इति नवयज्ञादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम्। नवयज्ञो वर्ततेऽस्मिन्काले नावयज्ञिकः । पाकयज्ञिकः ॥

पूर्णमासादण् ॥ २ ॥

पूर्णमासादण्वक्तव्यः । पूर्णमासो वर्ततेऽस्मिन्काले पौर्णमासी तिथिः ॥

---

( वा. १ ) ' कोणत्याही शब्दाहून भव या अर्थी जे प्रत्यय होतात ते कालविशेषवाचक शब्दाहून ती आहे देवता ज्याची या अर्थी होतात ' असा अर्थ असेल तर सगळेच प्रत्यय होऊं लागतील.

( वा. २ ) आतां ' कालविशेषवाचक शब्दाहून भव या अर्थी जे प्रत्यय होतात ते प्रत्यय कोणत्याही शब्दाहून ती आहे देवता ज्याची या अर्थी होतात' असा अर्थ असेल तर सगळ्याच शब्दांहून ते प्रत्यय होऊं लागतील.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

'कालेभ्यो भववत्कालेभ्यः' असा कालेभ्यः याचा दोनदां निर्देश करावा.

तर मग तसा दोनदां निर्देश केला पाहिजे.

करावयास नको. कारण भववत् असा वति प्रत्ययानें निर्देश केला आहे. तेव्हां ज्या शब्दांहून जें निमित्त असतांना जे प्रत्यय ' भव ' या अर्थी होतात त्याच शब्दांहून तेंच निमित्त असतांना तेच प्रत्यय ' ती आहे देवता ज्याची ' या अर्थी केले तर ते भव या अर्थाप्रमाणें बरोबर केले असें होईल आणि जर वाटेल त्या शब्दाहून केले किंवा वाटेल ते प्रत्यय केले तर ते भव या अर्थाप्रमाणें बरोबर केले असें होणार नाहीं.

( सू. ३५ वा. १ ) या ठञ् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें नवयज्ञ वगैरे शब्दांहून 'तें आहे ज्या कालीं' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०–नवयज्ञः अस्मिन् काले वर्तते नावयज्ञिकः कालः पाकयज्ञिकः कालः.

( वा. २ ) पूर्णमास शब्दाहून 'तो होतो ज्या कालीं' या अर्थी अण् प्रत्यय होतो उदा०–पूर्णमासः वर्ततेऽस्मिन् काले पौर्णमासी तिथिः.

---

२–दिगादिभ्यो यत् ( ४।३।५४ ) यानें 'भव' म्हणजे उत्पन्न झालेला या अर्थी यत् प्रत्यय होतो. तोही कालवाचक शब्दाहून 'ती आहे देवता ज्याची' या अर्थी होऊं लागेल.

३–कालाट्ठञ् ( ४।३।११ ) यानें 'भव' या अर्थी कालविशेषवाचक शब्दाहून ठञ् प्रत्यय होतो तो इन्द्र शब्दाहूनही 'ती आहे देवता ज्याची' या अर्थी होऊं लागेल.

१–( सू. ३५ ) महाराज आणि प्रोष्ठपद या शब्दांहून 'ती आहे देवता ज्याची' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०–महाराजः देवता अस्य माहाराजिकम्, प्रौष्ठपदिकम्.

**पितृव्यमातुलमातामहपितामहाः ॥४।२।३६॥**

पितृव्यमातुलेति किं निपात्यते ।

**पितृमातृभ्यां भ्रातरि व्यड्डुलचौ ॥ १ ॥**

पितृमातृभ्यां भ्रातरि व्यड्डुलचौ प्रत्ययौ निपात्येते । पितुर्भ्राता पितृव्यः । मातुर्भ्राता मातुलः ॥

मातामहपितामहेति किं निपात्यते ।

**मातृपितृभ्यां पितरि डामहच् ॥ २ ॥**

मातृपितृभ्यां पितरि डामहच्प्रत्ययो निपात्यते । मातुः पिता मातामहः । पितुः पिता पितामहः ॥

**मातरि षिच्च ॥ ३ ॥**

षिच्च वक्तव्यः । मातामही पितामही ॥

**महो वा छन्दस्यानङोऽवग्रहदर्शनात् ॥ ४ ॥**

महो वा पुनरेष भविष्यति छन्दस्यानङोऽवग्रहदर्शनात् । छन्दस्यानङोऽवग्रहो दृश्यते । पितामह इति ॥

**अवेर्दुग्धे सोढदूसमरीसचः ॥ ५ ॥**

अवेर्दुग्धे सोढदूसमरीसच इत्येते प्रत्यया वक्तव्याः । अविसोढम् अविदूसम् अविमरीसम् ॥

**तिलान्निष्फलात्पिञ्जपेजौ ॥ ६ ॥**

तिलान्निष्फलात्पिञ्जपेजौ वक्तव्यौ । तिलपिञ्जः तिलपेजः ॥

**पिञ्जश्छन्दसि डिच्च ॥ ७ ॥**

पिञ्जश्छन्दसि डिच्च वक्तव्यः । तिल्पि-

---

(सू. ३६) पितृव्य आणि मातुल या शब्दांमध्यें काय निपातन केलें आहे ?

(वा. १) पितृ आणि मातृ या शब्दांहून 'त्याचा भाऊ' या अर्थी क्रमानें व्यत् आणि डुलच् या प्रत्ययांचें येथें निपातन केलें आहे. उदा०–पितुः भ्राता पितृव्यः, मातुर्भ्राता मातुलः.

मातामह आणि पितामह या शब्दांमध्यें काय निपातन केलें आहे ?

(वा. २) मातृ आणि पितृ या शब्दांहून 'त्याचा पिता' या अर्थी डामहच् प्रत्यय येथें निपातन केला आहे. उदा०–मातुः पिता मातामहः, पितुः पिता पितामहः.

(वा. ३) मातृ आणि पितृ या शब्दांहून त्याची माता या अर्थी डामहच् प्रत्यय होतो आणि तो प्रत्यय षित् होतो असें म्हणावें. उदा०–मातुः माता मातामही, पितुः माता पितामही.

(वा. ४) अथवा मातृ आणि पितृ या शब्दांहून मह प्रत्यय होतो आणि मातृ व पितृ शब्दांतील ऋकाराला आनङ् आदेश होतो; कारण, तेथें अवग्रह केलेला दृष्टीस पडतो. उदा०–पितामह इति पिता ऽमहः, मातामह इति माता ऽमहः

(वा. ५) अवि शब्दाहून तिचें दूध या अर्थी सोढ, दूस, आणि मरीसच् हे प्रत्यय होतात असें म्हणावें. उदा०–अवेः दुग्धम् अविसोढम् अविदूसम् अविमरीसम्. शेळीचें दूध हा या सर्व शब्दांचा अर्थ आहे.

(वा. ६) तिल शब्दाहून पिञ्ज आणि पेज हे प्रत्यय होतात, परंतु तो तीळ निष्फल असला पाहिजे. निष्फल अशा तिळाला तिलपिञ्ज किंवा तिलपेज असें म्हणतात.

(वा. ७) वेदामध्यें पिञ्ज हा प्रत्यय डित् होतो असें म्हणावें. उदा०–तिल्पिञ्जं दण्डानतम्.

---

१–(सू. ३६) पितृव्य, मातुल, मातामह आणि पितामह हे शब्द निपातन केले आहेत.

२–प्रत्यय षित् झाल्यामुळें स्त्रीत्व-विवक्षा असतांना ङीष् (४।१।४१) प्रत्यय झाला आहे.

३–सामासिक वगैरे पदांतील अवान्तर पद असेल तेथें अवग्रह करण्याची पदकारांची पद्धत आहे. अवान्तर पद शलें कीं तेथें थोडा वेळ थांबून पुढील भाग उच्चारणें याला अवग्रह म्हणतात. 'मह' प्रत्यय केला तरच मागील आकारान्ताला पदसंज्ञा (१।४।१७) होते.

अं दृष्टान्ततम् ॥

[ तस्य समूहः ॥ ४ । २ । ३७ ॥ ]

भिक्षादिभ्योऽण् ॥ ४ । २ । ३८ ॥

किमर्थं भिक्षादिषु युवतिशब्दः पठ्यते न तस्य समूहः [ ३७ ] इत्येव सिद्धम् । न सिध्यति । अनुदात्तादिलक्षणोऽञ्प्राप्त-स्तद्बाधनार्थम् ॥ अत उत्तरं पठति ।

**भिक्षादिषु युवतिग्रहणानर्थक्यं पुंवद्भावस्य सिद्धत्वात्प्रत्ययविधौ ॥१॥**

भिक्षादिषु युवतिग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । पुंवद्भावस्य सिद्धत्वात्प्रत्ययविधौ । पुंवद्भावोऽत्र भविष्यति भस्याढे तद्धिते पुंवद्भवतीति । सिद्धश्च प्रत्ययविधौ । स च सिद्धः प्रत्ययविधौ ॥

गोत्रोक्षोष्ट्रोरभ्रराजराजन्यराजपुत्रवत्समनुष्याजाद्वुञ् ॥ ४ । २ । ३९ ॥

वृद्धाच्चेति वक्तव्यम् । वृद्धानां समूहो वार्द्धकम् ॥

**अञो वुञ्पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ १ ॥**

अञो वुञ्भवति पूर्वविप्रतिषेधेन । अञोऽवकाशः । कपोत कापोतम् । वुञोऽवकाशः । ग्लुचुकायनि ग्लौचुकायनकम् म्लौचुकायनकम् । इहोभयं प्राप्नोति । औपगवकम् कापटवकम् । वुञ्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो

---

( सू. ३८ ) या भिक्षादि गणामध्यें युवति शब्द कशाकरितां घातला आहे ? तो घालूं नये. तस्य समूहः या पूर्वसूत्रानेंच तेथें अण् प्रत्यय सिद्ध होत नाहीं कां ?

पूर्वसूत्रानें सिद्ध होत नाहीं. कारण, अनुदात्तादेरञ् ( ४।२।४४ ) यानें सांगितलेला अञ् प्रत्यय हा त्या अण् प्रत्ययाचा बाध करून प्राप्त होतो. त्या अञ् प्रत्ययाचा बाध करून अण् प्रत्ययच होण्याकरितां या गणामध्यें युवति शब्द घातला आहे.

यानंतर वार्तिककार म्हणतात.

( वा. १ ) भिक्षादि गणामध्यें युवति शब्दाचा पाठ व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं भस्याढे तद्धिते ( ६।३-३५ ) यानें सांगितलेल्या पुंवद्भावानें युवति शब्दाला युवन् असें रूप प्राप्त होतें, आणि पुंवद्भाव हा तद्धित प्रत्यय कर्तव्य असतांना अगोदरच होत असतो.

( सू. ३९ ) वृद्ध शब्दाहूनही त्यांचा समूह या अर्थी वुञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०वृद्धानां समूहः वार्धकम्.

( वा. १ ) अञ् प्रत्ययापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें त्याचा बाध करून वुञ् प्रत्यय होतो. उदा०कपोतानां समूहः कापोतम्. येथें अञ् प्रत्ययाला ( ४।२।४४ ) अवकाश आहे आणि ग्लुचुकायनीनां समूहः ग्लौचुकायनकम् येथें त्याप्रमाणेंच म्लौचुकायनकम् येथें ह्या वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे. पण औपगवानां समूहः औपगवकम् तसेंच कापटवकम् येथें दोघांची प्राप्ति आली असतां पूर्वविप्रतिषेधानें वुञ् प्रत्यय होतो.

---

१—( सू. ३७ ) प्रातिपदिकाहून 'त्याचा समूह' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—काकानां समूहः काकम्.

१—( सू. ३८ ) भिक्षादि गणांतील भिक्षा वगैरे शब्दांहून 'त्यांचा समूह' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—भिक्षाणां समूहो भैक्षम्.

१—( सू. ३९ ) अपत्य—प्रत्ययान्त शब्द, आणि उक्षन्, उष्ट्र, उरभ्र, राजन्, राजन्य, राजपुत्र, वत्स, मनुष्य व अज हे शब्द यांहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा० उपगूचीं अपत्यें किंवा गोत्रापत्यें औपगव होत. त्या औपगवांच्या समुदायाला औपगवक म्हणतात.

२—येथें फिञ् प्रत्यय (४।१।१६०) झाल्यामुळें आदि उदात्त ( ६।१।१९७ ) झाला आहे. म्हणून अनुदात्तादेरञ् (४।२।४४) याची प्राप्ति नाहीं.

वक्तव्यः। न वक्तव्यः। वक्ष्यत्येतत्पूर्वोऽपि वुञ्परमञं बाधत इति ॥ अथवेष्टवाची परशब्दः। विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति ॥

ठक्तु विप्रतिषेधात् ॥ २ ॥

ठक्तु भवति विप्रतिषेधेन । ठकोऽवकाशः। सक्तु साक्तुकम् । अञः स एव। इहोभयं प्राप्नोति। आपूपिकम् शाष्कुलिकम् मौदकिकम् । ठग्भवति विप्रतिषेधेन ॥

केदाराद्यञ्च ॥ ४ । २ । ४० ॥

गणिकायाश्चेति वक्तव्यम्। गणिकानां समूहो गाणिक्यम् ॥

[ठञ् कवचिनश्च ॥ ४ । २ । ४१॥]

ब्राह्मणमाणववाडवाद्यन् ॥ ४ । २ । ४२ ॥

किमर्थं ब्राह्मणादिभ्यो यन्विधीयते न यञ्प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते । न ह्यस्ति विशेषो ब्राह्मणादिभ्यो यञो वा यनो वा। तदेव रूपं स एव स्वरः ॥ एवं तर्हि सिद्धे सति यद् ब्राह्मणादिभ्यो यनं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्येभ्योऽप्ययं भवतीति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम्। यन्प्रकरणे पृष्ठादुपसंख्यानमिति चोदयिष्यति तन्न कर्तव्यं

---

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण हा वुञ् प्रत्यय जरी पूर्वपठित आहे तरी तो पुढील अञ् प्रत्ययाचा बाध करतो असें पुढें ( ४।२।४५ पृ. १८२ ) सांगावयाचेंच आहे. अथवा विप्रतिषेधे ( १।४।२ ) या सूत्रांतील परशब्द इष्ट या अर्थाचा आहे. तेव्हां 'विरोध' उपस्थित झाला असतां दोहोंमध्यें पर म्हणजे इष्ट जें असेल तें होतें असा त्या सूत्राचा अर्थ आहे.

( वा. २ ) ठक् प्रत्यय ( ४।२।४७ ) मात्र विप्रतिषेधामुळें अञ् प्रत्ययाचा परत्वास्तव बाध करतो. सक्तूनां समूहः साक्तुकम् येथें ठक् प्रत्ययाला अवकाश आहे; अञ् प्रत्ययाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण येथें तसेंच अपूपानां समूहः आपूपिकम् शाष्कुलिकम् व मौदकिकम् येथें दोघांची प्राप्ति येते; तेव्हां त्यांमध्यें विप्रतिषेधानें ठक् प्रत्यय परत्वास्तव होतो.

(सू. ४०) गणिकायाश्चेति वक्तव्यम्. म्हणजे गणिका शब्दाहूनही हा अञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० गणिकानां समूहः गाणिक्यम्.

(सू. ४२) ब्राह्मण वगैरे शब्दांहून येथें यन् हा प्रत्यय कशाकरितां सांगितला आहे ? तो सांगू नये. पूर्व सूत्रामध्यें यञ् प्रत्यय सांगितला आहे त्याचीच येथें अनुवृत्ति होईल. कारण ह्या ब्राह्मण वगैरे शब्दांहून यञ् प्रत्यय केला काय आणि यन् प्रत्यय केला काय कांहीं फरकच होत नाहीं. रूप तेंच होतें आणि स्वरही तोच होतो. तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांनाही जो येथें आचार्यांनीं ब्राह्मण वगैरे शब्दांहून यन् प्रत्यय सांगितला आहे त्यावरून त्यांनीं असें सुचविलें आहे कीं इतर शब्दांहूनही हा यन् प्रत्यय होतो.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं ह्या यन् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें पृष्ठ शब्दाहून यन् प्रत्यय होतो असें जे पुढें उपसंख्यान केलें आहे तें करावयास

---

१—( सू. ४० ) केदार शब्दाहून 'त्यांचा समूह' या अर्थी यञ् आणि वुञ् असे प्रत्यय होतात. उदा०—केदाराणां समूहः कैदार्यम्, कैदारकम्.

१—(सू. ४१) कवचिन् आणि केदार या शब्दांहून 'त्यांच्या समुदाय' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—कवचिनां समूहः कावचिकम्, कैदारिकम्.

१—( सू. ४२ ) ब्राह्मण माणव आणि वाडव या शब्दाहून 'त्याचा समूह' या अर्थी यन् प्रत्यय होतो. उदा० ब्राह्मणानां समूहः ब्राह्मण्यम्.

भवति ॥

यत्प्रकरणे पृष्ठादुपसंख्यानम् ॥ १ ॥

यत्प्रकरणे पृष्ठादुपसंख्यानं कर्तव्यम्। पृष्ठानां समूहः पृष्ठ्यः षडहः ॥

## ग्रामजनबन्धुभ्यस्तल् ॥ ४ । २ । ४३ ॥

गजसहायाभ्यां चेति वक्तव्यम् । गजता सहायता ॥

अह्नः खः ॥ १ ॥

अह्नः खो वक्तव्यः । अह्नां समूहो ऽहीनः ॥

क्रतौ ॥ २ ॥

क्रताविति वक्तव्यम् । इह मा भूत् । आह्नाय धूतपाप्मानो भास्करा जातमृत्यवः ॥

पर्श्वाः सण् ॥ ३ ॥

पर्श्वाः सण्वक्तव्यः । पर्शूनां समूहः पार्श्वम् ॥ यदि सण्क्रियत इत्संज्ञा न प्राप्नोति। एवं तर्हि णस्वक्तव्यः ॥

## [अनुदात्तादेरञ् ॥ ४ । २ । ४४ ॥]

## खण्डिकादिभ्यश्च ॥ ४ । २ । ४५ ॥

खण्डिकशुकोलूक । किमर्थं खण्डिकादिषूलूकशब्दः पठ्यते नानुदात्तादेरित्येव सिद्धम् । न सिध्यति । चाषोलूकयोश्छ-

---

न्दसि ...

(वा.१) ह्या यत् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें पृष्ठ शब्दाहून यत् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—पृष्ठानां समूहः पृष्ठ्यः षडहः.

(सू. ४३) गजसहायाभ्यां चेति वक्तव्यम् म्हणजे गज आणि आणि सहाय या शब्दांहूनही तल् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—गजानां समूहः गजता, सहायानां समूहः सहायता.

(वा. १) अहन् शब्दाहून त्यांचा समूह या अर्थी ख प्रत्यय होतो. अह्नां समूहः अहीनः.

(वा. २) अहन् शब्दाहून जो ख प्रत्यय सांगितला आहे तो त्या एकंदर शब्दापासून क्रतु हा अर्थ गम्यमान असेल तरच होतो असें म्हणावें. कारण 'आह्नाय धूतपाप्मानो भास्करा जातमृत्यवः' येथें ख प्रत्यय न झाला पाहिजे.

(वा. ३) पर्शु शब्दाहून 'त्यांचा समूह' या अर्थी सण् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—पर्शूनां समूहः पार्श्व .

जर सण् प्रत्यय केला तर सकाराला इत्संज्ञा पाहिजे ती कशानें होईल? ती कोणत्याही सूत्रानें प्राप्त होत नाहीं.

तर मग णस् प्रत्यय सांगावा म्हणजे झालें.

(सू. ४५) या खंडिकादि गणामध्यें खण्डिक, शुक, उलूक असा पाठ आहे. येथें उलूक शब्द घातलेला दिसतो तो कशाकारितां घातला आहे? तो घालूं नये. कारण 'अनुदात्तादेरञ्' या पूर्व सूत्रानेंच तेथें अञ् प्रत्यय सिद्ध होत आहे.

तशा रीतीनें सिद्ध होत नाहीं. कारण चाष व उलूक या शब्दांचा वेदामध्यें प्रयोग पाहिला असतां तेथें आदि उदात्त स्वर दृष्टीस पडतो.

---

१—(सू. ४३) ग्राम, जन आणि बन्धु या शब्दांहून 'त्यांचा समूह' या अर्थी तल् प्रत्यय होतो. उदा० ग्रामाणां समूहः ग्रामता.

२—येथें अहन् शब्दाहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी अञ् प्रत्यय (४।२।४५) होऊन आह्न असें रूप झालें आहे.

१—(सू. ४४) ज्या शब्दांतील अचांपैकीं पहिला अच् अनुदात्त स्वराचा आहे अशा शब्दांहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा० कपोतानां समूहः कापोतम्, मयूराणां समूहः मायूरम्.

१—(४५) खण्डिका वगैरे शब्दांहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा० खण्डिकानां समूहः खाण्डिकम्.

ष्वस्याद्युदात्तः प्रयोगो दृश्यते । चाषेण किकिदीविना । यदुलूको वदति । नैतयो-श्छन्दसि सामूहिको दृश्यते यत्र च दृश्यते तत्रैतावनुदात्तादी ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । अयमौलूक्यो गोत्र तत्र गोत्राश्रयो वुञ्प्रा-प्तस्तद्बाधनार्थम् । एतदपि नास्ति प्रयोजनम्। बहुवचनान्तानां सामूहिको बहुषु च लुकत्र लुकि कृते ऽनुदात्तादेरित्येव सिद्धम् । न सिध्यति । गोत्रे ऽलुगचि (४. १. ८९) इत्यलुक् प्राप्नोति ॥

अञ्सिद्धिरनुदात्तादेः कोऽर्थः क्षुद्रक-मालवात् ।

अनुदात्तादेरित्येवाञ्सिद्धः किमर्थं क्षुद्रकमालवशब्दः खण्डिकादिषु पठ्यते । गोत्राश्रयो वुञ्प्राप्तस्तद्बाधनार्थम् ।

गोत्राद्वुञ्न च तद् गोत्रं

गोत्राद् वुञ् भवतीत्युच्यते न च क्षुद्र-कमालवशब्दो गोत्रम् । न च गोत्रसमुदायो गोत्रग्रहणेन गृह्यते । तद्यथा । जनपदसमु-दायो जनपदग्रहणेन न गृह्यते । काशि-कोसलीया इति वुञ्न भवति ॥ तदन्त-विधिना प्राप्नोति ।

---

उदा०—चाषेण किकिदीविना, यदुलूको वदति.

पण हे जे आदि उदात्त स्वर असलेले शब्द आहेत त्यांहून त्यांचा समुदाय या अर्थी प्रत्यय झालेला दिसत नाहीं. ज्यांहून प्रत्यय झालेला दृष्टीस पडतो तेथें तर त्या शब्दांतील आदि अच् अनुदात्त स्वर असलेला आहेच.

तर मग आतां या खंडिकादि गणामध्यें उलूक शब्द जो घातला आहे त्याचा उपयोग असा समजावा कीं औलूक्य असा गोत्र-प्रत्ययान्त शब्द ( ४।१।१०५ ) आहे. त्याला गोत्र-प्रत्ययान्ताहून सांगितलेला वुञ् प्रत्यय (४।२।-३९ ) प्राप्त होतो. त्याचा बाध करून अञ् प्रत्ययच झाला पाहिजे.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण समूह या अर्थी प्रत्यय होणार तो बहुवचनी प्रत्यय केल्यानंतरच होणार, आणि बहुत्व-विवक्षा असतांना तर त्या अञ् प्रत्ययाचा लुक् होणार, तेव्हां लुक् केल्यानंतर अनुदात्तादेरञ् या पूर्व सूत्रानेंच अञ् प्रत्यय सिद्ध होत आहे.

तसा अञ् प्रत्यय येथें सिद्ध होत नाहीं. कारण गोत्रेऽलुगचि ( ४।१।८९ ) यानें लुकाचा निषेध होत आहे.

( श्लो. १ ) या खंडिकादि गणामध्यें क्षुद्रकमालव या शब्दाहून जो अञ् प्रत्यय सांगितला आहे त्याचा काय बरें उपयोग ? कारण अनुदात्तादेरञ् या पूर्वसूत्रानेंच अञ् प्रत्यय सिद्ध होतें आहे.

गोत्र-प्रत्ययान्ताहून वुञ् प्रत्यय ( ४।२।-३९ ) सांगितला आहे. त्याचा बाध करून अञ् प्रत्यय होण्याकरितां ह्या गणामध्यें क्षुद्रकमालव हा घातला आहे.

पण गोत्र-प्रत्ययान्ताहून वुञ् सांगितला आहे ना ? आणि 'क्षुद्रकमालव' हा शब्द तर गोत्रप्रत्ययान्त नव्हे. कारण गोत्रांच्या समुदायाला कांहीं गोत्र म्हणतां येत नाहीं. जनपदांच्या समुदायाला लोकामध्यें जनपद असें म्हणत नाहींत. म्हणूनच काशिकोस-लीयाः येथें वुञ् प्रत्यय ( ४।२।१२४ ) होत नाहीं.

पण तदन्तविधीनें प्राप्त होत आहे ना ?

---

२—बहुत्व-विवक्षा असतांना गोत्रापत्य अर्थी केलेल्या यञ् प्रत्ययाचा लुक् ( २।४।६४ ) झाल्यानंतर राहिलेला जो उलूक शब्द तो या गणांत आहे असा अभिप्राय आहे.

३—यञ् प्रत्ययाचा लुक् झाल्यामुळें ञ्नित्यादि० ( ६।१।१९७ ) यानें आदि उदात्त होत नाहीं.

४—क्षुद्रक शब्दाहून बहुत अपत्यें या अर्थी अञ् ( ४।१।१६८ ) हा तद्राज प्रत्यय झाल्यानंतर [illegible] समास होऊन क्षुद्रकमालव या सामासिक शब्दाचा अन्त उदात्त ( ६।१।२२३ ) झाला आहे. तेव्हां आदि अनुदात्त होतो.

**तदन्तान्न स सर्वतः ॥ १ ॥**

परिगणितेषु कार्येषु तदन्तविधिर्न चेदं तत्र परिगण्यते ॥

**ज्ञापकं स्यात्तदन्तत्वे**

एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यो भवतीह तदन्तविधिरिति ॥

**तथा चापिशलेर्विधिः ।**

एवं च कृत्वापिशलेराचार्यस्य विधिरुपपन्नो भवति । धेनुरनञि कमुत्पादयति । धेनूनां समूहो धैनुकम् । अनञीति किमर्थम् । अधेनूनां समूह आधेनवम् ॥

**सेनायां नियमार्थं वा**

अथवा नियमार्थोऽयमारम्भः । क्षुद्रकमालवशब्दात्सेनायामेव । क्व मा भूत् । क्षौद्रकमालवकमन्यदिति ॥

**यथा बाध्येत वाञ्वुञा ॥ २ ॥**

अथवा ज्ञापयत्याचार्यः पूर्वोऽपि वुञ् परमञं बाधत इति ॥ ननु चोक्तं गोत्राद्वुञ् न च तद्गोत्रमिति। तदन्तविधिना प्राप्नोति। ननु चोक्तं तदन्तान्न स सर्वत इति । ज्ञापकं स्यात्तदन्तत्वे । एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यो भवतीह तदन्तविधिरिति ॥ कथं पुनरेतदुभयं शक्यं ज्ञापयितुं भवति च तदन्तविधिः पूर्वश्च वुञ् परमञं बाधत

---

तदन्तविधीनें सर्व ठिकाणीं प्रत्यय होत नाहींत. कांहीं ठरीविक कार्यांविषयींच तदन्तविधि होत असतो. आणि हें तर ठराविक कार्यांमध्यें गणलेलें कार्य नाहीं.

( श्लो. २ ) तर मग आचार्यांनीं जो ह्या गणामध्यें क्षुद्रकमालव शब्दाचा पाठ केला आहे त्यावरून त्यांनीं येथें तदन्तविधि होतो असें सुचविलें आहे. आणि ह्या प्रकरणामध्यें तदन्तविधि होतो असें समजलें म्हणजे आपिशलि आचार्यांनीं केलेला विधि जुळतो. तो विधि म्हणजे मागें नञ् नसेल तर धेनु शब्दाहून 'क' हा प्रत्यय होतो. उदा० धेनूनां समूहः धैनुकम्.

मागें नञ् नसावा[6] असें येथें कशाकरितां म्हटलें आहे ?

अधेनूनां समूहः आधेनवम् येथें क प्रत्यय न झाला पाहिजे.

अथवा क्षुद्रकमालव शब्दाहून जो पूर्व सूत्रानें अञ् प्रत्यय होणार तो सेना अर्थ असेल तरच होतो असा नियम[7] होण्याकरितां ह्या गणामध्यें तो शब्द घातला आहे. आणि असा नियम केल्यामुळें सेना अर्थ नसेल त्या ठिकाणीं क्षौद्रकमालवकम् असा प्रयोग होतो. तेथें अञ् प्रत्ययच होत नाहीं.

अथवा आचार्यांनीं जो ह्या गणामध्यें क्षुद्रकमालव शब्दाचा पाठ केला आहे त्यावरून त्यांनीं असें सुचविलें आहे कीं अञ् प्रत्यय ( ४।२।४४ ) जरी पर आहे तरी पूर्वीं सांगितलेला असूनही वुञ् (४।२।३९) प्रत्यय त्याचा बाध करतो.

पण गोत्र–प्रत्ययान्ताहून वुञ् सांगितलेला आहे, आणि 'क्षुद्रकमालव' एवढा शब्द तर गोत्र–प्रत्ययान्त नव्हे असें सांगितलें आहे ना ?

तरी पण तदन्तविधीनें प्राप्त होत आहे.

तदन्तविधि हा ठराविक कांहीं ठिकाणींच होतो सर्व ठिकाणीं होत नाहीं असेंही पण सांगितलेंच आहे.

तर मग त्या गणपाठांतील क्षुद्रकमालव शब्दाच्या पाठावरून ह्या प्रकरणामध्यें तदन्तविधि होतो असें आचार्यांनीं ज्ञापित केलें आहे.

पण त्या गणामध्यें केलेल्या क्षुद्रकमालव शब्दाच्या पाठावरून ह्या प्रकरणामध्यें 'तदन्तविधि होतो' आणि 'पूर्वीं सांगितलेला वुञ्

---

५—मागें १।१।७२ वा. ४ पहा.

६–धेनु शब्दाहून ठक् प्रत्ययाला क आदेश (७।३।५१) होतो. या ठिकाणीं आपिशलि आचार्यांनीं 'क' प्रत्ययच सांगितला आहे व मागें नञ् नसावा असें म्हटलें आहे.

७—हा नियम येथें पुढें (वा. १) केला आहे

इति । उभयं ज्ञाप्यते ॥

अञ्प्रकरणे क्षुद्रकमालवात्सेनासंज्ञायाम् ॥ १ ॥

अञ्प्रकरणे क्षुद्रकमालवात्सेनासंज्ञायामिति वक्तव्यम् । क्षौद्रकमालवी सेना चेत् । क मा भूत् । क्षौद्रकमालवकमन्यदिति ॥

[चरणेभ्यो धर्मवत् ॥ ४।२।४६॥
अचित्तहस्तिधेनोष्ठक् ॥४।२।४७॥
केशाश्वाभ्यां यञ्छावन्यतरस्याम् ॥ ४।२।४८ ॥ ]

पाशादिभ्यो यः ॥ ४।२।४९ ॥

पाशतृणधूमवात ।

पृथग्वातादर्शनादसमूहः ॥ १ ॥

पृथग्वातादर्शनादयुक्तोऽयं सामूहिकः । न हि पृथग्वाता दृश्यन्ते ॥ न तर्हीदानीमिदं भवति वात्येति । भवति

शीघ्रत्वे तु ॥ २ ॥

शीघ्रो वातो वात्या ॥ अथवा पृथग्वाता अपि दृश्यन्ते । तद्यथा । पूर्वो वातः । उत्तरो वातः । सर्वतो वातः । वाता वान्तु दिशो दश ॥

खलगोरथात् ॥ ४।२।५० ॥

इनित्रकट्यचश्च ॥ ४।२।५१ ॥

---

प्रत्यय पुढें सांगितलेल्याही अञ् प्रत्ययाचा बाध करतो' ह्या दोन्ही गोष्टी कशा बरें सुचविल्या जातील ?

दोन्ही गोष्टी सुचवितां येतात ?

(वा. १) ह्या अञ् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें क्षुद्रकमालव शब्दाहून त्यांचा समुदाय या अर्थी अञ् प्रत्यय होतो परंतु तो प्रत्ययान्त शब्द सेनेची संज्ञा असेल तर असें म्हणावें. तेव्हां सेना अर्थ असेल तर क्षौद्रकमालवी असें होतें. सेना अर्थ नसेल व दुसरा अर्थ असेल तर क्षौद्रकमालवकम् असें रूप होतें. येथें अञ् प्रत्यय न झाला पाहिजे.

(सू. ४९) पाश, तृण, धूम, वात असा ह्या गणामध्यें वात शब्द दिसतो. परंतु—

(वा. १) निरनिराळे अनेक वात दिसत नाहींत म्हणून वात शब्दाहून त्यांचा समुदाय या अर्थी प्रत्यय सांगणें योग्य होत नाहीं.

तर मग वात्या असा शब्द होत नाहींच काय ?

होतो, पण—

(वा. २) शीघ्र गमन करणाऱ्या वाऱ्याला वात्या म्हणतात. अथवा निरनिराळे अनेक वारेही दिसतात. उदा० हा पूर्वेकडील वारा, हा उत्तरेचा वारा, हा सर्व दिशांनीं वाहणारा वारा. तसेंच,'दाही दिशांनीं वारे वाहोत' असे प्रयोग लोकांमध्यें आहेत.

---

१—(सू. ४६) शाखाविशेषवाचक शब्दांहून धर्म या अर्थी जे प्रत्यय (४।३।१२० वा. ११) होतात ते प्रत्यय त्याच शब्दाहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी होतात. उदा० कठानां धर्मः काठकम्, कठानां समूहः काठकम्

१—(सू. ४७) प्राणिभिन्नवाचक शब्द आणि हस्तिन् व धेनु हे शब्द, यांहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०अपूपानां समूहः आपूपिकम्. हास्तिकम्.

१—(सू. ४८) केश व अश्व या शब्दांहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी क्रमानें यञ् व छ हे प्रत्यय विकल्पानें होतात. उदा०केशानां समूहः कैश्यम्, कैशिकम्; अश्वानां समूहः अश्वीयम्, आश्वम्.

१ (सू. ४९)—पाशादि गणांतील पाश वगैरे शब्दांहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी य प्रत्यय होतो. उदा० पाशानां समूहः पाश्या.

१ (सू. ५०)—खल, गो आणि रथ या शब्दांहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी य प्रत्यय होतो. उदा० खलानां समूहः खल्या, गव्या, रथ्या.

१ (सू. ५१)—खल, गो आणि रथ या तीन शब्दांहून 'त्यांचा समुदाय' या अर्थी इनि, त्र आणि कट्यच् हे तीन प्रत्यय क्रमानें होतात. उदा० खलिनी, गोत्रा, रथकट्या.

खलादिभ्य इनिर्वक्तव्यः। खलिनी ऊकिनी कुन्दुमिनीति ॥

विषयो देशे ॥ ४।२।५२ ॥

विषयाभिधाने जनपदे लुब्बहुवचनविषयात् ॥ १ ॥

विषयाभिधाने जनपदे लुब्बहुवचनविषयाद्वक्तव्यः। अङ्गानां विषयो ऽङ्गाः। वङ्गाः सुह्माः पुण्ड्राः ॥

गान्धार्यादिभ्यो वा ॥ २ ॥

गान्धार्यादिभ्यो वेति वक्तव्यम्। गान्धारः गान्धारयः। वासातः वसातयः। शैबः शिवयः ॥

राजन्यादिभ्यो वा वुञ् ॥ ३ ॥

राजन्यादिभ्यो वा वुञ्वक्तव्यः। राजन्याः राजन्यकः। दैवयातवाः दैवयातवकः ॥

बैल्ववनादिभ्यो नित्यम् ॥ ४ ॥

बैल्ववनादिभ्यो नित्यमिति वक्तव्यम्। बैल्ववनकः आम्बरीषपुत्रकः आत्मकामेयकः।

तत्तर्हीदं बहु वक्तव्यम्।

न वाभिधेयस्य निवासविषयत्वान्निवासविवक्षायां लुब्विषयविवक्षायां प्रत्ययः ॥ ५ ॥

न वा वक्तव्यम्। किं कारणम् अभिधेयस्य निवासविषयत्वात्। यदभिधेयं स निवासश्च विषयश्च। अभिधेयस्य निवासविषयत्वान्निवासविवक्षायां लुब् विषयविवक्षायां प्रत्ययो भविष्यति ॥ इदं तर्हि

---

(सू. ५१ वा. १) खल वगैरे शब्दांहून हा इनि प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०— खलिनी, डाकिनी कुन्दुमिनी.

(सू. ५२ वा. १) बहुवचनान्त शब्दांच्या पुढील विषय या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुप् होतो पण एकंदर शब्दाचा अर्थ जनपद असला पाहिजे. उदा०— अङ्गानां विषयो देशः अङ्गाः, वङ्गाः, सुह्माः, पुण्ड्राः.

(वा. २) गान्धारि वगैरे शब्दांहून विषय या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुप् विकल्पानें होतो, असें म्हणावें. उदा० गान्धारः, गान्धारयः; वासातः, वसातयः; शैबः, शिवयः.

(वा. ३) राजन्य वगैरे शब्दांहून त्यांचा विषय देश या अर्थी वुञ् प्रत्यय विकल्पानें होतो असें म्हणावें. उदा०—राजन्याः राजन्यकः; दैवयातवाः दैवयातवकः.

(वा. ४) बैल्ववन वगैरे शब्दांहून त्याचा विषय या अर्थी वुञ् प्रत्यय नित्य होतो असें म्हणावें. उदा० बैल्ववनकः, आम्बरीषपुत्रकः, आत्मकामेयकः.

तर मग कोठें नित्य लुप् होतो, कोठें विकल्पानें लुप् होतो तसेंच कोठें वुञ् प्रत्यय नित्य होतो, असें निरनिराळ्या तऱ्हेनें पुष्कळ सांगितलें पाहिजे.

(वा. ५) अथवा तसें हें कांहीं सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं प्रत्ययाचा अर्थ हा निवास आणि विषय असा दोन प्रकारचा आहे आणि तो असा दोन प्रकारचा असल्यामुळें निवासाची विवक्षा असेल त्या वेळीं लुप् (४।२।८१) होईल आणि विषयाची विवक्षा असेल त्यावेळीं प्रत्यय होईल.

तर मग आतां हें सांगण्याचा उपयोग

---

१ (सू. ५२)—प्रातिपदिकाहून 'त्याचा विषय' या अर्थी अण् प्रत्यय होतो परंतु तो विषय देश असला पाहिजे. विषय म्हणजे संबंधी पदार्थ, उदा० शिबीनां विषयः शैबः देशः.

२—अङ्ग राजाची बहुत अपत्यें या अर्थी केलेल्या अण् (४।१।१७०) या तद्राज प्रत्ययाचा लुप् (२।४।६२) झाला आहे. तेव्हां त्या अर्थाचा अङ्ग हा शब्द नित्य बहुवचनीच चालतो.

३—त्याचा निवास या अर्थी अण् प्रत्यय (४।२।६९) सांगितला आहे. आणि देश वाच्य असतांना त्याचा लुप् (४।२।८१) सांगितला आहे. येथें त्याचा विषय देश या अर्थी

प्रयोजनमेतद्व्याख्यामीह नित्यो विधिरिह विभाषेति। एतदपि नास्ति प्रयोजनम्। यावता यद्भिदेयं स निवासश्च विषयश्चाभिधेयस्य निवासविषयत्वान्निवासविवक्षायां लुब् विषयविवक्षायां प्रत्ययः॥

[ राजन्यादिभ्यो वुञ्॥ ४।२।५३॥

भौरिक्याद्यैषुकार्यादिभ्यो विधल्भक्तलौ ॥ ४ । २ । ५४ ॥ ]

सोऽस्यादिरिति च्छन्दसः प्रगाथेषु ॥ ४ । २ । ५५ ॥

छन्दसः प्रत्ययविधाने नपुंसकात्स्वार्थ उपसंख्यानम् ॥ १ ॥

छन्दसः प्रत्ययविधाने नपुंसकात्स्वार्थ उपसंख्यानं कर्तव्यम्। त्रिष्टुबेव त्रैष्टुभम् अनुष्टुबेवानुष्टुभम् जगत्येव जागतम् ॥

[ संग्रामे प्रयोजनयोद्धृभ्यः ॥ ४ । २ । ५६ ॥

तदस्यां प्रहरणमिति क्रीडायां णः ॥ ४ । २ । ५७ ॥

घञः सास्यां क्रियेति ञः ॥ ४ । २ । ५८ ॥ ]

---

येथें नित्य विधि व येथें विकल्प हा विभाग समजणें हा आहे.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं; कारण, प्रत्ययाचे अर्थ निवास व विषय असे दोनच येथें संभवतात, तेव्हां निवास अर्थाची विवक्षा असेल तेव्हां लुप् आणि विषय अर्थाची विवक्षा असेल तेव्हां प्रत्यय होईल असें समजेलच.

( सू. ५५ वा. १ ) वृत्त-वाचक शब्दाहून प्रत्यय सांगणाऱ्या ह्या प्रकरणामध्यें वृत्त-वाचक शब्दाहून नपुंसकलिंगी स्वार्थीं अण् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—त्रिष्टुबेव त्रैष्टुभम्, अनुष्टुबेव आनुष्टुभम्, जगत्येव जागतम्.

---

प्रत्यय सांगितला आहे. निवास म्ह. राहण्याचा देश. त्या देशावर त्याची मालकी आहे की नाही हे मोघम राहतें. आणि विषय देश म्ह. मालकीचा देश. त्या देशामध्यें ते राहतात किंवा नाहीं हें मोघम राहते. तरी पण अङ्ग वगैरेंचा राहण्याचा व मालकीचा देश एकच आहे. तेव्हां कोणत्याही अर्थी प्रत्यय केला तरी त्या देशाचा बोध होईल. तद्धित प्रत्यय हे प्रयोगाला अनुसरूनच होत असतात. तेव्हां येथें अशीं व्यवस्था समजावी कीं अङ्ग वगैरेंहून ' निवास ' याच अर्थी प्रत्यय, गान्धारी वगैरे शब्द व राजन्य वगैरे शब्द यांहून पाळीपाळीनें निवास व विषय या दोन्ही अर्थी प्रत्यय, आणि बैल्ववन वगैरे शब्दांहून विषय याच अर्थी प्रत्यय होतात.

१ (सू. ५३)—मागील सूत्रावरील वा. ३ पहा. ते वार्तिकच या शब्द वगळून सूत्रपाठामध्यें घातलें आहे.

१ ( सू. ५४ )—भौरिकि वगैरे भौरिक्यादि गणांतील शब्द आणि ऐषुकारि वगैरे ऐषुकार्यादि गणांतील शब्द यांहून ' त्यांचा विषय देश ' या अर्थी क्रमानें विधल् आणि भक्तल् असे प्रत्यय होतात. उदा० भौरिकीणां विषयो देशः भौरिकिविधः, ऐषुकारिभक्तः.

१ (सू. ५५ )— वृत्तविशेषवाचक गायत्री पङ्क्ति वगैरे शब्दांहून ' त्या वृत्ताची ऋचा आहे आरंभी ज्या प्रगाथाच्या ' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा० पङ्क्तिः आदिरस्य पाङ्क्तः प्रगाथः. कांहीं ऋक्-समुदाय-विशेषांची प्रगाथ ही संज्ञा आहे.

१—( सू. ५६ ) प्रयोजनवाचक किंवा योद्धृ-वाचक शब्दाहून ' तें आहे प्रयोजन ज्या युद्धाचें ' किंवा ' ते आहेत योद्धे ज्या युद्धाचें ' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा० सुभद्रा प्रयोजनमस्य सौभद्रः सङ्ग्रामः. भरताः योद्धारः अस्य भारतः संग्रामः.

१—( सू. ५७ )प्रहरण म्ह. प्रहार करण्याचें साधन. प्रहरणविशेषवाचक शब्दाहून ' तें आहे प्रहरण ज्या क्रीडेमध्यें ' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—दण्डः प्रहरणमस्यां क्रीडायां दाण्डा.

१—( सू ५८ ) घञ्-प्रत्ययान्त प्रातिपदिकाहून ' ती आहे क्रिया जीमध्यें ' या अर्थी ञ प्रत्यय होतो. उदा०—श्येनपातः अस्यां वर्तते श्यैनंपाता मृगया.

**तदधीते तद्वेद ॥ ४ । २ । ५९ ॥**

किमर्थमिमावुभावर्थौ निर्दिश्येते न योऽधीते वेत्त्यप्यसौ यस्तु वेत्त्यधीते ऽप्यसौ। नैतयोरावश्यकः समावेशः। भवति हि कश्चित्संपाठं पठति न च वेत्ति कश्चिच्च वेत्ति न च संपाठं पठति ॥

**क्रतूक्थादिसूत्रान्ताट्ठक् ॥ ४ । २ । ६० ॥**

उक्थादीत्युच्यते कान्युक्थानि। सामानि। यद्येवं सामगमात्र औक्थिक इति प्राप्नोति। नैष दोषः। तादर्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति। उक्थार्थमुक्थम् ॥

इहोक्थान्यधीत औक्थिकः यज्ञमधीते याज्ञिकः य इदानीमौक्थिक्यं याज्ञिक्यं चाधीते कथं तत्र भवितव्यम्। औक्थिकः याज्ञिक इत्येव भवितव्यम्। कथम्।

तस्येदंप्रत्ययाल्लुक्। तस्येदंप्रत्याल्लुग्वक्तव्यः। इहास्माभिस्त्रैशब्द्यं साध्यम्।

(सू. ५९) येथें हे निरतिराळे दोन अर्थ कशाकरितां उच्चारले आहेत? तसे उच्चारावयास नकोत. कारण, जो मनुष्य जें अध्ययन करतो तें तो मनुष्य जाणीत असतोच. तसेंच जो जें जाणतो त्याचें तो अध्ययन करतोच.

पण ह्या दोन्ही गोष्टी प्रत्येक ठिकाणीं असतातच असा कांहीं नियम नाहीं. कारण असेंही दृष्टीस पडतें कीं, एखादा मनुष्य ग्रन्थ तोंडपाठ म्हणतो पण त्याला त्यांतलें काहीं कळत नाहीं. तसेंच एखाद्या मनुष्याला एखादी गोष्ट कळते पण त्याला तोंडपाठ कांहींच येत नाहीं.

(सू. ६०) येथें उक्थादि असें म्हटलें आहे. पण उक्थ म्हणजे काय?

उक्थ म्ह. साम.

पण असें असेल तर केवळ साम गाणाऱ्यालाही औक्थिक म्हणावें लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण त्याच्याकरितां जें असतें त्याला तो शब्द जसा लावतां येतो तसा येथें उक्थाकरितां जें प्रातिशाख्य त्याला उक्थ शब्द लावतां येईल.

बरें, तर त्या उक्थाचें जो अध्ययन करतो तो औक्थिक होय. तसेंच यज्ञाचें जो अध्ययन करतो तो याज्ञिक होय. पण त्या औक्थिक व याज्ञिक शब्दांहून 'तस्येदम्' म्हणजे 'त्याचें हें' या अर्थीं ञ्य प्रत्यय (४।३।१२९) केला असतां औक्थिक्य व याज्ञिक्य असे जे शब्द उक्थ व यज्ञ या अर्थी होतात त्या औक्थिक्य व याज्ञिक्य शब्दांहून 'त्याचें अध्ययन करतो' या अर्थीं प्रत्यय केला तर कशीं रूपें होतील?

औक्थिकः व याज्ञिकः अशींच रूपें तेथें झालीं पाहिजेत.

पण तीं रूपें कशीं बरें साधावीं?

तस्येदंप्रत्ययाल्लुक् म्हणजे 'तस्येदम्' या अर्थीं प्रत्यय केल्यानंतर त्याच्या पुढें प्रकृत अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो, आणि तस्येदम् या अर्थी केलेल्या प्रत्ययाचाही लुक् होतो असें म्हणावें.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण येथें एकंदर तीन प्रकारचा शब्दप्रयोग होतो, तो

---

१ (सू. ५९)—प्रातिपादिकाहून 'तें अध्ययन करतो' किंवा 'तें जाणतो' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा० व्याकरणमधीते वैयाकरणः. मुहूर्तं वेद मौहूर्तः.

१—(सू. ६०) क्रतुविशेषवाचक शब्द, उक्थादि गणांतील उक्थ वगैरे शब्द आणि सूत्र शब्द अंतीं असलेले शब्द यांहून 'तें अध्ययन करतो' किंवा 'तें जाणतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा. आग्निष्टोमिकः. अग्निष्टोम नांवाचा क्रतु जाणणारा किंवा अग्निष्टोमप्रतिपादक ग्रंथाचें अध्ययन करणारा असा अर्थ आहे. उक्थमधीते औक्थिकः. उक्थ शब्दाचा अर्थ येथें 'ज्या ग्रंथामध्यें उक्थ सामाची माहिती आहे तो ग्रंथ' असा गौण आहे. संग्रहसूत्रमधीते सांग्रहसूत्रिकः.

औक्थिक्यमधीते उक्थान्यधीते औक्थिक इति। तत्र द्वयोः समानार्थयोरेकेन विग्रहो ऽपरस्मादुत्पत्तिर्भविष्यत्यविरविकन्यायेन। तद्यथा। अवेर्मांसमिति विगृह्याविकशब्दादुत्पत्तिर्भवति आविकमिति। एवमुक्थान्यधीत इति विगृह्यौक्थिक इति भविष्यत्यौक्थिक्यमधीते इति विगृह्य वाक्यमेव॥

विद्यालक्षणकल्पसूत्रान्तादकल्पादेरिकक्स्मृतः॥

विद्या। वायसविद्यिकः। विद्या॥ लक्षण गौलक्षणिकः आश्वलक्षणिकः। लक्षण॥ कल्प। पाराशरकल्पिकः पारकल्पिकः। कल्प॥ सूत्र। वार्त्तिकसूत्रिकः सांग्रहसूत्रिकः। अकल्पादेरिति किमर्थम्। काल्पसूत्रः।

विद्या चानङ्गक्षत्रधर्मत्रिपूर्वा॥

विद्याचानङ्गक्षत्रधर्मत्रिपूर्वेति वक्तव्यम्। आङ्गविद्यः क्षात्रविद्यः धार्मविद्यः त्रैविद्यः।

आख्यानाख्यायिकेतिहासपुराणेभ्यश्च ठग्वक्तव्यः॥ यावक्रीतिकः प्रैयङ्गविकः यायातिकः। आख्यान॥ आख्यायिका। वासवदत्तिकः सौमनोत्तरिकः॥ ऐतिहासिकः पौराणिकः।।

## सर्वसादेर्द्विगोश्च लः।

सर्वसादेर्द्विगोश्च लो वक्तव्यः। सर्ववेदः सर्वतन्त्रः। सवार्त्तिकः ससंग्रहः। पञ्च-

---

साधावयाचा आहे. उक्थान्यधीते, औक्थिक्यमधीते हीं दोन प्रकारचीं वाक्यें होत; आणि त्या अर्थी औक्थिकः ही तद्धित-वृत्ति होय. येथें उक्थ आणि औक्थिक्य हे जे सारख्या अर्थाचे दोन शब्द त्यांपैकीं औक्थिक्य या शब्दानें फक्त विग्रहच दाखवावयाचा आहे आणि तद्धित प्रत्यय हा उक्थ या शब्दाहून करावयाचा आहे. ही गोष्ट अविरविकन्यायानें साधते. जसें अवेः मांसम् असा अवि शब्दानें फक्त विग्रह दाखवून त्या अर्थी तद्धित प्रत्यय करणें तो अविक शब्दाहूनच केला जातो आणि आविकम् अशी वृत्ति होते तसें येथेंही उक्थानि अधीते असा विग्रह करून उक्थ शब्दाहून प्रत्यय होऊन औक्थिकम् असें होतें, आणि औक्थिक्यमधीते असा विग्रह केला तर तेथें त्या अर्थी औक्थिक्य शब्दाहून प्रत्यय न होतां तसें वाक्यच राहते.

विद्यालक्षणकल्पसूत्रान्तादकल्पादेरिकक् स्मृतः म्हणजे विद्या, लक्षण, कल्प, आणि सूत्र हे शब्द शेवटीं असलेला आणि कल्प शब्द ज्याच्या आरंभीं नाहीं असा जो शब्द त्याहून अधीते किंवा वेत्ति या अर्थी इकक् प्रत्यय होतो. उदा०—वायसविद्यामधीते वेत्ति वा वायसविद्यिकः. त्याचप्रमाणें गौलक्षणिकः, आश्वलक्षणिकः, पाराशरकल्पिकः, पारकल्पिकः, वार्तिकसूत्रिकः सांग्रहसूत्रिकः हीं रूपें होतात.

कल्प शब्द आरंभीं नसावा असें कशाकरितां म्हटलें आहे?

कल्पसूत्रमधीते काल्पसूत्रः येथें इकक् प्रत्यय न होण्याकरितां म्हटलें आहे.

विद्या चानङ्गक्षत्रधर्मत्रिपूर्वा म्हणजे अङ्ग, क्षत्र, धर्म आणि त्रि हे शब्द ज्याच्या पूर्वी आहेत असा जो विद्या हा शब्द तदन्ताहून इकक् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. उदा०—आङ्गविद्यः, क्षात्रविद्यः, धार्मविद्यः, त्रैविद्यः.

आख्यानाख्यायिकेतिहासपुराणेभ्यश्च ठग्वक्तव्यः म्हणजे आख्यानविशेषवाचक शब्द, आख्यायिकावाचक शद्ब आणि इतिहास व पुराण हे शब्द यांहून अध्ययन करतो किंवा जाणतो या अर्थी इकक् प्रत्यय होतो असें म्हणावें यावक्रीतिकः, प्रैयङ्गविकः, यायातिकः हीं उदाहरणें आख्यानाचीं होत. वासवदत्तिकः, सौमनोत्तरिकः हीं आख्यायिकेचीं होत. ऐतिहासिकः व पौराणिकः हीं इतिहास व पुराण शब्दांचीं होत.

सर्व किंवा स हे शब्द आदि असलेला किंवा द्विगुसंज्ञक असा जो सामासिक शब्द त्याहून अध्ययन करतो किंवा जाणतो या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो. उदा०

कल्पः द्वितन्त्रः ॥

अनुसूर्लक्ष्यलक्षणे सर्वसादेर्द्विगोश्च लः इकन्पदोत्तरपदाच्छतषष्टेः षिकन्पथः

## [ क्रमादिभ्यो वुन् ॥ ४।२।६१ ॥ ॥ अनुब्राह्मणादिनिः ॥ ४।२।६२ ]

अयं योगः शक्योऽवक्तुम् । कथमनुब्राह्मणी अनुब्राह्मणिनौ अनुब्राह्मणिनः । इनिनैतन्मत्वर्थीयेन सिद्धम् ॥

## वसन्तादिभ्यष्ठक् ॥ ४।२।६३ ॥

अयुक्तोऽयं निर्देशः । अधीते वेदेति वर्तते न च वसन्तो नामाध्ययनमस्ति ॥ नैष दोषः । साहचर्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । वसन्तसहचरितमध्ययनं वसन्तोऽध्ययनमिति ॥

## प्रोक्ताल्लुक् ॥ ४।२।६४ ॥

अयुक्तोऽयं निर्देशः । प्रौक्तादिति भवि-

---

सर्ववेदः, सर्वतन्त्रः, सवार्तिकः, ससंग्रहः, पञ्चकल्पः, द्वितन्त्रः, द्विवेदः हीं आख्यायिकेचीं उदाहरणें होत. ऐतिहासिकः व पौराणिकः हीं इतिहास व पुराण शब्दांचीं होत.

( श्लोक. १ ) अनुसू, लक्ष्य आणि लक्षण या शब्दांहून ठक् प्रत्यय होतो. सर्व किंवा स हे शब्द आरंभीं असलेल्या शब्दाहून तसेंच द्विगुसमासाहून प्रत्ययाचा लुक् होतो. तसेंच पद शब्द उत्तरपद असलेला जो शब्द त्याहून इकन् प्रत्यय होतो. आणि शत किंवा षष्टि या शब्दांच्या पुढील जो पथिन् शब्द तो शेवटीं असलेल्या सामासिक शब्दाहून षिकन् प्रत्यय होतो.

(सू. ६२ ) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल. पण सूत्र केलें नाहीं तर अनुब्राह्मणी अनुब्राह्मणिनौ अनुब्राह्मणिनः हीं रूपें कशीं साधतील ?

मत्वर्थीय इनि (५ । २ । ११५) प्रत्ययानें साधतील.

( सू. ६३ ) ह्या प्रकरणामध्यें वसन्त वगैरे शब्दांहून प्रत्यय सांगणें बरें दिसत नाहीं. कारण अधीते व वेद या अर्थांची येथें अनुवृत्ती आहे. आणि वसन्त म्हणून अध्ययन करण्यासारखा एखादा ग्रंथ मुळींच नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण ज्या दोघांचें साहचर्य असतें त्यांतील एका अर्थाचा शब्द दुसऱ्या अर्थींही उपयोगांत येतो. तेव्हां वसन्तसहचरित ग्रंथाला वसन्त असें येथें म्हटलें आहे.

( सू. ६४ ) येथें प्रोक्तात् हें म्हणणें बरोबर दिसत नाहीं. प्रौक्तात् असें म्हटलें

---

२—‘ अनुसू ’ नांवाचा एक ग्रंथ आहे अनुस्वम् अधीते आनुसुकः. येथें प्रत्ययाला क आदेश ( ७।३।५१ ) आणि ऱ्हस्व ( ७।४।१३ ) झाला आहे. लक्ष्यमधीते लाक्ष्यिकः; लक्षणमधीते लाक्षणिकः पूर्वपदमधीते पूर्वपदिकः., शतपथमधीते शतपथिकः, शतपथिकी; षष्टिपथिकः षष्टिपथिकी.

१ ( सू. ६१ )—क्रमादि गणांतील क्रम वगैरे शब्दांहून अधीते किंवा वेत्ति या अर्थीं वुन् प्रत्यय होतो. उदा. क्रमकः.

१–( सू. ६२ ) अनुब्राह्मण शब्दाहून अधीते किंवा वेत्ति या अर्थीं इनि प्रत्यय होतो. अनुब्राह्मणमधीते अनुब्राह्मणी, अनुब्राह्मणिनौ, ब्राह्मण ग्रंथासारखा जो ग्रंथ त्याला अनुब्राह्मण म्हणतात.

( सू ६३ )१– वसन्त वगैरे शब्दांहून अधीते किंवा वेत्ति या अर्थीं ठक् प्रत्यय होतो. उदा०—वसन्तमधीते वासन्तिकः. ज्या ग्रंथामध्यें वसन्त ऋतूचें वर्णन केलें आहे किंवा वसन्त ऋतूमध्यें ज्या ग्रंथाचें अध्ययन केलें जातें तो ग्रंथ येथें वसन्त शब्दाचा अर्थ आहे.

( सू ६४ )१– प्रोक्त या अर्थीं केलेल्या प्रत्ययाच्या पुढील जो अधीते किंवा वेत्ति या अर्थाचा प्रत्यय त्याचा लुक् होतो. उदा०— पाणिनिना प्रोक्त पाणिनीयम् ( ४ । २ । ११५ ) पाणिनीयम् अधीते पाणिनीयः

२— ‘ प्रोक्त या अर्थीं असलेला प्रत्यय ’ या अर्थीं प्रौक्तात् असें येथें पाहिजे.

तव्यम् । सौत्रो निर्देशः ॥

## सूत्राच्च कोपधात् ॥ ४ । २ । ६५ ॥

संख्याप्रकृतेरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । माहावार्तिकः कालापकः ॥

## छन्दोब्राह्मणानि च तद्विषयाणि ॥ ४ । २ । ६६ ॥

किमर्थमिदमुच्यते ।

**अन्यत्राभिधेयस्यानित्यत्वाच्छन्दोब्राह्मणानां तद्विषयवचनम् ॥ १ ॥**

अन्यत्राभिधेयमनित्यं भवति । पाणिनीयमिति वा भवति पाणिनीया इति वा । अन्यत्राभिधेयस्यानित्यत्वाच्छन्दोब्राह्मणानामप्यनित्यता प्राप्नोति । इष्यते च तद्विषयतैव स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति च्छन्दोब्राह्मणानां तद्विषयवचनम् । एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**तत्र यथाधिकारं तद्विषयप्रसङ्गः ॥ २ ॥**

तत्र यथाधिकारं तद्विषयता प्राप्नोति । अधीते वेदेति वर्तते तेनाध्येतृवेदित्रोरेव

---

पाहिजे.

सूत्रकारांनीं प्रोक्तात् या अर्थीच प्रोक्तात् असें म्हटलें आहे.

( सू. ६५ ) सूत्रवाचक शब्दांमध्यें मूळ प्रकृतिभूत संख्या शब्द असला पाहिजे असें म्हणावें. कारण माहावार्तिकः, कालापकः, चान्दनगन्धिकः येथें लुक् न झाला पाहिजे

(सू. ६६) हें सूत्र कशाकरितां केलें आहे.

(वा. १) प्रोक्त-प्रत्ययान्त शब्दापासून मनांत येणारा जो छन्दस् व ब्राह्मण यांशिवाय इतर अर्थ तो अनित्य असतो. उदा० पाणिनिना प्रोक्तं व्याकरणं पाणिनीयम् असेंही होतें आणि त्या पाणिनीय शब्दाहून अधीते किंवा वेत्ति या अर्थी प्रत्यय केला तर पाणिनीयाः मनुष्याः असेंही होतें. तेव्हां इतर अर्थ अनित्य असल्यामुळें त्याप्रमाणें छन्दस् व ब्राह्मण हे अर्थही अनित्य होतील व ते तर नित्य म्हणजे अध्ययन करणें किंवा जाणणें या प्रत्ययार्थाशीं संबंध पावलेलेच इष्ट आहेत. आणि ही गोष्ट तर त्याकरितां कांहीं तरी यत्न केल्यावांचून सिद्धीला जाणार नाहीं, म्हणून हें सूत्र केलें आहे.

हा या सूत्राचा उपयोग आहे खरा.

मग आतां पुढें तुमचें काय म्हणणें आहे ?

(वा. २) आमचें म्हणणें इतकेंच कीं जो अधिकार चालू आहे त्या अर्थी प्रत्यय नित्य होईल. अधीते व वेद या अर्थांचा अधिकार चालू आहे. तेव्हां त्या अर्थांची विवक्षा असतांना

---

१– ( सू. ६५ ) ककार उपधेला असलेला जो सूत्रवाचक शब्द त्याहून अधीते किंवा वेत्ति या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो उदा०– अष्टकमधीते अष्टकः पाणिनीय.. आठ अध्याय पाणिनीचें सूत्र आहे म्हणून त्या सूत्राला अष्टक असें म्हणतात. अष्टन् शब्दाहून कन् प्रत्यय ( ५।१।२२ ) झाला आहे.

१—( सू. ६६ ) ज्या प्रोक्त—प्रत्ययान्त शब्दाचा अर्थ छन्द ( वेद ) किंवा ब्राह्मण असा आहे त्या शब्दाहून अधीते किंवा वेत्ति या अर्थी प्रत्यय केलाच पाहिजे. उदा०-- कठेन प्रोक्तमधीयते कठाः. हा सूत्रांतील च या शब्दानें अनुक्ताचा समुच्चय होतो तेव्हां काश्यप व कौशिक या शब्दांहून प्रोक्त या अर्थी णिनि प्रत्यय ( ४ । ३ । १०३ ) केल्यानंतर तेथें जरी छन्दस् किंवा ब्राह्मण हे प्रोक्त नसून कल्प घेतले तरी तेथें अधीते किंवा वेत्ति या अर्थी प्रत्यय केलाच पाहिजे हा नियम लागू होतो.

२— प्रोक्त या अर्थाचा पुढे अधीते किंवा वेत्ति या अर्थाकडे संबंध करून त्या अर्थी प्रत्यय करणें हें ज्या ठिकाणीं आपल्या इच्छेवर अवलंबून असतें त्या ठिकाणीं तो प्रोक्त अर्थ अनित्य म्ह. अनियत समजला जातो.

तद्विषयता स्याद्येऽन्य उपचारास्तत्र न स्यात् । यथेह भवति पाणिनीयं महत्सुविहितमित्येवमिहापि स्यात् कठं महत्सुविहितमिति ॥

सिद्धं तु प्रोक्ताधिकारे तद्विषयवचनात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । प्रोक्ताधिकार एव तद्विषयता वक्तव्या । तेन प्रोक्तम् ( ४. ३. १०१ ) छन्दोब्राह्मणान्यध्येतृवेदित्रोरिति ॥ तत्तर्ह्यध्येतृवेदितृग्रहणं कर्तव्यम् । ननु चेहापि क्रियते । परार्थमेतद्भवति तदधीते तद्वेदेति । एवं तर्हि यावदिह च्छन्दोब्राह्मणग्रहणं तावत्तत्राध्येतृवेदितृग्रहणम् ॥ ननु च तत्रापि क्रियते । परार्थं तद्भविष्यति । पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेषु शौनकादिभ्यश्छन्दसि [ ४. ३. १०५; १०६ ] इति । इह वा छन्दोब्राह्मणग्रहणं क्रियते तत्र वाध्येतृवेदितृग्रहणं को न्वत्र विशेषः ॥

---

प्रत्यय नित्य होईल[३], परंतु इतर जे व्यवहार आहेत तेही अधीते व वेत्ति या अर्थी प्रत्यय करूनच संभवतील तसे करावे असे सिद्ध होणार नाहीं. उदा० पाणिनीयं महत् सुविहितम् म्हणजे पाणिनीय व्याकरण हें मोठें आहे, चांगलें रचिलेलें आहे असा प्रयोग होतो त्याप्रमाणेंच कठं महत् सुविहितम् असा ही प्रयोग होऊं लागेल.

(वा. ३) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं अधीते किंवा वेत्ति या अर्थी प्रत्यय केलाच पाहिजे, अशा अर्थांचें तद्विषयवचन हें येथें न करतां प्रोक्ताधिकारामध्येंच करावें. 'तेन प्रोक्तम्' ( ४ । ३ । १०१ ) याच्या पुढें 'छन्दोब्राह्मणान्यध्येतृवेदित्रोः' असें वचन करावें.

तर मग तेथें अध्येतृ व वेदितृ हे शब्द घातले पाहिजेत.

येथें देखील घातलेच आहेत ना ?

येथें तदधीते तद्वेद असे जे घातले आहेत त्यांचा दुसराही उपयोग होतें आहे.

तरी पण अध्येतृ व वेदितृ शब्द जरी तेथें घातले तरी कांहीं गौरव होत नाहीं. कारण येथें छन्दोब्राह्मण शब्द घालणें काय आणि तेथें अध्येतृ व वेदितृ शब्द घालणें काय दोन्ही सारखींच आहेत.

सारखींच कशीं ? सारखी नाहींत. कारण तेथें अध्येतृ व वेदितृ शब्द घालूनही पुनः छन्दस् व ब्राह्मण शब्द घातलेच पाहिजेत.

तेथें घातले तरी ते ज्यास्त नव्हेत. कारण त्या शब्दांची पुढें अनुवृत्ति होऊन 'पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेषु' या सूत्रांतील ब्राह्मण हा शब्द, आणि 'शौनकादिभ्यश्छन्दसि' ( ४ । ३ । १०६ ) या सूत्रांतील छन्दसि हा शब्द हे दोन्ही काढून टाकतां येईल.

तेव्हां येथें छन्दोब्राह्मण शब्द काय आणि तेथें अध्येतृवेदितृ शब्द काय या दोहोंमध्यें काय बरें फरक होतो ? कांहींच होत नाहीं.

---

३—तेव्हां जसें 'पाणिनीयम्' अधीते हें वाक्य होतें तसें येथें अधीते व वेत्ति या अर्थाची विवक्षा असतांना वाक्य होणार नाहीं एवढें इष्ट साधेल. कारण अधिकारप्राप्त जो 'अधीते वेत्ति' हा अर्थ त्याला उद्देशून तद्विषयतेचें विधान होईल. प्रकृत अर्थी सांगितलेले जे प्रत्यय त्यांचा फक्त तद्विषयता यांतील तत् शब्दानें परामर्श होतो असा अभिप्राय आहे. आतां छन्दोब्राह्मणानि एवढेंच उद्देश घेऊन अधिकार प्राप्त अधीते वेत्ति हा अर्थ विधेय भागांत घेतला तर हा दोष येत नाहीं.

४—प्रोक्त अर्थ छन्दस् किंवा ब्राह्मण असतांना जर 'प्रोक्त' या अर्थी प्रत्यय कर्तव्य असेल तर पुढें अधीते किंवा वेत्ति या अर्थाची विवक्षा असेल तरच करावा असा त्याचा अर्थ होय.

५—'अधीते वेत्ति' या अर्थी प्रत्ययाचें विधान करणें हा दुसरा उपयोग होय.

याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधः ॥ ४ ॥

याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । याज्ञवल्कानि ब्राह्मणानि । सौलभानि ॥ किं प्रोक्ताधिकारे तद्विषयता क्रियत इत्यतो याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । नेत्याह । सर्वथा याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः ॥

इनिर्वा प्रोक्ते तद्विषयः ॥ ५ ॥

अथवेनिः प्रोक्ते तद्विषयो भवतीति वक्तव्यम् ॥ यदीनिः प्रोक्ते तद्विषयो भवतीत्युच्यते पैङ्गी कल्पः अत्रापि प्राप्नोति ।

काश्यपकौशिकग्रहणं च कल्पे नियमार्थम् ॥ ६ ॥

काश्यपकौशिकग्रहणं च कल्पे नियमार्थं द्रष्टव्यम् । काश्यपकौशिकाभ्यामेवेनिः कल्पे तद्विषयो भवति नान्येभ्य इति ॥

एवमपि च्छणादीनां तद्विषयता न प्राप्नोति । तैत्तिरीयाः वारतन्तवीयाः ॥ यदि पुनश्छणादयः प्रोक्ते तद्विषया भव-

( वा. ४ ) याज्ञवल्क्य वगैरे शब्दांहून तेन प्रोक्तम् या अर्थी प्रत्यय केला असतां त्याच्या पुढें तद्विषयतेचा निषेध सांगावा[६]. उदा० याज्ञवल्क्येन प्रोक्तानि याज्ञवल्कानि[७] ब्राह्मणानि, सौलभानि.

पण काय हो तद्विषयता ही ' तेन प्रोक्तम् ' या अधिकारामध्यें सांगितली म्हणूनच कां हा निषेध करावा लागत आहे ?

तसें कांहीं नाहीं. तद्विषयता ही कोठेंही सांगितली तरी याज्ञवल्क्य वगैरे शब्दासंबंधानें तद्विषयतेचा निषेध केलाच पाहिजे.

( वा. ५ ) अथवा छन्दोब्राह्मणानि असें न म्हणतां प्रोक्त या अर्थी केलेला जो इनि प्रत्यय ( ४ । ३ । १०३, १११ ) तो तद्विषय होतो म्हणजे त्याच्या पुढें अधीते व वेत्ति या अर्थी प्रत्यय केलाच पाहिजे असें म्हणावें.

पण जर इनि प्रत्ययापुरती तद्विषयता घेतली तरीही पैङ्गी कल्पः येथें तद्विषयता लागू होईल हा दोष येतोच[९].

( वा. ६ ) काश्यप व कौशिक या शब्दांचें सूत्रांत उच्चारण हें कल्प हा अर्थ असतांना नियमार्थ होईल[१०]. तो नियम असा कीं—प्रोक्त अर्थी केलेल्या इनि प्रत्ययानें कल्प घेतला असतांना जर तद्विषयता होईल तर काश्यप व कौशिक या दोन शब्दांहून केलेल्या इनि प्रत्ययापुरतीच होईल; इतर ठिकाणीं होणार नाहीं.

तरी पण तैत्तिरीयाः वारतन्तवीयाः इत्यादि उदाहरणांमध्यें प्रोक्त अर्थी छण् वगैरे प्रत्यय केले असतां तद्विषयता होणार नाहीं हा दोष येतोच.

आतां जर ' इनिः प्रोक्ते तद्विषयः ' असें न म्हणतां ' छणादयः प्रोक्ते तद्विषयाः ' असें

६—म्हणजे त्याच्या पुढें अधीते किंवा वेत्ति या अर्थी प्रत्यय केलाच पाहिजे असा नियम नाहीं.

७—यज्ञवल्क शब्दाहून गोत्रापत्य या अर्थी यञ् प्रत्यय ( ४।१।१०५ ), त्याच्या पुढें तेन प्रोक्तम् या अर्थी अण् प्रत्यय ( ४।२।१११ ), नंतर यकाराचा लोप ( ६।४।१५१ ) अशीं कार्यें झालीं आहेत. सौलभानि येथें सुलभ शब्दाहून तेन प्रोक्तम् ( ४।३ १७१) यानें अण् प्रत्यय झाला आहे.

८—तेव्हां याज्ञवल्कानि व सौलभानि येथें अण् प्रत्यय असल्यामुळें व. इनि प्रत्यय नसल्यामुळें तद्विषयता लागू होत नाही.

९—येथें पिङ्ग शब्दाहून प्रोक्त या अर्थी इनि प्रत्यय (३।४।१०५) झाला आहे. छन्दोब्राह्मणानि असें म्हटलें असतां हा दोष येत नाही. कारण, येथें प्रोक्त हें छन्द नाही, व ब्राह्मणही नाहीं. तर कल्प आहे.

१० छन्दोब्राह्मणानि० या सूत्राच्या ऐवजी ' इनिः प्रोक्ते तद्विषयः ' असें जें म्हटलें आहे त्याच्या पुढें ' काश्यपकौशिकाभ्यां कल्पे ' असें वचन करावें लागेलच. तें नियमार्थ समजावें.

न्तीत्युच्येत । एवमपि पैङ्गी कल्पः अत्रापि प्राप्नोति । काश्यपकौशिकग्रहणं च कल्पे नियमार्थमित्येव ॥ एवमप्यौत्सर्गिकाणां तद्विषयता न प्राप्नोति । क्रौडाः काङ्कताः मौदाः पैप्पलादाः । छणादयश्चाप्यौत्सर्गिकानध्येतृवेदित्रोरेव बाधेरन्येऽन्य उपचारास्तत्र न बाधेरन् । तित्तिरिणा प्रोक्ताः श्लोका इति ॥

अस्तु तर्ह्यविशेषेण । ननु चोक्तं याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेध इति । वक्ष्यत्येतद्याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधस्तुल्यकालत्वादिति तत्रैव वक्तव्यं तद्विषयता च न भवतीति ॥ कथं काश्यपिनः कौशिकिन इति । इनिः प्रोक्ते तद्विषयो भवतीत्युच्यमाने ऽवश्यं काश्यपकौशिकग्रहणं कल्पे नियमार्थं द्रष्टव्यं तदेवेदानीं विध्यर्थं भविष्यति ॥ कथं पाराशरिणो भिक्षवः शैलालिनो नटाः । अत्रापि तद्विषयता चेत्यनुव-

म्हणून प्रोक्तार्थी केलेले छण् वगैरे प्रत्यय हे तद्विषय समजावे असें म्हणावें तर पैङ्गी कल्पः येथें तद्विषयता होऊं लागेल हा दोष आहेच.

हा दोष येत नाहीं. कारण काश्यप व कौशिक या शब्दांचें उच्चारण हें कल्प हा अर्थ असतांना नियमार्थ होईलच.

तरी पण तेन प्रोक्तम् ( ४।३।१०१ ) या सूत्रानें सामान्यतः अण् प्रत्यय केला असेल तेथें तद्विषयता होणार नाहीं हा दोष येतोच. उदा० क्रौडाः, काङ्कताः, मौदाः, पैप्पलादाः; तसेंच छण् वगैरे प्रत्ययांना तद्विषयता असल्यामुळें अधीते व वेत्ति या अर्थी प्रत्यय कर्तव्य असेल तेथेंच ते प्रत्यय अण् प्रत्ययाचा बाध करतील. तेव्हां तित्तिरिणा प्रोक्ताः श्लोकाः तैत्तिरीयाः असे जे इतर व्यवहार तेथें छण् प्रत्यय होणार नाहीं. तेव्हां बाधक प्रत्यय न झाल्यामुळें अण् प्रत्यय होऊं लागेल.

तर मग इनि प्रत्यय किंवा छण् वगैरे प्रत्यय असें विशेष कांहीं न म्हणतां छन्दोब्राह्मणानि असें जें मोघम म्हटलें आहे तें तसेंच असूं दे.[१२]

पण तसें म्हटलें असतां याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधः (वा. ४) असा निषेध करावा लागेल असें म्हटलें आहे ना ?

याज्ञवल्क्यादिप्रतिषेधस्तुल्यकालत्वात् ( ४।३।१०५ वा. १ ) असें पुढें सांगावयाचेंच आहे. तेथेंच त्याच्या पुढें तद्विषयतेचा निषेध सांगावा म्हणजे झालें.

तरी पण काश्यपिनः व कौशिकिनः येथें छन्दस् व ब्राह्मण हे अर्थ नसतांना तद्विषयता कशी साधावी ?

प्रोक्त या अर्थी केलेल्या इनि प्रत्ययाला तद्विषयता सांगितली असतां काश्यपकौशिकाभ्यां कल्पे ( टीप १० ) असें नियमार्थ वचन अवश्य करावें लागतें. तेंच वचन आतां विध्यर्थ समजतां येईल. तेव्हां काश्यपिनः येथें कल्प अर्थ असतांनाही तद्विषयता होईल.

तरी पण पाराशरिणो भिक्षवः, शैलालिनो नटाः येथें तद्विषयता कशी ?

११—क्रोड, कङ्कत, मुद आणि पिप्पलाद या शब्दांहून ' त्यानें प्रोक्त छन्द ' या अर्थी अण् प्रत्यय व पुढें त्या छन्दाचे अध्ययन करणारे किंवा जाणणारे या अर्थी अण् प्रत्यय झाला आहे.

१२—तें सुद्धां तेन प्रोक्तम् ( ४ । ३ । १०१ ) या अधिकारांतच घातलें पाहिजे असें नाहीं. तसेंच असलें तरी हरकत नाहीं. कारण या सूत्राच्या वाक्यार्थामध्यें ' छन्दोब्राह्मणाचें अध्ययन करणारा किंवा जाणणारा ' एवढें मोठें उद्देश्य न घेता ' छन्दोब्राह्मणा ' एवढेंच उद्देश्य घ्यावें व ' अधीते वेत्ति ' हा अर्थासहित ते प्रत्यय विधेयांत घ्यावें म्हणजे इष्ट साधतें.

१३—पाराशर्य व शिलालि या शब्दांहून प्रोक्त या अर्थी णिनि प्रत्यय ( ४ । ३ । ११० ) व अधीते या अर्थी केलेल्या अण् प्रत्ययाचा ( ४।२।५९ ) लुक् ( ४ । २ । ६४ ) झाला आहे.

र्दिश्यते ॥

**तदस्मिन्नस्तीति देशे तन्नाम्नि ॥ ४ । २ । ६७ ॥**

**तेन निर्वृत्तम् ॥ ४ । २ । ६८ ॥**

**तस्य निवासः ॥ ४ । २ । ६९ ॥**

**अदूरभवश्च ॥ ४ । २ । ७० ॥**

किं पुनरयमेको योग आहोस्विन्नानायोगाः। किं चातः। यद्येको योग उत्तरेष्वर्थादेशनेषु देशे तन्नाम्नीत्यस्यानुवृत्तिः कर्तव्या न ह्येकयोगे ऽनुवृत्तिर्भवति । कथं ज्ञायते । यदयं तदधीते तद्वेद [ ४. २. ५९ ] इति द्विस्तद्ग्रहणं करोति । अथ नानायोगा ओरञ् [ ४. २. ७१ ] इत्येवमाद्यनुक्रमणं यदेव सर्वान्त्यमर्थादेशनं तस्यैव विषये स्यात् । यथेच्छसि तथास्तु ॥ अस्तु तावदेको योगः । ननु चोक्तमुत्तरेष्वर्थादेशनेषु देशे तन्नाम्नि देशे तन्नाम्नीत्यस्यानुवृत्तिः कर्तव्या न ह्येकयोगे ऽनुवृत्तिर्भ-

---

येथें तद्विषयता याची अनुवृत्ति करतां येईल[१४].

(सू. ६७–७० ) येथें हीं चार सूत्रें मिळून एकच सूत्र आहे किंवा निरनिराळीं चार सूत्रें आहेत ?

या दोहोंमध्यें फरक काय ?

जर एकच सूत्र असेल तर त्यांतील पहिल्या अर्थाच्या वेळीं जें ' देशे तन्नाम्नि ' हें निमित्त धरलें आहे त्याची पुढील तिन्ही अर्थांमध्यें अनुवृत्ति करावी लागेल; आणि एकाच सूत्रांत तर अनुवृत्ति होत नसते.

हें कशावरून समजतें ?

तदधीते तद्वेद (४।२।५९) या सूत्रामध्यें आचार्यांनीं जो तत् हा शब्द दोनदां उच्चारला आहे त्यावरून हें समजतें.

आतां जर हीं चार सूत्रें निरनिराळीं घ्यावीं तर त्या चार अर्थांतील शेवटचा जो ' अदूरभव ' हा अर्थ त्याचीच फक्त अनुवृत्ति पुढें चालू होऊन ' ओरञ् ' (४।२।७१) वगैरे पुढील सूत्रांनीं सांगितलेले प्रत्यय त्याच एका अर्थीं होतील.

ह्या दोन पक्षांतील तुला वाटेल तो पक्ष घे.

असे ना कां एकच सूत्र ? असूं दे.

पण एकच सूत्र घेतलें तर पुढील तीन अर्थांमध्यें ' देशे तन्नाम्नि ' या पदांचा संबंध होणार नाहीं. कारण, एकाच सूत्रामध्यें अनुवृत्ति होत नसते असें आतांच सांगितलें आहे ना ?

---

१४—पुराणप्रोक्तेषु० ( ४ । २ । १०५ ) या सूत्रावर तद्विषयतेचा निषेध सांगितला आहे. त्यांतील निषेध सोडून फक्त तद्विषयता या पदाची ' पाराशर्य०' ( ४ । २ । ११० ) येथें अनुवृत्ति करावी.

१– ( सू. ६७ ) प्रातिपदिकाहून ' तें आहे ज्या ठिकाणीं ' या अर्थीं अण् प्रत्यय होतो परंतु त्या अर्थानेंच त्या ठिकाणाला तें नांव प्राप्त झालें असलें पाहिजे. उदा०—उदुम्बराः सन्ति अस्मिन् औदुम्बर. औदुम्बर हें तशा एका स्थळाचें नांव आहे.

१– ( सू. ६८ ) प्रातिपदिकाहून ' ज्यानें निर्माण केलेला ' या अर्थीं अण् प्रत्यय होतो. परंतु त्या अर्थानेंच त्या प्रदेशाला तें नांव प्राप्त झालें असलें पाहिजे. उदा०—कुशाम्बेन निर्वृत्ता कौशाम्बी नाम नगरी.

१– ( सू. ६९ ) प्रातिपदिकाहून त्याचा निवास म्ह. राहण्याची जागा या अर्थीं अण् प्रत्यय होतो. परंतु त्या अर्थानेंच त्या स्थलाला तें नांव प्राप्त झालें असलें पाहिजे. उदा०—शिबीनां निवासो देशः शैबः.

१–(सू. ७० ) प्रातिपादकाहून ' त्याच्या जवळचा प्रदेश' या अर्थीं अण् प्रत्यय होतो. परंतु त्या अर्थानेंच त्या प्रदेशाला तें नांव प्राप्त झालें असलें पाहिजे. उदा० विदिशाया अदूरभवं वैदिशं नाम नगरम्.

२—नाहीं तर तदधीते यांतील तद् शब्दाची अनुवृत्ति होत असल्यामुळें पुनः तद्वेद येथें तद् शब्द उच्चारला नसता.

वर्तीति । एकयोगेऽप्यनुवृत्तिर्भवति । कथं ज्ञायते । यदयं तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप् [ ५. २. ९४ ] इति द्विस्तद्ग्रहणं न करोति । कथं तदधीते तद्वेदेति । प्रमादकृतमाचार्यस्य शक्यमकर्तुम् ॥ अथवा पुनः सन्तु नानायोगाः । ननु चोक्तमोरञित्येवमाद्यनुक्रमणं यदेव सर्वान्त्यमर्थादेशनं तस्यैव विषये स्यादिति । नैष दोषः । गोयूथवदधिकाराः । तद्यथा । गोयूथमेकदण्डप्रघट्टितं सर्वं समं घोषं गच्छति । तद्वदधिकाराः ॥

## ओरञ् ॥ ४ । २ । ७१ ॥

**ओरञ्विधेर्नद्यां मतुब्विप्रतिषिद्धम् ॥ १ ॥**

ओरञ्विधेर्नद्यां मतुब्भवति विप्रतिषेधेन । ओरञो ऽवकाशः । कक्षतु काक्षतवम् । मतुपोऽवकाशः । उदुम्बरावती मशकावती । इहोभयं प्राप्नोति । इक्षुमती द्रुमती । मतुब्भवति विप्रतिषेधेन ॥

## मतोश्च बह्वजङ्गात् ॥ ४ । २ । ७२ ॥

अङ्गग्रहणं किमर्थम् । यथा बह्वज्ग्रहणमङ्गविशेषणं विज्ञायेत । बह्वचोऽङ्गादिति । अथाक्रियमाणेऽङ्गग्रहणे बह्वज्ग्रहणं

---

तसा कांहीं नियम नाहीं. एका सूत्रांतही अनुवृत्ति होत असते.

हें कशावरून समजतें ?

अशावरून कीं 'तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप्' ( ५।२।९४ ) ह्या सूत्रामध्यें आचार्यांनीं दुसऱ्यानदां तत् शब्द घातला नाहीं.

मग तसें आचार्यांच्या मनांत असेल तर ' तदधीते तद्वेद ' येथें दुसऱ्यानदां तत् शब्द त्यांनीं कां बरें घातला आहे ?

सहजगत्या गैरसावधपणानें तो दुसऱ्यानदां तत् शब्द तेथें आचार्यांच्या हातून पडला आहे. तो तेथें न घातला तरी चालेल.

अथवा हीं चारी सूत्रें निरनिराळीं घेतलीं तरी हरकत नाहीं.

पण तसें असेल तर फक्त चवथ्या एका अर्थींच ओरञ् वगैरे पुढील सूत्रांनीं सांगितलेले प्रत्यय होतील असा दोष दाखविला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण हे चारी अर्थ मिळून अधिकार—रूपानें पुढें चालू होतील. ज्याप्रमाणें एखादा गाईंचा कळप एकजुटीनें न विस्कळित होतां सर्वच बरोबर गोठ्यांत शिरतो त्याप्रमाणेंच हें होय.

( सू. ७१ वा. १ ) ओरञ् याचा ' नद्यां मतुप् ' ( ४।२।८५ ) या शास्त्रानें विप्रतिषेधामुळें परत्वास्तव बाध होतो. कक्षतु काक्षतवम् येथें ओरञ् याला अवकाश आहे, व उदुम्बरावती व मशकावती येथें त्या मतुप् प्रत्ययाला अवकाश आहे; पण इक्षुमती व द्रुमती येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें विप्रतिषेधामुळें परत्वास्तव मतुप् प्रत्यय होतो.

( सू. ७२ ) येथें अङ्गात् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

अशाकरितां म्हटलें आहे कीं, बह्वच् हें अंगाचें विशेषण झालें पाहिजे. कारण, मतुप् प्रत्ययाच्या पूर्वीच्या अंगामध्यें अनेक अच् असले पाहिजेत.

पण अङ्गात् असें येथें म्हटलें नाहीं तर बह्वच् हें विशेषण कोणाचें बरें होईल ?

---

१—( सू. ७१ ) तदस्मिन्नस्ति० इत्यादि चारी अर्थीं उवर्णान्त प्रातिपदिकाहून अञ् प्रत्यय होतो. कक्षतु शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन काक्षतव असा शब्द होतो.

१—( सू. ७२ ) ज्या मतुप् प्रत्ययाच्या मागील अङ्गामध्यें कमींत कमी तीन तरी अच् आहेत त्या मतुप्–प्रत्ययान्त शब्दाहून तदस्मिन्नस्ति इत्यादि चारी अर्थीं अञ् प्रत्यय होतो. उदा सिध्रकावत् सैध्रकावताम्

कस्य विशेषणं स्यात् । मत्वन्तविशेषणम् । तत्र को दोषः । इहापि प्रसज्येत । मालावतामयं निवासो मालावतम् । अस्ति चेदानीं कश्चिद्बह्वज्मत्वन्तो यदर्थो विधिः स्यात् । अस्तीत्याह । स्ववान् श्ववान् ॥

[ बह्वचः कूपेषु ॥ ४ । २ । ७३ ॥

उदक् च विपाशः ॥ ४ । २ । ७४ ॥

संकलादिभ्यश्च ॥ ४ । २ । ७५ ॥

स्त्रीषु सौवीरसाल्वप्राक्षु ॥ ४ । २ । ७६ ॥

सुवास्त्वादिभ्योऽण् ॥ ४ । २ । ७७ ॥

रोणी ॥ ४ । २ । ७८ ॥

कोपधाच्च ॥ ४ । २ । ७९ ॥

वुञ्छण्कठजिलसेनिरढञ्ण्ययफक्फिञिञ्ञ्यकक्ठकोऽरीहणकृशाश्वर्श्यकुमुदकाशतृणप्रेक्षाश्मसखिसंकाशबलपक्षकर्णसुतङ्गमप्रगदिन्वराहकुमुदादिभ्यः ॥ ४ । २ । ८० ॥

मतुप्-प्रत्ययान्ताचें विशेषण होईल.

मग तसें झालें असतां दोष कोठें येतो ?

मालावतां निवासः मालावतम् येथें अञ् प्रत्यय होऊं लागेल.

पण बह्वच् हें मतुप्-प्रत्ययान्ताचें विशेषण झालें तर त्याचा उपयोग होईल असा एखादा मतुप्-प्रत्ययान्त शब्द बह्वच् नसलेला आहे काय ?

आहे तर; उदा०-स्ववान्, श्ववान्.

---

२—मालावतम् येथें अण् प्रत्यय होऊन प्रत्ययस्वरानें ( ३।१।३० ) अन्त उदात्त असलेला शब्द होतो तो होणार नाहीं.

१—( सू. ७३ ) बह्वच् प्रतिपादकाहून तदस्मिन्नस्ति इत्यादि चार अर्थांपैकीं संभवेल त्या अर्थी अञ् प्रत्यय होतो. पण एकंदर शब्दापासून कूप अर्थ गम्यमान असला पाहिजे. उदा० दीर्घवरत्रेण निर्वृत्तः दैर्घवरत्रः कूपः

१—( सू ७४ ) विपाश् नदीच्या उत्तरेकडील कूप अर्थ गम्यमान असतांना कोणत्याही प्रातिपदिकाहून या चार अर्थांपैकीं संभवेल त्या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा ०—दत्तेन निर्वृत्तः दात्तः कूपः.

१ ( सू. ७५ ) १—संकल वगैरे शब्दांहून या चार अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०—संकलेन निर्वृत्तः सांकलः.

१—( सू. ७६ ) प्रातिपदिकाहून या चार अर्थी अञ् प्रत्यय होतो. परंतु त्या प्रत्ययान्त शब्दापासून सौवीर देश, साल्व देश व पूर्वेकडील देश यांतील स्त्रीलिंगी अर्थ गम्यमान असला पाहिजे. उदा० दत्तामित्रेण निर्वृत्ता दात्तामित्री नगरी. वैधमाकी. माकन्दी.

१ ( सू. ७७ ) सुवास्तु वगैरे शब्दांहून या चार अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—सुवास्तोरदूरभवं सौवास्तवं नगरम्.

१ – ( सू. ७८ ) रोणी किंवा रोणी—शब्दान्त जें प्रातिपदिक त्याहून या चार अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—रौणः, आजकरौणः.

१ – ( सू. ७९ ) ज्याच्या उपधेला ककार आहे अशा प्रादिपदिकाहून या चार अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—कर्णवेष्टकेन निर्वृत्तः कार्णवेष्टकः.

१—( सू. ८० ) अरीहण, कृशाश्व, ऋश्य, कुमुद, काश, तृण, प्रेक्षा, अश्मन्, सखि, संकाश, बल, पक्ष, कर्ण, सुतंगम, प्रगदिन्, वराह व कुमुद हे सतरा शब्द प्रत्येकीं आरंभीं असलेले असे सतरा गण आहेत. त्यांतील शब्दांहून या चार अर्थी क्रमानें वुञ्, छण्, क, ठच्, इल, स, इनि, र, ढञ्, ण्य, य, फक्, फिञ्, इञ्, ञ्य, कक् आणि ठक् असे सतरा प्रत्यय होतात. उदा०—अरीहणेन निर्वृत्तम् आरीहणकम्, कार्शाश्वीयः, ऋश्यकः, कुमुदिकम्, काशिलम्, तृणसः, प्रेक्षी, अश्मरः, साखेयम्, सांकाश्यम्, बल्यः, पाक्षायणः, कार्णायनिः, सौतंगमिः, प्रागदम्, वाराहकम्, कौमुदिकम्.

जनपदे लुप् ॥ ४ । २ । ८१ ॥
वरणादिभ्यश्च ॥ ४ । २ । ८२ ॥
शर्कराया वा ॥ ४ । २ । ८३ ॥
ठक्छौ च ॥ ४ । २ । ८४ ॥ ]
नद्यां मतुप् ॥ ४ । २ । ८५ ॥

किमर्थं नद्यां मतुब्विधीयते न तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप् [ ५. २. ९४ ] इत्येव सिद्धम् ।

नद्यां मतुब्वचनं मत्वर्थेऽण्विधानात् ॥ १ ॥

नद्यां मतुब्वचनं क्रियते मत्वर्थेऽण्विधानात् । अयं मत्वर्थेऽण्विधीयते स विशेषविहितः सामान्यविहितं मतुपं बाधेत ॥

निर्वृत्ताद्यर्थ च ॥ २ ॥

निर्वृत्ताद्यर्थं च नद्यां मतुब्वचनं क्रियते। निर्वृत्ताद्यर्थेषु मतुब्यथा स्यात् ॥

[ मध्वादिभ्यश्च ॥ ४ । २ । ८६ ॥ ]
कुमुदनडवेतसेभ्यो ड्मतुप् ॥ ४ । २ । ८७ ॥

महिषाच्चेति वक्तव्यम् । महिष्मान् ॥

---

(सू. ८५) नद्यां मतुप् ह्या सूत्रानें जो हा मतुप् प्रत्यय सांगितला आहे तो कशाकरितां ? तो सांगावयास नको. कारण 'तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप्' ( ५।२।९४ )या सूत्रानेंच मतुप् प्रत्यय सिद्ध आहे.

(वा. १ ) ह्या सूत्रानें मतुप् प्रत्यय अशाकरितां सांगितला आहे कीं येथें 'तदस्मिन्नस्तीति०' ( ४।२।६७ ) या सूत्रानें मतुप् प्रत्ययाच्या अर्थींच अण् प्रत्यय सांगितला आहे. तो 'देशे तन्नाम्नि' असें विशेष निमित्त धरून सांगितला असल्यामुळें सामान्यत: सांगितलेल्या त्या मतुप् प्रत्ययाचा बाध करील म्हणून येथें मुद्दाम मतुप् सांगितला आहे.

(वा. २ ) शिवाय ह्या चार अर्थांपैकीं पहिल्या एका अर्थीं मतुप् प्रत्यय सिद्ध असला तरी निर्वृत्त वगैरे पुढील तीन अर्थीं मतुप् प्रत्यय मुळींच सिद्ध नाहीं. तो झाला पाहिजे म्हणून येथें सांगितला आहे.

( सू. ८७ ) महिषाच्चेति वक्तव्यम् म्हणजे महिष शब्दाहूनही हा ड्मतुप् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० महिष्मान्.

---

१-( सू. ८१ ) ह्या चार अर्थीं प्रत्यय केल्यानंतर त्यापासून जर एखादा जनपद हा अर्थ गम्यमान होत असेल तर त्या प्रत्ययाचा लुप् होतो. उदा०—पञ्चालानां निवास: पञ्चाला: जनपद:. येथें युक्तवद्भाव ( १।२।५१ ) झाला आहे. ग्रामसमुदायाला जनपद म्हणतात.

१-( सू. ८२ ) वरण वगैरे शब्दांहून ह्या चार अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुप् होतो. उदा०—वरणानाम् अदूरभवं नगरम् वरणा:.

१—( सू. ८३ ) शर्करा शब्दाहून ह्या चार अर्थीं केलेल्या अण् प्रत्ययाचा लुप् विकल्पानें होतो. उदा०—शर्करा शार्करम्.

१—( सू. ८४ ) शर्करा शब्दाहून ह्या चार अर्थी ठक् आणि छ हेही प्रत्यय होतात. उदा० ... शार्करिकम्, शर्करीयम्. शर्करा शब्दाचा कुमुदादि गणामध्यें पाठ आहे म्हणून ठच् प्रत्यय होतो आणि वराहादि गणामध्यें पाठ आहे म्हणून कक् प्रत्यय (४।२।८०) होतो. उदा०—शर्करिकम्, शार्करकम्.

१—( सू. ८५ ) प्रातिपदिकाहून ह्या चार अर्थीं मतुप् प्रत्यय होतो. परंतु त्या अर्थानेंच तें नांव एखाद्या नदीला प्राप्त झालेलें पाहिजे. उदा०—उदुम्बरा: सन्ति यस्याम् उदुम्बरावती नदी. येथें उदुम्बर शब्दांतील शेवटच्या अकाराला दीर्घ ( ६।३।११९ ) झाला आहे.

१—( सू. ८६ ) मधु वगैरे शब्दांहून ह्या चार अर्थीं मतुप् प्रत्यय होतो. उदा०—मधुमान्.

१—( सू. ८७ ) कुमुद नड आणि वेतस शब्दांहून वर दिलेल्या चार अर्थीं ड्मतुप् प्रत्यय होतो. उदा०—कुमुद्वान्, नड्वान्, वेतस्वान्.

नडशादाड्ड्वलच् ॥४।२।८८॥

शिखाया वलच् ॥ ४।२।८९॥

उत्करादिभ्यश्छः ॥ ४ । २ ।९० ॥]

नडादीनां कुक् च ॥ ४ । २ । ९१ ॥

यदि पुनरयं कुट् परादिः क्रियेत ।

कुटि प्रत्ययादेरादेशानुपपत्तिरनादित्वात् ॥ १ ॥

कुटि सति प्रत्ययादेरित्यादेशस्यानुपपत्तिः । कुटि कृतेऽनादित्वादादेशो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि पूर्वान्तः करिष्यते ।

पूर्वान्ते ह्रस्वत्वम् ॥ २ ॥

यदि पूर्वान्तो ह्रस्वत्वं वक्तव्यम् । कुञ्चकीयाः । परादौ पुनः सति केऽणः [ ७. ४. १३ ] इति ह्रस्वत्वं सिद्धं भवति ॥ अस्तु तर्हि परादिः । ननु चोक्तं कुटि कृते ऽनादित्वादादेशो न प्राप्नोतीति ।

सिद्धं त्वादिष्टस्य कुड्वचनात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । कुडादिष्टस्येति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम्

संनियोगात्सिद्धम् ॥ ४ ॥

संनियोगः करिष्यते । क एष यत्नश्चोद्यते संनियोगो नाम । चकारः कर्तव्यः ।

---

( सू. ९१ ) जर हा आगम पुढील प्रत्ययाचा आद्यावयव कुट् असा केला असता तर—

( वा. १ ) कुट् केला तर प्रत्ययाच्या आदि वर्णाला सांगितलेला आदेश म्हणजे येथें छकाराला होणारा ईय् आदेश ( ४।१।२ ) होणार नाहीं. कारण, छ प्रत्ययाला कुट् आगम केल्यानंतर छकार हा वर्ण प्रत्ययाचा आदि असत नाहीं.

तर मग मागील शब्दाचा अन्तावयव कुक् असा करितां येईल.

( वा. २ ) जर कुक् असा मागील शब्दाचा अन्तावयव असेल तर कुञ्चकीयाः येथें कुञ्चा शब्दांतील आकाराला ऱ्हस्व होतो असें म्हणावें लागेल. प्रत्ययाचा आद्यावयव कुट् असा केला म्हणजे मात्र ह्रस्व सांगावयास नको. कारण 'केऽणः' ( ७।४।१३ ) यानेंच त्या वेळीं ऱ्हस्व होतो.

तर मग प्रत्ययाचा आद्यावयव कुट् असाच आगम असू दे.

पण कुट् असा केला तर छकार हा प्रत्ययाचा आदि नसल्यामुळें त्याला ईय् आदेश होणार नाहीं असें सांगितलें आहे ना?

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं कुट् हा आगम छकाराला आदेश झाल्यानंतर होतो, असें म्हणावें.

तर मग तसें सूत्रांत सांगितलें पाहिजे.

तसें सांगावयास नको.

( वा. ४ ) संनियोग केला म्हणजे हें सिद्ध होत आहे.

संनियोग म्हणून जें म्हणतां त्याकरितां येथें यत्न तरी काय केला पाहिजे ?

---

१—( सू. ८८ ) नड आणि शाद या शब्दांहून चार अर्थी ड्वलच् प्रत्यय होतो. उदा०—नड्वलम्, शाद्वलम्.

१—( सू. ८९ ) शिखा शब्दाहून चार अर्थी वलच् प्रत्यय होतो. उदा०—शिखावलं नाम नगरम्.

१— ( सू. ९० ) उत्कर वगैरे शब्दांहून चार अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—उत्करीयम्.

१— ( सू. ९१ ) नड वगैरे शब्दांहून चार अर्थी छ प्रत्यय होतो आणि त्या छ प्रत्ययाबरोबर नड वगैरे शब्दांना कुक् असा आगम होतो. उदा० नडकीयम्.

२—केऽणः याचा अर्थ ककारादि प्रत्यय पुढें असतांना असा धरला आहे.

अ. ४ पा. २ आ. १ समाप्त.

कुट् । किं च । यच्चान्यत्प्राप्नोति । किं चान्यत्प्राप्नोति । आदेशः । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं पूर्वान्ते ह्रस्वत्वमिति । निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । कुब्जा ह्रस्वत्वं चेति । तत्तर्हि पूर्वान्ते सति निपातनं कर्तव्यम् । परादावप्येष दोषः । यद्धि तत्केऽण इति ह्रस्वत्वं न तत्कादिमात्रे शक्यं विज्ञातुम् । इहापि प्रसज्येत । नदीकल्पः परीवाहः । कुमारीकाम्यतीति । तस्मादुभाभ्यामेतद्वक्तव्यं कुब्जा ह्रस्वत्वं चेति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये चतुर्थस्याध्यायस्य द्वितीये पादे प्रथममाह्निकम् ॥

---

कुट् च असा सूत्रामध्ये 'च'हा शब्द घालावा म्हणजे त्याचा असा अर्थ होईल कीं प्रत्ययाला कुट् आगम होतो; तसेंच आणखी त्याशिवाय दुसरें जें कांहीं प्राप्त होत असेल तर तेंहीं होतें.

दुसरें कोणतें बरें कार्य येथें प्राप्त होतें ?

छकाराला ईय् आदेश प्राप्त होतो.

अशा रीतीनें सिद्ध होतें, पण सूत्रामध्यें फिरवाफिरव करावी लागते.

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण मागील शब्दाचा अन्तावयव कुक् असा केला तर कुब्जा शब्दाला ह्रस्व सांगितला पाहिजे असें म्हटलें आहे ना ?

निपातनामुळें तेथें ऱ्हस्व सिद्ध होईल.

तें निपातन कोणतें बरें ?

या नडादि गणामध्येंच 'कुब्जा ऱ्हस्वत्वं च' असें म्हटलें आहे. तेंच निपातन होय.

तर मग एकंदरीत मागील शब्दाचा अन्तावयव कुक् असा आगम सांगितला म्हणजे तें निपातन केलें पाहिजे.

असें कांहीं नाहीं. प्रत्ययाचा आद्यावयव कुट् असा केला तरी देखील तो दोष येतोच. तेव्हां त्या निपातनाची जरूर आहेच.

आतां त्या वेळीं केऽणः यानें ऱ्हस्व होईल असें जें म्हटलें होतें तें बरोबर नाहीं. कारण, ककारादि प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस्व होतो असा त्याचा अर्थ करणें शक्य नाहीं. कारण, तसा अर्थ केला तर नदीकल्पः परीवाहः व कुमारीकाम्यति येथेंही नदी व कुमारी यांना ऱ्हस्व होऊं लागेल. तेव्हां कुट् आगम करणारे आणि कुक् आगम करणारे या दोघांनींही 'कुब्जा ऱ्हस्वत्वं च' हें निपातन घेतलेंच पाहिजे.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या चवथ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें.

## शेषे ॥ ४।२।९२ ॥

शेष इत्युच्यते कः शेषो नाम । अपत्यादिभ्यश्चातुरर्थपर्यन्तेभ्यो येऽन्येऽर्थाः स शेषः ॥ किमर्थं पुनः शेषग्रहणम् । शेषे घादयो यथा स्युः स्वार्थे मा भूवन्निति । नैतदस्ति प्रयोजनम् । इदं तावदयं प्रष्टव्यः । अणादयः स्वार्थे कस्मान्न भवन्तीति । अपत्यादिष्वर्थेष्वणादयो विधीयन्ते तेन स्वार्थे न भविष्यन्ति । इमेऽपि तर्हि जातादिष्वर्थेषु विधीयन्ते तेन स्वार्थे न भविष्यन्ति ॥ कथं पुनरिहोच्यमाना घादयो जातादिषु शक्या विज्ञातुम् । अनुवर्तिष्यन्ते तत्र घादयः । यद्यनुवर्तन्ते घादयो या या परा प्रकृतिस्तस्यास्तस्याः पूर्वे पूर्वे प्रत्ययाः प्राप्नुवन्ति । एवं तर्हि जातादिष्वर्थेषु घादीनपेक्षिष्यामहे।अयुक्तैवं

---

( सू. ९२ ) येथें शेषे असें म्हटलें आहे; पण शेष म्हणजे काय ?

अपत्य अर्थापासून ह्या चार अर्थांपर्यंत सांगितलेले जे अर्थ त्यांपेक्षां इतर जे अर्थ त्यांना शेष म्हणतात.

पण 'तत्र जातः' वगैरे अर्थ पुढें सांगितलेच आहेत, मग पुनः येथें शेषे असें कशाकारितां म्हटलें आहे ?

तत्र जातः ( ४।३।२५ ) याच्या पूर्वी सांगितलेले जे घ ( ४।२।९३ ) वगैरे प्रत्यय ते स्वार्थी होऊं लागतील; तसें होऊं नये याकरितां येथें शेषे असें म्हटलें आहे.

हा शेषे याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, येथें असा एक प्रश्न उद्भवतो कीं, अण् वगैरे जे प्रत्यय पूर्वी सांगितले आहेत ते स्वार्थी कां बरें होत नाहींत ? आतां अपत्य वगैरे अर्थी ते प्रत्यय सांगितले असल्यामुळें स्वार्थी होत नाहींत असें असेल तर हे पुढील घ वगैरे प्रत्ययही ' जातः ' ( जन्मलेला ) वगैरे अर्थींच सांगितले आहेत म्हणून स्वार्थी होणार नाहींत.

पण ' जातः ' या अर्थापूर्वी येथें पुढील सूत्रापासूनच घ वगैरे प्रत्यय सांगितले आहेत ते 'जातः' ( ४।३।२५ ) वगैरे अर्थी सांगितले आहेत असें कसें म्हणतां येईल ?

कां बरें ? या घ, ख, य, खञ् वगैरे सर्व प्रत्ययांची अनुवृत्ति ' तत्र जातः ' या सूत्रामध्यें केली म्हणजे झालें.

पण जर तशी अनुवृत्ति केली तर ' तत्र जातः ' याच्या पूर्वींच्या सूत्रांपैकीं ग्रामाद्यखञौ ( ४।२।९४ ) वगैरे प्रस्तुत सूत्राच्या पुढील सूत्रांनीं ज्या ज्या शब्दाहून प्रत्यय सांगितले आहेत त्या त्या शब्दांहून त्याच्या त्याच्या मागील सूत्रांनीं सांगितलेले घ, ख वगैरे प्रत्ययही होऊं लागतील.

तर मग आतां 'तत्र जातः' असा अर्थाचा निर्देश जेथें असेल तेथेंच अपेक्षा असल्यामुळें या घ, ख वगैरे प्रत्ययांचा संबंध होईल.

पण अशा रीतीनें तेथें बहुत सूत्रांचा संबंध करणें योग्य नाहीं. आकांक्षा उत्पन्न झाली

---

१ (सू.९२–)'अपत्य' या अर्थापासून(४।१।९२) ह्या चार अर्थांपर्यंत (४।२।७०) जे अर्थ सांगितले आहेत त्यांपेक्षां निराळे जे अर्थ प्रयोगाला अनुसरून कल्पिलेले आणि पुढें 'तत्र जातः ' या अर्थापासून (४।३।२५) तस्येदम् ( ४।३।१२० ) या अर्थापर्यंत प्रत्यक्ष सांगितलेले हे सर्व अर्थ ' शेष ' होत. या सर्व अर्थी अण् वगैरे प्रत्यय ( ४।१।८३, ४।१।८७ ) होतात. उदा०—चक्षुषा गृह्यते चाक्षुषं रूपम् इत्यादि.

२—कारण, घ ख या प्रत्ययांची अनुवृत्ति ' तत्र जातः ' येथें करावयाची तर ' ग्रामाद्यखञौ ' वगैरे मधल्या सूत्रांमध्यें त्यांची अनुवृत्ति होणारच.

३—तत्र जातः (४।३।२५) कृतलब्ध०(४।३।३८) असा फक्त अर्थाचा निर्देश केला आहे. तेव्हां कोणत्या शब्दाहून कोणता प्रत्यय करावा अशी आकांक्षा उत्पन्न झाली असतां तेथें त्यामुळें ' राष्ट्रावार०' (४।२।९३) या सूत्रापासून ' विभाषा पूर्वा० ' ( ४।३।२४ ) या सूत्रापर्यंत मागील सर्व सूत्रांचा संबंध होईल.

बहुनोऽपेक्षा । अपेक्षमाणोऽयमनन्तरं योगमपेक्षेत । बहुनोऽप्यपेक्षा भवति । तद्यथा । कषादिषु यथाविध्यनुप्रयोगः [३.४.४६] इति ससामान्यकं सविशेषकं सर्वमपेक्ष्यते । अथवा पुनरस्त्वनुवृत्तिः । ननु चोक्तं या या परा प्रकृतिस्तस्यास्तस्याः पूर्वे पूर्वे प्रत्ययाः प्राप्नुवन्तीति । नैष दोषः । संबन्धमनुवर्तिष्यते । राष्ट्रावारपाराद् घखौ [४.२.९३] । ग्रामाद्यखञौ [९४] राष्ट्रावारपाराद् घखौ । कत्त्र्यादिभ्यो ढकञ्[९५] राष्ट्रावारपाराद् घखौ ग्रामाद्यखञाविति ॥

अत उत्तरं पठति ।

**शेषवचनं घादीनामपत्यादिष्वप्रसङ्गार्थम् ॥ १ ॥**

शेषवचनं क्रियते शेषे घादयो यथा स्युरपत्यादिषु मा भूवन्निति ॥ कथं च प्राप्नुवन्ति ।

**तस्येदंवचनात्प्रसङ्गः ॥ २ ॥**

तस्येदंविशेषा ह्येतेऽपत्यं समूहो निवासो विकार इति ॥

---

म्हणून त्याकरितां ‘ तत्र जातः ’ या सूत्रामध्यें त्याच्या जवळच्या सूत्राचा संबंध होईल.

अपेक्षेला अनुसरून बहुतांचाही संबंध होतो. उदा० ‘ कषादिषु यथाविध्यनुप्रयोगः ’ (३।४।४६). येथें ‘निमूलसमूलयोः०’ (३।४।३४) या सूत्रापासून अकरा सूत्रांमधील सामान्य प्रकृतीसह व विशेष प्रकृतीसह सर्वांचा जसा पूर्वी संबंध झाला असेल तसा संबंध होतो.

अथवा ‘ तत्र जातः ’ येथें मागाहून घ, ख वगैरे सर्व प्रत्ययांची अनुवृत्ति असूं दे.

पण अनुवृत्ति घेतली तर ‘ ग्रामाद्यखञौ ’ वगैरे पुढील सूत्रांनीं ज्या ज्या शब्दाहून प्रत्यय सांगितले आहेत त्या त्या शब्दाहून त्याच्या त्याच्या मागील सूत्रांनीं सांगितलेले घ, ख वगैरे प्रत्यय होऊं लागतील असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण नुसत्या प्रत्ययांची व प्रकृतींची अनुवृत्ति न करतां ज्या प्रत्ययाशीं संबंध झाला असेल त्या संबंधासकट अनुवृत्ति करतां येईल. उदा० राष्ट्रावारपाराद् घखौ ( ४ । २ । ९३ ) येथें राष्ट्र व अवारपार या शब्दांचा घ व ख या प्रत्ययांशीं संबंध झाला आहे. ‘ग्रामाद्यखञौ’ या पुढील सूत्रामध्यें पूर्वीचें राष्ट्रावारपाराद् घखौ हें सूत्र त्या संबंधासह अनुवृत्त होतें. त्याच्या पुढील कत्त्र्यादिभ्यो ढकञ् ह्या सूत्रामध्यें राष्ट्रावारपाराद् घखौ व ग्रामाद्यखञौ हीं दोन्ही सूत्रें संबंधासह अनुवृत्त होत आहेत. हें सर्व मनांत घेऊन वार्तिककार म्हणतात.

( वा. १ ) येथें जें ‘शेषे’ असें म्हटलें आहे तें अशाकरितां कीं घ वगैरे प्रत्यय शेष अर्थींच झाले पाहिजेत; अपत्य वगैरे पूर्वींच्या अर्थी न झाले पाहिजेत.

पण या घ वगैरे प्रत्ययांची अपत्य वगैरे अर्थीं प्राप्ति तरी कशी बरें येते ?

( वा. २ ) तस्येदम् म्हणजे ‘ त्याचें हें ’ या पुढील ( ४।३।१२० ) अर्थीं घ ख वगैरे प्रत्यय सांगितलेच आहेत. आणि अपत्य, समूह, निवास, विकार हे ‘इदम्’ याचे विशेष आहेत. तेव्हां अपत्य अर्थीं अण् वगैरे प्रत्यय कर्तव्य असतांना तेथें इदम् या अर्थीं प्रत्यय प्राप्त होणारच.

---

४– ‘ उपमाने कर्मणि च ’, ( ३।४।४५ ) या सूत्रामध्यें सामान्य प्रकृति धरली आहे आणि निमूलसमूलयोः कषः ( ३।४।३४ ) वगैरे इतर सूत्रांमध्यें कष् वगैरे विशेष प्रकृति धरली आहे. परंतु त्या सर्व ठिकाणीं णमुल् प्रत्ययाच्या प्रकृतीप्रमाणें पुढें या सूत्रानें अनुप्रयोग होत असतो.

५— असेंच पुढें ‘ तत्र जातः ’ या सूत्रापर्यंत समजावें.

६— कारण, विशेष असेल तेथें सामान्य असलेंच पाहिजे.

**विप्रतिषेधात्सिद्धम् ॥ ३ ॥**

अणादयः क्रियन्तां घादय इत्यणादयो भवन्ति विप्रतिषेधेन ॥

**न वा परत्वाद्धादीनाम् ॥ ४ ॥**

न वैष युक्तो विप्रतिषेधः । किं कारणम् । परत्वाद् घादीनाम्। विप्रतिषेधे परमित्युच्यते पूर्वे चाणादयः परे घादयः ॥ परेऽणादयः करिष्यन्ते । सूत्रविपर्यासश्चैवं कृतो भवति

**अणपवादत्वाच्चाण्विषये**

**घादिप्रसङ्गः ॥ ५ ॥**

अणपवादत्वाच्च घादीनामण्विषये घादयः प्राप्नुवन्ति ॥

नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नाण्विषये घादयो भवन्तीति यदयं फेश्छ च [४.१.१४९] इति फ्यन्ताच्छं शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । फिनर्थमेतत्स्यात् । सौवीरगोत्रेष्विति वर्तते न च फिनन्तं सौवीरगोत्रमस्ति ॥ गोत्रग्रहणं सामूहिकेषु ज्ञापकं दैवयातवग्रहणं वैषयिकेषु भाक्षायण-

---

(वा. ३) तेथें अण् वगैरे प्रत्यय करावे किंवा घ वगैरे प्रत्यय करावे असा विचार उपस्थित झाला असतांना विप्रतिषेधानें अण् वगैरे होतील आणि उदाहरणें सिद्ध होतील.

(वा. ४) हा विप्रतिषेध योग्य नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं घ वगैरे प्रत्यय हे पर आहेत. 'विप्रतिषेध आला असतां पर कार्य करावें' (१।४।२) असें सांगितलें आहे आणि अण् वगैरे प्रत्यय हे पूर्वपठित आहेत, व घ वगैरे प्रत्यय पर आहेत. आतां अण् वगैरे प्रत्यय हे सूत्रपाठामध्यें घ ख वगैरे प्रत्ययांच्या पुढें सांगावे तर सूत्रपाठ फिरवावा लागतो.

(वा. ५) विशेष शब्दाहून सांगितलेले हे घ ख वगैरे प्रत्यय अण् प्रत्ययाचा विषय म्हणजे अपत्य अर्थ असतांना त्याचा अपवादत्वास्तव बाध करून होऊं लागतील.

हा दोष येत नाहीं. कारण फेश्छ च (४।१। १४९) या सूत्रानें फि-प्रत्ययान्ताहून अपत्य या अर्थी छ प्रत्यय जो आचार्यांनीं सांगितला आहे त्यावरून असें ज्ञापन होतें कीं अण् प्रत्ययाच्या विषयामध्यें हे घ ख वगैरे प्रत्यय होत नाहींत.

हें ज्ञापक बरोबर जमत नाहीं. कारण फिन्-(४।१।१६०) प्रत्ययान्ताहून छ प्रत्यय होण्याकरितां 'फेश्छ च' हें सूत्र पाहिजे.

पण 'फेश्छ च' या सूत्रामध्यें सौवीर गोत्राची अनुवृत्ति आहे. आणि सौवीरगोत्रवाचक फिन्-प्रत्ययान्त शब्द मुळींच नाहीं. तेव्हां तें ज्ञापक बरोबरच आहे. तसेंच गोत्रचरणाद् वुञ् (४। ३।१२६) यानें वुञ् प्रत्यय सिद्ध असतांना 'गोत्रोक्षोष्ट्रो०' (४।२।३९) यानें समूह या अर्थी जो गोत्र-प्रत्ययान्ताहून वुञ् प्रत्यय सांगितलेला आहे तो समूह या अर्थाविषयीं ज्ञापक होईल. तसेंच 'गोत्रचरणाद् वुञ्' यानें वुञ् प्रत्यय सिद्ध होत असतांना विषय देश या अर्थी वुञ् प्रत्यय होण्याकरितां जो राजन्यादि गणामध्यें (४ २।५३) दैवयातव या गोत्रप्रत्ययान्त शब्दाचा पाठ केला आहे तो 'विषय देश' या अर्थाविषयीं ज्ञापक होईल.

---

७— नाहीं तर ह्या घ ख वगैरेपैकींच वृद्धाच्छः (४।२।११४) यानें छ प्रत्यय सिद्ध होत असल्यामुळें 'फेश्छ' च हें सूत्र व्यर्थ होईल.

८ — फिन् प्रत्यय केला असेल तेथें वृद्धि (७।२।११७,११८) होत नसल्यामुळें त्या फिन्-प्रत्ययान्त शब्दाला वृद्धसंज्ञा (१।१।७१) नाहीं. म्हणून 'वृद्धाच्छः' यानें छ प्रत्यय सिद्ध होत नाहीं.

९—' घ ख वगैरे पुढें सांगितलेले प्रत्यय हे पूर्वी सांगितलेल्या अपत्य वगैरे अर्थी होत नाहींत ' अशा अर्थाचें हें ज्ञापक समजावें. जर ' अपत्य या अर्थी होत नाहींत ' असें विशेष ज्ञापक घेतलें तर पुढील ज्ञापकें समजावीं.

ग्रहणं नैवासिकेषु ॥

**राष्ट्रावारपाराद् घखौ ॥ ४।२।९३ ॥**

**अवारपाराद्विगृहीतादपि ॥ १ ॥**

अवारपाराद्विगृहीतादपीति वक्तव्यम् । अवारीणः पारीणः अवारपारीणः ॥

**विपरीताच्च ॥ २ ॥**

विपरीताच्चेति वक्तव्यम् । पारावारीणः॥

**[ग्रामाद्यखञौ ॥ ४ । २ । ९४ ॥]**

**कत्त्र्यादिभ्यो ढकञ् ॥ ४।२।९५ ॥**

ग्रामाच्चेति वक्तव्यम् । ग्रामेयकः ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । कत्त्र्यादिभ्यो ढकञित्यत्र ग्रामादित्यनुवर्तिष्यते ॥

**कुलकुक्षिग्रीवाभ्यः श्वास्यलंकारेषु ॥ ४ । २ । ९६**

अयं योगः शक्योऽवक्तुम् । कथं कौलेयकः । कुलस्यापत्यम् ।

**कुक्षिग्रीवात्तु कन्ढञः ।**

कुलस्यापत्यं कौलेयक इति भविष्यति । कुक्षिग्रीवादपि ढञन्तात्कन्भविष्यति ॥

**[नद्यादिभ्यो ढक् ॥ ४।२।९७ ॥**

---

तसेंच 'गोत्रचरणाद् वुञ्' यानें वुञ् प्रत्यय सिद्ध होत असतांना निवास अर्थीं वुञ् प्रत्यय होण्याकरितां जो अरीहणादि गणामध्यें (४।२।८०) भास्त्रायण या गोत्रप्रत्ययान्त शब्दाचा पाठ केला आहे तो निवास वगैरे अर्थांविषयीं ज्ञापक होईल.

(सू. ९३ वा. १) 'अवारपार' या सामासिक शब्दाच्या विग्रहावस्थेतील जे अवार व पार हे दोन शब्द त्यांहूनही हा ख प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० अवारपारीणः, अवारीणः, पारीणः.

(वा. २) अवार व पार या शब्दांमध्यें वैपरीत्य केलें असतांही हा प्रत्यय होतो असें म्हणावें उदा० पारावारीणः.

(सू. ९५) ग्राम शब्दाहूनही ढकञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० ग्रामेयकः.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण कत्त्र्यादिभ्यो ढकञ् या प्रकृत सूत्रामध्यें ग्रामात् या पदाची अनुवृत्ति करतां येईल.

(सू. ९६) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल.

पण सूत्र केलें नाहीं तर कौलेयकः, कौक्षेयकः, ग्रैवेयकः हीं उदाहरणें कशीं साधावीं ?

'कुलस्यापत्यम्' कौलेयकः (४।१।१४०) असा ढकञ् प्रत्यय होईल.

'कुक्षिग्रीवात्तु कन् ढञः' म्हणजे कुक्षि आणि ग्रीवा या शब्दांहून शेष अर्थीं ढञ् प्रत्यय (४।३।५६,५७) केल्यानंतर पुढें स्वार्थी कन् प्रत्यय होईल.

---

१—(सू. ९३) राष्ट्र आणि अवारपार या दोन शब्दांहून शेष अर्थीं क्रमानें घ आणि ख हे प्रत्यय होतात. उदा०—राष्ट्रीयः, अवारपारीणः, तत्र भवः, तत्र जातः, तस्येदम् वगैरे अर्थांपैकीं संभवेल तो अर्थ येथें घ्यावा.

१—(सू. ९४) ग्राम शब्दाहून शेष अर्थीं य आणि खञ् असे प्रत्यय होतात. उदा०—ग्राम्यः ग्रामीणः.

१—(सू. ९५) कत्त्रि वगैरे शब्दांहून शेष अर्थीं ढकञ् प्रत्यय होतो. उदा०—कात्त्रेयकः.

१—(सू. ९६) कुल, कुक्षि व ग्रीवा या तीन शब्दांहून शेष अर्थीं ढकञ् प्रत्यय होतो परंतु त्या प्रत्ययान्त शब्दापासून श्वा, असि आणि अलंकार हे तीन अर्थ क्रमानें गम्यमान होत असले पाहिजेत. उदा०—कौलेयकः श्वा, कौक्षेयकः असिः, ग्रैवेयकः अलंकार..

२—कुत्र्याचें कुल घेतलें म्हणजे त्यांतील अपत्य असें कुत्र्याला म्हणतां येतें.

१—(सू. ९७) नदी वगैरे शब्दांहून शेष अर्थीं ढक् प्रत्यय होतो. उदा०—नादेयम्.

दक्षिणापश्चात्पुरसस्त्यक्
॥ ४ । २ । ९८ ॥ ]

कापिश्याः ष्फक् ॥ ४ । २ । ९९ ॥

बाह्युर्दिपर्दिभ्यश्चेति वक्तव्यम् । बाह्लायनी और्दायनी पार्दायनी ॥

रङ्कोरमनुष्येऽण् च ॥४।२।१००॥

अमनुष्य इति किमर्थम् । राङ्कवको मनुष्यः ॥

रङ्कोरमनुष्यग्रहणानर्थक्यं मनुष्यतत्स्थयोर्वुञ्विधानात् ॥ १॥

रङ्कोरमनुष्यग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । मनुष्यतत्स्थयोर्वुञ्विधानात् । अयं मनुष्ये मनुष्यस्थे च वुञ्विधीयते स बाधको भविष्यति ॥ एवं तर्हि ज्ञापयत्याचार्योऽमनुष्ये मनुष्यस्थे ष्फगणौ भवत इति ।

अमनुष्ये मनुष्यस्थे ष्फगणोर्ज्ञापकमिति चेन्नानिष्टत्वात् ॥ २ ॥

अमनुष्ये मनुष्यस्थे ष्फगणोर्ज्ञापकमिति चेत्तन्न । किं कारणम् । अनिष्टत्वात् । न ह्यमनुष्ये मनुष्यस्थे ष्फगणाविष्येते । किं तर्हि । वुञेवेष्यते ॥

अण्ग्रहणं च कच्छादिभ्योऽण्वचनात् ॥ ३ ॥

अण्ग्रहणं चानर्थकम् । किं कारणम् । कच्छादिभ्योऽण्वचनात् । कच्छादिपा-

(सू. ९९) बाह्वी, उर्दि आणि पर्दि या शब्दांहून शेष अर्थी ष्फक् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—बाह्लायनी, और्दायनी पार्दायनी.

(सू. १००) येथें अमनुष्ये असें कशाकरितां म्हटलें आहे ?

राङ्कवकः मनुष्यः येथें अण् व ष्फ हे प्रत्यय न झाले पाहिजेत.

(वा. १) रङ्कोरमनुष्ये० या प्रकृत सूत्रामध्यें अमनुष्य हा शब्द व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं मनुष्य किंवा मनुष्यस्थ हसित वगैरे अर्थ जर प्रत्ययान्तापासून गम्यमान होत असतील तर वुञ् प्रत्यय ( ४।२।१३४ ) ह्या रङ्कु शब्दाहून सांगितला आहे. तेव्हां अर्थातच तेथें तो ह्या ष्फक् व अण् यांचा बाध करील.

तर मग येथें या अमनुष्य ग्रहणावरून आचार्य असें ज्ञापित करतात कीं मनुष्यभिन्न पण मनुष्यस्थ चूडा वगैरे अर्थ गम्यमान होत असतील तर तेथें ष्फक् व अण् हे प्रत्यय होतात.

(वा २) मनुष्यभिन्न पण मनुष्यस्थ जे चूडा वगैरे अर्थ ते गम्यमान असतांना ष्फक् व अण् हे प्रत्यय होतात अशाविषयीं हें अमनुष्यग्रहण ज्ञापक आहे असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं मनुष्यभिन्न पण मनुष्यस्थ अर्थ गम्यमान असतांना तेथें ष्फक् व अण् हे प्रत्यय इष्ट नाहींत. तर तशा ठिकाणीं फक्त वुञ् प्रत्ययच इष्ट आहे.

(वा. ३) तसेंच या सूत्रामध्यें जें अण् प्रत्ययाचें विधान केलें आहे तेंही व्यर्थच आहे.

काय कारण ?

कारण असें कीं कच्छादि गणांतील शब्दाहून अण् प्रत्यय ( ४।२।१३३ ) सांगितलाच आहे. आणि या रङ्कु शब्दाचा कच्छादि गणा-

१—( सू. ९८ ) दक्षिणा, पश्चात् आणि पुरस् या शब्दांहून शेष अर्थी त्यक् प्रत्यय होतो. उदा०—दाक्षिणात्यः, पाश्चात्यः, पौरस्त्यः.

१—( सू. ९९ ) कापिशी शब्दाहून शेष अर्थी ष्फक् प्रत्यय होतो. उदा०—कापिशायनं मधु, कापिशायनी द्राक्षा.

१—( सू. १०० ) रङ्कु शब्दाहून शेष अर्थी अण् आणि ष्फक् हे प्रत्यय होतात. पण एकंदर प्रत्यान्त शब्दापासून मनुष्यभिन्न प्राणी असा अर्थ मनांत आला पाहिजे. उदा०—राङ्कवो गौः, राङ्कवायणो गौः.

ठञ्त्राण् भविष्यति ॥

[ द्युप्रागपागुदक्प्रतीचो यत् ॥ ४ । २ । १०१ ॥

कन्थायाष्ठक् ॥ ४ । २ । १०२ ॥

वर्णौ वुक् ॥ ४ । २ । १०३ ॥ ]

अव्ययात् त्यप् ॥ ४ । २ । १०४ ॥

परिगणनं कर्तव्यम् ।

अमेहक्वतसित्रेभ्यस्त्यब्विधिर्योऽव्ययात्स्मृतः ।

अमा । अमात्यः । अमा ॥ इह । इहत्यः । इह ॥ क्व । क्वत्यः । क्व ॥ तसि । ततस्त्यः यतस्त्यः । तसि ॥ त्र । तत्रत्यः यत्रत्यः ॥ इतरथा ह्यौत्तराहौपरिष्टपारतानां प्रतिषेधो वक्तव्यः स्यात् । औत्तराहः औपरिष्टः पारतः ॥

त्यब्नेर्ध्रुवे ॥ त्यब्नेर्ध्रुवे वक्तव्यः । नित्यः ॥

निसो गते ॥ त्यब्वक्तव्य इति । निष्ट्यः ॥

अरण्याण्णः ॥ अरण्याण्णो वक्तव्यः । आरण्याः सुमनसः ॥

दूरादेत्यः ॥ दूरादेत्यो वक्तव्यः । दूरेत्यः ॥

उत्तरादाहञ् ॥ उत्तरादाहञ्वक्तव्यः । औत्तराहः ॥

अव्ययात्त्यप्याविष्ट्यस्योपसंख्यानं छन्दसि ॥ १ ॥

अव्ययात्त्यबित्यत्राविष्ट्यस्य च्छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । आविष्ट्यो वर्धते

---

मध्यें पाठ असल्यामुळें त्याहून अण् प्रत्यय होईलच.

( सू. १०४ ) कांहीं ठराविक अव्ययांहूनच हा त्यप् प्रत्यय होतो असें परिगणन करावें.

( श्लो. १ ) अमा, इह, क्व, तसि-प्रत्ययान्त आणि त्र-प्रत्ययान्त याच अव्ययांहून हा त्यप् प्रत्यय होतो.उदा०—अमात्यः,इहत्यः, क्वत्यः, ततस्त्यः, यतस्त्यः,तत्रत्यः,यत्रत्यः. हें परिगणन केलें नाहीं तर 'औत्तराह, औपरिष्ट आणि पारत वगैरे शब्दांमध्यें अव्ययाहून त्यप् होत नाहीं' असा निषेध सांगावा लागेल.

नि याहून त्यप् प्रत्यय होतो असें म्हणावें, पण त्या त्यप्-प्रत्ययान्त शब्दाचा अर्थ ध्रुव असा पाहिजे. उदा० नित्यः.

निर्गत या अर्थाच्या निस् याहून त्यप् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० निष्ट्यः.

अरण्य शब्दाहून शेष अर्थीं ण प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० अरण्ये भवाः आरण्याः सुमनसः.

दूर शब्दाहून एत्य प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० दूरेत्यः.

उत्तर शब्दाहून शेष अर्थीं आहञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० औत्तराहः.

( वा. १ ) येथें वेदांमध्यें आविष्ट्य शब्दाचें उपसंख्यान करावें.उदा० आविष्ट्यो वर्धते चारुः.

---

१—( सू. १०१ ) दिव्, प्राच्, अपाच्, उदच् आणि प्रत्यच् या शब्दांहून शेष अर्थीं यत् प्रत्यय होतो. उदा०—दिव्यम्, प्राच्यम्, अपाच्यम्, उदीच्यम्, प्रतीच्यम्,

१— ( सू. १०२ ) कन्था शब्दाहून शेष अर्थीं ठक् प्रत्यय होतो. उदा०—कान्थिकः.

१— ( सू. १०३ ) वर्णु देशांतील कन्था असेल तर त्या कन्था शब्दाहून शेष अर्थीं वुक् प्रत्यय होतो. उदा०-कान्थकः. वर्णु नांवाचा एक नद आहे. त्याच्या जवळच्या देशाला वर्णु म्हणतात.

१ – ( सू. १०४ ) अव्ययाहून शेष अर्थीं त्यप् प्रत्यय होतो. उदा०—अमात्यः, इहत्यः.

२—उत्तराहि ( ५।३।३७ ) उपरिष्टात् ( ५।३।३१ ) व परतः ( ५।६।७ ) या अव्ययांहून 'तत्र भवः' या अर्थी ( ४।३।५३ ) अण् प्रत्यय झाला आहे.

३—आविस् हें अव्यय परिगणनांत नाहीं म्हणून त्याहून त्यप् प्रत्यय येथें सांगितला आहे.

वाद: ॥

अव्ययतीररूप्योत्तरपदोदीच्यग्रामकोपधविधेर्वृद्धाच्छो विप्रतिषेधेन ॥२॥

अव्ययतीररूप्योत्तरपदोदीच्यग्रामकोपधविधेर्वृद्धाच्छो भवति विप्रतिषेधेन ॥ अव्ययात्त्यब्भवतीत्यस्यावकाशः ।अमात्यः। छस्यावकाशः । शालीयः मालीयः । आरादुभयं प्राप्नोति । आरातीयः ॥ तीरोत्तरपदादञ्भवतीत्यस्यावकाशः। काखतीर काखतीरी । छस्य स एव । वायसतीरादुभयं प्राप्नोति । वायसतीरीयः ॥ रूप्योत्तरपदाञ्ञ्यो भवतीत्यस्यावकाशः । चणाररूप्य चाणाररूप्या । छस्य स एव । माणिरूप्यादुभयं प्राप्नोति । तं चापि च्छं परत्वाद्योपधलक्षणो वुञ् बाधते । माणिरूप्यकः ॥ उदीच्यग्रामाच्च बह्वचोऽन्तोदात्तादञ्भवतीत्यस्यावकाशः । शिवपुर शैवपुरः । छस्य स एव । वाडवकर्षादुभयं प्राप्नोति । वाडवकर्षीयः ॥ कोपधादण्भवतीत्यस्यावकाशः । निलीनक नैलीनकः । छस्य स एव । औलूकादुभयं प्राप्नोति औलूकीयः ॥

तेभ्यष्ठञ्ञिठौ ॥ ३ ॥

तेभ्यस्त्यबादिभ्यष्ठञ्ञिठौ भवतो विप्रतिषेधेन ॥ अव्ययात्त्यब्भवतीत्यस्यावकाशः । अमात्यः । ठञ्ञिठयोरवकाशः । कारन्तविकी कारन्तविका । आराग्राम वाहीकग्रामस्तस्मादुभयं प्राप्नोति । आरात्की

(वा. २) अव्यय०(४।२।१०४), तीररूप्योत्तरपद० (४।२।१०६) उदीच्यग्राम० (४।२।१०९) आणि कोपध० (४।२।११०) या विधींपेक्षां वृद्धाच्छः (४।२।११४) हा विधि विप्रतिषेधानें परत्वास्तव होतो; 'अव्ययात्त्यप्' याला अमात्यः येथें अवकाश आहे; आणि शालीयः, मालीयः येथें छ प्रत्ययाला अवकाश आहे; पण आरातीयः येथें दोघांची प्राप्ति येते. तसेंच काखतीर शब्दाहून अञ् प्रत्यय केल्यावर काखतीरी असें होतें, तेथें 'तीररूप्योत्तरपदात्०' याला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे. पण वायसतीरीय: येथें वायसतीर शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तसेंच चणाररूप्य शब्दाहून ञ प्रत्यय केल्यावर चाणाररूप्या असें होतें. तेथें 'रूप्योत्तरपदात्०' याला अवकाश आहे; व छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण माणिरूप्य शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. आतां तेथें यकार उपधेला असल्यामुळें योपधात्० (४।२।१२१) यानें सांगितलेला वुञ् प्रत्यय त्या छ प्रत्ययाचाही परत्वास्तव बाध करतो आणि माणिरूप्यकः असें रूप होतें. तसेंच शिवपुर शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन शैवपुरम् असें होतें; तेथें 'उदीच्यग्रामाच्च बह्वचः०' याला अवकाश आहे व छ प्रत्ययाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण वाडवकर्षीयः येथें वाडवकर्ष शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तसेंच निलीनक शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन नैलीनकः असें रूप होतें; तेथें 'कोपधादण्' याला अवकाश आहे व छ प्रत्ययाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण औलूकीयः येथें औलूक शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेव्हां या सर्व ठिकाणीं त्यप् वगैरे प्रत्ययांचा परत्वास्तव छ प्रत्यय बाध करतो.

(वा. ३) त्यप् वगैरे ज्या प्रत्ययांचा छ प्रत्यय बाध करतो त्या त्यप् वगैरे प्रत्ययांपेक्षां ठञ् व ञिठ हेही प्रत्यय (४।२।११६–११८) परत्वास्तव होतात. 'अव्ययात्त्यप्' याला अमात्यः येथें अवकाश आहे आणि कारन्तविकी व कारन्तविका येथें ठञ् व ञिठ या प्रत्ययांना अवकाश आहे; पण आरात्की व आरात्का येथें दोघांची प्राप्ति येते. आरात् या

४—अमेह० हें परिगणन मनांत न घेतां हें लिहिलें आहे. येथें परिगणनाचें काम परत्वास्तव बाध करून साधत आहे.

आराल्का ॥ तीरोत्तरपदादञ्भवतीत्यस्यावकाशः । कखतीर काखतीरी । ठञ्ञिठयोः स एव । कास्तीरो नाम वाहीकग्रामस्तस्मादुभयं प्राप्नोति । कास्तीरिकी कास्तीरिका ॥ रूप्योत्तरपदाञ्ञो भवतीत्यस्यावकाशः । चणाररूप्य चाणाररूप्या । ठञ्ञिठयोः स एव । दासरूप्यं नाम वाहीकग्रामस्तस्मादुभयं प्राप्नोति । तौ चापि ठञ्ञिठौ परत्वाद्योपधलक्षणो वुञ्बाधते । दासरूप्यकः ॥ उदीच्यग्रामाच्च बह्वचोऽन्तोदात्तादञ्भवतीत्यस्यावकाशः । शिवपुर शैवपुरः । ठञ्ञिठयोः स एव । शाकलं नाम वाहीकग्रामस्तस्मादुभयं प्राप्नोति । शाकलिकी शाकलिका ॥ कोपधादण्भवतीत्यस्यावकाशः । निलीनक नैलीनकः । ठञ्ञिठयोः स एव । सौसुकं नाम वाहीकग्रामस्तस्मादुभयं प्राप्नोति । तौ चापि ठञ्ञिठौ परत्वात्कोपधलक्षणश्छो बाधते । सौसुकीयः ॥

न वा ठञादीनां छापवादत्वात्तद्विषये चाभावादितरेषाम् ॥ ४ ॥

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । ठञादीनां छापवादत्वात् । ठञादयश्छापवादाः । तद्विषये चाभावादितरेषाम् । तद्विषये छविषये त्यबादीनामभावः ॥

---

नांवाचें वाहीक देशामध्यें एक गांव आहे. तसेंच कखतीर शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन काखतीरी असें होतें; तेथें तीरोत्तरपदात्० याला अवकाश आहे; ठञ् व ञिठ यांना अवकाश दाखविलाच आहे. आणि कास्तीरिकी व कास्तीरिका येथें दोघांची प्राप्ति येते. कास्तीर या नांवाचें वाहीक देशामध्यें एक गांव आहे. तसेंच चणाररूप्य शब्दाहून ञ प्रत्यय होऊन चाणाररूप्या असें होतें. तेथें रूप्योत्तरपदाहून सांगितलेल्या ञ प्रत्ययाला अवकाश आहे; ठञ् व ञिठ यांना अवकाश दाखविलाच आहे; पण दासरूप्य नांवाचें जें वाहीक देशांतील गांव आहे त्याहून दोघांची प्राप्ति येते. आतां तेथें यकार उपधेला असल्यामुळें प्राप्त झालेला वुञ् प्रत्यय हा त्या ठञ् व ञिठ प्रत्ययांचाही परत्वात्तव बाध करतो व दासरूप्यकः असें रूप होतें. तसेंच शिवपुर शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन शैवपुरम् असें होतें. तेथें ‘ उदीच्यग्रामाच्च बह्वचो० ’ याला अवकाश आहे. ठञ् व ञिठ यांना अवकाश दाखविलाच आहे; पण शाकालिकी व शाकलिका येथें दोघांची प्राप्ति येते. शाकल म्हणून एक वाहीक देशांतील गांव आहे. तसेंच निलीनक शब्दाहून अण् प्रत्यय होऊन नैलीनकः असें होतें. तेथें ‘ प्रस्थोत्तरपदपलद्यादिकोपधादण् ’ याला अवकाश आहे. ठञ् व ञिठ यांना अवकाश दाखविलाच आहे; पण सौसुक नांवाचें जें वाहीक देशांतील गांव आहे त्याहून दोघांची प्राप्ति येते. आतां तेथें उपधेला ककार असल्यामुळें प्राप्त झालेला छ प्रत्यय ( ४।२।४१ वा. १ ) त्या ठञ् व ञिठ प्रत्ययांचाही बाध करतो व सौसुकीयः असें रूप होतें.

( वा. ४ ) तेभ्यष्ठञ्ञिठौ ( वा. ३ ) हा जो विप्रतिषेध सांगितला आहे त्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ठञ् वगैरे प्रत्यय हे छ प्रत्ययाचे अपवाद आहेत. आणि त्या छ प्रत्ययाच्या विषयामध्यें तर त्या त्यप् वगैरे प्रत्ययांचा अभावच आहे.

---

५—कारण, त्या त्यप् वगैरे प्रत्ययांचा छ प्रत्ययानें बाध होत आहे. एकंदरींत त्यप् वगैरेंचा परत्वात्तव बाधक जो छ प्रत्यय त्याचे जे अपवाद ठञ् व ञिठ त्यांच्याशीं त्या त्यप् वगैरे प्रत्ययांचा विप्रतिषेध बरोबर नाहीं. कारण त्यप् वगैरे प्रत्यय आणि ठञ् व ञिठ हे प्रत्यय यांची बरोबरी नाहीं.

### कोपधादणः पुनर्वचनमन्यनिवृत्त्यर्थम् ॥ ५ ॥

अयं चाप्ययुक्तो विप्रतिषेधो योऽयं कोपधादणश्छस्य च । किं कारणम् । कोपधादणः पुनर्वचनमन्यनिवृत्त्यर्थम् । सिद्धोऽत्राणुत्सर्गेणैव तस्य पुनर्वचन एतत्प्रयोजनं येऽन्ये तदपवादाः प्राप्नुवन्ति तद्बाधनार्थम् । स यथैव तदपवादमञं बाधत एवं छमपि बाधेत ।

### तस्मादन्तोदात्ते कोपधप्रतिप्रषेधः ॥६॥

तस्मादन्तोदात्ते कोपधादञः प्रतिषेधो वक्तव्यः ॥ न वक्तव्यः । मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन्बाधन्त इत्येवं कोपधादणञं बाधिष्यते छं न बाधिष्यते ॥

### छादोर्देशे कालाट्ठञ् ॥ ७ ॥

छादोर्देशे ठञ् [४.२.११९] कालट्ठञ् [४.३.११] इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । छस्यावकाशः । शालीयः मालीयः । ओर्देशे ठञ्भवतीत्यस्यावकाशः । निषाद्कर्षू नैषाद्कर्षुकः । इहोभयं प्राप्नोति । दाक्षिकर्षुकः ॥ कालाट्ठञ्भवतीत्यस्यावकाशः । आर्धमासिकम् सांवत्सरिकम् । छस्य स एव । मासादुभयं प्राप्नोति । मासिकम् ॥

### नक्षत्रादण् ॥ ८ ॥

नक्षत्रादण्छाद्भवति विप्रतिषेधेन । अणोऽवकाशः । तैषः पौषः । छस्य स एव । स्वातेरुभयं प्राप्नोति । सौवातः ॥

---

(वा.५) तसेंच कोपधादण् आणि छ प्रत्यय यांचा जो विप्रतिषेध दाखविला आहे तोही बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं पुनर्वचन हें अन्यनिवृत्त्यर्थ आहे म्हणजे येथें सामान्य सूत्रानेंच (४।१।८३) अण् प्रत्यय सिद्ध आहे असें असूनही जो येथें अण् प्रत्यय सांगितला आहे त्याचा उपयोग असा कीं जे त्या अण् प्रत्ययाचे अपवाद प्रत्यय प्राप्त होत आहेत त्यांचा बाध करून अण् प्रत्ययच झाला पाहिजे. तेव्हां तो पुनः सांगितलेला अण् प्रत्यय (४।२।११०) जसा सामान्यतः सांगितलेल्या अण् प्रत्ययाचा अपवाद जो अञ् (४।२।१०९) त्याचा बाध करतो तसा छ प्रत्ययाचाही बाध करील.

(वा. ६) तेव्हां उदीच्यग्रामाच्च बह्वचोऽन्तोदात्तात् (४।२।१०९) येथें उपधेला ककार असलेल्या शब्दाहून अञ् प्रत्यय होत नाहीं असा निषेध सांगावा.

तसा निषेध सांगावयास नको. कारण 'मध्ये पठित अपवाद हे पूर्वविधींचाच बाध करतात, परविधींचा बाध करीत नाहींत' या न्यायानें हा कोपधादण् (४।२।११०) या सूत्रामध्यें सांगितलेला अण् पूर्वीच्या (४।२।१०९) अञ् प्रत्ययाचाच बाध करील; पुढील छ प्रत्ययाचा (४।२।११४) बाध करणार नाहीं.

(वा. ७) छ प्रत्ययापेक्षां (४।२।११४) ओर्देशे ठञ् (४।२।११९) आणि कालाट्ठञ् (४।३।११) हे ठञ् प्रत्यय विप्रतिषेधानें होतात. शालीयः व मालीयः येथें छ प्रत्ययाला अवकाश आहे. निषादकर्षू शब्दाहून ठञ् प्रत्यय केला असतां नैषादकर्षुकः असें रूप होतें. तेथें ओर्देशे ठञ् याला अवकाश आहे. पण दाक्षिकर्षुकः येथें दोघांची प्राप्ति येते. तसेंच आर्धमासिकम् व सांवत्सरिकम् येथें कालाट्ठञ् याला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण मासिकम् येथें मासशब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव ठञ् प्रत्यय होतो.

(वा. ८) छ प्रत्ययापेक्षां नक्षत्रवाचक शब्दांहून सांगितलेला अण् प्रत्यय (४।३।१६) विप्रतिषेधानें परत्वास्तव होतो. तैषः व पौषः येथें त्या अण् प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण सौवातः येथें स्वाति शब्दाहून दोघांची प्राप्ति येते तेथें

## अव्ययात्त्यप्टघुटघुलौ ॥ ९ ॥

अव्ययात्त्यप्टघुटघुलौ छाद्भवतो विप्रतिषेधेन । टघुटघुलोरवकाशः । दोषातनम् दिवातनम् । छस्य स एव । प्रातःशब्दादुभयं प्राप्नोति । प्रातस्तनम् ॥

## शरीरावयवाद्यत् ॥ १० ॥

शरीरावयवाद्यच्छाद्भवति विप्रतिषेधेन । यतोऽवकाशः । दन्त्यम् ओष्ठ्यम् । छस्य स एव । पादशब्दादुभयं प्राप्नोति । पद्यम् ॥

## वर्गान्ताच्चाशब्दे यत्खौ ॥ ११ ॥

वर्गान्ताच्चाशब्दे यत्खौ छाद्भवतो विप्रतिषेधेन । यत्खयोरवकाशः । अक्रूरवर्ग्यः अक्रूरवर्गीणः । छस्य स एव । वासुदेववर्गादुभयं प्राप्नोति । वासुदेववर्ग्यः वासुदेववर्गीणः ॥

## बह्वचोऽन्तोदात्ताट्ठञ् ॥ १२ ॥

बह्वचोऽन्तोदात्ताट्ठञ् [४. ३. ६७] छाद्भवति विप्रतिषेधेन । ठञोऽवकाशः । नतानत नातानतिकः । छस्य स एव । सामस्तादुभयं प्राप्नोति । सामस्तिकः ॥

## आयस्थानेभ्यष्ठक् ॥ १३ ॥

आयस्थानेभ्यष्ठक्छाद्भवति विप्रतिषेधेन । ठकोऽवकाशः । शौल्किकम् गौल्मिकम् । छस्य स एव । आपणादुभयं प्राप्नोति । आपणिकम् ॥

## विद्यायोनिसंबन्धेभ्यो वुञ् ॥ १४ ॥

विद्यायोनिसंबन्धेभ्यो वुञ् [४. ३. ७७] छाद् भवति विप्रतिषेधेन । वुञोऽवकाशः । औपाध्यायकम् पैतामहकम् ।

---

परत्वास्तव अण् होतो.

(वा. ९) छ प्रत्ययापेक्षां अव्ययाहून सांगितलेले टघु व टघुल् हे प्रत्यय (४।३।२३) विप्रतिषेधानें होतात. दोषातनम् व दिवातनम् येथें टघु व टघुल् प्रत्ययांना अवकाश आहे. छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे. आणि प्रातस्तनम् येथें प्रातः या अव्ययाहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव टघु व टघुल् प्रत्यय होतात.

(वा. १०) छ प्रत्ययापेक्षां शरीरावयवाद्यत् (४।३।५५) हा यत् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. दन्त्यम् व औष्ठ्यम् येथें त्या यत् प्रत्ययाला अवकाश आहे. छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे. पण पद्यम् येथें पाद शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव यत् प्रत्यय होतो.

(वा. ११) अशब्दे यत्खा०(४।३।६४) यानें वर्गशब्दान्ताहून सांगितलेले यत् व ख हे प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतात. अक्रूरवर्ग्यः व अक्रूरवर्गीणः येथें यत् व ख या प्रत्ययांना अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण वासुदेववर्ग्यः व वासुदेववर्गीणः येथें दोघांची प्राप्ति येते तेथें परत्वास्तव ( यत् व ख ) हे प्रत्यय होतात.

(वा. १२) छ प्रत्ययापेक्षां 'बह्वचोऽन्तोदात्ताट्ठञ्' (४।३।६७) हा ठञ् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. समानत शब्दाहून ठञ् प्रत्यय होऊन 'सामानतिकः' असें रूप होतें. तेथें ठञ् प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण सामस्तिकः येथें सामस्त शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव ठञ् प्रत्यय होतो.

(वा. १३) ठगायस्थानेभ्यः (४।३।७५) हा ठक् प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो. शौल्किकम्, व गौल्मिकम् येथें ठक् प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण आपणिकम् येथें आपण शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव ठक् प्रत्यय होतो.

(वा. १४) विद्यायोनिसंबन्धेभ्यो वुञ् (४।३।७७) हा वुञ् प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो. औपाध्यायकम् व पैतामह-

छस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । आचार्यकम् मातुलकम् ॥

ऋतष्ठञ् ॥ १५ ॥

ऋतष्ठञ् [ ४. ३. ७८ ] छाद् भवति विप्रतिषेधेन । ठञोऽवकाशः । हौतृकम् स्वासृकम् । छस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । शास्तृकम् भ्रातृकम् ॥

रूप्यमयटौ ॥ १६ ॥

रूप्यमयटौ छाद् भवतो विप्रतिषेधेन । रूप्यमयटोरवकाशः । देवदत्तरूप्यम् देवदत्तमयम् । छस्य स एव । वायुदत्तादुभयं प्राप्नोति । वायुदत्तरूप्यम् वायुदत्तमयम् ॥

अचित्ताट्ठक् ॥ १७ ॥

अचित्ताट्ठक्छाद् भवति विप्रतिषेधेन । ठकोऽवकाशः । आपूपिकः शाष्कुलिकः मौदकिकः । छस्य स एव । पायसादुभयं प्राप्नोति । पायसिकः ॥

गोत्रक्षत्रियाख्येभ्यो बहुलं वुञ् ॥१८॥

गोत्रक्षत्रियाख्येभ्यो बहुलं वुञ् [ ४ ३. ९९ ] छाद् भवति विप्रतिषेधेन । वुञो ऽवकाशः । ग्लौचुकायनकः त्रैगर्तकः । छस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । गार्गकः वात्सकः मालवकः ॥

णिनिरन्तेवासिब्राह्मणेभ्यः ॥१९॥

णिनिरन्तेवासिब्राह्मणेभ्यश्छाद् भवति विप्रतिषेधेन । णिनेरवकाशः । हारिद्रविणः तौम्बुरविणः भाल्लविनः । छस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । आरुणिनः शाट्यायनिनः ॥

---

कम् येथें त्या वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे, पण आचार्यकम् व मातुलकम् येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव वुञ् प्रत्यय होतो.

(वा. १५) ऋतष्ठञ् (४।३।७८) हा ठञ् प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो. हौतृकम् व स्वासृकम् येथें ठञ् प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण शास्तृकम् व भ्रातृकम् येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव ठञ् प्रत्यय होतो.

(वा. १६) रूप्य (४।४।८१) आणि मयट् (४।३।८२) हे प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतात. देवदत्तरूप्यम् व देवदत्तमयम् येथें रूप्य व मयट् यांना अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण वायुदत्तरूप्यम् व वायुदत्तमयम् येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव रूप्य व मयट् हे प्रत्यय होतात.

(वा. १७) अचित्तहस्ति० (४।३।९६) यानें भक्तिः या अर्थी सांगितलेला ठक् प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो. आपूपिकः, शाष्कुलिकः व मौदकिकः येथें त्या ठक् प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण पायसिकः येथें पायस शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव ठक् प्रत्यय होतो.

(वा. १८) गोत्रक्षत्रियाख्येभ्यो बहुलं वुञ् (४।३।९९) हा वुञ् प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो. ग्लौचुकायनकः व त्रैगर्तकः येथें त्या वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण गार्गकः, वात्सकः व मालवकः येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव वुञ् प्रत्यय होतो.

(वा. १९) कलापिवैशम्पायनान्तेवासिभ्यश्च (४।३।१०४) व पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेषु (४।३।१०५) ह्या सूत्रांनीं सांगितलेला णिनि प्रत्यय हा छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो. हारिद्रविणः तौम्बुरविणः व भाल्लविनः येथें णिनि प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण आरुणिनः व शाट्यायनिनः येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव णिनि प्रत्यय होतो.

**पत्त्रपूर्वादञ् ॥ २० ॥**

पत्त्रपूर्वादञ् [४. ३. १२२] छाद् भवति विप्रतिषेधेन । अञोऽवकाशः । उष्ट्र औष्ट्रम् औष्ट्ररथम् । छस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । वामी वामम् वामीरथम् ॥

**द्वन्द्वाद्वुन् वैरमैथुनिकयोः ॥ २१ ॥**

द्वन्द्वाद्वुन्वैरमैथुनिकयोः [४.३.१२५] छाद् भवति विप्रतिषेधेन । वुनोऽवकाशः । अहिनकुलिका । छस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । काकोलूकिका श्वावराहिका ॥

**गोत्रचरणाद्वुञ् ॥ २२ ॥**

गोत्रचरणाद्वुञ् [४.३.१२६] छाद् भवति विप्रतिषेधेन । वुञोऽवकाशः । ग्लौचुकायनकम् म्लौचुकायनकम् । काठकम् कालापकम् । छस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । गार्गकम् वात्सकम् । मौदकम् पैप्पलादकम् ॥

**कण्वादीञोऽण्विधेः ॥ २३ ॥**

कण्वादिभ्योऽण्भवतीञोऽण्भवतीत्येतस्माद्वुञ्भवति विप्रतिषेधेन । कण्वादिभ्योऽण्भवतीञोऽण्भवतीत्यस्यावकाशः । काण्वा दण्डमाणवाः । दाक्षा दण्डमाणवाः । वुञः स एव । इहोभयं प्राप्नोति । काण्वकम् दाक्षकम् ॥

**ठञ्ञिठाभ्यामोर्देशे ठञ् ॥ २४ ॥**

ठञ्ञिठाभ्यामोर्देशे ठञ् [४. २ ११९] इत्येतद्भवति विप्रतिषेधेन ठञ्ञिठयोरवकाशः । कारन्तविकी कारन्तविका । ओर्देशे ठञ्भवतीत्यस्यावकाशः

---

(वा. २०) पत्त्रपूर्वादञ् (४।३।१२२) हा अञ् प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो. उष्ट्र शब्दाहून अञ् प्रत्यय (४।३।१२१) होऊन औष्ट्रम् असें रूप होतें. तेथें व औष्ट्ररथम् येथें अञ् प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे. पण वामी शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन वामम् असें होतें. तेथें आणि वामीरथम् येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव अञ् प्रत्यय होतो.

(वा. २१) द्वंद्वाद्वुन् वैरमैथुनिकयोः (४।३।१२५) हा वुन् प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो. अहिनकुलिका येथें त्या वुन् प्रत्ययाला अवकाश आहे; छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; आणि काकोलूकिका व श्वावराहिका येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव वुन् प्रत्यय होतो.

(वा. २२) गोत्रचरणाद्वुञ् (४।३।१२६) हा वुञ् प्रत्यय छ प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो. ग्लौचुकायनकम् म्लौचुकायनकम् काठकम् व कालापकम् येथें वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण गार्गकम्, वात्सकम्, मौदकम् व पैप्पलादकम् येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव वुञ् प्रत्यय होतो.

(वा. २३) कण्व वगैरे शब्दांहून केलेला जो गोत्र प्रत्यय तदन्ताहून (४।२।१११) आणि इञ्-प्रत्ययान्ताहून (४।२।११२) सांगितलेला जो अण् प्रत्यय त्यापेक्षां वुञ् प्रत्यय (४।३।१२६) विपतिषेधानें होतो. काण्वाः व दण्डमाणवाः येथें 'कण्वादिभ्यो गोत्रे' या अण् प्रत्ययाला अवकाश आहे; दाक्षाः व दण्डमाणवाः येथें इञश्च या अण् प्रत्ययाला अवकाश आहे; वुञ् प्रत्ययाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण काण्वकम् व दाक्षकम् येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव वुञ् प्रत्यय होतो.

(वा. २४) ठञ् व ञिठ (४।२।११६–११८) या प्रत्ययांपेक्षां ओर्देशे ठञ् (४।२।११९) हा ठञ् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. कारन्तविकी व

---

६ —न दण्डमाण० (४।२।११) या निषेधामुळें येथें वुञ् प्रत्यय (४।३।१२६) झाला नाहीं.

तेव्हां या अण् व ठञ् यांची बरोबरी दिसत नाहीं.

निषाहकर्षू नैषाहकर्षुकः । इहोभयं प्राप्नोति । नापितवास्तुकः । ठञ्भवति विप्रतिषेधेन ॥

न वा ठञोऽनवकाशत्वात् ॥ २५ ॥

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । ठञोऽनवकाशत्वात् । अनवकाशष्ठञ् ठञ्ञिठौ बाधिष्यते । ननु चेदानीमेवावकाशः प्रक्लृप्तः । यद् वृद्धमनुवर्णान्तं वाहीकग्रामः स ठञ्ञिठयोरवकाशः । यदवृद्धमुवर्णान्तमवाहीकग्रामः स ठञोऽवकाशः । यद्वृद्धमुवर्णान्तं वाहीकग्रामश्च तस्मादुभयं प्राप्नोति ॥ एवं तर्हि नायमस्य विप्रतिषेधस्योपालम्भः । कस्य तर्हि । छादोर्देशे कालाट्ठञ्भिरत्येतस्य । ननु च तत्राप्यवकाशः प्रक्लृप्तः । यद्वृद्धमनुवर्णान्तं स छस्यावकाशः । यदवृद्धमुवर्णान्तं स ठञोऽवकाशः । यद्वृद्धमुवर्णान्तं देशश्च तस्मादुभयं प्राप्नोति । एवं तर्हि वृद्धात्प्राचाम् [ ४. २. १२० ] इत्यनेन वृद्धग्रहणेन किं क्रियते । यावद् ब्रूयात्पूर्वस्मिन्योगे वृद्धाच्चावृद्धाच्चेति । यदेतस्मिन्योगे वृद्धग्रहणं तदनवकाशं तस्यानवकाशत्वादयुक्तो विप्रतिषेधः ॥

योपधप्रस्थादीनां वुञ् ॥ २६ ॥

योपधप्रस्थादीनां वुञ्ठञ्ञिठाभ्यां

---

कारन्तविका येथें ठञ् व ञिठ या प्रत्ययांना अवकाश आहे; निषाहकर्षू शब्दाहून ठञ् प्रत्यय होऊन नैषाहकर्षुकः असें रूप होतें; तेथें ओर्देशे ठञ् याला अवकाश आहे; पण नापितवास्तुकः येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव ठञ् प्रत्यय होतो.

( वा. २५ ) ह्या विप्रतिषेधांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ओर्देशे ठञ् हा अनवकाश असल्यामुळें तो ठञ् व ञिठ यांचा बाध करील.

पण तो अनवकाश आहे असें कसें म्हणतां ? आतांच त्याला अवकाश दाखविला आहे ना ? वाहीकग्रामवाचक जो शब्द वृद्ध आहे पण उवर्णान्त नाहीं तेथें ठञ् व ञिठ यांना अवकाश आहे; जो शब्द उवर्णान्त आहे पण वृद्ध नव्हे व वाहीकग्रामही नव्हे तेथें ठञ् प्रत्ययाला अवकाश आहे. पण जो शब्द उवर्णान्त आहे, वृद्ध आहे; आणि वाहीकग्रामही आहे, त्याहून दोघांची प्राप्ति येते.

तर मग 'न वा ठञोऽनवकाशत्वात्' असा जो येथें विप्रतिषेधाचा निषेध केला आहे तो 'ठञ्ञिठाभ्यामोर्देशे ठञ्' ( वा. २४ ) या विप्रतिषेधाचा नव्हे, 'तर छादोर्देशे कालाठञ्' या ( वा. ७ ) विप्रतिषेधाचा आहे.

पण तेथेंही दोघांना अवकाश दाखविलाच आहे. तो असा कीं, जो शब्द वृद्ध आहे पण उवर्णान्त नाहीं अशा ठिकाणीं म्ह. शालीयः, मालीयः येथें छ प्रत्ययाला अवकाश आहे; व जो शब्द उवर्णान्त आहे पण वृद्ध नाहीं, तेथें म्हणजे नैषाहकर्षुकः येथें ठञ् प्रत्ययाला अवकाश आहे; पण जो शब्द वृद्ध आहे उवर्णान्त आहे व देशवाचकही आहे तेथें दोघांची प्राप्ति येते.

तर मग आतां ओर्देशे ठञ् (४।२।११९) या सूत्राच्या पुढील 'वृद्धात्प्राचाम्' या सूत्रामध्यें जो वृद्धात् असा शब्द उच्चारला आहे. त्यावरून असें सिद्ध होतें कीं, पूर्व सूत्राला वृद्ध व अवृद्ध अशीं दोन्ही प्रकारचीं उदाहरणें आहेत. त्यांपैकीं वृद्ध उदाहरणांत सर्वत्र छ प्रत्ययाची प्राप्ति येत असल्यामुळें तो उवर्णान्त वृद्ध शब्दाहून सांगितलेला ठञ् प्रत्यय अनवकाश होतो. तेव्हां अनवकाश असल्यामुळें तेथें विप्रतिषेध बरोबर नाहीं.

( वा. २६) यकारोपध शब्दाहून सांगितलेला ( ४।२।१२१ ) आणि प्रस्थ वगैरे शब्द अंतीं असलेल्या शब्दाहून सांगितलेला

भवति विप्रतिषेधेन । योपधाद्वुञ्भवतीत्यस्यावकाशः । सांकाश्य सांकाश्यकः । ठञ्ञिठयोः स एव । दासरूप्यं नाम वाहीकग्रामस्तस्मादुभयं प्राप्नोति । दासरूप्यकः ॥ प्रस्थान्ताद्वुञ्भवतीत्यस्यावकाशः । मालाप्रस्थ मालाप्रस्थकः । ठञ्ञिठयोः स एव । पातानप्रस्थं नाम वाहीकग्रामस्तस्मादुभयं प्राप्नोति । पातानप्रस्थकः॥ पुरान्ताद्वुञ्भवतीत्यस्यावकाशः। काञ्चीपुर काञ्चीपुरकः । ठञ्ञिठयोः स एव । नान्दीपुरं नाम वाहीकग्रामस्तस्मादुभयं प्राप्नोति । नान्दीपुरकः ॥ वहान्ताद्वुञ्भवतीत्यस्यावकाशः । वातवह वातवहकः । ठञ्ञिठयोः स एव । कौकुडीवहं नाम वाहीकग्रामस्तस्मादुभयं प्राप्नोति । कौकुडीवहकः ॥

ओश्च ठञः ॥ २७ ॥

ओश्च ठञो वुञ्भवति विप्रतिषेधेन । ओष्ठञोऽवकाशः । नैषादकर्षुकः । वुञः स एव । आप्रीतमायोरुभयं प्राप्नोति । आप्रीतमायवकः ॥

जनपदानामकाणौ ॥ २८ ॥

जनपदानामकाणावोष्ठञो भवतो विप्रतिषेधेन । अकस्यावकाशः । अङ्गाः आङ्ग-

---

( ४।२।१२२ ) वुञ् प्रत्यय हा ठञ् व ञिठ ( ४।२।११६–११८ ) या प्रत्ययांपेक्षां विप्रतिषेधानें अगोदर होतो. सांकाश्य शब्दाहून वुञ् प्रत्यय होऊन सांकाश्यकः असें रूप होतें तेथें यकारोपधशब्दाहून सांगितलेल्या वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे. ठञ् व ञिठ यांना अवकाश दाखविलाच आहे. आणि दासरूप्य म्हणून जो वाहीक ग्राम आहे त्याहून दोघांची प्राप्ति येते. तेव्हां तेथें परत्वास्तव वुञ् प्रत्यय होतो व दासरूप्यकः असें रूप होतें. तसेंच मालाप्रस्थ शब्दाहून वुञ् प्रत्यय होऊन मालाप्रस्थकः असें रूप होतें. तेथें प्रस्थ-शब्दान्ताहून सांगितलेल्या वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे. ठञ् व ञिठ या प्रत्ययांना अवकाश दाखविलाच आहे. आणि पातानप्रस्थ नांवाचा जो वाहीक ग्राम आहे तेथें दोघांची प्राप्ति येते. तेव्हां तेथें परत्वास्तव वुञ् प्रत्यय होतो व पातानप्रस्थकः असें रूप होतें. तसेंच काञ्चीपुर शब्दाहून वुञ् प्रत्यय होऊन काञ्चीपुरकः असें रूप होतें. तेथें पुर-शब्दान्ताहून सांगितलेल्या वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे. ठञ् व ञिठ यांना अवकाश दाखविलाच आहे. आणि नान्दीपुर नांवाचा जो वाहीक ग्राम आहे त्याहून दोघांची प्राप्ति येते; तेव्हां तेथें परत्वास्तव वुञ् प्रत्यय होतो व नान्दीपुरकः असें रूप होतें.तसेंच वातवह शब्दाहून-वुञ् प्रत्यय होऊन वातवहकः असें रूप होतें. तेथें वह-शब्दान्ताहून सांगितलेल्या वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे. ठञ् व ञिठ यांना अवकाश दाखविलाच आहे. आणि कौकुडीवह नांवाचा जो वाहीक ग्राम आहे त्याहून दोघांची प्राप्ति येते. तेव्हां तेथें परत्वास्तव वुञ् प्रत्यय होतो. कौकुडीवहकः.

( वा. २७ ) उवर्णान्ताहून सांगितलेल्या ( ४।२।११९ ) ठञ् प्रत्ययापेक्षांही वुञ् प्रत्यय ( ४।२।१२१ ) विप्रतिषेधानें अगोदर होतो. उवर्णान्ताहून सांगितलेल्या ठञ् प्रत्ययाला नैषादकर्षुकः येथें अवकाश आहे; वुञ् प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण आप्रीतमायु शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव वुञ् प्रत्यय होतो व आप्रीतमायवकः असें रूप होतें.

( वा. २८ ) जनपदवाचक शब्दाहून सांगितलेले अक प्रत्यय ( ४।२।१२५ ) आणि अण् प्रत्यय ( ४।२।१३२ ) हे उवर्णान्ताहून सांगितलेल्या ठञ् प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें अगोदर होतात. अङ्गाः असा बहुवचनान्त शब्द ( ४।२।६२ ) आहे. त्याहून अक प्रत्यय होऊन आङ्गकः असें रूप होतें. तेथें अक प्रत्ययाला

कः । ओष्ठ्यः स एव । जिह्वो नाम जनपदस्तस्मादुभयं प्राप्नोति । जैह्वकः ॥ अणोऽवकाशः । ऋषिक आर्षिकः । ओष्ठ्यः स एव । इक्ष्वाकवो नाम जनपदस्तस्मादुभयं प्राप्नोति । ऐक्ष्वाकः ॥

न वा वुञपवादत्वादणः ॥ २९ ॥

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । वुञपवादत्वादणः । वुञपवादोऽण्वुञ्चौष्ठ्यं बाधिष्यते ॥

कोपधादणोऽकान्ताच्छः ॥ ३० ॥

कोपधादण्भवतीत्येतस्मादकान्ताच्छो भवति विप्रतिषेधेन । कोपधादण्भवतीत्यस्यावकाशः । निलीनक नैलीनकः । अकान्ताच्छो भवतीत्यस्यावकाशः । आरीहणक आरीहणकीयः । ब्राह्मणको नाम जनपदस्तस्मादुभयं प्राप्नोति । ब्राह्मणकीयः ॥

धन्ववुञश्च ॥ ३१ ॥

धन्ववुञश्च च्छो भवति विप्रतिषेधेन। धन्वनो वुञ्भवतीत्यस्यावकाशः । पारेधन्व पारेधन्वकः । छस्य स एव । आष्टकं नाम धन्व तस्मादुभयं प्राप्नोति । आष्टकीयः ॥

न वा छस्य पुनर्वचनं छापवादनिवृत्त्यर्थम् ॥ ३२ ॥

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । छस्य पुनर्वचनं छापवादनिवृत्त्यर्थम् । सिद्धोऽत्र च्छो वृद्धाच्छः [ ४.२.११४ ]

अवकाश आहे; उवर्णान्ताहून सांगितलेल्या ठञ् प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे. अङ्गाः याप्रमाणेंच जिह्वः हें बहुवचन होय. त्या देशवाचक जिह्व शब्दाहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव अक प्रत्यय होतो व जैह्वकः असें रूप होतें. तसेंच ऋषिक शब्दाहून 'कोपधादण्' ( ४।२।१३२ ) यानें अण् प्रत्यय होऊन आर्षिकः असें होतें. तेथें अण् प्रत्ययाला अवकाश आहे; उवर्णान्ताहून सांगितलेल्या ठञ् प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे; पण इक्ष्वाकु असा जो बहुवचनान्त देशवाचक शब्द त्याहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव अण् प्रत्यय होतो व ऐक्ष्वाकः असें रूप होतें.

( वा. २९ ) ह्या विप्रतिषेधांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.[७]

काय कारण ?

कारण असें कीं अण् हा वुञ् प्रत्ययाचा अपवाद आहे. आणि वुञ् प्रत्यय तर उवर्णान्ताहून सांगितलेल्या ठञ् प्रत्ययाचा परत्वास्तव बाधक आहे.

( वा ३० ) कोपधादण् ( ४।२।१३२ ) यापेक्षां अक शब्दाहून सांगितलेला छ प्रत्यय ( ४।२।४१ ) विप्रतिषेधानें होतो. कोपधादण् याला नैलीनकः येथें अवकाश आहे, व अक-शब्दान्ताहून सांगितलेला छ प्रत्यय आरीहणक शब्दाहून होतो, तेव्हां आरीहणकीय येथें त्या छ प्रत्ययाला अवकाश आहे; पण ब्राह्मणक म्हणून जो जनपद आहे त्याहून दोघांची प्राप्ति येते तेथें परत्वास्तव छ प्रत्यय होतो. उदा०—ब्राह्मणकीयः

( वा. ३१ ) धन्वयोपधाद्वुञ् (४।२।१२१) यापेक्षां छ प्रत्यय ( ४।२।१४१ ) विप्रतिषेधानें होतो. पारेधन्वन् शब्दाहून वुञ् प्रत्यय होऊन पारेधन्वकः असें रूप होतें. तेथें धन्वयोपधाद्वुञ् याला अवकाश आहे. छ प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे. आणि आष्टक म्हणून जो धन्ववाचक शब्द आहे त्याहून दोघांची प्राप्ति येते. तेथें परत्वास्तव छ प्रत्यय होतो व आष्टकीयः असें रूप होतें.

( वा. ३२ ) ह्या विप्रतिषेधांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं येथें वृद्धाच्छः (४।१।२ ११४ ) यानें छ प्रत्यय सिद्धच आहे. असें असतां जो येथें मुद्दाम पुनः छ प्रत्यय ( ४।२

७—तेव्हां ह्या अण् व ठञ् यांची बरोबरी दिसत नाहीं.

इत्येव । तस्य पुनर्वचन एतत्प्रयोजनं येऽन्ये तदपवादाः प्राप्नुवन्ति तद्बाधनार्थम्। स यथैवान्यांस्तदपवादान् बाधत एवमिममपि बाधिष्यते ॥

[ऐषमोह्यःश्वसोऽन्यतरस्याम् ॥ ४ । २ । १०५ ॥

तीररूप्योत्तरपदादञ्ञौ ॥ ४ । २ । १०६ ॥

दिक्पूर्वपदादसंज्ञायां ञः ॥ ४ । २ । १०७ ॥

मद्रेभ्योऽञ् ॥ ४ । २ १०८ ॥

उदीच्यग्रामाच्च बह्वचोऽन्तोदात्तात् ॥ ४ । २ । १०९ ॥

प्रस्थोत्तरपदपलद्यादिकोपधादण् ॥ ४ । २।११०॥

कण्वादिभ्यो गोत्रे ॥ ४ । २ ।१११॥

इञश्च ॥ ४ । २ । ११२ ॥

न द्व्यचः प्राच्यभरतेषु ॥ ४ । २ । ११३ ॥

वृद्धाच्छः॥ ४ । २ । ११४ ॥

भवतष्ठक्छसौ ॥४ । २ । ११५॥

---

१४१ ) सांगितला आहे त्याचा उपयोग असा कीं जे त्या छ प्रत्ययाचे अपवाद प्रत्यय प्राप्त होतील त्यांचा बाध करून पुनः छ प्रत्ययच झाला पाहिजे. तेव्हां हा पुनः सांगितलेला छ प्रत्यय जसा त्या छ प्रत्ययाच्या इतर अपवाद प्रत्ययांचा बाध करतो तसा ह्या अण् प्रत्ययाचाही बाध करीलच.

---

१—( सू. १०५ ) ऐषमस्, ह्यस् आणि श्वस् या अव्ययांहून शेष अर्थी त्यप् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—ऐषमस्त्यम्, ऐषमस्तनम्, ह्यस्त्यम्, ह्यस्तनम्, श्वस्त्यम्, श्वस्तनम्.

१—( सू. १०६ ) ज्या शब्दामध्ये तीर किंवा रूप्य हें उत्तरपद आहे अशा शब्दांहून शेष अर्थी क्रमानें अञ् व ञ हें प्रत्यय होतात, अण् होत नाहीं. उदा०—काकतीरम्, शैवरूप्यम्.

१—( सू. १०७ ) ज्या शब्दामध्यें पूर्वपद दिक् शब्द आहे आणि जो संज्ञा शब्द नव्हे अशा शब्दाहून शेष अर्थी ञ प्रत्यय होतो. उदा०—पौर्वशालः.

१—( सू. १०८ ) पूर्वपद अशा दिक् शब्दाच्या पुढील जो मद्र शब्द तदन्त प्रातिपदिकाहून शेष अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०—पौर्वमद्रः.

१—( सू. १०९ ) ज्या शब्दामध्यें बहुत अच् आहेत आणि ज्याचा अन्त उदात्त आहे अशा उत्तर दिशेकडील ग्रामवाचक शब्दाहून शेष अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०—शैवपुरम्.

१—( सू. ११० ) ज्या शब्दांमध्यें प्रस्थ शब्द उत्तरपद आहे असे शब्द, पलदी वगैरे शब्द, आणि ज्यांच्या उपधेला ककार आहे असे शब्द यांहून शेष अर्थी अण् प्रत्यय होतो; पूर्व सूत्रानें अञ् करूं नये. उदा०—माद्रीप्रस्थः, पालदः, नैलीनकः.

१—( सू. १११ ) कण्वादि गणांतील शब्दांहून केलेला जो गोत्र प्रत्यय तदन्त शब्दाहून शेष अर्थी अण् प्रत्यय होतो, छ प्रत्यय होत नाहीं. उदा०—काण्व्यस्य छात्राः काण्वाः.

१—( सू. ११२ ) गोत्र या अर्थी केलेला जो इञ् प्रत्यय तदन्त शब्दाहून शेष अर्थी अण् प्रत्यय होतो; छ प्रत्यय होत नाहीं. उदा०—दक्षस्य गोत्रापत्यं दाक्षिः, तस्य छात्राः दाक्षाः.

१—( सू. ११३ ) प्राच्य गोत्रवाचक, किंवा भरत गोत्रवाचक असें जें इञ्—प्रत्ययान्त द्व्यच्क प्रातिपादिक त्याहून पूर्वसूत्रानें अण् प्रत्यय होत नाहीं. उदा०—चैदीयाः.

१—( सू. ११४ ) 'वृद्धसंज्ञक' प्रातिपदिकाहून शेष अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—शालीयः गार्गीयः.

१—( सू. ११५ ) वृद्धसंज्ञक तसाच सर्वनामसंज्ञक जो भवत् शब्द त्याहून शेष अर्थी ठक् व छस् हे प्रत्यय होतात. उदा०—भावत्कः, भवदीयः.

काश्यादिभ्यष्ठञ्ञिठौ ४।२।११६॥

वाहीकग्रामेभ्यश्च ॥४।२।११७॥

विभाषोशीनरेषु ॥४।२।११८॥

ओर्देशे ठञ् ॥४।२।११९॥

वृद्धात्प्राचाम् ॥४।२।१२०॥

धन्वयोपधाद्वुञ् ॥४।२।१२१॥

प्रस्थपुरवहान्ताच्च ॥४।२।१२२॥

रोपधेतोः प्राचाम् ॥४।२।१२३॥

जनपदतदवध्योश्च ॥४।२।१२४॥

जनपदतदवध्योर्वुञ्विधानेऽवयवमात्रात्प्रसङ्गः ॥ १ ॥

जनपदतदवध्योर्वुञो विधानेऽवयवमात्रात्प्राप्नोति । मौञ्जो नाम वाहीकेषु ग्रामस्तस्मिन्भवो मौञ्जीयः ॥ एवं तर्हि जनपदादेव जनपदावधेः ।

जनपदादिति चेद्वचनानर्थक्यम् ॥ २ ॥

जनपदादिति चेदवधिग्रहणमनर्थकम् ।

---

(सू. १२४ वा. १) जनपदवाचक आणि जनपदावधिवाचक शब्दांहून सांगितलेला हा वुञ् प्रत्यय, कोणताही ग्राम अवधि असेल तर तद्वाचक शब्दाहून होऊं लागेल. मौञ्ज म्हणून एक गांव वाहीक देशाच्या जवळ आहे. त्या मौञ्जामध्यें असलेला या अर्थी मौञ्जीयः असा छ प्रत्यय होतो. तेथें वुञ् प्रत्यय होऊं लागेल.

तर मग जनपदाचा अवधि असें न म्हणतां जनपदच जो अवधि त्याहून वुञ् प्रत्यय होतो असा अर्थ करतां येईल.

(वा. २) अवधि जर जनपदच घेतला तर अवधि ग्रहण व्यर्थ होतें. कारण जनपदात् एवढ्यानेंच तेथें वुञ् प्रत्यय सिद्ध होत आहे.

---

१—(सू. ११६) काशि वगैरे शब्दांहून शेष अर्थी ठञ् आणि ञिठ असे प्रत्यय होतात. उदा०—काशिकी, काशिका. ञिठ प्रत्यय केला त्या वेळीं ङीप् (४।१।१५) प्रत्यय होत नाहीं एवढाच फरक आहे.

१—(सू. ११७) वाहीक देशांतील ग्रामवाचक वृद्धसंज्ञक जें प्रातिपदिक त्याहून शेष अर्थी छ प्रत्यय न होतां ठञ् व ञिठ हे प्रत्यय होतात. उदा०—शाकलिकी शाकलिका.

१—(सू. ११८) उशीनर देशांतील जें वाहीक ग्राम तद्वाचक वृद्धसंज्ञक प्रातिपदिकाहून शेष अर्थी ठञ् व ञिठ हे प्रत्यय विकल्पानें होतात. उदा०—सौदर्शनिकी सौदर्शनिका सौदर्शनीया.

१—(सू. ११९) देशवाचक उवर्णान्त प्रातिपदिकाहून शेष अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—नैषादकर्षुकः.

१—(सू. १२०) पूर्वेकडील देशवाचक उवर्णान्त प्रातिपदिकाहून शेष अर्थी पूर्वसूत्रानें ठञ् प्रत्यय करणें झाल्यास तें प्रातिपदिक वृद्ध असेल तरच करावा. उदा०—आढकजम्बुकः, मल्लवास्तु शब्दाहून होत नाहीं; मल्लवास्तवः असें रूप होतें.

१—(सू. १२१) धन्व म्ह. मरु देश होत. त्यांतील देशवाचक किंवा यकारोपध असे देशवाचक जे वृद्धसंज्ञक शब्द त्यांहून शेष अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा०—पारेधन्वकः, ऐरावतकः, सांकाश्यकः,

१—(सू. १२२) प्रस्थ शब्द, पुर शब्द अथवा वह शब्द अन्तीं असलेले असें जें देशवाचक प्रातिपदिक त्याहून शेष अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा०—मालाप्रस्थकः, नान्दीपुरकः, पैलुवहकः.

१—(सू. १२३) रेफ उपधेला असलेला किंवा दीर्घ ईकार अंतीं असलेला असा जो पूर्वेकडील देशवाचक वृद्धसंज्ञक शब्द त्याहून शेष अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा०—पाटलिपुत्रकः, काकन्दकः.

१—(सू. १२४) जनपद किंवा जनपदाचा अवधि जो जनपद तद्वाचक शब्दाहून शेष अर्थी वुञ् प्रत्यय होतो, छ प्रत्यय होत नाहीं. उदा०—आभिसारकः, आदर्शकः, श्यामायनकः, त्रैगर्तकः. लहानसा जनपद हा मोठ्या जनपदाचा अवधि होतो.

सिद्धं जनपदादित्येव ॥ इदं तर्हि प्रयोजनं जनपदाज्जनपदावधेर्वुञेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति । किं चान्यत्प्राप्नोति । छः । गर्तोत्तरपदाच्छविधेर्जनपदाद्वुञ्पूर्वविप्रतिषिद्धमिति वक्ष्यति स पूर्वविप्रतिषेधो न पठितव्यो भवति ॥

**[अवृद्धादपि बहुवचनविषयात् ॥ ४ । २ । १२५ ॥**

**कच्छाग्निवक्त्रगर्तोत्तरपदात् ॥ ४ । २ । १२६ ॥**

**धूमादिभ्यश्च ॥ ४ । २ । १२७ ॥**

**नगरात्कुत्सनप्रावीण्ययोः ॥ ४ । २ । १२८ ॥]**

**अरण्यान्मनुष्ये ॥ ४ । २ । १२९ ॥**

अत्यल्पमिदमुच्यते मनुष्य इति । पथ्यध्यायन्यायविहारमनुष्यहस्तिष्विति वक्तव्यम् । आरण्यकः पन्थाः । आरण्यकोऽध्यायः । आरण्यको न्यायः । आरण्यको विहारः । आरण्यको मनुष्यः । आरण्यको हस्ती ॥

वा गोमयेष्विति वक्तव्यम् । आरण्यका गोमयाः । आरण्या गोमयाः ॥

**विभाषा कुरुयुगंधराभ्याम् ॥ ४ । २ । १३० ॥**

**कुरुयुगंधरेभ्यो वावचनान्मनुष्यतत्स्थयोर्वुञ्विधानम् ॥ १ ॥**

---

तर मग आतां तदवधेः याचा उपयोग असा कीं जनपदाचा अवधि जो जनपद त्याहून वुञ् प्रत्ययच झाला पाहिजे. इतर प्रत्यय जो प्राप्त होईल तो न झाला पाहिजे.

तेथें इतर प्रत्यय कोणता बरें प्राप्त होतो? छ प्रत्यय प्राप्त होतो. अवधिग्रहणाचा असा उपयोग घेतला म्हणजे ‘ गर्तोत्तरपदाच्छविधेर्जनपदाद्वुञ् पूर्वविप्रतिषिद्धम् ( ४।२।१३७ वा. १ ) असा जो पूर्वविप्रतिषेध पुढें सांगण्यांत येणार आहे तो पूर्वविप्रतिषेध सांगावयास नको.

( सू. १२९ ) येथें मनुष्ये असें जें म्हटलें आहे तें फारच थोडें आहे. तर ‘ पथ्यध्यायन्यायविहारमनुष्यहस्तिषु ’ म्हणजे पथिन्, अध्याय, न्याय, विहार, मनुष्य आणि हस्तिन् यांपैकीं कोणताही अर्थ गम्यमान असतांना असें म्हणावें. उदा० आरण्यकः पन्थाः, आरण्यकः अध्यायः, आरण्यकः न्यायः, आरण्यकः विहारः, आरण्यकः मनुष्यः, आरण्यकः हस्ती.

‘वा गोमयेषु’ म्हणजे गोमय अर्थ गम्यमान असतांना शेष अर्थीं वुञ् प्रत्यय विकल्पानें होतो असें म्हणावें. उ०— आरण्यकाः गोमयाः, आरण्याः गोमयाः.

---

१—( सू. १२५ ) जनपद किंवा जनपदाचा अवधि जा जनपद तद्वाचक अवृद्ध किंवा वृद्ध असा जो बहुवचनान्त शब्द त्याहून शेष अर्थीं वुञ् प्रत्यय होतो; अण् व छ हे होत नाहींत. उदा०—आङ्गकः, आजमीढकः, दार्वकः, कालञ्जरकः.

१—( सू. १२६ ) कच्छ, अग्नि, वक्त्र आणि गर्त हे शब्द ज्यामध्यें उत्तर पद आहेत अशा देशवाचक शब्दाहून शेष अर्थीं वुञ् प्रत्यय होतो. उदा०—दारुकच्छकः, कालाग्नकः, सैन्धुवक्त्रकः, बाहुगर्तकः.

१—( सू. १२७ ) धूमादि गणांतील धूम वगैरे देशवाचक शब्दांहून शेष अर्थीं वुञ् प्रत्यय होतो. उदा०—धौमकः.

१—( सू. १२८ ) नगर शब्दाहून शेष अर्थीं वुञ् प्रत्यय होतो. पण निंदा किंवा प्रावीण्य अर्थ गम्यमान पाहिजे. उदा०—नागरकः भिक्षुः, नागरकः रथकारः.

१—( सू. १२९ ) अरण्य शब्दाहून शेष अर्थीं वुञ् प्रत्यय होतो. एकंदर प्रत्ययान्ताचा अर्थ मनुष्य असला पाहिजे. उदा०—आरण्यकः मनुष्यः.

१—( सू. १३० ) कुरु व युगन्धर या देशवाचक शब्दांहून शेष अर्थीं वुञ् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—कौरवकः, यौगन्धरकः, यौगन्धरः.

कुरुयुगंधरेभ्यो वावचनान्मनुष्यतत्स्थयोर्वुञ् [ ४.२.१३४ ] इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । कुरुयुगंधरेभ्यो वावचनस्यावकाशः । कौरवः कौरवकः । यौगंधरः यौगंधरकः । मनुष्यतत्स्थयोर्वुञ्भवतीत्यस्यावकाशः । अन्ये कच्छादयः । काच्छको मनुष्यः । काच्छकमस्येक्षितम् जल्पितम् हसितम् स्मितम् । इहोभयं प्राप्नोति । कौरवको मनुष्यः । कौरवकमस्येक्षितम् । जल्पितम् हसितम् स्मितम् । वुञ्भवति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः । न हि कुरुशब्दस्यान्ये कच्छादयोऽवकाशः । कुरुशब्दस्य यः कच्छादिषु पाठः सोऽनवकाशः ॥ न खल्वपि कुरुशब्दो विभाषां प्रयोजयति । अनेन वुञ्कच्छादिपाठादृष्भविष्यति । सैषा युगंधरार्था विभाषा ॥

[मद्रवृज्योः कन् ॥ ४ । २ । १३१ ॥

कोपधादण् ॥ ४ । २ । १३२ ॥]

कच्छादिभ्यश्च ॥ ४ । २ । १३३ ॥

किमर्थं साल्वानां कच्छादिषु पाठः क्रियते ।

साल्वानां कच्छादिषु पाठोऽणिवधानार्थः ॥ १ ॥

साल्वानां कच्छादिषु पाठोऽणिवधानार्थः क्रियते । अण्यथा स्याद्वुञ्मा भूदिति ॥

न वापदातिगोयवागूग्रहणमत्र धारणार्थम् ॥ २ ॥

न वैतत्प्रयोजनमस्ति । किं कारणम् ।

---

( सू. १३० वा. १ ) ह्या वैकल्पिक वुञ् प्रत्ययापेक्षां मनुष्यतत्स्थयोर्वुञ् हा नित्य वुञ् विप्रतिषेधानें अगोदर होतो. कौरवः व कौरवकः तसेंच यौगंधरकः व यौगंधरः येथें ह्या वैकल्पिक वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे. व कच्छादि गणांतील इतर शब्दांचे ठिकाणीं 'मनुष्यतत्स्थयोर्वुञ्' ( ४।२।१३४ ) याला अवकाश आहे; पण कौरवको मनुष्यः, कौरवकमस्य ईक्षितम् जल्पितम् हसितम् स्मितम् येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें तो नित्य वुञ् विप्रतिषेधानें होतो.

हा विप्रतिषेध योग्य दिसत नाहीं. कारण कच्छादि गणांतील इतर शब्दांचे ठिकाणीं जो अवकाश दाखविला तो कांहीं कुरु शब्दाला अवकाश होत नाहीं. तेव्हां कच्छादि गणामध्यें जो कुरु शब्दाचा पाठ आहे तो अनवकाशच आहे. खरोखर विचार केला तर कुरु शब्दाहून वुञ् प्रत्ययाचा विकल्प सांगावयास नकोच. कारण नित्य वुञ् सांगितला तरी त्यानें वुञ् आणि कच्छादि गणामध्यें पाठ आहे म्हणून अण् असे पाळीपाळीनें दोन प्रत्यय होतीलच. तेव्हां युगंधर शब्दाकरितां येथें विभाषा शब्द घातला आहे.

( सू. १३३ ) ह्या कच्छादि गणामध्यें साल्व शब्दाचा पाठ कशाकरितां केला आहे ?

( वा. १ ) अण् प्रत्यय होण्याकरितां कच्छादि गणामध्यें साल्व शब्दाचा पाठ केला आहे. तेथें अण् प्रत्ययच झाला पाहिजे. वुञ् प्रत्यय (४।२।१२४) न झाला पाहिजे.

( वा. २ ) वुञ् प्रत्यय न होण्याकारितां पाठ करावयास नको. कारण त्याचा तो उपयोग नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं अपदातौ साल्वात्

---

१—( सू. १३१ ) मद्र व वृजि या शब्दांहून शेष अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—मद्रकः वृजिकः.

१—( सू. १३२ ) ज्या शब्दाच्या उपधेला ककार आहे अशा देशवाचक शब्दाहून शेष अर्थी अण् प्रत्यय होतो; वुञ् प्रत्यय होत नाहीं. उदा०—ऋषिकेषु जातः आर्षिकः, इक्ष्वाकुषु जातः ऐक्ष्वाकः.

१—(सू. १३३) कच्छादि गणांतील कच्छ वगैरे देशवाचक शब्दांहून शेष अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—कच्छे जातः काच्छः.

अपदातिग्रहणमवधारणार्थं भविष्यति । अपदातावेव साल्वात् । गोयवाग्वोरेव च साल्वादिति ॥

[मनुष्यतत्स्थयोर्वुञ् ॥४।२।१३४॥
अपदातौ साल्वात् ॥४।२।१३५॥
गोयवाग्वोश्च ॥ ४ । २ । १३६ ॥]
गर्तोत्तरपदाच्छः ॥ ४ । २ । १३७ ॥

गर्तोत्तरपदाच्छविधेर्जनपदाद्वुञ्पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ १ ॥

गर्तोत्तरपदाच्छविधेर्जनपदाद्वुञ्भवति पूर्वविप्रतिषेधेन । गर्तोत्तरपदाच्छो भवतीत्यस्यावकाशः । श्वाविद्गर्ते श्वाविद्गर्तीयः । वुञोऽवकाशः । अङ्गाः आङ्गकः । इहोभयं प्राप्नोति । त्रैगर्तकः । वुञ्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । उक्तमेवावधिग्रहणस्य प्रयोजनं जनपदाज्जनपदावधेर्वुञेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति ॥

गहादिभ्यश्च ॥ ४ । २ । १३८ ॥

गहादिषु पृथिवीमध्यस्य मध्यमभावः ॥ १ ॥

गहादिषु पृथिवीमध्यस्य मध्यमभावो वक्तव्यः। पृथिवीमध्ये भवो मध्यमीयः ॥

चरणसंबन्धेन निवासलक्षणोऽण् ॥२॥

चरणसंबन्धेन निवासलक्षणोऽण्वक्तव्यः। त्रयः प्राच्याः । त्रय उदीच्याः । त्रयो

---

(४।२।१३५) गोयवाग्वोश्च (४।२।१३६) हीं दोन सूत्रें नियमार्थ होतील. तो नियम असा कीं साल्व शब्दाहून शेष अर्थी वुञ् प्रत्यय कर्तव्य असेल तर पदातिभिन्न मनुष्य, गो आणि यवागू हे अर्थ असतील तरच करावा.

(सू. १३७ वा. १) या छ प्रत्ययापेक्षां जनपदवाचकाहून सांगितलेला वुञ् प्रत्यय (४।२।१२४) पूर्वविप्रतिषेधानें होतो. श्वाविद्गर्त शब्दाहून प्रकृत सूत्रानें छ प्रत्यय होऊन श्वाविद्गर्तीयः असें रूप होतें. तेथें ह्या छ प्रत्ययाला अवकाश आहे. बहुवचनी अङ्ग शब्दाहून वुञ् प्रत्यय करून आङ्गकः असें रूप होतें. तेथें त्या वुञ् प्रत्ययाला अवकाश आहे, पण त्रैगर्तकः येथें दोघांची प्राप्ति येते. तेव्हां तेथें पूर्वविप्रतिषेधानें वुञ् प्रत्यय होतो. तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगितला पाहिजे. सांगावयास नको. कारण तेथें अवधि ग्रहणाचा उपयोग असा सांगितला (पृ.२१६ पं.१५-१७) आहे कीं 'जनपदाचा अवधि जो जनपद त्याहून वुञ् प्रत्ययच झाला पाहिजे; इतर प्रत्यय जो प्राप्त होईल तो न झाला पाहिजे.

(सू. १३८ वा. १) ह्या गहादि गणामध्यें पृथिवीमध्य शब्दाला मध्यम असा आदेश होतो असें म्हणावें. उदा० पृथिवीमध्यें भवः मध्यमीयः.

(वा. २) मध्यें असणाऱ्या शाखा अस-

---

१—तेव्हां अर्थातच अपदाति, गो, आणि यवागू यांहून इतर अर्थी वुञ् न झाल्यामुळें अण् प्रत्ययच होईल असा अभिप्राय आहे. तरी पण, छ प्रत्ययाच्या बाधाकरितां कच्छादि गणामध्यें पाठ पाहिजे.

१—(सू. १३४) कच्छादिगणांतील शब्दाहून शेष अर्थी वुञ् प्रत्यय होतो. परंतु प्रत्ययान्तापासून मनुष्य किंवा मनुष्यांतील चूडा, हसित वगैरे अर्थ गम्यमान होत असले पाहिजेत. उदा०—काच्छकः मनुष्यः, काच्छकहसितम्, काच्छकः चूडाकलापः.

१—(सू. १३५) कच्छादि गणामध्यें साल्व शब्द आहे. त्या साल्व शब्दाहून शेष अर्थी वुञ् प्रत्यय मनुष्य अर्थ असतांना करणें झाल्यास पदातिभिन्न अर्थ असतांनाच करावा. उदा०—साल्वका मनुष्याः.

१—(सू. १३६) प्रत्ययान्तापासून गो किंवा यवागू हा अर्थ गम्यमान होत असेल तर साल्व शब्दाहून शेष अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा०—साल्वकः गौः. साल्विकयवागूः.

१—(सू. १३७) गर्त शब्द उत्तरपद असलेल्या देशवाचक शब्दाहून शेष अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—वृकगर्तीयम्.

१—(सू. १३८) गह वगैरे शब्दांहून शेष अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—गहीयः.

माध्यमाः । सर्वे निवासलक्षणाः ॥

[प्राचां कटादेः ॥ ४ । २ । १३९ ॥

राज्ञः क च ॥ ४ । २ । १४० ॥]

वृद्धादकेकान्तखोपधात्

॥ ४ । २ । १४१ ॥

[कन्थापलदनगरग्रामह्रदोत्तरपदात् ॥ ४ । २ । १४२ ॥

पर्वताच्च ॥ ४ । २ । १४३ ॥

विभाषामनुष्ये ॥ ४ । २ । १४४ ॥

कृकणपर्णाद् भारद्वाजे ॥ ४ । २ । १४५ ॥]

ईकान्तादपीति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । ऐणीकीयः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

अकेकान्तग्रहणे कोपधग्रहणं सौसुकाद्यर्थम् ॥ १ ॥

अकेकान्तग्रहणे कोपधग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । सौसुकाद्यर्थम् । सौसुकीयः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये चतुर्थस्याध्यायस्य द्वितीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

तील तर मात्र तेथें मध्यम शब्दाहून 'तो आहे निवास ज्याचा' या अर्थी अन् प्रत्यय (४।३।८८) होतो असें म्हणावें. उदा०—त्रयः प्राच्याः, त्रयः उदीच्याः, त्रयो माध्यमाः. प्राच्य, उदीच्य, व माध्यम हीं सर्वनामें त्या त्या देशांतील निवासामुळेंच त्या त्या शाखांना पडलीं आहेत.

(सू. १४१) ईक शब्द अन्तीं असलेल्या शब्दाहूनही शेष अर्थी छ प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण ऐणीकीयः येथेंही छ प्रत्यय झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

(वा. १) ह्या सूत्रामध्यें जें अकेकान्तग्रहण केलें आहे त्याच्या ऐवजीं कोपध-ग्रहण करावें.

त्याचा काय उपयोग?

उपधेला ककार असलेल्या सौसुक वगैरे शब्दांहूनही हा छ प्रत्यय झाला पाहिजे. उदा० सौसुकीयः.

याप्रमाणें श्रीभगवान् पतञ्जलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील चवथ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें. दुसरा पादही समाप्त झाला.

---

१—(सू. १३९) कट शब्द आरंभीं असलेला असा जो पूर्वेकडील देशांचा वाचक शब्द त्याहून शेष अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—कटनगरीयम्.

१—(सू. १४०) राजन् शब्दाहून शेष अर्थी छ प्रत्यय होतो आणि त्याच्या बरोबरच राजन् शब्दाच्या नकाराला ककार होतो. उदा०—राजकीयम्.

१—(सू. १४१) अक किंवा इक शब्द अंतीं असलेला किंवा उपधेला खकार असलेला असा जो वृद्धसंज्ञक देशवाचक शब्द त्याहून शेष अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—आरीहणकीयम्, शाल्मलिकीयम्, आयोमुखीयम्.

२—शब्दाच्या शेवटीं अक, इक, किंवा ईक यांपैकीं कांहींही असलें तरी तेथें उपधेला ककार असल्यामुळें कोपध म्हणण्यानें त्या सर्व ठिकाणीं छ प्रत्यय सिद्ध होतो.

१—(सू. १४२) ज्या शब्दामध्यें कन्था, पलद नगर, ग्राम किंवा ह्रद हे शब्द उत्तरपद आहेत अशा वृद्धसंज्ञक देशवाचक शब्दांहून शेष अर्थी छ प्रत्यय होतो उदा०—दाक्षिकन्थीयम् इत्यादि.

१—(सू. १४३) पर्वत शब्दाहून शेष अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—पर्वतीयः मनुष्यः.

१—(सू. १४४) मनुष्यभिन्न अर्थ असेल तर पर्वत शब्दाहून शेष अर्थी छ प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—पर्वतीयम् पार्वतम् उदकम्.

१—(सू. १४५) कृकण व पर्ण हे जे भारद्वाजदेशवाचक शब्द त्यांहून शेष अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—कृकणीयम्, पर्णीयम्.

## युष्मदस्मदोरन्यतरस्यां खञ्च ॥ ४ । ३ । १ ॥

### युष्मदस्मद्भ्यां प्रत्ययविधाने योगविभागः ॥ १ ॥

युष्मदस्मद्भ्यां प्रत्ययविधाने योगविभागः कर्तव्यः । युष्मदस्मदोरन्यतरस्यां छो भवति । युष्मदीयः अस्मदीयः । ततः खञ्च । खञ्च भवति युष्मदस्मदोरन्यतरस्याम् । यौष्माकीणः आस्माकीनः ॥ किमर्थो योगविभागः ।

### समसंख्याप्रतिषेधार्थः ॥ २ ॥

संख्यातानुदेशो मा भूदिति ॥

## तस्मिन्नणि च युष्माकास्माकौ ॥ ४ । ३ । २ ॥

### आदेशवचने च ॥ १ ॥

किम् । योगविभागः कर्तव्यः । तस्मिन्नणि युष्माकास्माकौ भवतः । यौष्माकः आस्माकः । ततः खञि । खञि च युष्माकास्माकौ भवतः । यौष्माकीणः आस्माकीनः ॥ किमर्थो योगविभागः । समसंख्याप्रतिषेधार्थ इत्येव ॥

### तत्र पुनः खञ्ग्रहणम् ॥ २ ॥

तत्र पुनः खञ्ग्रहणं कर्तव्यम् । न ह्यन्तरेण खञ्ग्रहणं योगाङ्गमुपजायते ॥

---

( सू. १ वा. १ ) युष्मद् व अस्मद् या शब्दांहून हे प्रत्यय जेथें सांगितले आहेत तेथें सूत्राचा योगविभाग करावा:'युष्मदस्मदोरन्यतरस्याम्' असें छ प्रत्यय विकल्पानें सांगणारें निराळें सूत्र करावें. त्याची उदाहरणें०— युष्मदीयःअस्मदीयः वगैरे.त्याच्या पुढें'खञ् च' असें निराळें सूत्र करावें. त्याचा अर्थः–युष्मद् व अस्मद् या शब्दांहून विकल्पानें खञ् प्रत्यय होतो. त्याचीं उदाहरणें यौष्माकीणः आस्माकीनः वगैरे.

हा योगविभाग कशाकरितां ?

( वा. २ ) युष्मद् व अस्मद् या दोन शब्दांचा खञ् व छ या दोन प्रत्ययांशीं क्रमानें संबंध होईल, तो न होण्याकरितां हा योगविभाग केला पाहिजे.

( सू. २ वा. १ ) आदेश सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्येंहीं तसेंच—

तसेंच म्हणजे काय ?

योगविभाग करावा. तो असा कीं— 'तस्मिन्नणि युष्माकास्माकौ.' हें पहिलें सूत्र. तो अण् पुढें सतांना युष्मद् व अस्मद् या शब्दांना क्रमानें युष्माक व अस्माक हे आदेश होतात. हा त्याचा अर्थ होय. उदा०—यौष्माकः आस्माकः. त्याच्या पुढें 'खञि' असें दुसरें सूत्र होय व खञ् प्रत्यय पुढें असतांनाही उष्मद् व अस्मद् या शब्दांना क्रमानें युष्माक व अस्माक हे आदेश होतात असा त्याचा अर्थ होय. उदा ०—यौष्माकीणः आस्माकीनः.

हा योगविभाग कशाकरितां ?

दोन प्रत्ययांच्या दोन आदेशांकडे क्रमानें संबंध होऊं नये याकरितां हें कारण आहेच.

(वा.२)पण ह्या योगविभागाकरितां पुनःदुसरें खञ् ग्रहण केलें पाहिजे ना ? कारण त्या खञ्ग्रहणाशिवाय सूत्राचा दुसरा भाग कसा दाखवितां येईल ?

---

१–( सू. १ )युष्मद् व अस्मद् या शब्दांहून शेष अर्थीं खञ् व छ हे प्रत्यय विकल्पानें होतात; अर्थात् एकदां अण् प्रत्यय होतो. उदा.-तव अयं तावकीनः, त्वदीयः, तावकः; मम अयं मामकीनः, मदीयः, मामकः; युवयोः अयं यौष्माकीणः, युष्मदीयः, यौष्माकः; आवयोः अयम् आस्माकीनः, अस्मदीयः, आस्माकः; बहुत्व–विवक्षा असतांना द्वित्वाप्रमाणेंच रूपें होतात.

१—( सू. २ ) युष्मद् व अस्मद् या शब्दांना क्रमानें युष्माक व अस्माक हे आदेश होतात खञ् व अण् प्रत्यय पुढें असतांना.

तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । एवं वक्ष्यामि । तस्मिन्नणि युष्माकास्माकौ भवतः । ततोऽणि च । अणि च युष्माकास्माकौ भवत इति ॥

## तवकममकावेकवचने

## ॥ ४ । ३ । ३ ॥

## एकार्थग्रहणं च ॥ १ ॥

एकार्थग्रहणं च कर्तव्यम् । एकार्थयोर्युष्मदस्मदोरिति वक्तव्यम् । किमर्थम् । नैकवचन इत्येव सिद्धम् । न सिध्यति । किं कारणम् । एकवचनाभावात् । एकवचन इत्युच्यते न चात्रैकवचनं पश्यामः ॥ यदि पुनरेकवचनपरत्वेनाणखञौ विशेष्येयाताम् । नैवं शक्यम् । इह हि प्रसज्येयाताम् । युष्माकं छात्त्रो यौष्माकीणःआस्माकीनः । इह च न स्याताम् । तव च्छात्त्रास्तावकीनाः मामकीनाः । तस्मान्नैवं शक्यम् । न चेदेवमेकार्थग्रहणं कर्तव्यम् ॥ न कर्तव्यम् । नेदं पारिभाषिकस्यैकवचनस्य ग्रहणम् । किं तर्हि । अन्वर्थग्रहणम् । उच्यते वचनम् एकस्यार्थस्य वचनमेकवचनमिति॥

---

तर मग असें केलें पाहिजे.

तसें करावयास नको. कारण, 'तस्मिन्युष्माकास्माकौ' म्हणजे तो खञ प्रयत्य पुढें असतांना युष्माक आणि अस्माक हे आदेश होतात असा अर्थ होईल आणि त्याच्या पुढें 'अणि च'असें दुसरें सूत्र होईल व अण् प्रत्यय पुढें असतांनाही युष्माक व अस्माक हे आदेश त्या शब्दांना होतात असा त्याचा अर्थ होईल.

(सू. ३ वा. १) येथें एकार्थ–ग्रहण करावें म्हणजे 'युष्मद् व अस्मद् शब्दांच्या अर्थांची एकत्व-विवक्षा पाहिजे' असें म्हणावें.

कशाकरितां? एकवचने एवढें म्हटल्यानें सिद्ध होणार नाहीं का?

काय कारण?

कारण असें कीं एकवचनाचा अभाव आहे. एकवचन पुढें असतांना असें सूत्रांत म्हटलें आहे. आणि येथें तर एकवचनाचा प्रत्यय दिसत नाहीं.

आतां जर एकवचने हें विशेषण खञ् व अण् या प्रत्ययांना दिलें तर येथें इष्ट गोष्ट सिद्ध होईल हें खरें; पण तसें करणें शक्य नाहीं. कारण तसा अर्थ केला तर युष्माकं छात्रः यौष्माकीणः,तसेंच अस्माकं छात्रः आस्माकीनः येथेंही तसा एकवचन प्रत्यय पुढें असल्यामुळें आदेश होऊं लागतील. तसेंच तव छात्राः तावकीनाः, मम छात्राः मामकीनाः येथें तसें एकवचन पुढें नसल्यामुळें आदेश होणार नाहींत. तेव्हां एकवचने हें खञ् व अण् यांना विशेषण देतां येतें नाहीं आणि तें तसें दिलें नाहीं म्हणजे एकार्थ-ग्रहण केलें पाहिजे. एकार्थ ग्रहण करावयास नको. कारण ह्या सूत्रांतील एकवचन शब्दानें एकवचनसंज्ञक (१।४।१०३) प्रत्ययाचें ग्रहण करावयाचें नाहीं तर एकवचन हा शब्द येथें उच्यत इति वचनम्, एयस्य वचनम् एकवचनम् असा अन्वर्थ आहे.

---

१–(सू.३)एकत्व विवक्षा असेल तर युष्मद् व अस्मद् या शब्दांना क्रमानें तवक व ममक हे आदेश होतात, खञ् किंवा अण् प्रत्यय पुढें असतांना. छ प्रत्यय पुढें असतांना हे आदेश सांगितले नाहींत. तेथें फक्त एकत्व-विवक्षा असतांना त्व आणि म हे आदेश (७।२।९८) होतात.

२—कारण तव अयं तावकीनः येथें युष्मद् ङस् असा एकवचन ङस् प्रत्यय करून पुढें खञ् प्रत्यय केला आहे. तरी खञ्-प्रत्ययान्ताला प्रातिपदिक संज्ञा (१।२।४६) होऊन त्या ङस् या एकवचन प्रत्ययाचा लुक् (२।४।७१) झाला आहे.

३—मामकीनः असा जो मामकीन शब्दाच्या पुढें प्रथमा एकवचन सुप्रत्यय केला आहे तो घेऊन साधेल. कारण त्या वेळीं एकवचनपरक जे खञ् व अण् प्रत्यय ते पुढें असतांना असा अर्थ होईल.

४—म्हणजे एक अर्थाचें प्रतिपादन करणारे जे युष्मद् व अस्मद् शब्द असा अर्थ होतो.

अर्धाद्यत् ॥ ४ । ३ । ४ ॥

अर्धाद्यद्विधाने सपूर्वाट्ठञ् ॥ १ ॥

अर्धाद्यद्विधाने सपूर्वाट्ठञ्वक्तव्यः । बालेयार्धिकः गौतमार्धिकः ॥

दिक्पूर्वपदाद्यच्च ॥ २ ॥

दिक्पूर्वपदाद्यच्च ठञ् च वक्तव्यः पूर्वार्ध्यः पौर्वार्धिकः । दाक्षिणार्ध्यः दाक्षिणार्धिकः । उत्तरार्ध्यः औत्तरार्धिकः ॥ किमर्थमिदमुच्यते यदाद्यन्यास एव दिक्पूर्वपदादर्धादुभयमुच्यते । इदमद्यापूर्वं क्रियते ऽर्धाद्यद्विधाने सपूर्वाट्ठञिति । तद् द्रेष्यं विजानीयात्सर्वमेव विकल्पत इति । तदा चार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्टे दिक्पूर्वपदादर्धाद्यथान्यासमेव भवतीति ॥

[ परावराधमोत्तमपूर्वाच्च ॥ ४ । ३ । ५ ॥

दिक्पूर्वपदाट्ठञ् च ॥ ४ । ३ । ६ ॥

ग्रामजनपदैकदेशादञ्ठञौ ॥ ४ । ३ । ७ ॥

मध्यान्मः ॥ ४ । ३ । ८ ॥

अ सांप्रतिके ॥ ४ । ३ । ९ ॥

( सू. ४ वा. १ ) अर्ध शब्दांहून जो हा येथें यत् प्रत्यय सांगितला आहे तेथें 'त्या अर्ध शब्दाच्या मागें कांहीं पूर्वपद असेल तर त्याहून ठञ् प्रत्यय होतो' असें म्हणावें. उदा० बालेयार्धिकः गौतमार्धिकः.

( वा. २ ) अर्ध शब्दाचे मागें दिग्वाचक शब्द पूर्वपद असेल तर त्याहून यत् व ठञ् असे प्रत्यय होतात असें म्हणावें. उदा० पूर्वार्ध्यः, पौर्वार्धिकः; दक्षिणार्ध्यः, दाक्षिणार्धिकः; उत्तरार्ध्यः; औत्तरार्धिकः.

हें ( दिक्पूर्वपदाद्यच्च ) वार्तिक कशाकरितां बरें केलें आहे ? कारण सूत्रपाठामध्येंच आचार्योंनीं दिग्वाचक पूर्वपद असेल तर अर्ध शब्दाहून ठञ् व यत् असे दोन प्रत्यय सांगितले आहेत. ( ४।३।६ )

येथें ' अर्धाद्यद्विधाने सपूर्वाट्ठञ् '(वा. १) हें जें नवीन वचन केलें आहे त्यावरून सर्वत्र दोन प्रत्यय होतात असा भास होईल परंतु तो बरोबर नाहीं असें मनांत धरून आचार्य वार्तिककार येथें सूत्रकारांनीं दिक्पूर्वपदाट्ठञ् च ' असें जें केलें आहे तेंच बरोबर आहे असें त्याच सूत्राचा ' दिक्पूर्वपदाद्यच्च ' ( वा. २ ) असा अनुवाद करून मित्रत्वाच्या नात्यानें सांगत आहेत.

---

१ ( सू. ४ )—अर्ध शब्दाहून शेष अर्थी यत् प्रत्यय होतो उदा.—अर्ध्यम्

२—'अर्धाद्यद्विधाने सपूर्वाट्ठञ् ' या वार्तिकावरून ' दिक्पूर्वपदाट्ठञ् च या सूत्रामध्यें दिक्पूर्वपदात् याच्या ऐवजीं ' सपूर्वात् ' असें म्हणावें असा या वार्तिकाचा अर्थ सकृद्दर्शनीं मनांत येतो, परंतु तो भ्रम आहे असें वार्तिककारच दुसऱ्या वार्तिकानें सुचवीत आहेत.

१—( सू ५ ) अर्ध शब्दाच्या मागें जर पर, अवर, अधम आणि उत्तम हे शब्द असतील तर तेथें-ही त्याहून शेष अर्थी यत् प्रत्यय होतो उदा.—परार्ध्यम्, अवरार्ध्यम्, अधमार्ध्यम्, उत्तमार्ध्यम्.

१—( सू ६ ) अर्ध शब्दाच्या मागें दिग्वाचक शब्द पूर्वपद असेल तर तेथें त्याहून शेष अर्थी ठञ् व यत् असे दोन प्रत्यय होतात उदा.—पौर्वार्धिकम् पूर्वार्ध्यम्.

१—( सू. ७ ) अर्ध शब्दाच्या मागें दिग्वाचक शब्द पूर्वपद असेल तर तेथें त्याहून शेष अर्थी अञ् व ठञ् असे प्रत्यय होतात. परंतु त्या प्रत्ययान्त शब्दापासून ग्रामाचा किंवा जनपदाचा एक भाग असा अर्थ गम्यमान होत असला पाहिजे. उदा.—हे आमच्या गांवचे पौर्वार्ध आहेत अथवा पौर्वार्धिक आहेत. पूर्वार्धांत असणारे लोक असा अर्थ आहे.

१—( सू. ८ ) मध्य शब्दाहून शेष अर्थी 'म' प्रत्यय होतो. उदा.—मध्ये भवः मध्यमः.

१—( सू. ९ ) मध्य शब्दाहून शेष अर्थी अ प्रत्यय होतो, त्यापासून वेळाचा ( योग्य ) असा अर्थ गम्यमान असला पाहिजे. उदा.—मध्यं काष्ठम्.

**द्वीपादनुसमुद्रं यञ् ॥ ४ । ३ । १० ॥**

**कालाट्ठञ् ॥ ४ । ३ । ११ ॥**

**श्राद्धे शरदः ॥ ४ । ३ । १२ ॥**

**विभाषा रोगातपयोः ॥ ४ । ३ । १३ ॥**

**निशाप्रदोषाभ्यां च ॥ ४।३ ।१४॥ ]**

**श्वसस्तुट् ४ । ३ । १५ ॥**

**श्वसस्तुट्यादेशानुपपत्तिरनादित्वात् ॥ १ ॥**

श्वसस्तुटि कृत आदेशानुपपत्तिः । किं कारणम् । अनादित्वात् । तुटि कृते ऽनादित्वादादेशो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि पूर्वान्तः करिष्यते ।

**पूर्वान्ते कप्रतिषेधः ॥ २ ॥**

यदि पूर्वान्तः कादेशस्य प्रतिषेधो वक्तव्यः । शौवस्तिकम् । तान्तादिति कादेशः प्राप्नोति ॥ अस्तु परादिः । ननु चोक्तं श्वसस्तुट्यादेशानुपपत्तिरनादित्वादिति ।

**सिद्धं त्वादिष्टस्य तुड्वचनात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । तुडादिष्टस्येति वक्तव्यम् ॥

**संनियोगाद्वा ॥ ४ ॥**

---

( सू. १५ वा. १ ) श्वस् शब्दाच्या पुढील ठञ् प्रत्ययाला तुट् आगम केल्यानंतर ठकाराला इक हा आदेश होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं—तो आदि रहात नाहीं. म्हणजे तुट् आगम केल्यानंतर 'ठ' वर्ण हा प्रत्ययाचा आदि नसल्यामुळें त्याला इक आदेश ( ७ । ३ । ५० ) होणार नाहीं.

तर मग आतां हा आगम तुक् असा पूर्वाचा अन्तावयव करतां येईल.

( वा. २ ) जर श्वस् शब्दाचा अन्तावयव तुक् झाला तर शब्द तकारान्त झाल्यामुळें शौवस्तिकम् येथें शब्दाच्या पुढील प्रत्ययाला क आदेश ( ७ । ३ । ५१) होऊं लागेल.

तर मग तुट् असा प्रत्ययाचा आद्यावयवच असूं दे.

पण तुट् असा आगम केला तर ठकार हा प्रत्ययाचा आदि नसल्यामुळें त्याला इक आदेश होणार नाहीं असें म्हटलें आहे ना ?

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं आदेश झाल्यानंतर मग तुट् आगम होतो असें म्हणावें म्हणजे झालें.

( वा. ४ ) अथवा सूत्रांतील शब्दानें संनि-

---

१—( सू. १० ) दोन्ही बाजूंनीं पाणी असलेला असा जो समुद्राजवळचा प्रदेश तद्वाचक द्वीप शब्दाहून शेष अर्थी यञ् प्रत्यय होतो. उदा.—द्वीपे भवं-द्वैप्यम्.

१—( सू. ११ ) कालवाचक शब्दाहून शेष अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा.—मासिकः आर्धमासिकः.

१—( सू. १२ ) शरद् शब्दाहून शेष अर्थी ठञ् प्रत्यय होतो. त्या प्रत्ययान्त शब्दाहून श्राद्ध अर्थ गम्यमान होत असला पाहिजे. उदा.—शारदिकं श्राद्धम्.

१—( सू. १३ ) प्रत्ययान्तापासून रोग किंवा आतप हा अर्थ गम्यमान होत असेल तर शरद् शब्दाहून शेष अर्थी ठञ् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा० शारदिकः शारदः ( रोग अथवा आतप ).

१—( सू. १४ ) निशा व प्रदोष या शब्दांहून शेष अर्थी ठञ् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा.—नैशम् , नैशिकम् ' प्रादोषम् , प्रादोषिकम्.

१—( सू. १५ ) श्वस् शब्दाहून शेष अर्थी ठञ् प्रत्यय विकल्पानें होतो, आणि त्या ठञ् प्रत्ययाला तुट् असा आगम होतो. उदा०—शौवस्तिकम्. येथें ऐच् आगम ( ७।३।४ ) झाला आहे. ठञ् प्रत्यय होत नाहीं तेव्हां त्यप् प्रत्यय ( ४।२।१०५ ) होतो. उदा०—श्वस्त्यः. तोही होत नाहीं तेव्हां ट्यु व ट्युल् प्रत्यय ( ४।३।२३ ) होतात. उदा०—श्वस्तनः.

अथवा येन संनियोगः करिष्यते। तुट् च। किं च। यच्चान्यत्प्राप्नोति। किं चान्यत्प्राप्नोति। आदेशः॥

[[1]संधिवेलाद्यृतुनक्षत्रेभ्योऽण् ॥४।३।१६॥

प्रावृष एण्यः ॥४।३।१७॥

वर्षाभ्यष्ठक् ॥४।३।१८॥

छन्दसि ठञ् ॥४।३।१९॥

वसन्ताच्च ॥४।३।२०॥

हेमन्ताच्च ॥४।३।२१॥]

सर्वत्राण् च तलोपश्च ॥४।३।२२॥

हेमन्तस्याणि तलोपवचनानर्थक्यं हेम्नः प्रकृत्यन्तरत्वात् ॥१॥

हेमन्तस्याणि तलोपवचनमनर्थकम्। किं कारणम्। हेम्नः प्रकृत्यन्तरत्वात्। प्रकृत्यन्तरं हेमन्शब्दः। आतश्च प्रकृत्यन्तरमेवं ह्याह। हेमन्हेमन्नागनीगन्ति कर्णौ तस्मादेतौ हेमन्न शुष्यत इति॥

अलोपदर्शनाच्च ॥२॥

अलोपः खल्वपि दृश्यते। पाङ्क्तिहैमन्तीति॥

अपर आह। हेमन्तस्याणवचनमाणि च तलोपवचनमनर्थकम्। किं कारणम्।

---

योग केला जातो. तो असा कीं–तुट् असा आगम होतो, आणखी दुसरें जें कांहीं प्राप्त होत असेल तेंही त्याच्याबरोबरच होतें.

दुसरें कोणतें बरें कार्य प्राप्त होत आहे?

ठकाराला इक आदेश प्राप्त होत आहे.

( सू. २२ वा. १ ) येथें जो अण् प्रत्यय पुढें असतांना हेमंत शब्दांतील त याचा लोप सांगितला आहे तो व्यर्थ आहे.

काय कारण?

कारण असें कीं हेम्नः येथें मूळ शब्द हेमन् असा निराळाच आहे. शिवाय, याच अर्थाचा हेमन् असा निराळा शब्द मानलाच पाहिजे. कारण " हेमन् हेमन्नागनीगन्ति कर्णौ तस्मादेतौ हेमन्न शुष्यतः " असा वेदामध्यें हेमन् शब्दाचा प्रयोग दिसतो.

( वा. २ ) तसेंच वेदामध्यें ' पाङ्क्तिहैमन्ती ' असा हेमन्त शब्दाच्या अकाराचा लोप केलेला प्रयोगही दिसतो.

येथे दुसरे एक वैयाकरण वार्तिककारांचा असा अभिप्राय वर्णन करतात कीं–येथें जो हेमन्त शब्दाहून अण् प्रत्यय सांगितला आहे, आणि तो अण पुढें असतांना ' त ' चा जो लोप सांगितला आहे ते दोन्ही व्यर्थ आहेत.

काय कारण?

---

१–( सू. १६ ) संधिवेलादि गणपठित, ऋतु वाचक आणि नक्षत्र वाचक असे जे कालबोधक शब्द त्यांहून शेष अर्थी अण् प्रत्यय होतो, ठञ् व छ हे होत नाहींत. उदा०—संधिवेलायां भवं सांधिवेलम्, ग्रैष्मम्, तैषम्.

१–( सू. १७ ) प्रावृष् शब्दाहून शेष अर्थी 'एण्य' प्रत्यय होतो. उदा० —प्रावृषि भवः प्रावृषेण्यः मेघः.

१–( सू. १८ ) वर्षा शब्दाहून शेष अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—वर्षासु भवं वार्षिकम्.

१–( सू. १९ ) वेदामध्यें वर्षा शब्दाहून शेष अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—वार्षिकम्, ठञ् यांतील ञ् इत असल्यामुळें येथें आदि उदात्त होतो.

१–( सू. २० ) वेदामध्यें वसन्त शब्दाहून शेष अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—वासन्तिकौ ऋतू.

१–( सू. २१ ) वेदामध्यें हेमन्त शब्दाहून शेष अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—हैमन्तिकौ ऋतू.

१–( सू. २२ ) लोकामध्यें व वेदामध्यें हेमन्त शब्दाहून शेष अर्थी अण् प्रत्यय होतो, आणि त्या अण् प्रत्ययाच्या बरोबर हेमन्त शब्दांतील त या भागाचा लोप होतो. उदा०—हैमनं वासः.

हेमः प्रकृत्यन्तरत्वादलोपदर्शनाच्चेत्येव । तत्र ऋतुभ्य इत्येव सिद्धम् ॥

## सायंचिरंप्राह्णेप्रगेऽव्ययेभ्यष्ट्युट्युलौ तुट् च ॥ ४ । ३ । २३ ॥

चिरपरुत्परारिभ्यस्त्नो वक्तव्यः । चिरत्नम् परुत्नम् परारित्नम् ॥

प्रगस्य च्छन्दसि गलोपश्च त्नश्च वक्तव्यः । प्रत्नमात्मानम् ॥

अग्रादिपश्चाड्डिमच्स्मृतः । अग्रिमम् आदिमम् पश्चिमम् ॥ अन्ताच्चेति वक्तव्यम् । अन्तिमम् ॥

अथ सायचिरयोः किं निपात्यते ।

## सायचिरयोर्मकारान्तत्वं प्रत्ययसंनियुक्तम् ॥ १ ॥

सायचिरयोर्मकारान्तत्वं प्रत्ययसंनियोगेन निपात्यते । सायंतनम् चिरंतनम् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । मकारान्तः सायंशब्दः । यदि मकारान्तः कथं सायाह्नः ।

सायमोऽह्नि मलोपः ॥ सायमोऽह्नि मलोपो वक्तव्यः ॥ कथं सायतरे । तरे चेति वक्तव्यम् ॥ कथं सायम् साये । वा सप्तम्यामिति वक्तव्यम् ॥

---

कारण असें कीं हेमन् असा निराळा शब्द आहेच; व हेमन्त शब्दाच्या अकाराचा लोपही दिसतो. तेव्हां तो शब्द ऋतुवाचक म्हणून अण् प्रत्यय तेथें ' संधिवेला० ' (४।३।१६) या सूत्रानेंच सिद्ध होत आहे.

( सू. २३ ) चिर, परुत् आणि परारि यांहून शेष अर्थी ' त्न ' प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० चिरत्नम्, परुत्नम् परारित्नम्. तसेंच, वेदामध्यें प्रगे शब्दाहून शेष अर्थी त्न प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाबरोबर प्रग शब्दांतील ग या भागाचा लोप होतो असें म्हणावें. उदा० प्रत्नमात्मानम्. तसेंच अग्र, आदि आणि पश्चात् या शब्दांहून शेष या अर्थी डिमच् प्रत्यय होतो असें स्मरतात, उदा० अग्रिमम् आदिमम् पश्चिमम्. अन्त शब्दाहूनही शेष अर्थी डिमच् प्रत्यय होतो. उदा० अन्तिमम्.

आतां येथें साय व चिर या शब्दांमध्यें निपातनानें काय केलें आहे ?

( वा. १ ) साय व चिर यांहून पुढें प्रत्यय केल्याबरोबर त्या शब्दांच्या शेवटीं मकार येतो असें येथें निपातन केलें जातें. उदा०—सायंतनम्, चिरंतनम्.

हा उपयोग बरोबर दिसत नाही. कारण सायम् असा मूळचाच मकारान्त शब्द आहे.

पण जर मूळचा सायम् असा मकारान्तच शब्द असेल तर सायाह्नः हा प्रयोग कसा साधेल ?

सायमोऽन्हे मलोपः म्हणजे सायम् शब्दाच्या मकाराचा लोप होतो अह्न शब्द पुढें असतांना असें म्हणावें.

तरी पण 'सायतरे' हा प्रयोग कसा साधेल ?

तरे चेति वक्तव्यम् म्हणजे तर प्रत्यय पुढें असतांनाही सायम् शब्दाच्या मकाराचा लोप होतो असें म्हणावें.

तरी पण सायम् व साये हीं रूपें कशीं साधतील ?

वा सप्तम्यामिति वक्तव्यम् म्हणजे सप्तमी प्रत्यय पुढें असतांना सायम् शब्दाच्या मकाराचा लोप विकल्पानें होतो असें म्हणावें.

---

१–(सू.२३) साय, चिर, प्राह्ण, प्रग आणि अव्यये या कालवाचक शब्दाहून शेष अर्थी ट्यु आणि ट्युल् हे प्रत्यय होतात आणि त्या प्रत्ययांना तुट् असा आगम होतो. आणि साय व चिर या शब्दांच्या पुढें मकार येतो व प्राह्ण आणि प्रग या शब्दांच्या शेवटच्या अकाराला एकार होतो. उदा०—सायंतनम्, चिरंतनम्, प्राह्णेतनम्, प्रगेतनम्, दोषातनम्.

अथ प्राह्णप्रगयोः किं निपात्यते ।

**प्राह्णप्रगयोरेकारान्तत्वम् ॥ २ ॥**

प्राह्णप्रगयोरेकारान्तत्वं निपात्यते । प्राह्णेतनम् प्रगेतनम् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । सप्तम्या अलुकापि सिद्धम् । भवेत्सिद्धं यदा सप्तमी यदा त्वन्या विभक्तयस्तदा न सिध्यति ॥

**तुडयुक्तम् ॥ ३ ॥**

किमुक्तम् । तुटयादेशानुपपत्तिरनादित्वादिति । तुटि कृते ऽनादित्वादादेशो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि पूर्वान्तः करिष्यते ।

**पूर्वान्ते विसर्जनीयः ॥ ४ ॥**

यदि पूर्वान्तो विसर्जनीयो वक्तव्यः । प्रातस्तनम् पुनस्तनम् । परादौ पुनः सति खरवसानयोर्विसर्जनीयः [ ८. ३. १५ ] इति विसर्जनीयः सिद्धो भवति ॥ अस्तु तर्हि परादिः । ननु चोक्तं तुटि कृते ऽनादित्वादादेशो न प्राप्नोतीति ।

**सिद्धं त्वादिष्टस्य तुड्वचनात् ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् आदिष्टस्य तुड्वच-

---

आतां प्राह्ण व प्रग या शब्दांमध्यें काय निपातन केलें आहे ?

( वा. २ ) प्राह्ण व प्रग या शब्दांहून पुढें प्रत्यय केल्याबरोबर त्या शब्दांच्या शेवटच्या अकाराला एकार होतो असें येथें निपातन केलें जातें. उदा. प्राह्णेतनम्, प्रगेतनम्.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. येथें सप्तमी प्रत्ययाचा अलुक् ( ६।३।१७ ) केला म्हणजे साधेल.

ज्या ठिकाणीं सप्तमी प्रत्यय केला असेल तेथें असें अलुकानें साधेल. पण ज्या ठिकाणीं इतर विभक्ती केल्या असतील तेथें प्राह्णेतनम् व प्रगेतनम् हीं रूपें साधणार नाहींत तेव्हां त्याकरितां निपातन पाहिजे.

( वा. ३ ) तुट् आगमाविषयीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

तुट्यादेशानुपपत्तिरनादित्वात् ( ४।३।१५ वा. १ ) असें सांगितलें आहे. म्हणजे तुट् केला असतां 'यु' हा आदि नसल्यामुळें त्याला 'अन' आदेश ( ७।१।१ ) होणार नाहीं.

तर मग आतां हा आगम पूर्वाचा अन्तावयव तुक् असा करतां येईल.

( वा. ४ ) जर पूर्वीच्या शब्दाचा अन्तावयव तुक् असा केला तर प्रातस्तनम् व पुनस्तनम् येथें विसर्गाचें विधान करावें लागेल; आणि पुढील प्रत्ययाचा आद्यावयव तुट् असा केला म्हणजे मात्र मागें पदान्त असल्यामुळें 'खरवसानयोः०' ( ८।३।३५ ) यानेंच विसर्ग सिद्ध होईल.

तर मग आतां पुढील प्रत्ययाचा आद्यावयव तुट् असाच आगम असू दे. पण तुट् असा पुढील प्रत्ययाचा आद्यावयव केला तर 'यु' हा आदि नसल्यामुळें त्याला अन आदेश होणार नाहीं असें सांगितलें आहे ना ?

( वा. ५ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

---

२—प्राह्णः सोढः अस्य प्राह्णतनः येथें प्रथमा-विभक्ति आहे.

३—प्रत्ययाच्या आरंभीं यु असला म्हणजे तो अंगसंज्ञेला निमित्त होत असतो म्हणून तेथें 'यु' याला 'अन' आदेश होतो. गम् धातूहून ल्युट् प्रत्यय केला म्हणजे गमन शब्द सिद्ध होतो. परंतु मृत्यु शब्दामध्यें मृ धातूहून त्यु हा कृत्प्रत्यय (उणा. ३।२१) केला असतां त्यु यांतील 'यु' हा आदि नसल्यामुळें अंगसंज्ञेला निमित्त होत नाही. म्हणून 'अन' आदेश होत नाहीं. तसा येथें ट्यु प्रत्ययाला तुट् आगम झाल्यानंतर त्यु असा प्रत्यय होतो. म्हणून त्यांतील 'यु' याला 'अन' आदेश होणार नाहीं.

नात् । तुडादिष्टस्येति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

संनियोगाद्वा ॥ ६ ॥

अथवा चेन संनियोगः करिष्यते । तुट्च । किं च । यच्चान्यत्प्राप्नोति । किं चान्यत्प्राप्नोति । आदेशः ॥

## विभाषा पूर्वाह्णापराह्णाभ्याम् ॥ ४ । ३ । २४ ॥

पूर्वाह्णापराह्णाभ्यां सुबन्तवचनं सप्तमीश्रवणार्थम् ॥ १ ॥

पूर्वाह्णापराह्णाभ्यां सुबन्तत्वं वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । सप्तमीश्रवणार्थम् । सप्तम्याः श्रवणं यथा स्यात् । पूर्वाह्णेतनम् अपराह्णेतनम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्यत्र सप्तमीति यदयं घकालतनेषु कालनाम्नः [६. ३. १७] इति सप्तम्या अलुकं शास्ति ॥

अलुग्वचनं ज्ञापकमिति चेदव्ययात्सप्तमीप्रसङ्गः ॥ २ ॥

अलुग्वचनं ज्ञापकमिति चेदव्ययात्सप्तमी प्राप्नोति । दोषातनम् दिवातनम् । अस्तु । अव्ययादिति लुग्भविष्यति । इहापि लुक्प्राप्नोति । पूर्वाह्णेतनम् अपराह्णेतनम् । अलुगत्र लुकं बाधिष्यते । इहापि बाधेत । दोषातनम् दिवातनम् । समानाश्रयो लुगलुका बाध्यते । कश्च समानाश्रयः । यः

---

असें कीं आदेश झाल्यानंतर त्याला तुट् आगम होतो असें म्हणावें म्हणजे झालें.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावायास नको.

( वा. ६ ) अथवा सूत्रांतील च शब्दानें संनियोग केला जातो; त्यानेंही काम होईल. तो असा कीं—तुट् आगम होतो आणखी दुसरें कांहीं जें प्राप्त होईल तेंही त्याच्या बरोबरच होतें.

दुसरें कोणतें बरें कार्य प्राप्त होतें ?

' यु ' याला ' अन ' आदेश प्राप्त होतो.

( सू. २४ वा. १ ) पूर्वाह्ण व अपराह्ण या शब्दांहून सुप् प्रत्यय करून तदन्ताहून तद्धित प्रत्यय होतो असें म्हणावें.

याचा उपयोग काय ?

सप्तमीचें श्रवण व्हावें हा त्याचा उपयोग होय. पूर्वाह्णेतनम् तसेंच अपराह्णेतनम् असें सप्तमीचें श्रवण झालें पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे

तसें म्हणावयास नको. कारण 'घकालतनेषु कालनाम्नः' ( ६।३।१७ ) ह्या सूत्रानें ज्या अर्थी आचार्यांनीं तन प्रत्यय पुढें असतांना सप्तमीचा अलुक् सांगितला आहे त्यावरून त्यांनीं असें सूचित केलें आहे कीं येथें प्रकृति आणि तद्धित प्रत्यय यांचेमध्यें सप्तमी होते.

( वा. २ ) 'अलुक्' वचन ज्ञापक असेल तर त्या ज्ञापकामुळें दोषातनम् व दिवातनम् येथें अव्ययाहूनही सप्तमी होऊं लागेल.

सप्तमी झाली तर होऊं दे. अव्ययादाप्सुपः (२।४।८२) या सूत्रानें त्या सप्तमीचा लुक् होईल.

तर मग पूर्वाह्णेतनम्, अपराह्णेतनम् येथेंही सप्तमीचा लुक् (२।४।७१) होऊं लागेल.

जरी तेथें लुक् प्राप्त झाला तरी अलुक् (६।३।१७) त्याचा बाध करील.

तर मग दोषातनम् व दिवातनम् येथेंही लुकाचा अलुक् बाध करूं लागेल.

पण समानाश्रय जो लुक् त्याच लुकाचा अलुकानें बाध होतो.

समानाश्रय लुक् तो कोणता ?

---

१—( सू. २४ ) पूर्वाह्ण व अपराह्ण या शब्दांहून शेष अर्थीं विकल्पानें ट्यु व ट्युल् हे प्रत्यय होतात, आणि त्या प्रत्ययांना तुट् असा आगम होतो. उदा०—पूर्वाह्णेतनम्. येथें सप्तमीचा अलुक् ( ६।३।१७ ) झाला आहे. पौर्वाह्णिकम्; अपराह्णेतनम् आपराह्णिकम्.

प्रत्ययाश्रयो ऽत्र च प्रागेव प्रत्ययोत्पत्तेर्लुग्भवति ॥ न सिध्यति । इह हि सति प्रत्यये लुका भवितव्यं सति लुक्यलुका भवितव्यम् । तत्र च प्रत्यय एव नास्ति कुतो लुग्भविष्यति । सैषा ज्ञापकेनासती विभक्तिराकृष्यते । सा यथेह बाधिका भवति पूर्वाह्णेतनम् अपराह्णेतनमित्येवमिहापि स्यात् दोषातनम् दिवातनम् ॥ एवं तर्हि न ब्रूमो ऽलुग्वचनं ज्ञापकं भवत्यत्र सप्तमीति । किं तर्हि । भवति सुबन्तादुत्पत्तिरिति । किं पुनर्ज्ञाप्यमेतद्यावता समर्थानां प्रथमादिति वर्तते सामर्थ्यं च सुबन्तेन । ज्ञाप्यमित्याह । कथम् । ङ्याप्प्रातिपदिकादित्यपि वर्तते तत्र कुत एतत्सुबन्तादुत्पत्तिर्भविष्यति न पुनर्ङ्याप्प्रातिपदिकादिति । कथं यत्तदुक्तं वृद्धावृद्धावर्णस्वरद्व्यज्लक्षणे च प्रत्ययविधौ तत्संप्रत्ययार्थमिति । समर्थस्य यद्वृद्ध ङ्याप्प्रातिपदि-

---

जसा अलुक् तद्धित प्रत्ययामुळें प्राप्त होतो तसा त्या तद्धितावर अवलंबून प्राप्त होणारा जो 'सुपो धातु०' (२।४।७१) हा लुक् तोच अलुकार्शी समानाश्रय होय. आणि दोषातनम् येथें 'अव्ययादाप्सुपः' हा लुक् तर तद्धित प्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वींच होतो.

अशा रीतीनें हें सिद्ध होणार नाहीं. कारण, प्रत्यय केला म्हणजे त्याचा लुक् होणार; आणि येथें तर मुळांत आरंभीं प्रत्ययच नाहीं. मग लुकाचें नांव कशाला? तो येथें नसलेला विभक्ति प्रत्यय 'घकालतनेषु०' या ज्ञापकानें तद्धित प्रत्यय आणि त्याची प्रकृति यांच्या मध्यें आणून बसवावयाचा. तेव्हां अशा रीतीनें मुद्दाम बसविलेला विभक्ति प्रत्यय लुकाचा बाध करून जसा पूर्वाह्णेतनम् व अपराह्णेतनम् येथें कायम राहतो तसा दोषातनम् व दिवातनम् येथेंही कायम राहूं लागेल.

तर मग आतां येथें सप्तमी होते अशाविषयीं 'घकाल०' हें अलुक्—वचन ज्ञापक आहे असें आम्ही म्हणत नाहीं तर प्रातिपदिकाहून अगोदर सुप् प्रत्यय करून त्या सुबन्ताहून तद्धित होतो अशाविषयीं हें ज्ञापक आहे.

पण काय हो, 'सुबन्ताहून तद्धित होतो' याला ज्ञापक कशाला पाहिजे? कारण समर्थानां प्रथमात् (४।१।८२) असा अधिकार आहेच, आणि अन्वययोग्यता ही तर सुबन्त झाल्यामुळेंच येते.

तरी पण त्याला ज्ञापक पाहिजे.

तें कसें?

ङ्याप्प्रातिपदिकात् (४।१।१) असाही अधिकार आहे. तेव्हां अन्वययोग्य अशा सुबन्ताहूनच तद्धित प्रत्यय होईल आणि ङ्याप्प्रातिपदिकाहून होणार नाहीं असें कशावरून।

पण या ज्ञापकावरून जर तद्धित प्रत्ययाची प्रकृति सुबन्त घेतली तर 'वृद्धावृद्धावर्णस्वरद्व्यज्लक्षणे च प्रत्ययविधौ तत्संप्रत्ययार्थम्' (४।१।१ वा. ३) म्हणजे 'वृद्ध, अवृद्ध वगैरे जी प्रकृति म्हणून त्या त्या सूत्रांत धरली आहे ती ङ्याप्प्रातिपदिकरूपी घ्यावी' असें जें मागें सांगितलें आहे तें कसें जमेल?

समर्थ म्ह. अन्वययोग्य असें जें असेल त्यापैकीं 'वृद्ध अवृद्ध वगैरे ङ्याप्प्रातिपदिक असल्यास समर्थाहून तद्धित प्रत्यय होतो' असें त्याचें तात्पर्य समजावें.

---

१—कारण ङ्याप्प्रातिपदिकात् हा अधिकार येथें चालू असल्यामुळें तद्धित प्रत्यय हे विभक्ति प्रत्यय न करतांच त्याच्या पूर्वींच होणारे आहेत. तो तद्धित प्रत्यय झाल्यानंतर मागून सप्तमी प्रत्यय मध्यें होणार व नंतर त्याचा लुक् होणार. तेव्हां दोषातनम् येथें 'अव्ययात्०' हा लुक्ही अंतरंग म्हणून करतां येत नाहीं.

कमित्येवमेतद्विज्ञायते ॥ यद्येतज्ज्ञाप्यते कथं द्विपद आगतं द्विपाद्रूप्यम् प्रष्ठौह आगतं प्रष्ठवाड्रूप्यम् कीलालप आगतं कीलालपारूप्यम् पपुष आगतं पविवद्रूप्यम् । पद्भाव ऊठाकारलोपः प्रसारणमित्येते विधयः प्राप्नुवन्ति । लुकि कृते न भविष्यन्ति ॥ इह तर्हि सामसु साधुः सामन्यः वेमन्यः नलोपः प्रातिपदिकान्तस्य [ ८. २. ७ ] इति नलोपः प्राप्नोति । लुकि कृते भत्वान्न भविष्यति ॥ इदमिह संप्रधार्यम् । लुक्क्रियतां नलोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वान्नलोपः । एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । नलोपः क्रियतां तद्धितोत्पत्तिरिति किमत्र कर्तव्यम् । परत्वान्नलोपः । असिद्धो नलोपस्तस्यासिद्धत्वात्तद्धितोत्पत्तिर्भविष्यति । परिगणितेषु कार्येषु नलोपोऽसिद्धो न चेदं तत्र परिगण्यते । इदमपि तत्र परिगण्यते । कथम् । सुब्विधिरिति सर्वविभक्त्यन्तः समासः । सुपो विधिः सुब्विधिः। सुबन्ताद्विधिः सुब्विधिरिति ॥

---

जर सुबन्ताहून तद्धित होतो असें ज्ञापक घेतलें तर द्विपदः आगतम् द्विपाद्रूप्यम् येथें पद् आदेश (६।४।१३०), प्रष्ठौहः आगतम् प्रष्ठवाड्रूप्यम् येथें ऊठ् आदेश (६।४।१३२), कीलालपः आगतम् कीलालपारूप्यम् येथें आकाराचा लोप ( ६।४।१४० ), आणि पपुषः आगतम् पपिवद्रूप्यम् येथें संप्रसारण (६।४।१३१) हे विधी सुबन्ताहून रूप्य प्रत्यय ( ४।४।३८१ ) केल्यानंतर त्या सुप् प्रत्ययाला मानून होऊं लागतील.

पण त्या सुप् प्रत्ययाचा लुक् ( २:४।७१) झाल्यानंतर ते होणार नाहींत.

तरी पण सामसु साधुः सामन्यः तसेंच वेमन्यः येथें सामन् व वेमन् या शब्दांहून सप्तमीचा सु प्रत्यय करून पुढें यत् प्रत्यय ( ४।४।९८ ) केल्यानंतर त्या सु प्रत्ययाला मानून पद संज्ञा ( ४।१।१७ ) होत असल्यामुळे 'नलोपः प्रातिपदिकान्तस्य' ( ८।२।७ ) यानें नकाराचा लोप होऊं लागेल.

सु प्रत्ययाचा लुक् केल्यानंतर भ संज्ञा ( १। ४।१८ ) असल्यामुळे तो होणार नाहीं.

पण येथें असा विचार उत्पन्न होतो कीं सु प्रत्ययाचा लुक् अगोदर करावा किंवा नकाराचा [1]लोप अगोदर करावा.

मग या दोहोंमध्यें काय बरें अगोदर करावें ?

परत्वास्तव नकाराचा लोप अगोदर करावा.

तर मग आतां सु प्रत्यय केल्यानंतर तद्धित प्रत्यय करावा किंवा नकाराचा लोप करावा हाच विचार अगोदर केला पाहिजे.

मग या दोहोंमध्यें काय बरें अगोदर करावें ?

येथेंही परत्वास्तव नकाराचा लोप अगोदर करावा.

पण नकाराचा लोप असिद्ध आहे ( ८।२। १ ) तेव्हां त्याच्या असिद्धत्वास्तव तद्धित प्रत्यय अगोदर होईल.

कांहीं ठराविक कार्ये कर्तव्य असतांनाच नलोप असिद्ध समजला जातो ( ८।२।२ ) आणि तद्धित प्रत्यय हें कार्य तर त्यांमध्यें गणलेलें नाहीं.

हेंही कार्य त्यांमध्यें गणलेलें आहे.

तें कसें ?

सुब्विधि असें कार्य तेथें गणलें आहे. आणि सुब्विधि हा समास सर्व विभक्तींनीं सोडवितां येतो. सुपः विधिः सुब्विधिः असाही सोडवितां येईल, तसेंच सुबन्तात् विधिः सुब्विधिः असाही

---

१—तेव्हां सुबन्ताहून तद्धित प्रत्यय होत असल्यामुळें तद्धित प्रत्यय हा सुब्विधि आहे. आणि सु याचा लुक् हाही सुब्विधिच आहे. तेव्हां नकाराचा लोप होत असल्यामुळें तद्धित प्रत्यय होतो आणि सुपाचा लुक्ही होतो. नतर भ संज्ञा असल्यामुळें नलोप होत नाहीं.

**तत्र जातः ॥ ४ । ३ । २५ ॥**

किमर्थं जातादयोऽर्था निर्दिश्यन्ते । जातादिष्वर्थेषु घादयो यथा स्युः स्वार्थे मा भूवन्निति । नैतदस्ति प्रयोजनम् । शेषे [४.२.९२] इति वर्तते तेन स्वार्थे न भविष्यन्ति ॥ अत उत्तरं पठति ।

**तत्रजातादिषु वचनं नियमार्थम् ॥ १ ॥**

नियमार्थोऽयमारम्भः । जातादिष्वेव घादयो यथा स्युरिह मा भूवन् तत्रास्ते तत्र शेत इति ॥ यदि नियमः क्रियते दार्षदाः सक्तवः औलूखलो यावक इति न सिध्यति । संस्कृतमित्येवं भविष्यति । भवेत्सिद्धं दार्षदाः सक्तव इति । इदं तु न सिध्यति औलूखलो यावक इति । संस्कृतं हि नाम तद्भवति यत्तत एवापकृष्याभ्यवह्रियते न च यावक उलूखलादेवापकृष्याभ्यवह्रियते ऽवश्यं रन्धनादीनि प्रतीक्ष्याणि । तस्मान्नार्थोऽनेन नियमेन । कस्मान्न भवति तत्रास्ते तत्र शेत इति । अनभिधानात् ॥ तच्चावश्यमनभिधानमा-

---

श्रोढवितां येईल.

( सू. २५ ) येथें जातः वगैरे अर्थांचा निर्देश सूत्रकारांनीं जो केला आहे तो कशाकरितां ?

पूर्वी राष्ट्र वगैरे शब्दांहून जे घ ख वगैरे प्रत्यय ( ४।२।९३ ) सांगितले आहेत ते या जातः वगैरे अर्थीं झाले पाहिजेत स्वार्थी होऊं नयेत याकरितां या अर्थांचा निर्देश येथें केला आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, येथें शेषे ( ४।२।९२ ) या पदाची अनुवृत्ति आहे; तेव्हां ते घ ख वगैरे प्रत्यय स्वार्थी होणारच नाहींत. हें मनांत घेऊन वार्तिककार म्हणतात.

( वा. १ ) ' तत्र जातः ' वगैरे अर्थांचे निर्देश हे नियमार्थ केले आहेत. तो नियम असा कीं हे घ ख वगैरे प्रत्यय जातः वगैरे अर्थींच झाले पाहिजेत; ' त्या ठिकाणीं बसतो ' ' त्या ठिकाणीं निजतो ' इत्यादि इतर अर्थी होऊं नयेत.

पण येथें जर असा नियम केला तर दृषादि पिष्टाः दार्षदाः सक्तवः म्हणजे पाट्यावर वाटलेले सातू, तसेंच उलूखले क्षुण्णः औलूखलो यावकः म्हणजे उखळामध्यें कुटलेला जवस इत्यादि ठिकाणीं त्या इतर अर्थीं अण् प्रत्यय होणार नाहीं.

' संस्कृतं भक्षाः ' ( ४।२।१६ ) यानें तेथें अण् प्रत्यय होईल.

' संस्कृतं भक्षाः ' यानें दार्षदाः सक्तवः येथें दृषद् शब्दाहून अण् प्रत्यय होईल, परंतु औलूखलो यावकः येथें उलूखल शब्दाहून अण् प्रत्यय होणार नाहीं. कारण, ' संस्कृत ' असें तशाच पदार्थाला म्हटलें जातें कीं जो तेथून बाहेर काढल्याबरोबर खाण्यासारखा तयार होतो. आणि यावक तर उखळांतून बाहेर काढल्याबरोबर लगेच खाण्यासारखा होत नाहीं. त्याला पुन्हां शिजविण्याची अपेक्षा असतेच. एकंदरींत येथें नियम करण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

पण नियम केला नाहीं तर ' त्या ठिकाणीं बसतो ' ' त्या ठिकाणीं निजतो ' या अर्थीं कां बरें अण् प्रत्यय होणार नाहीं ?

अनभिधानास्तव होणार नाहीं. आणि असें अनभिधान अवश्य मानलेंच पाहिजे.

---

१—( सू. २५ ) प्रातिपदिकाहून ' तत्र जातः ' म्हणजे ' त्या ठिकाणीं झालेला ' या शेष अर्थी अण् प्रत्यय होतो.

२—गृहे आस्ते, गृहे शेते या अर्थी गृह शब्दाहून अण् प्रत्यय केला तर त्या गार्ह शब्दापासून घरांत बसणारा, घरांत निजणारा असा अर्थ लोकामध्यें मनांत येत नाहीं.

श्रयितव्यम् । क्रियमाणेष्वपि ह्यर्थनिर्देशेषु यत्र आतादिषूत्पद्यमानेन प्रत्ययेनार्थस्याभिधानं न भवति न भवति तत्र प्रत्ययोत्पत्तिः । तद्यथा । अङ्गुल्या खनति । वृक्षमूलादागत इति ॥ न तर्हीदानीं जातादयोऽर्था निर्देष्टव्याः । निर्देष्टव्याश्च । किं प्रयोजनम् । अपवादविधानार्थम् । प्रावृषष्ठप् [४.३.२६] प्रावृषि जातः प्रावृषिकः । क मा भूत् । प्रावृषि भवाः प्रावृषेण्या बलाहकाः । यानि त्वेतानि निरपवादान्यर्थादेशनानि तानि शक्यान्यकर्तुम् । कृतलब्धक्रीतकुशलाः [४.३.३८] स्रौघ्नो देवदत्त इति ॥

**[प्रावृषष्ठप् ॥ ४ । ३ । २६ ॥**

**संज्ञायां शरदो वुञ् ॥४।३।२७॥**

**पूर्वाह्णापराह्णार्द्रामूलप्रदोषावस्कराद्वुन् ॥ ४ । ३ । २८ ॥**

**पथः पन्थ च ॥ ४ । ३ । २९ ॥**

**अमावास्याया वा ॥४। ३ । ३० ॥**

**अ च ॥४ । ३ । ३१॥**

---

कारण, येथें 'तत्र जातः' इत्यादि अर्थांचे निर्देश केले तरी त्या 'तत्र जातः' वगैरे अर्थी केलेल्या तद्धित प्रत्ययानें ज्या ठिकाणीं तसा अर्थ दाखविला जात नाहीं तेथें त्या अर्थी तद्धित प्रत्यय होत नसतोच. उदा० अङ्गुल्या खनति [ ४ । ४ । २ ] वृक्षमूलात् आगतः ( ४ । ३ । ७४ ) अशा अर्थी अङ्गुलि व वृक्षमूल यांहून तद्धित प्रत्यय होत नाहीं.

तर मग आतां येथें 'तत्र जातः' वगैरे अर्थांचे निर्देश करावयास नकोतच कीं काय ?

तसें नाहीं. ते निर्देश केलेच पाहिजेत.

मग त्यांचा उपयोग तरी काय ?

अपवाद प्रत्यय सांगण्याकरितां ते विशेष अर्थांचे निर्देश केले पाहिजेत. उदा० प्रावृषष्ठप् या पुढील सूत्रानें 'तत्र जातः' या अर्थी अण् प्रत्ययाचा अपवाद ठप् प्रत्यय सांगितला आहे. उदा० प्रावृषि जातः प्रावृषिकः.

कोणत्या अर्थी हा अपवाद ठप् प्रत्यय न झाला पाहिजे म्हणून येथें 'जातः' अशा अर्थाचा निर्देश करावयाचा ?

प्रावृषि भवाः प्रावृषेण्याः बलाहकाः येथें 'तत्र भवः' या शेष अर्थी ठप् प्रत्यय न झाला पाहिजे.

आतां जे अर्थ असतांना अण् प्रत्ययाचा अपवाद प्रत्यय कोणत्याही शब्दाहून सांगावयाचा नसेल ते अर्थांचे निर्देश मात्र न केले तरी चालतील. उदा० स्रुघ्ने कृतः, लब्धः, क्रीतः कुशलः या अर्थी कृतलब्धक्रीतकुशलाः ( ४ । ३ । ३८ ) यानें स्रुघ्न शब्दाहून अण् प्रत्यय होऊन स्रौघ्नो देवदत्तः असा प्रयोग होत असतो.

---

१—( सू. २६ ) प्रावृष् शब्दाहून 'तत्र जातः', या अर्थी ठप् प्रत्यय होतो. उदा०—प्रावृषि जातः प्रावृषिकः. एण्य प्रत्ययाचा ( ४।३।१७ ) हा अपवाद आहे.

१—( सू. २७ ) शरद् शब्दाहून 'तत्र जातः' या अर्थी वुञ् प्रत्यय होतो. परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—शारदका दर्भाः.

१—( सू. २८ ) पूर्वाह्ण, अपराह्ण, आर्द्रा, मूल, प्रदोष आणि अवस्कर या शब्दांहून 'तत्र जातः' या अर्थी वुन् प्रत्यय होतो. उदा०—पूर्वाह्णक; इत्यादि.

१—( सू. २९ ) पथिन् शब्दाहून 'तत्र जातः' या अर्थी वुन् प्रत्यय होतो. आणि त्या प्रत्ययाच्या बरोबर पथिन् शब्दाला पन्थ असा आदेश होतो. उदा०—पथि जातः पन्थकः.

१—( सू. ३० ) अमावास्या शब्दाहून 'तत्र जातः' या अर्थी वुन् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—अमावास्यायां जातः अमावास्यकः, आमावस्यः.

१—( सू. ३१ ) अमावास्या शब्दाहून 'तत्र जातः' या अर्थी एकदां 'अ' असाही प्रत्यय होतो. उदा०—अमावस्यः.

सिन्ध्वपकराभ्यां कन् ॥४।३।३२॥

अणञौ च ॥ ४ । ३ । ३३॥]

श्रविष्ठाफल्गुन्यनुराधास्वातितिष्यपुनर्वसुहस्तविशाखाषाढाबहुलाल्लुक् ॥४ । ३ । ३४ ॥

लुक्प्रकरणे चित्रारेवतीरोहिणीभ्यः स्त्रियामुपसंख्यानम् ॥ १ ॥

लुक्प्रकरणे चित्रारेवतीरोहिणीभ्यः स्त्रियामुपसंख्यानं कर्तव्यम् । चित्रायां जाता चित्रा स्त्री । चित्रा ॥ रेवती । रेवती स्त्री । रेवती ॥ रोहिणी । रोहिणी स्त्री ॥

फल्गुन्यषाढाभ्यां टानौ ॥ २ ॥

फल्गुन्यषाढाभ्यां टानौ वक्तव्यौ । फल्गुनी । अषाढा उपदधाति ॥

श्रविष्ठाषाढाभ्यां छण् ॥ ३ ॥

श्रविष्ठाषाढाभ्यां छण् वक्तव्यः श्राविष्ठीयाः आषाढीयाः ॥

स तर्हि वक्तव्यः ।

न वा नक्षत्रेभ्यो बहुलं लुग्वचनात् ॥ ४ ॥

न वा वक्तव्यः । किं कारणम् । नक्षत्रेभ्यो बहुलं लुग्वचनात् । नक्षत्रेभ्यो बहुलं लुगित्येवमत्र लुग्भविष्यति ॥

[ स्थानान्तगोशालखरशालाच्च ॥ ४ । ३ । ३५ ॥-

---

( सू. ३४ वा. १ ) ह्या लुक्–प्रकरणामध्यें चित्रा, रेवती आणि रोहिणी या शब्दांहून ' तत्र जातः ' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो स्त्रीत्व विवक्षा असतांना असें उपसंख्यान करावें. उदा० चित्रायां जाता चित्रा स्त्री; रेवत्यां जाता रेवती स्त्री; रोहिणी स्त्री.

( वा. २ ) फल्गुनी व अषाढा या शब्दांहून क्रमानें ' तत्र जातः' या अर्थी ट व अन्[3] असे प्रत्यय होतात. उदा० फल्गुनी, अषाढा उपदधाति.

( वा. ३ ) श्रविष्ठा आणि अषाढा या शब्दांहून ' तत्र जातः ' या अर्थी छण् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० श्राविष्ठीयाः, आषाढीयाः.

तर मग तसा लुक् येथें सांगितला पाहिजे.

( वा. ४ ) अथवा तसा लुक् येथें सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं नक्षत्रेभ्यो बहुलम् ( ४ । ३ । ३७ ) यानें लुक् सांगितलाच आहे. तो येथें लुक् होईल[3].

---

१—( सू. ३२ ) सिन्धु व अपकर या शब्दांहून ' तत्र जातः ' या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०— सिन्धुकः अपकरकः.

१—( सू. ३३ ) सिन्धु व अपकर या शब्दांहून ' तत्र जातः ' या अर्थी क्रमानें अण् व अञ् हेही प्रत्यय होतात. उदा०—सैन्धवः, आपकरः.

१—( सू. ३४ ) श्रविष्ठा, फल्गुनी, अनुराधा, स्वाति, तिष्य, पुनर्वसु, हस्त, विशाखा, अषाढा आणि बहुल या शब्दांहून ' तत्र जातः ' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो उदा०—श्रविष्ठासु जातः श्रविष्ठः. येथें टाप् प्रत्ययाचाही लुक् ( ४।२।४९ ) झाला आहे. फल्गुनः अनुराधः इत्यादि रूपेंही याप्रमाणेंच होतात.

२—येथें तद्धित प्रत्ययाचा लुक् व स्त्री प्रत्यय टाप् झाला आहे. रेवती व रोहिणी येथें पुनः स्त्री प्रत्यय ङीष् ( ४।१।४१ ) झाला आहे.

३—ट, अन् व छण् या प्रत्ययांचें विधान केलें आहे म्हणून त्या सामर्थ्यास्तव त्यांचा लुक् होत नाहीं.

१—( सू. ३५ ) स्थान शब्द शेवटीं असलेले शब्द आणि गोशाल व खरशाल हे शब्द यांच्या पुढील ' तत्र जातः ' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो. उदा०—गोस्थाने जातः गोस्थानः, गोशालः, खरशालः.

**वत्सशालाभिजिदश्वयुक्छतभिषजो वा॥ ४ । ३ । ३६ ॥**

**नक्षत्रेभ्यो बहुलम् ॥ ४ । ३ । ३७॥**

**कृतलब्धक्रीतकुशलाः ॥ ४ । ३ । ३८ ॥ ]**

**प्रायभवः ॥ ४ । ३ । ३९ ॥**

**प्रायभवग्रहणमनर्थकं तत्रभवेन कृतत्वात् ॥ १ ॥**

प्रायभवग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । तत्रभवेन कृतत्वात् । यो हि राष्ट्रे प्रायेण भवति तत्र भवोऽसौ भवति तत्र तत्र भवः [४.३.५३] इत्येव सिद्धम् ॥ न सिध्यति । अनित्यभवः प्रायभवः । नित्यभवस्तत्रभवः ।

**अनित्यभवः प्रायभव इति चेन्मुक्तसंशयेन तुल्यम् ॥ २ ॥**

यद्भवान्मुक्तसंशयं तत्र भव उदाहरणं न्याय्यं मन्यते स्रौघ्नो देवदत्त इति तेन तत्तुल्यम् । सोऽपि ह्यवश्यमुदकदेशादीन्यभिनिष्क्रामति । अथैतद् भवान्प्रायभव उदाहरणं न्याय्यं मन्यते तत्र भवे किमुदाहरणम् । यत्तत्र नित्यं भवति । स्रौघ्नाः प्रासादाः । स्रौघ्नाः प्राकारा इति । एवं तर्हि तत्र भव इति प्रकृत्य जिह्वामूलाङ्गुलेश्छो विधीयते स यथा तस्मिन्दृष्टापचारे अङ्गुलीयमिति भवत्येवं प्रायभवेऽपि भवि-

(सू. ३९ वा. १) 'प्रायभवः' या अर्थी प्रत्यय सांगणें व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं 'तत्र भवः' (४।३।५३) यानेंच तेथें प्रत्यय सिद्ध होईल. कारण जो ज्या राष्ट्र वगैरेंमध्यें प्रायः असतो तो तेथें असणारा असतोच. तेव्हां तेथें 'तत्र भवः' यानेंच प्रत्यय होत आहे.

तसें सिद्ध होणार नाहीं. कारण जो नेहमीं नसतो त्याला 'प्रायभव' म्हणतात. आणि जो नेहमीं असतो त्याला 'तत्रभव' म्हणतात.

(वा. २) 'तत्र भवः' याचें योग्य उदाहरण असें जें स्रुघ्ने भवः स्रौघ्नः हें तुला खात्रीनें वाटतें तें आणि प्रायभवः याचें उदाहरण ही दोन्ही सारखींच आहेत. कारण, स्रुघ्न देशांत नेहमीं राहणारा असें ज्याला तूं समजतोस तो देखील एखादे वेळीं तरी त्या देशांतून बाहेर जातोच. आतां तेंही 'प्रायभव' याचेंच उदाहरण योग्य आहे असें जर तू म्हणशील तर मग 'तत्र भवः' याचें उदाहरण तरी तूं कोणतें सांगणार ?

जो पदार्थ स्रुघ्न देशामध्यें कायमचा आहे अशाविषयींची म्हणजे स्रौघ्नः प्राकारः, स्रौघ्नः प्रासादः हीं त्याचीं उदाहरणें होत.

असें असेल तर 'तत्र भवः' या अधिकारामध्यें 'जिह्वामूलाङ्गुलेश्छः' (४।३।६२) यानें अङ्गुलि शब्दाहून छ प्रत्यय करून अङ्गुलीय शब्द साधला आहे. परंतु एखादे वेळीं बोटांतून बाहेर काढली जाणारी जी आंगठी ती 'प्रायभव' असून जसें तिला 'तत्रभव' समजुन अङ्गुलीय असें आपण म्हणतों तसें स्रौघ्नः येथेंही म्हणतां येईल. तेव्हां प्रायभवः हें

१—(सू ३६) वत्सशाला, अभिजित्, अश्वयुज् आणि शतभिषज् या शब्दांच्या पुढील 'तत्र जातः' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् विकल्पानें होतो. उदा०—वत्सशालः वात्सशालः इत्यादि.

१—(सू. ३७) नक्षत्र-वाचक शब्दाच्या पुढील 'तत्र जात,' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा बाहुल्येकरून लुक् होतो, उदा०—रौहिणः, रोहिणः.

१—(सू ३८) प्रातिपदिकाहून तत्रकृत, तत्रलब्ध, तत्रक्रीत, आणि तत्रकुशल. या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—स्रौघ्नः.

१—(सू. ३९) प्रातिपदिकाहून 'तत्र प्रायभवः' म्हणजे तेथें प्रायः असणारा या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—स्रुघ्ने प्रायेण भवः स्रौघ्नः.

ष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । प्रायभव इति प्रकृत्योपजानूपकर्णोपनीवेष्ठकं वक्ष्यति स प्रायभव एव यथा स्यात्तत्र भवे मा भूत् । उपजानुभवं गड्विति । अथेदानीं तत्र भव इति प्रकृत्य शरीरावयवाद्यद्वि-धीयते सोऽत्र कस्मान्न भवति । अनभि-धानात् । स यथैव तर्ह्यनभिधानाद्यन्न भवत्येवं ठगपि न भविष्यति ॥

[ उपजानूपकर्णोपनीवेष्ठक् ॥ ४ । ३ । ४० ॥

संभूते ॥ ४ । ३ । ४१ ॥ ]

कोशाड्ढञ् ॥ ४ । ३ । ४२ ॥

विकारे कोशाड्ढञ् ॥ १ ॥

विकारे कोशाड्ढञ्वक्तव्यः । कोशस्य विकारः कौशेयम् ॥

संभूते ह्यर्थानुपपत्तिः ॥ २ ॥

संभूत इति ह्युच्यमाने ऽर्थस्यानुपपत्तिः स्यात् । न ह्यदः कोशे संभवति । किं तर्हि । कोशस्यादो विकारः॥ यदि विकार इत्युच्यते भस्मन्यपि प्राप्नोति भस्मापि कोशस्य विकारः ॥ अथ संभूत इत्युच्य-माने क्रिमौ कस्मान्न भवति । क्रिमिरपि हि कोशे संभवति । अनभिधानात् । यथैव तर्ह्यनभिधानात्क्रिमौ न भवत्येवं

---

निराळें सूत्र नको.

तर मग आतां प्रायभवः याचा उपयोग असा कीं या 'प्रायभव' अधिकारामध्यें 'उपजानूपकर्णोपनीवेष्ठक्' (४।३।४०) या पुढील सूत्रानें सांगितलेला ठक् प्रत्यय 'प्रायभव' याच अर्थी झाला पाहिजे. 'तत्रभव' या अर्थी म्हणजे एखाद्याच्या गुडघ्याजवळ कायमची गांठ असेल तर तेथें 'उपजानु भवं गड्ड' असें वाक्यच राहिलें पाहिजे; ठक् प्रत्यय न झाला पाहिजे.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'उपजानु भवं गड्ड' येथें 'तत्र भवः' या अधिकारा-मध्यें शरीरावयवाद्यत् (४।३।५५) यानें सांगि-तलेला यत् प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

अनभिधानास्तव होत नाहीं.

तर मग तसा अनभिधानास्तवच ठक् प्रत्ययही होणार नाहीं. एकंदरींत 'प्रायभवः' हें सूत्र नको.

(सू. ४२ वा. १) हा जो कोश शब्दा-हून ढञ् प्रत्यय सांगितला आहे तो 'संभूत' या अर्थी न सांगतां 'विकार' या अर्थी सांगावा. उदा० कोशस्य विकारः कौशेयम्.

(वा. २) 'संभूत' या अर्थी प्रत्यय केला तर कौशेय शब्दाचा अर्थ जुळत नाहीं. कारण, कौशेय असें वस्त्राला म्हणतात; आणि त्या वस्त्राचा संभव कोशामध्यें नाहीं. तर तें वस्त्र हा कोशाचा विकार आहे.

पण जर 'विकार' या अर्थी प्रत्यय सांगि-तला तर 'त्याचें भस्म' या अर्थींही ढञ् प्रत्यय होऊं लागेल. कारण भस्म म्हणजे राख हाही कोशाचा एक प्रकारचा विकारच आहे.

आतां 'संभूत' या अर्थी प्रत्यय सांगितला तर त्यांतील क्रिमि या अर्थी ढञ् प्रत्यय कां होत नाहीं ? कारण क्रिमि म्हणजे एक प्रकारचा किडा हा कोशामध्यें होत असतो.

अनभिधानास्तव तेथें ढञ् प्रत्यय होत नाहीं.

तर मग जसा संभूते असें म्हटलें असतां क्रिमि या अर्थी ढञ् प्रत्यय अनभिधानास्तव होत नाहीं तसा विकारः असें म्हटलें असतां

---

१—(सू. ४०) उपजानु, उपकर्ण आणि उपनीवि या शब्दांहून 'प्रायभव' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—औपजानुकः.

१—(सू. ४१) प्रातिपदिकाहून 'तत्र संभूतः' म्हणजे तेथें संभव असलेला या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—स्रुघ्ने संभवति स्रौघ्नः.

१—(सू. ४२) कोश शब्दाहून 'संभूत' या अर्थी ढञ् प्रत्यय होतो. उदा०—कोशे संभवति कौशेयं वस्त्रम्.

भस्मन्यपि न भविष्यति । अर्थश्चोपपन्नो भवति ॥

[कालात्साधुपुष्प्यत्पच्यमानेषु ॥ ४ । ३ । ४३ ॥
उप्ते च ॥ ४ । ३ । ४४ ॥
आश्वयुज्या वुञ् ॥ ४ । ३ । ४५ ॥
ग्रीष्मवसन्तादन्यतरस्याम् ॥ ४ । ३ । ४६ ॥
देयमृणे ॥ ४ । ३ । ४७ ॥]
कलाप्यश्वत्थयवबुसाद्वुन् ॥ ४ । ३ । ४८ ॥

अयुक्तोऽयं निर्देशः । कालादिति वर्तते न च कलापी नाम कालोऽस्ति ॥ नैष दोषः । साहचर्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । कलापिसहचरितः कालः कलापी काल इति ॥

[ग्रीष्मावरसमाद्वुञ् ॥ ४।३।४९ ॥
संवत्सराग्रहायणीभ्यां ठञ् च ॥ ४ । ३ । ५० ॥
व्याहरति मृगः ॥ ४ । ३ । ५१ ॥
तदस्य सोढम् ॥ ४ । ३ । ५२ ॥]

भस्म या अर्थी ढञ् प्रत्यय अनभिधानास्तव होणार नाहीं. तेव्हां दोषही येत नाहीं, आणि कौशेयं वस्त्रम् येथें विकार हा अर्थही चांगला जुळतो.

(सू. ४८) हा निर्देश अयुक्त आहे. कारण येथें कालात् अशी अनुवृत्ति आहे; आणि कलापिन् ह्या नांवाचा काल तर नाहीं. हा दोष येत नाहीं. कारण अर्थाच्या साहचर्यामुळें एका अर्थाचा शब्द दुसऱ्या अर्थी उपयोगांत येतो. तेव्हां मोर हे ज्या कालीं कलाप धारण करतात त्या कालाला कलापिन् असें म्हटलें जातें.

१—(सू. ४३) कालवाचक शब्दाहून त्यामध्यें साधु, त्यामध्यें फुलणारा, किंवा त्यामध्ये पक्व होणारा या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—हेमन्ते साधु. हैमन्तः प्राकारः, वसन्ते पुष्प्यन्ति वासन्त्यः कुन्दलता, शरदि पच्यन्ते शारदाः शालयः.

१—(सू. ४४) कालवाचक शब्दाहून 'त्यामध्यें पेरले जाणारे' या अर्थींही अण् प्रत्यय होतो. उदा०—हेमन्ते उप्यन्ते हैमन्ताः यवाः.

१—(सू. ४५) आश्वयुजी शब्दाहून 'त्यामध्यें पेरलेलें' या अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा०—आश्वयुज्यामुप्ताः आश्वयुजका माषाः. आश्वयुजी म्ह. आश्विनी पौर्णिमा.

१—(सू. ४६) ग्रीष्म व वसंत या शब्दांहून 'त्यामध्यें पेरलेलें' या अर्थी वुञ् विकल्पानें होतो. उदा०—ग्रीष्मे उप्तम् ग्रैष्मकम्, ग्रैष्मम् सस्यम्.

१—(सू. ४७) कालवाचक शब्दाहून 'त्यामध्यें दिले जाणारें ऋण' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात उदा०—मासे देयं मासिकम् ऋणम्.

१—(सू. ४८) कलापिन्, अश्वत्थ आणि यवबुस या कालवाचक शब्दांहून 'त्यामध्यें दिलें जाणारें ऋण' याअर्थी वुन् प्रत्यय होतो. उदा०—कलापिनि काले देयमृणं कलापकम्, अश्वत्थकम्, यवबुसम्.

२—तसेंच ज्या कालीं अश्वत्थाला फल येतें त्या कालाला अश्वत्थ म्हणतात; आणि ज्या काली यवाला बुस धरते त्या कालाला यवबुस म्हणतात.

१—(सू. ४९) ग्रीष्म आणि अवरसम या कालवाचक शब्दांहून 'त्यामध्यें देय ऋण' या अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा०—ग्रीष्मे देयम् ग्रैष्मकम् ऋणम्; आवरसमकम्. अवरसमा म्ह. अलीकडचें वर्ष.

१—(सू. ५०) संवत्सर आणि आग्रहायणी या कालवाचक शब्दांहून 'त्यामध्यें दिलें जाणारें ऋण' या अर्थी ठञ् व वुञ् हे प्रत्यय होतात. उदा०—संवत्सरे देयं सांवत्सरिकम्, सांवत्सरकम् ऋणम्; आग्रहायणिकम्, आग्रहायणकम्

१—(सू. ५१) कालवाचक शब्दांहून 'त्यामध्यें शब्द करणारा मृग' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—निशायां व्याहरति नैशः मृगः.

१—(सू. ५२) कालवाचक शब्दांहून ते सहन झालें आहे ज्याला या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—रात्रिवाचक निशा शब्दाचा रात्रीं केले जाणारे अध्ययन असा गौण अर्थ घेऊन त्याच्या पुढें तें तसें अध्ययन ज्याला सहन झाले आहे या अर्थी ठञ् व अण् (४ । ३ । १४) प्रत्यय होतात. उदा०—नैशः, नैशिकः.

**तत्र भवः ॥ ४ । ३ । ५३ ॥**

तत्रेति वर्तमाने पुनस्तत्रग्रहणं किमर्थम्।

**तत्रप्रकरणे तत्रेति पुनर्वचनं कालनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

तत्रप्रकरणे तत्रेति पुनर्वचनं क्रियते कालनिवृत्त्यर्थम् । कालाधिकारो निवर्त्यते ॥ न हि काको वाश्यत इत्येवाधिकारा निवर्तन्ते को वाभिसंबन्धो यत्तत्रग्रहणं कालाधिकारं निवर्तयेत् । एषोऽभिसंबन्धः । कालाभिसंबद्धं तत्रग्रहणमनुवर्तते तत्रग्रहणं च तत्रग्रहणस्य निवर्तकं भवति तस्मिन्निवृत्ते कालाधिकारोऽपि निवर्तते ॥

**[दिगादिभ्यो यत् ॥ ४ । ३ । ५४ ॥**

**शरीरावयवाच्च ॥ ४ । ३ । ५५ ॥**

**दृतिकुक्षिकलशिवस्त्यस्त्यहेर्ढञ् ॥ ४ । ३ । ५६ ॥**

**ग्रीवाभ्योऽण् च ॥ ४ । ३ । ५७ ॥]**

**गम्भीराञ्ञ्यः ॥ ४ । ३ । ५८ ॥**

**ञ्यप्रकरणे परिमुखादिभ्य उपसंख्यानम् ॥ १ ॥**

ञ्यप्रकरणे परिमुखादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । पारिमुख्यम् पारिहनव्यम् ॥

**अव्ययीभावाद्विधान उपकूलादिभ्यः प्रतिषेधः ॥ २ ॥**

अव्ययीभावाद्विधान उपकूलादिभ्यः

---

( सू. ५३ ) 'तत्र' असें येथें मागून अनुवृत्तीनें येत असतां पुन्हां येथें 'तत्र' असें कशाकरितां म्हटलें आहे?

( वा. १ ) 'तत्र' याची मागून अनुवृत्ति येत असतां पुनः येथें जें तत्र शब्दाचें ग्रहण केलें आहे तें कालात् हा अधिकार बंद होण्याकरितां केलें आहे.

पण काय हो, येथें तत्र-ग्रहण केलें काय, आणि त्याचा कालात् हा अधिकार बंद होण्याशीं संबंध काय, कीं ज्यामुळें तत्र-ग्रहण हें 'कालात्' ह्या अधिकाराला बंद करील? असें पहा कीं— कावळा ओरडतो असें कांहीं तरी बोललें असतां त्यानें अधिकार कां बंद होत असतात?

संबंध आहे तर; उगीच कसें होईल? मागून जें तत्र-ग्रहण अनुवृत्तीनें येणार तें कालाशीं संबंध पावलेलेंच येणार. आतां ह्या तत्र-ग्रहणानें त्या तत्र ग्रहणाची निवृत्ति होणें हें तर सरळच आहे. तेव्हां तें तत्र-ग्रहण निवृत्त झालें म्हणजे अर्थातच त्या तत्र ग्रहणाशीं संबंध पावलेला कालात् हा अधिकारही निवृत्त होणारच.

( सू. ५९ वा. १ ) ह्या ञ्य प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें परिमुख वगैरे कांहीं अव्ययीभावांहूनच हा ञ्य प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—परिमुखं भवं पारिमुख्यम्, परिहनु भवं पारिहनव्यम्.

(वा. २) अव्ययीभावाहून ञ्य प्रत्यय होतो असा येथें मोघम ञ्य प्रत्यय सांगितला तर उपकूल वगैरे अव्ययीभावांहून तो होत नाहीं

---

१—( सू. ५३ ) प्रातिपदिकाहून 'तत्र भवः' म्हणजे तेथें असणारा या अर्थीं अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—स्रुघ्ने भवः स्रौघ्नः.

१—( सू. ५४ ) दिश् वगैरे शब्दांहून 'तत्र भवः' या अर्थीं यत् प्रत्यय होतो. उ०—दिशि भवं दिश्यम्

१—( सू. ५५ ) शरीरावयववाचक शब्दांहून 'तत्र भवः' या अर्थीं यत् प्रत्यय होतो. उदा०—दन्ते भवं दन्त्यम्.

१—( सू. ५६ ) दृति, कुक्षि, कलशि, वस्ति, अस्ति आणि अहि या शब्दांहून 'तत्र भवः' या अर्थीं ढञ् प्रत्यय होतो. उदा०—दृतौ भवं दार्तेयम्, इत्यादि.

१—( सू. ५७ ) ग्रीवा शब्दाहून 'तत्र भवः' या अर्थीं अण् व ढञ् हे प्रत्यय होतात. उदा०—ग्रीवासु भवं ग्रैवम्, ग्रैवेयम्.

१—( सू. ५८ ) गम्भीर शब्दाहून 'तत्र भवः' या अर्थीं ञ्य प्रत्यय होतो. उदा०—गम्भीरे भवं गाम्भीर्यम्.

प्रतिषेधो वक्तव्यः । औपकूलः औपमूलः औपशालः ॥

## [ अव्ययीभावाच्च ॥४।३।५९॥ ]

## अन्तःपूर्वपदाट् ठञ् ॥ ४।३।६० ॥

अत्यल्पमिदमुच्यते ।

**समानस्य तदादेश्च अध्यात्मादिषु चेष्यते ।**

समानस्य । सामानिकः ॥ तदादेः । सामानग्रामिकः सामानदेशिकः ॥ अध्यात्मादिषु चेष्यते । आध्यात्मिकः आधिदैविकः आधिभौतिकः ॥

**ऊर्ध्वंदमाच्च देहाच्च**

ठञ्वक्तव्यः । और्ध्वंदमिकम् और्ध्वदेहिकम् ॥

**लोकोत्तरपदस्य च ॥ १ ॥**

ठञ्वक्तव्यः । ऐहलौकिकम् पारलौकिकम् ॥

**मुखपार्श्वतसोरीयः**

मुखपार्श्व इत्येताभ्यां तसन्ताभ्यामीयो वक्तव्यः । मुखतीयः पार्श्वतीयः ॥

**कुग्जनस्य परस्य च ।**

ईयो वक्तव्यः । जनकीयम् परकीयम् ॥

**ईयः कार्योऽथ मध्यस्य**

मध्यीयः ॥

**मण्मीयौ चापि प्रत्ययौ ॥ २ ॥**

मण्मीयौ चापि प्रत्ययौ वक्तव्यौ । माध्यमः मध्यमीयः ॥

**मध्य मध्यं दिनण्चास्मात्**

मध्यशब्दो मध्यंशब्दमापद्यते दिनण्चास्मात्प्रत्ययो वक्तव्यः । माध्यंदिन उद्गायति ॥

**स्थाम्नो लुगजिनात्तथा ।**

---

असा प्रतिषेध सांगावा. उदा० उपकूले भवः औपकूलः; तसेंच औपमूलः, औपशालः.

सूत्रकारांनीं येथें हें फारच थोडें सांगितलें आहे.

( श्लो. १ ) समान शब्द, समान शब्द आरंभीं असलेला शब्द आणि अध्यात्मादि गणांतील शब्द यांहून ' तत्र भवः ' या अर्थी ठञ् प्रत्यय इष्ट आहे. उदा. सामानिकः, सामानग्रामिकः, सामानदेशिकः, आध्यात्मिकः, आधिदैविकः, आधिभौतिकः.

ऊर्ध्व शब्दाच्या पुढें असलेला जो दम शब्द किंवा देह शब्द तदन्त शब्दाहून ' तत्र भवः ' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा. और्ध्वंदमिकम्, और्ध्वदेहिकम्.

ज्या प्रातिपदिकामध्यें लोक शब्द उत्तरपद आहे त्या प्रातिपदिकाहून ' तत्र भवः ' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० इह लोके भवम् ऐहलौकिकम्, पारलौकिकम्.

( श्लो. २ ) मुख किंवा पार्श्व या शब्दांहून केलेला जो तस् प्रत्यय तदन्ताहून 'तत्र भवः' या अर्थी ईय प्रत्यय होतो; आणि त्या प्रत्ययाच्या बरोबरच त्या शब्दांना कुक् असा आगम होतो. उदा. जनकीयम्, परकीयम्.

मध्य शब्दाहून ' तत्र भवः ' या अर्थी ईय प्रत्यय करावा; आणि तसेंच त्या शब्दाहून मण् आणि मीय हेही प्रत्यय होतात असें म्हणावें. उदा. मध्ये भवः मध्यीयः, माध्यमः, मध्यमीयः.

( श्लो. ३ ) मध्य शब्दाहून ' तत्र भवः ' या अर्थी दिनण् असा ही प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाच्या बरोबर मध्य शब्द हा मध्यम् असा आदेशाप्रत प्राप्त होतो. उदा. माध्यंदिन उद्गायति.

स्थामन्–शब्दान्त व अजिनशब्दान्त

---

१—( सू. ५९ ) अव्ययीभावाहून ' तत्र भवः ' या अर्थी ञ्य प्रत्यय होतो. उदा०–परिमुख्यम् भवं पारिमुख्यम्.

१—( सू. ६० ) ज्या अव्ययीभावामध्यें पूर्वपद ' अन्तः ' हा शब्द आहे त्याहून ' तत्र भवः ' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—आन्तर्वेशिकम्.

स्थाम्नो लुग्वक्तव्यः । अश्वत्थामा ॥ अजिनान्तथा । अजिनान्ताच्च लुग्वक्तव्यः । उष्ट्राजिनः सिंहाजिनः व्याघ्राजिनः ॥

वाह्यो दैव्यः पाञ्चजन्यो गाम्भीर्यं च ञ्य इष्यते ॥ ३ ॥

[ग्रामात् पर्यनुपूर्वात् ॥४।३।६१॥

जिह्वामूलाङ्गुलेश्छः ॥ ४ । ३ । ६२ ॥

वर्गान्ताच्च ॥ ४ । ३ । ६३ ॥

अशब्दे यत्खावन्यतरस्याम् ॥ ४ । ३ । ६४ ॥

कर्णललाटात्कनलंकारे ॥ ४ । ३ । ६५ ॥ ]

तस्य व्याख्यान इति च व्याख्यातव्यनाम्नः ॥ ४ । ३ । ६६ ॥

किमर्थं भवव्याख्यानयोर्युगपदधिकारः क्रियते ।

भवव्याख्यानयोर्युगपदधिकारो ऽपवादविधानार्थः ॥ १ ॥

भवव्याख्यानयोर्युगपदधिकारः क्रियते ऽपवादविधानार्थः । युगपदपवादान्वक्ष्यामीति ॥ किमुच्यते ऽपवादविधानार्थ इति न पुनर्निर्देशार्थोऽपि स्यात् ।

कृतनिर्देशौ हि तौ ॥ २ ॥

कृतनिर्देशौ ह्येतावर्थौ । एकस्तत्र भवः

---

जें प्रातिपदिक त्याहून 'तत्र भवः' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें. उदा. अश्वत्थामा, कृष्णाजिनः, उष्ट्राजिनः, सिंहाजिनः, व्याघ्राजिनः.

गम्भीराञ्ञ्यः (४।२।५८) येथें गम्भीर शब्दाप्रमाणें बहिस्, देव आणि पञ्चजन या शब्दांहूनही तत्र भवः या अर्थी ञ्य प्रत्यय इष्ट आहे. उदा० बाह्यः, दैव्यः, पाञ्चजन्यः.

(सू. ६६) मागून चालू असलेल्या 'तत्र भवः' या अर्थाच्या जोडीला येथें 'तस्य व्याख्यानः' हा अर्थ देऊन येथून पुढें दोन्ही अर्थ चालू केले आहेत ते कशाकरितां ?

(वा. १) 'तत्र भवः' आणि 'तस्य व्याख्यानः' हे दोन्ही अर्थ बरोबर चालू करण्याचें कारण इतकेंच कीं ठञ् वगैरे पुढील अपवाद प्रत्यय दोन्ही अर्थी सारखेच सांगावयाचे आहेत.

अपवाद सांगावयाचे आहेत हें कारण काय दाखवितां ? इतर अर्थाप्रमाणें तद्धित प्रत्ययाचे हेही अर्थ आहेत हें समजण्याकरितां त्या अर्थाचा निर्देश केलाच पाहिजे ना ?

(वा. २) त्या दोन्ही अर्थांचे निर्देश केलेलेच आहेत. एकाचा तर 'तत्र भवः'

---

१—(सू. ६१) प्ररि किंवा अनु या शब्दांच्या पुढील जो ग्रामशब्द तदन्त अव्ययीभावाहून 'तत्र भवः' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—पारिग्रामिकः, आनुग्रामिकः.

१—(सू. ६२) जिह्वामूल आणि अङ्गुलि या शब्दांहून 'तत्र भवः' या अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—जिह्वामूलीयम, अङ्गुलीयम्.

१—(सू. ६३) वर्ग—शब्दान्त प्रातिपदिकाहून 'तत्र भवः' या अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—कवर्गीयः.

१—(सू. ६३) वर्ग—शब्दान्त प्रातिपदिकाहून 'तत्र भवः' या अर्थी यत्, आणि ख हे प्रत्यय होतात. परंतु त्या प्रत्ययान्त शब्दांपासून शब्द या अर्थाचा बोध न झाला पाहिजे. उदा०—वासुदेववर्ग्यः वासुदेववर्गीणः.

१—(सू. ६५) कर्ण व ललाट या शब्दांहून 'तत्र भवः' या अर्थी कन् प्रत्यय होतो, परंतु त्या प्रत्ययान्त शब्दापासून अलंकार या अर्थाचा बोध झाला पाहिजे. उदा०—कर्णिका, ललाटिका.

१—(सू. ६६) व्याख्यान करण्यास योग्य जी वस्तु तद्वाचक शब्दाहून 'त्याचें व्याख्यान' या अर्थी आणि 'तत्र भवः' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—सुपां व्याख्यानः सौपः ग्रन्थः, सुप्सु भवं सौपम्.

[४. ३. ५३] इत्यपरस्तस्येदम् [१२०] इति ॥

अथ व्याख्यातव्यनाम्नो ग्रहणं किमर्थम् ।

तत्र व्याख्यातव्यनाम्नो ग्रहणं भवार्थम् ॥ ३ ॥

तत्र व्याख्यातव्यनाम्नो ग्रहणं क्रियते भवार्थम् ॥ किमुच्यते भवार्थमिति न पुनर्व्याख्यानार्थमपि स्यात् ।

व्याख्याने ह्यवचनात्सिद्धम् ॥ ४ ॥

व्याख्याने हि सत्यन्तरेण वचनं सिद्धम् । यत्प्रति व्याख्यानमित्येतद्भवति तस्मादुत्पत्तिर्भविष्यति । किं प्रत्येतद्भवति । व्याख्यातव्यनाम ॥ यदुच्यते भवार्थमिति तत्र । व्याख्यानार्थमपि व्याख्यातव्यनाम्नो ग्रहणं क्रियते । इह मा भूत् । पाटलिपुत्रस्य व्याख्यानी सुकोसलेति ॥ अथ क्रियमाणेऽपि व्याख्यातव्यनाम्नो ग्रहणे कस्मादेवात्र न भवति । अवयवशो ह्याख्यानं व्याख्यानं पाटलिपुत्रं चाप्यवयवश आचष्ट ईदृशा अस्य प्राकारा इति । सत्यमेवमेतत् । काचित्तु काचित्प्रसृततरा गतिर्भवति । शब्दग्रन्थेषु चैषा प्रसृततरा गतिर्भवति । निरुक्तं व्याख्यायते व्याकरणं

---

(४।३।५३) असा नुकताच केला आहे. आणि 'तस्य व्याख्यानः' या अर्थाचा निर्देश 'तस्येदम्' (४।३।१२०) यानें होतच आहे.

आतां येथें 'व्याख्यातव्यनाम्नः' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा. ३) 'व्याख्यातव्यनाम्नः' असें जें येथें म्हटलें आहे तें 'तत्र भवः' या अर्थाकरितां म्हटलें आहे. म्हणजे त्या व्याख्यातव्याचें जें नांव असेल त्याहूनच 'तत्र भवः' या अर्थी प्रत्यय झाला पाहिजे.

पण येथें 'तत्र भवः' या अर्थाकरितां असें काय म्हणतां ? 'तस्य व्याख्यानः' या अर्थाकरितांही त्याचा उपयोग कां बरें होणार नाहीं ?

(वा. ४) 'तस्य व्याख्यानः' या अर्थी प्रत्यय करणें झाल्यास 'व्याख्यातव्यनाम्नः' असें सूत्रांत म्हटलें नाहीं तरी त्याहूनच प्रत्यय होईल. कारण व्याख्यान हें ज्याचें असें म्हणतां येतें त्याहून 'व्याख्यान' या अर्थी प्रत्यय होईल.

व्याख्यान हें कोणाचें असें म्हणता येतें ?

व्याख्यान करण्यास योग्य अशी जी वस्तु तिचें व्याख्यान केलें जातें.

तरी पण येथें व्याख्यातव्यनाम्नः असें 'तत्र भवः' या अर्थाकरितां म्हटलें आहे असें म्हणतां येत नाहीं, तर, 'तस्य व्याख्यानः' या अर्थाकरितांही येथें 'व्याख्यातव्यनाम्नः' असें म्हटलें पाहिजे. कारण पाटलिपुत्रस्य व्याख्यानी सुकोसला येथें पाटलिपुत्र शब्दाहून 'तस्य व्याख्यानः' या अर्थी प्रत्यय न झाला पाहिजे.

पण येथें तस्य व्याख्यानः असें म्हटलें तरी पाटलिपुत्र शब्दाहून तस्य व्याख्यानः या अर्थी प्रत्यय कां बरें होत नाहीं ? कारण व्याख्यान म्हणजे अवयवशः माहिती सांगणें. सुकोसला नगरीप्रमाणेंच या पाटलिपुत्र शहराचे तट आहेत तेथील वाडेही त्यासारखेच आहेत अशी येथेंही अवयवशः माहिती दिली जाते.

ही गोष्ट खरी, पण एखाद्या गोष्टीचा प्रसार एखाद्या ठिकाणीं ज्यास्त होतो. शब्दग्रंथामध्यें तर व्याख्यान हें विस्तारानें करतां येतें. त्यामुळें निरुक्ताचें व्याख्यान केलें जातें तसेंच, व्याकरणाचें व्याख्यान केलें जातें

---

३—अपत्य या अर्थी प्रत्यय हा जसा पितुः असें म्हटलें नाहीं तरी पितृवाचक शब्दाहूनच होतो तसा येथें 'व्याख्यातव्यनाम्नः' असें म्हटलें नाहीं तरी व्याख्यातव्यवस्तुवाचक शब्दाहूनच प्रत्यय होईल.

व्याख्यायत इत्युच्यते न कश्चिदाह पाटलिपुत्रं व्याख्यायत इति ॥

भवे मन्त्रेषु लुग्वचनम् ॥ ५ ॥

भवे मन्त्रेषु लुग्वक्तव्यः । अग्निष्टोमे भवो मन्त्रो ऽग्निष्टोमः । राजसूयः वाजपेयः ॥

कल्पे च व्याख्याने ॥ ६ ॥

कल्पे च व्याख्याने लुग्वक्तव्यः । अग्निष्टोमस्य व्याख्यानः कल्पो ऽग्निष्टोमः । राजसूयः वाजपेयः ॥

स तर्हि वक्तव्यः ।

न वा तादर्थ्यात्ताच्छब्द्यम् ॥ ७ ॥

न वा वक्तव्यः । किं कारणम् । तादर्थ्यात्ताच्छब्द्यम् । तादर्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । अग्निष्टोमार्थो ऽग्निष्टोमः । राजसूयः वाजपेयः ॥

[ बह्वचोन्तोदात्ताट्ठञ् ॥ ४ । ३ । ६७ ॥ ]

ऋतुयज्ञेभ्यश्च ॥ ४ । ३ । ६८ ॥

ऋतुग्रहणं किमर्थम् । यज्ञेभ्य इतीयत्युच्यमाने य एव संज्ञीभूतका यज्ञास्तत उत्पत्तिः स्यात् । आग्निष्टोमिकः राजसूयिकः वाजपेयिकः । यत्र वा यज्ञशब्दो ऽस्ति । नावयज्ञिकः पाकयज्ञिकः ।

---

असें म्हणण्याचा प्रघात लोकांमध्यें पडला आहे. पण पाटलिपुत्राचें व्याख्यान केलें जातें असें कोणी म्हणत नाहींतै.

( वा. ५ ) तत्र भवः या अर्थी केलेल्या प्रत्ययापासून जर मंत्राचा बोध होत असेल तर त्या प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें. उदा०—अग्निष्टोमे भवः मन्त्रः अग्निष्टोमः. त्याप्रमाणेंच राजसूयः, वाजपेयः.

( वा. ६ ) तस्य व्याख्यानः या अर्थी केलेल्या प्रत्ययापासून जर कल्पाचा बोध होत असेल तर त्या प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें. उदा०—अग्निष्टोमस्य व्याख्यानः कल्पः अग्निष्टोमः. त्याप्रमाणेंच राजसूयः, वाजपेयः.

तर मग मंत्र किंवा कल्प अर्थ असतांना तसा लुक् सांगितला पाहिजे.

( वा. ७ ) अथवा तसा लुक् येथें सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं ज्या वस्तूकरितां जो पदार्थ उपयोगांत येतो त्या पदार्थाला त्या वस्तूचा शब्द दिला जातो. तेव्हां अग्निष्टोमाकरितां जो मंत्र आणि कल्प त्याला अग्निष्टोम असें म्हणतां येईल. तसेंच राजसूय व वाजपेय हे शब्दही त्या अर्थी उपयोगांत येतील.

(सू. ६८) येथें ऋतु शब्दाचें ग्रहण कशाकरितां केलें आहे ?

यज्ञेभ्यः एवढेंच म्हटलें तर ज्यांना यज्ञ ही संज्ञा आहे अशा ठिकाणींच हा प्रत्यय होईल. उदा०—आग्निष्टोमिकः, राजसूयिकः वाजपेयिकः अथवा ज्या नांवामध्यें यज्ञ शब्द आहे तेथेंच उदा० नावयज्ञिकः, पाकयज्ञिकः,येथेंच हा प्रत्यय होईल.

---

१—तेव्हां या लोक-प्रसिद्धीवरून व्याख्यातव्य अशा एखाद्या ग्रंथाचें जें नांव तें येथें व्याख्यातव्यनाम असें घेतलें जातें. याचकरितां येथें व्याख्यातव्यनाम्नः असें म्हटलें आहे.

१—( सू. ६७ ) ज्यामध्यें अच् बहुत आहेत असे जें व्याख्यतव्य वस्तूचें अन्तीं उदात्त असलेलें नाम त्याहून ‘ तत्र भवः ’ या अर्थी किंवा ‘ तस्य व्याख्यान. ’ या अर्थी ठञ् प्रत्यय होतो, उदा०—षत्वणत्विकम्.

१—( सू. ६८ ) मुख्ययज्ञवाचक किंवा अमुख्ययज्ञवाचक जें व्याख्यातव्य नाम त्याहून ‘ तत्र भवः ’ या अर्थी किंवा ‘ तस्य व्याख्यानः ’ या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. ज्यामध्यें सोमाचा संबंध नाहीं ते अमुख्य यज्ञ होत. त्यांचा संग्रह होण्याकरितांच येथें ऋतु व यज्ञ असे दोन शब्द उच्चारले आहेत, उदा०—आग्निष्टोमिकः पाकयज्ञिकः, पाञ्चौदनिकः.

इह न स्यात्। पाञ्चौदनिकः साप्तौदनिकः शातौदनिकः। क्रतुग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ अथ यज्ञग्रहणं किमर्थम्। क्रतुभ्य इतीयत्युच्यमाने य एव संज्ञीभूतकाः क्रतवस्तत उत्पत्तिः स्यात्। आग्निष्टोमिकः राजसूयिकः वाजपेयिकः। इह न स्यात्। पाञ्चौदनिकः साप्तौदनिकः शातौदनिकः। यज्ञग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥

**[अध्यायेष्वेवर्षेः ॥ ४ । ३ । ६९ ॥**

**पौरोडाशपुरोडाशात् ष्ठन् ॥ ४ । ३ । ७० ॥**

**छन्दसो यदणौ ॥ ४ । ३ । ७१ ॥]**

**द्व्यजृद्ब्राह्मणर्क्प्रथमाध्वरपुरश्चरणनामाख्याताट् ठक् ॥ ४।३।७२ ॥**

**नामाख्यातग्रहणं संघातविगृहीतार्थम् ॥ १ ॥**

नामाख्यातग्रहणं संघातविगृहीतार्थं द्रष्टव्यम्। नामिकः आख्यातिकः नामाख्यातिकः ॥

**[अणृगयनादिभ्यः ॥ ४ । ३ । ७३ ॥**

---

आणि पाञ्चौदनिकः, साप्तौदनिकः, शातौदनिकः येथें होणार नाहीं; क्रतुग्रहण केलें म्हणजे मात्र येथें दोष येत नाहीं.

आतां येथें यज्ञ शब्द कशाकरितां घातला आहे ?

क्रतुभ्यः एवढेंच म्हटलें तर ज्यांना क्रतु ही संज्ञा आहे तशा ठिकाणींच हा प्रत्यय होईल. उदा० आग्निष्टोमिकः, राजसूयिकः, वाजपेयिकः; आणि पाञ्चौदनिकः, साप्तौदनिकः, शातौदनिकः येथें होणार नाही. यज्ञ शब्दाचें ग्रहण केलें म्हणजे मात्र येथें दोष येत नाहीं.

( सू ७२ वा. १ ) ह्या सूत्रांतील नामाख्यात शब्दानें नामाख्यात एवढा सामासिक शब्दही घ्यावा आणि त्यांतील नामन् व आख्यात हे पोटशब्दही घ्यावे. उदा०— नामिकः, आख्यातिकः, नामाख्यातिकः.

---

२—पञ्चौदन वगैरे हीं मुख्य यज्ञांचीं नावें नव्हेत. कारण, त्यात सोम रसाचें पान नाहीं.

१—( सू. ६९ ) जे ऋषिवाचक शब्द 'त्यानीं केलेला ग्रंथ' या अर्थी उपयोगांत येतात अशा व्याख्यातव्यनामांहून 'तत्र भवः' या अर्थी किंवा 'तस्य व्याख्यानः' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. परंतु त्या प्रत्ययान्त शब्दापासून अध्याय या अर्थाचा बोध होत असला पाहिजे. उदा०—वासिष्ठिकः अध्यायः.

१—( सू. ७० ) पौरोडाश व पुरोडाश या शब्दांहून 'तत्र भवः' या अर्थी किंवा 'तस्य व्याख्यानः' या अर्थी ष्ठन् प्रत्यय होतो. ज्या मंत्रानें पुरोडाशाचा संस्कार होतो त्याला पौरोडाश म्हणतात, आणि ज्या ग्रंथामध्यें पुरोडाशाचा विचार केला आहे त्याला पुरोडाश म्हणतात. उदा०--पौरोडाशिकः, पुरोडाशिकः.

१—( सू. ७१ ) छन्दस् शब्दाहून 'तत्र भवः' या अर्थी किंवा 'तस्य व्याख्यानः' या अर्थी यत् व अण् हे प्रत्यय होतात; पुढील सूत्रानें ठक् होत नाहीं. उदा०—छन्दस्यः, छान्दसः.

१—( सू. ७२ ) दोन अच् असलेला शब्द, ऋकारान्त शब्द आणि ब्राह्मण, ऋक्, प्रथम, अध्वर, पुरश्चरण, नामन्, आख्यात आणि नामाख्यात हे शब्द यांहून 'तत्र भवः' आणि 'तस्य व्याख्यानः' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—ऐष्टिकः, पाशुकः, चातुर्होतृकः, ब्राह्मणिकः इत्यादि.

१—( सू. ७३ ) ऋगयनादि गणांतील शब्दांहून 'तत्र भवः' या अर्थी किंवा 'तस्य व्याख्यानः' या अर्थी अण् प्रत्यय होतो. ठक् वगैरे अपवाद प्रत्यय होत नाहीत. उदा०—आर्गयनः.

**तत आगतः ॥ ४ । ३ । ७४ ॥**

**ठगायस्थानेभ्यः ॥ ४ । ३ । ७५ ॥**

**शुण्डिकादिभ्योऽण् ॥ ४।३।७६ ॥**

**विद्यायोनिसंबन्धेभ्यो वुञ् ॥ ४ । ३ । ७७ ॥**

**ऋतष्ठञ् ॥ ४ । ३ । ७८ ॥**

**पितुर्यच्च ॥ ४ । ३ । ७९ ॥**

**गोत्रादङ्कवत् ॥ ४ । ३ । ८० ॥**

**हेतुमनुष्येभ्योऽन्यतरस्यां रूप्यः ॥ ४ । ३ । ८१ ॥**

**मयट् च ॥ ४ । ३ । ८२ ॥**

**प्रभवति ॥ ४ । ३ । ८३ ॥]**

**विदूराञ्ञ्यः ॥ ४ । ३ । ८४ ॥**

अयुक्तोऽयं निर्देशो न ह्यसौ विदूरात्प्रभवति । किं तर्हि । वालवायात्प्रभवति विदूरे संस्क्रियते ॥ एवं तर्हि

**वालवायो विदूरं च**

वालवायो विदूरशब्दमापद्यते ञ्यश्चा-

---

(सू. ८४) हा निर्देश बरोबर दिसत नाहीं. कारण, हा वैदूर्य मणि विदूर नगरांतून निर्माण होत नाहीं. तर हा वालवाय पर्वतावर निर्माण होतो. फक्त त्याला एक प्रकारचा संस्कार विदूर नगरामध्यें दिला जातो.

तर मग आतां—

(श्लो. १) वालवाय शब्दाहून ञ्य प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाच्या बरोबरच

---

१ (सू. ७४) प्रातिपदिकाहून 'तत आगतः' या अर्थी म्हणजे 'त्यापासून आलेला' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०— स्रुघ्नात् आगतः स्रौघ्नः.

१-(सू. ७५) आयस्थान म्हणजे हक्काने द्रव्य प्राप्त होण्याची जागा, तद्वाचक शब्दाहून 'तत आगतः' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—शुल्कशालायाः सकाशात् आगतः शौल्कशालिकः.

१-(सू. ७६) शुण्डिकादि गणांतील शब्दाहून 'तत आगतः' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा० शुण्डिकात् आगतः शौण्डिकः.

१-(सू. ७७) विद्यासंबंध किंवा योनिसंबंध दाखविणारे जे शब्द त्यांहून 'तत आगतः' या अर्थी वुन् प्रत्यय होतो उदा०-उपाध्यायात् आगतः औपाध्यायकः, मातामहात् आगतः मातामहकः.

१-(सू. ७८) विद्यासंबंध किंवा योनिसंबंध दाखविणारे जे ऋकारान्त शब्द त्यांहून 'तत आगतः, या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. होतुः आगतं हौतृकम्, भ्रातृकम्.

१-(सू. ७९) पितृ शब्दाहून 'तत आगतः' या अर्थी यत् व ठञ् हे प्रत्यय होतात. पितुः सकाशात् आगतम्, पित्र्यम् पैतृकम्.

१-(सू. ८०) अपत्य-प्रत्ययान्त अशा ज्या शब्दाहून जो प्रत्यय अङ्क या अर्थी (४।३।१२७) होत असतो तो प्रत्यय त्याच शब्दाहून 'तत आगत' या अर्थी होतो. उदा०-औपगवकम्. अङ्क हा अर्थ गम्यमान असतांना औपगव शब्दाहून वुञ् प्रत्यय (४।३।१२६) 'तस्य इदम्' या अर्थी होत असतो.

१—(सू. ८१) हेतुवाचक आणि मनुष्यवाचक शब्दांहून तत आगत. या अर्थी रूप्य प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—समात् आगतं समरूप्यम्, म्हणजे सम प्रदेश हाच जेथून येण्याला हेतु झाला आहे असें. तसेंच समीयम्; देवदत्तरूप्यम् दैवदत्तम्.

१-(सू. ८२) हेतुवाचक आणि मनुष्यवाचक शब्दांहून 'तत आगतः' या अर्थी मयट् प्रत्ययही होतो. उदा०—सममयम्, देवदत्तमयम्.

१-(सू. ८३) प्रातिपदिकाहून 'ततः प्रभवति' म्हणजे तेथून प्रथमतः प्रकाशित होतो या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा० हिमवतः सकाशात् प्रभवति हैमवती गङ्गा.

१-(सू. ८४) विदूर शब्दाहून 'ततः प्रभवति' या अर्थी ञ्य प्रत्यय होतो. उदा ०—विदूरात् प्रभवति वैदूर्यः मणिः.

क्षमात्प्रत्ययो वक्तव्यः ॥

प्रकृत्यन्तरमेव वा ।

अथवा प्रकृत्यन्तरं विदूरशब्दो वालवायस्य ॥ न वै तत्र वालवायं विदूर इत्युपाचरन्ति ।

न वै तत्रेति चेद्ब्रूयाज्जित्वरीवदुपाचरेत्॥

तद्यथा । वणिजो वाराणसीं जित्वरीत्युपाचरन्ति । एवं वैयाकरणा वालवायं विदूर इत्युपाचरन्ति ॥

वालवायो विदूरं च प्रकृत्यन्तरमेव वा ॥
न वै तत्रेति चेद्ब्रूयाज्जित्वरीवदुपाचरेत्॥

[ तद्‌ गच्छति पथिदूतयोः ॥ ४ । ३ । ८५ ॥ ]

अभिनिष्क्रामति द्वारम् ॥ ४ । ३ । ८६ ॥

अयुक्तो ऽयं निर्देशः । चेतनावत एतद्भवति निष्क्रमणं वापक्रमणं वा द्वारं चाचेतनम् । कथं तर्हि निर्देशः कर्तव्यः । अभिनिष्क्रमणं द्वारमिति ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । अचेतनेष्वपि चेतनावदुपचारो दृश्यते । तद्यथा । अयमस्य कोणोऽभिनिःसृतः । अयमभिप्रविष्ट इति ॥

अधिकृत्य कृते ग्रन्थे ॥ ४ । ३ । ८७ ॥

आधिकृत्य कृते ग्रन्थे लुबाख्यायिकाभ्यो बहुलम् ॥ १ ॥

अधिकृत्य कृते ग्रन्थ इत्यत्राख्यायि-

---

त्या वालवाय शब्दाला विदूर असा आदेश होतो असें म्हणावें.

अथवा वालवाय या अर्थाचा दुसराच हा विदूर शब्द आहे.

आतां वालवाय या अर्थी विदूर शब्दाचा प्रयोग लोकांमध्यें कोठें दिसत नाहीं असें कोणी म्हणेल तर जसे व्यापारी लोक वाराणसीला 'जित्वरी' म्हणतात तसें वैयाकरण लोक वालवाय पर्वताला 'विदूर' म्हणतात असें समजावें.

( सू. ८६ ) हा निर्देश बरोबर दिसत नाहीं. कारण निघणें, मागें फिरणें वगैरे गोष्टी चेतनालाच संभवतात. आणि द्वार तर अचेतन आहे.

तर मग येथें कसा बरें निर्देश केला पाहिजे ?

अभिनिष्क्रमणं द्वारम् म्ह. निघण्याचें साधन द्वार असा निर्देश केला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण अचेतन वस्तूचे ठिकाणीं देखील चेतनासारखे व्यवहार लोकांमध्यें केलेले दृष्टीस पडतात. उदा० हा या घराचा कोपरा बाहेर आला आहे, हा आंत शिरला आहे वगैरे.

( सू. ८७ वा. १ ) ह्या सूत्रामध्यें आख्यायिका-वाचक शब्द साधण्याकरितां त्या अर्थी

---

१–( सू. ८५ ) प्रातिपदिकाहून ' त्याकडे जातो ' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. परंतु त्या प्रत्ययान्त शब्दापासून मार्ग किंवा दूत यांचाच बोध होत असला पाहिजे. उदा ०–स्रुघ्नं गच्छति स्रौघ्नः. मार्ग किंवा दूत असा अर्थ येथें असतो.

१–( सू. ८६ ) प्रातिपदिकाहून ' त्याकडे निघणारें ' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. परंतु त्या प्रत्ययान्त शब्दापासून द्वार या अर्थाचा बोध होत असला पाहिजे. उदा०– स्रौघ्नमभिनिष्क्रामति स्रौघ्नं द्वारम् स्रुघ्नाकडे जाणारा मनुष्य ज्या द्वारांतून बाहेर पडतो तें द्वार असा अर्थ आहे.

१–( सू. ८७) प्रातिपदिकाहून ' त्याला उद्देशून केलेला ग्रंथ या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०– सुभद्राम् अधिकृत्य कृतो ग्रन्थः सौभद्रः.

काभ्यो बहुलं लुब्वक्तव्यः । वासवदत्ता सुमनोत्तरा । न च भवति । भैमरथी ॥

**शिशुक्रन्दयमसभद्वंद्वेन्द्रजननादिभ्यश्छः ॥ ४ । ३ । ८८ ॥**

**द्वन्द्वे देवासुरादिभ्यः प्रतिषेधः ॥ १ ॥**

द्वन्द्वे देवासुरादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः। दैवासुरम् राक्षोऽसुरम् । दैवासुरी राक्षोऽसुरी ॥

**सोऽस्य निवासः ॥ ४ । ३ । ८९ ॥**

**अभिजनश्च ॥ ४ । ३ । ९० ॥**

निवासाभिजनयोः को विशेषः । निवासो नाम यत्र संप्रत्युष्यते । अभिजनो नाम यत्र पूर्वैरुषितम् ॥

**[ आयुधजीविभ्यश्छः पर्वते ॥ ४ । ३ । ९१ ॥**

**शौण्डिकादिभ्यो ञ्यः ॥ ४।३।९२ ॥**

**सिन्धुतक्षशिलादिभ्योऽणञौ ॥ ४ । ३ । ९३ ॥**

**तूदीशलातुरवर्मतीकूचवाराड्ढक्छण्ढञ्यकः ॥ ४ । ३ । ९४ ॥**

**भक्तिः ॥ ४ । ३ । ९५ ॥**

---

केलेल्या प्रत्ययाचा बाहुल्येकरून लुप् होतो असें म्हणावें. उदा० वासवदत्तामधिकृत्य कृतो ग्रन्थः वासवदत्ता. त्याप्रमाणेंच सुमनोत्तरा. कांहीं ठिकाणीं आख्यायिकावाचक शब्द असेल तर लुप् होत नाहीं. उदा० भैमरथी.

( सू. ८८ वा. १ ) देवासुर वगैरे द्वंद्वांहून हा छ प्रत्यय होत नाहीं असा निषेध सांगावा. उदा० दैवासुरम्, राक्षोसुरम्; दैवासुरी, राक्षोसुरी.

( सू. ९० ) निवास आणि अभिजन यांमध्यें काय बरें फरक आहे ?

निवास म्हणजे हल्लींचें राहण्याचें ठिकाण; आणि ज्या ठिकाणीं पूर्वज राहत होते तो अभिजन होय.

---

१–( सू. ८८ ) शिशुक्रन्द, यमसभ, द्वंद्व आणि इन्द्रजननादि गणांतील शब्द यांहून 'त्याला उद्देशून केलेला ग्रंथ' या अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०–शिशूनां क्रन्दनं शिशुक्रन्दः. शिशुक्रन्दीयः. म्हणजे शिशुक्रन्दाला उद्देशून केलेला ग्रंथ. यमसभ म्ह. यमाची सभा. यमसभीयः म्हणजे त्या सभेला उद्देशून केलेला ग्रंथ.

१–( सू. ८९ ) प्रातिपदिकाहून तो आहे निवास ज्याचा या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०–स्रुघ्नः निवासः अस्य स्रौघ्नः.

१—( सू. ९० ) प्रातिपदिकाहून 'तो आहे अभिजन ज्याचा' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—स्रुघ्नः अभिजनः अस्य स्रौघ्नः.

१—( सू. ९१ ) पर्वतविशेषवाचक शब्दाहून 'तो आहे अभिजन ज्यांचा असे आयुधजीवी लोक' या अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—हृद्गोलः पर्वतः अभिजनो येषां ते हृद्गोलीयाः आयुधजीविनः.

१—( सू. ९२ ) शण्डिक वगैरे शब्दांहून 'तो आहे अभिजन ज्याचा' या अर्थी ञ्य प्रत्यय होतो. उदा०—शाण्डिक्यः.

१—( सू. ९३ ) सिन्ध्वादि गणांतील शब्द व तक्षशिलादि गणांतील शब्द यांहून 'तो आहे अभिजन ज्याचा' या अर्थी क्रमानें अण् व अञ् हे प्रत्यय होतात. उदा०—सैन्धवः, ताक्षशिलः.

१—( सू. ९४ ) तूदी, शलातुर, वर्मती आणि कूचवार या चार शब्दांहून 'तो आहे अभिजन ज्याचा' या अर्थी क्रमानें ढक्, छण्, ढञ् आणि यक् हे प्रत्यय होतात. उदा०—तौदेयः, शालातुरीयः, वार्मतेयः, कौचवार्यः.

१—( सू. ९५ ) प्रातिपदिकाहून 'तो प्रातिपदिकार्थ आहे भक्ति म्हणजे सेव्य पदार्थ ज्याचा' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—स्रुघ्नः भक्तिः अस्य स्रौघ्नः.

**[अचित्ताददेशकालाट्ठक् ॥४।३।९६॥**
**महाराजाट्ठञ् ॥ ४ । ३ । ९७ ॥]**
**वासुदेवार्जुनाभ्यां वुन्**
**॥ ४ । ३ । ९८ ॥**

किमर्थं वासुदेवशब्दाद्वुन्विधीयते न गोत्रक्षत्रियाख्येभ्यो बहुलं वुञ् [ ४. ३. ९९ ] इत्येव सिद्धम्। न ह्यस्ति विशेषो वासुदेवशब्दाद्वुनो वा वुञो वा । तदेव रूपं स एव स्वरः ॥ इदं तर्हि प्रयोजनं वासुदेवशब्दस्य पूर्वनिपातं वक्ष्यामीति ॥ अथवा नैषा क्षत्रियाख्या । संज्ञैषा तत्रभवतः ॥

**[ गोत्रक्षत्रियाख्येभ्यो बहुलं वुञ्**
**॥ ४ । ३ । ९९ ॥ ]**

**जनपदिनां जनपदवत्सर्वं जनपदेन समानशब्दानां बहुवचने**
**॥ ४ । ३ । १०० ॥**

---

( सू. ९८ ) येथें वासुदेव शब्दाहून वुन् प्रत्यय कशाकरितां सांगितला आहे ? तो सांगावयास नको. कारण वासुदेव ही एक क्षत्रियाची आख्या असल्यामुळें ' गोत्रक्षत्रियाख्येभ्यो बहुलं वुञ् ' या पुढील सूत्रानें तेथें वुञ् प्रत्यय होईल. वासुदेव शब्दाच्या पुढें वुन् प्रत्यय केला काय आणि वुञ् प्रत्यय केला काय कांहीं फरकच नाहीं. तेंच रूप आणि तोच स्वर.

तर मग येथें वासुदेव शब्द घालण्याचा उपयोग असा कीं येथें अर्जुनापेक्षां वासुदेव श्रेष्ठ असल्यामुळें त्याला पूर्वनिपात केला आहे. तेव्हां ' श्रेष्ठाला पूर्वनिपात होतो ' ही गोष्ट जी सांगावयाची (२ । २ । ३४ वा.४) आहे ती गोष्ट सुचविण्याकरितां येथें वासुदेव शब्द उच्चारला आहे. अथवा वासुदेव ही क्षत्रियाची आख्या नव्हे; तर भगवान् परमात्म्याची ही संज्ञा आहे.

---

१—( सू. ९६ ) अचेतनपदार्थवाचक जो देशकालव्यतिरिक्त शब्द त्याहून ' भक्ति ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—अपूपाः भक्तिः अस्य आपूपिकः.

१—( सू. ९७ ) महाराज शब्दाहून ' भक्ति ' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—महाराजः भक्तिः अस्य माहाराजिकः.

१—( सू. ९८ ) वासुदेव आणि अर्जुन या शब्दांहून भक्ति या अर्थी वुन् प्रत्यय होतो. उदा०—वासुदेवः भक्तिः अस्य वासुदेवकः, अर्जुनकः.

१—( सू. ९९ ) अपत्य-प्रत्ययान्त जी आख्या व क्षत्रियाची जी आख्या त्या शब्दांहून ' भक्ति ' या अर्थी बाहुल्येंकरून वुञ् प्रत्यय होतो. उदा०—ग्लौचुकायनकः, नाकुलकः.

१—( सू. १०० ) जनपदवाचक शब्दांना ' भक्ति ' हा अर्थ विवक्षित असतांना जें काय सर्व होतें म्हणजे त्याहून जो शैषिक प्रत्यय ( ४।२।१२४ ) होतो व तेव्हां त्या शब्दाचें जसें स्वरूप असतें तें सर्व जनपदस्वामिवाचक शब्दाना होतें. परंतु त्या जनपदस्वामिवाचक शब्दाचें बहुवचनीं रूप त्या जनपदवाचक शब्दासारखे असलें पाहिजे. उदा०—जनपदवाचक अङ्ग शब्दाहून भक्ति या अर्थी वुञ् प्रत्यय (४।२।१२४) होऊन आङ्गकः असें रूप होतें. जनपदस्वामिवाचक आङ्ग शब्दाचेंही तसेंच रूप होतें. देशवाचक अङ्ग शब्दाचें बहुवचन अङ्गाः असें होतें. आङ्ग शब्दाचेंही लुकामुळें ( २।४।६२ ) तसेंच होतें. तसेंच जनपदवाचक मद्र व वृजि या शब्दांहून भक्ति या अर्थी शैषिक कन् प्रत्यय ( ४।२।१३१ ) होऊन मद्रकः वृजिकः अशीं रूपें होतात. वृद्धि ( ७।२।११७। ११८ ) न झाल्यामुळें अकार व ऋकार ह्रस्वच कायम राहतात जनपदस्वामिवाचक माद्र ( ४।२।१७० ) व वार्ज्य (४।२।१७१) या शब्दांचींही तशींच रूपें होतात. सर्वम् असें म्हटलें असल्यामुळें माद्र व वार्ज्य या प्रकृतींना मद्र व वृजि अशीं रूपें प्राप्त होतात.

सर्ववचनं किमर्थम्।

**सर्ववचनं प्रकृतिनिर्ह्रासार्थम् ॥ १ ॥**

सर्ववचनं क्रियते प्रकृतिनिर्ह्रासार्थम्। प्रकृतिनिर्ह्रासो यथा स्यात् ॥

**तच्च मद्रवृज्यर्थम् ॥ २ ॥**

तच्च मद्रवृज्यर्थं द्रष्टव्यम्। माद्रो भक्तिरस्य माद्रौ वा भक्तिरस्य मद्रक इत्येव यथा स्यात्। वार्ज्यो भक्तिरस्य वार्ज्यौ वा भक्तिरस्य वृजिक इत्येव यथा स्यात् ॥

**तेन प्रोक्तम् ॥ ४ । ३ । १०१ ॥**

**प्रोक्तग्रहणमनर्थकं तत्रादर्शनात् ॥ १ ॥**

प्रोक्तग्रहणमनर्थकम्। किं कारणम्। तत्रादर्शनात्। ग्रामे ग्रामे काठकं कालापकं च प्रोच्यते तत्रादर्शनात्। न च तत्र प्रत्ययो दृश्यते ॥

**ग्रन्थे च दर्शनात् ॥ २ ॥**

यत्र च दृश्यते ग्रन्थः स तत्र कृते ग्रन्थे [ ४।३।११६ ] इत्येव सिद्धम् ॥ छन्दोऽर्थं तर्हीदं वक्तव्यं न हि च्छन्दांसि क्रियन्ते नित्यानि च्छन्दांसि।

**छन्दोऽर्थमिति चेत्तुल्यम् ॥ ३॥**

छन्दोऽर्थमिति चेत्तुल्यमेतद्भवति। ग्रामे ग्रामे काठकं कालापकं च प्रोच्यते तत्रादर्शनात्। न च तत्र प्रत्ययो दृश्यते। ग्रन्थे च दर्शनात्। यत्र च दृश्यते ग्रन्थः

---

(सू. १००) येथें सर्व हा शब्द कशाकरितां घातला आहे?

(वा. १) सर्व हा शब्द अशाकरितां घातलेला आहे कीं प्रकृतीमध्यें ह्रस्व झाला पाहिजे.

(वा. २) आणि तो तशाकरितां घातलेला सर्व हा शब्द मद्र व वृजि या शब्दांकरितां उपयोगीं पडतो असें समजावें. उदा०—माद्रः भक्तिः अस्य असा एकवचनी शब्द घेतला, किंवा माद्रौ भक्तिः अस्य असा द्विवचनी शब्द घेतला तरी तेथें मद्रकः असेंच रूप झालें पाहिजे. तसेंच वार्ज्यः भक्तिः अस्य असा किंवा वार्ज्यौ भक्तिः अस्य असा विग्रह केला तरी वृजिकः असेंच रूप झालें पाहिजे.

(सू. १०१ वा. १) येथें प्रोक्तम् असें म्हटलें आहे तें व्यर्थ आहे.

काय कारण?

कारण असें कीं प्रोक्त असून त्या अर्थी प्रत्यय झालेला दृष्टीस पडत नाहीं. गांवोगांवीं काठक तसेंच कालापक त्या त्या गुरूनें शिष्यांना सांगितलें जातें; परंतु त्या त्या गुरूच्या नांवापुढें प्रत्यय झालेला दिसत नाहीं.

(वा. २) आणि प्रत्यय केलेला ज्या ठिकाणीं दिसतो तो तर ग्रंथ आहे; तेव्हां 'कृते ग्रन्थे' (४।३।११७) यानेंच तेथें प्रत्यय होईल.

तर मग वेद हा अर्थ असतांना प्रत्यय होण्याकरितां हें प्रकृत सूत्र पाहिजे. कारण, वेद हे कांहीं कोणीं केलेले नाहींत, ते नित्यच आहेत.

(वा. ३) वेदाकरितां हें प्रकृत सूत्र पाहिजे असें म्हणाल तर आतां दाखविली तीच अडचण पुनः आढळून येते. ती अशी कीं गांवोगांवीं काठक तसेंच कालापक हे त्या त्या गुरूनें शिष्यांना सांगितलें जातें, परंतु त्या त्या गुरूच्या नांवापुढें प्रत्यय झालेला दिसत नाहीं. शिवाय, ज्या ठिकाणीं प्रत्यय केलेला दिसतो तो तर ग्रंथ आहे. तेव्हां 'कृते ग्रन्थे' यानेंच तेथें प्रत्यय होईल.

---

१—(सू. १०१) प्रातिपदिकाहून 'तेन प्रोक्तम्' म्हणजे त्यानें सांगितलेलें या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—माथुरेण प्रोक्ता माथुरी वृत्तिः; माथुरानें सांगितलेली वृत्ति; ही माथुरानें केली नसली तरी चालेल.

स तत्र कृते ग्रन्थ इत्येव सिद्धम् । ननु चोक्तं न हि च्छन्दांसि क्रियन्ते नित्यानि च्छन्दांसीति । यद्यप्यर्थो नित्यो या त्वसौ वर्णानुपूर्वी सानित्या । तद्भेदाच्चैतद्भवति काठकं कालापकं मौदकं पैप्पलादकमिति॥

न तर्हीदानीमिदं वक्तव्यम् । वक्तव्यं च । किं प्रयोजनम् । यत्तेन प्रोक्तं न च तेन कृतम् । माधुरी वृत्तिः ।। यदि तर्ह्यस्य निबन्धनमस्तीदमेव वक्तव्यं तन्न वक्तव्यम् । तदप्यवश्यं वक्तव्यम् । यत्तेन कृतं न च तेन प्रोक्तम् । वाररुचं काव्यम् । जालूकाः श्लोकाः ॥

[ तित्तिरिवरतन्तुखण्डिकोखाच्छण् ॥ ४ । ३ । १०२ ॥

काश्यपकौशिकाभ्यामृषिभ्यां णिनिः ॥ ४ । ३ । १०३ ॥ ]

कलापिवैशम्पायनान्तेवासिभ्यश्च ॥ ४ । ३ । १०४ ॥

प्रत्यक्षकारिग्रहणम् ॥ १ ॥

प्रत्यक्षकारिग्रहणं कर्तव्यमन्तेवास्यन्तेवासिभ्यो मा भूदिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

---

पण वेद हे कांहीं कोणीं केलेले नाहींत, ते नित्यच आहेत असें आतांच सांगितलें आहे ना ?

जरी वेदाचा अर्थ नित्य आहे तरी क्रमशः अक्षरांची आनुपूर्वी ही अनित्य आहे. आणि ती आनुपूर्वी निरनिराळी होत असल्यामुळे काठक, कालापक, मौदक, पैप्पलादक वगैरे निरनिराळीं नांवें वेदभागांना मिळतात.

तर मग एकंदरीत हें प्रकृत सूत्र करूं नयेच कीं काय ?

तसें नाहीं. प्रकृत सूत्र केलेंच पाहिजे.

मग त्याचा उपयोग काय ?

जें ज्यानें फक्त सांगितलें, पण तें त्यानें केलें मात्र नाहीं, उदा०—माथुरी वृत्तिः, अशीं उदाहरणें साधण्याकरितां प्रकृत सूत्र केलें पाहिजे.

तर मग या कारणानें जर हें सूत्र करावें लागणार तर हेंच सूत्र असूं दे. 'कृते ग्रन्थे' हें सूत्र नको.

तसें नाहीं. तें देखील सूत्र अवश्य केलेंच पाहिजे. जें ज्यानें केलें पण तें त्यानें सांगितलें मात्र नाहीं अशा ग्रंथांकरितां त्याची जरूर आहे. उदा०—वाररुचं काव्यम्, जालूकाः श्लोकाः.

(सू. १०४ वा. १) कलापिन् आणि वैशंपायन यांचेजवळ साक्षात् अध्ययन करणारे जे शिष्य त्यांचेंच येथें ग्रहण होतें असें म्हणावें. कारण शिष्यांचे जे शिष्य तद्वाचक शब्दाहून हा णिनि प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

---

१—(सू. १०२) तित्तिरि, वरतन्तु, खण्डिक आणि उख या शब्दांहून 'प्रोक्त' या अर्थी छण् प्रत्यय होतो. उदा०—तित्तिरिणा प्रोक्तमधीयते तैत्तिरीयाः. या छण्—प्रत्ययान्ताहून पुढें केलेल्या (४।२।६६) प्रत्ययाचा लुक् (४।२।६४) झाला आहे.

१—(सू. १०३) काश्यप व कौशिक हे जे ऋषिवाचक शब्द त्यांहून 'प्रोक्त' या अर्थी णिनि प्रत्यय होतो. उदा०—काश्यपेन प्रोक्तं कल्पमधीयते काश्यपिनः (४।२।६६ वा. ६).

१—(सू. १०४) कलापीचे जे शिष्य आणि वैशंपायनाचे जे शिष्य तद्वाचक शब्दांहून 'प्रोक्त' या अर्थी णिनि प्रत्यय होतो. उदा०—हरिद्रुणा प्रोक्तमधीयते हारिद्रविणः, आलम्बिनः.

**कलापिखाडायनग्रहणं ज्ञापकं वैशम्पायनान्तेवासिषु प्रत्ययकारिग्रहणस्य ॥२॥**

यदयं कलापिखाडायनग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो नान्तेवास्यन्तेवासिभ्यो भवतीति । कथं कृत्वा ज्ञापकम् । वैशंपायनान्तेवासी कठः कठान्तेवासी खाडायनः । वैशंपायनान्तेवासी कलापी । यदि चान्तेवास्यन्तेवासिभ्यो ऽपि स्यात्कलापिखाडायनग्रहणमनर्थकं स्यात् । पश्यति त्वाचार्यो नान्तेवास्यन्तेवासिभ्यो भवतीति ततः कलापिखाडायनग्रहणं करोति ॥

**छन्दोग्रहणं चेतरथा ह्यतिप्रसङ्गः ॥ ३ ॥**

छन्दोग्रहणं च कर्तव्यम् । इतरथा ह्यतिप्रसङ्गः । इतरथा ह्यतिप्रसङ्गः स्यात् । इहापि प्रसज्येत । तित्तिरिणा प्रोक्ताः श्लोका इति ॥

## पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेषु ॥ ४ । ३ । १०५ ॥

**पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेषु याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधस्तुल्यकालत्वात् ॥१॥**

पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेष्वित्यत्र याज्ञवल्क्यादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । याज्ञवल्कानि ब्राह्मणानि । सौलभानीति । किं कारणम् । तुल्यकालत्वात् । एतान्यपि तुल्यकालानीति ॥

---

(वा. २) कारण, ह्या सूत्रामध्यें कलापि शब्द आणि शौनकादि गणामध्यें (४।३।१०६) खाडायन शब्द हे जे आचार्यांनीं घातले आहेत त्यांवरून त्यांनीं असें सुचविलें आहे कीं शिष्यांच्या शिष्यांचें येथें ग्रहण होत नाहीं.

हें ज्ञापक कसें जमतें ?

असें जमतें कीं कठ हा वैशंपायनाचा शिष्य आहे आणि त्या कठाचा शिष्य खाडायन आहे. तसेंच कलापी हा स्वतःच वैशंपायनाचा शिष्य आहे तेव्हां जर येथें वैशंपानाच्या शिष्यांच्या शिष्यांचें ग्रहण होईल तर कलापि शब्द आणि खाडायन शब्द हे व्यर्थ उच्चारले असें होईल. तेव्हां खालीनें आचार्यांचे मनांत असें दिसतें कीं शिष्यांच्या शिष्यांचें येथें ग्रहण होत नाहीं. आणि म्हणूनच ह्या प्रकृत सूत्रामध्यें कलापिन् शब्द घातला आहे व तसाच शौनकादि गणामध्यें खाडायन शब्द घातला आहे.

(वा. ३) हा जो येथें प्रोक्त अर्थीं प्रत्यय सांगितला आहे तो प्रोक्त अर्थ वेद असला पाहिजे असें म्हणावें; नाहीं तर दोष येईल. उदा०—तित्तिरिणा प्रोक्ताः श्लोकाः येथेंही प्रत्यय होऊं लागेल.

(सू. १०५ वा. १) या प्रकृत सूत्रानें याज्ञवल्क्य वगैरे शब्दांहून प्रोक्त या अर्थीं प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. उदा०—याज्ञवल्क्येन प्रोक्तानि ब्राह्मणानि याज्ञवल्कानि; तसेंच सौलभानि.

काय कारण ?

कारण असें कीं याज्ञवल्क्य वगैरेंनीं सांगितलेले ब्राह्मण ग्रंथ हेही जुन्या काळचेच आहेत.

---

१—(सू. १०५) प्रातिपदिकाहून 'तेन प्रोक्तम्' या अर्थीं णिनि प्रत्यय होतो. परंतु तो प्रोक्त अर्थ पूर्वकालच्या ऋषीनें सांगितलेला ब्राह्मण ग्रन्थ किंवा कल्प ग्रंथ असला पाहिजे. भाल्लविनः (४।२।६६); पैङ्गी कल्पः.

२—मागें (४।२।६६ वा. ४) पहा.

[ शौनकादिभ्यश्छन्दसि ॥ ४ । ३ । १०६ ॥

कठचरकाल्लुक् ॥ ४ । ३ । १०७ ।

कलापिनोऽण् ॥ ४ । ३ । १०८ ॥

छगलिनो ढिनुक् ॥ ४ । ३ । १०९ ॥

पाराशर्यशिलालिभ्यां भिक्षुनटसूत्रयोः ॥ ४ । ३ । ११० ॥

कर्मन्दकृशाश्वादिनिः ॥ ४ । ३ । १११ ॥

तेनैकदिक् ॥ ४ । ३ । ११२ ॥

तसिश्च ॥ ४ । ३ । ११३ ॥

उरसो यच्च ॥ ४ । ३ । ११४ ॥

उपज्ञाते ॥ ४ । ३ । ११५ ॥ ]

कृते ग्रन्थे ॥ ४ । ३ । ११६ ॥

कृते ग्रन्थे मक्षिकादिभ्योऽण् ॥ १ ॥

कृते ग्रन्थ इत्यत्र मक्षिकादिभ्योऽण्वक्तव्यः । माक्षिकाभिः कृतं माक्षिकम् ॥

---

(सू. ११६ वा. १ ) ह्या प्रकृत सूत्रामध्यें मक्षिका वगैरे शब्दांहून 'त्यांनीं केलेली वस्तु' या अर्थी अण् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० मक्षिकाभिः कृतं माक्षिकं मधु.

---

१–( सू. १०६ ) शौनकादि गणांतील शौनक वगैरे शब्दांहून ' प्रोक्त ' या अर्थी णिनि प्रत्यय होतो. उदा०—शौनकेन प्रोक्तमधीयते शौनकिनः.

१–( सू. १०७ ) कठ व चरक या शब्दांहून ' प्रोक्त वेद ' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो. उदा०–कठेन प्रोक्तमधीयते कठाः. येथें णिनि प्रत्ययाचा ( ४।३।१०४ ) लुक् झाला आहे. चरकाः येथे अण् प्रत्ययाचा लुक् झाला आहे.

१–( सू. १०८ ) कलापिन् शब्दाहून ' प्रोक्त ' या अर्थी अण् प्रत्यय होतो; णिनि ( ४।३।१०४ ) प्रत्यय होत नाहीं. उदा०—कलापिना प्रोक्तमधीयते कालापाः ( ६।४।१४४ वा. १ ).

१–( सू. १०९ ) छगलिन् शब्दाहून ' प्रोक्त ' या अर्थी ढिनुक् प्रत्यय होतो. उदा०–छगलिना प्रोक्तमधीयते छागलेयिनः

१–( सू. ११० ) पाराशर्य व शिलालिन् या शब्दांहून 'प्रोक्त' या अर्थी णिनि प्रत्यय होतो, परंतु तो प्रोक्त अर्थ क्रमानें भिक्षुसूत्रें व नटसूत्र असला पाहिजे. उदा०—पाराशर्येण प्रोक्तं भिक्षुसूत्रमधीयते पाराशरिणो भिक्षवः; शिलालिना प्रोक्तं नटसूत्रमधीयते शैलालिनो नटाः- हीं सूत्रें छन्दासारखींच समजलीं जातात. ( ४।३।६६ ):.

१–( सू. १११ ) कर्मन्द व कृशाश्व या शब्दांहून ' प्रोक्त' या अर्थी इनि प्रत्यय होतो, परंतु तो प्रोक्त अर्थ क्रमानें भिक्षुसूत्र व नटसूत्र असला पाहिजे. उदा०–कर्मन्दिनो भिक्षवः, कृशाश्विनो नटाः.

१–( सू. ११२ ) प्रातिपदिकाहून ' तेन एकदिक् ' म्हणजे 'त्याच्या दिशेमध्यें असलेला' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०–सुदाम्ना एकदिक् सौदामनी; सुदामन् पर्वत ज्या दिशेकडे आहे त्या दिशेकडे चमकणारी वीज.

१–( सू. ११३ ) पूर्व सूत्राच्या विषयामध्यें तसि प्रत्ययही होतो. उदा०–सुदामतः.

१–( सू. ११४ ) उरस् शब्दाहून ' तेन एकदिक् ' या अर्थी यत् व तस् हे प्रत्यय होतात. उदा०–उरसा एकदिक् उरस्यः, उरस्तः.

१–( सू. ११५ ) प्रातिपदिकाहून ' तेन उपज्ञातम् ' म्ह. त्यानें स्वतः जाणलेलें या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०--पाणिनिना उपज्ञातं पाणिनीयम् व्याकरणम्.

१–( सू. ११६ ) प्रातिपदिकाहून ' तेन कृतम् ' म्ह. त्यानें केलेलं या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात परंतु तो केलेला ग्रंथ असला पाहिजे. उदा०–वररुचिना कृताः वाररुचाः श्लोकाः.

तद्विशेषेभ्यश्च ॥ २ ॥

तद्विशेषेभ्यश्चाण्वक्तव्यः । सरघाभिः कृतं सारघम् गार्मुतम् पौत्तिकम् ॥ स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः ।

योगविभागात्सिद्धम् ॥ ३ ॥

योगविभागः करिष्यते । कृते ग्रन्थे । ततः संज्ञायाम् । संज्ञायां च तेन कृत इत्येतस्मिन्नर्थे यथाविहितं प्रत्ययो भवति। सरघाभिः कृतं सारघम् गार्मुतम् पौत्तिकम् । ततः कुलालादिभ्यो वुञ् । संज्ञायामित्येव ॥

[ संज्ञायाम् ॥ ४ । ३ । ११७ ॥

कुलालादिभ्यो वुञ् ॥ ४।३।११८॥

क्षुद्राभ्रमरवटरपादपादञ् ॥ ४ । ३ । ११९ ॥ ]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये चतुर्थस्याध्यायस्य तृतीये पादे प्रथममाह्निकम् ॥

---

( वा. २ ) मक्षिकाविशेषवाचक शब्दाहून तीत्यांनीं केलेली वस्तु या अर्थी अण् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०— सरघाभिः कृतं सारघम्; तसेंच गार्मुतम् व पौत्तिकम्.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

( वा. ३ ) कारण, योगविभाग केला म्हणजे हीं उदाहरणें सिद्ध होतील. योगविभाग असा करावा कीं ‘ कृते ग्रन्थे ’ या प्रकृत सूत्राच्या पुढें ‘ संज्ञायाम् ’ एवढेंच पहिलें सूत्र करावें. प्रातिपदिकाहून ‘ त्यानें केलेली वस्तु ’ या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात, परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा० सरघाभिः कृतम् सारघं मधु; तसेंच गार्मुतम् व पौत्तिकम्. त्याच्या पुढें ‘ कुलालादिभ्यो वुञ् ’ एवढेंच दुसरें सूत्र होईल. तेथें संज्ञायाम् याची अनुवृत्ति आहेच.

याप्रमाणें श्री भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्याच्या चवथ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

---

१–( सू. ११७ ) पूर्व सूत्रावरील भाष्य पहा.

१–( सू. ११८ ) कुलालादि गणांतील शब्दाहून ‘ त्यानें केलेलें ’ या अर्थी वुञ् प्रत्यय होतो. परंतु तो वुञ्-प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—कौलालकम्, वारुडकम्.

१–( सू. ११९ ) क्षुद्रा, भ्रमर, वटर आणि पादप या शब्दांहून ‘ त्यानें केलेलें ’ या अर्थी अञ् प्रत्यय होतो. परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०–क्षौद्रम्, भ्रामरम्, वाटरम्, पादपम्.

अ. ४ पा. ३ आ. १ समाप्त.

## तस्येदम् ॥ ४ । ३ । १२० ॥

**तस्येदमित्यसंनिहितेऽप्राप्तिरिदमः प्रत्यक्षवाचित्वात् ॥१॥**

तस्येदमित्यसंनिहिते ऽप्राप्तिः । किं कारणम् । इदमः प्रत्यक्षवाचित्वात् । इदमित्येतत्प्रत्यक्षे वर्तते तेनैव स्यात् तस्येदमिति तस्याद इति तस्य तदिति न स्यात्॥

**सिद्धं तु यद्योगा षष्ठी तत्र ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । यद्योगा षष्ठी प्रवर्तते तत्रेति वक्तव्यम् ॥

**अनन्तरादिषु च प्रतिषेधः ॥ ३ ॥**

अनन्तरादिषु च प्रतिषेधो वक्तव्यः । तस्यानन्तरः तस्य समीप इति ॥ किं यद्योगा षष्ठी प्रवर्तत इत्यतोऽनन्तरादिषु प्रतिषेधो वक्तव्यः । नेत्याह । सर्वथानन्तरादिषु प्रतिषेधो वक्तव्यः ॥

**सिद्धं तु परिगणनात् ॥ ४ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । परिगणनं कर्तव्यम् ॥

**स्वे ग्रामजनपदमनुष्येभ्यः ॥ ५ ॥**

स्वे ग्रामजनपदमनुष्येभ्य इति वक्तव्यम् । स्रौघ्नः माथुरः । ग्राम ॥ जनपद । आङ्गकः वाङ्गकः । जनपद ॥ मनुष्य । दैवदत्तः याज्ञदत्तः ।

**पत्त्राद्वाह्ये ॥ ६ ॥**

पत्त्राद्वाह्य इति वक्तव्यम् । आश्वम् औष्ट्रम् गार्दभम् ॥

**रथाद्रथाङ्गे ॥ ७ ॥**

---

(सू. १२० वा. १) 'तस्येदम्' यामुळें ज्या अर्थी प्रत्यय होणार तो अर्थ म्हणजे पदार्थ संनिहित नसेल तर त्या ठिकाणीं ह्या सूत्रानें प्रत्यय होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं इदम् शब्द हा प्रत्यक्ष वस्तूचा दर्शक आहे. त्यामुळें प्रत्यक्ष वस्तु असेल तेथेंच प्रत्यय होईल; दूरची वस्तु किंवा अप्रत्यक्ष वस्तु असेल तर तेथें प्रत्यय होणार नाहीं.

(वा. २) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं 'यद्योगा षष्ठी तत्र' असें सूत्र करावें. म्हणजे ज्याच्या योगीं षष्ठी होते त्या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात असा अर्थ होईल.

(वा. ३) अनन्तर वगैरे अर्थी हा प्रत्यय होत नाहीं असा निषेध सांगावा. म्हणजे उपगूच्या अनन्तर वस्तु अथवा उपगूच्या जवळची वस्तु या अर्थीं प्रत्यय होणार नाहीं.

पण काय हो, 'यद्योगा षष्ठी तत्र' असें सूत्र केलें असतां हा निषेध सांगितला पाहिजे असें आहे कीं काय ?

तसें कांहीं नाहीं. कसेंही सूत्र असो हा निषेध सांगितलाच पाहिजे.

(वा. ४) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

परिगणन करावें म्हणजे झालें. तें असें—

(वा. ५) ग्रामवाचक आणि जनपदवाचक शब्दांहून 'त्यांतील वस्तु' या अर्थीं आणि मनुष्यवाचक शब्दाहून 'त्याच्या मालकीची वस्तु' या अर्थीं अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा० स्रौघ्नः, माथुरः, आङ्गकः, वाङ्गकः, दैवदत्तः, याज्ञदत्तः.

(वा. ६) वाहनवाचक शब्दांहून 'वाहन नेण्याला योग्य वस्तु' या अर्थीं अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—आश्वम्, औष्ट्रम्, गार्दभम्.

---

१—(सू. १२०) प्रातिपदिकाहून 'तस्य इदम्' म्हणजे 'त्याचें हें' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—उपगोः इदम् औपगवम्, उपगूचें घर दार, द्रव्य वगैरे.

रथाद्रथाङ्गे इति वक्तव्यम् । आश्वरथम् औष्ट्ररथम् गार्दभरथम् ॥

**वहेस्तुरणिट् च ॥ ८ ॥**

वहेस्त्रन्तादण्वक्तव्य इट् च वक्तव्यः । संवोढुः स्वं सांवहित्रम् ॥

**अग्नीधः शरणे रञ्भं च ॥ ९ ॥**

अग्नीधः शरणे रञ्वक्तव्यो भसंज्ञा च वक्तव्या । अग्नीधः शरणमाग्नीध्रम् ॥

**समिधामाधाने षेण्यण् ॥ १० ॥**

समिधामाधाने षेण्यण्वक्तव्यः । समिधामाधानो मन्त्रः सामिधेन्यो मन्त्रः । सामिधेन्यृक् ॥

**चरणाद्धर्माम्नाययोः ॥ ११ ॥**

चरणाद्धर्माम्नाययोरिति वक्तव्यम् । कठानां धर्म आम्नायो वा काठकम् । कालापकम् मौदकम् पैप्पलादकमिति ॥

तत्तर्हीदं बहु वक्तव्यम् । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं तस्येदमित्यसंनिहितेऽप्राप्तिरिति । किमिदं भवान्प्रत्ययार्थमेवोपालभते न पुनः प्रकृत्यर्थमपि । यथैव हीदमित्येतत् प्रत्यक्षे वर्तत एवं तदित्येतत् परोक्षे वर्तते । तेनेहैव स्यात् तस्येदमिति अस्यामुष्येत्यत्र न स्यात् । अस्त्यत्र विशेषः । एकशेषनिर्दे-

---

(वा. ७) रथ 'शब्दाहून रथांतील भाग' या अर्थी अण् वगैरे प्रत्यय होतात. उदा० आश्वरथम्, औष्ट्ररथम्, गार्दभरथम्,

(वा. ८) तृ–प्रत्ययान्त वह् धातूहून 'त्याच्या मालकीची वस्तु' या अर्थी अण् प्रत्यय होतो आणि त्या तृ प्रत्ययाला इट् आगम होतो. उदा० संवोढुः स्वं सांवहित्रम्.

(वा. ९) अग्नीध् शब्दाहून 'त्यांचें शरण' या अर्थी रण् प्रत्यय होतो आणि अग्नीध् शब्दाला भ संज्ञा होते असें म्हणावें. उदा०—अग्नीधः शरणम् आग्नीध्रम्[१].

(वा. १०) समिध् शब्दाहून 'त्याचें आधान करण्याचा मंत्र' या अर्थी 'षेण्यण्' प्रत्यय होतो. उदा०–समिधाम् आधानः मन्त्रः सामिधेन्यः, सामिधेनी ऋक्.

(वा. ११) शाखावाचक शब्दांचा त्या शाखेचे लोक हा अर्थ घेतला असतां त्याहून त्यांचा धर्म किंवा त्यांचा वेद या अर्थी शैषिक प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० कठानां धर्मः आम्नायः वा काठकम्, कालापकम्, मौदकम्, पैप्पलादकम्. येथें शैषिक वुञ् प्रत्यय (४।३।१२६) झाला आहे.

तर मग हीं अशीं वरींच वचनें केलीं पाहिजेत. शिवाय 'तस्येदम्' हें सूत्र फिरवावें लागेलच.

तर मग मूळचें जसें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण मूळचेंच सूत्र असेल तर त्यांत इदम् शब्द घातला असल्यामुळें पदार्थ संनिहित नसेल त्या ठिकाणीं ह्या सूत्रानें प्रत्यय होणार नाहीं असा दोष दाखविला आहे ना?

काय पण तूं येथें सूत्रांतील इदम् शब्दामुळ प्रत्ययार्थीसंबंधानेंच फक्त आक्षेप घेतोस? तस्य या तद् शब्दामुळें प्रकृत्यर्थासंबंधानें आक्षेप कां बरें घेत नाहींस? जसा जवळ असलेल्या प्रत्यक्ष वस्तूलाच इदम् शब्द लागतो तसा परोक्ष वस्तूलाच तद् शब्द लागतो. तेव्हां ज्याची वस्तु आहे तो मालक अप्रत्यक्ष असेल तेथेंच प्रत्यय होईल. आणि जर तो संनिहित असेल किंवा प्रत्यक्ष असेल तर तेथें त्याहून प्रत्यय होणार नाहीं.

प्रकृत्यर्थासंबंधानें आक्षेप न घेण्याचें कारण तेथें विशेष आहे. तस्य हा निर्देश एकशेषानें बाध झाल्यामुळें जश्त्व (८।२।३९) होत नाहीं.

---

१—अग्नीध् म्हणजे अग्नीचें इन्धन करणारा होता नांवाचा ऋत्विज्, शरण म्ह. घर. भ संज्ञेनें पद संज्ञेचा

शोऽत्र भविष्यति। तस्य चास्य चामुष्य च तस्येति भवति। इहापि तदेकशेषनिर्देशो भविष्यति। तच्चादश्चेदं चेदमित्येव। यदप्युच्यते ऽनन्तरादिषु च प्रतिषेधो वक्तव्य इति न वक्तव्यः। अनभिधानादनन्तरादिषूत्पत्तिर्न भविष्यति ॥

[ रथाद्यत् ॥ ४ । ३ । १२१ ॥

पत्त्रपूर्वादञ् ॥ ४ । ३ । १२२ ॥

पत्त्राध्वर्युपरिषदश्च ॥४।३।१२३॥

हलसीराट्ठक् ॥ ४ । ३ । १२४ ॥ ]

द्वन्द्वाद्वुन् वैरमैथुनिकयोः ॥ ४ । ३ । १२५ ॥

वैरे देवासुरादिभ्यः प्रतिषेधः ॥ १ ॥

वैरे देवासुरादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः। दैवासुरम् राक्षोऽसुरम् ॥

[ गोत्रचरणाद्वुञ् ॥४।३।१२६॥ ]

संघाङ्कलक्षणेष्वञ्यञिञामण् ॥ ४ । ३ । १२७ ॥

संघादिषु घोषग्रहणम् ॥ १ ॥

संघादिषु घोषग्रहणं कर्तव्यम्। गार्गो

---

( १।२।७२ वा. ५ ) केला आहे. तस्य च अस्य च अमुष्य च तस्य असा हा तद् इदम् आणि अदस् या तीन शब्दांचा तस्य हा एकशेष आहे.

पण तसा तस्य हा एकशेष घेतला तर तच्च अदश्च इदं च इदम् असा तद् अदस् आणि इदम् या तीन शब्दांचा इदम् हाही एकशेषानें निर्देश केला आहे असें म्हणतां येईल.

आतां ' अनन्तर वगैरे अर्थी प्रत्यय होत नाहीं ' असा निषेध सांगितला पाहिजे (वा. ३) असें म्हटलें खरें; आहे पण तो निषेध सांगावयास नको. कारण अनभिधानास्तव अनन्तर वगैरे अर्थी तद्धित प्रत्यय होणार नाहीं.

( सू. १२५ वा. १ ) देवासुर वगैरे द्वंद्व समासांहून 'त्यांचें वैर' या अर्थी हा वुन् प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें. उदा०—देवासुरयोः इदम् दैवासुरम् वैरम्, राक्षोसुरम्. येथें वुन् प्रत्यय झाला नाहीं; अण् प्रत्ययच झाला आहे.

( सू. १२७ वा. १ ) संघ, अङ्क वगैरे शब्दांमध्यें घोष शब्दही अधिक घालावा. उदा०

---

१—( सू. १२१ ) रथ शब्दाहून ' तस्येदम् ' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—रथस्येदं रथ्यं चक्रम्.

१—(सू. १२२) ज्याच्या पूर्वी वाहन-वाचक शब्द आहे असा जो रथ शब्द तदन्त शब्दाहून ' तस्य इदम् ' या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०—अश्वरथस्य इदम् आश्वरथम् चक्रम्.

१—( सू. १२३ ) वाहन-वाचक शब्दाहून आणि अध्वर्यु व परिषद् या शब्दांहून 'तस्य इदम् या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०—अश्वस्येदम् आश्वम् वाह्यं वस्तु. आध्वर्यवम्, पारिषदम्.

१—( सू. १२४ ) हल व सीर या शब्दांहून ' तस्य इदम् ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो, उदा०—हालिकम्, सैरिकम्.

१—( सू. १२५ ) द्वंद्व समासाहून ' तस्य इदम् ' या अर्थी वुन् प्रत्यय होतो. परंतु इदम् म्हणून जो अर्थ घेतला असेल तो वैर किंवा मैथुनिका यांपैकीं पाहिजे. उदा०—काकोलूकिका, अत्रिभरद्वाजिका.

१—( सू. १२६ ) अपत्य-प्रत्ययान्त शब्द आणि शाखा—वाचक शब्द यांहून ' तस्येदम् ' या अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा०— औपगवकम्, काठकम् ( ४।३।१२० वा. ११ ).

१–( सू. १२७ ) अञ्-प्रत्ययान्त यञ्-प्रत्ययान्त आणि इञ्-प्रत्ययान्त जे शब्द त्यांहून ' तस्य इदम् ' या अर्थी अण् प्रत्यय होतो, परंतु येथें इदम् म्हणून जो अर्थ घेतला असेल तो संघ अंक किंवा लक्षण यांपैकीं असला पाहिजे. उदा०—बैदः संघः अङ्कः, बैदं लक्षणम्, गार्गः संबन्धः, दाक्षः संघः.

घोषः। वात्सो घोषः ॥

किमर्थो णकारः। वृद्ध्यर्थः। ञ्णितीति वृद्धिर्यथा स्यात्।

**संघादिषु प्रत्ययस्य णित्करणानर्थक्यं वृद्धत्वात्प्रातिपादकस्य ॥ २ ॥**

संघादिषु प्रत्ययस्य णित्करणमनर्थकम्। किं कारणम्। वृद्धत्वात् प्रातिपदिकस्य। वृद्धमेवैतत्प्रातिपदिकम् ॥

**लिङ्गपुंवद्भावप्रतिषेधार्थं तु ॥ ३ ॥**

लिङ्गपुंवद्भावप्रतिषेधार्थं तु णकारः कर्तव्यः। लिङ्गार्थम्। बैदी। पुंवद्भावप्रतिषेधार्थम्। बैदी स्थूणास्य बैदीस्थूणः। वृद्धिनिमित्तस्येति पुंवद्भावप्रतिषेधो यथा स्यात् ॥

**[ शाकलाद्वा ॥ ४ । ३ । १२८ ॥ छन्दोगौक्थिकयाज्ञिकबह्वृचनटाञ्ञ्यः ॥ ४ । ३ । १२९ ॥ न दण्डमाणवान्तेवासिषु ॥ ४ । ३ । १३० ॥ ]**

**रैवतिकादिभ्यश्छः ॥ ४।३।१३१ ॥**

**कौपिञ्जलहास्तिपदादण् ॥ १ ॥**

कौपिञ्जलहास्तिपदादण्वक्तव्यः। कौपिञ्जलाः हास्तिपदाः ॥

**आथर्वणिकस्येकलोपश्च ॥ २ ॥**

आथर्वणिकस्येकलोपश्चाण्च वक्तव्यः। आथर्वणो धर्मः। आथर्वण आम्नायः ॥

---

गार्ग्यस्य अयम् गार्गः घोषः, वात्सः घोषः

ह्या प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या अण् प्रत्ययाला णकार कशाकरितां जोडला आहे ?

वृद्धीकरितां जोडला आहे. कारण ञित् किंवा णित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेली वृद्धि ( ७।२।११७ ) झाली पाहिजे.

( वा. २ ) संघ या अर्थी सांगितलेल्या अण् प्रत्ययाचा इत्संज्ञक णकार व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें की येथें मूळचें प्रातिपदिक वृद्धच आहे.

( वा. ३ ) स्त्रीलिंगी ङीप् प्रत्यय ( ४।१।१५ ) होण्याकरितां आणि पुंवद्भावाचा निषेध होण्याकरितां णकार केला पाहिजे. बैदी येथें स्त्रीलिंगी ङीप् होतो. आणि बैदी स्थूणा अस्य बैदीस्थूणः या बहुव्रीहि समासामध्यें बैदी या पूर्वपदाला ‘ वृद्धिनिमित्तस्य० ’ (६।३।३९) यानें पुंवद्भावाचा निषेध झाला पाहिजे.

( सू. १३१ वा. १ ) कौपिञ्जल व हास्तिपद या शब्दांहून ‘तस्येदम्’ या अर्थी वुञ् प्रत्ययाचा अपवाद अण् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० कौपिञ्जलाः, हास्तिपदाः.

( वा. २ ) आथर्वणिक शब्दाहून ‘ तस्येदम् ’ या अर्थी अण् प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाबरोबर आथर्वणिक शब्दांतील इक याचा लोप होतो. उदा० आथर्वणिकस्यायम्

---

१—( सू. १२८ ) शाकल शब्दाहून ‘तस्येदम्’ या अर्थी अण् प्रत्यय विकल्पानें होतो, परंतु तो इदम् म्हणून घेतलेला अर्थ संघ वगैरेंपैकीं असला पाहिजे. उदा०—शाकलेन प्रोक्तमधीयते शाकलाः, शाकलानामयं शाकलः, शाकलकः संघः.

१—( सू. १२९ ) छन्दोग, औक्थिक, याज्ञिक, बह्वृच आणि नट या शब्दांहून ‘ तस्येदम् ’ या अर्थी ञ्य प्रत्यय होतो. उदा०—छन्दोगानाम् अयं छान्दोग्यः (धर्म किंवा आम्नाय हे येथें अर्थ आहेत).

१—( सू. १३० ) अपत्य प्रत्ययान्ताहून ‘तस्येदम्’ या अर्थी वुञ् प्रत्यय होत नाही. परंतु इदम् म्हणून घेतलेला अर्थ जर दण्डधारी मनुष्य किंवा शिष्य असेल तर. उदा०—गौकक्ष्यस्य इमे गौकक्षाः ( दंडधारी मनुष्य, किंवा शिष्य या अर्थी ).

१— ( सू. १३१ ) रैवतिक वगैरे शब्दांहून ‘ तस्येदम् ’ या अर्थी छ प्रत्यय होतो. वुञ् प्रत्ययाचा (४।३।१२६ ) हा अपवाद आहे. उदा०—रैवतिकस्यायम् रैवतिकीयः. रेवती शब्दाहून ठक् प्रत्यय (४।१।१४६) करून रैवतिक शब्द सिद्ध झाला आहे.

इदमाथर्वणार्थमाथर्वणिकार्थं च चतुर्ग्रहणं क्रियते। वसन्तादिष्वथर्वन्शब्द आथर्वणशब्दश्च पठ्यते। षष्ठाध्याये प्रकृतिभावार्थं ग्रहणं क्रियते। इदं चतुर्थमिकलोपार्थम्। द्विर्ग्रहणं शक्यमकर्तुम्। कथम्। तेन प्रोक्तम् [ ४. ३. १०१ ] इति प्रकृत्यर्षिभ्यो लुग्वक्तव्यो वासिष्ठोऽनुवाकः विश्वामित्रोऽनुवाक इत्येवमर्थम्। ततो वक्तव्यमथर्वणो वेति। तेन सिद्धमथर्वेत्याथर्वण इति च। अथ वसन्तादिष्वाथर्वणशब्दः पठितव्यः। तत्र नैवार्थः प्रकृतिभावार्थेन नापीकलोपार्थेन ॥ यदि वसन्तादिष्वाथर्वणशब्दः पठ्यते ऽथर्वाणमधीत आथर्वणिक इति न सिध्यति। नैष दोषः। इहास्माभिस्त्रैशब्द्यं साध्यम्। तत्र द्वयोः शब्दयोः समानार्थयोरेकेन विग्रहोऽपरस्मादुत्पत्तिर्भविष्यत्यविरविकन्यायेन। तद्यथा अवेर्मांसमिति विगृह्य अविकशब्दादुत्पत्तिर्भवति आविकमिति। एवमाथर्वणमधीत इति विगृह्याथर्वणिक इति भविष्यत्यथ-

---

आथर्वणः धर्मः आम्नायो वा.

येथें आथर्वण आणि आथर्वणिक हे दोन शब्द साधण्याकरितां चार ठिकाणीं निरनिराळे शब्द उच्चारले आहेत. वसन्तादि गणामध्यें ( ४।२।६३ ) अथर्वन् आणि आथर्वण शब्द उच्चारले आहेत, सहाव्या अध्यायामध्यें आथर्वणिकः ( ६।४।१७४ ) असा शब्द अथर्वन् शब्दाहून ठक् प्रत्यय ( ४।२।६३ ) केला असतां प्रकृतिभावाकरितां उच्चारला आहे; आणि येथें चवथ्या वेळीं ' आथर्वणिकस्य ' असा शब्द इक याचा लोप होण्याकरितां उच्चारला आहे. त्यांत दोन ठिकाणचें उच्चारण कमी करितां येईल.

तें कसें ?

असें कीं, ' तेन प्रोक्तम् ' (४।३।१०१) या प्रकरणामध्यें वसिष्ठेन प्रोक्तः अनुवाकः वासिष्ठः, विश्वामित्रेण प्रोक्तः अनुवाकः विश्वामित्रः हीं उदाहरणें साधण्याकरितां ' ऋषिभ्यो लुग्वक्तव्यः ' असें ऋषिवाचक शब्दाहून प्रोक्त अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो या अर्थाचें वचन केलेंच पाहिजे. त्याच्या पुढें ' अथर्वणो वा ' असें अथर्वन् शब्दाहून प्रोक्त अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् विकल्पानें होतो या अर्थाचें वचन करावें. त्यानें अथर्वणा प्रोक्तः अथर्वा आथर्वणः अशीं दोन रूपें वेदविशेष या अर्थी सिद्ध होतील. आतां वसन्तादि गणामध्यें फक्त आथर्वण असा एकच शब्द घालावा. तेव्हां प्रकृतिभावाकरितां सहाव्या अध्यायामध्यें आथर्वणिक असें निपातन करावयास नको. आणि इक याच्या लोपाकरितां आथर्वणिकस्य असें कांहीं सांगावयास नको.

परंतु जर वसन्तादि गणामध्यें आथर्वण शब्द एकटाच घातला तर अथर्वन् शब्द तेथें नसल्यामुळें अथर्वाणमधीते आथर्वणिकः असें अथर्वन् शब्दाहून ठक् प्रत्यय करून प्रकृतिभावानें रूप होतें तें होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण, येथें आम्हाला एकंदर तीन शब्दांचे प्रयोग साधावयाचे आहेत. तेव्हां सारख्या अर्थाच्या दोन शब्दांपैकीं एका शब्दानें फक्त विग्रह दाखवावयाचा आणि त्या अर्थी वृत्ति दुसऱ्या शब्दाची अव्यविकन्यायानें होते. जसा अवेः मांसम् असा अवि या शब्दानें फक्त विग्रह दाखवून त्या अर्थी तद्धितप्रत्यय अविक शब्दाहूनच होतो, आणि आविकम् असें रूप होतें तशा रीतीनें येथें अथर्वाणमधीते असा अथर्वन् शब्दानें फक्त विग्रहच दाखवावयाचा; त्या अर्थी तद्धित प्रत्यय ठक् ( ४।२।६३ ) हा आथर्वण शब्दाहूनच होऊन आथर्वणिकः असें रूप होईल. अथर्वाणमधीते असा विग्रह केला असतां तेथें

कोणमधीत इति विगृह्य वाक्यमेव । तत्राभिसंबन्धमात्रं कर्तव्यमाथर्वणिकानामिदमिति न चेदानीमन्यदाथर्वणिकानां स्वं भवितुमर्हत्यन्यदतो धर्माद्वाम्नायाद्वा ॥

[ कौपिञ्जलहास्तिपदादण् ॥ ४ । ३ । १३२ ॥

आथर्वणिकस्येकलोपश्च ॥ ४ । ३ । १३३ ॥ ]

तस्य विकारः ॥ ४ । ३ । १३४ ॥

तस्येति वर्तमाने पुनस्तस्यग्रहणं किमर्थम् ।

तस्यप्रकरणे तस्यपुनर्वचनं शैषिकनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥

तस्यप्रकरणे तस्येति पुनर्वचनं क्रियते शैषिकनिवृत्त्यर्थम् । शैषिका निवर्त्येरन्निति ॥ कथं च प्राप्नुवन्ति ।

तस्येदंवचनात्प्रसङ्गः ॥ २ ॥

तस्येदंविशेषा ह्येते ऽपत्यं समूहो विकारो निवास इति ॥

---

अथर्वन् शब्दाहून तद्धित प्रत्यय कोणताच न होतां तसें वाक्यच राहील. आतां आथर्वणिकानाम् इदम् असा आथर्वणि शब्दाहून अण् प्रत्यय केला असतां त्या धर्म व आम्नाय यांच्याशीं आथर्वणिकांचा संबंध जोडावयाचा परंतु तेथें आथर्वणिकानाम् इदम या इदम् शब्दानें दाखविली जाणारी वस्तु कांहीं त्यांचा धर्म किंवा आम्नाय यांशिवाय निराळी दाखवितां येत नाहीं.

(सू. १३४) तस्येदम् (४।३।१२०) येथून तस्य या पदाची अनुवृत्ति येत असतांना पुनः येथें तस्य असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा. १) तस्य असें मागून अनुवृत्तीनें येत असतांना पुनः जें येथें तस्य असें म्हटलें आहे तें शैषिक प्रत्ययांची निवृत्ति होण्याकरितां म्हटलें आहे. त्यामुळें विकार या अर्थीं शैषिक प्रत्यय होत नाहींत.

पण विकार या अर्थीं शैषिक प्रत्ययांची प्राप्ति तरी कशी बरें येते ?

(वा. २) तस्येदम् हा जो शैषिक अर्थ त्याचेच अपत्य, समूह, विकार, निवास वगैरे विशेष होत.

---

२—अथर्वन्, आथर्वण आणि आथर्वणिक या तीन शब्दांपैकीं अथर्वन् हा मूळ शब्द ऋषिविशेषवाचक आहे. त्याहून प्रोक्त अर्थीं केलेल्या प्रत्ययाचा लुक् केल्यानंतर अथर्वन् हा वेदवाचक शब्द होतो. त्याचा वसन्तादि गणांतील पाठ कमी केल्यामुळें त्याहून ठक् प्रत्ययच होत नाहीं; तेव्हां प्रकृतिभावाकरितां सहाव्या अध्यायामध्यें निपातन नको. आथर्वणिकन्यायानें अथर्वन् शब्दाहून अधीते या अर्थीं अण् प्रत्यय होत नाहीं. लुक् केला नाहीं तेव्हां आथर्वण हा शब्द अथर्वणा प्रोक्तं शास्त्रम् या अर्थीं सिद्ध होतो. तें शास्त्र म्हणजे त्यांचा धर्म किंवा आम्नाय होय. तेव्हां आतां त्या अर्थीं आथर्वणिकस्य इदम् असा अण् प्रत्यय करून आणि इक याचा लोप करून आथर्वण शब्द साधला नाहीं तरी हरकत नाहीं. तसा साधला म्हणजे त्या धर्माशीं व आम्नायाशीं आथर्वणिकांचा संबंध फक्त दाखविला जातो, त्यांत कांहीं विशेष नाहीं. त्या शब्दाहून ठक् प्रत्यय करून अकाराचा लोप (६।४।१४८) होतो, त्याच्या असिद्धत्वास्तव (६।४।२२) टिलोप (६।४।१४४) होत नाहीं. तेव्हां आथर्वणिक शब्द सिद्ध होतो.

१—(सू. १३२) मागील सूत्र १३१ वा. १ पहा.

१—(सू. १३३) मागील सूत्र १३१ वा. २ पहा.

१—(सू. १३४) प्रातिपदिकाहून 'तस्य विकारः' म्ह. त्याचा विकार या अर्थीं अण् प्रत्यय होतो. उदा०—मृत्तिकाया विकारः मार्तिकः.

२-तेव्हां विकार अर्थ असेल तेथें 'तस्येदम्' हा सामान्य अर्थ असणारच. म्हणून त्या अर्थीं शैषिक प्रत्यय होतात.

किमर्थमिदमुच्यते ।

बाधनार्थं कृतं भवेत् ।

ये तस्य बाधकास्तद्बाधनार्थम् ॥ कथं पुनरशैषिकः शैषिकं बाधते ।

उत्सर्गः शेष एवासौ

यो ह्युत्सर्गः सोऽपि शेष एव ॥ के पुनः शैषिकाणां विकारावयवयोः प्राप्नुवन्ति यावता सर्वमपवादैर्व्याप्तम् । इह न किंचिदुच्यते हलसीराट्ठक् [ ४. ३. १२४ ] इति ॥ कथं पुनरिच्छतोऽप्यपवादः प्राप्नुवञ्शक्यो बाधितुम् । तस्यग्रहणसामर्थ्यात् ॥ किमिदं भवानध्याहृत्य तस्यग्रहणस्यैव प्रयोजनमाह न पुनः सर्वस्यैव योगस्य । अवश्यमुत्तरार्थोऽर्थनिर्देशः

---

पण 'तस्य विकारः' हें सूत्रच मुळीं कशाकरितां बरें केलें आहे?

त्या अण् प्रत्ययाचे ( ४।३।१२० ) जे घ ख वगैरे बाधक प्रत्यय ( ४।२।९३ ) त्यांचा बाध होऊन विकार या अर्थी अण् प्रत्यय झाला पाहिजे याकरितां हें सूत्र केलें आहे.

पण हा विकार अर्थी सांगितलेला अशैषिक प्रत्यय त्या शैषिक प्रत्ययांचा बाध कसा करील?

तस्येदम् हा जो सामान्य अर्थ तो शेषच आहे.

पण हें सूत्र केलें नाहीं तर विकार व अवयव अर्थ असतांना तेथें 'तस्येदम्' हा सामान्य अर्थ शेष घेऊन असे कोणते बरें अण् प्रत्ययाचे बाधक प्रत्यय होऊं लागतील? कारण अण् प्रत्ययाचे बाधक असे शैषिक प्रत्यय ज्या ज्या ठिकाणीं प्राप्त होतात त्या त्या सर्व ठिकाणीं पुढील सूत्रांनीं त्यांचे अपवाद प्रत्यय विकार व अवयव या अर्थीं प्राप्त होतात; तेव्हां त्यांनीं सर्व व्यापलेंच आहे.

असें नाहीं. 'हलसीराट्ठक्' ( ४।३।१२४ ) हा जो अण् प्रत्ययाचा बाधक ठक् प्रत्यय सांगितला आहे तेथें त्या हल व सीर शब्दांहून येथें कोणीही पुढें सांगितलेला अपवाद प्रत्यय येत नाहीं.

पण विकार व अवयव अर्थ असतांना हल व सीर शब्दांहून अण् प्रत्यय पाहिजे असला तरी अण् प्रत्ययाचा अपवाद म्हणून मुद्दाम जर ठक् प्रत्यय सांगितला आहे तर तेथें त्या ठक् प्रत्ययाचा बाध करून अण् प्रत्यय व्हावा कसा?

तस्य ग्रहणाच्या सामर्थ्यानें हें सर्व साधतें.

पण कां बरें येथें तस्य यावरच ज्यास्त भिस्त ठेवून त्याचा उपयोग सांगतां? सर्व सूत्राचाच हा उपयोग आहे असें कां म्हणत नाहीं?

तसें न म्हणण्याचें कारण हें कीं ' विकार ' हा अर्थाचा निर्देश पुढें अनुवृत्त होण्याकरितां

---

३–येथें तस्य हें पद घालण्यानें ' शेषे ' याची निवृत्ति झाली आहे. तेव्हां विकार हा अर्थ शेष नसल्यामुळें त्या अर्थी घ ख वगैरे प्रत्ययांची प्राप्तीच येत नाहीं.

४–'तस्य विकारः' हें सूत्र केलें नाहीं तर विकार अर्थ असेल तेथें ' तस्येदम् ' या सामान्य अर्थीच प्रत्यय होणार आहे.

५–तेव्हां हें प्रकृत सूत्र केलें नाहीं, तर हल व सीर या शब्दांहून विकार व अवयव अर्थ असतांना शैषिक ठक् प्रत्यय होऊं लागेल. तेव्हां येथें अण् प्रत्यय होण्याकरितां हें सूत्र केलें पाहिजे. हें सूत्र केलें म्हणजे विकार व अवयव हे अर्थ शेष नव्हेत. म्हणून ठक् प्रत्ययाची प्राप्ति येत नाहीं. आणि प्रकृत सूत्रानें अण् होतो.

६–तस्य ग्रहणानें 'शेष' याची निवृत्ति झाली आहे (वा.१). विकार अवयव हे अर्थ ' शेष ' नसल्यामुळें ठक् प्रत्ययाची प्राप्तीच येत नाहीं.

कर्तव्यः । समर्थविभक्तिरपि तर्ह्यवश्यमुत्तरार्था निर्देष्टव्या । प्रकृता समर्थविभक्तिरनुवर्तते तस्येदमिति ॥

न वा संप्रत्ययः ॥ ३ ॥

न वा संप्रत्यय इयता सूत्रेण शैषिकाणां निवृत्तेः । न हि काको वाश्यत इत्येवाधिकारा निवर्तन्ते । यदि खल्वपि विकारावयवयोः शैषिका नेष्यन्ते महता सूत्रेण निवृत्तिर्वक्तव्या ॥

अवयवे चाप्राण्योषधिवृक्षेभ्यो ऽनिवृत्तिः ॥ ४ ॥

अवयवे चाप्राण्योषधिवृक्षेभ्यो ऽनिवृत्तिरिष्टा तत्र च निवृत्तिः प्राप्नोति । पाटलिपुत्रकाः प्रासादाः । पाटलिपुत्रकाः प्राकारा इति ॥

अण्मयटोश्च विप्रतिषेधानुपपत्तिर्मयडुत्सर्गात् ॥ ५ ॥

अण्मयटोश्च विप्रतिषेधो नोपपद्यते । पठिष्यति हि विप्रतिषेधमणो वृद्धान्मयडिति स विप्रतिषेधो नोपपद्यते । किं कारणम् । मयडुत्सर्गात् । निवृत्तेषु हि शैषिकेषु वृद्धान्मयडुत्सर्गस्तस्याणपवाद उत्सर्गापवादयोश्चायुक्तो विप्रतिषेधः ॥

---

केला पाहिजे.

पण त्या विकार या अर्थाशीं षष्ठी विभक्तीनें संबंध दाखविण्याकरितां तस्य या पदाचीही अनुवृत्ति पुढें झालीच पाहिजे ना ?

त्याकरितां नको. कारण, मागून 'तस्येदम्' ( ४।३।१२० ) येथून तस्य हें षष्ठयन्त पद अनुवृत्त होत आहेच.

(वा. ३) पण 'तस्य' पद घालून सूत्र केलें म्हणून तेवढयानें विकार व अवयव या अर्थी शैषिक प्रत्ययाची निवृत्ति होते हा अर्थ समजतां येणार नाहीं. कारण त्यांचा तस्य ग्रहणाशीं कांहींच संबंध दिसत नाही. कावळा ओरडतो म्हणून कांहीं त्यानें अधिकारांची निवृत्ति होत नाहीं. खरोखरच जर विकार व अवयव या अर्थी शैषिक प्रत्यय जरूर नसतील तर त्याकरितां मोठें सूत्र करूनच त्यांची निवृत्ति केली पाहिजे.

( वा. ४ ) प्राणी, ओषधि व वृक्ष यांशिवाय इतर शब्दांहून अवयव या अर्थी शैषिक प्रत्ययाची निवृत्ति न झाली पाहिजे ती निवृत्ति होऊं लागेल. उदा० पाटलिपुत्रकाः प्रासादाः, पाटलिपुत्रकाः प्राकाराः;

( वा. ५ ) तसेंच अण् ( ४।३।१३७ ) आणि मयट् ( ४।३।१४४ ) या दोहोंमध्यें ' अणो वृद्धान्मयट् ' ( ४।३।१५६ वा. २ ) असा जो विप्रतिषेध सांगितला आहे तो जुळत नाही.

काय कारण ?

कारण असें की मयट् प्रत्यय हा उत्सर्गच होतो. विकार या अर्थीं शैषिक प्रत्यय प्राप्त न झाले तर वृद्धसंज्ञक शब्दाहून सांगितलेला मयट् प्रत्यय ( ४।३।१४४ ) हा वृद्धाच्छः ( ४।२।११४ ) या शैषिक छ प्रत्ययाचा अपवाद होत नसल्यामुळें तो उत्सर्गच होणार आणि अण् प्रत्यय (४।३।१३७) हा त्याचा अपवादच होणार; व उत्सर्ग आणि अपवाद यांची बरोबरी नसल्यामुळें त्यांमध्यें विप्रतिषेध जमत नाहीं.

---

७—पाटलिपुत्र शब्दाहून त्याचे अवयव या अर्थी 'रोपधेतोः प्राचाम्' ( ४।२।१२३ ) यानें शैषिक वुञ् प्रत्यय होत असतो. जर अवयव हा अर्थ शेष समजला नाहीं तर तो होणार नाहीं. याकरितां येथें शेष याची अनुवृत्ति आणली पाहिजे असा अभिप्राय आहे.

८—कारण, तस्य विकारः यानें सामान्यतः सांगितलेल्या अण् प्रत्ययाचा बाध करून वृद्धशब्दस्थलीं मयट् येतो आणि अवृद्ध शब्दस्थलीं अण् येतो. तेव्हां त्या दोघांचाहीं ( ४।३।१३७ ) हा प्रत्यय अपवाद होणार आहे.

**अनुवृत्तौ हि छोत्सर्गापवाद-विप्रतिषेधान्मयट् ॥ ६ ॥**

अनुवर्तमानेषु हि शैषिकेषु वृद्धाच्छ उत्सर्गस्तस्याण्मयटावपवादौ । अपवादविप्रतिषेधान्मयड्भविष्यति ॥

यत्तावदुच्यते न वा संप्रत्यय इयता सूत्रेण शैषिकाणां निवृत्तेरिति संप्रत्यय एव । न ह्यत्राण्दुर्लभः । सिद्धोऽत्राणतस्येदमित्येव । सोऽयं पुनस्तस्यग्रहणेन तस्य सापवादस्याणः प्रसङ्ग इम निरपवादकमणं प्रतिपादयति । तत्र ये तावद् द्वितीयास्तानयमपवादत्वाद् बाधिष्यते ये तृतीयास्तान्परत्वाद्ये चतुर्थास्तत्र केचित्पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन् बाधन्त इत्येवमिमं न

---

(वा. ६) विकार या अर्थीही शैषिक प्रत्यय होतात असें म्हटलें म्हणजे मात्र वृद्धसंज्ञक शब्दाहून सांगितलेला छ प्रत्यय (४।२।११४) हा उत्सर्ग होणार, आणि अण् व मयट् हे दोन्ही प्रत्यय त्या छ प्रत्ययाचे अपवाद होणार. तेव्हां त्या दोन्ही अपवादांमध्यें विप्रतिषेध संभवतो म्हणून तेथें विप्रतिषेधानें मयट् होईल.

आतां येथें पूर्वी सांगितलेले शैषिक प्रत्यय विकार या अर्थी होत नाहींत ही गोष्ट तस्य विकारः एवढ्या सूत्रानें समजली जात नाहीं असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. तेवढ्या सूत्रानेंच ती गोष्ट सिद्ध होते. ती अशी—हें सूत्र केलें नाहीं तरी विकार या अर्थी अण् प्रत्यय होणार नाहीं असें नाहीं. त्या अर्थी तस्येदम् या सूत्रानेंच अण् प्रत्यय सिद्ध आहे. असें असतां पुनः येथें जो तस्य विकारः असें सूत्र करून अण् प्रत्यय सांगितला आहे त्याचा हेतु इतकाच की तस्येदम् यानें सांगितलेल्या अण् प्रत्ययाचे जे अपवाद आहेत ते या अण् प्रत्ययाला नाहींत. तेव्हां हे विकार व अवयव अर्थी सांगितलेले अण् वगैरे प्रत्यय ज्या ज्या शब्दांहून प्राप्त होतात त्या त्या सर्वच ठिकाणीं पूर्वीच्या शैषिक प्रत्ययाचा ते बाध करतात. त्यांपैकीं ज्या ठिकाणीं प्रथमतः प्राप्त झालेल्या तस्येदम् या सामान्य अण् प्रत्ययाचा अपवाद म्हणून दुसऱ्यानदां जे शैषिक प्रत्यय प्राप्त होतील त्यांचा हा अण् प्रत्यय अपवादत्वास्तव बाध करील. तसेंच ज्या ठिकाणीं त्या दुसऱ्यानदां प्राप्त झालेल्या शैषिक प्रत्ययांचा बाध करून तिसऱ्यानदां शैषिक प्रत्यय प्राप्त होतील त्यांचा हे विकार व अवयव या अर्थी सांगितलेले प्रत्यय परत्वास्तव बाध करतील. तसेंच, ज्या ठिकाणीं तिसऱ्यानदां प्राप्त झालेल्या शैषिक प्रत्ययांचा बाध करून चवथ्यानदां शैषिक प्रत्यय प्राप्त होतील त्यांपैकीं कांहीं प्रत्यय 'पूर्वी पठित अपवाद हे जवळच्या विधीचा बाध करतात दूरच्या विधीचा बाध करीत नाहींत' या न्यायानें या विकार व अवयव या अर्थी सांगितलेल्या दूरच्या प्रत्ययांचा बाध करणार

---

९— येथून भाष्यकार सिद्धांत सांगत आहेत.

१०—हलसीराठक् इत्यादि सूत्रांनीं सांगितलेले.

११—जसें वृजींनां विकारः वार्जे. येथें प्रथमतः 'तस्येदम्' हा अण् येतो, त्याचा बाध करून दुसऱ्यानदां 'जनपदवदपि' (४।२।१२५) हा वुञ् प्राप्त होतो त्याचा बाध करून तिसऱ्यानदां 'मद्रवृज्योः कन्' (४।२।१३१) हा कन् प्राप्त होतो त्याप्रमाणें.

१२—जसें त्रिगर्तानां विकारः त्रैगर्तः येथें प्रथमतः 'तस्येदम्' हा अण्, त्याचा बाध करून दुसऱ्यानदां 'जनपद०' यानें वुञ् (४।२।१२४) व त्याचा बाध करून तिसऱ्यानदां प्राप्त झालेला गर्त-उत्तरपदक शब्दाहून सांगितलेला छ प्रत्यय (४।२।१२६) व त्याचा बाध करून चवथ्यानदां प्राप्त झालेला जनपदावधि वुञ् (४।२।१२४) प्राप्त होतो त्याप्रमाणें.

बाधिष्यन्ते केचिन्मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन्बाधन्त इति । एतावन्तश्चैते स्युर्यदुत द्वितीयास्तृतीयाश्चतुर्थो वा । न पञ्चमाः सन्ति न षष्ठाः ॥ यदप्युच्यतेऽवयवे चाप्राण्योषधिवृक्षेभ्योऽनिवृत्तिरिति प्राण्योषधिवृक्षेभ्यो निवृत्तिरुच्यते तत्र कः प्रसङ्गो यदप्राण्योषधिवृक्षेभ्यो निवृत्तिः स्यात् ॥ यदप्युच्यतेऽण्मयटोश्च विप्रतिषेधानुपपत्तिर्मयडुत्सर्गादिति मा भूद्विप्रतिषेधः ॥ पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्त इत्येवमणवं बाधिष्यते मयटं न बाधिष्यते ॥

## अवयवे च प्राण्योषधिवृक्षेभ्यः ॥ ४ । ३ । १३५ ॥

किमर्थं विकारावयवयोर्युगपदधिकारः।

विकारावयवयोरुक्तम् ॥ १ ॥

किमुक्तम् । तत्र तावदुक्तं भवव्याख्यानयोर्युगपदधिकारोऽपवादविधानार्थः कृतनिर्देशौ हि ताविति । इहापि विकारावयवयोर्युगपदधिकारोऽपवादविधानार्थः कृत-

---

नाहींत आणि कांहीं प्रत्यय 'मध्यें पठित अपवाद हे पूर्वींच्या विधीचा बाध करतात पुढील विधीचा बाध करीत नाहींत' या न्यायानें ह्या विकार व अवयव या अर्थी सांगितलेल्या प्रत्ययांचा बाध करणार नाहींत; तेव्हां तेथेंही हेच होतील. आतां शैषिक प्रत्यय हे तर मोजक्या प्रकारचेच आहेत म्हणजे कांहीं दुसऱ्यानदां, कांहीं तिसऱ्यानदां, व कांहीं चवथ्यानदां प्राप्त होणार आहेत. पाचव्यानदां येणारे किंवा सहाव्यनदां येणारे असे कोणीही नाहीत. आतां [१]प्राणी ओषधि व वृक्ष यांशिवाय इतर ठिकाणीं अवयव या अर्थी शैषिक प्रत्ययांची निवृत्ति होऊं लागेल ' असें जें म्हटलें आहे (वा. ४) त्यासंबंधानें इतकेंच सांगावयाचें कीं येथें शैषिक प्रत्ययाचा बाधक अण् प्रत्यय फक्त प्राणी, ओषधि व वृक्ष यांहून सांगितला आहे. तेव्हां प्राणी ओषधि व वृक्ष यांशिवाय इतर ठिकाणीं त्या अण् प्रत्ययाचा प्रसंग काय कीं ज्याच्या योगानें तेथील शैषिक प्रत्यय निवृत्त होतील ?

तसेंच ' अण् आणि मयट् यांमध्यें विप्रतिषेध जुळत नाहीं कारण मयट् हा उत्सर्गच होणार आहे ' (वा. ५ ) असें जें म्हटलें आहे त्यासंबंधानेंही असें सांगावयाचें आहे कीं विप्रतिषेध जुळला नाहीं तरी हरकत नाहीं. ' पूर्वपठित अपवाद हे जवळच्याच विधीचा बाध करतात दूरच्या विधीचा बाध करीत नाहींत ' या न्यायानें हा अण् प्रत्यय ( ४ । ३ । १३७ ) जवळच्या अञ् प्रत्ययाचा-( ४ । ३ । १३९, १४० ) च बाध करील; दूरच्या मयट् प्रत्ययाचा (४।३।१४४) बाध करणार नाहीं.

( सू. १३५ ) [१]त्याचा विकार आणि त्याचा अवयव अशा दोन अर्थांचा अधिकार घेऊन बरोबर जो चालू केला आहे तो कशाकरितां ?

( वा. १ ) विकार व अवयव हे दोन अर्थ चालू करण्यासंबंधानें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

'भवव्याख्यानयोर्युगपदधिकारोऽपवादविधानार्थः कृतनिर्देशौ हि तौ ' ( ४।३।६३ वा. १,२) असें सांगितलेंच आहे. याचा अर्थः-येथें देखील तसेंच विकार आणि अवयव हे दोन्ही अर्थ बरोबर चालू करण्याचें कारण इतकेंच कीं अण् अञ् मयट् वगैरे पुढील अपवाद प्रत्यय दोन्ही अर्थी बारसेच सांगावयाचे

---

[१] १-तेव्हां विकार व अवयव या अर्थी जेथें प्रत्यय प्राप्त होतात तेथें कोठेंही पूर्वीच शैषिक प्रत्यय होत नाहीं असें सिद्ध झालें.

[१] १-( सू. १३५ ) प्राणिवाचक, ओषधिवाचक आणि वृक्षवाचक प्रातिपदिकांहून तस्यावयवः अर्थ. त्याचा अवयव या अर्थीहीं अण् प्रत्यय होतो. उदा०-कपोतानाम् अवयवः कापोतः, मौर्वम् भस्म काण्डं वा.

निर्देशौ द्वितावर्थौ तस्येदम् [४.३.१२०] इति ॥

## बिल्वादिभ्योऽण् ॥ ४ । ३ । १३६ ॥

किमर्थं बिल्वादिषु गवीधुकाशब्दः पठ्यते न कोपधादणित्येव सिद्धम् ।

**बिल्वादिषु गवीधुकाग्रहणं मयट्प्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

बिल्वादिषु गवीधुकाग्रहणं क्रियते मयट्प्रतिषेधार्थम् । मयडतो मा भूदिति ॥

## [ कोपधाच्च ॥ ४ । ३ । १३७ ॥

## त्रपुजतुनोः षुक् ॥ ४ । ३ । १३८ ॥

## ओरञ् ॥ ४ । ३ । १३९ ॥ ]

## अनुदात्तादेश्च ॥ ४ । ३ । १४० ॥

**अनुदात्तादेरञो विधान आद्युदात्तान्ङीष उपसंख्यानम् ॥ १ ॥**

अनुदात्तादेरञो विधान आद्युदात्तान्ङीष उपसंख्यानं कर्तव्यम् । कुवली कौवलम् । बदरी बादरम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । निघाते कृते ऽनुदात्तादेरित्येव सिद्धम् ॥ न सिध्यति । किं कारणम् ।

---

आहेत. तद्धित प्रत्ययाचे ते अर्थ आहेत हें समजण्याकरितां म्हणाल तर ‘ तस्येदम् ’ (४ । ३ । १२०) येथेंच त्या दोन्ही अर्थांचा निर्देश होत आहे.

( सू. १३६ ) ह्या बिल्वादि गणामध्यें गवीधुका शब्दाचा पाठ कशाकरितां केला आहे ? तो करूं नये. कारण कोपधादण् ( ४ । ३ । १३२ ) यानेंच तेथें अण् प्रत्यय सिद्ध होत आहे.

मयट् प्रत्ययाचा प्रतिषेध होण्याकरितां बिल्वादि गणामध्यें गवीधुका शब्द घातला आहे. कारण गवीधुका शब्दाहून विकार व अवयव या अर्थी प्रत्यय (४ । ३ । १४३) न झाला पाहिजे.

( सू. १४० वा. १ ) हा जो अनुदात्तादि प्रातिपदिकांहून अञ् प्रत्यय सांगितला आहे तेथेंच आद्युदात्त प्रातिपदिकाहून ङीष् प्रत्यय केल्यानंतर तदन्त शब्दांहूनही तो अञ् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०— कुवली शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन कौवलम् असें रूप होतें; तसेंच बदरी शब्दाचें बादरम् असें रूप होतें.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. ङीष् प्रत्ययाला उदात्त ( ३।१।३ ) केला असतां शेष–निघातानें ( ६।१।१५८ ) कुवली व बदरी यांतील पहिला अच् अनुदात्त होत असल्यामुळें प्रकृत सूत्रानेंच अञ् प्रत्यय होईल.

तसें सिद्ध होणार नाहीं.

काय कारण ?

---

१—( सू. १३६ ) बिल्वादिगणपठित शब्दांहून ‘ विकार ’ या अर्थी आणि त्या गणांतील प्राणिवाचक वगैरे शब्दांहून ‘ अवयव ’ या अर्थीही अण् प्रत्यय होतो. उदा०—बिल्वस्य विकारोऽवयवो वा बैल्वः.

१—( सू. १३७ ) ज्याच्या उपधेला ककार आहे अशा प्रातिपदिकाहून विकार या अर्थी अण् प्रत्यय होतो; आणि जर तें प्रातिपदिक प्राणिवाचक वगैरेंपैकीं असेल तर त्याहून अवयव अर्थीही अण् प्रत्यय होतो. उदा०—तैत्तिडीकम्, माण्डूकम्.

१—( सू. १३८ ) त्रपु व जतु या शब्दांहून विकार या अर्थी अण् प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाच्या बरोबरच या शब्दांना षुक् आगम होतो. उदा०— त्रापुषम्, जातुषम्.

१—( सू. १३९ ) उवर्णान्त प्रातिपदिकाहून ‘विकार’ या अर्थी आणि जर तें प्रातिपदिक प्राणिवाचक वगैरे असेल तर त्याहून ‘ अवयव ’ या अर्थीही अञ् प्रत्यय होतो. उदा०—देवदारवम्.

१—( सू. १४० ) ज्या प्रातिपदिकांतील पहिला अच् अनुदात्त आहे अशा प्रातिपदिकाहून विकार या अर्थी, आणि जर तें प्रातिपदिक प्राणिवाचक वगैरे असेल तर त्याहून अवयव या अर्थीही अञ् प्रत्यय होतो. उदा०—दाधित्थम्.

**पदस्य ह्यनुदात्तादित्वम् ॥ २ ॥**

पदस्य निघातः सुबन्तं च पदं ङ्याप्प्रातिपदिकाच्च प्रत्ययो विधीयते ॥

**न वा समर्थस्यानुदात्तादित्वात् ॥ ३ ॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । समर्थस्यानुदात्तादित्वात् । समर्थमनुदात्तादित्वेन विशेषयिष्यामः ॥ नैवं शक्यम् । इह च प्रसज्येत । वाचो विकारः त्वचो विकार इति । एतद्धि समर्थमनुदात्तादि । इह च न स्यात् । सर्वेषां विकार इति । तस्मान्नैवं शक्यम् । न चेदेवमुपसंख्यानं कर्तव्यम् ॥ न कर्तव्यम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति यावत्येव द्वितीयस्य स्वरस्य प्रादुर्भावस्तावत्येव पूर्वस्य निघात इति यदयं भिक्षादिषु गर्भिणीशब्दस्य पाठं करोति । कथं कृत्वा ज्ञापकम् । भिक्षादिषु गर्भिणीशब्दस्य पाठ एतत्प्रयोजनमनुदात्तादिलक्षणो ऽञ्मा भूदिति । यदि च पदस्य निघातो गर्भशब्दोऽयमाद्युदात्तस्तस्मादिनन्ताद् प्रत्ययः प्राप्नोति स तावत्स्यात्तस्मिन्नवस्थिते निघातस्तत्र कोऽनुदात्तादिलक्षणस्याञः प्रसङ्गः । पश्यति त्वाचार्यो यावत्ये-

---

( वा. २ ) कारण असें कीं शेष–निघात पदाला सांगितला आहे आणि पद संज्ञा तर ङीष् प्रत्ययाच्या पुढें सुप् प्रत्यय केल्यानंतर ( १।४।१४ ) होणारी आहे आणि ङी–प्रत्ययान्त, अप्–प्रत्ययान्त व प्रातिपदिक यांहून हा तद्धित प्रत्यय सांगितला आहे.

( वा. ३ ) तरी पण कुवली वगैरेंकरितां उपसंख्यान करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं जरी ङीष्–प्रत्ययान्त अनुदात्तादि नाहीं तरी पण कुवली+ङस् हें जें सुबन्त समर्थ तें अनुदात्तादि आहे.

सूत्रांतील अनुदात्तादेः हें विशेषण ङ्याप्–प्रातिपदिकाचें न करतां समर्थाचें करतां येईल.

असें करणें शक्य नाहीं. कारण तसें केलें तर वाचः विकारः व त्वचः विकारः येथें हा अञ् प्रत्यय होऊं लागेल; कारण येथें जें समर्थ सुबन्त तें अनुदात्तादि आहे; आणि सर्वेषां विकारः सार्वः येथें हा अञ् प्रत्यय होणार नाहीं. तेव्हां अनुदात्तादि हें विशेषण समर्थाला देणें शक्य नाहीं.

तर मग तसें होत नसेल तर वरील उपसंख्यान केलें पाहिजे.

तें करावयास नको. कारण आचार्योंनीं जो भिक्षादि गणामध्यें ( ४।२।३८ ) गर्भिणी शब्दाचा पाठ केला आहे त्या आचार्योंच्या कृतीवरून असें ज्ञापित होतें कीं शेष–निघात हा पदसंज्ञकालाच होतो असें नाहीं; तर जेवढ्या भागांत दुसरा स्वर उत्पन्न होतो तेवढ्या भागांत इतरांना निघात होतो.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें कीं भिक्षादि गणामध्यें जो गर्भिणी शब्द घातला आहे त्याचा उपयोग अण् प्रत्ययच त्याहून झाला पाहिजे, अनुदात्तादि शब्दांहून सांगितलेला अञ् प्रत्यय ( ४ । २ । ४४ ) होऊं नये असा आहे. पण जर शेषनिघात हा पदालाच होईल तर आद्युदात्त गर्भ शब्दाहून इन् प्रत्यय (५।२।११५) व त्याला उदात्त केला तरी शेष-निघात त्या वेळीं होत नसल्यामुळें जो प्रत्यय प्राप्त होईल तोच म्हणजे अर्थात् अण् प्रत्ययच (४।२।३७) होईल.तो प्रत्यय झाल्यानंतर मागून शेष-निघातानें आदि अनुदात्त झाला तरी अनुदात्तादि शब्दांहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाची

---

२—वाचः व त्वचः येथील षष्ठी प्रत्यय उदात्त (६।१।१६८) असल्यामुळें मागील अच् शेष–निघातानें अनुदात्त झाला आहे. व सर्व शब्द हा मूळचा जरी अनुदात्तादि आहे तरी त्याहून सु हा प्रत्यय केल्यानंतर त्याला आद्युदात्त ( ६।१।१९१ ) होत आहे.

व द्वितीयस्य स्वरस्य प्रादुर्भावस्तावत्येव पूर्वस्य निघात इति । अतो भिक्षादिषु गर्भिणीशब्दं पठति ॥ पदग्रहणं किमर्थम् ।

**पदग्रहणं परिमाणार्थम् ॥ ४ ॥**

पदग्रहणं क्रियते परिमाणार्थम् । वाक्यस्य मा भूदनुदात्तं पदमेकवर्जम् [ ६. १. १५८ ] इति ॥

**[पलाशादिभ्यो वा ॥४।३।१४१॥**

**शम्याष्ट्लञ् ॥४।३।१४२॥**

**मयड्वैतयोर्भाषायामभक्ष्याच्छादनयोः ॥४।३।१४३॥**

किमर्थमेतयोरित्युच्यते ।

**मयड्वैतयोर्वचनमपवादविषयेऽनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

मयडेतयोरित्युच्यतेऽपवादविषयेऽनिवृत्तिर्यथा स्यात् । बिल्वमयम् बैल्वम् ॥

**एतयोरित्यर्थनिर्देशः ॥ २ ॥**

एतयोरित्यर्थनिर्देशो द्रष्टव्यः ॥ द्वेष्यं विजानीयाद्योगयोर्वा प्रत्ययोर्वेति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्ट एतयोरित्यर्थनिर्देश इति ॥

**[ नित्यं वृद्धशरादिभ्यः ॥ ४ । ३ । १४४ ॥**

**गोश्च पुरीषे ॥ ४ । ३ । १४५ ॥**

---

प्राप्ति पूर्वी कशी येणार ? तेव्हां दुसरा स्वर उत्पन्न झाला की लगेच तेवढ्या भागांत शेष-निघात होतो त्याला पदसंज्ञेची जरूर नाहीं असें आचार्य खात्रीनें समजत आहेत व म्हणूनच ते भिक्षादि गणामध्यें गर्भिणी शब्द घालीत आहेत.

असें असेल तर मग आचार्यांनीं तेथें (६।१।१५८) पद हा शब्द कां उच्चारला आहे ?

(वा. ४) ज्या भागांत शेष–निघात होतो तो भाग किती घ्यावा तें परिमाण दाखविण्याकरितां पद–ग्रहण केलें आहे. पदापेक्षां जास्त म्हणजे पदांचा समुदाय जें वाक्य त्या सर्वाला अनुदात्तं पदमेकवर्जम् (६।१।१५८) यानें शेष-निघात न झाला पाहिजे.

(सू. १४३) 'मयड्वा०या' सूत्रामध्यें एतयोः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा. १) अपवादाच्या विषयामध्येंही मयट् प्रत्ययाची निवृत्ति न झाली पाहिजे याकरितां म्हटलें आहे. उदा० बिल्वमयम्, बैल्वम्.

(वा. २) सूत्रांतील एतयोः या शब्दानें विकार व अवयव या दोन अर्थांचा परामर्श केला आहे असें समजावें. मागील दोन सूत्रांचा किंवा दोन प्रत्ययांचा एतयोः यानें परामर्श होतो ही गोष्ट तेथें ग्राह्य नाहीं हा सूत्रकारांच्या मनांतील अभिप्राय येथें ह्या वार्तिकानें मित्रत्वाच्या नात्यानें वार्तिककार स्पष्ट करून दाखवीत आहेत.

---

१—(सू. १४१) पलाशादि गणांतील शब्दाहून त्याचा विकार किंवा त्याचा अवयव या अर्थी अञ् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—पालाशम्.

१—(सू. १४२) शमी शब्दाहून विकार व अवयव या अर्थी ट्लञ् प्रत्यय होतो. उदा०—शामीलम्, शामीली.

१—(सू. १४३) प्रातिपदिकाहून विकार या अर्थी आणि प्राणिवाचक वगैरे प्रातिपदिकांहून अवयव या अर्थींही मयट् प्रत्यय भाषेमध्यें विकल्पानें होतो. परंतु जो विकार किंवा अवयव असेल तो भक्ष्य किंवा आच्छादन यांपैकीं नसावा. उदा०—अश्मनो विकारः अश्ममयम्, आश्मनम्.

१—(सू. १४४) वृद्धसंज्ञक शब्द आणि शरादि गणांतील शब्द यांहून विकार व अवयव या अर्थी भाषेमध्यें नित्य मयट् प्रत्यय होतो. परतु ते विकार व अवयव हे भक्ष्य किंवा आच्छादन यांपैकीं नसावे. उदा०—आम्रमयम्; शरमयम्.

१ (सू. १४५) गो शब्दाहून त्याचें पुरीष (शेण) या अर्थी मयट् प्रत्यय होतो. उदा०—गोः पुरीषम् गोमयम्.

पिष्टाच्च ॥ ४ । ३ । १४६ ॥
संज्ञायां कन् ॥ ४ । ३ । १४७ ॥
व्रीहेः पुरोडाशे ॥ ४ । ३ । १४८ ॥
असंज्ञायां तिलयवाभ्याम् ॥ ४ । ३ । १४९ ॥
द्व्यचश्छन्दसि ॥ ४ । ३ । १५० ॥
नोत्वद्वर्ध्रबिल्वात् ॥ ४ । ३ । १५१ ॥
तालादिभ्योऽण् ॥ ४ । ३ । १५२ ॥
जातरूपेभ्यः परिमाणे ॥ ४ । ३ । १५३ ॥

प्राणिरजतादिभ्योऽञ् ॥ ४ । ३ । १५४ ॥
ञितश्च तत्प्रत्ययात् ॥ ४ । ३ । १५५ ॥

किमर्थमिदमुच्यते ।

विकारावयवयोर्विकारावयवयुक्तत्वान्मयट्प्रतिषेधार्थं ञितश्च तत्प्रत्ययादञो विधानम् ॥ १ ॥

विकारो विकारेण युज्यते ऽवयवेनावयवः । विकारावयवयोर्विकारावयवयुक्त-

---

( सू. १५५ ) हें सूत्र कशाकरितां केलें आहे?

( वा. १ ) विकाराचाही विकार असतो, तसेंच अवयवाचाही अवयव असतो. तेव्हां विकार व अवयव हे पुनः विकार व अवयव यांनीं युक्त असल्यामुळें त्या दुसऱ्या विकार व अवयव या अर्थी मयट् प्रत्यय प्राप्त होतो; आणि तेथें अञ् प्रत्ययच व्हावा हें इष्ट आहे.

---

१—( सू. १४६ ) पिष्ट शब्दाहून त्याचा विकार या अर्थी नित्य मयट् प्रत्यय होतो. उदा०—पिष्टमयम् भस्म.

१—( सू. १४७ ) पिष्ट शब्दाहून त्याचा विकार या अर्थी कन् प्रत्यय होतो; परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—पिष्टकः.

१—( सू. १४८ ) व्रीहि शब्दाहून विकार या अर्थी मयट् प्रत्यय होतो, पुरोडाश अर्थ गम्यमान असतांना. उदा०—व्रीहिमयः पुरोडाशः.

१—( सू. १४९ ) तिल आणि यव या शब्दांहून विकार अर्थी मयट् प्रत्यय होतो संज्ञा नसतांना. उदा०—तिलमयम्, यवमयम्.

१—( सू. १५० ) दोन अच् असलेल्या प्रातिपदिकाहून विकार या अर्थी आणि तें प्रातिपदिक प्राणिवाचक वगैरे असेल तर त्याहून अवयव या अर्थीही वेदामध्यें मयट् प्रत्यय होतो. उदा०—पर्णमयी जुहूः.

१—( सू. १५१ ) ह्रस्व उकार ज्यामध्यें आहे असे शब्द आणि वर्ध्र व बिल्व हे शब्द यांहून पूर्वसूत्रानें प्राप्त झालेला मयट् प्रत्यय होत नाहीं. उदा०—मौञ्जं शिक्यम्; वार्ध्री रज्जुः. बैल्वः यूपः.

१—( सू. १५२ ) तालादि गणांतील शब्दांहून विकार अर्थी आणि त्यांतील प्राणिवाचक वगैरे शब्दांहून अवयव अर्थीही अण् प्रत्यय होतो. उदा०—तालं धनुः, बार्हिणम्.

१—( सू. १५३ ) सुवर्णवाचक शब्दाहून त्याचा परिणामरूपी विकार या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—हाटकः निष्कः.

१—( सू. १५४ ) प्राणिवाचक शब्दांहून आणि रजतादि गणातील ओषधिवृक्षवाचक शब्दाहून विकार व अवयव या अर्थी आणि रजतादि गणातील इतर शब्दांहून विकार या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०—कापोतम्, राजतम्, औदुम्बरम्.

१—( सू. १५५ ) विकार व अवयव या अर्थी केलेला व ज्याला ञकार इत्संज्ञक जोडला आहे असा जो प्रत्यय तदन्त शब्दाहून यथायोग्य विकार व अवयव या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०—दैवदारवस्य विकारः अवयवः वा दैवदारवम्.

२—प्रथम विकार व प्रथम अवयव या अर्थी ञित् प्रत्यय केला असेल तेथें आदि-वृद्धि ( ७।२।११७ ) झाल्यामुळें तो ञित्-प्रत्ययान्त शब्द वृद्धसंज्ञक (१।१।७३) होतो. म्हणून त्याहून मयट् प्रत्यय (४।३।१४४) प्राप्त होतो.

त्वस्मयट् प्राप्नोति। इष्यते चाप्येष स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति मयट्प्रतिषेधार्थं नियमार्थं वा तत्प्रत्ययादञ्ञो विधानम्। एतदर्थमिदमुच्यते॥

**न वा दृष्टो ह्यवयवे समुदायशब्दो विकारे च प्रकृतिशब्दस्तस्मान्मयडभावः॥ २॥**

न वैतत्प्रयोजनमस्ति। किं कारणम्। दृष्टो ह्यवयवे समुदायशब्दः। तद्यथा। पूर्वे पञ्चालाः। उत्तरे पञ्चालाः। तैलं भुक्तम्। घृतं भुक्तम्। शुक्लः नीलः कृष्ण इति। विकारे च प्रकृतिशब्दः। विकारे च प्रकृतिशब्दो दृश्यते। तद्यथा। शालीन्भुङ्क्ते मुद्गैः। शालिविकारं मुद्गविकारेणेति। तस्मान्मयडभावः। तस्मान्मयड्ढो न भविष्यति॥ नैतद्विवदामहेऽवयवे समुदायशब्दोऽस्ति नास्तीति विकारे वा प्रकृतिशब्द इति। किं तर्हि। विकारावयवशब्दोऽपि त्वस्ति तत उत्पत्तिः प्राप्नोति।

**विकारावयवशब्दात्प्रसङ्ग इति चेन्न तेनानभिधानात्॥ ३॥**

विकारावयवशब्दात्प्रसङ्ग इति चेत्तन्न।

---

ही इष्ट गोष्ट साधण्याकरितां कांहीं तरी यत्न केल्याशिवाय ती सिद्धीला जाणार नाहीं. म्हणून तेथें मयट् प्रत्यय न होण्याकरितां ञितश्च तत्प्रत्ययात् या प्रकृत सूत्रानें अञ् प्रत्यय सांगितला आहे. अशाकरितां हें सूत्र केलें आहे.

(वा. २) हा प्रकृत सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं समुदायवाचक शब्द अवयव या अर्थींही उपयोगांत आलेला दिसतो. उदा० पूर्वे पञ्चालाः, उत्तरे पञ्चालाः; तैलं भुक्तम्, घृतं भुक्तम्; शुक्लः, नीलः, कृष्णः. त्याप्रमाणेंच प्रकृतिवाचक शब्द हा विकार या अर्थींही उपयोगांत आलेला दिसतो. उदा० शालीन् भुङ्क्ते मुद्गैः. येथें मुगाच्या उसळीबरोबर भात खातो असा अर्थ आहे. तेव्हां मूळ शब्दच प्रथम विकार व प्रथम अवयव या अर्थीं वापरला म्हणजे ञित् प्रत्यय नसल्यामुळें त्याहून मयट् प्रत्यय होणार नाहीं.

पण समुदायवाचक शब्द अवयव या अर्थी उपयोगांत येतो कीं नाहीं तसेंच प्रकृतिवाचक शब्द विकार या अर्थी उपयोगांत येतो कीं नाहीं याबद्दल आम्ही कांहीं मुळींच वाद करीत नाहीं. त्याचा तसा उपयोग खुशाल करा. परंतु तसा उपयोग न करतां विकार व अवयव या अर्थीं प्रत्यय करूनही शब्द तयार होतोच. त्याहून मयट् प्रत्यय होऊं लागेल ना ?

(वा. ३) ' प्रथम विकार व अवयव या अर्थीं प्रत्यय करून सिद्ध झालेल्या शब्दाहून त्याचा पुनः विकार व अवयव या अर्थीं मयट् होऊं लागेल ' असें म्हणणें असेल तर तसा तो प्रत्यय होणार नाहीं.

काय कारण ?

---

३—येथें पञ्चाल वगैरे शब्द पञ्चाल वगैरेंचा तो तो भाग या अर्थी उपयोगांत आले आहेत.

४—येथें शालि शब्द हा शाळींचा विकार भात या अर्थी उपयोगांत आलेला आहे तसाच मुद्ग शब्दही होय.

५—देवदारूच्या विकाराचा विकार या अर्थी देवदारव असें रूप होतें. त्यांतील प्रथम विकार या अर्थी देवदारु शब्दाहून ओरञ् (४।३।१३९) यानें अञ् प्रत्यय व वृद्धि (७।२।११७) होऊन देवदारव असा शब्द होतो. याला वृद्धसंज्ञा (१।१।७३) असल्यामुळें मयट् प्रत्यय (४।३।१४४) दुसरा विकार या अर्थी प्राप्त होतो, त्याचा बाध करून प्रकृत सूत्रानें अञ् प्रत्यय होतो. आतां प्रथम विकार या अर्थी प्रत्यय न करतां देवदारु शब्दच घेतला तर त्याला वृद्धसंज्ञा नसल्यामुळें त्याहून मयट् प्रत्ययाची प्राप्ति नाहीं. तेव्हां त्याहून ओरञ् यानें अञ् प्रत्यय होऊन त्या एका प्रत्ययानेंच देवदारव शब्दापासून विकाराचा विकार या अर्थाचा बोध होतो.

किं कारणम् । तेनानभिधानात् । न हि विकारावयवशब्दादुत्पद्यमानेन प्रत्ययेनास्याभिधानं स्यात् । अनभिधानाच्चत नुत्पत्तिर्न भविष्यति । तच्चावश्यमनाभिधानमाश्रयितव्यम् ।

**अभिधाने ह्यन्यतोऽपि मयट्प्रसङ्गः ॥४॥**

अभिधाने हि सत्यन्यतोऽपि मयट् प्रसज्येत । बैल्वस्य विकार इति ॥

**तस्मात्तत्प्रत्ययान्ताल्लुग्वचनम् ॥ ५ ॥**

तस्मात्तत्प्रत्ययान्ताल्लुग्वक्तव्यः ॥ यदि लुगुच्यते कथं गौमयं भस्म द्रौवयं मानम् कापित्थो रस इति । अन्यत्र गोमयाद् द्रुवयात् फलाच्च लुग्वक्तव्यः ॥ इह तर्हि औष्ट्रकी अञन्तादितीकारो न प्राप्नोति । इष्टमेवैतत्संगृहीतम् । औष्ट्रिकेत्येव भवितव्यम् । एवं हि सौनागाः पठन्ति वुञ्श्चाञ्कृतप्रसङ्ग इति ॥ इह तर्हि पालाशी समिदित्यनुपसर्जनलक्षण ईकारो न प्राप्नोति । मा भूदेव-

---

कारण असें कीं त्या अर्थाच्या प्रत्ययाचें अभिधानच आहे. प्रथम विकार व अवयव या अर्थीं प्रत्यय करून पुनः त्याच्या पुढें विकार व अवयव या अर्थीं केलेल्या प्रत्ययानें कोठेंही अर्थ दाखविला जात नाहीं. तेव्हां अर्थातच तशा ठिकाणीं प्रत्ययांची उत्पत्ति होणार नाहीं. आणि अनभिधानामुळें तसा प्रत्यय होत नाहीं ही गोष्ट तर अवश्य मानलीच पाहिजे.

( वा. ४ ) जर विकार व अवयव या अर्थीं प्रत्यय करून त्याच्या पुढें पुनः त्या अर्थीं केलेल्या प्रत्ययानें अर्थाचें अभिधान होईल तर भित् प्रत्ययाशिवाय इतर ठिकाणींही मयट् प्रत्यय होऊं लागेल. उदा० बैल्वस्य विकारः.

( वा. ५ ) तेव्हां विकार व अवयव या अर्थीं प्रत्यय केल्यानंतर पुढें त्या प्रत्ययान्ताहून विकार व अवयव या अर्थीं केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें.

पण तसा लुक् सांगितला तर गौमयं भस्म द्रौवयं मानम्, व कापित्थः रसः येथेंही मयट्-प्रत्ययान्त (४।३।१४५) वय-प्रत्ययान्त (४।३।१६२) आणि अञ्-प्रत्ययान्त (४।३।१४०) यांहून पुढें विकार या अर्थीं केलेल्या प्रत्ययाचा लुक् होऊं लागेल.

गोमय द्रुवय आणि फल या अर्थीं केलेल्या प्रत्ययांशिवाय इतर अर्थीं केलेल्या प्रत्ययांचा लुक् होतो असें म्हणावें.

तरी पण औष्ट्रकी येथें अञ्-प्रत्ययान्ताहून स्त्रीलिंगी सांगितलेला ईकार प्रत्यय (४।१।१५) होणार नाहीं.

ईकार प्रत्यय होणार नाहीं हा दोष नव्हे. उलट तसें इष्टच आहे. औष्ट्रिका असें टाप्-प्रत्ययान्तच रूप झालें पाहिजे. कारण वुञ्-प्रत्ययान्ताहून अण् प्रत्यय केला असतां तेथें स्त्रीलिंगी ङीप् प्रत्यय होऊं लागेल असा सौनाग वैयाकरणांनीं टिड्ढाणञ्० या सूत्रावर दोषच दाखविला आहे.

तर मग औष्ट्रिका येथें स्त्रीलिंगी ईकार हा प्रत्यय नको असला तरी पालाशी समित् येथें तो पाहिजे, पण तो अनुपसर्जन अञ्-प्रत्ययान्ताहून सांगितला असल्यामुळें होणार नाहीं.

---

६—कापित्थः येथें प्रथम विकार फल अशी विवक्षा करून केलेल्या अण् प्रत्ययाचा ' फले लुक् ' ( ४।३।१६३ ) यानें लुक् झाला आहे.

७—उष्ट्र शब्दाहून वुञ् प्रत्यय ( ४।३।१५७ ) व त्याहून पुढें प्रकृत सूत्रानें अण् प्रत्यय होत असतो. तेथें आतां मयट् प्रत्यय होऊन त्याचा प्रकृत वार्तिकानें लुक् झाला आहे.

८—पलाश शब्दाहून अञ् प्रत्यय (४।३।१४१) व त्याहून पुढें प्रकृत सूत्रानें अण् प्रत्यय होत असतो. तेथें आतां मयट् प्रत्यय होऊन त्याचा प्रकृत वार्तिकानें लुक् झाला आहे. पहिला अञ् प्रत्यय शिल्लक आहे, पण तो मयट् प्रत्ययाच्या अर्थाला उपसर्जन म्हणजे विशेषण झाला आहे म्हणून ईकार होणार नाहीं.

मञ्यो ऽनुपसर्जनमिति । अञन्तादनुपसर्जनादित्येवं भविष्यति । नैवं शक्यम् । इह हि दोषः स्यात् । काशकृत्स्निना प्रोक्ता मीमांसा काशकृत्स्नी तामधीते काशकृत्स्ना ब्राह्मणीति । अणन्तादितीकारः प्रसज्येत ॥ तस्मादस्तु न तेनानभिधानादित्येव ॥ इह तर्हि कापोतो रस इति प्राणिशब्दो नोपपद्यते । नैष दोषः । इदं तावदयं प्रष्टव्यः । अथ योऽसावाद्यः कपोतः सलोमकः सपक्षो न च सेप्रति प्राणिति कथं तत्र प्राणिशब्दो वर्तत इति । अथ मतमेतत्प्रकृत्यन्वया विकारा भवन्तीतीहापि न दोषो भवति ॥

**क्रीतवत्परिमाणात्** ॥ ४।३।१५६ ॥

कथमिदं विज्ञायते । क्रीते ये प्रत्यया विहितास्ते भवन्ति परिमाणाद्विकारावयवयोरिति । आहोस्वित्परिमाणात्क्रीते ये प्रत्यया विहितास्ते भवन्ति विकारावय-

---

तेथें ' अञ् जो अनुपसर्जन ' असा अर्थ असतांना ईकार झाला नाहीं तर न होऊं दे, अञ्-प्रत्ययान्त जें अनुपसर्जन असा अर्थ करूं म्हणजे होईल.

तसा अर्थ करणें शक्य नाहीं. कारण तसा अर्थ केला तर काशकृत्स्निना प्रोक्ता मीमांसा काशकृत्स्नी, तामधीते काशकृत्स्ना ब्राह्मणी. येथें अण्-प्रत्ययान्त अनुपसर्जन असल्यामुळें ईकार प्रत्यय होऊं लागेल असा दोष येतो. तेव्हां लुक् सांगणें ( वा. ५ ) बरें नव्हे. तर ' न तेनानभिधानात् ' ( वा. ३ ) असें अनभिधान मानणें हेंच असू दे.

तर मग कापोतः रसः येथें मांसवाचक कपोत शब्द हा प्राणिशब्द होत नाहीं.

हा दोष येत नाहीं. येथें अगोदर या शंका घेणाऱ्याला असें विचारावें कीं जो हा लव पंख वगैरे सर्व अवयवांनीं युक्त सबंद कपोत पक्षी, फक्त हल्ली जिवंत मात्र नाहीं, त्या प्रेतरूपी कपोताला लोकामध्यें कपोत असा प्राणिशब्द कसा बरें दिला जातो ? आतां ' विकारामध्यें प्रकृतीचा संबंध असल्यामुळें त्या विकाराला प्रकृति शब्द लावतां येतो ' असेंच जर मत असेल तर येथेंही दोष येत नाहीं.

( सू. १५६ ) या सूत्राचा अर्थ कसा समजावयाचा ' कोणत्याही शब्दाहून क्रीत या अर्थीं जे प्रत्यय होतात ते प्रत्यय परिमाणवाचक शब्दाहून विकार व अवयव या अर्थीं होतात ' असा अर्थ आहे किंवा ' परिमाणवाचक शब्दाहून क्रीत या अर्थीं जे प्रत्यय होतात ते प्रत्यय कोणत्याही शब्दाहून विकार व अवयव या अर्थीं होतात ' असा अर्थ आहे ?

---

९—येथें प्रोक्ता या अर्थीं केलेला अण् प्रत्यय शिष्ट आहे. पुढील अधीते या अर्थीं केलेल्या अण् प्रत्ययाचा लुक् ( ४।२।६४ ) झाल्यामुळें तो अर्थ मागील अण्-प्रत्ययान्ताला आलेला आहे. आणि तो अर्थ अनुपसर्जन आहे.

१०— विकाराचा विकार व अवयवाचा अवयव या अर्थीं दोन प्रत्यय अनभिधानामुळें कोठेंही होत नाहींत, तर प्रथम विकार व अवयव या अर्थीं मूळ शब्दच घेऊन पुढें एकच प्रत्यय करून रूपें साधावयाचीं. तसें कापोतः रसः येथें कपोताचा प्रथम विकार मांस आणि त्या मांसाचा विकार रस या अर्थीं दोन प्रत्यय न करता कपोत शब्दच 'त्याचें मांस या अर्थाचा घेऊन पुढें एकच अञ् प्रत्यय ( ४।३।१५४ ) करावयाचा; पण मांस या अर्थाचा कपोत शब्द प्राणिवाचक शब्द नव्हे म्हणून त्याहून अञ् प्रत्यय होणार नाहीं.

१—( सू. १५६ ) ज्या परिमाणवाचक शब्दाहून क्रीत या अर्थीं जो प्रत्यय होतो ( ५।१।१८-३७ ) तोच प्रत्यय त्याच परिमाणवाचक शब्दाहून विकार अर्थीं होतो. उदा०-निष्केण क्रीतं नैष्किकम्, निष्कस्य विकारः नैष्किकः ( ५।१।२१ ). शतेन क्रीतः शत्यः, शतिकः.

योरिति । किं चातः । यदि विज्ञायते क्रीते ये प्रत्यया विहितास्ते भवन्ति परिमाणाद्विकारावयवयोरिति प्रत्ययमात्रं प्राप्नोति । अथ विज्ञायते परिमाणात्क्रीते ये प्रत्यया विहितास्ते भवन्ति विकारावयवयोरिति प्रकृतिमात्रात्प्राप्नुवन्ति । तस्मात्

क्रीतवत्परिमाणाद्वक्तुं च ॥ १ ॥

अङ्गं च क्रीतवदिति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । क्रीतवदिति वतिनिर्देशोऽयम् । यदि च याभ्यः प्रकृतिभ्यो येन विशेषणेन क्रीते प्रत्यया विहितास्ताभ्यः प्रकृतिभ्यस्तेनैव विशेषणेन परिमाणाद्विकारावयवयोर्भवन्ति ततोऽमी क्रीतवत्कृताः स्युः । अथ हि प्रकृतिमात्राद्वा स्युः प्रत्ययमात्रं वा स्यान्नामी क्रीतवत्कृताः स्युः ॥

अणो वृद्धान्मयट् ॥ २ ॥

अणो वृद्धान्मयडित्येतद्भवति विप्रतिषेधेन । अणोऽवकाशः । तित्तिडीक तैत्तिडीकम् । मयटोऽवकाशः । काष्ठमयम् । इहोभयं प्राप्नोति । शाकमयम् ॥

ओरञोऽनुदात्तादेरञश्च ॥ ३ ॥

ओरञोऽनुदात्तादेरञश्च मयड् भवति विप्रतिषेधेन । ओरञोऽवकाशः । अरडु आरडवम् । मयटः स एव । इहोभयं प्राप्नोति । दारुमयम् ॥ अनुदात्तादेरञ-

---

या दोन अर्थांमध्यें फरक काय ?

'कोणत्याही शब्दाहून क्रीत या अर्थी जे प्रत्यय होतात ते प्रत्यय परिमाणवाचक शब्दाहून विकार व अवयव या अर्थी होतात' असा अर्थ असेल तर सगळेच प्रत्यय होऊं लागतील. आतां 'परिमाणवाचक शब्दाहून क्रीत या अर्थी जे प्रत्यय होतात ते प्रत्यय कोणत्याही शब्दाहून विकार व अवयव या अर्थी होतात' असा अर्थ असेल तर सगळ्याच शब्दांहून ते प्रत्यय होऊं लागतील. तेव्हां—

( वा. १ ) परिमाणवाचक शब्दाहून क्रीत या अर्थी प्रत्यय होतांना जें तेथें पूर्वीचें अंग असतें तसेंच विकार व अवयव या अर्थींही होतें असें म्हणावें.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण क्रीतवत् हा वति प्रत्ययाचा निर्देश आहे. तेव्हां ज्या परिमाणवाचक शब्दाहून जें निमित्त असतांना जे प्रत्यय क्रीत या अर्थी होतात त्याच शब्दाहून तेंच निमित्त असतांना तेच प्रत्यय विकार व अवयव या अर्थी केले तर ते क्रीत या अर्थाप्रमाणें बरोबर केले असें होईल; आणि जर वाटेल त्या शब्दाहून केले तर किंवा वाटेल ते प्रत्यय केले तर ते क्रीत या अर्थाप्रमाणें बरोबर केले असें होणार नाहीं.

( वा. २ ) अण् प्रत्ययापेक्षां वृद्धसंज्ञक शब्दाहून सांगितलेला मयट् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. 'तित्तिडीक' शब्दाहून अण् प्रत्यय (४।३।१३७) होऊन तैत्तिडीकम् असें रूप होतें; तेथें अण् प्रत्ययाला अवकाश आहे; व काष्ठमयम् येथें मयट् प्रत्ययाला (४।३।१४४) अवकाश आहे; पण शाकमयम् येथें दोघांची प्राप्ति येते; तेव्हां तेथें विप्रतिषेधानें मयट् प्रत्यय होतो.

( वा. ३ ) उवर्णान्ताहून सांगितलेला अञ् प्रत्यय (४।३।१३९) आणि अनुदात्तादि शब्दाहून सांगितलेला अञ् प्रत्यय (४।३।१४०) या दोहोंपेक्षांही मयट् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. अरडु शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन आरडवम् असें रूप होतें. तेथें उवर्णान्ताहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाला अवकाश आहे. मयट् प्रत्ययाला अवकाश दाखविलाच आहे. पण दारुमयम् येथें दारु शब्दाहून दोघांची प्राप्ति येते; तेथें विप्रतिषेधानें मयट् होतो. तसेंच

त्वीत्यस्यावकाशः । कौवलम् । जरद्वृक्ष जारद्वृक्षम् ॥ मयटः स एव । इहोभयं प्राप्नोति । आम्रमयम् ॥

मयटः प्राण्यञ्विप्रतिषेधेन ॥ ४ ॥

मयटः प्राण्यञ्भवति विप्रतिषेधेन । प्राण्यञोऽवकाशः । गृध्र गार्ध्रम् । मयटः स एव । इहोभयं प्राप्नोति । चाषम् भासम् । प्राण्यञ्भवति विप्रतिषेधेन ॥

न वानवकाशत्वादपवादो मयट् ॥ ५ ॥

न वैष युक्तो विप्रतिषेधो योऽयमञो मयटश्च । किं कारणम् । अनवकाशत्वादपवादो मयट् । अनवकाशो मयट् साव-काशमञं बाधिष्यते । स कथमनवकाशः । यद्यनुवर्तन्ते शैषिकाः । अथ निवृत्ताः शैषिका वृद्धमाद्युदात्तं मयटोऽवकाशः ॥

प्राण्यञश्च ॥ ६ ॥

अयं चाप्ययुक्तो विप्रतिषेधो योऽयं मयटः प्राण्यञश्च । किं कारणम् । अन-वकाशत्वादपवादो मयडित्येव । अन-वकाशो मयट् । स यथैवौरञमनुदात्ता-देरञं च बाधत एवं प्राण्यञमपि बाधेत ॥

---

कुवल व जरद्वृक्ष या शब्दांहून अञ् प्रत्यय होऊन कौवलम् व जारद्वृक्षम् अशीं रूपें होतात. येथें अनुदात्तादि शब्दाहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाला अवकाश आहे; मयट् प्रत्ययाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. पण आम्र-मयम् येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें विप्रति-षेधानें मयट् प्रत्यय होतो.

( वा. ४ ) मयट् प्रत्ययापेक्षां प्राणिवाचक शब्दाहून अञ् प्रत्यय ( ४।३।१५४ ) विप्रति-षेधानें होतो. गृध्र शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन गार्ध्रम् असें रूप होतें. तेथें प्राणिवाचक शब्दाहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाला अवकाश आहे. मयट् प्रत्ययाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. पण चाषम्, व भासम् येथें दोघांची प्राप्ति येते. तेथें प्राणिवाचक शब्दाहून सांगित-लेल्या अञ् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो.

(वा. ५) येथें जो हा अञ् प्रत्ययापेक्षां मयट् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो असा विप्रति-षेध सांगितला आहे ( वा. ३ ) तो बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं अनवकाश हा मयट् प्रत्यय अपवादच आहे. तेव्हां सावकाश अशा अञ् प्रत्ययाचा अनवकाश मयट् प्रत्यय अपवादत्वास्तवच बाध करील.

पण मयट् प्रत्यय हा अनवकाश कसा बरें ? जर विकार व अवयव या अर्थी शैषिक प्रत्यय प्राप्त होत असतील तर मयट् प्रत्ययाच्या विषयामध्यें सर्वत्र छ प्रत्यय ( ४।२।११४ ) प्राप्त होत असल्यामुळें मयट् प्रत्यय अनवकाश होईल. पण विकार व अवयव या अर्थी शैषिक प्रत्यय होत नाहींतच म्हणून वृद्धसंज्ञक आद्युदात्त शब्दाचे ठिकाणीं मयट् प्रत्ययाला अवकाश आहेच.

( वा. ६ ) तसाच प्राणिवाचक शब्दाहून सांगितलेला अञ् प्रत्यय मयट् प्रत्ययापेक्षां विप्रतिषेधानें होतो असा जो मयट् आणि प्राणिवाचक शब्दाहून होणारा अञ् यांचा विप्रतिषेध सांगितला आहे ( वा. ४ ) तोही बरोबर नाहीं.

काय कारण ?

मयट् प्रत्यय हा अनवकाशत्वास्तव अपवाद आहे हेंच कारण होय. तेव्हां तो मयट् प्रत्यय जसा उवर्णान्ताहून अञ् प्रत्ययाचा आणि अनुदात्तादि शब्दाहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाचा बाध करतो तसा प्राणिवाचक शब्दा-हून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाचाही बाध करीलच.

**तस्मान्मयड्विधाने प्राणिप्रतिषेधः ॥ ७॥**

तस्मान्मयड्विधाने प्राणिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः ॥ स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः। मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन् बाधन्त इत्येवमयं मयडोरञमनुदात्तादेरञं च बाधिष्यते प्राण्यञं न बाधिष्यते ॥ यद्येतदस्ति मध्येऽपवादाः पुरस्तादपवादा इति मानुवृतञ्शैषिकाः । पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन् बाधन्त इत्येवमयमणञं बाधिष्यते मयटं न बाधिष्यते ॥

**अनुदात्तादेरञः प्राण्यञ्विप्रतिषेधेन॥८॥**

अनुदात्तादेरञः प्राण्यञ्भवति विप्रतिषेधेन । अनुदात्तादेरञ्भवतीत्यस्यावकाशः। जरद्वृक्ष जारद्वृक्षम् । प्राण्यञः स एव । इहोभयं प्राप्नोति । कपोत कापोतम् । प्राण्यञ्भवति विप्रतिषेधेन ॥ कः पुनरत्र विशेषस्तेन वा सत्यनेन वा । सापवादकः स विधिरयं पुनर्निरपवादकः । यदि तेन स्यादिह न स्यात् । श्वाविधो विकारः शौवाविधम् ॥

---

( वा. ७ ) तेव्हां प्राणिवाचकाहून मयट् प्रत्यय होत नाहीं असा निषेध मयट् प्रत्यय सांगणाऱ्या शास्त्रामध्यें सांगावा.

तर मग तसा निषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण ' मध्यें पठित अपवाद हे पूर्वपठित विधीचाच बाध करतात ' या न्यायानें हा मयट् प्रत्यय ( ४।३।१४४ ) पूर्वपठित अशा उवर्णान्ताहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाचा ( ४।३।१३९ ) आणि अनुदात्तादि शब्दाहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाचाच ( ४।३।१४० ) बाध करील; प्राणिवाचकाहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाचा (४।३।१५४) बाध करणार नाहीं.

आतां जर 'मध्यें पठित अपवाद हे पूर्व विधीचाच बाध करतात' व 'पूर्वपठित अपवाद हे जवळच्या विधीचाच बाध करतात' असे न्याय न आहेत तर विकार व अवयव या अर्थीहीं शैषिक प्रत्ययांचा संबंध करावयास नको. 'पूर्वपठित अपवाद जवळच्याच विधीचा बाध करतात' या न्यायानें हा अण् प्रत्यय अञ् प्रत्ययाचाच बाध करील मयट् प्रत्ययाचा बाध करणार नाहीं.

( वा. ८ ) अनुदात्तादि शब्दाहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययापेक्षां प्राणिवाचक शब्दाहून सांगितलेला अण् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो. जरद्वृक्ष या अन्तोदात्त शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन जारद्वृक्षम् असें रूप होतें. तेथें अनुदात्तादि शब्दाहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाला ( ४।३।१४० ) अवकाश आहे. प्राणिवाचक शब्दाहून सांगितलेल्या अञ् प्रत्ययाला (४।३।१५४) गार्भम् हा अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. पण कपोत शब्दाहून अञ् प्रत्यय होऊन कापोतम् असें रूप होतें तेथें दोघांची प्राप्ति येते. तेथें प्राणिवाचक शब्दाहून सांगितलेला अञ् प्रत्यय विप्रतिषेधानें होतो.

पण काय हो, त्यानें अञ् प्रत्यय झाला काय आणि ह्यानें झाला काय, दोहोंत काय बरें विशेष आहे ?

विशेष असा आहे कीं अनुदात्तादि शब्दाहून सांगितलेल्या त्या अञ् प्रत्ययाला अपवाद आहेत. आणि प्राणिवाचक शब्दाहून सांगितलेल्या ह्या अञ् प्रत्ययाला अपवाद नाहींत. तेव्हां प्राणिवाचक अशा अनुदात्तादि शब्दाहून जर त्यानेंच अञ् प्रत्यय केला तर श्वाविधः विकारः शौवाविधम् येथें त्यानें - अञ् प्रत्यय होणार नाहीं.

---

२—खालीं पृष्ठ २५९ पं १५ पहा.

३—श्वानं विध्यतीति श्वावित्. पूर्वपदाच्या अकाराला दीर्घ ( ६।३।११६ ) झाला आहे. येथें त्या अञ् प्रत्ययाचा बाध करून मयट् प्रत्यय प्राप्त होत आहे. तेव्हां त्या मयट् प्रत्ययाचा बाध करून प्राणिवाचक शब्दाहून सांगितलेला हा अञ् प्रत्यय होतो.

[ उष्ट्राद्वुञ् ॥ ४ । ३ । १५७
उमोर्णयोर्वा ॥ ४ । ३ । १५८ ॥
एण्या ढञ् ॥ ४ । ३ । १५९ ॥
गोपयसोर्यत् ॥ ४ । ३ । १६० ॥
द्रोश्च ॥ ४ । ३ । १६१ ॥
माने वयः ॥ ४ । ३ । १६२ ॥ ]
फले लुक् ॥ ४ । ३ । १६३ ॥

फले लुग्वचनानर्थक्यं प्रकृत्यन्तरत्वात् ॥१॥

फले लुग्वचनमनर्थकम् । किं कारणम् । प्रकृत्यन्तरत्वात् । प्रकृत्यन्तरमामलकशब्दः फले वर्तते ॥ एकान्तदर्शनात्प्राप्नोति ।

एकान्तदर्शनात्प्रसङ्ग इति चेद्वृक्षे लुग्वचनम् ॥२॥

एकान्तदर्शनात्प्रसङ्ग इति चेद् वृक्षे लुग्वक्तव्यः । वृक्षोऽपि हि फलैकान्तः ॥

[ प्लक्षादिभ्योऽण् ॥ ४ । ३ । १६४ ॥
जम्ब्वा वा ॥ ४ । ३ । १६५ ॥ ]

---

( सू. १६३ वा. १ ) विकार किंवा अवयव जर फल असेल तर त्याचा जो हा लुक् सांगितला आहे तो व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं, आमलक हा फलविशेष अर्थाचा स्वतंत्रच शब्द आहे.

पण वृक्षविशेषवाचक आमलकी शब्दाहून प्रत्यय करूनच फल या अर्थी आमलक शब्द साधलेला असावा, कारण त्या फलाचा त्या वृक्षाशीं संबंध नित्य दिसतो.

( वा. २ ) नित्य-संबंध दृष्टीस पडतो म्हणून आमलक हा फल या अर्थाचा शब्द स्वतंत्र नाहीं असें म्हणावें लागतें असें असेल तर उलट वृक्षविशेष या अर्थाचा आमलकी शब्द स्वतंत्र नाहीं, तर फल या अर्थाच्या आमलक शब्दाहून 'तें फल ज्याचें आहे' या अर्थी प्रत्यय करून त्याचा लुक् सांगावा, म्हणजे त्याचा वृक्ष हा अर्थ होईल. कारण जसा त्या फळाचा वृक्षाशीं संबंध नित्य आहे तसा त्या वृक्षाचाही फलाशीं संबंध नित्य आहे.

---

१—( सू. १५७ ) उष्ट्र शब्दाहून विकार व अवयव या अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा०—उष्ट्रस्य विकारः अवयवः औष्ट्रकः.

१—( सू. १५८ ) उमा व ऊर्णा या शब्दांहून वरील अर्थी वुञ् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—औमकम् औमम् ; और्णकम्, और्णम्.

१—( सू. १५९ ) एणी शब्दाहून वरील अर्थी ढञ् प्रत्यय होतो. उदा०—ऐणेयम् मांसम्.

१—( सू. १६० ) गो आणि पयस् या शब्दांहून वरील अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—गव्यं, पयस्यम्.

१—( सू. १६१ ) द्रु शब्दाहून वरील अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—द्रव्यम्.

१—( सू. १६२ ) द्रु शब्दाहून त्याचा परिमाणरूपी विकार या अर्थी वय प्रत्यय होतो. उदा०—द्रुवयम् ( लांकडी माप ).

१—( सू. १६३ ) विकार किंवा अवयव जर फल असेल तर त्या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो. उदा०—कुवल, बदरम्.

१—( सू. १६४ ) प्लक्षादि गणांतील शब्दांहून फलरूपी विकार या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—प्लाक्षम्. हा अण् प्रत्यय मुद्दाम सांगितला आहे म्हणून त्याचा लुक् होत नाहीं.

१—( सू. १६५ ) जम्बू शब्दाहून फलरूपी विकार या अर्थी अण् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—जम्ब्वाः फलं जाम्बवम्. एकदां अण् प्रत्यय (४।३।१३९) होतो आणि त्याचा लुक् होतो. उदा० जम्बु.

**लुप् च ॥ ४ । ३ । १६६ ॥**

**लुप्प्रकरणे फलपाकशुषामुपसंख्यानम् ॥ १ ॥**

लुप्प्रकरणे फलपाकशुषामुपसंख्यानं कर्तव्यम् । व्रीहयः यवाः माषाः मुद्गाः तिलाः ॥

**पुष्पमूलेषु च बहुलम् ॥ २ ॥**

पुष्पमूलेषु च बहुलं लुब्वक्तव्यः । मल्लिका करवीरम् विसम् मृणालम् । न च भवति । पाटलानि मूलानि ॥

**[ हरीतक्यादिभ्यश्च ॥ ४ । ३ । १६७ ॥**

**कंसीयपरशव्ययोर्यञञौ लुक् च ॥ ४ । ३ । १६८ ॥ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये चतुर्थस्याध्यायस्य तृतीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

( सू. १६६ वा. १ ) फलाचा परिपाक झाला असतांना शुष्क होणाऱ्या ज्या औषधी तद्वाचक शब्दाहून फलरूपी विकार या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुप् होतो असें या लुप्-प्रकरणामध्यें उपसंख्यान करावें. उदा० व्रीहयः, यवाः, माषाः, मुद्गाः, तिलाः.

विकार किंवा अवयव जर पुष्प किंवा मूल असेल तर त्या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा बाहुल्येंकरून लुप् होतो असें म्हणावें. उदा० मल्लिकायाः पुष्पं मल्लिका. करवीरस्य पुष्पं करवीरम् बिसस्य मूलं बिसम्, तसेंच मृणालम्. बहुलम् असें म्हटलें असल्यामुळें कांहीं ठिकाणीं लुप् होत नाहीं. उदा० पाटलानि मूलानि.

याप्रमाणे श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या चवथ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें व पादही समाप्त झाला.

---

१—(सू. १६६) जम्बू शब्दाहून फलरूपी विकार या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा एकदा लुप्ही होतो. उदा०—जम्ब्वाः फलं जम्बूः. येथें युक्तवद्भाव ( १।२।५१ ) झाला आहे.

२—येथें पाटलि शब्दाहून अण् प्रत्यय ( ४।३। १३६ ) झाला आहे.

१—( सू. १६७ ) हरीतकी वगैरे शब्दाहून फलरूपी विकार या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुप् होतो. उदा०—हरीतक्याः फलानि हरीतक्यः, येथें युक्तवद्भावानें ( १।२।५१ ) फक्त स्त्रीलिंग झालें आहे.

१—( सू. १६८ ) कंसीय हा छ-प्रत्ययान्त शब्द ( ५।१।५ ) आणि परशव्य हा यत्-प्रत्ययान्त ( ५।१।२ ) शब्द यांहून विकार या अर्थी यञ् व अञ् हे प्रत्यय क्रमानें होतात; आणि त्या प्रत्ययांबरोबर त्या कंसीय व परशव्य या शब्दांतील छ प्रत्यय आणि यत् प्रत्यय यांचा लुक् होतो. उदा०—कंसाय हितम् कंसीयम्, कंसीयस्य विकारः कांस्यम् परशवे हितं परशव्यम्, परशव्यस्य विकारः पारशवः.

अ. ४ पा. ३ आ २ समाप्त; व पादही समाप्त.

प्राग्वहतेष्ठक् ॥ ४ । ४ । १ ॥

ठक्प्रकरणे तदाहेति माशब्दादिभ्य उपसंख्यानम् ॥ १ ॥

ठक्प्रकरणे तदाहेति माशब्दादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । माशाब्दिकः नैत्यशाब्दिकः कार्यशाब्दिकः ॥

आहौ प्रभूतादिभ्यः ॥ २ ॥

आहौ प्रभूतादिभ्यष्ठग्वक्तव्यः । प्रभूतमाह प्राभूतिकः । पार्याप्तिकः ॥

पृच्छतौ सुस्नातादिभ्यः ॥ ३ ॥

पृच्छतौ सुस्नातादिभ्यष्ठग्वक्तव्यः । सौस्नातिकः सौखरात्रिकः सौखशायिकः ॥

गच्छतौ परदारादिभ्यः ॥ ४ ॥

गच्छतौ परदारादिभ्यष्ठग्वक्तव्यः । पारदारिकः गौरुतल्पिकः ॥

[ तेन दीव्यति खनति जयति जितम् ॥ ४ । ४ । २ ॥

संस्कृतम् ॥ ४ । ४ । ३ ॥

कुलत्थकोपधादण् ॥ ४ । ४ । ४ ॥

तरति ॥ ४ । ४ । ५ ॥

गोपुच्छाट्ठञ् ॥ ४ । ४ । ६ ॥

नौद्व्यचष्ठन् ॥ ४ । ४ । ७ ॥

---

( सू. १ वा. १ ) मा वगैरे शब्दांहून 'तें सांगतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो असें ठक् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें उपसंख्यान करावें. उदा० मा शब्दम् आह माशब्दिकः, नित्यनैत्यशब्दिकः, कार्यशब्दिकः.

( वा. २ ) प्रभूत वगैरे शब्दांहून 'तसें सांगतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० प्रभूतम् आह प्राभूतिकः, पार्याप्तिकः.

( वा. ३ ) सुस्नात वगैरे शब्दांहून 'तसा प्रश्न करतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० सुस्नातं पृच्छति सौस्नातिकः.

( वा. ४ ) परदार वगैरे शब्दांहून 'गच्छति' या अर्थी ठक् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० परदारान् गच्छति पारदारिकः, गुरुतल्पं गच्छति गौरुतल्पिकः.

---

१—( सू. १ ) हें अधिकार-सूत्र आहे. 'वहति' हा अर्थ ( ४।४।७६ ) पुढें सांगितला आहे. त्याच्या पूर्वीचे जे अर्थ निर्दिष्ट केले आहेत त्या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—अक्षैः दीव्यति आक्षिकः इत्यादि. प्राग्दीव्यतोऽण् ( ४।१।८३ ) या अण् प्रत्ययाची मर्यादा येथें पूर्ण झाली.

२—'शब्द करूं नको' असें सांगणारा 'माशब्दिक' होय. शब्द नित्य आहे असें सांगणारा वैयाकरण 'नैत्यशब्दिक' होय. शब्द हा कार्य आहे असें सांगणारा नैयायिक 'कार्यशब्दिक' होय.

१—( सू. २ ) प्रातिपदिकाहून त्या साधनानें खेळतो, त्या साधनानें खणतो, त्या साधनानें जिंकतो आणि त्या साधनानें जिंकलेली वस्तु या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा.०—अक्षैर्दीव्यति आक्षिकः, अभ्र्या खनति आभ्रिकः, अक्षैर्जयति आक्षिकः, अक्षैर्जितम् आक्षिकम्.

१—( सू. ३ ) प्रातिपदिकाहून 'त्यानें संस्कार केलेलें' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा.०—दध्ना संस्कृतम् दाधिकम्.

१—( सू. ४ ) कुलत्थ शब्द आणि उपधेला ककार असलेला शब्द यांहून 'त्यानें संस्कारलेलें' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—कुलत्थैः संस्कृत कौलत्थम्, तैत्तिडीकम्.

१—( सू. ५ ) प्रातिपदिकाहून 'त्या साधनानें तरतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—उडुपेन तरति औडुपिकः.

१—( सू. ६ ) गोपुच्छ शब्दाहून त्या साधनानें तरतो या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा.०—गोपुच्छेन तरति गौपुच्छिकः.

१—( सू. ७ ) नौ शब्द आणि दोन अच् असलेले शब्द यांहून 'त्या साधनानें तरतो' या अर्थी ठन् प्रत्यय होतो. उदा०—नावा तरति नाविकः, घटेन तरति घटिकः.

**चरति ॥ ४ । ४ । ८ ॥**

**आकर्षात्ष्ठल् ॥ ४ । ४ । ९ ॥**

इह केषांचित्सांहितिकं षत्वं केषांचित्षिदर्थम् । तत्र न ज्ञायते केषां सांहितिकं षत्वं केषां षिदर्थमिति । तत्र किं न्याय्यम् । परिगणनं कर्तव्यम् ।

आकर्षात्पर्पादेर्भस्त्रादिभ्यः कुसीदसूत्राच्च ।
आवसथात्किसरादेः षितः षडेते ठगधिकारे ॥

**[ पर्पादिभ्यः ष्ठन् ॥ ४ । ४ । १० ॥**

**श्वगणाट्ठञ् च ॥ ४ । ४ । ११ ॥**

**वेतनादिभ्यो जीवति ॥ ४ । ४ । १२ ॥**

**वस्नक्रयविक्रयाट्ठन् ॥ ४ । ४ । १३ ॥**

**आयुधाच्छ च ॥ ४ । ४ । १४ ॥**

**हरत्युत्सङ्गादिभ्यः ॥ ४ । ४ । १५ ॥**

**भस्त्रादिभ्यः ष्ठन् ॥ ४ । ४ । १६ ॥**

---

( सू. ९ ) येथें कांहीं सूत्रांमध्यें प्रत्ययाजवळ दृष्टी पडणारा षकार हा प्रत्ययापैकीं नसून संधीमुळें झालेला असतो आणि कांहीं ठिकाणीं प्रत्ययापैकींच इत्संज्ञक षकार असतो. तेव्हां कोठें संधीनें झालेला आणि कोठें प्रत्ययाचाच इत्संज्ञक षकार असतो हें समजत नाहीं.

मग त्याला काय युक्ति करावी बरें ?

परिगणन करावें. तें असें —

( श्लो. १ ) ह्या ठक् प्रत्ययाच्या अधिकारामध्यें आकर्षात् ष्ठल् ( ४ । ४ । ९ ) पर्पादिभ्यः ष्ठन् ( ४ । ४ । १० ] भस्त्रादिभ्यः ष्ठन् ( ४ । ४ । १६ ) कुसीददशैकादशात् ष्ठन्ष्ठचौ (४।४।४१) आवसथात् ष्ठल् ( ४ । ४ । ७४ ) आणि किसरादिभ्यः ष्ठन् ( ४ । ४ । ५३ ) या सहा सूत्रांनीं सांगितलेले प्रत्यय इत्संज्ञक षकारानें युक्त आहेत असें समजावें.

---

१—( सू. ८ ) प्रातिपदिकाहून ‘ चरति ’ म्हणजे ‘ त्या साधनानें भक्षण करतो ’ किंवा ‘ त्या साधनानें गमन करतो ’ या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—दध्ना चरति दाधिकः, शकटेन चरति शाकटिकः.

१—( सू. ९ ) आकर्ष शब्दाहून ‘ चरति ’ या अर्थी ष्ठल् प्रत्यय होतो. उदा०—आकर्षेण चरति आकर्षिकः. आकर्ष म्हणजे कसोटीचा धोंडा.

१—( सू. १० ) पर्पादि गणांतील शब्दांहून ‘ चरति ’ या अर्थी ष्ठन् प्रत्यय होतो. उदा०—पर्पेण चरति पर्पिकः. पर्प म्हणजे पांगळ्याचें संचार करण्याचें साधन ( पांगुळगाडा वगैरे ).

१—( सू. ११ ) श्वगण शब्दाहून चरति या अर्थी ठञ् आणि ठन् असे प्रत्यय होतात. उदा०—श्वगणेन चरति श्वागणिकः. ठञ् प्रत्यय केला तेव्हां स्त्रीलिंगी ङीप् प्रत्यय ( ४ । १ । १५ ) होतो. आणि ठन् केला त्या वेळीं स्त्रीलिंगी टाप् प्रत्यय (४ । १ । ४) होतो. श्वागणिकी, श्वागणिका.

१—( सू. १२ ) वेतनादि गणांतील शब्दांहून ‘ तेन जीवति ’ म्हणजे त्या साधनानें उपजीविका करतो या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—वेतनेन जीवति वैतनिकः कर्मकरः.

१—( सू. १३ ) वस्न, क्रय, विक्रय आणि क्रयविक्रय या शब्दांहून ‘ तेन जीवति ’ या अर्थी ठन् प्रत्यय होतो. उदा०—वस्नेन जीवति वस्निकः इत्यादि. वस्न म्हणजे किंमत.

१—( सू. १४ ) आयुध शब्दाहून ‘ तेन जीवति ’ या अर्थी छ आणि ठन् हे प्रत्यय होतात. उदा०—आयुधीयः, आयुधिकः.

१—( सू. १५ ) उत्सङ्गादि गणांतील शब्दांहून ‘ तेन हरति ’ म्हणजे त्या साधनानें दुसरीकडे नेतो या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उत्सङ्गेन हरति औत्सङ्गिकः.

१—( सू. १६ ) भस्त्रा वगैरे शब्दांहून ‘ तेन हरति ’ या अर्थी ष्ठन् प्रत्यय होतो. उदा०—भस्त्रया हरति भस्त्रिकः.

**विभाषा विवधात् ॥४।४।१७॥**

वीवधाच्चेति वक्तव्यम् । वैवधिकः ॥

**[अण् कुटिलिकायाः ॥४।४।१८॥**

**निर्वृत्तेऽक्षद्यूतादिभ्यः ॥४।४।१९॥]**

**क्त्रेर्मम् नित्यम् ॥४।४।२०॥**

नित्यग्रहणं किमर्थम् । विभाषा मा भूत् । नैतदस्ति प्रयोजनम् । पूर्वस्मिन्नेव योगे विभाषाग्रहणं निवृत्तम् ॥ इदं तर्हि प्रयोजनम् ।

**क्त्रेर्मन्नित्यवचनं विषयार्थम् ॥ १ ॥**

नित्यं क्त्र्यन्तं मब्विषयमेव यथा स्यात्केवलस्य प्रयोगो मा भूत् ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**तत्र यथाधिकारं तद्विषयप्रसङ्गः ॥ २ ॥**

तत्र यथाधिकारं तद्विषयता प्राप्नोति । निर्वृत्त इति वर्तते तेन निर्वृत्त एव क्त्र्यन्तं मब्विषयं स्याद्येऽन्य उपचारास्तत्र न स्यात् । कृत्रिमं महत्सुविहितमिति ॥ एवं तर्हि भाव इति प्रकृत्येमब्वक्तव्यः कुट्टिमा भूमिः

(सू. १७) वीवध शब्दाहूनही हे प्रत्यय होतात असें म्हणावें. उदा० वीवधिकः, वैवधिकः.

(सू. २०) येथें नित्यम् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

हा मप् प्रत्यय विकल्पानें होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण पूर्वसूत्रांतच मुळीं विभाषापद अनुवृत्त आलें नाहीं.

तर मग येथें नित्य-ग्रहणाचा असा उपयोग समजावा—

(वा. १) त्रि.-प्रत्ययान्ताचा प्रयोग नेहमीं मप् प्रत्ययाच्या विषयांतच झाला पाहिजे. मप् प्रत्यय केल्याशिवाय केवळ त्रिप्रत्ययान्ताचा प्रयोग होऊं नये याकरितां येथें नित्यम् असें म्हटलें आहे.

हा उपयोग आहे खरा.

मग आतां पुढें तुमचें काय म्हणणें आहे ?

(वा. २) मप् प्रत्ययाच्या प्रयोगांतच त्रि प्रत्यय होईल. पण तो चालू असलेल्या अधिकाराला अनुसरून होईल. म्हणजे निर्वृत्ते या अर्थाचा अधिकार येथें चालू आहे. तेव्हां निर्वृत्त या अर्थाची विवक्षा असतांना तेथेंच फक्त केवळ त्रि-प्रत्ययान्ताचा प्रयोग न होतां कायमचा मप् प्रत्यय होईल. कृत्रिमं महत् सुविहितम् इत्यादि इतर व्यवहारामध्यें हा नियम लागू होणार नाहीं.

तर मग कुट्टिमा भूमिः, सेक्त्रिमः असिः ही उदाहरणें साधण्याकरितां भावे असें प्रक-

१—(सू. १७) विवध शब्दाहून 'तेन हरति' या अर्थी ष्ठन् प्रत्यय विकल्पानें होतो. विवधेन हरति विवधिकः, वैवधिकः. विवध म्हणजे कावड.

१—(सू. १८) कुटिलिका शब्दाहून 'तेन हरति' या अर्थी अण् प्रत्यय होतो उदा०—कुटिलिकया हरति कौटिलिकः व्याधः कर्मारो वा. कुटिलिका म्हणजे वक्रगति, किंवा सोनाराचें लहानसें लोखंडी शस्त्र.

१—(सू. १९) अक्षद्यूत वगैरे शब्दांहून 'तेन निर्वृत्तम्' म्हणजे त्यामुळें निर्माण झालेलें या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—अक्षद्यूतेन निर्वृत्तम् आक्षद्यूतिकम् वैरम्.

१—(सू. २०) त्रिप्रत्ययान्त शब्दाहून 'निर्वृत्त' या अर्थी मप् प्रत्यय होतोच. उदा०-पाकेन निर्वृत्तम् पक्त्रिमम् येथे पच् धातूहून भावी त्रिप्रत्यय (३।३।८८) व पुढे हा मप् झाला आहे.

२—तेव्हां येथें विभाषापदाची अनुवृत्ति येतच नाही म्हणून आपोआपच हा प्रत्यय नित्य होईल.

३—येथें मोठी आणि चांगली योजिलेली कृति असा अर्थ दाखविण्याचा उद्देश आहे तरी पण 'निर्वृत्त' या अर्थी पुढे मप् प्रत्यय करूनच प्रयोग करावा लागत आहे. तेव्हां अशा ठिकाणीं मप् प्रत्ययावांचूनही प्रयोग होऊ लागेल.

सेकिमोऽसिरित्येवमर्थम्। ततो वक्तव्यं त्रेः। त्रेश्चेमब्भवति। ततो नित्यम्। नित्यं श्यन्तादिमबिति। किमर्थमिदम्। नित्यं श्यन्तमिमाब्विषय एव यथा स्यात्केवलस्य प्रयोगो मा भूदिति ॥

**[ अपमित्ययाचिताभ्यां कक्कनौ ॥ ४ । ४ । २१ ॥**

**[ संसृष्टे ॥ ४ । ४ । २२ ॥ ]**

**चूर्णादिनिः ॥ ४ । ४ । २३ ॥**

अयं योगः शक्योऽवक्तुम्। कथं चूर्णी चूर्णिनौ चूर्णिन इति। इनिनैतन्मत्वर्थीयेन सिद्धम् ॥

**लवणाल्लुक् ॥ ४ । ४ । २४ ॥**

**लवणाल्लुग्वचनानर्थक्यं रसवाचित्वात् ॥ १ ॥**

लवणाल्लुग्वचनमनर्थकम्। किं कारणम्। रसवाचित्वात्। रसवाच्येष लवणशब्दो नैष संसृष्टनिमित्तः॥ आतश्च रसवाची

**असंसृष्टे च दर्शनात् ॥ २ ॥**

असंसृष्टेऽपि हि लवणशब्दो वर्तते। तद्यथा। लवणं क्षीरम्। लवणं पानीयमिति ॥

**संसृष्टे चादर्शनात् ॥ ३ ॥**

संसृष्टेऽपि च यदा नोपलभ्यते तदाह

---

रण चालू करून भाव—प्रत्ययान्ताहून निर्वृत्त या अर्थी इमप् प्रत्यय सांगितलाच पाहिजे. त्याच्या पुढें 'त्रेः' असें सूत्र करावें. त्रि-प्रत्ययान्ताहून इमप् प्रत्यय होतोच असा त्याचा अर्थ होईल. त्याच्या पुढे 'नित्यम्' असें सूत्र करावें. पूर्वसूत्रानें जो त्रिप्रत्ययान्ताहून इमप् प्रत्यय सांगितला आहे तो नित्य होतोच असा त्याचा अर्थ होईल.

'नित्यम्' हें सूत्र कशाकरितां ?

अशाकरितां कीं इमप् प्रत्यय कर्तव्य असेल तरच त्रिप्रत्ययान्ताचा प्रयोग झाला पाहिजे. त्याशिवाय केवल त्रिप्रत्ययान्ताचा प्रयोग न झाला पाहिजे.

(सू. २३) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल.

पण मग चूर्णी चूर्णिनौ चूर्णिनः हे प्रयोग कसे साधतील.

मत्वर्थीय इनि (५।२।११५) प्रत्ययानेंच ते प्रयोग साधतील.

(सू. २४ वा. १) लवण शब्दाच्या पुढील संसृष्ट या अर्थाच्या प्रत्ययाचा लुक् होतो हें सांगणें व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं लवण शब्द हा रसवाचक आहे. 'खारें' या अर्थाचा हा लवण शब्द आहे; मिठानें संसृष्ट या अर्थाचा हा लवण शब्द नव्हे. शिवाय 'खारें' या अर्थाचा लवण शब्द स्वतंत्र आहे. याचें कारण असें कीं—

लवणं क्षीरम् लवणं पानीयम् येथें मीठ मिसळलें नसतांही लवण शब्दाचा प्रयोग झालेला दृष्टीस पडतो.

शिवाय मीठ घातलें असूनही जेव्हां वरण

---

१—(सू. २१) अपमित्य आणि याचित या शब्दांहून 'निर्वृत्त' या अर्थी क्रमानें कक् आणि कन् हे प्रत्यय होतात. उदा०—अपमित्य निर्वृत्तम् आपमित्यकम्, म्हणजे अदलाबदल करून केलेलें; याचितेन निर्वृत्तम् याचितकम्.

१—(सू. २२) प्रातिपदिकाहून त्यानें संसृष्ट म्हणजे संबद्ध या अर्थी ठक् प्रत्यय होतो. दध्ना संसृष्टम् दाधिकम्.

१—(सू. २३) चूर्ण शब्दाहून 'त्यानें संसृष्ट' या अर्थी इनि प्रत्यय होतो, उदा०—चूर्णैः संसृष्टाः चूर्णिनः अपूपाः.

१—(सू. २४) लवण शब्दाहून 'त्यानें संसृष्ट' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो. उदा०—लवणेन संसृष्टः लवणः सूपः.

अलवणः सूपः अलवणं शाकमिति ॥

[ मुद्गादण् ॥ ४ । ४ । २५ ॥

व्यञ्जनैरुपसिक्ते ॥ ४ । ४ । २६ ॥

ओजःसहोम्भसा वर्तते ॥ ४ । ४ । २७ ॥

तत्प्रत्यनुपूर्वमीपलोमकूलम् ॥ ४ । ४ । २८ ॥

परिमुखं च ॥ ४ । ४ । २९ ॥ ]

प्रयच्छति गर्ह्यम् ॥ ४ । ४ । ३० ॥

अयुक्तोऽयं निर्देशः । यदसावल्पं दत्त्वा बहु गृह्णाति तद्गर्ह्यम् । कथं तर्हि निर्देशः कर्तव्यः ।

प्रयच्छति गर्ह्याय ॥ १ ॥

इति ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । तादर्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । गर्ह्यार्थं गर्ह्यम् ॥

मेस्याल्लोपो वा ॥ २ ॥

मेस्याच्छब्दलोपो वा द्रष्टव्यः । द्विगुणं

---

वगैरे पदार्थ खारट लागत नाहींत तेव्हां अनलवणः सूपः अलवणं शाकम् असेच प्रयोग होतात. संसृष्ट या अर्थाच्या प्रत्ययाचा लुक् करून साधलेला लवण शब्दाचा प्रयोग ' लवणः सूपः ' असा तेथें दिसत नाहीं.

( सू. ३० ) हा निर्देश अयुक्त दिसतो कारण, देणारा मनुष्य हा थोडें देऊन जें जास्त घेतो तें निन्द्य होतें.

तर मग येथें कसें वरें म्हटलें पाहिजे ?

( वा. १ ) गर्ह्यम् याच्या ऐवजीं गर्ह्याय म्हणावें. म्हणजे निन्द्य घेण्याकरितां जें दिलें जातें तद्वाचक शब्दाहून 'तें देतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो असा अर्थ होईल.

तर मग तसा निर्देश केला पाहिजे.

तसा निर्देश करावयास नको. कारण ज्या पदार्थांकरितां जी वस्तु उपयोगीं पडते त्या पदार्थाचा वाचक शब्द त्या वस्तूला लावतां येतो. तेव्हां येथें द्विगुण घेण्याकरितां जें थोडें द्रव्य दिलें जातें त्या थोडया द्रव्यालाच येथें लक्षणेनें द्विगुण शब्द लावला आहे. तेव्हां घेतलें जाणारें द्विगुण हें निन्द्य असल्यामुळें त्या उद्देशानें दिलें जाणारें थोडें द्रव्यही निन्द्यच समजलें जातें.

( वा. २ ) अथवा ' मे स्यात् ' या शब्दांचा येथें लोप होतो असें समजावें. 'द्विगुणं मे स्यात् ' या वाक्याहून ' त्या बुद्धीनें देतो '

---

१—( सू. २५ ) मुद्ग शब्दाहून ' त्यानें संसृष्ट ' या अर्थी अण् प्रत्यय होतो; ठक् प्रत्यय होत नाहीं. उदा० मौद्गः औदनः.

१—( सू. २६ ) व्यञ्जनवाचक शब्दाहून ' त्यानें उपसिक्त ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—दध्ना उपसिक्तं दाधिकम्.

१—( सू. २७ ) ओजस् सहस् आणि अम्भस् या शब्दांहून ' त्या योगानें वर्तन करतो ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—ओजसा वर्तते औजसिक. शूरः; साहसिकश्चौरः; आम्भसिको मत्स्यः.

१—( सू. २८ ) प्रति किंवा अनु हे शब्द ज्याच्या पूर्वी आहेत असे जे ईप, लोम आणि कूल हे शब्द तदन्त प्रातिपदिकाहून ' तसें वर्तन करतो ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—प्रतीप वर्तते प्रातीपिकः इत्यादि.

१—( सू. २९ ) परिमुख शब्दाहून ' तसें वर्तन करतो ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—परिमुखं वर्तते पारिमुखिकः.

१—( सू. ३० ) प्रातिपदिकाहून ' तें देतो ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो, परंतु तें दिलें जाणारें द्रव्य निंद्य असलें पाहिजे. उदा०—द्विगुणं प्रयच्छति द्वैगुणिकः. येथें दुप्पट होण्याकरितां दिलें जाणाऱ्या थोड्या द्रव्य ला द्विगुण शब्द लक्षणेनें लावला आहे. व त्या अर्थाच्याच द्विगुण शब्दाहून येथें प्रत्यय झाला आहे. द्विगुण व्हावें या उद्देशानें दिलें जातें म्हणूनच तें निंद्य होय.

मे स्यादिति प्रयच्छति द्वैगुणिकः। त्रैगुणिकः ॥

**वृद्धेर्वृधुषिभावः ॥ ३ ॥**

वृद्धेर्वृधुषिभावो वक्तव्यः। वार्धुषिकः॥

**[ कुसीददशैकादशात्ष्ठन्ष्ठचौ ॥ ४ । ४ । ३१ ॥**

**उञ्छति ॥ ४ । ४ । ३२ ॥**

**रक्षति ॥ ४ । ४ । ३३ ॥**

**शब्ददर्दुरं करोति ॥ ४ । ४ । ३४ ॥**

**पक्षिमत्स्यमृगान् हन्ति ॥ ४ । ४ । ३५ ॥**

**परिपन्थं च तिष्ठति ॥ ४ । ४ । ३६ ॥**

**माथोत्तरपदपदव्यनुपदं धावति ॥ ४ । ४ । ३७ ॥**

**आक्रन्दाट्ठञ् च ॥ ४ । ४ । ३८ ॥**

**पदोत्तरपदं गृह्णाति ॥ ४ । ४ । ३९ ॥**

**प्रतिकण्ठार्थललामं च ॥ ४ । ४ । ४० ॥**

**धर्मं चरति ॥ ४ । ४ । ४१ ॥**

---

या अर्थी ठक् प्रत्यय होऊन त्या प्रत्ययाच्या बरोबर त्या वाक्यांतील 'मे स्यात्' या पदांचा लोप झाला आहे. उदा० द्वैगुणिकः, त्रैगुणिकः.

( वा. ३ ) वृद्धीकरितां दिलें जाणारें द्रव्य या अर्थाच्या वृद्धि शब्दाहून 'तें देतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो आणि त्या ठक् प्रत्ययाच्या बरोबर वृद्धि शब्दाला वृधुषि असा आदेश होतो असें म्हणावें. उदा० — वार्धुषिकः.

---

१—( सू. ३१ ) कुसीद व दशैकादश या शब्दांहून 'तें देतो' या अर्थी क्रमानें ष्ठन् व ष्ठच् हे प्रत्यय होतात. उदा०—कुसीदं प्रयच्छति कुसीदिकः, कुसीद शब्दाचा मूळचा अर्थ व्याज असा आहे. परतु येथें व्याज मिळण्याकरिता दिलें जाणारें द्रव्य असा त्या शब्दाचा अर्थ आहे, दशैकादशिक· ( अकरा होण्याकरितां दहा देणारा मनुष्य ).

१—( सू. ३२ ) प्रातिपदिकाहून 'तें वेंचतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—बदराणि उञ्छति बादरिकः. बोरें वेंचणारा मनुष्य हा अर्थ आहे.

१—( सू ३३ ) प्रातिपदिकाहून 'त्याचें रक्षण करतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—समाजं रक्षति सामाजिकः.

१—( सू. ३४ ) शब्द आणि दर्दुर या शब्दांहून 'करोति' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. करोति म्हणजे करतो. उदा०—शब्दं करोति शाब्दिकः वैयाकरणः. दर्दुरं करोति दार्दुरिकः कुम्भकारः. दर्दुर म्हणजे वाद्यविशेषाचे मातीचे साचे.

१—( सू. ३५ ) पक्षिवाचक, मत्स्यवाचक आणि मृगवाचक या शब्दांहून 'हन्ति' म्हणजे त्यांना मारतो या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—पाक्षिकः, शाकुनिकः, मायूरिकः इत्यादि.

१—( सू ३६ ) परिपन्थ शब्दाहून 'तिष्ठति' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—पारिपन्थिकः चौरः. वाटेंत उभा राहणारा हा अर्थ आहे.

१—( सू. ३७ ) ज्यामध्यें माथ शब्द उत्तरपद आहे असे शब्द आणि पदवी व अनुपद हे शब्द यांहून 'धावति' म्हणजे धावतो या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—दण्डमाथं धावति दाण्डमाथिकः. दण्डमाथ म्हणजे सरळ लांबलचक मार्ग.

१—( सू. ३८ ) आक्रन्द शब्दाहून 'धावति' या अर्थी ठञ् व ठक् असे प्रत्यय होतात. आक्रन्दं धावति आक्रन्दिकः. आक्रन्द म्हणजे रोदनस्थान.

१—( सू. ३९ ) ज्यामध्यें पद शब्द उत्तरपद आहे अशा शब्दाहून 'गृह्णाति' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—पौर्वपदिकः.

१—( सू. ४० ) प्रतिकण्ठ, अर्थ आणि ललाम या शब्दांहून 'गृह्णाति' या अर्थी ठक् प्रत्यय होतो उदा०—प्रातिकण्ठिकः.

१—( सू. ४१ ) धर्म शब्दाहून 'त्याप्रमाणें नेहमीं वागणारा' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—धर्मं चरति धार्मिकः.

अधर्माच्च ॥ १ ॥

अधर्माच्चेति वक्तव्यम् । आधार्मिकः ॥

[ प्रतिपथमेति ठंश्च ॥ ४ । ४ । ४२ ॥

समवायान् समवैति ॥ ४ । ४ । ४३ ॥

परिषदो ण्यः ॥ ४ । ४ । ४४ ॥

सेनाया वा ॥ ४ । ४ । ४५ ॥

संज्ञायां ललाटकुक्कुट्यौ पश्यति ॥ ४ । ४ । ४६ ॥

तस्य धर्म्यम् ॥ ४ । ४ । ४७ ॥

अण् महिष्यादिभ्यः ॥ ४ । ४ । ४८ ]

ऋतोऽञ् ॥ ४ । ४ । ४९ ॥

नृनराभ्यामञ्वचनम् ॥ १ ॥

नृनराभ्यामञ्चेति वक्तव्यम् । नुर्धर्म्या नारी । नरस्यापि नारी ॥

विशसितुरिड्लोपश्च ॥ २ ॥

विशसितुरिड्लोपश्चाञ्च वक्तव्यः । विशसितुर्धर्म्यं वैशस्त्रम् ॥

विभाजयितुर्णिलोपश्च ॥ ३ ॥

विभाजयितुर्णिलोपश्चाञ्च वक्तव्यः ।

---

( सू. ४१ वा. १ ) अधर्म शब्दाहूनही ' अधर्मानें वागणारा ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० आधर्मिकः.

( सू. ४९ वा. १ ) हा अञ् प्रत्यय नृ आणि नर या शब्दांहूनही होतो असें म्हणावें. उदा० नुः धर्म्या नारी. नर शब्दाचेंही नारी असेंच रूप होतें.

( वा. २ ) विशसितृ शब्दाहून धर्म्य या अर्थी अञ् प्रत्यय होतो; आणि त्याच्या बरोबरच विशसितृ शब्दांतील इट् आगमाचा लोप होतो. उदा० विशसितुः धर्म्यं वैशस्त्रम्.

( वा. ३ ) विभाजयितृ शब्दाहूनही धर्म्य या अर्थी अञ् प्रत्यय होतो आणि त्याच्याबरोबरच विभाजयितृ शब्दांतील णि प्रत्ययाचा

---

१—( सू. ४२ ) प्रतिपथ शब्दाहून ' एति ' या अर्थी ठन् व ठक् हे प्रत्यय होतात. प्रतिपथमेति प्रातिपथिकः. प्रत्येक मार्गानें जाणारा हा अर्थ आहे.

१—( सू. ४३ ) समुदायवाचक शब्दाहून ' समवैति ' म्हणजे त्यामध्यें मिळतो या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—सामवायिकः, सामाजिकः.

१—( सू. ४४ ) परिषद् शब्दाहून ' समवैति ' या अर्थी ण्य प्रत्यय होतो. उदा०—परिषदं समवैति पारिषद्यः.

१—( सू. ४५ ) सेना शब्दाहून ' समवैति ' या अर्थी ण्य प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—सेनायां समवैति सैन्यः, सैनिकः.

१—( सू. ४६ ) ललाट आणि कुक्कुटी या शब्दांहून ' त्याला पाहणारा ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—ललाटं पश्यति लालाटिकः सेवकः. जवळ न येतां लांबून मालकाच्या कपाळाकडे नुसतें पाहणारा म्हणजे लांबून तोंड दाखवून जवळ न येतां काम चुकविणारा. तसेंच कौक्कुटिकः. कुक्कुटी शब्दाचा मूळचा अर्थ कोंबडी असा आहे. पण येथें कोंबडीच्या उडण्याचा स्वल्प प्रदेश असा अर्थ लक्षणेनें घेतला आहे. तेवढ्याच प्रदेशाला पाहणारा संन्याशी हा अर्थ आहे. संन्याशानें जास्त लांबवर नजर देऊं नये असा त्याचा धर्मच आहे.

१—( सू. ४७ ) प्रातिपदिकाहून त्याचें धर्म्य म्हणजे त्याच्या धर्मातून न सुटलेले या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—आपणस्य धर्म्यम् आपणिकम्.

१-( सू. ४८ ) महिषी वगैरे शब्दांहून ' त्याचें धर्म्य ' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०-महिष्याः धर्म्यम् माहिषम्.

१-( सू.४९) ऱ्हस्व ऋकारान्त शब्दाहून ' त्याचें धर्म्य ' या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०-उद्गातुः धर्म्यम् औद्गात्रम्.

२-विशसितृ शब्दामध्यें विपूर्वक शस् धातूहून तृच् प्रत्यय व त्याला इट् आगम झाला आहे.

विभाजयितुर्धर्म्यं वैभाजित्रम् ॥

[ अवक्रयः ॥ ४ । ४ । ५० ॥

तदस्य पण्यम् ॥ ४ । ४ । ५१ ॥

लवणाट्ठञ् ॥ ४ । ४ । ५२ ॥

किशरादिभ्यः ष्ठन्
॥ ४ । ४ । ५३ ॥

शलालुनोऽन्यतरस्याम्
॥ ४ । ४ । ५४ ॥ ]

शिल्पम् ॥ ४ । ४ । ५५ ॥

किं यस्य मृदङ्गः शिल्पं स मार्दङ्गिकः । किं चातः । कुम्भकारे प्राप्नोति । एवं तर्ह्युत्तरपदलोपो द्रष्टव्यः । शिल्पमिव शिल्पम् । मृदङ्गवादनं शिल्पमस्य मार्दङ्गिकः । पैठरिकः ॥

[ मड्डुकझर्झरादणन्यतरस्याम्
॥ ४ । ४ । ५६ ॥

प्रहरणम् ॥ ४ । ४ । ५७ ॥

परश्वधाट्ठञ् च ॥ ४ । ४ । ५८ ॥

---

लोप होतो. उदा० विभाजयितुः धर्म्यं वैभाजित्रम्.

( सू. ५५ ) ज्याचें मृदंग शिल्प आहे, त्याला मार्दङ्गिक म्हणावयाचें काय ?

तसें म्हटलें तर काय बरें होईल ?

कुंभकारालाही मार्दङ्गिक म्हणावें लागेल ना ?

तर मग ह्या सूत्रामध्यें उत्तरपद अशा इव शब्दाचा लोप करून शिल्प शब्द उच्चारला आहे असें समजावें. शिल्पमिव शिल्पम्. उदा० मृदङ्गवादनं शिल्पम् अस्य मार्दङ्गिकः, मौरजिकः, पाणविकः, पैठरिकः.

---

१—विभाजयितृ शब्दामध्यें विउपसर्गपूर्वक भज् धातूहून णि प्रत्यय, पुढें तृच् प्रत्यय व त्याला इट् आगम अशी कार्यें झालीं आहेत.

१–( सू.५० ) प्रातिपदिकाहून ' त्याचा अवक्रय ' या अर्थीं ठक् प्रत्यय होतो. उदा०–शुल्कशालाया अवक्रयः शौल्कशालिकः. अवक्रय म्ह. ज्यामुळे विकण्याला परवानगी मिळते असा राजग्राह्य भाग ( कर ).

१–( सू. ५१ ) प्रातिपदिकाहून ' तें आहे पण्य म्हणजे विक्रेय वस्तु ज्याची ' या अर्थीं ठक् प्रत्यय होतो. उदा० अपूपाः पण्यमस्य आपूपिकः.

१–( सू. ५२ ) लवण शब्दाहून ' तें आहे पण्य ज्याचें ' या अर्थीं ठञ् प्रत्यय होतो. उदा०–लवणं पण्यमस्य लावणिकः.

१–( सू. ५३ ) किशर वगैरे शब्दांहून ' पण्य ' या अर्थीं ष्ठन् प्रत्यय होतो. उदा०–किशरिकः. किशर म्ह. एक प्रकारचें सुगंधि द्रव्य.

१–( सू. ५४ ) शलालु शब्दाहून ' पण्य ' या अर्थीं ष्ठन् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०–शलालुकः. एकदां येथें ठक् प्रत्यय होतो. शालालुकः (७।३।५१).

१–( सू. ५५ ) प्रातिपदिकाहून ' तें शिल्प ज्याचें ' या अर्थीं ठक् प्रत्यय होतो. उदा०–मृदङ्गवादनं शिल्पमस्य मार्दङ्गिकः. येथें मृदंग शब्दाचा मृदंगवादन असा अर्थ आहे.

२–कारण, कुम्भार हा मृदंग तयार करणारा आहे. त्यानें चांगला मृदंग तयार केला असला तरच तेथें वाजविणाराचें कौशल्य उपयोगी पडतें. तेव्हां त्या कामीं मुख्य शिल्प कुंभाराचेंच आहे, आणि वाजविणाराचें शिल्प गौण आहे.

१–( सू. ५६ ) मड्डुक आणि झर्झर या शब्दांहून ' तें आहे शिल्प ज्याचें ' या अर्थीं अण् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०–माड्डुकः, झार्झरः. एकदां ठक् प्रत्ययही होतो. माड्डुकिकः, झार्झरिकः. मड्डुक व झर्झर हीं वाद्यें आहेत.

१–( सू. ५७ ) प्रातिपदिकाहून ' तें आहे प्रहरण म्ह. आयुध ज्याचें ' या अर्थीं ठक् प्रत्यय होतो. उदा०–असिः प्रहरणमस्य आसिकः.

१–( सू. ५८ ) परश्वध शब्दाहून ' तें आहे प्रहरण ज्याचें ' या अर्थीं अण् व ठक् हे प्रत्यय होतात. पारश्वधः, पारश्वधिकः.

## शाक्तियष्ट्योरीकक्
## ॥ ४ । ४ । ५९ ॥

किमर्थमीकगुच्यते न कगेवोच्येत । का रूपसिद्धिः शाक्तीकः याष्टीक इति । शक्तियष्ट्योरीकारोऽन्ते कशब्दश्च प्रत्ययः । न सिध्यति । विभाषा चैव हि शक्तियष्ट्योरीकारोऽपि च केऽणः [ ७.४.१३ ] इति ह्रस्वत्वं प्रसज्येत ॥ एवं तर्हि इकगुच्यते । का रूपसिद्धिः शाक्तीकः याष्टीक इति । सवर्णदीर्घत्वेन सिद्धम् । न सिध्यति । यस्येति लोपः प्राप्नोति । इकारोच्चारणसामर्थ्यान्न भविष्यति । यदि तर्हि प्राप्नुवन्विधिरुच्चारणसामर्थ्याद् बाध्यते सवर्णदीर्घत्वमपि न प्राप्नोति । यं विधिं प्रत्युपदेशोऽनर्थकः स विधिर्बाध्यते यस्य तु विधेर्निमित्तमेव नासौ बाध्यते । यस्येति लोपं च प्रतीकारोच्चारणमनर्थकं सवर्णदीर्घस्य तु निमित्तमेव ॥

---

( सू. ५९ ) येथें ईकक् असा प्रत्यय कशाकरितां सांगितला आहे ? तसा सांगूं नये. तर कक् एवढाच प्रत्यय सांगावा.

पण कक् असा प्रत्यय सांगितला तर शाक्तीकः याष्टीकः ही उदाहरणें कशीं बरें साधतील ?

शक्ति व यष्टि या शब्दांच्या पुढें ईकार प्रत्यय ( ४।१।४५ ) केला आहे. आणि पुढें जो क शब्द दिसतो तो हा कक् प्रत्यय केला आहे.

तशा रीतीनें हीं उदाहरणें साधणार नाहींत. कारण तो ईकार प्रत्यय विकल्पाने सांगितला आहे. शिवाय तो ईकार प्रत्यय केला असतां त्याला ' केऽणः ' ( ७।४।१३ ) या सूत्रानें ऱ्हस्व प्राप्त होतो.

तर मग येथें इकक् असा प्रत्यय सांगावा.

पण इकक् असा प्रत्यय सांगितला तरी शाक्तीकः याष्टीकः हीं रूपें कशीं साधतील ?

सवर्णदीर्घ ( ६।१।१०१ ) केला म्हणजे तीं रूपें साधतील.

तरीं साधणार नाहींत. कारण सवर्णदीर्घाचा बाध करून ' यस्येति च ' ( ६।४।१४८ ) यानें शक्ति व यष्टि या शब्दांतील इकाराचा लोप प्राप्त होत आहे.

प्रत्ययाला इकार जो लावला आहे त्याच्या सामर्थ्यास्तव मागील इकाराचा लोप होणार नाहीं.

जर प्रत्ययाला इकार लावला तर त्याच्या सामर्थ्यास्तव इकक् प्रत्यय केल्यानंतर प्राप्त होणाऱ्या विधीचा बाध झाला तर सवर्ण दीर्घाचाही बाध होईल. तेव्हां तेथें तोही होणार नाहीं.

ज्या विधीमुळें ज्या उपदेशाला वैयर्थ्य येतें त्या उपदेशाच्या सामर्थ्यानें त्याच विधीचा बाध केला जातो; आणि ज्या विधीचें निमित्तच तो उपदेश होतो त्या विधीचा त्यानें बाध होत नाहीं.

येथें इकाराचा लोप झाला तर प्रत्ययाचा इकार जसा व्यर्थ होतो तसा सवर्णदीर्घ झाला तर इकार व्यर्थ होतो असें म्हणतां येत नाहीं; तर सवर्णदीर्घाचा तो निमित्तच आहे व त्याकरितांच तो लावला आहे.

---

१–( सू. ५९ ) शक्ति आणि यष्टि या शब्दांहून ' तें आहे प्रहरण ज्याचें ' या अर्थी ईकक् प्रत्यय होतो. उदा०–शाक्तीकः, याष्टीकः.

२–इकाराचा लोप होऊन जें शाक्तिकः असें मग्लतेंच रूप होणार तें कक् प्रत्ययानेंही होत आहे. तेव्हां प्रत्ययाचा इकार व्यर्थ होईल.

**अस्तिनास्तिदिष्टं मतिः ॥ ४ । ४ । ६० ॥**

किं यस्यास्ति मतिः स आस्तिकः । किं चातः । चौरेऽपि प्राप्नोति । एवं तर्हीतिलोपोऽत्र द्रष्टव्यः । अस्तीत्यस्य मतिरास्तिकः । नास्तीत्यस्य मतिर्नास्तिकः । दिष्टमित्यस्य मतिर्दैष्टिकः ॥

**[ शीलम् ॥ ४ । ४ । ६१ ॥ ]**

**छत्त्रादिभ्यो णः ॥ ४ । ४ । ६२ ॥**

किं यस्य च्छत्त्रधारणं शीलं स च्छात्त्रः । किं चातः । राजपुरुषे प्राप्नोति । एवं तर्ह्युत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । छत्त्रमिव च्छत्त्रम् । गुरुश्छत्त्रम् । गुरुणा शिष्यश्छत्त्रवच्छाद्यः शिष्येण च गुरुश्छत्त्रत्परिपाल्यः ॥

**[ कर्माध्ययने वृत्तम् ॥ ४ । ४ । ६३ ॥**

**बह्वच्पूर्वपदाट्ठच् ॥ ४ । ४ । ६४ ॥ ]**

---

(सू. ६०) ज्याला मति आहे त्याला आस्तिक म्हणावयाचें कीं काय ?

मग तसें म्हटलें तर काय बरें होईल. ?

मति ही सर्वांनाच आहे. तेव्हां चोरालाही आस्तिक म्हणावें लागेल ?

तर मग ह्या सूत्रामध्यें इति या शब्दाचा लोप झाला आहे असें समजावें. तेव्हां अस्ति अशी ज्याची मति आहे तोच आस्तिक होय. नास्ति अशी ज्याची मति आहे तो नास्तिक होय. आणि दिष्टम् अशी ज्याची मति आहे तो दैष्टिक होय.

( सू. ६२ ) छत्र धारण करणें हा ज्याचा स्वभाव आहे त्याला छात्र म्हणावयाचें कीं काय ?

मग तसें म्हटलें तर काय बरें होईल ?

छत्र धारण करणाऱ्या अशा राजाच्या चाकरालाही छात्र म्हणावें लागेल.

तर मग ह्या सूत्रामध्यें उत्तरपद अशा इव शब्दाचा लोप झाला आहे असें समजावें. छत्रमिव असें म्हणावयाचें तेथें नुसता छत्र शब्दच उच्चारला आहे. गुरु हें एक प्रकारचें छत्रच आहे. छत्र हें जसें मनुष्याला छाया देतें तसेंच गुरुनें आपल्या छायेखालीं शिष्याचें रक्षण करावें व शिष्यानेंही गुरु हें आपलें छत्र आहे असें समजूनच वागावें.

---

१–( सू. ६० ) अस्ति नास्ति व दिष्ट या शब्दांहून ' तशी मति ज्याची आहे ' या अर्थीं ठक् प्रत्यय होतो. उदा०–आस्तिकः. म्हणजे परलोक आहे असें मानणारा. तसेंच नास्तिकः म्हणजे अदृष्ट गोष्टीवर विश्वास न ठेवणारा. दैष्टिकः. म्हणजे नशीबावर हवाला ठेवणारा.

१–( सू. ६१ ) प्रातिपदिकाहून ' तसें आहे शील म्हणजे स्वभाव ज्याचा ' या अर्थीं ठक् प्रत्यय होतो. उदा०–अपूपभक्षणं शीलमस्य आपूपिकः. येथें अपूप शब्दाचा अपूपभक्षण असा अर्थ आहे.

१—( सू. ६२ ) छत्र वगैरे शब्दांहून ' तसा आहे स्वभाव ज्याचा ' या अर्थीं ण प्रत्यय होतो.उदा०—छत्रं शीलमस्य छात्रः. येथें छत्र शब्दाचा अर्थ ' गुरूची छिद्रें झांकणें ' असा आहे. छात्र म्ह. गुरुकार्याविषयीं तत्पर असा शिष्य.

१—( सू. ६३ ) अध्ययन केलें असतां त्यामध्य झालेलें जें कांहीं विशेष प्रकारचें कर्म त्याचा निर्देशक जो शब्द त्याहून ' तें ज्याचें आहे ' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०–'एकम् अन्यत् अध्ययने कर्म वृत्तम् अस्य ' या अर्थी ऐकान्यिकः. म्हणजे परीक्षेच्या वेळीं अध्ययन केल्याप्रमाणें सांगतांना एका ठिकाणीं जो चुकला असा मनुष्य.

१—( सू. ६४ ) ज्या शब्दांतील पूर्वपदामध्यें बहुत अच् आहेत असा जो केलेल्या अध्ययनांतील विशेष प्रकारच्या कर्मांचा निदर्शक सामासिक शब्द त्याहून ' तें आहे ज्याचें ' या अर्थीं ठच् प्रत्यय होतो. उदा०—द्वादशान्यानि कर्माणि अध्ययने वृत्तान्यस्य द्वादशान्यिकः. म्हणजे बारा ठिकाणीं चुकलेला मनुष्य.

**हितं[1] भक्षाः ॥ ४ । ४ । ६५ ॥**

**हितं भक्षा इति चतुर्थीनिर्देशः ॥ १ ॥**

हितं भक्षा इति चतुर्थीनिर्देशः कर्तव्यः ॥

**इतरथा ह्यनिर्देशः ॥ २ ॥**

इतरथा हि निर्देशो न भवति । हितशब्देन च योगे चतुर्थी विधीयते सा प्राप्नोति ॥ स तर्हि चतुर्थीनिर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । एवं वक्ष्यामि । हितं भक्षास्तदस्मै । ततो दीयते नियुक्तम् । तदस्मा इति ॥

**[ तदस्मै दीयते नियुक्तम् ॥ ४ । ४ । ६६ ॥**

**श्राणामांसौदनाट्टिठन् ॥ ४ । ४ । ६७ ॥**

**भक्तादणन्यतरस्याम् ॥ ४ । ४ । ६८ ॥**

**तत्र[1] नियुक्तः ॥ ४ । ४ । ६९ ॥**

**अगारान्ताट्ठन्[1] ॥ ४ । ४ । ७० ॥**

**अध्यायिन्यदेशकालात्[1] ॥ ४ । ४ । ७१ ॥**

**कठिनान्तप्रस्तारसंस्थानेषु[1] व्यवहरति ॥ ४ । ४ । ७२ ॥**

---

(सू. ६५ वा. १) 'हितं भक्षाः' येथें 'अस्मै' असा चतुर्थी विभक्तीनें प्रत्ययार्थाचा निर्देश करावा.

(वा. २) नाहीं तर प्रत्ययार्थाचा निर्देशच येथें नाहीं असें होईल. कारण हित शब्दाचा योग असतांना चतुर्थी सांगितली आहे. (२।३।१३५ वा. ४) ती प्राप्त होते.[2]

तर मग तसा निर्देश येथें करावयास पाहिजे.

तसा निर्देश करावयास नको. कारण 'हितं भक्षास्तदस्मै' असें हें सूत्र समजण्यांत येईल, व त्याच्या पुढें 'दीयते नियुक्तम्' हें दुसरें सूत्र होईल. तेथें 'तदस्मै' या पदांची अनुवृत्ति आहेच.

---

१—(सू. ६५) भक्ष्यपदार्थवाचक शब्दांहून 'तें भक्ष्य ज्याला हितकारक होतें' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—अपूपभक्षणं हितमस्य आपूपिकः. येथें अपूप शब्दाचा अपूपभक्षण असा अर्थ आहे.

२—त्यामुळें 'तदस्य पण्यम्' (४।४।५१) येथून 'तदस्य' याची अनुवृत्ति करून तिच्या योगानें येथें अर्थनिर्देश होत आहे असें म्हणतां येत नाहीं.

१—(सू. ६६) प्रातिपदिकाहून 'तें निश्चित रीतीनें दिलें जातें ज्याला' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—अग्रे भोजनं नियुक्तं दीयते अस्मै आग्रभोजनिकः.

१—(सू. ६७) श्राणा आणि मांसौदन या शब्दांहून 'तें निश्चित दिलें जातें ज्याला' या अर्थी टिठन् प्रत्यय होतो. उदा०—श्राणिकः; मांसौदनिकः. श्राणा म्ह. पेज. मास व ओदन या निरनिराळ्या शब्दांहूनही हा प्रत्यय होतो.

१—(सू.६८) भक्त शब्दाहून 'तें निश्चित दिलें जातें ज्याला' या अर्थी अण् प्रत्यय विकल्पानें होतो. भक्तमस्मै नियुक्तं दीयते भाक्तः, भाक्तिकः.

१—(सू. ६९) प्रातिपदिकाहून 'तेथें नियुक्त म्हणजे नेमलेला' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—द्वारे नियुक्तः दौवारिकः (७।३।४).

१—(सू. ७०) ज्या शब्दाच्या शेवटीं अगार शब्द आहे त्या शब्दाहून 'नियुक्त' या अर्थी ठन् प्रत्यय होतो. उदा०—देवागारिकः.

१—(सू. ७१) जो देश आणि जो काल अध्ययनाला योग्य नव्हे तद्वाचक शब्दाहून 'तेथें अध्ययन करणारा' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—श्मशानेऽधीते श्माशानिक. चतुर्दश्यामधीते चातुर्दशिकः.

१—(सू. ७२) ज्या शब्दाच्या शेवटीं कठिन शब्द आहे. असे शब्द आणि प्रस्तार व संस्थान हे शब्द याहून 'तेथें योग्य व्यवहार करतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—वंशकठिने व्यवहरति वांशकठिनिकः इत्यादि.

**निकटे वसति ॥ ४ । ४ । ७३ ॥**
**आवसथात्ष्ठल् ॥ ४ । ४ । ७४ ॥**
**प्राग्घिताद्यत् ॥ ४ । ४ । ७५ ॥]**
**तद्वहति रथयुगप्रासङ्गम् ॥ ४ । ४ । ७६ ॥**

**वहत्यभिधाने रथशकटहलसीरेभ्यः प्रत्ययविधानानर्थक्यं विहितत्वात् ॥१॥**

वहत्यभिधाने रथशकटहलसीरेभ्यः प्रत्ययविधानमनर्थकम् । किं कारणम् । विहितत्वात् । विहितोऽत्र प्रत्ययस्तस्येदम् । [४.३.१२०] इति ॥ शब्दभेदादविधानम् । शब्दभेदाद्विधिः स भवति । अन्यो हि शब्दो रथं वहत्यन्यो हि रथस्य वोढेति । **शब्दभेदादविधानमिति चेदर्थाश्रयत्वात्प्रत्ययविधानस्यार्थसामान्यात्सिद्ध ॥ २ ॥**

शब्दभेदादविधानमिति चेदर्थाश्रय प्रत्ययविधिः । स एवार्थो रथं वहति स ए रथस्य वोढेति । तत्रार्थसामान्यात्सिद्धम् । इदं तर्हि प्रयोजनम् । यो द्वौ रथौ वह स द्विरथ्यः । यो द्वयो रथयोर्वोढा द्विरथः । तेन सति लुग्भवति । अने सति कस्मान्न भवति । प्राग्दीव्य इत्युच्यते ॥

(सू. ७६ वा. १) 'वहति' या अर्थी रथ, शकट, हल व सीर या शब्दांहून यत् अण् व ठक् हे जे प्रत्यय सांगितले आहेत ते व्यर्थ आहेत.

काय कारण ?

कारण असें कीं त्यांहून प्रत्यय सांगितलेच आहेत. 'तस्येदम्' (४।३।१२०,१२१,१२४) या अर्थी तेथें प्रत्यय होतातच.

पण 'रथं वहति' हा येथील शब्द निराळा आणि 'रथस्य अयं वोढा' हा तेथील शब्द निराळा तेव्हां ह्या प्रकृत अर्थी त्या सूत्रांनीं प्रत्यय होतील असें नाहीं.

(वा. २) शब्द निराळा असल्यामुळें या सूत्रांनीं प्रत्यय होणार नाहींत असें असेल तर त्यावर आमचें म्हणणें असें आहे कीं कोणताही प्रत्यय करणें झाल्यास तो अर्थावर अवलंबूनच होत असतो आणि अर्थ तर–'रथाल ओढतो' हा काय व 'रथाला ओढणारा' ह काय–दोन्ही ठिकाणीं तशा तऱ्हेचा घोडा हा मनांत येतो. तेव्हां सामान्यतः अर्थ एक असल्यामुळें ही सिद्ध गोष्ट होत आहे.

तर मग आतां येथें प्रत्यय सांगण्याच उपयोग असा कीं जो दोन रथांना ओढत तो द्विरथ आणि दोन रथांचा ओढणारा त द्विरथ्य अर्थी एकाच अश्वाला दोन नां मिळतात. तस्येदम् या अर्थी प्रत्यय केल म्हणजे त्याचा लुक् (४।१।८८) होतो.

मग प्रकृत सूत्रानें प्रत्यय केला म्हण त्याचा लुक् कां होत नाहीं ?

लुक् सांगणाऱ्या त्या सूत्रामध्यें 'प्राग्दीव्यतः अशी अनुवृत्ति आहे म्हणून त्याचा लुक् हो नाहीं.

---

१–(सू. ७३) निकट शब्दाहून 'तेथें राहतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—निकटे वसति नैकटिको भिक्षुः.

१–(सू. ७४) आवसथ शब्दाहून तेथें राहतो या अर्थी ष्ठल् प्रत्यय होतो. उदा०—आवसथे वसति आवसथिकः.

१–(सू. ७५) हें अधिकारसूत्र आहे. तस्मै हितम् (५।१।५) या सूत्राच्या पूर्वी जे अर्थ निर्दिष्ट केले आहेत त्या अर्थी यत् प्रत्यय होतो.

१–(सू. ७६) रथ, युग आणि प्रासङ्ग शब्दांहून 'त्याला वाहणारा' या अर्थी यत् प्रत्य होतो. रथं वसति रथ्यः, युग्यः, प्रासङ्ग्य म्ह. जूं.

२–द्विगोर्लुगनपत्ये (४।१।८८) यानें येथें य प्रत्ययाचा लुक् झाला आहे. हलादि प्रत्ययाचा कचित् ठिकाणीं लुक् होतो असें उद्योतकारां सांगितलें आहे.

[ **धुरो यड्ढकौ** ॥ ४ । ४ । ७७॥
**खः सर्वधुरात्** ॥ ४ । ४ । ७८ ॥
**एकधुराल्लुक् च** ॥ ४ । ४ । ७९ ॥
**शकटादण्** ॥ ४ । ४ । ८० ॥
**हलसीराट्ठक्** ॥ ४ । ४ । ८१ ॥ ]
**संज्ञायां जन्याः** ॥ ४ । ४ । ८२ ॥

किं निपात्यते । जनन्या जनीभावो निपात्यते यच्च प्रत्ययः ।

**जन्या इति निपातनानर्थक्यं पञ्चमीनिर्देशात्** ॥ १ ॥

जन्या इति निपातनमनर्थकम् । किं कारणम् । पञ्चमीनिर्देशात् । जनीशब्दादेषा पञ्चमी ॥ इदं तर्हि प्रयोजनं सर्वकालः प्रत्ययविधिर्यथा विज्ञायेत । जनीं वहन्ति जन्याः । जनीं वोढारो जन्याः । जनीमवाक्षुर्जन्या इति ॥

**विध्यत्यधनुषा** ॥ ४ । ४ । ८३ ॥

**विध्यत्यकरणेन** ॥ १ ॥

विध्यत्यकरणेनेति वक्तव्यम् ॥

**इतरथा ह्यतिप्रसङ्गः** ॥ २ ॥

अधनुषेति ह्युच्यमाने ऽतिप्रसङ्गो भवति । इहापि प्रसज्येत । शर्कराभिर्वि-

---

(सू. ८२) येथें काय निपातन केलें आहे ?

जननी शब्दाला जनी आदेश आणि पुढें यत् प्रत्यय यांचें निपातन केलें आहे ?

येथें 'जन्या' हें निपातन समजणें व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं येथें पंचमीनिर्देश आहे. जन्याः हें जनी शब्दाचें पंचमी एकवचन आहे.

तर मग निपातन समजण्याचा उपयोग असा कीं 'जन्या' ही संज्ञा तिन्ही कालीं समजली जावी. म्हणजे जन्या शब्दामध्यें यत् प्रत्यय अमुकच कालीं होतो असें नाहीं. तर जनीला म्ह. नव–वधूला पतीकडे ज्या नेतात त्या जन्या होत. ज्या पुढें नेतील त्या लहान पणींही जन्या होत. तसेंच पूर्वीं ज्या जनीला तशा रीतीनें नेत होत्या त्या वृद्धावस्थेमध्येंही जन्या होत.

(सू. ८३ वा. १) या सूत्रामध्यें 'अधनुषा' याचे ऐवजीं 'अकरणेन' असें म्हणावें.

(वा. २) नाहीं तर 'अधनुषा' असें म्हटलें असतां दोष येतो. शर्कराभिः पादौ विध्यति, कण्टकैः पादौ विध्यति अशा रीतीनें शर्करा वगैरे करणांची विवक्षा असतांनाही

---

१–(सू. ७७) धुर् शब्दाहून 'तिला वाहतो' या अर्थी यत् व ढक् प्रत्यय होतात उदा०—धुरं वहति धुर्यः; धौरेयः.

१–(सू. ७८) सर्वधुरा शब्दाहून 'तिला वाहतो' या अर्थी ख प्रत्यय होतो. उदा० – सर्वधुरां वहति सर्वधुरीणः.

१–(सू. ७९) एकधुरा शब्दाहून 'तिला वाहतो' या अर्थी ख प्रत्यय होतो आणि त्याचा एकदां लुक् होतो. उदा०—एकधुरां वहति एकधुरीणः, एकधुरः.

१–(सू. ८०) शकट शब्दाहून त्याला ओढतो या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—शाकटः म्हणजे गाडी ओढणारा बैल.

१–(सू. ८१) हल व सीर या शब्दांहून 'त्याला ओढतो' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०-हलं वहति हालिकः, सैरिकः.

१–(सू. ८२) जनी शब्दाहून 'तिला पतीकडे पोचविणारी' या अर्थी यत् प्रत्यय होतो, पण तो शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—जनीं वहति जन्या. नवऱ्या मुलीला तिच्या पतीची गाठ घालून देणारी बाई

१–(सू. ८३) प्रातिपदिकाहून 'त्याचा वेध करतो' या अर्थी यत् प्रत्यय होतो. परंतु त्या वेधाचें साधन धनुष्य हें विवक्षित नसलें पाहिजे. उदा०—पादौ विध्यन्ति पद्याः शर्कराः.

ध्यति । कण्टकैर्विध्यतीति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । कस्मान्न भवति शर्कराभिर्विध्यति कण्टकैर्विध्यतीति । अनभिधानात् ॥

**[ धनगणं लब्धा ॥ ४ । ४ । ८४ ॥**

**अन्नाण्णः ॥ ४ । ४ । ८५ ॥**

**वशं गतः ॥ ४ । ४ । ८६**

**पदमस्मिन् दृश्यम् ॥ ४ । ४ । ८७॥**

**मूलमस्याबर्हि ॥ ४ । ४ । ८८ ॥**

**संज्ञायां धेनुष्या ॥ ४ । ४ । ८९ ॥ ]**

**गृहपतिना संयुक्ते ञ्यः ॥ ४ । ४ । ९० ॥**

गृहपतिना संयुक्त इत्युच्यते तत्र दक्षिणाग्नावपि प्राप्नोति । दक्षिणाग्निरपि गृहपतिना संयुज्यते ॥ एवं तर्हि गृहपतिना संयुक्त इत्युच्यते सर्वश्च गृहपतिना संयुक्तस्तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते । साधीयो यो गृहपतिना संयुक्त इति । कश्च साधीयः । यस्मिन्पत्नीसंयाजाः क्रियन्ते ॥ अथवा गृहपतिर्नाम मन्त्रः स यस्मिन्नुच्यते ॥ अथवा संज्ञायामिति वर्तते ॥

---

पाद शब्दाहून यत् प्रत्यय होऊं लागेल.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

पण तसें म्हटलें नाहीं तर शर्कराभिः विध्यति, कण्टकैः विध्यति अशी विवक्षा असतांना यत् प्रत्यय कां होत नाहीं.

अनभिधानास्तव होत नाहीं.

( सू. ९० ) ' गृहपतीनें संयुक्त' असें येथें म्हटलें आहे. तेव्हा दक्षिणाग्नि या अर्थीही गार्हपत्य शब्दाचा प्रयोग होऊं लागेल. कारण दक्षिणाग्नीही यजमानानें संयुक्त असतोच.

तर मग आतां 'गृहपतीनें संयुक्त' असें तर येथें म्हटलें आहे. आणि गृहपतीनें म्हणजे यजमानानें संयुक्त तर सर्वच असतात. तेव्हां येथें संयुक्तपदानें ज्यास्त कांहीं तरी अर्थ विवक्षित आहे असें समजतें. तो ज्यास्त अर्थ म्हणजे ' जो गृहपतीनें चांगला संयुक्त आहे ' असा समजावा.

चांगला संयुक्त असा कोण बरें समजावा ?

' पत्नीसंयाज ' हे विशेष याग ज्यामध्यें केले जातात तो अग्नि चांगला संयुक्त होय. अथवा गृहपति म्हणजे मन्त्रविशेष होय. तो ज्याच्याजवळ बसून म्हटला जातो तो गार्हपत्य अग्नि होय. अथवा पूर्वसूत्रांतून ' संज्ञायाम् ' अशी येथें अनुवृत्ति येत आहे. गार्हपत्य ही संज्ञा तर एकाच अग्नीची आहे.

---

१–( सू. ८४ ) धन व गण या शब्दांहून ' त्याला प्राप्त होणारा ' या अर्थी यत् प्रत्यय होतो. धनं लब्धा धन्यः, गणं लब्धा गण्यः.

१–( सू. ८५ ) अन्न शब्दाहून ' त्याला प्राप्त होणारा' या अर्थी ण प्रत्यय होतो. उदा०–अन्नं लब्धा आन्नः.

१–( सू. ८६ ) स्वाधीन झालेला या अर्थी वश शब्दाहून यत् प्रत्यय होतो. उदा०—वशं गतः वश्यः.

१–( सू. ८७ ) पद शब्दाहून ' तें जेथें उमटतें ' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उ०–पद्यः कर्दमः.

१–( सू. ८८ ) मूल शब्दाहून ' तें ज्याचें उपटलें जातें ' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०— मूल्याः मुद्गाः.

१–( सू. ८९ ) धेनु शब्दाहून यत् प्रत्यय आणि धेनु शब्दाला षुक् आगम करून धेनुष्या असें येथें निपातन संज्ञा असतांना केलें आहे. धेनुष्या म्ह. गहाण ठेवलेली गाय.

१–( सू. ९० ) गृहपति शब्दाहून ' त्यानें संयुक्त अग्नि ' या अर्थी ञ्य प्रत्यय होतो. गृहपतिना संयुक्तः गार्हपत्यः अग्निः.

**[ नौवयोधर्मविषमूलमूलसीतातुलाभ्यस्तार्यतुल्यप्राप्यवध्यानाम्यसमसमितसंमितेषु ॥ ४ । ४ । ९१ ॥**

**धर्मपथ्यर्थन्यायादनपेते ॥ ४ । ४ । ९२ ॥**

**छन्दसो निर्मिते ॥ ४ । ४ । ९३ ॥**

**उरसोऽण् च ॥ ४ । ४ । ९४ ॥**

**हृदयस्य प्रियः ॥ ४ । ४ । ९५ ॥**

**बन्धन चर्षौ ॥ ४ । ४ । ९६ ॥**

**मतजनहलात् करणजल्पकर्षेषु ॥ ४ । ४ । ९७ ॥**

**तत्र साधुः ॥ ४ । ४ । ९८ ॥**

**प्रतिजनादिभ्यः खञ् ॥४।४।९९॥**

**भक्ताण्णः ॥ ४ । ४ । १०० ॥**

**परिषदो ण्यः ॥ ४ । ४ । १०१ ॥**

**कथादिभ्यष्ठक् ॥ ४ । ४ । १०२ ॥**

**गुडादिभ्यष्ठञ् ॥ ४ । ४ । १०३ ॥**

---

१—( सू. ९१ ) नौ, वयस्, धर्म, विष, मूल, मूल, सीता आणि तुला या आठ शब्दांहून क्रमानें तार्य, तुल्य, प्राप्य, वध्य, आनाम्य, सम, समित आणि संमित या आठ अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—नावा तार्या नाव्या नदी; नावेनें पलीकडे जाण्याला योग्य. वयसा तुल्यः वयस्यः; वयानें बरोबरीचा मित्र. धर्मेण प्राप्यं धर्म्यम्; धर्मानें मिळणारें स्वर्गादि फल. विषेण वध्यः विष्यः; विषानें मारण्याला योग्य शत्रू. मूलेन आनाम्यं मूल्यम्; मूल कारण पाहून त्यावरून कल्पना करण्यास योग्य (किंमत). मूलेन समः मूल्यः, मूल कारणाच्या बरोबरीचा पदार्थ. सीतया समितं सीत्यम्; नांगरून सारखें केलेलें शेत. तुलया संमितं तुल्यम्; तागडीनें मोजल्यासारखें.

१—( सू. ९२ ) धर्म, पथिन्, अर्थ, आणि न्याय या शब्दांहून त्यापासून न सुटलेलें या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—धर्मात् अनपेतं धर्म्यम् इत्यादि.

१—( सू. ९३ ) छन्दस् शब्दाहून 'त्यानें निर्मित' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—छन्दसा निर्मितः छन्दस्यः; स्वेच्छेनें तयार केलेला पदार्थ.

१—( सू. ९४ ) उरस् शब्दांहून 'त्यानें निर्मित' या अर्थी अण् व यत् हे प्रत्यय होतात. उदा०—उरसा निर्मित औरसः, उरस्यः.

१—( सू. ९५ ) हृदय शब्दाहून 'त्याला प्रिय या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—हृदयस्य प्रियः हृद्यः देशः.

१—( सू. ९६ ) हृदय शब्दाहून 'त्याचें बन्धन करणारा मन्त्र' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—हृदयस्य बन्धने साधनीभूतः हृद्यः; वशीकरण-मन्त्रः.

१—( सू. ९७ ) मत जन आणि हल या तीन शब्दांहून क्रमानें त्याचें कारण, त्याचा जल्प, आणि त्याचा कर्ष या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—मतस्य करणं मत्यम्, म्हणजे ज्ञानाचें साधन. जनस्य जल्पः जन्यः, म्हणजे गलबा. हलस्य कर्षः हल्यः म्हणजे नांगरानें उखणणें.

१—( सू. ९८ ) प्रातिपदिकांहून 'त्याविषयीं साधु' म्हणजे चांगला या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—कर्ममि साधुः कर्मण्यः.

१—( सू. ९९ ) प्रतिजनादि गणांतील शब्दांहून 'तत्र साधुः' या अर्थी खञ् प्रत्यय होतो. उदा०—प्रतिजने साधुः प्रातिजनीनः; सर्वांविषयींच चांगला.

१—( सू. १०० ) भक्त शब्दाहून 'तत्र साधुः' या अर्थी ण प्रत्यय होतो. उदा०—भक्ते साधुः भाक्तः-म्हणजे भाताला चांगला तांदूळ.

१—( सू. १०१ ) परिषद् शब्दांहून 'तत्र साधुः' या अर्थी ण्य प्रत्यय होतो. उदा०—परिषदि साधुः पारिषद्यः.

१—( सू. १०२ ) कथा वगैरे शब्दांहून 'तत्र साधुः' या अर्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—कथायां साधुः काथिकः.

१—( सू. १०३ ) गुड शब्दाहून 'तत्र साधुः' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—गुडे साधुः गौडिकः इक्षुः.

**पथ्यतिथिवसतिस्वपतेर्ढञ् ॥ ४ । ४ । १०४ ॥**

**सभाया यः ॥ ४ । ४ । १०५ ॥**

**ढश्छन्दसि ॥ ४ । ४ । १०६ ॥**

**समानतीर्थे वासी ॥ ४ । ४ । १०७ ॥**

**समानोदरे शयित ओ चोदात्तः ॥ ४ । ४ । १०८ ॥**

**सोदराद्यः ॥ ४ । ४ । १०९ ॥**

**भवे छन्दसि ॥ ४ । ४ । ११० ॥**

**पाथोनदीभ्यां ड्यण् ॥ ४ । ४ । १११ ॥**

**वेशन्तहिमवद्भ्यामण् ॥ ४ । ४ । ११२ ॥**

**स्रोतसो विभाषा ड्यड्ड्यौ ॥ ४ । ४ । ११३ ॥**

**सगर्भसयूथसनुताद्यन् ॥ ४ । ४ । ११४ ॥**

**तुग्राद् घन् ॥ ४ । ४ । ११५ ॥**

**अग्राद्यत् ॥ ४ । ४ । ११६ ॥**

---

१—( सू. १०४ ) पथिन्, अतिथि, वसति आणि स्वपति या शब्दांहून ' तत्र साधुः ' या अर्थी ढञ् प्रत्यय होतो. उदा०—पथि साधु पाथेयम्; आतिथेयम्.

१—( सू. १०५ ) सभा शब्दाहून ' तत्र साधुः' या अर्थी य प्रत्यय होतो. उदा—सभायां साधुः सभ्यः

१—( सू. १०६ ) सभा शब्दाहून ' तत्र साधुः' या अर्थी वेदामध्यें ढ प्रत्यय होतो. सभायां साधुः सभेयः

१—( सू. १०७ ) समानतीर्थ शब्दाहून ' तेथे अध्ययनाकरितां राहणारा' या अर्थी यत् प्रत्यय होतो समाने तीर्थे वसतीति सतीर्थ्यः एका गुरूपाशीं अध्ययनाकरितां राहिलेले शिष्य परस्पर सतीर्थ्य होत. समान शब्दाला स आदेश ( ६ । ३ । ८७ ) झाला आहे.

१—( सू. १०८ ) समानोदर शब्दांहून ' तेथें शयित म्ह. गर्भरूपानें अवस्थित ' या अर्थी यत् प्रत्यय होतो आणि त्याच्या बरोबर त्या शब्दांतील ओकार उदात्त होतो. उदा०—समानोदरे शयितः समानोदर्यः, समान शब्दाला स आदेश ( ६।३।८८ ) वैकल्पिक असल्यामुळें येथें झाला नाहीं. स आदेश झाला म्हणजे त्या सोदर शब्दाहून पुढील सूत्रानें य प्रत्यय होतो.

१—( सू. १०९ ) सोदर शब्दाहून ' तेथे शयित' या अर्थी य प्रत्यय होतो. उदा०—सोदर्यः.

१—( सू. ११० ) प्रातिपदिकाहून ' तत्र भवः ' म्ह. तेथें असलेला या अर्थी वेदामध्यें यत् प्रत्यय होतो. उदा०—मेघ्याय च विद्युत्याय च. ह्या अर्थाची गणना शैषिकामध्येंही ( ४।३।५३ ) आहे. म्हणून राष्ट्र वगैरे विशेष शब्दांहून घ ख वगैरे प्रत्यय प्राप्त होतात तेथेंही वेदामध्यें यत् प्रत्यय होतो. क्वचित् तेही होतात.

१—(सू १११) पाथस् व नदी या शब्दांहून 'तत्र भव.' या अर्थी वेदामध्यें ड्यण् प्रत्यय होतो. उदा०—पाथ्यः, नाद्यः, पाथस् म्ह. अन्तरिक्ष.

१—( सू. ११२ ) वेशन्त व हिमवत् या शब्दांहून ' तत्र भवः ' या अर्थी वेदामध्यें अण् प्रत्यय होतो. उदा० —वैशन्तीभ्यः, हैमवतीभ्यः.

१-( सू. ११३ ) स्रोतस् शब्दाहून ' तत्र भवः ' या अर्थी ड्यत् व ड्य हे वेदामध्य विकल्पानें होतात. उदा०—स्रोत्यः. एकदां यत् प्रत्ययही होतो. स्रोतस्यः.

१—( सू. ११४ ) सगर्भ, सयूथ आणि सनुत या शब्दांहून ' तत्र भवः ' या अर्थी वेदामध्यें यन् प्रत्यय होतो. उदा०—सगर्भ्यः.

१—( सू. ११५ ) तुग्र शब्दाहून ' तत्र भवः ' या अर्थी वेदामध्यें घन् प्रत्यय होतो. उदा०—तुग्रियाणाम्.

१—( सू. ११६ ) अग्र शब्दाहून ' तत्र भवः' या अर्थी वेदामध्यें यत् प्रत्यय होतो. उदा०—अग्र्यम्. पुढील सूत्रानें घ व छ प्रत्यय सांगितले असल्यामुळें सामान्य सूत्रानें (४।४।११०) यत् प्रत्यय होणार नाहीं, म्हणून हें सूत्र केलें आहे.

**घच्छौ च ॥ ४।४।११७ ॥**
**समुद्राभ्राद्घः ॥ ४ । ४ । ११८ ॥**
**बर्हिषि दत्तम् ॥ ४ । ४ । ११९ ॥**
**दूतस्य भागकर्मणी ॥ ४।४।१२० ॥**
**रक्षोयातूनां हननी ॥४।४।१२१ ॥**
**रेवतीजगतीहविष्याभ्यः प्रशस्ये ॥ ४ । ४ । १२२ ॥**
**असुरस्य स्वम् ॥ ४ । ४ । १२३ ॥**
**मायायामण् ॥ ४ । ४ । १२४ ॥**
**तद्वानासामुपधानो मन्त्र इतीष्टकासु लुक् च मतोः ॥४।४।१२५॥**
**अश्विमानण् ॥ ४ । ४ । १२६ ॥**
**वयस्यासु मूर्ध्नो मतुप् ॥४।४।१२७॥**
**मत्वर्थे मासतन्वोः ॥४।४।१२८॥ ]**

मासतन्वोरनन्तरार्थे वा ॥ १ ॥

मासतन्वोरनन्तरार्थे वेति वक्तव्यम् । मध्वस्मिन्नस्ति मध्वनन्तरमिति वा मधव्यः माधवः ॥

(सू. १२८ वा. १) हा जो 'मास' किंवा 'तनू' अर्थ असतांना मत्वर्थी यत् प्रत्यय सांगितला आहे तो अनन्तर या अर्थीही होतो असें म्हणावें. उदा. मधु ज्यामध्यें आहे किंवा मधु ज्याच्या जवळ आहे तो मधव्य मास होय; माधवेंही त्यालाच म्हणतात.

१—(सू. ११७) अग्र शब्दाहून 'तत्र भव.' या अर्थी वेदामध्ये घ, छ व घन् हे प्रत्यय होतात. उदा०—अग्रियम्, अग्रीयम्.

१—(सू. ११८) समुद्र व अभ्र या शब्दाहून 'तत्र भव.' या अर्थी वेदामध्ये घ प्रत्यय होतो. उदा०—समुद्रियाणाम्, अभ्रियस्येव

१—(सू. ११९) बर्हिस् शब्दाहून 'तेथें दिलेले' या अर्थी वेदामध्ये यत् प्रत्यय होतो. उदा०—बर्हिष्येषु

१—(सू. १२०) दूत शब्दाहून 'त्याचा भाग किंवा 'त्याचे कर्म' या अर्थी वेदामध्ये यत् प्रत्यय होतो. उदा०—दूतस्य भागः कर्म वा दूत्यम्

१—(सू. १२१) रक्षस् व यातु या शब्दाहून 'त्याला मारणारी' या अर्थी वेदामध्ये यत् प्रत्यय होतो. उदा०—रक्षस्या, यातव्या

१—(सू. १२२) रेवती, जगती व हविष्या या शब्दाहून त्याचें प्रशंसन या अर्थी यत् प्रत्यय वेदामध्यें होतो. उदा०—रेवत्यम्.

१—(सू. १२३) असुर शब्दाहून 'त्याच्या मालकीची वस्तु' या अर्थी वेदामध्यें यत् प्रत्यय होतो. उदा०—असुर्यं पात्रम्.

१—(सू. १२४) असुर शब्दाहून 'त्याची माया' या अर्थी वेदामध्यें अण् प्रत्यय होतो. उदा०—आसुरी माया.

१—(सू. १२५) 'तो शब्द असलेला मंत्र ज्यांचा स्थापन करण्याचा आहे अशा इष्टका म्हणजे विटा' या अर्थी त्या मंत्रदर्शक मतुप्-प्रत्ययान्त शब्दाहून यत् प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाबरोबर त्या मतुप् प्रत्ययाचा लुक् होतो. उदा०—वर्चस्वान् मन्त्रः उपधानं यासां ताः वर्चस्याः इष्टकाः; वयस्याः.

१—(सू. १२६) ज्या मंत्रामध्ये अश्विन् शब्द आहे. त्याला अश्विमत् म्हणतात. त्या अश्विमत् शब्दाहून 'त्या मंत्राने स्थापन केल्या जाणाऱ्या इष्टका' या अर्थी अण् प्रत्यय होतो. आणि मतुप् प्रत्ययाचा लुक् होतो. उदा०—आश्विनीरुपदधाति.

१—(सू. १२७) 'मूर्धन्-शब्द-घटित मंत्रानें स्थापन केल्या जाणाऱ्या अशा वयस्या (४।४।१२४) म्हणजे इष्टका' या अर्थी मूर्धन् शब्दाहून मतुप् प्रत्यय होतो. उदा०—मूर्धन्वतीरुपदधाति. ज्या मंत्रामध्ये मूर्धन् व वयस् हे दोन्ही शब्द आहेत अशा मंत्रानें स्थापन केलेल्या इष्टका असा मूर्धन्वती शब्दाचा अर्थ आहे.

१—(सू. १२८) प्रातिपदिकाहून वेदामध्यें मतुप् प्रत्ययाच्या (५।२।९४) अर्थी यत् प्रत्यय होतो. पण त्या प्रत्ययान्तापासून मास किंवा तनू या अर्थाचा बोध होत असला पाहिजे. उदा०—नभांसि विद्यन्ते यस्मिन् इति नभस्यो भाद्रपदमासः नभस् म्ह. अभ्र ओजस्या तनूः.

२—येथें पुढील सूत्रानें ञ प्रत्यय झाला आहे. मधु म्ह. पुष्परस तो ज्या कालात भरतो तो चैत्र, आणि त्याच्या जवळचा मास म्हणजे वैशाख हा माधव होय.

**लुगकारेकाररेफाश्च ॥ २ ॥**

लुगकारेकाररेफाश्च प्रत्यया वक्तव्याः। लुक् । मधुः तपः नभः । अकारः । इषः ऊर्जः । इकारः शुचिः । रेफश्च । शुक्रः ॥

[ **मधोर्ञ च ॥ ४ । ४ । १२९ ॥**

**ओजसोऽहनि यत्खौ ॥ ४ । ४ । १३० ॥**

**वेशोयशआदेर्भगाद्यल् ॥ ४ । ४ । १३१ ॥**

**ख च ॥ ४ । ४ । १३२ ॥**

**पूर्वैः कृतमिनयौ च ॥ ४ । ४ । १३३ ॥**

**अद्भिः संस्कृतम् ॥ ४ । ४ । १३४ ॥**

**सहस्रेण संमितौ घः ॥ ४ । ४ । १३५ ॥**

**मतौ च ॥ ४ । ४ । १३६ ॥**

**सोममर्हति यः ॥ ४ । ४ । १३७ ॥**

**मये च ॥ ४ । ४ । १३८ ॥**

**मधोः ॥ ४ । ४ । १३९ ॥ ]**

**वसोः समूहे च ॥ ४ । ४ । १४० ॥**

---

(वा. २) ह्या प्रकृत सूत्रानें मत्वर्थी केलेल्या यत् प्रत्ययाचा एकदां लुक् होतो, व तसेच 'अ', 'इ', व 'र' असे प्रत्ययही होतात. मधुः, तपः[३], नभः हीं लुकाचीं उदाहरणें होत. इषः, ऊर्जः हीं 'अ' प्रत्ययाचीं उदाहरणें होत. शुचिः हें 'इ' प्रत्ययाचें उदाहरण होय. आणि शुक्रः हें 'र' प्रत्ययाचें उदाहरण होय.

---

३—तपस् म्हणजे संताप, नभस् म्ह. अभ्र. इष म्ह. इच्छा. पावसाळा संपल्यानंतरच आश्विन महिन्यात इच्छा प्रबल होते. ऊर्ज् म्ह. बल. शारीरशक्ति देणारा मुख्य कार्तिक मासच होय. शुच् म्ह. मनाचा क्षोभ. तो पावसाळ्याच्या आरंभी ज्येष्ठ मासांत अंकुरित होतो आणि आषाढात प्रबल होतो.

१—( सू. १२९ ) मधु शब्दाहून वरती दिलेल्या अर्थी वेदामध्ये 'ञ' हा प्रत्यय होतो उदा०-माधवः.

१—( सू. १३० ) ओजस् शब्दाहून मत्वर्थी वेदामध्ये यत् व ख हे प्रत्यय होतात. पण त्या प्रत्ययान्तापासून अहन् म्हणजे दिवस हा अर्थ गम्यमान झाला पाहिजे. ओजस्यम् ओजसीनम् अहः.

१—( सू. १३१ ) वेशस् व यशस् या शब्दांच्या पुढील जो भग शब्द तदन्त प्रातिपदिकाहून वेदामध्यें मत्वर्थी यल् प्रत्यय होतो. उदा०—वेशोभग्यः; वेशस् म्ह. बल, भग म्ह. श्री वगैरे; बलरूपी श्री ज्याची आहे तो हा वेशोभग्य या शब्दाचा अर्थ आहे. त्याचप्रमाणें यशोभग्यः.

१—( सू. १३२ ) पूर्वसूत्राच्या विषयामध्ये ख व यत् हे प्रत्ययही वेदामध्यें होतात. उदा०-वेशोभग्यः वेशोभगीनः.

१—(सू. १३३) पूर्व पुरुषांनी केलेले या अर्थी पूर्व शब्दाहून वेदामध्ये इन य, व ख हे प्रत्यय होतात. उदा०—पूर्विणैः, पूर्व्यैः, पूर्वीणैः.

१—( सू. १३४ ) अप् शब्दाहून त्यानें संस्कार केलेले या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—अद्भिः संस्कृतम् अप्यं हविः.

१—( सू. १३५ ) सहस्र शब्दाहून त्यानें तुल्य या अर्थी वेदामध्यें घ प्रत्यय होतो. उदा०—सहस्रियः अग्निः. एक असला तरी हजार असल्यासारखा असा अर्थ आहे.

१—( सू. १३६ ) सहस्र शब्दाहून वेदामध्यें मत्वर्थीही घ प्रत्यय होतो. उदा०—सहस्रमस्यास्तीति सहस्रियः.

१—( सू. १३७ ) सोम शब्दाहून 'सोम-प्राशनाला योग्य' या अर्थी वेदामध्यें य प्रत्यय होतो. उदा०—सोममर्हन्ति सोम्याः विप्राः.

१—( सू. १३८ ) सोम शब्दाहून वेदामध्यें मयट् प्रत्ययाच्या अर्थीही य प्रत्यय होतो. उदा०—सोम्यं मधुः, सोममय मधु असा अर्थ आहे.

१—( सू. १३९ ) मधु शब्दाहून वेदामध्यें मयट् प्रत्ययाच्या अर्थी य प्रत्यय होतो. उदा०-मधव्यः. मधुमय असा अर्थ आहे.

१—( सू. १४० ) वसु शब्दाहून 'समूह' या अर्थी आणि मयट् प्रत्ययाच्या अर्थी वेदामध्ये यत् प्रत्यय होतो. उदा०—वसव्यः.

**अक्षरसमूहे छन्दस उपसंख्यानम् ॥१॥**

अक्षरसमूहे छन्दस उपसंख्यानं कर्तव्यम्। ओ श्रावयेति चतुरक्षरम् । अस्तु श्रौषडिति चतुरक्षरम्। ये यजामहे इति पञ्चाक्षरम्। यजेति द्व्यक्षरम् । द्व्यक्षरो वषट्कारः। एष वै सप्तदशाक्षरश्छन्दस्यः प्रजापतिर्यज्ञमनुविहितः ॥

**छन्दसि बहुभिर्वसव्यैरुपसंख्यानम् ॥२॥**

छन्दसि बहुभिर्वसव्यैरुपसंख्यानं कर्तव्यम् । हस्तौ पृणस्व बहुभिर्वसव्यैः ॥

**अग्निरीशे वसव्यस्य ॥ ३ ॥**

अग्निरीशे वसव्यस्योपसंख्यानं कर्तव्यम् ॥ तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् ।

**स्वार्थविज्ञानात् सिद्धम् ॥ ४ ॥**

स्वार्थविज्ञानात् सिद्धमेतत् । वसव एव वसव्याः पान्तु ॥

**[नक्षत्राद् घः ॥४।४।१४१॥**
**सर्वदेवात्तातिल् ॥४।४।१४२॥**
**शिवशमरिष्टस्य करे ॥४।४।१४३॥**
**भावे च ॥४।४।१४४॥]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये चतुर्थस्याध्यायस्य चतुर्थे पादे प्रथममाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥
॥ चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥

---

(सू. १४० वा. १) 'अक्षरसमूह' या अर्थाच्या 'छन्दस्' शब्दाहून वेदामध्ये स्वार्थी यत् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—'ओ श्रावय' हीं चार अक्षरें 'अस्तु श्रौषट्' हीं चार अक्षरें 'ये यजामहे' हीं पांच अक्षरें 'यज' हीं दोन अक्षरें आणि 'वषट्' हीं दोन अक्षरें मिळून सतरा अक्षरांचा समुदाय हा 'छन्दस्य' होय. उदा एष वै सप्तदशाक्षरश्छन्दस्यः प्रजापतिर्यज्ञमनुविहितः.

(वा. २) वेदामध्यें 'बहुभिर्वसव्यैः' येथें 'वसु' शब्दाहून यत् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० हस्तौ पृणस्व बहुभिर्वसव्यैः.

(वा.३) वेदामध्यें 'अग्निरीशे वसव्यस्य' येथें वसु शब्दाहून यत् प्रत्यय होतो असें म्हणावें.

तर मग तसें उपसंख्यान केलें पाहिजे.

उपसंख्यान करावयास नको.

(वा. ४) स्वार्थी यत् प्रत्यय केला असतां हीं उदाहरणें सिद्ध होतील. जे 'वसु' तेच येथें वसव्य होत.

याप्रमाणें श्री भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या चवथ्या अध्यायाच्या चवथ्या पादाचें पहिलें आह्निक समाप्त झालें. पादही समाप्त झाला व चवथा अध्यायही समाप्त झाला.

---

२—प्रकृत सूत्रामध्यें वसोः असा योगविभाग करून वसु शब्दाहून स्वार्थी यत् प्रत्यय सांगावा. उदा० बहुभिर्वसव्यैः. वसव्यस्य येथें यत् प्रत्यय मयट् प्रत्ययाच्या अर्थी न करतां स्वार्थी केला तरी चालेल.

१—(सू. १४१) नक्षत्र शब्दाहून वेदामध्यें स्वार्थी घ प्रत्यय होतो. उदा०—नक्षत्रियेभ्यः स्वाहा.

१—(सू. १४२) सर्व आणि देव या शब्दाहून वेदामध्यें स्वार्थी तातिल् प्रत्यय होतो. उदा०—सर्वतातिम्; देवतातिम्.

१—(सू. १४३) शिव, शम् आणि अरिष्ट या शब्दांहून 'तें करणारा' या अर्थी वेदामध्यें तातिल् प्रत्यय होतो. उदा०—शिवं करोतीति शिवतातिः, शंतातिः, अरिष्टतातिः.

१—(सू. १४४) शिव, शम् आणि अरिष्ट या शब्दांहून वेदामध्यें 'भाव' या अर्थी तातिल् प्रत्यय होतो. उदा०—शिवस्य भावः शिवतातिः, शंतातिः, अरिष्टतातिः.

अ.४पा.४आ.१ समाप्त व पाद आणि अध्यायही समाप्त.

**प्राक् क्रीताच्छः ॥ ५ । १ । १ ॥**

प्राग्वचनं किमर्थम् ।

**प्राग्वचन उक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । तत्र तावदुक्तं प्राग्वचनं सकृद्विधानार्थमधिकारात्सिद्धमिति चेदपवादाविषयेऽण्प्रसङ्ग इति । इहापि प्राग्वचनं क्रियते सकृद्विधानार्थम् । सकृद्विहितः प्रत्ययो विहितो यथा स्यात् । योगे योगे तस्य ग्रहणं मा कार्षमिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । अधिकारादप्येतत्सिद्धम् । अधिकारः प्रतियोगं तस्यानिर्देशार्थ इति योगे योग उपतिष्ठते ॥ अधिकारात्सिद्धमिति चेदपवादविषये छप्रसङ्गः । अधिकारात्सिद्धमिति चेदपवादविषये छः प्राप्नोति । उगवादिभ्यो यत् [ ५. १. २. ] छश्चेति च्छोऽपि प्राप्नोति । तस्मात्प्राग्वचनं कर्तव्यम् ॥ अथ क्रियमाणेऽपि प्राग्वचने कथमिदं विज्ञायते प्राक्क्रीताद्याः प्रकृतय आहोस्वित्प्राक्क्रीताद्ये ऽर्था इति । किं चातः । यदि विज्ञायते प्राक्क्रीताद्याः प्रकृतय इति स एव दोषोऽपवादविषयेऽपि

( सू. १ ) या सूत्रांत ' प्राक् क्रीतात् ' हे शब्द कशाकरितां ? ( नुसतें 'छः' असें सूत्र करावें. )

( वा. १ ) प्राक् शब्द घालण्याच्या प्रयोजनासंबंधीं मागें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

"प्राग्वचनं सकृद्विधानार्थम् अधिकारात्सिद्धमिति चेदपवादविषयेऽण्प्रसङ्गः (४।१।८३ वा. १, २) असें मागें सांगितलेंच आहे.

तसेंच प्रस्तुत स्थलींही प्राक् शब्द घालण्याचा हेतु छ प्रत्ययाचें विधान एकदांच करावें हा आहे. एकदा प्रत्ययाचें विधान करून ठेवले म्हणजे योग्य त्या ठिकाणीं पुनः उच्चारण न करतां त्या प्रत्ययाचें विधान व्हावें, व पुन्हां पुन्हां दर सूत्रांत छ प्रत्ययाचें उच्चारण आपणास करावयास नको या हेतूनेंच पाणिनीनें ' प्राक् क्रीतात् ' हे शब्द सूत्रात घातले आहेत.

वर निर्दिष्ट केलेलें हें प्रयोजन म्हणून सांगतां येणार नाहीं. कारण वर निर्दिष्ट केलेलें काम 'छः' असें अधिकार सूत्र करून सुद्धां भागेल. कारण, अधिकार करण्याचा हेतूच हा असतो कीं एकदां उच्चारण्यानें काम भागावें; पुन्हां पुन्हां उच्चारण करण्यास लागूं नये. तेव्हां 'छ' असा अधिकार केला तरी दर एक सूत्रांत छः हें पद उपस्थित होईलच.

अधिकारानें काम भागेल असें म्हणाल तर ज्या ठिकाणीं छ प्रत्ययाचा अपवाद म्हणून दुसरा प्रत्यय सांगितला आहे त्या ठिकाणींही छ प्रत्यय होऊं लागेल. उदाहरणार्थ 'उगवादिभ्यो यत्' या पुढील सूत्रानें यत् प्रत्यय सांगितला आहे म्हणून व छ हा अधिकार आहे म्हणून यत् व छ दोन्ही प्रत्ययांचें विधान होईल. एकंदरीत 'प्राक्' हा शब्द सूत्रात घालणें जरूर आहे.

आतां जरी सूत्रांत प्राक् शब्द घातला तरी प्रस्तुत सूत्राचा अर्थ कसा करावयाचा ? तेन क्रीतम् या पूर्वीच्या सूत्रात जेथें जेथें प्रत्यय होण्याकरिता मूळ शब्द उच्चारले असतील तेथें तेथे असा अर्थ करावयाचा, अथवा जेथें जेथें निरनिराळे अर्थ सांगितले आहेत तेथें तेथें असा अर्थ करावयाचा ?

या दोहोंमध्यें फरक काय ?

कां बरें; जर 'तेन क्रीतम् या सूत्राचे पूर्वीच्या सूत्रांत जेथें जेथें प्रकृती उच्चारल्या आहेत तेथें तेथें' असा अर्थ केला तर पूर्वी सांगितलेलाच दोष येईल. म्हणजे 'छ' चा अपवाद प्रत्यय ज्या सूत्रानें सांगितला आहे त्या सूत्रानें छ व अपवाद प्रत्यय हे दोन्हीही

१—( सू. १ ) हें अधिकारसूत्र आहे. 'क्रीतम्' (५।१।३७) या अर्थाच्या पूर्वी छ प्रत्ययाचा अधिकार केला आहे. अर्थाचा निर्देश ज्या ठिकाणीं केला असेल तेथें छ प्रत्ययाचें विधान समजावे.

च्छप्रसङ्ग इति । अथ विज्ञायते प्राक्क्रीताद्ये ऽर्था इति न दोषो भवति । समानेऽर्थे प्रकृतिविशेषादुत्पद्यमानो यच्छं बाधिष्यते । यथा न दोषस्तथास्तु । प्राक्क्रीताद्ये ऽर्था इति विज्ञायते । कुत एतत् । तथा ह्ययं प्राधान्येनार्थं प्रतिनिर्दिशति । इतरथा हि बह्वयस्तत्र प्रकृतयः पठ्यन्ते ततो यां कांचिदेव प्रकृतिमवधित्वेनोपाददीत॥अथवा पुनरस्तु प्राक्क्रीताद्याः प्रकृतय इति । ननु चोक्तमपवादविषयेऽपि च्छप्रसङ्ग इति । न वा क्वचिद्वावचनात् । न वैष दोषः । किं कारणम् । क्वचिद्वावचनात् । यदयं क्वचिद्वावचनं करोति विभाषा हविरपूपादिभ्यः [५. १. ४.] इति तज्ज्ञापयति नापवादविषये छो भवतीति ॥ यद्येवं नार्थः प्राग्वचनेन । अधिकारात्सिद्धम् । ननु चोक्तमधिकारात्सिद्धमिति चेदपवादविषये

---

होऊं लागतील. पण 'जेथें जेथें निरनिराळे अर्थ उच्चारले आहेत तेथें तेथें' असा अर्थ केला तर कांहींही दोष येत नाहीं. कारण, एकाच अर्थी सामान्यतः छ प्रत्यय व विशिष्ट शब्दाचे पुढें यत् प्रत्यय असे दोन सूत्रांनीं दोन प्रत्यय विशिष्ट शब्दाचे पुढें प्राप्त झाल्यास यत् प्रत्यय हा छ प्रत्ययाला बाजूला सारूं शकेल.

तर मग ज्या रीतीनें दोष येणार नाहीं अशा रीतीनें अर्थ करावा. 'तेन क्रीतम् या सूत्राचे पूर्वींच्या सूत्रांत जेथें जेथें निरनिराळे अर्थ सांगितले आहेत तेथें तेथें' असा अर्थ आम्ही करतों.

असाच अर्थ काय म्हणून करतां?

असा अर्थ करण्याचें कारण एवढेंच कीं प्रस्तुत सूत्रांत क्रीतात् या शब्दानें मुख्यतः अर्थच सांगितला आहे. जर पाणिनीच्या मनांत 'जेथें जेथें निरनिराळ्या प्रकृती सांगितल्या आहेत तेथें तेथें छ प्रत्यय होतो' असें सांगावयाचें असतें तर त्यानें 'क्रीतात्' हा अर्थ प्रतिपादन करणारा शब्द प्रस्तुत सूत्रांत मर्यादा म्हणून न सांगतां पुष्कळ ठिकाणीं मूळ प्रकृति म्हणून शब्द घातले आहेत त्यांतील एकादा प्रकृति—वाचक शब्द मर्यादा म्हणून उचलला असता, व तो प्रस्तुत सूत्रांत घातला असता.

अथवा तुम्ही म्हणतां तसा कां अर्थ करा ना. 'तेन क्रीतम् या सूत्राचे पूर्वीं ज्या ज्या सूत्रांत प्रकृति उच्चारिली आहे त्या त्या सूत्रांत' असा अर्थ होऊ द्या. पण आतांच नाहीं का तुम्ही बोललां कीं 'तसें केल्यास अपवाद-प्रत्यय ज्या सूत्रानें सांगितला आहे त्या सूत्रानें अपवाद प्रत्यय व छ प्रत्यय दोन्हीही होऊं लागतील'?

'न वा क्वचिद्वावचनात्' म्हणजे हा दोष येत नाहीं; असें काय म्हणून? तर कांहीं ठिकाणीं प्रत्यय विकल्पानें सांगितला आहे म्हणून. ज्या अर्थी आचार्य पाणिनि कांहीं ठिकाणीं उदा० विभाषा हविरपूपादिभ्यः (५।१।४) या सूत्रांत विकल्पानें प्रत्यय सांगतात त्या अर्थी असें अनुमान निघतें कीं अपवाद प्रत्यय ज्या सूत्रानें सांगितला आहे त्याच सूत्रानें अधिकारामुळें प्राप्त झालेला छ प्रत्ययच होत नाहीं.

असें जर असेल तर 'प्राक्' शब्द सूत्रांत घालण्याचा कांहींच उपयोग नाहीं. प्रस्तुत सूत्र जरी अधिकार सूत्र घेतलें तरीही आपलें काम भागतें.

पण आतांच नाहीं का तुम्ही म्हणालां कीं अधिकारानें काम भागेल असें म्हणाल तर ज्या ठिकाणीं छ प्रत्ययाचा अपवाद म्हणून दुसरा प्रत्यय सांगितला असेल त्या ठिकाणींही छ प्रत्यय होऊं लागेल?

छप्रसङ्ग इति। परिहृतमेतन्न वा कचिद्वावचनादिति ॥ अथ किमर्थमियानवधिर्गृह्यते न प्राक्ठञ इत्येवोच्येत। एतज्ज्ञापयत्याचार्योऽर्थेष्वयं भवतीति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम्। समानेऽर्थे प्रकृतिविशेषादुत्पद्यमानो यच्छं बाधते ॥

## उगवादिभ्यो यत् ॥ ५। १। २॥

**यञ्ज्यावञः पूर्वविप्रतिषिद्धं सनङ्गूपानहौ प्रयोजनम् ॥ १ ॥**

यञ्ज्यौ भवतोऽञः पूर्वविप्रतिषेधेन। किं प्रयोजनम्। सनङ्गूपानहौ प्रयोजनम्। यतोऽवकाशः। शङ्कव्यं दारु पिचव्यः कार्पासः। अञोऽवकाशः। बार्भ्रम् वारत्रम्। सनङ्गुर्नाम चर्मविकारस्तस्मादुभयं प्राप्नोति। सनङ्गव्यं चर्म। ञ्यस्यावकाशः। औपानह्यं चर्म ॥ औपानह्यं दारु। अञः स एव। उपानन्नाम चर्मविकारस्तस्मादुभयं प्राप्नोति। औपानह्यं चर्म ॥

**ढञ्च ॥ २ ॥**

ढञ्च भवत्यञः पूर्वविप्रतिषेधेन। ढञो ऽवकाशः। छादिषेयं तृणम्। अञः

---

हा दोष आम्हीं दूर केला आहे. आम्हीं आतांच सांगितलें कीं हा दोष येत नाहीं. कारण कांहीं ठिकाणीं (अपवाद) प्रत्यय विकल्पानें सांगितला आहे.

बरें, तर आतां प्राक् क्रीतात् अशी येथें अर्थाची मर्यादा काय म्हणून सांगितली आहे? 'ठञ् प्रत्ययाचे पूर्वी' अशी छ प्रत्ययाला प्रत्ययाचीच मर्यादा कां नाहीं सांगितली?

'तेन क्रीतम्' ही अर्थाची मर्यादा सांगण्यावरून आचार्य पाणिनि असें सुचवितात कीं क्रीत या अर्थाच्या पूर्वी जेथें अर्थाचा निर्देश असेल तेथेंच या छ प्रत्ययाचा संबंध होतो.

अशा प्रकारचें अनुमान काढण्याचा फायदा कोणता?

एकाच अर्थीं विशिष्ट प्रकृतीला 'छ' व 'यत्' असे दोन्ही प्रत्यय होऊं लागले तर यत् प्रत्यय छ प्रत्ययाचा बाध करतो ही गोष्ट सहज निष्पन्न होणें हा फायदा होय.

(सू. २ वा. १) यत् आणि ञ्य हे प्रत्यय पूर्वविप्रतिषेधानें अञ् प्रत्ययाचा बाध करून होतात असें सांगावें.

असें सांगण्याचें प्रयोजन काय?

सनङ्गु व उपानह् हे शब्द घेऊन त्याना अनुक्रमानें यत् आणि ञ्य प्रत्यय लावून रूपें साधणें हें या पूर्वविप्रतिषेधाचें प्रयोजन होय.

प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या यत् प्रत्ययाला स्वतंत्र जागा 'शङ्कव्यं दारु' 'पिचव्यः कार्पासः' वगैरे आहेत. तसेंच अञ् प्रत्ययाला (५।१।१५) स्वतंत्र जागा बार्भ्रम् वारत्रम् वगैरे आहेत. सनङ्गु म्हणजे चामड्याची केलेली एक वस्तु. सनङ्गु शब्दापुढें यत् व अञ् हे दोन्ही प्रत्यय प्राप्त होतात. पण या दोहोंपैकीं यत् प्रत्यय एकटाच होतो, व सनङ्गव्य असें रूप साधतें. त्याप्रमाणेंच ञ्य (५।१।१४) प्रत्ययाला स्वतंत्र जागा औपानह्यं दारु यांतील औपानह्य शब्द, अञ् प्रत्ययाला जागा म्हणून बार्भ्रम् वारत्रम् वगैरे शब्द वरतीं दिलेच आहेत. उपानह् म्हणजे चामड्याची केलेली एक वस्तु. या उपानह् शब्दापुढें य व अञ् हे दोन्ही प्रत्यय प्राप्त होतात; पण दोहोंपैकीं य प्रत्यय पूर्वविप्रतिषेधानें होतो व औपानह्य रूप होतें.

(वा २) ढञ् प्रत्यय सुद्धां अञ् प्रत्ययाला बाजूला सारून पूर्वविप्रतिषेधानें होतो. ढञ् (५।१।१३) प्रत्ययाला स्वतंत्र जागा छादिषेयं

---

१—(सू. २) उवर्णान्त शब्द आणि गो वगैरे शब्द यांहून 'क्रीत' या अर्थाच्या पूर्वींच्या 'तस्मै हितम्' वगैरे अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—शङ्कवे हितम् शङ्कव्यम् दारु; गवे हितम् गव्यम्; हविष्यम्,

२—येथें यत् व ञ्य अशीं पदें आहेत. यत् यांतील तकाराला श्चुत्व (८।४।४०) आणि अनुनासिक (८।४।४५) होऊन ञकार झाला आहे.

स एव । छदिर्नाम चर्मविकारस्तस्मादुभयं प्राप्नोति । छदिषेयं चर्म । ढञ्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥

**हविरपूपादिभ्यो विभाषाया यत् ॥ ३ ॥**

हविरपूपादिभ्यो विभाषाया यद्भवति पूर्वविप्रतिषेधेन । हविरपूपादिभ्यो विभाषाया अवकाशः । आमिक्ष्यम् आमिक्षीयम् । पुरोडाश्यम् पुरोडाशीयम् । यतः स एव । इहोभयं प्राप्नोति । चरव्यास्तण्डुलाः । यद्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥

**अन्नविकारेभ्यश्च ॥ ४ ॥**

अन्नविकारेभ्यश्च विभाषाया यद्भवति पूर्वविप्रतिषेधेन । अन्नविकारेभ्यश्च विभाषाया अवकाशः । सुर्याः सुरीयाः । यतः स एव । इहोभयं प्राप्नोति । सक्तव्या धाना इति । यद्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥

स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । इष्टवाची परशब्दः विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति ॥

अयं नाभिशब्दो गवादिषु पठ्यते । तत्रैवोच्यते नाभि नभं चेति । तत्र चोद्यते ।

**नाभेर्नभभावे प्रत्ययानुपपत्तिः प्रकृत्यभावात् ॥ ५ ॥**

नाभेर्नभभावे प्रत्ययस्यानुपपत्तिः । किं

---

तृणम् यातील छादिषेय शब्द आहे. अञ् प्रत्ययाला स्वतंत्र जागा वर दाखविलेलीच आहे- छदिस् शब्दाचा अर्थ एक चामडयाची वस्तु असा जेव्हां घेतला जातो तेव्हां छदिस् शब्दापुढें दोन्ही प्रत्यय एकदम प्राप्त होतात त्यांपैकीं पूर्वविप्रतिषेधानें ढञ् प्रत्यय होऊन छादिषेयं चर्म असें रूप साधतें.

( वा. ३ ) हविर्द्रव्यें व अपूप वगैरे शब्द यांहून विकल्पानें सांगितलेल्या यत् प्रत्ययाला बाजूला सारून 'उगवादिभ्यो यत्' या सूत्रानें सांगितलेला यत् प्रत्यय पूर्वविप्रतिषेधानें होतो. हविर्द्रव्यें व अपूप वगैरे शब्द यांहून सांगितलेल्या वैकल्पिक यत् प्रत्ययाला स्वतंत्र जागा आमिक्ष्यम् आमिक्षीयम्, पुरोडाश्यम् पुरोडाशीयम्, वगैरे आहेत. प्रस्तुत सूत्रानें सांगितलेल्या यत् प्रत्ययाला स्वतंत्र जागा वरतीं दाखविलीच आहे. पण 'चरव्यास्तण्डुलाः' येथें दोन्हीं सूत्रांची प्राप्ति येते; पैकीं 'उगवादिभ्यो यत्' या सूत्रानें सांगितलेला नित्य यत् प्रत्ययच पूर्वविप्रतिषेधानें होतो.

( वा. ४ ) अपूपादि गणामध्यें ( ५।१।४ ) अन्नविकारवाचक शब्दांहून सांगितलेला वैकल्पिक यत् प्रत्यय बाजूला सारून प्रस्तुत सूत्रानें सांगितलेला यत् प्रत्यय होतो. अन्नविकारवाचक शब्दांहून सांगितलेल्या वैकल्पिक यत् प्रत्ययाचीं स्वतंत्र उदाहरणें सुर्याः सुरीयाः वगैरे आहेत. 'उगवादिभ्यो यत्' या सूत्रानें सांगितलेल्या यत् प्रत्ययाचीं स्वतंत्र उदाहरणें वरतीं दिलींच आहेत. सक्तव्याः धानाः यांतील सक्तु शब्दांहून दोन्ही सूत्रांनीं यत् प्रत्यय प्राप्त होतो. पैकीं प्रकृत सूत्रानें सांगितलेला यत् प्रत्यय पूर्वविप्रतिषेधानें होतो.

बरे तर, या सर्व ठिकाणीं पूर्वविप्रतिषेधानें यत् प्रत्यय होतो, असें विधान करणें जरूर आहे.

विधान करण्याची जरूर नाहीं 'विप्रतिषेधे परम्' ( १।४।२ ) या सूत्रांतील पर शब्दाचा इष्ट असा अर्थ आहे त्यामुळें दोन सूत्रांनीं दोन कार्यें एकदम आलीं असतां तेथें इष्ट असेल तें होतें.

बरे, आतां येथें असा विचार करावयाचा आहे कीं नाभि हा शब्द गवादि गणामध्यें घातला आहे. व तेथेच नाभि शब्दाला नभ असा आदेश होतो असेंही सांगितले आहे; तेव्हां येथें पुढील शंका येते—

( वा. ५ ) नाभि शब्दाला यत् प्रत्यय लावला असतां नभ आदेश होतो हे खरें, पण नाभि शब्दाहून यत् प्रत्ययच होऊं शकणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं— नभ्य शब्दापासून

कारणम्। प्रकृत्यभावात्। विकृतेः प्रकृतावभिधेयायां प्रत्ययेन भवितव्यं न च नाभिसंज्ञिकाया विकृतेः प्रकृतिरस्ति। यदेव हि तन्मण्डलचक्राणां मण्डलचक्रं तन्नभ्यमित्युच्यते ॥

सिद्धं तु शाखादिषु वचनाद्ध्रस्वत्वं च ॥ ६ ॥

सिद्धमेतत्। कथम्। शाखादिषु नाभिशब्दः पठितव्यो ह्रस्वत्वं च वक्तव्यम्। नाभिरिव नभ्यमिति। कः पुनरिहोपमार्थः। यत्तदक्षधारणं परिवर्तनं वा॥ अपर आह। यत्तदञ्जनोपाञ्जनमिति॥ न तर्हीदानीमिदं वक्तव्यं नाभि नभं चेति। वक्तव्यं च। किं प्रयोजनम्। यान्येतान्यरवन्ति चक्राणि तदर्थम्। तत्र नाभिसंज्ञिकाया विकृतेः प्रकृतिरस्ति। यानि चाप्यनरवान्ति चक्राणि तदर्थमपीदं वक्तव्यम्। दृश्यते हि समुदायादवयवस्य पृथक्त्वम्। तद्यथा। वार्क्षी शाखेति। गुणान्तरयोगाच्च विकारशब्दो दृश्यते। तद्यथा। वैभीतको यूपः। खादिरं

---

नाभीची प्रकृति हा अर्थ दाखविला जात नाहीं. यत् प्रत्यय हा विकृति-वाचकाहून त्याची प्रकृति या अर्थीं होत असतो. नाभि नांवाच्या विकृतीची प्रकृति नभ्य या शब्दानें दाखविली जात नाहीं. वर्तुळाकार चाक असलेल्या रथाच्या त्या वर्तुळाकार चक्रालाच नभ्य म्हणतात. (आणि नाभि म्हणजे चाकामधील तुंबा, त्याची चाक हें प्रकृति म्हणजे मूळ द्रव्य असूं शकत नाहीं.)

(वा.६) नभ्य हें उदाहरण सिद्ध होत आहे.

तें कसें?

शाखादि गणात (५।३।१०३) नाभि शब्द घालावा व त्या नाभि शब्दांतील आकाराला ऱ्हस्व सांगावा. म्हणजे 'नाभीसारखा' या अर्थीं नभ्य शब्द साधला जाईल.

पण 'नाभीसारखा' यामध्यें जो उपमेचा अर्थ म्हणजे साधर्म्य आहे तें येथें कसें समजावयाचें? (चाक व तुंबा यांत कोणत्या प्रकारचें साधर्म्य आहे?)

कां बरें? कणा धारण करणें व फिरणें या दोहींनीं साधर्म्य आहे.

अथवा दुसरा एक वैयाकरण म्हणतो तेल माखणें व जवळच्या भागावर तेल सोडणें याही दोन बाबतीत साम्य आहे.

तर मग गवादि गणांत नाभि नभं च असे शब्द घालण्याचें काहींच कारण नाहीं

तें का?

गवादि गणांत नाभि नभं च असे शब्द घातलेच पाहिजेत.

कशाकरितां घातले पाहिजेत?

ज्या चाकाना आरा लावल्या असतात त्या चाकाना लागणारा नभ्य शब्द साधण्याकरितां. कारण तेथें नाभि म्हणजे तुंबा ही जी विकृति तिचें प्रकृतिभूत जें काष्ठ तें तिच्यापेक्षां निराळें असूं शकते. आतां ज्या चाकांना आरा नाहींत त्याकरितांही 'नाभि नभं च' असें त्या गणांत म्हटलें पाहिजे. कारण 'समुदायापेक्षां अवयव निराळा असा व्यवहार होतो' हें दृष्टीस पडतें. उदा०—वृक्षस्य इयं वार्क्षी शाखा म्हणजे झाडाची फांदी. तसेंच वस्तूमध्यें कांहीं निराळा गुण उत्पन्न झाला म्हणजे त्या मूळच्या वस्तूचाच तो विकार आहे असाही व्यवहार झालेला दिसतो. उदा०—वैभीतकः यूपः; खादिरं चषालम् तेव्हां तुंबा हा अवयव चाकाला म्हणतां येतें.

---

३—मधला तुंबा आणि बाहेरील चाक या दोहोंमध्यें जीं आडवीं काष्ठें असतात त्या अरा होत. त्या ठिकाणीं तुंबा व चाक हे दोन निराळे असल्यामुळे चाकाचें काष्ठ हें तुंब्याची मूळ प्रकृति होऊं शकते. तेव्हां तेथें नाभीची प्रकृति या अर्थानें नभ्य असें

४—बिभीतक म्हणजे बिब्याचें झाड त्याच्या लांकडाला यूपाचा आकार आला कीं तो यूप त्या वृक्षाचा विकार समजला जातो. तसाच चषाल हाही खदिराच्या (खैराच्या) झाडाचा विकार समजला

चषालमिति । तत्रावयवात्समुदाये वृत्तिर्भविष्यति ॥

अथ यो नभ्यार्थो वृक्षः कथं तत्र भवितव्यम् । नभ्यो वृक्षः । नभ्या शिंशपेति ।

नभ्यात्तु लुग्वचम् ॥ ७ ॥

नभ्यात्तु लुग्वक्तव्यः ॥ स तर्हि लुग्वक्तव्यः । न वक्तव्यः । तादर्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । नभ्यार्थो नभ्य इति ॥

कम्बलाच्च संज्ञायाम् ॥ ५ । १ । ३ ॥

अयं योगः शक्योऽवक्तुम । कथमशीतिशतं कम्बल्यमिति । निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यो न तद्धितलुकि [ ४. १. २२ ] इति ॥ इदं तर्हि प्रयोजनं संज्ञायामिति वक्ष्यामीति । इह मा भूत् । कम्बलीया ऊर्णाः । एतदपि नास्ति प्रयोजनम् । परिमाणपर्युदासेन पर्युदासे प्राप्ते तत्र कम्बल्यग्रहणं क्रियते परिमाणार्थं परिमाणं च संज्ञैव ॥

---

चाकाचा विकार समजून तद्वाचक नाभि शब्दाहून प्रकृति या अर्थी म्हणजे सबंध चाक या अर्थी प्रत्यय लावतां येईल.

आतां 'चाक या अर्थाचा जो नभ्य शब्द त्याकरितां' अशा अर्थाची विवक्षा असेल तेव्हा त्या अर्थी (५।१।१२) प्रत्यय करून रूप कसें व्हावें ?

नभ्यः वृक्षः, नभ्या शिंशपा असेंच व्हावें. त्याकरितां—

( वा. ७ ) नभ्य शब्दाहून केलेला 'प्राक्क्रीत' या अर्थी जो प्रत्यय त्याचा लुक् होतो असें म्हणावें.

तर मग तसा लुक् तेथें सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण, 'ज्या वस्तूकरितां जो पदार्थ उपयोगी पडतो त्या वस्तूचा शब्द त्या पदार्थाला देतां येतो.' तेव्हां त्या नभ्याकरितां जो वृक्ष त्यालाही नभ्य असें म्हणतां येईल.

( सू. ३ ) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल.

पण सूत्र नसेल तर अशीतिशतं कम्बल्यम् येथें यत् प्रत्यय कसा होईल ?

निपातनामुळें कम्बल्य हा शब्द सिद्ध होईल.

तें निपातन कोणतें ?

अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यो न तद्धितलुकि ( ४।१।२२ ) येथें कम्बल्य शब्द उच्चारला आहे तें निपातन होय.

तर मग संज्ञा असतांनाच यत् प्रत्यय होण्याकरितां हें सूत्र केलें पाहिजे. कारण, कम्बलीया ऊर्णाः येथें संज्ञा असताना यत् प्रत्यय न[2] झाला पाहिजे.

हाही या सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, 'अपरिमाण' या शब्दानें परिमाणवाचक शब्द वगळला आहे. तेव्हा परिमाण अर्थ असताना तो निषेध व्हावा याकरितांच तेथें कम्बल्यशब्द उच्चारलां[3] आहे. आणि कम्बल्य म्हणजे एक प्रकारचें परिमाण ही तर संज्ञाच आहे.

---

जातो. यूपाच्या अग्रावरील लाकडाचें जें वलय त्याला चषाल म्हणतात. तेव्हां अरा नसलेलें एकसंधी चाक असलें तरी तेथें तुबा हा अवयव सबंध चाकापेक्षा वेगळा असा व्यवहार होईल.

५—नभ्य शब्दाहून त्या अर्थी प्रत्यय मात्र अनभिधानास्तव होत नाहीं.

१—( सू. ३ ) कम्बल शब्दाहून हित वगैरे प्राक्क्रीतीय अर्थी यत् प्रत्यय होतो, पण तो यत्प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—कम्बल्यम्. हें एक प्रकारचें परिमाण आहे.

२—कम्बल म्हणजे कांबळा. त्याकरितां ऊर्णा म्हणजे लोंकर. निपातनावरून यत् प्रत्ययाची कल्पना केली तर संज्ञा नसतांनाही कम्बलीया ऊर्णा येथें तो यत् प्रत्यय होऊं लागेल.

३—तेव्हा त्या निपातनावरून होणारा यत् प्रत्यय परिमाण अर्थ असतांनाच होईल.

**विभाषा हविरपूपादिभ्यः ॥ ५ । १ । ४ ॥**

किमियं प्राप्ते विभाषाहोस्विदप्राप्ते । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते । उवर्णान्तादिति वा नित्ये प्राप्ते ऽन्यत्र वाप्राप्ते ।

**हविरपूपादिभ्योऽप्राप्ते ॥ १ ॥**

हविरपूपादिभ्यो ऽप्राप्ते विभाषा प्राप्ते नित्यो विधिः । चरव्यास्तण्डुलाः ॥

**[ प्राग्घिताच्छः ॥ ५ । १ । ५ ॥ ]**

**शरीरावयवाद्यत् ॥ ५ ॥ १ ॥ ६ ॥**

**यत्प्रकरणे रथाच्च ॥ १ ॥**

यत्प्रकरणे रथच्चोपसंख्यानं कर्तव्यम् । रथाय हिता रथ्या ॥

**खलयवमाषतिलवृषब्रह्मणश्च ॥ ५ । १ । ७ ॥**

वृषशब्दोऽयमकारान्तो गृह्यते । वृषन्शब्दो ऽपि नकारान्तोऽस्ति तस्योपसंख्यानं कर्तव्यं वृषशब्दश्चादेशो वक्तव्यो वृष्णे हितमिति विगृह्य वृष्यमित्येव यथा स्यात् । तथा ब्रह्मन्शब्दो नकारान्तो गृह्यते ब्राह्मणशब्दश्चाकारान्तोऽस्ति तस्योपसंख्यानं कर्तव्यं ब्रह्मन्शब्दश्चादेशो वक्तव्यो ब्राह्मणेभ्यो हितमिति विगृह्य ब्रह्मण्यमित्येव यथा स्यात् ॥

---

( सू. ४ ) ही काय प्राप्त-विभाषा आहे किंवा अप्राप्त विभाषा आहे ?

प्राप्त-विभाषा कशी संभवते आणि अप्राप्त विभाषा कशी संभवते ?

चरु वगैरे उवर्णान्त शब्दांहून यत् प्रत्यय नित्य प्राप्त ( ५।१।२ ) होतो [३]. उवर्णान्त शब्दांशिवाय इतर ठिकाणीं यत् प्रत्यय मुळींच प्राप्त होत नाहीं.

( वा. १ ) ज्या हविर्विशेषवाचक शब्दाहून आणि अपूपादि गणांतील शब्दांहून यत् प्रत्यय प्राप्त होत नाहीं तेथेंच ह्यानें विकल्प होतो. उवर्णान्त शब्दांहून तर नित्यच यत् प्रत्यय प्राप्त होतो. (५।१।२ वा. ३) उदा०-चरव्याः तण्डुलाः

( सू. ६ वा. १ ) ह्या यत् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें रथ शब्दाहून यत् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०-रथाय हिता रथ्या.

( सू. ७ ) ह्या सूत्रामध्यें वृष असा अकारान्त शब्द उच्चारला आहे. पण वृषन् असा नकारान्त शब्द जो आहे त्याहूनही हा यत् प्रत्यय होतो असें म्हणावें;आणि त्या प्रत्ययाच्या बरोबरच वृषन् शब्दाला वृष असा अकारान्त आदेश होतो असें म्हणावें. कारण, वृष्णे हितम् असा विग्रह केला असतांना तेथेंही वृष्यम् असेंच रूप झालें पाहिजे. तसेंच येथें ब्रह्मन् असा नकारान्त शब्द उच्चारला आहे. पण ब्राह्मण असा अकारान्त शब्द जो आहे त्याहूनही हा यत् प्रत्यय होतो असें म्हणावें, आणि त्या प्रत्ययाच्या बरोबर ब्राह्मण शब्दाला ब्रह्मन् असा आदेश होतो असें म्हणावें. कारण ब्राह्मणेभ्यः हितम् असा विग्रह केला असतां तेथेही ब्रह्मण्यम् असेंच रूप झालें पाहिजे.

---

१—( सू. ४ ) हविर्विशेषवाचक शब्द आणि अपूपादि गणांतील शब्द याहून हित वगैरे प्राक्क्रीतीय अर्थीं विकल्पानें यत् प्रत्यय होतो. आमिक्ष्यम्, आमिक्षीयम् दधि; अपूप्यम्, अपूपीयम्.

२—हा प्रश्न हविर्विशेषवाचक शब्दांसंबंधानें आहे.

३—येथें उवर्णाची अनुवृत्ति करून ते हविर्विशेषवाचक शब्दाचे विशेषण करावयाचें, असा अभिप्राय आहे. येथें उवर्णाची अनुवृत्ति नाहीं असा सिद्धान्त आहे.

१—( सू. ५ ) हें अधिकारसूत्र आहे. प्रातिपदिकाहून 'त्याला हितकारक' या अर्थीं छ प्रत्यय होतो. उदा०—वत्सेभ्यः हित. वत्सीयः, वत्सीय शब्दाचा गवळी हा अर्थ आहे.

१—( सू. ६ ) शरीरावयववाचक शब्दाहून 'त्याला हितकारक' या अर्थीं यत् प्रत्यय होतो. उदा०—दन्ताय हितम् दन्त्यम्.

१—( सू. ७ ) खल, यव, माष, तिल, वृष आणि ब्रह्मन् या शब्दाहून 'तस्मै हितम्' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—खलाय हितम् खल्यम् इत्यादि.

तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् समानार्थावेतौ वृषशब्दो वृषन्शब्दश्च ब्रह्मन्शब्दो ब्राह्मणशब्दश्च । आतश्च समानार्थावेवं ह्याह कुतो नु चरसि ब्रह्मन् कुतो नु चरसि ब्राह्मणेति । तत्र द्वयोः शब्दयोः समानार्थयोरेकेन विग्रहोऽपरस्मादुत्पत्तिर्भविष्यत्यविरविकन्यायेन । तद्यथा । अवेर्मांसमिति विगृह्य अविकशब्दादुत्पत्तिर्भवति आविकमिति । एवमिहापि वृषाय हितमिति विगृह्य वृष्यमिति भविष्यति वृष्णे हितमिति विगृह्य वाक्यमेव । तथा ब्रह्मणे हितमिति विगृह्य ब्रह्मण्यमिति भविष्यति ब्राह्मणेभ्यो हितमिति विगृह्य वाक्यमेव भविष्यति । त्रैशब्द्यं चेह साध्यं तच्चैवं सति सिद्धं भवति ॥

### [ अजाविभ्यां थ्यन् ॥ ५ । १ । ८ ॥ ]

### आत्मन्विश्वजनभोगोत्तरपदात्खः ॥ ५ । १ । ९ ॥

भोगोत्तरपदात्खविधानेऽनिर्देशः पूर्वपदार्थहितत्वात् ॥ १ ॥

भोगोत्तरपदात्खविधानेऽनिर्देशः । अगमको निर्देशो ऽनिर्देशः । किं कारणम् । पूर्वपदार्थहितत्वात् । उत्तरपदार्थप्रधानस्तत्पुरुषः पूर्वपदार्थप्रधाने च प्रत्यय इष्यते ।

---

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण वृष आणि वृषन् हे शब्द एकाच अर्थाचे आहेत. तसेंच ब्रह्मन् आणि ब्राह्मण हें शब्द एकाच अर्थाचे आहेत. शिवाय, हे शब्द एकाच अर्थाचे आहेत असें लोकांमधील प्रयोगांवरूनही सिद्ध होतें. एका मनुष्याला ' कुतोऽनुचरसि ब्रह्मन् ' असें कोणी विचारतो, दुसरा कोणी त्यालाच ' कुतोऽनुचरसि ब्राह्मण ' असें विचारतो. हे ब्राह्मणा तुझा संचार कोठपासून चालू आहे असा अर्थ आहे. तेव्हां ' एकाच अर्थाच्या दोन शब्दांपैकीं एका शब्दानें फक्त विग्रह दाखवावयाचा, आणि त्या अर्थीं प्रत्यय दुसऱ्या शब्दाहूनच करावयाचा ' असें अविरविकन्यायानें कांहीं ठिकाणीं होत असतें. उदा०—अवेः मांसम् असा अवि शब्दानें फक्त विग्रहच दाखवून त्याच अर्थाच्या अविक शब्दाहून त्याचें मांस ह्या अर्थीं अण् प्रत्यय (४।३।१२०) होऊन आविकम् असें होतें. तसें येथेंही वृषाय हितम् असा वृष या अकारान्त शब्दानें विग्रह दाखविला असतां वृष्य असें रूप होतें. आणि जेव्हां वृष्णे हितम् असा विग्रह दाखवावयाचा असेल तेव्हां फक्त वाक्यच राहतें. तसेंच ब्रह्मणे हितम् असा विग्रह असा केला असतां ब्रह्मण्यम् असें रूप होईल, आणि ब्राह्मणेभ्यः हितम् असा विग्रह केला असतां वाक्यच राहील. कोणीकडून तरी येथें तीन तऱ्हेचे प्रयोग साधावयाचे आहेत ते अशा रीतीनें सिद्ध होतातच.

( सू. ९ वा. १ ) येथें 'भोगोत्तरपदात्खः' असा जो सूत्रकारांनीं निर्देश केला आहे तो अनिर्देश होय. ज्या निर्देशापासून इष्ट अर्थाचा बोध होत नाहीं तो अनिर्देशच समजला जातो.

तसा अनिर्देश येथें समजण्याचें काय बरें कारण ?

कारण असें कीं ' पूर्वपदार्थाचें हित ' या अर्थीं येथें प्रत्यय इष्ट आहे. आणि भोगशब्द उत्तरपद असलेल्या सामासिक शब्दामध्यें तर उत्तर पदार्थाला मुख्यत्व आहे; तत्पुरुषामध्यें

---

१—( सू. ८ ) अज आणि अवि या शब्दांहून ' तस्मै हितम् ' या अर्थीं थ्यन् प्रत्यय होतो. उदा०— अजेभ्य; हिता अजथ्या यूथिः, अविथ्या.

१—( सू. ९ ) आत्मन् व विश्वजन हे शब्द आणि ज्यांमध्ये भोग शब्द उत्तरपद आहे असे शब्द यांहून ' तस्मै हितम् ' या अर्थीं ख प्रत्यय होतो. उदा०—आत्मने हितः आत्मनीनः, विश्वजनीनः; मातृभोगीणः.

पितृभोगाय हिते प्राप्नोति पित्रे चैव हित इष्यते ॥ एवं तर्हि भोगीनर्प्रत्ययो विधास्यते ।

**भोगीनरिति चेद्वावचनम् ॥ २ ॥**

भोगीनरिति यदि प्रत्ययो विधीयते वावचनं कर्तव्यं मात्रीयः पित्रीय इत्यपि यथा स्यादिति ॥

**राजाचार्याभ्यां नित्यम् ॥ ३ ॥**

राजाचार्याभ्यां नित्यमिति वक्तव्यम् । राजभोगीनः । आचार्याद्णत्वं च । आचार्यभोगीनः ॥ किं भोगीनर्प्रत्ययो विधीयत इत्यतो राजाचार्याभ्यां नित्यमिति वक्तव्यम् । नेत्याह । सर्वथा राजाचार्याभ्यां नित्यमिति वक्तव्यम् ॥

इह च ग्रामणिभोगीनः सेनानिभोगीन इत्युत्तरपद इति ह्रस्वत्वं न प्राप्नोति । इह च अब्भोगीन इत्यपो भि [ ७. ४. ४८ ] इति तत्वं प्राप्नोति । सूत्रं च भिद्यते ॥

यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं भोगोत्तरपदात्खविधानेऽनिर्देशः पूर्वपदार्थहितत्वादिति । नैष दोषः । अयं भोगशब्दोऽस्त्येव द्रव्यपदार्थकः । तद्यथा । भोगवानयं देश इत्युच्यते यस्मिन्गावः सस्यानि च वर्तन्ते । अस्ति क्रियापदार्थकः । तद्यथा । भोगवानयं ब्राह्मण इत्युच्यते यः सम्यक्स्ननादीः क्रिया अनुभवति । तद्यः क्रियापदार्थकस्त-

---

उत्तर पदार्थालाच प्राधान्य असतें. तेव्हां पितृभोगीण: येथें पित्याच्या भोगाला जें हितकारक या अर्थी प्रत्यय होऊं लागेल. आणि पित्याला जें हितकारक या अर्थी प्रत्यय झाला पाहिजे.

तर मग आता येथें पितृ वगैरे शब्दांहून 'त्याचें हित' या अर्थी भोगीनर् एवढा प्रत्यय सांगतां येईल.

(वा. २) पितृ वगैरे शब्दांहून जर भोगीनर् प्रत्यय सांगितला तर तो विकल्पानें सांगितला पाहिजे कारण मात्रे हितः मात्रीयः, पित्रे हितः पित्रीयः असेही प्रयोग झाले पाहिजेत.

( वा. ३ ) राजन् आणि आचार्य या शब्दांहून 'त्यांचें हित' या अर्थी भोगीनर् प्रत्यय नित्य होतो असें म्हणावें. उदा०—राजभोगीनः. तसेंच आचार्य शब्दाहून केलेल्या भोगीनर् प्रत्ययांतील नकाराला णत्व होत नाहीं असें म्हणावें. उदा०—आचार्यभोगीनः.

काय पण येथें भोगीनर् प्रत्यय सांगितला म्हणून 'राजाचार्याभ्यां नित्यम्' असें वचन करावें लागेल असा अभिप्राय आहे कीं काय?

तसें कांहीं नाहीं. तर सूत्रकाराप्रमाणें भोगशब्द उत्तरपद असलेल्या प्रातिपदिकाहून ख प्रत्यय सांगितला तरी राजभोगीनः, आचार्यभोगीनः हे प्रयोग नित्य होण्याकरितां तसें म्हटलेंच पाहिजे. तसेंच भोगीनर् प्रत्यय सांगितला तर ग्रामणिभोगीनः सेनानिभोगीनः येथें उत्तरपद पुढें असतांना सांगितलेला ह्रस्व (६।३।६१) होणार नाहीं. आणि अब्भोगीनः येथें तकार आदेश ( ७।४।४८ ) होऊं लागेल असे दोष येतात शिवाय सूत्र फिरवावें लागतें तें निराळेंच !

तर मग येथें मूळचें सूत्रकारांनीं जसें सूत्र केलें आहे तसेंच असूं दे.

पण तसेंच सूत्र ठेवलें तर 'भोगोत्तरपदात्खविधानेऽनिर्देशः पूर्वपदार्थहितत्वात्' ( वा. १ ) असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष नाहीं. कारण भोग या शब्दाचा उपयोग दोन अर्थांनीं होतो. भोग घेण्याचें साधन अशी वस्तु या अर्थी भोगवान् अयं देशः असें म्हटलें जातें. त्या देशामध्यें गाई पुष्कळ आहेत व त्यांना चाराही चांगला आहे असा अर्थ तेथें मनांत येतो. तसेंच भोग घेणें ही जी क्रिया त्या अर्थी भोगवान् अयं ब्राह्मणः असें म्हटलें जातें. लहानपणापासून स्नान पान वगैरे क्रियांचा अनुभव ज्याला बरोबर मिळाला असा तेथें अर्थ मनांत येतो. तो जो भाग घेणें

स्येदं ग्रहणम् । यश्च पितृस्थाभ्यः क्रियाभ्यो हितः संबन्धादसौ पित्रेऽपि हितो भवति ॥ यदि संबन्धादस्तु द्रव्यपदार्थकस्यापि ग्रहणम् । योऽपि हि पितृद्रव्याय हितः संबन्धादसौ पित्रे हितो भवति ॥ अथवा भोगशब्दः शरीरवाच्यपि दृश्यते । तद्यथा । अहिरिव भोगैः पर्येति बाहुम् । अहिरिव शरीरैरिति गम्यते । एवं पितृशरीराय हितः पितृभोगीण इति ॥

खविधाने पञ्चजनादुपसंख्यानम् ॥ ४ ॥

खविधाने पञ्चजनादुपसंख्यानं कर्तव्यम् । पञ्चजनाय हितः पञ्चजनीनः ॥ समानाधिकरण इति वक्तव्यम । यो हि पञ्चानां जनाय हितः पञ्चजनीयः स भवति ॥

सर्वजनाट्ठञ्च ॥ ५ ॥

सर्वजनाट्ठञ्च वक्तव्यः खश्च । सर्वजनाय हितः सार्वजनिकः सर्वजनीनः ॥ समानाधिकरण इति च वक्तव्यम् । यो हि सर्वेषां जनाय हितः सर्वजनीयः स भवति ॥

महाजनान्नित्यम् ॥ ६ ॥

महाजनान्नित्यं ठञ्वक्तव्यः । महाजनाय हितो माहाजनिकः ॥ तत्पुरुष इति वक्तव्यं बहुव्रीहौ मा भूदिति । महाजनोऽस्य

---

या क्रिया अर्थाचा भोग शब्द आहे त्याचें येथें सूत्रकारांनीं ग्रहण केलें आहे. आणि पित्याच्या भोग घेणें या क्रियेला जो पदार्थ हितकारक होतो तो त्या वस्तूच्या संबधामुळें पित्याला हितकारक होतोच.

पण जर संबंधामुळें पित्याला हितकारक होतो असें म्हणणें असेल तर मग भोगसाधनीभूत वस्तु या अर्थाचा भोग शब्द घेतला तरी हरकत दिसत नाहीं. कारण, पित्याच्या भोगसाधनीभूत वस्तूला जो हितकारक तो त्या वस्तूच्या संबंधानें पित्याला हितकारक होणारच.

अथवा, भोग या शब्दाचा शरीर असाही अर्थ आहे. उदा०—अहिरिव भोगैः पर्येति बाहुम् (तै. सं. ४।६।६). येथे साप जसा आपल्या शरीरानें प्राण्याचें वेष्टन करतो तसा धनुर्धारी मनुष्य आंपल्या हाताचें चर्मानें वेष्टन करतो असा अर्थ आहे. तेव्हां पितृभोगीणः येथें पित्याच्या शरीराला हितकारक असा अर्थ होईल.

(वा. ४) येथें पञ्चजन शब्दाहून हित या अर्थीं ख प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०-पञ्चजनाय हितः पञ्चजनीनः.

पण येथें पञ्चन् आणि जन या शब्दांचें[२] सामानाधिकरण्य पाचं जे जन असा अर्थ असला पाहिजे. ज्या ठिकाणीं सामानाधिकरण्य नसून पांचाचा जन असा अर्थ असेल तेथें त्या पञ्चजनाला हितकारक या अर्थीं छ प्रत्यय होऊन पञ्चजनीयः असेंच रूप होतें.

(वा. ५) सर्वजन शब्दाहून त्याला हितकारक या अर्थीं ठञ् व ख असे प्रत्यय होतात असें म्हणावें उदा०-सर्वजनाय हितः सार्वजनिकः सर्वजनीनः. येथेंही सर्व आणि जन या शब्दांचें सामानाधिकरण्य म्हणजे सर्व जे जन असा अर्थ असला पाहिजे. ज्या ठिकाणीं सामानाधिकरण्य नसून सर्वांचा जन असा अर्थ असेल तेथें त्या सर्वजनाला हितकारक या अर्थीं छ प्रत्यय होऊन सर्वजनीयः असेंच रूप होतें.

(वा. ६) महाजन शब्दाहून त्याला हितकारक या अर्थीं नित्य ठञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—महाजनाय हितः माहाजनिकः. पण येथें महत् आणि जन या शब्दांचा तत्पुरुष असला पाहिजे. कारण बहुव्रीहि समास केला असेल तर तेथें ठञ् प्रत्यय न झाला पाहिजे. तेव्हां महान् आहे जन ज्याच्या तो महाजन या

---

२—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि रथकार हे पाच जन होत.

महाजनः महाजनाय हितो महाजनीयः ॥

यदि तर्ह्यतिप्रसङ्गाः सन्तीत्युपाधिः क्रियत आद्यन्यासेऽप्युपाधिः कर्तव्यः। आत्मन्विश्वजन समानाधिकरण इति वक्तव्यम्। यो हि विश्वेषां जनाय हितो विश्वजनीयः स भवति। अथ मतमेतदनभिधानादाद्यन्यासे न भविष्यतीतीहापि नार्थ उपाधिग्रहणेन। इहाप्यनभिधानान्न भविष्यति ॥

**सर्वपुरुषाभ्यां णढञौ ॥५।१।१०॥**

**सर्वाण्णस्य वावचनम् ॥ १ ॥**

सर्वाण्णस्य वेति वक्तव्यम्। सार्वः सर्वीयः ॥

**पुरुषाद्वधे ॥ २ ॥**

पुरुषाद्वध इति वक्तव्यम्। पौरुषेयो वधः ॥

अत्यल्पमिदमुच्यते पुरुषाद्वध इति। पुरुषाद्वधविकारसमूहतेनकृतेष्विति वक्तव्यम्। पौरुषेयो वधः। पौरुषेयो विकारः। पौरुषेयः समूहः। तेन कृतं पौरुषेयम् ॥

**[ माणवचरकाभ्यां खञ् ॥५।१।११॥ ]**

**तदर्थं विकृतेः प्रकृतौ ॥५।१।१२॥**

**तदर्थमिति कृतनामभ्यष्ठञ् ॥ १ ॥**

तदर्थमिति कृतनामभ्यष्ठञ्वक्तव्यः। इन्द्रमहार्थमैन्द्रमहिकम् गाङ्गामहिकम्

---

शब्दाहून त्या महाजनाला जो हितकारक त्या अर्थी महाजनीय असेंच रूप होतें.

हें जें येथें वार्तिककारांनीं पञ्चजन वगैरे शब्दांहून ख वगैरे प्रत्ययांचें विधान केलें आहे त्यावर दोष येतो म्हणून येथें सामानाधिकरण्य असलें पाहिजे असें निमित्त धरलें जावें असें असेल तर प्रथमतः सूत्रकारांनीं जो विश्वजन शब्दाहून ख प्रत्यय सांगितला आहे तेथेंही तसें निमित्त धरलें पाहिजे. म्हणजे ' आत्मन्विश्वजन...समानाधिकरणे ' असें म्हटलें पाहिजे. कारण जो विश्वांचा जन त्याला हितकारक या अर्थी ख प्रत्यय न होता विश्वजनीयः असा छ प्रत्ययच झाला पाहिजे. आतां सामानाधिकरण्य नसेल त्या ठिकाणीं विश्वजन शब्दाहून अनभिधानास्तव ख प्रत्यय होत नाहीं असें मत असेल तर वार्तिकामध्येही सामानाधिकरण्य वगैरे निमित्त धरावयास नको. तेथेंही अनभिधानास्तवच ख ठञ् वगैरे प्रत्यय होणार नाहींत.

( सू. १० वा. १ ) येथें सर्व शब्दाहून जो ण प्रत्यय सांगितला आहे तो विकल्पानें होतो असें म्हणावें. उदा०—सार्वः, सर्वीयः.

( वा. २ ) पुरुष शब्दाहून 'त्याचा वध' या अर्थींही ढञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—पुरुषस्य वधः पौरुषेयः.

येथें जें ' पुरुषाद्वधे ', असें वार्तिककारांनीं म्हटलें आहे तें फारच थोडें आहे तर पुरुष शब्दाहून त्याचा वध, विकार, समूह आणि त्यानें केलेलें इतक्या अर्थी ढञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०-' पौरुषेय ' म्हणजे पुरुषांचा वध, पुरुषांचा विकार, पुरुषाचा समुदाय, तसेंच पुरुषानें केलेलें.

( सू. १२ वा. १ ) कृत्यवाचक शब्दाहून ' त्याच्याकरितां जें ' या अर्थी ठञ् प्रत्यय

---

१—( सू. १० ) सर्व आणि पुरुष या शब्दांहून ' त्याला हितकारक ' या अर्थी क्रमानें ण आणि ढञ् हे प्रत्यय होतात. उदा०—सर्वस्मै हितः सार्वः, पुरुषाय हितं पौरुषेयम्.

१—( सू. ११ ) माणव आणि चरक या शब्दाहून त्याला हितकारक ' या अर्थी खञ् प्रत्यय होतो. उदा०—माणवाय हितम् माणवीनम्, चारकीणम्.

१—( सू. १२ ) विकृतिवाचक शब्दाहून त्याच्याकरितां जी त्या विकृतीची मूळ प्रकृति या अर्थी छ वगैरे प्रत्यय होतात उदा०—अङ्गारीयाणि काष्ठानि.

२—अवश्य कर्तव्य जे कर्म, किंवा योग्य कर्तव्य जे कर्म त्याला कृत्य म्हणतात. उदा०—इन्द्रमह म्हणजे इन्द्र देवतेचा उत्साह.

काशेरुयज्ञिकम् ॥

**न वा प्रयोजनेन कृतत्वात् ॥ २ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । प्रयोजनेन कृतत्वात् । यद्धीन्द्रमहार्थमिन्द्रमहस्तस्य प्रयोजनं भवति तत्र प्रयोजनम् [५.१.१०९] इत्येव सिद्धम् ॥

**छदिरुपाधिबलेर्ढञ् ॥ ५ । १ । १३ ॥**

**उपध्यर्थमिति प्रत्ययानुपपत्तिरुपध्यभावात् ॥ १ ॥**

उपध्यर्थमिति प्रत्ययस्येहानुपपत्तिः । किं कारणम् । [१]उपध्यभावात् । विकृतेः प्रकृतावभिधेयायां प्रत्ययेन भवितव्यं न चोपधिसंज्ञिकाया विकृतेः प्रकृतिरस्ति । यद्धि तद्रथाङ्गं तदौपधेयमित्युच्यते ॥

**सिद्धं तु कृदन्तस्य स्वार्थेऽञ्वचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । कृदन्तस्य स्वार्थेऽञ्वक्तव्यः । उपधीयत उपधेयम् उपधेयमेवौपधेयम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमुपध्यर्थमिति प्रत्ययानुपपत्तिरुपध्यभावादिति । नैतदस्ति, अयमुपधिशब्दो ऽस्त्येव कर्मसाधनः ।

होतो असें म्हणावें. उदा०–इन्द्रमहाकरितां जें तें ऐन्द्रमहिक होय. गङ्गामहाकरितां जें तें गाङ्गामहिक होय. कशेरु यज्ञाकरितां जें तें 'काशेरुयज्ञिक' होय.

(वा. २) अथवा कृत्यवाचक शब्दाहून हा ठञ् प्रत्यय सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं प्रयोजनामुळें तें काम भागतें. असें पहा कीं इन्द्रमहाकरितां जें काय असेल त्याचें इन्द्रमह हें प्रयोजन होणारच. तेव्हा तेथें प्रयोजनम् (५।१।१०९) या सूत्रानेंच ठञ् प्रत्यय सिद्ध होतो.

(सू. १३ वा. १) उपधि शब्दाहून 'त्याकरितां जें' या अर्थी प्रत्यय करितां येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं तशी विकृति नाहीं. विकृतिवाचक शब्दाहून 'त्याकरितां जी' ती त्या विकृतीची प्रकृति; व ती वाच्य असतांना येथें उपधि शब्दाहून प्रत्यय करावयाचा आहे. आणि उपधि नांवाच्या विकृतीची तशी प्रकृति औपधेय नांवाची कोणीच नाहीं. उपधि म्हणजे रथाङ्गाला म्हणतात. जें तें रथाङ्ग तेंच औपधेय असें म्हटलें जातें.

(वा. २) हे सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं उपधेय या कृत्-प्रत्ययान्त शब्दाहून स्वार्थी अञ् प्रत्यय सांगावा म्हणजे झालें. उपधीयते तत् उपधेयम् उपधेयम् एव औपधेयम्.

अशा रीतीनें औपधेय शब्द रथाङ्ग या अर्थी सिद्ध होईल. पण सूत्र फिरवावें लागेल.

तर मग मूळचें सूत्र जसें आहे तसेंच तें असूं दे.

पण तसेंच सूत्र ठेवलें तर "उपध्यर्थमिति प्रत्ययानुपपत्तिरुपध्यभावात्" (वा.१) असें आतांच सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. उपधिशब्दाचे दोन अर्थ आहेत. उप उपसर्गपूर्वक धा धातूहून कर्म या अर्थी कि प्रत्यय (३।३।९२) केला असतां उपधीयते इत्युपधिः म्हणजे जें स्थापन

१—(सू. १३) छदिस् आणि बलि या विकृतिवाचक शब्दाहून त्याच्याकरितां जी प्रकृति या अर्थी ढञ् प्रत्यय होतो. आणि उपधि शब्दाहून स्वार्थी ढञ् प्रत्यय होतो. उदा०—छादिषेयानि तृणानि. छदिस् म्हणजे शाकारणी. त्याकरितां जे गवत त्याला छादिषेय म्हणतात. काही घराना गवताचीच शाकारणी केलेली असते. उपधि म्हणजे रथाङ्ग, तेंच औपधेय होय. बलीकरिता जे तण्डुल ते बालेय होत.

२—तेव्हा उपधि म्हणजे स्थापन करणें. त्याकरितां जी वस्तु म्हणजे स्थापन केली जाणारी जी रथाङ्ग वस्तु त्या अर्थी प्रकृत सूत्रानें ढञ् प्रत्यय करून त्या वस्तूला औपधेय असे म्हणतां येईल.

उपधीयत उपधिरिति । अस्ति भावसाधनः । उपधानमुपधिरिति । तयो भावसाधनस्तस्येदं ग्रहणम् ॥ एवमपि न सिध्यति । किं कारणम् । विकृतेः प्रकृताविति वर्तते । प्रकृतिविकृतिग्रहणं निवर्तिष्यते । तच्चावश्यं निवर्त्यमिहार्थमुत्तरार्थं च । इहार्थं तावत् । बालेयास्तण्डुलाः । उत्तरार्थम् । ऋषभोपानहोर्ञ्यः [ ५. १. १४ ] आर्षभ्यो वत्स इति ॥ अथ तदर्थमित्यनुवर्तेत उताहो न । किं चार्थोऽनुवृत्त्या । बाढमर्थस्तदस्य तदस्मिन्स्यादिति [ ५. १. १६ ] तदर्थे यथा स्यादिह मा भूत् प्रासादो देवदत्तस्य स्यादिति प्राकारो नगरस्य स्यादिति । यदि तदर्थमित्यनुवर्तेत ऋषभोपानहोर्ञ्यः ऋषभार्थो घासः उपानदर्थस्तिलकल्क इत्यत्रापि प्राप्नोति ॥ एवं तर्ह्यनुवर्तते

केलें जातें तें रथाङ्ग उपधि होतें. त्याप्रमाणें त्याच धातूहून त्याच सूत्रानें भाव या अर्थी कि प्रत्यय केला असतां उपधानम् उपधिः म्हणजे स्थापन करणें याला उपधि म्हणतां येतें. या दोहोंमध्यें भाव या अर्थी कि प्रत्यय करुन जो उपधि शब्द साधला आहे त्याचें येथें सूत्रामध्यें ग्रहण केलें आहे.

[3] तरी देखील रथाङ्ग या अर्थी औपधेय शब्द सिद्ध होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं पूर्वसूत्रांतून ' विकृतेः प्रकृतौ ' या पदांची येथें अनुवृत्ति बंदच करतां येईल.

आणि ती या सूत्रांतील बलि शब्दाकरितां व उत्तर सूत्रांतील ऋषभ शब्दाकरिता बंद केलीच पाहिजे. त्यांपैकी येथील बलि शब्दाचें उदाहरण बालेयाः तण्डुलाः हें आहे तसेंच आणि 'ऋषभोपानहोर्ञ्यः' या पुढील सूत्रांतील ऋषभ शब्दाचें उदाहरण—आर्षभ्यो वत्सः हें आहे.

आतां पूर्वसूत्रातून तदर्थम् या पदांची अनुवृत्ति येथें येते किंवा नाहीं ?

पण येथें अनुवृत्ति आणण्यांत कांहीं फायदा आहे काय ?

होय. खालीनें फायदा आहे. येथें अनुवृत्ति केली म्हणजेच पुढें 'तदस्य तदस्मिन् स्यादिति' ( ५।१।१६ ) या सूत्रामध्यें अनुवृत्ति करतां येईल. कारण त्यानें सांगितलेला छ प्रत्यय 'तें आहे ज्याचें' आणि 'तें आहे ज्या ठिकाणीं' एवढ्याच नुसत्या अर्थी 'प्रासादो देवदत्तस्य स्यात्, प्राकारो नगरे स्यात्' येथें न झाला पाहिजे. तर प्रकृतीचा जो अर्थ त्याकरितांच तो प्रत्ययार्थ असेल तरच त्यानें छ प्रत्यय झाला पाहिजे.

पण जर तदर्थम् या पदाचीच फक्त अनुवृत्ति चालू राहील तर ऋषभार्थो घासः व उपानदर्थः तिलकल्कः येथेंही 'ऋषभोपानहोर्ञ्यः' या पुढील सूत्रानें ऋषभ व उपानह् या शब्दांहून ञ्य प्रत्यय होऊं लागेल.

तर मग त्याकरितां 'विकृतेः प्रकृतौ' या पदांची अनुवृत्ति करावी म्हणजे दोष येणार नाहीं.

३—स्थापन केली जाणारी वस्तु जरी स्थापन करणें या क्रियेकरिता आहे असे म्हणतां येतें तरी स्थापन करणें ही विकृति, आणि स्थापन केली जाणारी वस्तु ही त्या स्थापन करणें या क्रियेची प्रकृति असा त्या दोघांमध्यें प्रकृतिविकृतिभाव संबंध नाहीं. तेव्हां एकंदरींत प्रकृत सूत्रानें औपधेय शब्द साधणार नाहीं.

४—बलि म्हणजे पूजा. पूजेकरितां जरी तांदूळ आहेत तरी पूजा ही कांहीं तांदुळांची विकृति होत नाही. तसेंच, आर्षभ्यः वत्स. म्हणजे चांगला बैल तयार होण्याकरितां बाळगलेला पाडा. येथें पाडाच पुढें बैल होणार असल्यामुळें बैल हा पाड्याचा विकार होत नाहीं.

५—घास, म्हणजे चारा तो ऋषभाकरितां आहे. तसाच तिळाचा कल्क हा जोड्याकरितां आहे. उपानह् म्हणजे पायांत घालण्याचा जोडा.

६—कारण चारा ही कांहीं बैलाची प्रकृति नव्हे. तसेंच तिळांचा कल्क हा कांहीं जोड्याची प्रकृति नव्हे.

प्रकृतिविकृतिग्रहणम्। ननु चोक्तं बल्यूषभयोर्न सिध्यतीति। कं पुनर्भवान्विकारं मत्वाह बल्यूषभयोर्न सिध्यतीति। यदि तावद्यः प्रकृत्युपमर्देन भवति स विकारो वैभीतको यूपः खादिरं चषालमिति न सिध्यति। अथ मतमेतत्तदेव गुणान्तरयुक्तं विकार इति बल्यृषभयोरपि सिद्धं भवति। गुणान्तरयुक्ता हि तण्डुला बालेया गुणान्तरयुक्तश्च वत्स आर्षभ्यः। औपधेयं तु न सिध्यति। वचनात्स्वार्थिको भविष्यति॥

[ऋषभोपानहोर्ञ्यः ॥५।१।१४॥
चर्मणोऽञ् ॥५।१।१५॥]
तदस्य तदस्मिन्स्यादिति ॥५।१।१६॥

स्याद्ग्रहणं किमर्थम्। इह मा भूत्। प्रासादो देवदत्तस्य प्राकारो नगरस्येति॥ अथ क्रियमाणेऽपि स्याद्ग्रहण इह कस्मान्न भवति। प्रासादो देवदत्तस्य स्यात् प्राकारो

---

पण जर त्या पदाची अनुवृत्ति केली तर बालेयाः तण्डुलाः व आर्षभ्यो वत्सः येथें प्रकृतिविकृतिभाव नसल्यामुळें प्रत्यय होणार नाहीं असें आतांच सांगितलें आहे ना?

सांगितलें आहे खरें; पण बालेयाः तण्डुलाः व आर्षभ्यो वत्सः येथें प्रकृतिविकृतिभाव नाहीं म्हणून प्रत्यय होणार नाहीं असें आपण म्हणतां तेव्हा त्या विकारासंबंधानें आपली समजूत तरी काय आहे तें अगोदर सांगा बरें! जर प्रकृतीचा सर्वथा विनाश होऊन जो पदार्थ बनतो तोच विकार होय अशी समजूत असेल तर वैभीतकः वृक्षः व खादिरं चषालम् येथें तस्य विकारः या अर्थी प्रत्यय (४।३।३५) होणार नाहीं. आतां थोडासा निराळा गुण उत्पन्न झाला कीं त्याला विकार म्हणतां येतें असें मत असेल तर बालेयास्तण्डुलाः व आर्षभ्यो वत्सः येथेंही विकार समजून प्रत्यय होईलच; कारण पूजेकरिता घेतले जाणाऱ्या तंडुलांना काहीं तरी निराळा संस्कार झालेला आहेच; तसेंच आर्षभ्यः वत्सः येथें वत्स मोठा झाल्यानंतर त्याच्यामध्यें काहीं तरी निराळा गुण उत्पन्न झालेला असतोच. कसेंही झालें तरी औपधेयम् हे सिद्ध होत नाहीं.[७]

ज्या अर्थी प्रकृत सूत्रानें उपधि शब्दाहून ढञ् प्रत्यय सांगितलाच आहे त्या अर्थी तेथें स्वार्थी ढञ् प्रत्यय होईल.

(सू. १६) येथें स्यात् असें कशाकरिता म्हटलें आहे?

प्रासादः देवदत्तस्य व प्राकारः नगरस्य येथें प्रासाद व प्राकार या शब्दाहून छ प्रत्यय न झाला पाहिजे.

पण स्यात् असें येथें म्हटलें तरी 'प्रासादो

---

७—कारण, उपधि म्हणजे रथाङ्ग; तेंच औपधेय असल्यामुळें तेथें कोणत्याही दृष्टीनें औपधेयाला उपधीचा विकार असें म्हणतां येत नाहीं.

१—(सू. १४) ऋषभ व उपानह् या विकृतिवाचक शब्दाहून 'त्याची प्रकृति' या अर्थी ञ्य प्रत्यय होतो. उदा०—आर्षभ्यः वत्सः, औपानह्यः मुञ्जः.

१—(सू. १५) चर्माची जी विकृति तद्वाचक शब्दाहून 'त्याची प्रकृति चर्म' या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०—वध्र्याः प्रकृतिः वार्ध्रम् चर्म.

१—(सू. १६) विकृतिवाचक शब्दाहून 'तें ज्याचें होऊं शकेल,' किंवा 'तें ज्या ठिकाणीं होऊं शकेल' अशा अर्थी छ वगैरे प्रत्यय होतात. उदा०—प्रासादीया इष्टका., प्राकारीयो देशः.

२—जसा 'तस्येदम्' (४।३।१२०) यानें 'त्याचें हें' या अर्थी प्रत्यय सांगितला आहे तसा थेट त्याच्या उलट येथें 'इदं तस्य' या अर्थी प्रत्यय सांगितलासें होईल.

नगरस्य स्यादिति । शक्यार्थे लिङिति वक्तव्यम् । नैवं शक्यम् । इदानीमेव ह्युक्तं न ह्युपाधेरुपाधिर्भवति विशेषणस्य वा विशेषणमिति ॥ एवं तर्हीतिकरण: क्रियते । ततश्चेद्विवक्षा भवति । विवक्षा च द्वयी अस्त्येच प्रायोक्त्री विवक्षास्ति लौकिकी । प्रायोक्त्री विवक्षा । प्रयोक्ता हि मृद्व्या स्निग्धया श्लक्ष्णया जिह्वया मृदून्स्निग्धाञ्श्लक्ष्णाञ्शब्दान्प्रयुङ्क्ते । लौकिकी विवक्षा यत्र प्रायस्य संप्रत्ययः । प्राय इति लोको व्यपदिश्यते । न च प्रासादो देवदत्तस्य स्यात् प्राकारो नगरस्य स्यादित्यत्रोत्पद्यमानेन प्रत्ययेन प्रायस्य संप्रत्ययः स्यात् ॥ यद्येवं नार्थः स्याद्ग्रहणेन । न हि प्रासादो देवदत्तस्य प्राकारो नगरस्येत्यत्रोत्पद्यमानेन प्रत्ययेन प्रायस्य संप्रत्ययः स्यात् ॥

**[परिखाया ढञ् ॥ ५ । १ । १७ ॥**

**प्राग्वतेष्ठञ् ॥ ५ । १ । १८ ॥]**

---

देवदत्तस्य स्यात् ’ तसेंच ‘ प्राकारो नगरस्य स्यात् ’ येथें कां बरें छ प्रत्यय होत नाहीं ?

‘ स्यात् ’ येथील लिङ् प्रत्यय शक्य अर्थी ( ३ । ३ । १०२ ) केला आहे असें समजण्याकरिता येथें ‘ स्याच्छक्यार्थे ’ असें म्हणावें.[३]

तसें म्हणूनही भागणार नाहीं. कारण उपाधीला उपाधी होत नाहीं अथवा विशेषणाला विशेषण होत नाहीं असें आतांच सांगितले आहे.[४]

तर मग आतां हा दोष असा घालवावा कीं, येथे इति शब्द घातला आहे त्यावरून विवक्षा असेल तेथेंच हा प्रत्यय होतो असें समजावें. ती विवक्षा येथें लौकिकी समजावी. विवक्षा ही दोन प्रकारची आहे. प्रायोक्त्री आणि लौकिकी. जेव्हां प्रयोग करणारा मनुष्य मृदु, स्निग्ध आणि श्लक्ष्ण अशा वाणीनें सुकुमार प्रेमळ आणि सभ्य अशा शब्दांचा प्रयोग करतो तेव्हा ती प्रायोक्त्री विवक्षा होते; आणि ज्या ठिकाणीं ‘ प्राया ’ ला स्पष्ट अर्थबोध होतो ती लौकिकी विवक्षा होय. लोकाला ‘ प्राय ’ असें म्हणतात. आतां प्रासादो देवदत्तस्य स्यात् तसेंच प्राकारो नगरस्य स्यात् या ठिकाणीं प्रकृत सूत्रानें प्रत्यय केला तर त्या प्रत्ययान्त शब्दापासून लोकाना स्पष्ट अर्थबोध होत नाहीं म्हणून तेथें प्रत्यय होत नाहीं.

जर असा हा दोष इति शब्दामुळें घालविला जाईल तर मग प्रकृत सूत्रामध्यें स्यात् हा शब्द घालावयास नको. कारण प्रासादो देवदत्तस्य तसेंच प्राकारो नगरस्य येथेंही प्रत्यय केला तर त्यापासून लोकांना स्पष्ट अर्थबोध होत नाहींच.

---

३—प्रासादीया: इष्टका: येथ ‘ प्रासाद आहे शक्य ज्या इष्टकाचा ’ असा अर्थ आहे. तेव्हा ते ‘ शक्यार्थे ’ हें प्रकृत्यर्थाला विशेषण दिले पाहिजे. तव्हां ‘ तदस्य शक्यम् ’ आणि ‘ तदस्मिन् शक्यम् ’ या अर्थी प्रत्यय सागितला असे होईल.

४—उपाधि व विशेषण यामध्ये थोडा फरक आहे. शक्य हा लिङ् प्रत्ययाचा अर्थ घेतला तेव्हां त्याला उपाधि म्हटले आहे. आणि त्याच अर्थाचा प्रत्यक्ष उच्चारलेला जो शक्यार्थे हा शब्द त्याला विशेषण म्हटले जातें. इतर ठिकाणी हे दोन्ही शब्द सारख्याच अर्थानें वापरले जातात.

१—( सू. १७ ) परिखा शब्दाहून ‘ ती ज्याची होऊ शकेल ’ किंवा ‘ ती ज्या ठिकाणी होऊ शकेल ’ या अर्थी ढञ् प्रत्यय होतो. उदा०—पारिखेयी भूमिः.

१—( सू. १८ ) हे अधिकारसूत्र आहे. वति प्रत्ययाच्या ( ५।१।११५ ) पूर्वीपर्यंत ठञ् प्रत्ययाचा अधिकार केला जातो. ज्या शब्दाहून काहीं विशेष प्रत्यय सागितला नसेल तेथे चालू असलेल्या अर्थी ठञ् प्रत्यय होतो.

## आर्हादगोपुच्छसंख्यापरिमाणाट्ठञ् ॥ ५ । १ । १९ ॥

किमर्थं संख्यायाः पृथग्ग्रहणं क्रियते न संख्यापि परिमाणमेव तत्र परिमाणपर्युदासेन पर्युदासो भविष्यति । एवं तर्हि सिद्धे सति यत्संख्यायाः पृथग्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्या संख्यान्यत्परिमाणमिति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यो न तद्धितलुकि [ ४. १. २२ ] इति द्वाभ्यां शताभ्यां क्रीता द्विशता त्रिशता परिमाणपर्युदासेन पर्युदासो न भवतीति ॥ यद्येतज्ज्ञाप्यते तदस्य परिमाणं संख्यायाः संज्ञासंघसूत्राध्ययनेषु [ ५ १. ५७–५८ ] इति विशेषणं न प्रकल्पते परिमाण या संख्येति । इह च क्रीतवत्परिमाणात् [ ४. ३. १५६ ] इति संख्याविहितस्य प्रत्ययस्यातिदेशो न प्रकल्पते । शतस्य विकारः शत्यः शतिकः । साहस्र इति ॥

यत्तावदुच्यत एतज्ज्ञापयत्याचार्योऽन्या संख्यान्यत्परिमाणमिति नैतज्ज्ञापकसाध्यमन्या संख्यान्यत्परिमाणमिति । न्यायसिद्ध-

---

( सू. १९ ) येथे परिमाण शब्द उच्चारून त्यापेक्षां निराळा संख्या हा शब्द कां म्हणून उच्चारला आहे ? तो उच्चारूं नये. कारण संख्या देखील एक प्रकारचें परिमाणच आहे. तेव्हा येथें ठक् प्रत्यय सांगतांना ज्या शब्दानें परिमाण वगळलें आहे त्याच शब्दाने संख्याही वगळली जाईलच.

तर मग आता अशा रीतीनें सिद्ध होत असतांनाही जो येथें आचार्यांनीं परिमाण शब्द उच्चारून त्यापेक्षां निराळा संख्या शब्दही उच्चारला आहे त्यावरून त्यांनीं असें सुचविलें आहे कीं संख्या निराळी आणि परिमाण निराळें.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं द्वाभ्यां शताभ्यां क्रीता द्विशता तसेंच त्रिशता येथें ' अपरिमाणबिस्ता० ' ( ४ । १ । २२ ) या सूत्रानें ङीप् प्रत्ययाचा निषेध सिद्ध होतो. शत हें परिमाण समजून तो शब्द त्या निषेधांतून वगळला जाईल तो वगळला जात नाहीं.

पण जर हें ज्ञापक घेतलें तर 'तदस्य परिमाणम्' (५।१।५७) या सूत्रानें 'तें आहे परिमाण ज्याचें' या अर्थी परिमाणवाचक शब्दाहून प्रत्यय लागून पुढे ' संख्यायाः संज्ञासंघसूत्राध्ययनेषु' (५।१।५८) या सूत्रामध्यें ' परिमाणवाचक जो संख्या–शब्द ' असें जें विशेषण दिलें आहे तें जुळणार नाहीं. तसेंच 'क्रीतवत् परिमाणात्' (४।३।१५६) या सूत्रानें जो परिमाण शब्दाहून होणाऱ्या प्रत्ययाचा अतिदेश केला आहे तो संख्या शब्दाहून होणाऱ्या प्रत्ययांचा अतिदेश होणार नाहीं. उदा०—शतस्य विकारः शत्यः[2], शतिकः; साहस्रः.

आता येथें जें म्हटलें आहे कीं आचार्यांनीं जें येथें संख्याग्रहण केलें आहे त्यावरून त्यांनीं संख्या निराळी व परिमाण निराळें असें सुचविलें आहे त्यासंबंधानें इतकेंच सांगावयाचें कीं, संख्या निराळी व परिमाण निराळें या गोष्टीला ज्ञापक नको. कारण ही गोष्ट युक्तीनेंच सिद्ध होत आहे. संख्या ही फक्त भेद

---

१—( सू. १९ ) त्यात 'तदर्हति' (५।१।६३) या अर्थापर्यंत ( त्या अर्थासुद्धा ) जेथें विशेष प्रत्यय सांगितला नसेल तेथें ठक् प्रत्यय होतो, पण त्यात गो, पुच्छ, संख्या, आणि परिमाण हे शब्द वगळावे. त्या शब्दांहून ठञ् प्रत्ययच सामान्यतः होतो असें समजावें.

२—शतेन क्रीत शत्य , शतिक ; येथें 'क्रीत' या अर्थी यत् व ठन् प्रत्यय (५।१।२१) होतात. सहस्र शब्दाहून त्या अर्थी अण् प्रत्यय ( ५।१।२८ ) होतो. हेच प्रत्यय त्या शब्दाहून ' क्रीतवत् परिमाणात् ' या सूत्रानें होतात.

मेवैतत् । भेदमात्रं संख्याह। यच्चेषीकान्तं यच्चापरिमाणं सर्वस्य संख्या भेदमात्रं ब्रवीति । परिमाण तु सर्वतः। सर्वतो मानमिति चातः परिमाणमिति । प्रस्थस्य च समानाकृतेर्न कुतश्चिद्विशेषो गम्यते न चोन्मानतो न परिमाणतो न प्रमाणतः ॥ किं पुनरुन्मानं किं परिमाणं किं प्रमाणम् ।

ऊर्ध्वमानं किलोन्मानम्
ऊर्ध्वं यन्मीयते तदुन्मानम् ॥
परिमाणं तु सर्वतः ।

सर्वतो मानमिति चातः परिमाणम् । कुत एतत् । परिः सर्वतोभावे वर्तते ॥

आयामस्तु प्रमाणं स्यात् ॥

आयामविवक्षायां प्रमाणमित्येतद्भवति॥

संख्या बाह्या तु सर्वतः ॥१॥

आतश्च सर्वतः संख्या बाह्या

भेदमात्रं ब्रवीत्येषा नैषा मानं कुतश्चन ॥

एवं च कृत्वा संख्यायाः पृथग्ग्रहणं क्रियते ॥ यदप्युच्यते तदस्य परिमाणं संख्यायाः संज्ञासंघसूत्राध्ययनेष्विति विशे-

---

दाखविणारी आहे. असें पहा कीं मोठ्या पदार्थांपासून अगदीं लहान काडीपर्यंत जे पदार्थ, तसेंच ज्याला परिमाण लागत नाहीं असे जे अमूर्त पदार्थ त्या सर्वांचाच भेद दाखविणारी संख्या आहे. परिमाण तर 'परिमाणं तु सर्वतः' म्हणजे ते धान्य वगैरेची इयत्ता सर्व बाजूंनीं दाखवितें म्हणूनच त्याला परिमाण नांव पडलें आहे. शिवाय, शेर, अधोली वगैरे मापांनीं जोडलेले जे सारख्या आकाराचे धान्याचे ढीग त्यांमध्यें विशेष दाखविणे झाल्यास तो संख्येनेंच दाखविता येतो, उन्मानानें नाहीं, परिमाणानें नाहीं, प्रमाणानेंही नाहीं; इतर कशानेंही तो दाखवितां येत नाहीं.

पण उन्मान म्हणजे काय? परिमाण म्हणजे काय व प्रमाण म्हणजे तरी काय ?

(श्लो. १) ऊर्ध्व बाजूनें इयत्ता दाखविणारें तें उन्मान होयें[३].

सर्व बाजूनीं इयत्ता दाखविणारें परिमाण होयें[४].

असें कशावरून?

'परि' याचा चोहोंबाजूंनीं असा अर्थ आहे.

पदार्थांचें दैर्घ्य म्हणजे लांबी दाखविणारें प्रमाण होयें[५].

आणि संख्या ही या तिघांपेक्षां बाह्य म्हणजे विजातीय आहे. शिवाय संख्या ही तिघांपेक्षा विजातीय आहे असें म्हणण्याचें कारण हें कीं—

(श्लो. २) संख्या ही फक्त भेद दाखविणारी आहे. हिला कोणत्याही तऱ्हेनें प्रमाण म्हणतां येत नाहीं[६]. हें मनांत धरूनच सूत्रामध्यें परिमाण शब्द घालूनही पुनः निराळा संख्या शब्द घातला आहे.

तसेंच 'तदस्य परिमाणम्' या सूत्राच्या पुढील 'संख्यायाः संज्ञासंघसूत्राध्ययनेषु' या सूत्रामध्यें परिमाणवाचक जो संख्या-शब्द असें जे विशेषण दिलें आहे तें जुळणार नाहीं असें जें म्हटलें आहे त्यासंबंधानें इतकेंच

३—तराजूच्या साधनानें इयत्ता दाखविणारें तोळा, मासा, वगैरे ते उन्मान ( वजन ) होय. पुरुषभर पाणी आहे अशी जी इयत्ता दाखविली जाते तेंही उन्मानच होय.

४—शेर अधोली वगैरे धान्य मोजण्याचें जे माप तें परिमाण होय ते माप बाजूंनीं व उंचीनें असे चोहोंकडून भरलें म्हणजेच धान्याची इयत्ता दाखविली जाते.

५—लांबी, रुंदी मोजण्याचें तसु, वार, मैल, कोस, वगैरे हे प्रमाण होय.

६—चार तोळे, चार पायल्या, चार कोस, येथें नुसता चार हा शब्दच फक्त उच्चारला तर कांहींच इयत्ता कळत नाहीं. तेव्हां तोळे, पायल्या, कोस हेच शब्द इयत्ता दाखवितात. म्हणून त्यानाच मान म्हणतां येतें.

षणं न प्रकल्पत इत्याहार्यं परिमाणं या संख्येति न चास्ति संख्या परिमाणं तत्र वचनादियती विवक्षा भविष्यति ॥ यदप्युच्यते क्रीतवत्परिमाणादिति च संख्याविहितस्य प्रत्ययस्यातिदेशो न प्रकल्पत इति संख्याया इति च तत्र वक्तव्यम् ॥

किं पुनरिमे ठगादयः प्रागर्हाद्भवन्त्याहोस्वित्सहार्हेण । कश्चात्र विशेषः ।

**ठगादयः प्रागर्हाच्चेदर्हे तद्विधिः ॥ १ ॥**

ठगादयः प्रागर्हाच्चेदर्हे तद्विधिः । अर्हे ठगादयो विधेयाः । शतमर्हति शत्यः शतिकः । साहस्र इति ॥ वस्ने वचनात्सिद्धम् । इह यः शतमर्हति शतं तस्य वस्नो भवति तत्र सोऽस्यांशवस्नभृतयः [ ५. १. ५६ ] इत्येव सिद्धम् ॥

**वस्ने वचनात्सिद्धमिति चेन्मांसौदनिकादिष्वप्राप्तिः ॥ २ ॥**

वस्ने वचनात्सिद्धमिति चेन्मांसौदनिकादिष्वप्राप्तिः । मांसौदनिकोऽतिथिः । श्वैतच्छत्त्रिकः कालायसूपिकः ॥ तथा गुणानां परिप्रश्नो भवति । किमयं ब्राह्मणोऽर्हति । शतमर्हति शत्यः शतिकः साहस्रः नैष्किक इति न सिध्यति ॥ सन्तु तर्हि सहार्हेण ॥

---

सांगावयाचें कीं आचार्य तर परिमाणवाचक जो संख्या शब्द असें विशेषण देतात आणि संख्या शब्द तर परिमाण असूं शकत नाहीं. तेव्हा येथें वचनसामर्थ्यास्तव परिमाण हा शब्द अगदीं सामान्य अर्थाचा घेतां येईल[७]

तसेंच संख्या-शब्दाहून होणाऱ्या प्रत्ययांचा 'क्रीतवत्परिमाणात्' यानें विकारार्थीं जो अतिदेश होतो तो होणार नाहीं असें जें म्हटलें आहे तेथें त्याकरितां 'क्रीतवत्परिमाणात्' या सूत्रामध्यें 'संख्यायाः' असा शब्द ज्यास्त घालावा.

आतां येथें या ठक् प्रत्ययाला आरंभ करून 'द्वित्रिपूर्वादण् च' (५।१।३६) ह्या अण् प्रत्ययापर्यंत त्या त्या शब्दाहून सांगितलेले प्रत्यय 'तेन क्रीतम्' (५।१।३७) या सूत्रापासून 'तदर्हति' (५।१।६३) या सूत्रापर्यंत निर्दिष्ट केलेल्या अर्थीं करावयाचे हें खरें; पण ते त्या अर्हति या अर्थाच्या पूर्वीच्या अर्थीं करावयाचे किंवा अर्हति हा अर्थ त्या अर्थामध्यें धरावयाचा ?

ह्या दोहोंमध्यें फरक काय बरें होतो ?

(वा. १) अर्हति या अर्थाच्या पूर्वीच्या अर्थीं हे ठक् वगैरे प्रत्यय होतात असें असेल तर अर्हति या अर्थीं हे ठक् वगैरे प्रत्यय होतात असें सांगितलें पाहिजे उदा०-शतमर्हति शत्यः शतिकः, साहस्रः

'वस्ने वचनात्सिद्धम्' म्हणजे शत्यः येथें शताला जो योग्य होतो त्याची शत हीच वस्न म्हणजे किंमत असते. तेव्हा येथें 'सोऽस्यांशवस्नभृतयः' (५।१।५६) या अर्थानेंच शत्यः वगैरे उदाहरणे साधतील.

(वा. २) किंमत हा अर्थ धरून शत्यः वगैरे उदाहरणें साधलीं तरी मांसौदनमर्हति मांसौदनिकः, श्वेतच्छत्रमर्हति श्वैतच्छत्रिकः, कलायसूपमर्हति कालायसूपिकः येथें जो प्रकृत सूत्रानें ठक् प्रत्यय होतो तो होणार नाहीं. तसेंच 'हा ब्राह्मण कशाला योग्य आहे' अशा त्याच्या गुणासंबंधानें केलेल्या प्रश्नाचें उत्तर देताना शत्यः, शतिकः, साहस्रः, नैष्किकः असें जें म्हटलें जातें तेथें शत, सहस्र किंवा निष्क ही त्या ब्राह्मणाची कांहीं किंमत गृहीत धरता येत नसल्यामुळें 'सोऽस्यांशवस्न', यानें इष्टसिद्धि होत नाहीं.

तर मग 'आर्हात्' या शब्दानें घेतलेल्या अर्थामध्यें 'अर्हति' हा अर्थ धरावा.

---

७—अमुक असा कांहो तरी परिच्छेद ज्याने होतो तो परिमाणवाचक शब्द होय.

८—मांसौदन, श्वेतच्छत्र व कलायसूप हे कांहीं किंमत असे गृहीत धरता येत नाहीत कलाय म्हणजे वाटाणे. वाटाण्याच्या डाळीच्या वरणाला कलायसूप म्हणतात.

आर्हाच्चेद्भोजनादिष्वतिप्रसङ्गः ॥ ३ ॥
आर्हाच्चेद्भोजनादिष्वतिप्रसङ्गो भवीति। भोजनमर्हति पानमर्हतीति ॥ किमुच्यते भोजनादिष्वतिप्रसङ्ग इति यदा छेदादिभ्य इत्युच्यते। अवश्यं मांसौदनिकाद्यर्थं योगविभागः कर्तव्यः। तदर्हति। ततश्छेदादिभ्यो नित्यमिति। तस्मिन्क्रियमाणे भोजनादिष्वतिप्रसङ्गो भवति ॥

उक्तं वा ॥ ४ ॥
किमुक्तम्। अनभिधानादिति। अनभिधानाद्भोजनादिष्वतिप्रसङ्गो न भवति ॥

अथवा योगविभागो न करिष्यते। कथं मांसौदनिकोऽतिथिः श्वैतच्छत्रिकः कालायसूपिकः। अस्मिन्दीयतेऽस्मा इति च एवमेतत्सिद्धम् ॥

अथवा पुनः सन्तु प्रागर्हात्। ननु चोक्तं ठगादयः प्रागर्हाच्चेदर्हे तद्विधिरिति। परिहृतमेतद्वस्ने वचनात्सिद्धमिति। ननु चोक्तं वस्ने वचनात्सिद्धमिति चेन्मांसौदनिकादिष्वप्राप्तिरिति तथा गुणानां परिप्रश्नो भवति किमयं ब्राह्मणोऽर्हति शतमर्हति शत्यः शतिकः साहस्रः नैष्किक इति न सिध्यतीति। नैष दोषः। अस्मिन्दीयतेऽस्मा इति च एवमेतत्सिद्धम् ॥

---

(वा. ३) अर्हति हा अर्थ त्यांत धरला तर भोजन वगैरे शब्दामध्यें दोष येतो. भोजनमर्हति पानमर्हति येथेंही ठक् प्रत्यय होऊं लागेल.

भोजन वगैरे शब्दांमध्यें दोष येतो असें काय म्हणतां? कारण 'तदर्हति', 'छेदादिभ्यो नित्यम्' असा तेथे छेद वगैरे शब्दांहूनच प्रत्यय सांगितला आहे ना?

पण मांसौदनमर्हति मांसौदनिकः इत्यादि उदाहरणें साधण्याकरिता तेथें योगविभाग केलाच पाहिजे. तो असा कीं–'तदर्हति' एवढेंच सूत्र निराळें व त्याच्यापुढें 'छेदादिभ्यो नित्यम्' असें दुसरें सूत्र. आणि असा योगविभाग केला म्हणजे भोजनमर्हति वगैरे उदाहरणांमध्यें तदर्हति या सूत्रानें ठक् प्रत्यय होऊ लागेल असा दोष येणारच.

(वा. ४) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे?

अनभिधानात् (३।२।१ वा. ५) असें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां भोजनमर्हति या अर्थीं भोजन वगैरे शब्दांहून अनभिधानामुळेंच ठक् प्रत्यय होणार नाहीं.

अथवा तदर्हति असा योगविभाग न करावा.

पण तो योगविभाग केला नाहीं तर मांसौदनिकः, श्वैतच्छत्रिकः, कालायसूपिकः हीं उदाहरणें कशीं साधतील?

तदस्मिन् दीयते अस्मै इति च (३।१।४७-वा. १) असें म्हटलें आहे त्यानेंच तीं उदाहरणें सिद्ध होतील.

अथवा 'तेन क्रीतम्' वगैरे अर्थांमध्यें अर्हति हा अर्थ धरूं नये असा पहिलाच पक्ष असूं दे.

पण तसा पक्ष घेतला तर 'ठगादयः प्रागर्हाच्चेदर्हे तद्विधिः' (वा. १) असें म्हटलें आहे ना?

'वस्ने वचनात्सिद्धम्' असा त्याचा परिहारही केला आहे.

पण, त्यानंतरही 'वस्ने वचनात्सिद्धमिति चेन्मांसौदनिकादिष्वप्राप्तिः' (वा. २) असें म्हटलें आहे ना? शिवाय 'हा ब्राह्मण कशाला योग्य आहे' असा त्याच्या गुणासंबधानें जो प्रश्न केला जातो त्याचें उत्तर 'शत्यः, शतिकः, साहस्रः, नैष्किक; असें जें दिलें जातें तीं उदाहरणें साधणार नाहींत' असेंही म्हटलें आहे.

हा दोष येत नाहीं. 'अस्मिन् दीयते अस्मै इति च (५।१।४७ वा. १) यानेंच तीं उदाहरणें सिद्ध होतात.

## असमासे निष्कादिभ्यः ॥ ५ । १ । २० ॥

असमास इति किमर्थम् । परमनिष्केण क्रीतं परमनैष्किकम् । नैदतस्ति । निष्कशब्दात्प्रत्ययो विधीयते तत्र कः प्रसङ्गो यत्परमनिष्कशब्दात्स्यात् । नैव प्राप्नोति नार्थः प्रतिषेधेन । तदन्तविधिना प्राप्नोति । ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिः प्रतिषिध्यते ॥ अत उत्तरं पठति ।

**निष्कादिष्वसमासग्रहणं ज्ञापकं पूर्वत्र तदन्ताप्रतिषेधस्य ॥१॥**

निष्कादिष्वसमासग्रहणं क्रियते ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्यः पूर्वत्र तदन्तविधेः प्रतिषेधो न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । प्राग्वतेष्ठञ् [ ५.१.१८ ] इत्यत्र तदन्तविधिः सिद्धो भवति । नैतदस्ति प्रयोजनम् । ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिः प्रतिषिध्यते न च ठञ्विधौ काचित्प्रकृतिर्गृह्यते ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । आर्हादगोपुच्छसंख्यापरिमाणाट्ठक् [ ५.१.१९ ] परमगोपुच्छेन क्रीतं पारमगोपुच्छिकम् । अत्र तदन्त-

---

( सू. २० ) येथें असमासे असें कशाकरिता म्हटलें आहे.

परमनिष्केण क्रीतम् परमनैष्किकम् येथे ठक् प्रत्यय न होण्याकरितां तसें म्हटलें आहे.

असमासे याचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण ह्या प्रकृत सूत्रानें निष्क शब्दाहून प्रत्यय सांगितला आहे. तेव्हां परमनिष्क शब्दाहून तो होईल कसा? तेव्हा ठक् प्रत्ययाची प्राप्तीच येत नाहीं; तेव्हां त्याचा निषेध करण्यांत कांहीच अर्थ दिसत नाहीं.

पण तदन्तविधि ( १।१।७२ ) केला म्हणजे निष्क शब्दान्ताहून ठक् प्रत्यय प्राप्त होतो ना?

प्रत्ययविधींमध्यें उच्चारलेल्या प्रातिपदिकानें तदन्तविधि होत नाहीं ( १।१।७२ वा. ३ ) असा त्याचा निषेध आहे. हें मनांत आणूनच वार्तिककार म्हणतात—.

( वा. १ ) येथें जें असमासग्रहण केले आहे तें ज्ञापकाकरितां केलें आहे.

ह्या ज्ञापकानें कोणती गोष्ट सिद्ध करावयाची आहे?

येथें आचार्य असें ज्ञापन करतात कीं ह्याच्या पूर्वीच्या सूत्रांमध्यें तदन्तविधीचा निषेध होत नाहीं.

या ज्ञापकाचा उपयोग काय?

प्राग्वतेष्ठञ् ( ५।१।१८ ) या पूर्वीच्या सूत्रामध्यें तदन्तविधि होतो.

या ज्ञापकाचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं.कारण, सूत्रामध्ये प्रातिपदिक हे पद उच्चारलें असेल तरच तेथें तदन्तविधीचा प्रतिषेध सांगितला आहे आणि प्राग्वतेष्ठञ् या ठञ् प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें तर प्रातिपदिक हे पद उच्चारलेंच नाहीं.

तर मग त्या ज्ञापकाचा असा उपयोग समजावा कीं, 'आर्हादगोपुच्छसंख्यापरिमाणाट्ठक्' या पूर्वसूत्रामध्यें 'अगोपुच्छसंख्या०' असा पर्युदास करून गोपुच्छ वगैरे जे शब्द वगळले आहेत तेथें तदन्तविधि होऊन गोपुच्छशब्दान्त असे परमगोपुच्छ. वगैरे शब्दही वगळले जातात. उदा०-परमगोपुच्छेन क्रीतम् पारमगोपुच्छिकम्. येथें ठञ् प्रत्ययच होतो, ठक् होत नाहीं.

---

१—( सू. २० ) निष्क वगैरे शब्दांहून आर्हीय अर्थी ठक् प्रत्यय होतो समास नसताना. उदा०—निष्केण क्रीतम् नैष्किकम्.

२--परमनिष्क हा कर्मधारय समास आहे. येथें ठक् होत नाहीं. तर ठञ्च होतो उत्तरपदाला वृद्धि ( ७।३।१७ ) झाली आहे.

विधिः सिद्धो भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । विधौ प्रतिषेधः प्रतिषेधश्चायम्। एवं तर्हि ज्ञापयत्याचार्य इत उत्तरं तदन्तविधेः प्रतिषेधो न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । पारायणतुरायणचान्द्रायणं वर्तयति [ ५.१ ७२ ] द्वैपारायणिकः त्रैपारायणिकः । अत्र तदन्तविधिः सिद्धो भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । वक्ष्यत्येतत्प्राग्वतेः संख्यापूर्वपदानां तदन्तग्रहणमलुकीति ॥ पूर्वेत्रैव तर्हि प्रयोजनम् । खलयवमाषतिलवृषब्रह्मणश्च [ ५.१.७ ] इति । कृष्णतिलेभ्यो हितः कृष्णातिल्यः । राजमाषेभ्यो हितं राजमाष्यम् ॥

**प्राग्वतेः संख्यापूर्वपदानां तदन्तग्रहणमलुकि ॥ २ ॥**

प्राग्वतेः संख्यापूर्वपदानां तदन्तग्रहणमलुकि कर्तव्यम् । पारायणतुरायणचान्द्रायणं वर्तयति । द्वैपारायणिकः त्रैपारायणिकः । अलुकीति किमर्थम् । द्वाभ्यां शूर्पाभ्यां क्रीतं द्विशूर्पम् त्रिशूर्पम्। द्विशूर्पेण क्रीत द्विशौर्पिकम् त्रिशौर्पिकम् ॥

---

हाही या ज्ञापकाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण प्रत्ययविधीमध्यें तदन्तविधीचा निषेध सांगितला आहे. आणि येथे तर उलट अगोपुच्छ० हा प्रत्ययाचा निषेध आहे. तेव्हा येथें आपोआपच तदन्तविधि होईल.

तर मग आतां येथें आचार्य असमास ग्रहणावरून असें ज्ञापन करतात कीं ह्याच्या पुढील सूत्रामध्यें तदन्तविधि होतो. तेथें तदन्तविधीचा निषेध होत नाहीं.

या ज्ञापकाचा तरी उपयोग काय ?

पारायणतुरायणचान्द्रायणं वर्तयति ( ५।१।७२ ) या प्रत्ययविधीमध्ये पारायण वगैरे शब्द उच्चारले आहेत तेथे तदन्तविधि होतो आणि द्वैपारायणिकः, त्रैपारायणिकः हीं रूपे साधतात.

हाही या ज्ञापकाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, प्राग्वतेः संख्यापूर्वपदाना तदन्तग्रहणमलुकि (वा. २) असें येथें आचार्य वार्तिककार सांगणारच आहेत.

तर मग पूर्वींच्याच सूत्रामध्यें या ज्ञापकाचा उपयोग होत आहे तो असा—

खलयवमाषतिलवृषब्रह्मणश्च ( ५।१।७ ) ह्या सूत्रामध्यें तदन्तविधि झाल्यामुळें राजमाषेभ्यः हितम् राजमाष्यम्, कृष्णतिलेभ्यः हितः कृष्णतिल्यः हीं उदाहरणें सिद्ध होतात.

( वा. २ ) वति प्रत्ययाच्या (५।१।११५) पूर्वीं सूत्रामध्यें उच्चारलेल्या प्रातिपदिकानें तदन्तग्रहण होतें; परंतु तेथे पूर्वपद मात्र संख्या शब्दच असला पाहिजे. शिवाय तेथें तद्धित प्रत्ययाचा लुक् न झाला पाहिजे असें म्हणावे. उदा०—पारायणतुरायणचान्द्रायणं वर्तयति ( ५।१।७२ ) येथें तदन्तविधि होऊन तदन्ताहून ठञ् प्रत्यय होतो. उदा० द्वैपारायणिकः त्रैपारायणिकः.

येथें तद्धित प्रत्ययाचा लुक् न झाला पाहिजे असें कशाकरितां म्हटलें आहे ?

द्वाभ्या शूर्पाभ्या क्रीतम् द्विशूर्पम् द्विशूर्पेण क्रीतम् द्विशौर्पिकम्. त्रिशौर्पिकम्

---

१—द्वि आणि शूर्प या शब्दांचा 'क्रीत' या तद्धितार्थी द्विगु ( २।१।७१ ), त्याच्या पुढे 'शूर्पादञन्यतरस्याम्' ( ५।१।२६ ) येथे तदन्तविधीमुळे अञ् प्रत्यय किंवा एकदां ठञ् प्रत्यय, व त्या दोघांचाही लुक् ( ५।१।२८ ) झाला आहे नतर त्या द्विशूर्प शब्दाहून पुनः 'क्रीत' या अर्थी प्रत्यय करणे झाल्यास सामान्यतः सांगितलेला ठञ् प्रत्ययच होतो. शूर्पादञ्० याची पुनः प्रवृत्ति होत नाहीं. कारण, या ठिकाणी तद्धित प्रत्ययाचा लुक् झाला असल्यामुळे तदन्तविधीचा उपयोग होत नाहीं, तेव्हा द्विशौर्पिकम् असें एकच रूप होतें. येथें उत्तरपदाला वृद्धि (७।३।१६)झाली आहे.

## शताच्च ठन्यतावशते ॥ ५ । १ । २१ ॥

**शतप्रतिषेधे ऽन्यशतत्वे ऽप्रतिषेधः ॥ १ ॥**

शतप्रतिषेधे ऽन्यशतत्वे प्रतिषेधो न भवतीति वक्तव्यम् । इह मा भूत् । शतेन क्रीतं शत्यं शाटकशतमिति ॥ अन्यशतत्व इति किम् । शतकं निदानम् ॥

## संख्याया अतिशदन्तायाः कन् ॥ ५ । १ । २२ ॥

डतेश्चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । कतिभिः क्रीतं कतिकम् । किं पुनः कारणं न सिध्यति । त्यन्ताया नेति प्रतिषेधः प्राप्नोति ।

**तिप्रतिषेधाड्डतिग्रहणमिति चेदर्थवद्ग्रहणात्सिद्धम् ॥ १ ॥**

अर्थवतस्तिशब्दस्य ग्रहणं न च डतेस्तिशब्दोऽर्थवान् ॥ नैषा परिभाषेह शक्या विज्ञातुम् । न हि केवलेन प्रत्ययेनार्थो गम्यते । केन तर्हि । सप्रकृतिकेन । क तर्ह्येषा परिभाषा भवति । यान्येतानि

---

( सू. २१ वा. १ ) प्रत्ययार्थ शत असला तरी तो अर्थ प्रकृत्यर्थ शतापेक्षां जर निराळा असेल तर तेथें अशते हा निषेध प्रवृत्त होत नाहीं असें म्हणावें. कारण शतेन क्रीतं शाटकशतं शत्यम्.

निराळें शतक असें कशाकरितां म्हटलें आहे ?

शतं परिमाणमस्य शतकं निदानम्[3].

( सू. २२ ) डतेश्च म्हणजे डति -प्रत्ययान्ताहून आर्हीय अर्थीं कन् प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण, कतिभिः क्रीतम् कतिकम् येथें कन् प्रत्यय झाला पाहिजे.

पण काय बरें कारण कीं ज्यामुळें येथें प्रकृत सूत्रानेंच कन् प्रत्यय होणार नाहीं ?

ति शब्द शेवटीं असल्यास त्याहून कन् प्रत्ययाचा 'अतिशदन्तायाः' असा सूत्रामध्ये निषेध केला आहे.

( वा. १ ) ति शब्द शेवटीं असल्यास त्याहून कन् प्रत्ययाचा निषेध असल्यामुळें 'डतेश्च' असें म्हणावें लागतें, असें असेल तर त्या निषेधामध्यें अर्थवान् अशाच ति शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळे कतिकम् हें सिद्ध होतें. अर्थवान् ति शब्द असेल तेथेंच तो निषेध[3] होतो. आणि कति शब्दांतील ति शब्दाला तर काहींच अर्थ नाहीं.

पण 'अर्थवानाचें ग्रहण संभवत असतांना तेथें अनर्थकाचें ग्रहण करूं नयें' ही परिभाषा येथें घेणें शक्य नाहीं. कारण केवळ प्रत्ययापासून काहींच अर्थ लोकांच्या मनांत येत नाहीं. तर प्रकृति व प्रत्यय मिळून समुदायापासून अर्थ

---

१—( सू. २१ ) शत शब्दाहून आर्हीय अर्थीं ठन् व यत् प्रत्यय होतात. परंतु त्या प्रत्ययान्तापासून त्याच शत या अर्थाचा बोध न झाला पाहिजे. उदा० शतेन क्रीत· शतिकः शत्यः अश्व·.

२—शंभर रुपयांनीं विकत घेतलेले शंभर शेले असा अर्थ आहे. येथें रुपयांचे शतक हा प्रकृत्यर्थ आणि शाल्यांचें शतक हा प्रत्ययार्थ असल्यामुळे दोन्ही शतकें निरनिराळीं आहेत.

३—येथें प्रत्ययाचा अर्थ सघ म्हणजे शतच होय. आणि तें शत व प्रकृत्यर्थ शत हीं वस्तुत. एकच आहेत.

१—( सू २२ ) ति आणि शत् हे शब्द ज्याच्या शेवटी नाहींत असा जो सख्या-शब्द त्याहून आर्हीय अर्थीं कन् प्रत्यय होतो. उदा०—पञ्चभिः क्रीतः पञ्चकः.

२—किम् शब्दाहून डति प्रत्यय ( ५।२।४१ ) होऊन किम् यातील इम् या टि भागाचा लोप झाला आहे.

३ – सप्तति शब्दामधील ति हा शब्द अर्थवान् (५।१।५९) आहे.

४—तेव्हां सप्तति शब्दामध्येंही 'ति' या नुसत्या प्रत्ययाला लोकामध्यें काहींच अर्थ दिसत नाहीं.

शब्दसंघातग्रहणानि ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम् । अर्थवद्ग्रहणात्सिद्धम् । ननु चोक्तं नैषा परिभाषेह शक्या विज्ञातुं न हि केवलेन प्रत्ययेनार्थो गम्यते केन तर्हि सप्रकृतिकेनेति । केवलेनापि प्रत्ययेनार्थो गम्यते । कथम् । उक्तमन्वयव्यतिरेकाभ्याम् ॥

**वतोरिड्वा** ॥ ५ । १ । २३ ॥

कस्यायमिड्विधीयते । कन इत्याह । तत्कनो ग्रहणं कर्तव्यम् । अक्रियमाणे हि कनो ग्रहणे प्रत्ययाधिकारात्प्रत्ययो ऽय विज्ञायेत । टित्करणसामर्थ्यादादिर्भविष्यति । अस्त्यन्याट्टित्करणे प्रयोजनं टित इतीकारो यथा स्यात् । अकारान्तप्रकरण ईकारो न चैषो ऽकारान्तः । एवमपि कुत एतादृित्करणसामर्थ्यादादिर्भविष्यति न पुनरकारान्तप्रकरणे सत्यनकारान्ताद पीकारः स्यात् । तस्मात्कनो ग्रहणं कर्त

मनांत येतो.

मग ही परिभाषा कोठें बरें घेतां येतें?

ज्या ठिकाणीं पूर्ण शब्दाचें ग्रहण केलें असेल तेथें घेतां येईल?

तर मग डतेश्च असें तेथें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. 'अर्थवानाचें ग्रहण संभवत असतांना तेथें अनर्थकाचें ग्रहण करूं नये' या परिभाषेनेंच सिद्ध होईल.

पण ती परिभाषा येथें घेतां येत नाहीं, कारण. केवळ प्रत्ययापासून कांहींच अर्थ लोकांच्या मनांत येत नाहीं. तर प्रकृति व प्रत्यय मिळून समुदायापासून अर्थ मनांत येतो असें आतांच सागितलें आहे ना?

असा कांहीं नियम नाहीं. केवळ प्रत्ययापासूनही लोकामध्यें अर्थबोध होतो.

तो कसा?

त्या संबधानें सिद्धं त्वन्वयव्यतिरेकाभ्याम् ( १।२।४५ वा. ९, १।३।१ वा ६ ) असें मागें सांगितलेंच आहे.

(सू. २३ ) येथें हा इट् आगम कोणाला बरें सांगितला आहे ?

कन् प्रत्ययाला सांगितला आहे असें म्हणतों.

तर मग ह्या सूत्रामध्यें 'कनः' असें म्हटले पाहिजे. जर तसें म्हटलें नाहीं तर हा इट् आगम न समजतां प्रत्ययच समजला जाईल. कारण प्रत्ययः ( ३। १ । १ ) असा अधिकार चालूच आहे.

पण इट् याला इत्संज्ञक टकार लावला आहे, त्याच्या सामर्थ्यानें इट् हा आद्यावयव होणारा ( १ । १ । ४६ ) आगमच समजला जाईल.

प्रत्यय समजला तरी त्या टकाराचा निराळ्या तऱ्हेनें उपयोग होईलच. इत्संज्ञक टकार असेल तेथें ईकार म्हणजे ङीप् प्रत्यय ( ४ । १ । १५ ) होतो; तो झाला पाहिजे असें म्हणता येईल.

पण तो ईकार अकारान्ताहून सांगितला आहे ना ? आणि इट् प्रत्यय केला तर तो शब्द अकारान्त मुळींच होत नाहीं.

तरी पण त्या 'इत्संज्ञक टकाराच्या जोरावर प्रत्ययाधिकाराला मागें सारून हा आद्यावयव आगम समजावा' किंवा 'अकारान्ताहूनच जरी ईकार प्रत्यय सांगितला आहे तरी तो त्या टकाराच्या जोरावर अकारान्त नसतांनाही होतो असें समजावें' हा संशय उरतोच. एकंदरींत ह्या सूत्रामध्यें हा आद्यावयव होणारा आगम आहे असें समजण्या-

५—संस्करोति येथें सम् याला अर्थ आहे. म्हणन येथें सुट् आगम (६।१।१३७) होतो. पायसं करोति येथें होत नाहीं.

१—( सू. २३ ) वतुप्रत्ययान्ताला संख्या संज्ञा ( १।१।२३ ) आहे. तेव्हां त्याहून पूर्वसूत्रानें केलेला जो कन् प्रत्यय त्याला इट् आगम विकल्पानें होतो. उदा०—तावतिकः, तावत्कः.

व्यम् ॥ न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । संख्याया अतिशदन्तायाः कन् [ ५. १. २२ ] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । वतोरित्येषा पञ्चमी कनिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [ १. १. ६७ ] इति । प्रत्ययविधिरयं न च प्रत्ययविधौ पञ्चम्यः प्रकल्पिका भवन्ति । नायं प्रत्ययविधिः । विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते ॥

## विंशतित्रिंशद्भ्यां ड्वुनसंज्ञायाम्

॥ ५ । १ । २४ ॥

असंज्ञायामिति किमर्थम् । त्रिंशत्कः विंशतिकः । कथं चात्र कन्भवति। संख्यायाः कन्भवतीति । अतिशदन्ताया इति प्रतिषेधः प्राप्नोति । एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवः त्यत्र कनिति यदयं विंशतिकात्खः [ ५. १. ३२ ] इति प्रत्ययान्तनिपातनं करोति । विंशतेरेतज्ज्ञापकं स्यात् । नेत्याह । योगापेक्षं ज्ञापकम् ॥ अथवा योगविभागः करिष्यते । विंशतित्रिंशद्भ्यां कन्भवतीति । ततो ड्वुनसंज्ञायामिति ॥

---

करितां येथें ' कनः ' असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण मागून चालू असलेल्या कन् ग्रहणाची अनुवृत्ति करता येईल.

मागे कोठें बरें कन्-ग्रहण आहे ?

संख्याया अतिशदन्तायाः कन् या मागच्या सूत्रामध्यें आहे ना ?

आहे खरें, पण तेथें तें कन् असें प्रथमान्त आहे. आणि येथें तर कनः असे षष्ठ्यन्त पाहिजे आहे.

येथें कन् असें प्रथमान्त पद अनुवृत्त आलें तरी 'वतोः' ही पञ्चमी तस्मादित्युत्तरस्य ( १ । १ । ६७ ) या परिभाषेच्या साहाय्यानें कन् पदापुढील प्रथमेच्या ऐवजीं षष्ठीची कल्पना करील.

पण हा प्रत्ययविधि आहे ना ? आणि प्रत्ययविधीमध्यें तर पंचमीच्या जोरावर षष्ठीची कल्पना होत नसते.

येथें कन् प्रत्ययाचा विधि नाहीं. तो मागील सूत्रानेंच सांगितला आहे. येथें फक्त त्याची अनुवृत्ति येत आहे.

( सू. २४ वा. १ ) येथें असंज्ञायाम् असें कशाकरितां म्हटलें आहे.

त्रिंशत्कः व विंशतिकः या संज्ञा शब्दामध्यें ड्वुन् प्रत्यय न झाला पाहिजे.

पण येथें त्रिंशत् व विंशति या संख्या शब्दांहून पूर्वसूत्रानें कन् कसा बरें होतो ? कारण तेथें ' अतिशदन्तायाः ' असा निषेध केला आहे ना ? तो निषेध प्राप्त होत आहे.

तर मग आतां ' विंशतिकात्खः ' ( ६।१।३२ ) या सूत्रामध्यें आचार्योंनीं ज्या अर्थीं विंशतिक असा शब्द उच्चारला आहे त्या अर्थीं त्यानीं असें सुचाविलें आहे कीं संज्ञा शब्दामध्यें ' अतिशदन्तायाः ' हा निषेध येत नाहीं; तेथें कन् प्रत्यय होतो.

पण हें ज्ञापक विंशतिक शब्दापुरतेंच होईल ना?

तसें नाहीं. सामान्यतः त्या सूत्रासंबंधानेंच ज्ञापक आहे. म्हणजे त्या सूत्रातील कोणताही निषेध असो तो संज्ञा शब्दामध्यें येत नाहीं. अथवा प्रकृत सूत्रामध्यें योगविभाग करता येईल. तो असा-' विंशतित्रिंशद्भ्याम्' एवढेंच पहिलें सूत्र होईल. विंशति व त्रिंशद् या शब्दाहून आर्हीय अर्थीं कन् प्रत्यय होतो असा त्याचा अर्थ होईल. त्याच्यापुढें ' ड्वुनसंज्ञायाम् ' हें दुसरें सूत्र होईल व त्याचा अर्थ पूर्वीप्रमाणेंच होईल.

---

१—( सू. २४ ) विंशति व त्रिंशत् या शब्दाहून आर्हीय अर्थीं ड्वुन् प्रत्यय होतो, परतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाचीही संज्ञा नसला पाहिजे. उदा०— विंशत्या क्रीतः विंशकः येथें ति शब्दाचा लोप (६।४।१४९) झाला आहे. त्रिंशता क्रीतः येथें टि-लोप (६।४।१४३) झाला आहे.

## कंसाट्टिठन् ॥ ५ । १ । २५

### टिठनर्धाच्च ॥ १ ॥

टिठनर्धाच्चेति वक्तव्यम् । अर्धिकः अर्धिकी ॥

### कार्षापणाद्वा प्रतिश्च ॥ २ ॥

कार्षापणाट्टिठन्वक्तव्यो वा च प्रतिरादेशो वक्तव्यः। कार्षापणिकः कार्षापणिकी। प्रतिकः प्रतिकी ॥

## [शूर्पादञन्यतरस्याम् ॥ ५ । १ । २६ ॥

## शतमानविंशतिकसहस्रवसनादण् ॥ ५ । १ । २७ ॥]

## अध्यर्धपूर्वाद्द्विगोर्लुगसंज्ञायाम् ॥ ५ । १ । २८ ॥

### द्विगोर्लुक्युक्तम् ॥ १ ॥

किमुक्तम् । तत्र तावदुक्तं द्विगोर्लुकि तन्निमित्तग्रहणमर्थविशेषासंप्रत्ययेऽतन्निमित्तादपीति ॥ इहापि द्विगोर्लुकि तन्निमित्तग्रहणं कर्तव्यम्। द्विगोर्निमित्तं यस्तद्धितस्तस्य लुग्भवतीति वक्तव्यम्। इह मा भूत् । द्वाभ्यां शूर्पाभ्यां क्रीतं द्विशूर्पम् द्विशूर्पेण क्रीतं द्विशौर्पिकम् त्रिशौर्पिकम् ॥ अर्थविशेषासंप्रत्ययेऽतन्निमित्तादपि।अर्थविशेषस्यासंप्रत्ययेऽतन्निमित्तादपीति वक्तव्यम्। किं प्रयोजनम् । द्वयोः शूर्पयोः समाहारो द्विशूर्पी द्विशूर्प्या क्रीतमिति विगृह्य द्विशूर्पमित्येव

---

( सू. २५ वा. १ ) हा टिठन् प्रत्यय आर्हीय अर्थी अर्ध शब्दांहूनही होतो असें म्हणावें. उदा० अर्धिकः अर्धिकी.

( वा. २ ) कार्षापण शब्दाहून आर्हीय अर्थी टिठन् प्रत्यय होतो आणि त्याच्या बरोबर कार्षापण शब्दाला विकल्पानें प्रति असा आदेश होतो असें म्हणावें. उदा० कार्षापणिकः, कार्षापणिकी; प्रतिकः प्रतिकी.

( सू. २८ वा. १ ) द्विगूच्या पुढील तद्धित प्रत्ययाच्या लुकासंबंधानें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

"द्विगोर्लुकि तन्निमित्तग्रहणम् । अर्थविशेषासंप्रत्ययेऽतन्निमित्तादपि" (४।३।८८ वा. १.२) असें मागें सांगितलें आहे. येथें देखील' द्विगोर्लुकि तन्निमित्तग्रहणं कर्तव्यम्' म्हणजे 'द्विगूच्या पुढील ज्या तद्धित प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लुक् होणार तो तद्धित प्रत्यय त्या द्विगु समासाला कारणीभूत असला पाहिजे' असें म्हणावें. कारण द्वाभ्या शूर्पाभ्या क्रीतं द्विशूर्पम् द्विशूर्पेण क्रीतं द्विशौर्पिकम्, त्रिशौर्पिकम् येथें दुसऱ्या क्रीत या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् न झाला पाहिजे. 'अर्थविशेषासंप्रत्ययेऽतन्निमित्तादपि' म्हणजे द्विगूला कारणीभूत तद्धित प्रत्यय द्विगूहून केला असता आणि द्विगूला कारणीभूत नसलेला ताद्धित प्रत्यय द्विगूहून केला असतां जर त्या दोहोंच्या अर्थांमध्यें फरक होत नसेल तर द्विगूला कारणीभूत नसलेल्याही ताद्धित प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लुक् होतो असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं द्वयोः शूर्पयोः समाहारः द्विशूर्पी. द्विशूर्प्या क्रीतम् असा विग्रह केला असतां प्रकृत सूत्रानें लुक् होऊन द्विशूर्पम्

---

१—( सू. २५ ) कंस शब्दाहून आर्हीय अर्थी टिठन् प्रत्यय होतो. उदा०-कंसिकः.

१—( सू. २६ ) शूर्प शब्दाहून आर्हीय अर्थी अञ् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०-शूर्पेण क्रीतम् शौर्पम्, शौर्पिकम्

१—( सू. २७ ) शतमान, विंशतिक, सहस्र आणि वसन या शब्दांहून आर्हीय अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—शतमानेन क्रीतम् शातमानम् ; वैंशतिकम् ; साहस्रम्; वासनम्.

१—(सू. २८ ) 'ज्याच्या आरंभीं अध्यर्ध' शब्द आहे असा शब्द आणि द्विगुसंज्ञक शब्द याच्या पुढील आर्हीय अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो परंतु तो शब्द कोणाचीही संज्ञा नसला पाहिजे. उदा०—अध्यर्धकंसम् ; द्विकंसम्.

यथा स्यात् । अथ क्रियमाणेऽपि तन्निमित्तग्रहणे कथमिदं विज्ञायते । तस्य निमित्तं तन्निमित्तम् तन्निमित्तादिति । आहोस्वित्स निमित्तमस्य सोऽयं तन्निमित्तः तन्निमित्तादिति । किं चातः । यदि विज्ञायते तस्य निमित्तं तन्निमित्तम् तन्निमित्तादिति क्रियमाणेऽपि हि तन्निमित्तग्रहणेऽत्र प्राप्नोति द्वाभ्यां शूर्पाभ्यां क्रीतं द्विशूर्पम् द्विशूर्पेण क्रीतं द्विशौर्पिकम् त्रिशौर्पिकम्। अथ विज्ञायते स निमित्तमस्य सोऽयं तन्निमित्तः तन्निमित्तादिति न दोषो भवति । यथा न दोषस्तथा तु । स निमित्तमस्य सोऽयं तन्निमित्तः तन्निमित्तादिति विज्ञायते । कुत एतत् । यदयमाहार्थविशेषासंप्रत्यये ऽतन्निमित्तादपीति ॥

तत्तर्हि तन्निमित्तग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । द्विगोरिति नैषा पञ्चमी । का तर्हि । संबन्धषष्ठी । द्विगोस्तद्धितस्य लुग्भवति । द्विगोर्यस्तद्धितः । किं च द्विगोस्तद्धितः । निमित्तम् । यस्मिन्द्विगुरित्येतद् भवति । कस्मिंश्चैतद्भवति । प्रत्यये॥ इदं तर्हि वक्तव्यमर्थविशेषासंप्रत्यये ऽतन्निमित्तादपीति । एतच्च न वक्तव्यम् । इहास्माभिस्त्रै-

---

असेंच रूप झालें पाहिजे.

पण येथें 'तन्निमित्त–ग्रहण करावें असें जें म्हटलें आहे त्यात तन्निमित्त शब्दाचा अर्थ तरी काय आहे? 'त्या तद्धित प्रत्ययाचा निमित्त जो द्विगु तो तन्निमित्त द्विगु, त्या तन्निमित्त द्विगूहून' असा अर्थ समजावा? किंवा 'तो तद्धित प्रत्यय आहे निमित्त ज्याचा असा जो द्विगु तो तन्निमित्त द्विगु होय, त्या तन्निमित्त द्विगूहून' असा अर्थ समजावा?

या दोन अर्थांमध्यें फरक काय बरें होतो?

फरक असा कीं 'त्या तद्धित प्रत्ययाचा निमित्त जो द्विगु तो तन्निमित्त द्विगु त्याहून' असा अर्थ असेल तर येथें तन्निमित्त–ग्रहण केलें तरी द्वाभ्यां शूर्पाभ्यां क्रीतम् द्विशूर्पम् द्विशूर्पेण क्रीतम् द्विशौर्पिकम् त्रिशौर्पिकम् येथें दुसऱ्या क्रीत या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् प्राप्त होतोच. आतां 'तो तद्धित प्रत्यय आहे निमित्त ज्याचा तो तन्निमित्त द्विगु त्या तन्निमित्त द्विगूहून' असा अर्थ असेल तर मात्र दोष येत नाहीं.

तर मग जो अर्थ घेतला असतां दोष येत नाहीं तोच अर्थ असूं दे म्हणजे तद्धित प्रत्यय आहे निमित्त ज्याचा तो तन्निमित्त द्विगु व त्याच्या पुढील त्या तद्धित प्रत्ययाचा लुक् होतो.

दोष येत नाहीं हें खरें; पण तसाच अर्थ घेण्याला प्रमाण काय?

आचार्य वार्तिककार हे पूर्ववार्तिकानें सिद्धि होत नाहीं म्हणून 'अर्थविशेषासंप्रत्ययेऽतन्निमित्तादपि' असें पुनः दुसरें वार्तिक करतात हेंच प्रमाण.

तर मग आतां एकंदरींत तन्निमित्तग्रहण केलें पाहिजे.

तन्निमित्त-ग्रहण करावयास नको. कारण कीं ह्या सूत्रामध्यें सूत्रकारांनीं द्विगोः ही पञ्चमी घातली आहे असें समजूं नये.

पञ्चमी नाहीं, तर ही विभक्ति कोणती आहे?

सामान्यतः संबंध दाखविणारी षष्ठी आहे. म्हणजे द्विगूचा जो तद्धित त्याचा लुक् होतो असा अर्थ आहे.

द्विगूचा तद्धित म्हणजे कसा?

द्विगूचा जो निमित्त तो द्विगूचा तद्धित होय म्हणजे जो पुढें असतांना द्विगुसंज्ञा होते तो.

कोण पुढें असतांना द्विगु अशी संज्ञा होते?

विशेष प्रकारचा प्रत्यय पुढें असतांना द्विगु-अशी संज्ञा होते.

तर मग आतां तन्निमित्त-ग्रहण केलें नाहीं तरी 'अर्थविशेषासंप्रत्ययेऽतन्निमित्तादपि' हें तर म्हटलेंच पाहिजे ना?

शब्दं साध्यम्। द्वाभ्यां शूर्पाभ्यां क्रीतम्। द्विशूर्प्या क्रीतम्। द्विशूर्पम् त्रिशूर्पमिति। तत्र द्वयोः शब्दयोः समानार्थयोरेकेन विग्रहः करिष्यतेऽपरस्मादुत्पत्तिर्भविष्यत्यविकन्यायेन। तद्यथा। अवेर्मांसमिति विगृह्य अविकशब्दादुत्पत्तिर्भवति आविकमिति। एवमिहापि द्वाभ्यां शूर्पाभ्यां क्रीतमिति विगृह्य द्विशूर्पमिति भविष्यति द्विशूर्प्या क्रीतमिति विगृह्य वाक्यमेव भविष्यति॥

अथासंज्ञायामिति किमर्थम्। पाञ्चलोहितिकम् पाञ्चकलापिकम्।

संज्ञाप्रतिषेधानर्थक्यं च तन्निमित्तत्वाल्लोपस्य॥ २॥

संज्ञाप्रतिषेधश्चानर्थकः। किं कारणम्। तन्निमित्तत्वाल्लोपस्य। नान्तरेण तद्धितं तद्धितस्य च लुकं द्विगुः संज्ञास्ति यस्तस्मादुत्पद्यते नासौ तन्निमित्तं स्यात्। एवं तर्हीदं स्यात् पञ्चानां लोहितानां समाहारः पञ्चलोहिती पञ्चलोहित्या क्रीतमिति। अत्रापि पञ्चलोहितमित्येव भवितव्यम्। कथम्। उक्तं ह्येतदर्थाविशेषासंप्रत्ययेऽतन्नि-

---

तेंही म्हणावयास नको. असें पहा कीं येथें एकंदर तीन तऱ्हेचे प्रयोग साधले पाहिजेत. द्वाभ्या शूर्पाभ्यां क्रीतम् ( १ ) द्विशूर्प्या क्रीतम् ( २ ) अशीं दोन तऱ्हेचीं वाक्यें, आणि द्विशूर्पम् ( ३ ) अशी तद्धित प्रत्यय होऊन झालेली वृत्ति. याप्रमाणेंच त्रिशूर्पम् येथें समजावें. येथें जीं सारख्या अर्थाचीं दोन तऱ्हेचीं वाक्यें त्यांपैकीं द्विशूर्प्या क्रीतम् या एका वाक्यानें फक्त विग्रहच दाखविला जाईल, आणि दुसऱ्या द्वाभ्यां शूर्पाभ्यां क्रीतम् या वाक्यांतील शब्दाहून तद्धित प्रत्यय उत्पन्न होईल ही गोष्ट अविरविकन्यायानें साधते. उदा०—अवेः मासम् असा अविशब्दानें फक्त विग्रह दाखवला जातो व अविक शब्दाहूनच तद्धित प्रत्यय होऊन आविकम् अशी वृत्ति होते. तसेंच येथें द्वाभ्या शूर्पाभ्यां क्रीतम् असा विग्रह करून द्विशूर्पम् अशी वृत्ति होईल आणि द्विशूर्प्या क्रीतम असा विग्रह केला असतां तसें वाक्यच राहील.

आतां या सूत्रामध्यें ' असंज्ञायाम् ' असें कशाकारितां म्हटलें आहे ?

पाञ्चलोहितिकम् पाञ्चकलापिकम् येथें लुक् न झाला पाहिजे म्हणून.

( वा. २ ) येथें असंज्ञायाम् हा संज्ञा-प्रतिषेध व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं लुक् हा त्या संज्ञा—शब्दाचें निमित्तच आहे. तें असें कीं– येथें ताद्धित प्रत्यय आणि त्याचा लुक् झाल्याशिवाय हा द्विगु संज्ञा–शब्दच बनत नाहीं.

आतां त्या संज्ञा-शब्दाहून पुढें तद्धित प्रत्यय केला तर तो तद्धित प्रत्यय द्विगूला निमित्तच असत नाहीं.

तर मग पञ्चानां लोहितानां समाहारः पञ्चलोहिती पञ्चलोहित्या क्रीतम् याकरितां 'असंज्ञायाम्' हें पाहिजे.

असें म्हणतां येत नाहीं. कारण, येथेंही पञ्चलोहितम् असेंच झालें पाहिजे.

तें कसें ?

असें कीं, ' अर्थविशेषासंप्रत्ययेऽतन्निमित्ता-

---

२—पञ्चलोहित व पञ्चकलाप ह्या परिमाण-विशेषाच्या संज्ञा आहेत.

३—तेव्हां लुक् होण्याचे पूर्वी त्याला ' हा संज्ञाशब्द आहे ' असें म्हणतांच येत नाही

४—तेव्हां द्विगूला निमित्त असा तो तद्धित प्रत्यय नसल्यामुळेंच त्याचा लुक् होणार नाहीं. तेव्हां त्याकारितांही येथे असंज्ञायाम् असें म्हणावयास नको.

मित्तादपीति ॥

**उक्तं संख्यात्वे प्रयोजनं तस्मादिहाध्यर्धग्रहणानर्थक्यम् ॥ ३ ॥**

उक्तं संख्यात्वेऽध्यर्धग्रहणस्य प्रयोजनम्। किमुक्तम्। अध्यर्धग्रहणं च समासकन्विध्यर्थं लुकि चाग्रहणमिति। तस्मादिहाध्यर्धग्रहणानर्थक्यम्। तस्मादिहाध्यर्धग्रहणमनर्थकम्। द्विगोरित्येव लुक्सिद्धः॥

## विभाषा कार्षापणसहस्राभ्याम् ॥ ५। १। २९ ॥

**कार्षापणसहस्राभ्यां सुवर्णशतमानयोरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

कार्षापणसहस्राभ्यां सुवर्णशतमानयोरुपसंख्यानं कर्तव्यम्। अध्यर्धसुवर्णम् अध्यर्धसौवर्णिकम्। अध्यर्धशतमानम् अध्यर्धशातमानम्। द्विशतमानम् द्विशातमानम्। ॥

## द्वित्रिपूर्वान्निष्कात् ॥ ५। १। ३० ॥

## बिस्ताच्च ॥ ५। १। ३१ ॥

**द्वित्रिभ्यां द्वैयोग्यम् ॥ १ ॥**

द्वित्रिभ्यामिति यदुच्यते द्वैयोग्यमेतद् द्रष्टव्यम्। किमिदं द्वैयोग्यमिति। द्वयोर्योगयोर्भवं द्वियोगम्। द्वियोगस्य भावो द्वैयोग्यमिति॥ द्वैष्यं विजानीयादविशेषेणेत उत्तरं द्वित्रिभ्यामिति। तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वा-

---

दपि ' इत्यादि मागें सांगितलेच आहे.

( वा. ३ ) अध्यर्ध शब्दाला संख्या संज्ञा सांगून तिचा उपयोगही मागें सांगितलाच आहे ?

तो काय सांगितला आहे ?

अध्यर्धग्रहणं च समासकन्विध्यर्थम्।लुकि चाग्रहणम् ( १।१।२३ वा ५, ६ ) असें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां येथें ' अध्यर्ध '–ग्रहण करावयास नको. फक्त द्विगूहूनच आर्हीय अर्थीं केलेल्या प्रत्ययाचा लुक् सांगावा. त्यानेंच अध्यर्धकंसम् इत्यादि उदाहरणे सिद्ध होतील.

( सू. २९ वा. १ ) ह्या सूत्रामध्यें कार्षापण आणि सहस्र हे दोन शब्द घातले आहेत. तसेंच सुवर्ण आणि शतमान हे दोन शब्दही घालावे. उदा०–अध्यर्धसुवर्णम्, अध्यर्धसौवर्णिकम्; अध्यर्धशतमानम् अध्यर्धशातमानम्; द्विशतमानम् द्विशातमानम्.

( सू. ३१ वा. १ ) ' द्वि व त्रि यांहून ' असें जें येथें म्हटलें आहे तें ' द्वैयोग्य ' समजावें.

द्वैयोग्य म्हणजे काय ?

द्वयोर्योगयोः भवं द्वियोगम्। द्वियोगस्य भावः द्वैयोग्यम् म्हणजे दोन शास्त्रांमध्यें असा त्याचा अर्थ आहे. 'द्वित्रिपूर्वात् या पदाचा संबंध पुढें बऱ्याच सूत्रांमध्यें होतो', असें समजूं नये, तर फक्त ह्या दोन सूत्रांमध्यें होतो असा सूत्रकारांच्या मनांतील अभिप्राय मिळत्वाच्या आहे.

---

५—' अर्थविशेषासप्रत्ययेऽतन्निमित्तादपि ' याचें प्रत्याख्यान करतेवेळीं अविरविकन्याय सांगितला आहे. तेव्हां पञ्चलोहित्या क्रीतम् असा विग्रह केला असता तेथें वृत्ति होतच नाहीं तेव्हां त्याकरितां असंज्ञायाम् हें करावयास नको.

१—( सू. २९ ) कार्षापण किंवा सहस्र हे शब्द द्विगूच्या शेवटीं असतील तर तेथें त्याच्या पुढील आर्हीय अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् विकल्पानें होतो उदा०–अध्यर्धकार्षापणम् अध्यर्धकार्षापणिकम्.

२–येथें उत्तरपदाला वृद्धि ( ७।३।१७ ) झाली

१—( सू. ३० ) द्वि किंवा त्रि हे शब्द ज्याच्या पूर्वी आहेत असा जो निष्क शब्द तो शेवटीं असलेल्या द्विगूच्या पुढील आर्हीय अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् विकल्पानें होतो. उदा०–द्विनिष्कम्, द्विनैष्किकम्; इत्यादि.

१—( सू. ३१ ) द्वि किंवा त्रि हे शब्द ज्याच्या पूर्वी आहेत. असा जो बिस्त शब्द तो शेवटीं असलेल्या द्विगूच्या पुढील आर्हीय अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् विकल्पानें होतो. उदा०–द्विबिस्तम्, द्विबैस्तिकम्,

चष्टे द्वित्रिभ्यां द्वैयोग्यमिति ॥

तत्र च बहुग्रहणम् ॥ २ ॥

तत्र च बहुग्रहणं कर्तव्यम् । बहुनिष्कम् । बहुनैष्किकम् । बहुबिस्तम् बहुबैस्तिकम् ॥

[विंशतिकात्खः ॥ ५ । १ । ३२ ॥]

खार्या ईकन् ॥ ५ । १ । ३३ ॥

खार्या ईकन्केवलायाश्च ॥१॥

खार्या ईकन्केवलायाश्चेति वक्तव्यम् । खारीकम् ॥

काकिण्याश्चोपसंख्यानम् ॥२॥

काकिण्याश्चोपसंख्यानं कर्तव्यम् । अध्यर्धकाकिणीकम् । द्विकाकिणीकम् ॥

केवलायाश्च ॥ ३ ॥

केवलायाश्चेति वक्तव्यम् । काकिणीकम् ॥

[पणपादमाषशताद्यत् ॥ ५ । १ । ३४ ॥]

शाणाद्वा ॥ ५ । १ । ३५ ॥

शतशाणाभ्यां वा ॥ १ ॥

शतशाणाभ्यां वेति वक्तव्यम् । अध्यर्धशतम् । अध्यर्धशत्यम् । पञ्चशतम् पञ्चशत्यम् । अध्यर्धशाणम् अध्यर्धशाण्यम् - पञ्चशाणम् पञ्चशाण्यम् ॥

द्वित्रिपूर्वादण्च ॥ २ ॥

द्वित्रिपूर्वादण्चेति वक्तव्यम् । द्विशाणम् त्रिशाणम् । द्वैशाणम् त्रैशाणम् । द्विशाण्यम् त्रिशाण्यम् ॥

---

नात्यानें येथें वार्तिककारांनीं स्पष्ट केला आहे.

(वा. २) शिवाय, येथें 'द्वित्रि' याप्रमाणें बहुशब्दाचेंही ग्रहण करावें. उदा०—बहुभिः निष्कैः क्रीतं बहुनिष्कम्, बहुनैष्किकम् ; बहुबिस्तम्, बहुबैस्तिकम्.

(सू ३३ वा. १) केवल खारी शब्दाहूनही आर्हीय अर्थीं ईकन् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—खारीकम्.

(वा. २) ह्या सूत्रामध्यें काकिणी शब्दाचें उपसंख्यान करावें उदा०-अध्यर्थकाकिणीकम्, द्विकाकिणीकम्.

(वा. ३) केवल काकिणी शब्दाहूनही आर्हीय अर्थीं ईकन् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—काकिणीकम्.

(सू. ३५ वा. १) ह्या सूत्रामध्यें शतशब्द जास्त घालावा. म्ह. शतशाणाभ्यां वा असें म्हणावें. उदा०—अध्यर्धशतम् अध्यर्धशत्यम्; पञ्चशतम् पञ्चशत्यम्; अध्यर्धशाणम् अध्यर्धशाण्यम्; पञ्चशाणम्, पञ्चशाण्यम्.

(वा. २) द्वि किंवा त्रि या शब्दांच्या पुढील जो शाण शब्द तदन्त द्विगूहून अण् व यत् हे प्रत्यय विकल्पानें होतात असें म्हणावें. उदा०—द्विशाणम् त्रिशाणम् ; द्वैशाणम् त्रैशाणम्, द्विशाण्यम् त्रिशाण्यम्.

---

१—(सू. ३२) अध्यर्ध शब्दाच्या पुढील जो विंशतिक शब्द तदन्त प्रातिपदिकाहून आणि विंशतिक शब्द शेवटीं असलेल्या द्विगूहून आर्हीय अर्थीं ख प्रत्यय होतो. उदा०—अध्यर्धविंशतिकीनम्, द्विविंशतिकीनम्.

१—(सू ३३) अध्यर्ध शब्दाच्या पुढील जो खारी शब्द तदन्त प्रातिपदिकाहून आणि खारी शब्द शेवटीं असलेल्या द्विगूहून ईकन् प्रत्यय होतो. उदा०—अध्यर्धखारीकम्, द्विखारीकम्.

१—(सू. ३४) अध्यर्ध शब्दाच्या पुढील जे पण, पाद, माष आणि शत हे शब्द तदन्त प्रातिपदिकाहून आणि पण वगैरे शब्द शेवटीं असलेल्या द्विगूहून आर्हीय अर्थीं यत् प्रत्यय होतो. उदा०—अध्यर्धपण्यम्, द्विपण्यम्.

१—(सू. ३५) अध्यर्ध शब्दाच्या पुढील जो शाण शब्द तदन्त प्रातिपदिकाहून आणि शाण शब्द शेवटीं असलेल्या द्विगूहून आर्हीय अर्थीं यत् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—अध्यर्धशाण्यम् ; पक्षीं ठञ् प्रत्यय होऊन त्याचा लुक् (५।१।२८) होतो. अध्यर्धशाणम् ; द्विशाण्यम्, द्विशाणम्.

[द्वित्रिपूर्वादण् च ॥ ५।१।३६ ॥]

तेन क्रीतम् ॥ ५ । १ । ३७ ॥

तेन क्रीतमिति करणात् ॥ १ ॥

तेन क्रीतमित्यत्र करणादिति वक्तव्यम्। इह मा भूत्। देवदत्तेन क्रीतम् यज्ञदत्तेन क्रीतमिति ॥

अकर्त्रेकान्तात् ॥ २ ॥

अकर्त्रेकान्तादिति वक्तव्यम्। इह मा भूत। देवदत्तेन पाणिना क्रीतमिति ॥

संख्यैकवचनाद्विगोश्चोपसंख्यानम् ॥ ३॥

संख्याया इति वक्तव्यम्। इहापि यथा स्यात्। पञ्चभिः क्रीतं पञ्चकम्। किं पुनः कारणं न सिध्यति। एकवचनान्तादिति वक्ष्यति तस्यायं पुरस्तादपकर्षः ॥ एकवचनात्। एकवचनान्तादिति वक्तव्यम्। इह मा भूत्। शूर्पाभ्यां क्रीतम् शूर्पैः क्रीतमिति ॥ द्विगोश्च। द्विगोश्चेति वक्तव्यम्। इहापि यथा स्यात्। द्वाभ्यां शूर्पाभ्यां क्रीतं द्विशूर्पम् त्रिशूर्पमिति ॥

यद्येकवचनान्तादित्युच्यते मुद्गैः क्रीतं मौद्गिकम् माषैः क्रीतं माषिकमिति न सिध्यति। परिमाणस्य संख्याया यदेकवचनं तदन्तादिति वक्तव्यम् ॥ तत्तर्ह्येकवचनान्तादिति वक्तव्यम्। तस्मिंश्च क्रिय-

---

(सू. ३७ वा. १) तेन क्रीतम् यानें सांगितलेला प्रत्यय करणवाचक प्रातिपदिकाहून होतो असें म्हणावें. कारण, देवदत्तेन क्रीतम् यज्ञदत्तेन क्रीतम् येथें देवदत्त व यज्ञदत्त या कर्तृवाचक शब्दांहून क्रीत या अर्थी प्रत्यय न झाला पाहिजे.

(वा. २) कर्त्याचा जो अवयव नव्हे अशा करणवाचक शब्दाहून हा प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण, देवदत्तेन पाणिना क्रीतम् येथें पाणि शब्दाहून क्रीत या अर्थी प्रत्यय न झाला पाहिजे.

(वा. ३) संख्यावाचक शब्दाहून 'क्रीत' या अर्थी प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण पञ्चभिः क्रीतम् पञ्चकम् येथें प्रत्यय (५।१।१२२) झाला पाहिजे.

पण काय बरें कारण कीं ज्यामुळें पञ्चकम् येथें प्रत्यय होणार नाहीं ?

एकवचनान्ताहूनच 'क्रीत' या अर्थी प्रत्यय होतो असें सांगावयाचेंच आहे; त्याचा हा अपवाद पूर्वी सांगितला आहे.

एकवचनात् म्हणजे एकवचनान्ताहूनच क्रीत अर्थी प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण, शूर्पाभ्यां क्रीतम् तसेंच शूर्पैः क्रीतम् येथें क्रीत या अर्थी प्रत्यय न झाला पाहिजे.

द्विगोश्च म्हणजे द्विगु समासाहून हा प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण द्वाभ्यां शूर्पाभ्यां क्रीतम् द्विशूर्पम् तसेंच त्रिशूर्पम् येथें प्रत्यय झाला पाहिजे.

पण जर एकवचनान्ताहूनच क्रीत या अर्थी प्रत्यय होतो असें म्हटलें तर मुद्गैः क्रीतम् मौद्गिकम्, तसेंच माषैः क्रीतम् माषिकम् येथें क्रीत या अर्थी ठक् प्रत्यय होत असतो तो होणार नाहीं.

परिमाणाच्या संख्येला दाखविणारें जें एकवचन त्या एकवचनान्ताहून क्रीत या अर्थी प्रत्यय होतो असें म्हणावें.

तर मग एकंदरीत एकवचनान्ताहूनच येथें प्रत्यय होतो असें म्हटलें पाहिजे. आणि तें

---

१—(सू. ३६) मागील सूत्रावरील वार्तिक २ पहा. तें वार्तिकच सूत्रपाठामध्यें येथे वृत्तिकारांनीं घातलें आहे. (तत्त्वबोधिनी).

१—(सू. ३७) प्रातिपदिकाहून 'तेन क्रीतम्' म्हणजे त्या साधनानें विकत घेतलेलें या अर्थी ठक् ठञ् वगैरे पूर्वी (५।१।१८–३६) सांगितलेले प्रत्यय होनात.

२—एकवचनान्ताहूनच क्रीत या अर्थी प्रत्यय होतो हा नियम परिमाणापुरताच आहे असें तात्पर्य.

माणे बहु वक्तव्यं भवति । न वक्तव्यम् । कस्मान्न भवति शूर्पाभ्यां क्रीतम् शूर्पैः क्रीतमिति

उक्तं वा ॥ ४ ॥

किमुक्तम् । अनभिधानादिति ॥ यद्येवं करणादकर्त्रेकान्तादित्यपि न वक्तव्यम् । कर्तुः कर्त्रेकान्ताद्वा कस्मान्न भवति । अनभिधानात् ॥

## तस्य निमित्तं संयोगोत्पातौ ॥ ५ । १ । ३८ ॥

संयोगोत्पातयोः को विशेषः । संयोगो नाम स भवतीदं कृत्वेदमवाप्स्यत इति । उत्पातो नाम स भवति यादृच्छिको भेदो वा छेदो वा पद्मं वा पर्णं वा ॥

तस्यनिमित्तप्रकरणे वातपित्तश्लेष्मभ्यः शमनकोपनयोरुपसंख्यानम् ॥ १ ॥

तस्यनिमित्तप्रकरणे वातपित्तश्लेष्मभ्यः शमनकोपनयोरुपसंख्यानं कर्तव्यम् । वातस्य शमनं कोपनं वा वातिकम् । पैत्तिकम् श्लैष्मिकम् ॥

सांनिपाताच्च ॥ २ ॥

संनिपाताच्चेति वक्तव्यम् । सांनिपातिकम् ॥

## गोद्व्यचोऽसंख्यापरिमाणाश्वादेर्यत् ॥ ५ । १ । ३९ ॥

---

म्हटलें म्हणजे त्यामुळें बरींच वचनें करावीं लागतात.

असें आहे तर 'एकवचनान्तात्' हें म्हणूं नये.

पण तें म्हटलें नाहीं तर शूर्पाभ्यां क्रीतम् तसेंच शूर्पैः क्रीतम् येथें प्रत्यय कां बरें होणार नाहीं ?

( वा. ४ ) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

' अनभिधानात् ' ( ३।२।१ वा. ५ ) असें मागें सांगितलेंच आहे.

असेंच जर असेल तर ' करणात् ' (वा. १) तसेंच ' अकर्त्रेकान्तात् ' (वा. २) हें देखील म्हणावयास नको.

पण तें नाहीं म्हटलें तर देवदत्त वगैरे कर्त्यांहून आणि पाणि वगैरे त्यांच्या अवयवांहून क्रीत या अर्थीं प्रत्यय कां बरें होणार नाहीं ?

अनभिधानामुळें होणार नाहीं.

( सू. ३८ ) संयोग आणि उत्पात यांमध्यें फरक काय ?

अमुक केलें म्हणजें अमुक मिळतें असें जें मिळण्याचें साधन तो संयोग होय; आणि काहीं दृष्ट कारण नसतां एकाएकीं घडून आलेला भेद, छेद, पद्म किंवा पर्ण वगैरे त्याला उत्पात म्हणतात.

( वा. १ ) ह्या प्रकरणामध्यें वात, पित्त, आणि श्लेष्मन् या शब्दांहून त्याचें शमन म्ह. शमविणारें किंवा त्याचें कोपन म्हणजे वाढविणारें या अर्थीं ठक् ठञ् वगैरे प्रत्यय होतात, असें उपसंख्यान करावें. उदा०—वाताचें शमन किंवा कोपन तें वातिक होय; तसेंच पैत्तिक आणि श्लैष्मिक होय.

( वा. २ ) संनिपात शब्दाहूनही त्याचें शमन किंवा कोपन या अर्थीं ठक् प्रत्यय होतो असें म्हणावें उदा०-संनिपातस्य शमनं कोपनं वा सांनिपातिकम् औषधम्.

---

१-(सू. ३८ ) प्रातिपदिकाहून ' त्याचे निमित्त' या अर्थी ठक्, ठञ वगैरे प्रत्यय होतात. पण तें निमित्त मात्र संयोग किंवा उत्पात यापैकीं असलें पाहिजे उदा०—शतस्य निमित्त शत्यः संयोगः, अथवा उत्पातः.

२—एखादी वस्तु अकस्मात् दुभंग होणें किंवा एखाद्या वस्तूचा अकस्मात् तुकडा पडणे हा अशुभसूचक उत्पात होय. एखाद्या ठिकाणी अकस्मात् कमल दृष्टीस पडणें किंवा नागवेलीचा वेल दृष्टीस पडणें हा शुभसूचक उत्पात समजला जातो.

१—( सू. ३९ ) गो शब्द आणि ज्यामध्ये दोन अच् आहेत असे शब्द यांहून ' त्याचे निमित्त संयोग किंवा उत्पात ' या अर्थी यत् प्रत्यय होतो, पण संख्या, परिमाण किंवा अश्वादि गण यांपैकी तो शब्द नसावा. उदा०—गोः निमित्तं संयोग उत्पातो वा गव्यः, स्वर्गस्य निमित्त स्वर्ग्यः.

**यत्प्रकरणे ब्रह्मवर्चसाच्च ॥ १ ॥**

यत्प्रकरणे ब्रह्मवर्चसाच्चोपसंख्यानं कर्तव्यम् । ब्रह्मवर्चसस्य निमित्तं संयोगो ब्रह्मवर्चस्यः । उत्पातो वा ॥

**[ पुत्राच्छ च ॥ ५ । १ । ४० ॥**

**सर्वभूमिपृथिवीभ्यामणञौ ॥ ५ । १ । ४१ ॥**

**तस्येश्वरः ॥ ५ । १ । ४२ ॥**

**तत्र विदित इति च ॥ ५ । १ । ४३ ॥**

**लोकसर्वलोकाट्ठञ् ॥ ५ । १ । ४४ ॥**

**तस्य वापः ॥ ५ । १ । ४५ ॥**

**पात्रात्ष्ठन् ॥ ५ । १ । ४६ ॥ ]**

**तदस्मिन् वृद्ध्यायलाभशुल्कोपदा दीयते ॥ ५ । १ । ४७ ॥**

**तदस्मिन्दीयतेऽस्मा इति च ॥ १ ॥**

तदस्मिन्दीयतेऽस्मा इति चेति वक्तव्यम् । पञ्च वृद्धिर्वायो वा लाभो वा शुल्को वोपदा वा दीयतेऽस्मै पञ्चकः । सप्तकः अष्टकः नवकः दशकः ॥ तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । यद्धि यस्मै दीयते तस्मिन्नपि तद्दीयते तत्र तदस्मिन्दीयत इत्येव सिद्धम् ॥

---

(सू. ३९ वा. १) ह्या यत् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें ब्रह्मवर्चस शब्दाहून 'त्याचे निमित्त' या अर्थीं यत् प्रत्यय होतो असें म्हणावें उदा० ब्रह्मवर्चसस्य निमित्तं ब्रह्मवर्चस्यः संयोगः उत्पातः वा.

( सू. ४७ वा, १ ) ' तें जेथे दिलें जातें ' त्याचप्रमाणें ' तें ज्याला दिलें जातें ' या अर्थींही वर सांगितल्याप्रमाणें प्रत्यय होतात असें म्हणावें. उदा०—वृद्धि, आय, लाभ, शुल्क व उपदा यापैकीं कोणत्याही रूपानें पांच ज्याला दिले जातात तो पञ्चक होय. तसेच सप्तक, अष्टक, नवक, व दशक हे शब्द होत.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण जें ज्याला दिलें जातें ते ' तेथे दिलें जातें ' असें होतेंच. तेव्हा ' तें जेथे दिले जातें ' असे जें सूत्रात म्हटलें आहे त्यानेंच ते सिद्ध होतें.

---

२—ब्रह्मवर्चस म्ह ब्रह्मतेज.

१–( सू. ४० ) पुत्र शब्दाहून ' त्याचें निमित्त संयोग किंवा उत्पात ' या अर्थीं छ आणि यत् हे प्रत्यय होतात. उदा०—पुत्रस्य निमित्त पुत्रीय, पुत्र्यम्

१—(सू. ४१) सर्वभूमि व पृथिवी या शब्दाहून 'त्याचे निमित्त' या अर्थीं अण् आणि अञ् हे प्रत्यय क्रमानें होतात. उदा०—सर्वभूमे निमित्त संयोग उत्पातो वा सार्वभौमः. येथें दोन्ही पदाना वृद्धि ( ७।३।२० ) झाली आहे. पृथिव्याः निमित्त पार्थिवः.

१—(सू.४२)' त्याचा ईश्वर' या अर्थीं क्रमाने अण् आणि अञ् हे प्रत्यय होतात. उदा०—सर्वभूमे ईश्वरः सार्वभौमः. पृथिव्याः ईश्वरः पार्थिवः.

१—( सू. ४३ ) सर्वभूमि आणि पृथिवी या शब्दाहून ' त्या ठिकाणीं प्रख्यात ' या अर्थीं क्रमानं अण आणि अञ् हे प्रत्यय होतात. उदा०—सर्वभूमौ विदितः सार्वभौमः; पृथिव्यां विदितः पार्थिवः.

१—( सू. ४४ ) लोक आणि सर्वलोक या शब्दाहून 'त्या ठिकाणीं प्रख्यात' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—लोके विदितः लौकिकः, सार्वलौकिक.

१–( सू. ४५ ) प्रातिपदिकाहून ' त्याचा वाप ' म्ह. त्याची पेरण्याची जागा या अर्थी ठञ् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—प्रस्थस्य वाप. प्रास्थिक क्षेत्रम्.

१—( सू. ४६ ) पात्र शब्दाहून ' त्याचा वाप ' या अर्थीं ष्ठन् प्रत्यय होतो. उदा०-पात्रस्य वापः पात्रिकं क्षेत्रम्. पात्र म्हणजे एक प्रकारचे परिमाण आहे.

१–( सू. ४७ ) प्रातिपदिकाहून ' ते दिलें जातें ज्याला ' या अर्थी ठञ् वगैरे प्रत्यय होतात. पण दिलें जाणारें द्रव्य वगैरे हे वृद्धि, आय, लाभ, शुल्क व उपदा यापैकीं कोणत्या तरी रूपानं दिलें असलें पाहिजे. व्याज, मालकी, फायदा, कर, व नजराणा असे वृद्धि वगैरे शब्दांचे क्रमानं अर्थ आहेत.

पूरणार्धाट्ठन् ॥ ५ । १ । ४८ ॥

ठन्प्रकरणेऽनन्तादुपसंख्यानम् ॥ १ ॥

ठन्प्रकरणेऽनन्तादुपसंख्यानं कर्तव्यम् । द्वितीयकः तृतीयकः । किं पुनः कारणं न सिध्यति । पूरणादित्युच्यते न चैतत्पूरणान्तम् । अनैतत्पर्यवपन्नम् ॥ पूरणं नामार्थस्तमर्थमाह तीयशब्दः पूरणं सोऽसौ भवति । पूरणान्तात्स्वार्थे भागेऽन्सोऽपि पूरणं भवत्येव ॥

[ भागाद्यच्च ॥ ५ । १ । ४९ ॥

तद्धरति वहत्यावहति भाराद्वंशादिभ्यः ॥ ५ । १ । ५० ॥ ]

वस्नद्रव्याभ्यां ठन्कनौ ॥ ५ । १ । ५१ ॥ ]

संभवत्यवहरति पचति ॥ ५ । १ । ५२ ॥

तत्पचतीति द्रोणादण्च ॥ १ ॥

---

( सू. ४८ वा. १ ) या ठन् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें हा ठन् प्रत्यय अन्-प्रत्ययान्ताहूनही होतो असें म्हणावें उदा०- द्वितीयिकः तृतीयिकः.

पण येथें मूळ सूत्रानें कां बरें ठन् प्रत्यय सिद्ध होत नाहीं ?

तेथें पूरण-प्रत्ययान्ताहून असें म्हटलें आहे. आणि येथें तर त्या पूरण प्रत्ययाच्या पुढें अन् प्रत्यय होऊन शब्द पुरा झाला आहे.

पण पूरण म्हणजे एक प्रकारचा अर्थ आहे. त्याला तीय शब्द बोलतो म्हणून त्याला पूरण म्हणतात. त्या पूरण-प्रत्ययान्ताहून स्वार्थविशेषच अशा भाग या अर्थी अन् प्रत्यय केला आहे म्हणून त्यालाही पूरण प्रत्यय म्हणतां येईल.

---

१—( सू. ४८ ) पूरण-प्रत्ययान्त (५।२।४८) शब्द आणि अर्ध शब्द याहून 'तें दिले जातें जेथे' या अर्थी ठन् प्रत्यय होतो. पण तें दिलें जाणारें द्रव्य वृद्धि वगैरे पाच प्रकारांपैकीं कोणत्या तरी प्रकारानें दिलें असलें पाहिजे. उदा०—द्वितीयो दीयतेऽस्मिन् द्वितीयिकः, अर्धिकः.

२–द्वि शब्दाहून 'पूरण या अर्थी म्हणजे 'दुसरा या अर्थी तीय प्रत्यय ( ५।२।५४ ), पुढे 'तो दुसरा भाग' या अर्थी अन् प्रत्यय, ( ५।३।४८ ) आणि त्याच्या पुढे हा ठन् प्रत्यय झाला आहे. 'तृतीयिकः' येथें त्रि शब्दांतील रेफाला संप्रसारण ( ५।२।५५ ) अधिक झालें आहे

१—( सू. ४९ ) भाग शब्दाहून 'तो वृद्धि वगैरे रूपानें दिला जातो जेथें' या अर्थी यत् व ठन् हे प्रत्यय होतात उदा०-भाग्यम्, भागिकं शतम्. भाग म्ह. अर्धा रुपया.

१–( सू. ५० ) वंशादि शब्दाच्या पुढील जो भार शब्द तदन्ताहून आणि भारभूत जे वंशादिक तद्वाचक शब्दांहून 'तत् हरति', 'तत् वहति' आणि 'तत् आवहति' या अर्थी ठक् ठञ् वगैरे प्रत्यय होतात. उदा०–वंशभारं हरति वांशभारिकः, भारभूतं वंशं हरति वांशिकः. हरति म्हणजे हरण करतो, किंवा वहति म्हणजे उचलून डोक्यावर घेतो. आवहति म्हणजे तयार करतो.

१—( सू. ५१ ) वस्न आणि द्रव्य या शब्दांहून हरति वगैरे अर्थी ठन् आणि कन् हे प्रत्यय क्रमानें होतात उदा० —वस्नं हरति, वहति, आवहति वा वस्निक. वस्न म्ह. किंमत. तसेच द्रव्यक..

१–( सू. ५२ ) प्रातिपदिकाहून 'तितकें सामवून धरतो', किंवा 'शिजवितो' या अर्थी ठञ् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—प्रास्थिकः कटाहः; प्रस्थ म्ह. शेर. ज्यामध्यें शेरभर धान्य मावण्याचा संभव आहे अशी कढई, शेर धान्य देणारा मनुष्य, आणि शेर धान्य ज्यामध्ये शिजेल असें भांडें, असें प्रास्थिक शब्दाचे अर्थ आहेत.

तत्पचतीति द्रोणादण् चेति वक्तव्यम् । द्रोणं पचति द्रौणी द्रौणिकी ॥

[ आढकाचितपात्रात्खोऽन्यतरस्याम् ॥ ५ । १ । ५३ ॥

द्विगोष्ठंश्च ॥ ५ । १ । ५४ ॥ ]

कुलिजाल्लुक्खौ च ॥५ । १ । ५५॥

कुलिजाच्चेति सिद्धे लुक्खग्रहणानर्थक्यं पूर्वस्मिंस्त्रिकभावात् ॥ १ ॥

कुलिजाच्चेत्येव सिद्धं नार्थो लुक्खग्रहणेन । किं कारणम् । पूर्वस्मिंस्त्रिकभावात् । पूर्वस्मिन्योगे सर्व एष त्रिको निर्दिश्यते । द्व्याढकी द्व्याढकिकी द्व्याढकीना ॥

[ सोऽस्यांशवस्नभृतयः ॥ ५ । १ । ५६ ॥ ]

तदस्य परिमाणम् ॥ ५ । १ । ५७ ॥

संख्यायाः संज्ञासंघसूत्राध्ययनेषु ॥ ५ । १ । ५८ ॥

---

( सू. ५२ वा. १ ) द्रोणे[2] शब्दाहून ' तितकें शिजवितो ' या अर्थी अण् व ठञ् हे प्रत्यय होतात. उदा०-द्रोणं पचतीति द्रौणी, द्रौणिकी.

( सू. ५५ वा. १ ) कुलिजाच्च एवढेंच सूत्र केलें तरी तेवढ्यानें इष्ट सिद्ध होतें. लुक् व ख हे शब्द येथें घालावयास नकोत. काय कारण ?

कारण असें कीं—मागील सूत्रामध्यें हे सर्व म्हणजे तिन्ही शब्द आहेतच; तेव्हां त्यांच्या अनुवृत्तीनेंच काम भागेल. द्व्याढकी, द्व्याढकिकी, द्व्याढकीना अशी तीन रूपें तेथें होतात तशीं येथेंही होतील[2].

---

२—द्रोण म्ह. पायली. येथे पायलीभर धान्य असा द्रोण शब्दाचा अर्थ आहे.

१—( सू. ५३ ) आढक, आचित आणि पात्र या शब्दांहून पूर्वीच्या तिन्ही अर्थी ख प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०-आढकीना, आचितीना, पात्रीणा. एकदां ठञ् प्रत्यय होतो. आढकिकी, आचितिकी, पात्रिकी. आढक, आचित, आणि पात्र हीं विशेष परिमाणें आहेत

१—( सू. ५४ ) आढक, आचित आणि पात्र हे शब्द शेवटीं असलेला जो द्विगु त्याहून पूर्वींच्या तिन्ही अर्थी ष्ठन् व ख हे प्रत्यय विकल्पानें होतात. उदा०-द्व्याढकिकी, द्व्याढकीना. एकदां ठञ् होऊन त्याचा लुक् होतो. उदा०—द्व्याढकी.

१—( सू. ५५ ) कुलिज—शब्दान्त द्विगूहून वरच्या तिन्ही अर्थी ठञ् प्रत्ययाचा लुक्, ख आणि ष्ठन् हे विकल्पानें होतात. उदा०—द्विकुलिजी, द्विकुलिजीना, द्विकुलिजिकी. लुक् विकल्पानें होतो म्हणून एकदा ठञ् प्रत्यय राहतो. द्वैकुलिजिकी.

२—ठञ् प्रत्ययाचा लुक् न होतां द्वैकुलिजिकी असें जें चवथें रूप होतें तें वार्तिककारांना इष्ट नाहीं.

१—( सू. ५६ ) अंश म्ह. भाग, वस्न म्ह. मूल्य, आणि भृति म्ह. वेतन, हे अर्थ असलेल्या प्रातिपदिकाहून ' तें आहे ज्याचें ' या अर्थी पूर्वी सांगितलेले प्रत्यय होतात. उदा०—पञ्च अंशाः वस्नम् भृतिर्वा अस्य पञ्चकः.

१—( सू. ५७ ) प्रातिपदिकाहून ' तें आहे परिमाण ज्याचें ' या अर्थी यथाप्राप्त प्रत्यय होतात. उदा०—प्रस्थं परिमाणमस्य प्रास्थिकः धान्यादिराशिः. येथें परिमाण शब्दानें सर्व प्रकारच्या परिच्छेदकाचें ग्रहण होतें.

१—( सू. ५८ ) संख्यावाचक शब्दाहून ' तें आहे परिच्छेदक ज्याचें ' अशा परिच्छेद्य या अर्थी यथाप्राप्त प्रत्यय होतात. परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. किंवा तो परिच्छेद्य पदार्थ संघ, सूत्र किंवा अध्ययन यांपैकीं असला पाहिजे.

संज्ञायां स्वार्थे ॥ १ ॥

संज्ञायां स्वार्थे प्रत्यय उत्पाद्यः । पञ्चैव पञ्चकाः शकुनयः । त्रिकाः शालङ्कायनाः । सप्तका ब्रह्मवृक्षाः ॥

ततः परिमाणिनि ॥ २ ॥

ततः परः प्रत्ययः परिमाणिनीति वक्तव्यम् । पञ्चकः संघः । दशकः संघः ॥

जीवितपरिमाणे चोपसंख्यानम् ॥३॥

जीवितपरिमाणे चोपसंख्यानं कर्तव्यम् । षष्टिर्जीवितपरिमाणमस्य षाष्टिकः साप्ततिकः ॥

जीवितपरिमाणे चेत्यनर्थकं वचनं कालादिति सिद्धत्वात् ॥ ४ ॥

जीवितपरिमाणे चेत्यनर्थकं वचनम् । किं कारणम् । कालादिति सिद्धत्वात् । कालात् [ ५.१.७८ ] इत्येव सिद्धम् । इह यस्य षष्टिर्जीवितपरिमाणं षष्टिमसौ भूतो भवति तत्र तमधीष्टो भृतो भूतो भावी [ ५. १. ८० ] इत्येव सिद्धम् ॥ अवश्यं चैतदेव विज्ञेयम् ।

इह वचने हि लुक्प्रसङ्गः ॥५ ॥

इह हि क्रियमाणे लुक्प्रसज्येत । द्विषाष्टिकः त्रिषाष्टिकः । अनेन सति लुग्भवति । तेन सति कस्मान्न भवति । आर्हादित्युच्यते ॥

न सिध्यति । किं कारणम् । न हीमे

---

( सू. ५८ वा. १ ) संज्ञा-शब्दामध्यें हा प्रत्यय स्वार्थी करावा. उदा० - पञ्चैव पञ्चकाः शकुनयः; षट्काः शालङ्कायनाः; सप्तकाः ब्रह्मवृक्षाः.

( वा. २ ) संघ वगैरे पुढील अर्थ गम्यमान असतांना जो प्रत्यय होतो तो 'परिच्छेद्य' या अर्थी होतो. उदा०—पञ्च परिमाणमस्य पञ्चकः संघः, दशकः संघः.

( वा. ३ ) जीविताचें परिमाण गम्यमान असतांनाही हा प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—षष्टिः जीवितपरिमाणमस्य षाष्टिकः, साप्ततिकः.

( वा. ४ ) जीवितपरिमाणे च ( वा. ३ ) हें वचन करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं 'कालात्' (५।१।७८) यानेंच तेथें सिद्धि होत आहे. असें पहा कीं, ज्याच्या आयुष्याचें परिमाण साठ वर्षांवर आहे तो आपल्या जगण्यानें साठ वर्षांना व्यापतोच. तेव्हां 'तमधीष्टो भृतो भूतो भावी' (५।१।८०) यानेंच तेथें भूत या अर्थी प्रत्यय होईल.

आणि हें असें अवश्य मानलेंच पाहिजे.

( वा. ५ ) येथें जीवितपरिमाणे असें वचन करून परिमाण या अर्थी प्रत्यय केला तर द्विषाष्टिकः, त्रिषाष्टिकः येथें त्या प्रत्ययाचा लुक् (५।१।२८) होऊं लागेल.

पण येथें ह्या वचनानें प्रत्यय केला म्हणजे त्याचा लुक् होतो तर 'तमधीष्टो०' यानें 'भूत' या अर्थी प्रत्यय केला तर त्याचा लुक् का बरें होत नाहीं ?

आर्हात् असें म्हटलें आहे ना ? तेव्हां तदर्हति ( ५।१।६३ ) यापर्यंतच्या आर्हीय अर्थी केलेल्या प्रत्ययाचाच त्यानें लुक् होतो.

तरी पण षाष्टिकः इत्यादि उदाहरणांमध्यें 'तमधीष्टो०' यानें प्रत्यय करतां येणार नाहीं.

काय कारण ?

---

२—साठ वर्षांच्या मनुष्याला षाष्टिक म्हणतात. सत्तर वर्षांच्या मनुष्याला साप्ततिक म्हणतात.

अ. ५ पा. १ आह्निक १ समाप्त.

कालशब्दाः । किं तर्हि । संख्याशब्दा इमे । इमेऽपि कालशब्दाः । कथम् । संख्या संख्येयेवर्तते । यदि तर्हि यो यः काले वर्तते स स कालशब्दो रमणीयादिष्वतिप्रसङ्गो भवति । रमणीयं कालं भूतः । शोभनं कालं भूतः । अथ मतमेतत्काले दृष्टः शब्दः कालशब्दः कालं यो न व्यभिचरतीति न रमणीयादिष्वतिप्रसङ्गो भवति जीवितपरिमाणे तूपसंख्यानं कर्तव्यम् । इह चोपसंख्यानं कर्तव्यम् । वार्षशतिकः वार्षसहस्रिक इति । किं पुनः कारणं न सिध्यति । न हि वर्षशतशब्दः संख्या । किं तर्हि । संख्येये वर्तते वर्षशतशब्दः ॥ एवं तर्हि

**अन्येभ्योऽपि दृश्यते खारशताद्यर्थम्॥६॥**

अन्येभ्योऽपि दृश्यत इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । खारशताद्यर्थम् । खारशतिको राशिः । खारसहस्रिको राशिः ॥

अयं तर्हि दोष इह वचने हि लुक्प्रसङ्ग इति । न ब्रूमो यत्र क्रियमाणे दोषस्तत्र कर्तव्यमिति । किं तर्हि । यत्र क्रियमाणे न दोषस्तत्र कर्तव्यम् । क च क्रियमाणे न

---

कारण असें कीं—षष्टि व सप्तति हे कालवाचक शब्द नव्हेत, तर हे संख्याशब्द आहेत.

हे संख्यावाचक शब्द जरी आहेत तरी ह्यांना येथें कालवाचक म्हणतां येतें.

तें कसें ?

असें कीं—संख्या-शब्द हे 'त्या संख्येनें मोजली जाणारी वस्तु' या अर्थीं असतात, आणि ती वस्तु येथें कालच आहे.

पण कोणत्याही तऱ्हेनें कालाचा निदर्शक जो शब्द तो काल-शब्द असें जर मानलें तर रमणीय शोभन वगैरे शब्द कांहीं ठिकाणीं काल-शब्द होतील. तेव्हां रमणीयं कालं भूतः, व शोभनं कालं भूतः येथेंही रमणीय व शोभन या शब्दांहून 'तमधीष्टो०' यानें ठञ् प्रत्यय होऊं लागेल. आतां असेंच जर मत असेल कीं—जो शब्द नेहमीं 'काल' या अर्थीं दिसतो, कधींही व्यभिचरित होत नाहीं तोच कालशब्द, तर मात्र रमणीय व शोभन या शब्दांहून 'तमधीष्टो०' यानें प्रत्यय होऊं लागेल हा दोष येणार नाहीं. पण येथें 'जीवितपरिमाणे च' असें वचन षाष्टिक वगैरे शब्द साधण्याकरितां करावें लागणार आहे. तसेंच आणखी वार्षशतिकः व वार्षसहस्रिकः हीं उदाहरणें साधण्याकरितांही ठञ् प्रत्ययाचें उपसंख्यान केलें पाहिजे.

पण तेथें "संख्यायाः संज्ञा०' या प्रकृत सूत्रानेंच कां बरें प्रत्यय होणार नाहीं ?

वर्षशत हा शब्द संख्यावाचक नव्हे, तर त्या संख्येनें मोजलेला जो काल या अर्थी तो शब्द आहे.

असें आहे तर मग—

( वा. ६ ) इतर शब्दांहूनही हा ठञ् प्रत्यय दृष्टीस पडतो. तेव्हां 'इतर शब्दांहूनही हा प्रत्यय होतो' असें म्हणावें.

याचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं— खारशत वगैरे शब्दांहून हा प्रत्यय झाला पाहिजे. उदा.—खारशतं परिमाणमस्य खारशतिकः राशिः, खारसहस्रिकः राशिः.

तर मग आतां 'येथें प्रत्यय सांगितला तर त्याचा लुक् होऊं लागेल' हा दोष येतांच ना ?

जेथें हें वचन केलें असतां दोष येईल तेथें हें वचन करा असें आमचें म्हणणें नाहीं, तर जेथें केलें असतां दोष न येईल तेथें 'जीवितपरिमाणे च' हें वचन करावें.

दोषः। परमहोत्॥ तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम्। न कर्तव्यम् । कालादित्येव सिद्धम् । ननु चोक्तं नेमे कालशब्दाः किं तर्हि संख्याशब्दा इति । ननु चोक्तमिमेऽपि कालशब्दाः कथम् संख्या संख्येये वर्तते । ननु चोक्तं यदि तर्हि यो यः शब्दः काले वर्तते स स कालशब्दो रमणीयादिष्वतिप्रसङ्गो भवतीति ।

उक्तं वा ॥ ७ ॥

किमुक्तम् । अनाभिधानादिति । अनभिधानाद्रमणीयादिषूत्पत्तिर्न भविष्यति ॥

स्तोमे डविधिः पञ्चदशाद्यर्थः ॥८॥

स्तोमे डो विधेयः । किं प्रयोजनम् । पञ्चदशाद्यर्थः । पञ्चदशः स्तोमः । सप्तदशः स्तोम इति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये पञ्चमस्याध्यायस्य प्रथमे पादे प्रथममाह्निकम् ॥

---

कोठें केलें असतां दोष येत नाहीं ?

तदर्हति ( ५ । १ । ६३ ) याच्या पुढें केलें असतां दोष येत नाहीं.

तर मग तसें तेथें उपसंख्यान केलें पाहिजे

करावयास नको. कारण षाष्टिकः इत्यादि उदाहरणें कालात् या अधिकारांतील ' तमधीष्टो० ' यानें ठञ् प्रत्यय करून साधतील.

पण षष्टि व सप्तति हे शब्द कालवाचक नव्हेत, तर संख्या शब्द आहेत असें सांगितलें आहे ना ?

पण त्यावर संख्या-शब्द हे संख्येय या अर्थीं असतात आणि येथें संख्येय म्हणजे त्या संख्येनें मोजलेला कालच असल्यामुळें षष्टि व सप्तति या शब्दांना येथें काल-शब्द असें म्हणतां येतें असेंही सागितलेंच आहे.

पण त्यानंतरही 'कसें तरी कालाला लागणारे जे शब्द ते काल–शब्द' असें समजलें तर रमणीय व शोभन या शब्दांहूनही त्या सूत्रानें ठञ् प्रत्यय होऊं लागेल असा दोष दाखविलाच आहे.

(वा. ७) तर मग यासंबंधानें मागें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

अनभिधानात् ( ३ । २ । १ वा. ५ ) असें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां रमणीयं कालं भूतः इत्यादि उदाहरणांमध्यें अनभिधानामुळें ' तमधीष्टो० ' यानें ठञ् होणार नाहीं.

( वा. ८ ) संख्यावाचक शब्दांहून 'तें आहे परिमाण ज्याचें असा मन्त्रसमूह' या अर्थीं ड प्रत्यय होतो असें म्हणावें.

याचा काय बरें उपयोग ?

पञ्चदश मन्त्राः परिमाणमस्य पञ्चदशः स्तोमः तसेंच सप्तदशः स्तोमः हीं उदाहरणें साधणें हा त्याचा उपयोग होय.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पांचव्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

**पङ्क्तिविंशतित्रिंशच्चत्वारिंशत्पञ्चाशत्षष्टिसप्तत्यशीतिनवतिशतम् ॥ ५ । १ । ५९ ॥**

इमे विंशत्यादयः सप्रकृतिकाः सप्रत्ययकाश्च निपात्यन्ते तत्र न ज्ञायते का प्रकृतिः कः प्रत्ययः कः प्रत्ययार्थ इति । तत्र वक्तव्यमियं प्रकृतिरयं प्रत्ययोऽयं प्रत्ययार्थ इति । इमे ब्रूमो द्विशब्दादयं दशदर्थाभिधायिनः स्वार्थे शतिच्प्रत्ययो निपात्यते विन्भावश्च । द्वौ दशतौ विंशतिः ।

**विंशत्यादयो दशदर्थे चेत्समासवचनानुपपत्तिः ॥ १ ॥**

विंशत्यादयो दशदर्थे चेत्समासो नोपपद्यते । विंशतिगवमिति । किं कारणम् । द्रव्यमनभिहितं तस्यानभिहितत्वात्षष्ठी प्राप्नोति षष्ठ्यन्तं च समासे पूर्वं निपतति[1] तत्र गोविंशतिरिति प्राप्नोति । न चैवं भवितव्यम् । भवितव्यं च विंशतिगवं तु न सिध्यति । इह च त्रिंशत्पूली चत्वारिंशत्पूली समानाधिकरणलक्षणः समासो न प्राप्नोति ॥ वचनं च विधेयम् । विंशतिः ।

---

( सू. ५९ ) ह्या सूत्रामध्यें हे विंशति वगैरे शब्द प्रकृतिप्रत्ययांसह सबंध एकदम निपातन केले आहेत. तेव्हां तेथें प्रकृतिभाग केवढा, प्रत्ययभाग केवढा, आणि प्रत्ययाचा अर्थ तरी काय तें कांहींच कळत नाहीं. म्हणून तेथें अमुक प्रकृतिभाग अमुक प्रत्ययभाग आणि अमुक प्रत्ययाचा अर्थ असें सांगितलें पाहिजे.

येथें आम्ही असें सांगतों कीं दहांचा संघ तो दशत् म्हणजे दसकडी. तसले दोन संघ अशाच अर्थाचा द्विदशत् शब्द घेऊन त्या द्विदशत् शब्दाहून स्वार्थीं शतिच् प्रत्यय आणि मागील प्रकृतीला विन् असा आदेश येथें निपातन केला जातो. तेव्हां द्वौ दशतौ इति विंशतिः.

विंशति वगैरे शब्द द्विदशत् या अर्थीं असतील तर समास व वचन हीं दोनही बरोबर होत नाहींत. विंशति त्रिंशत् वगैरे शब्द दोन दसकड्या, तीन दसकड्या इत्यादि अर्थीं साधले तर विंशतिगवम् येथें समास होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ह्या विंशति शब्दानें दोन दसकड्या म्ह. एक विशी हा अर्थ दाखविला जातो; ते जे वीस या संख्येनें युक्त गो वगैरे पदार्थ ते दाखविले जात नाहींत. आणि ते गो वगैरे पदार्थ दाखविले नाहींत म्हणून 'गाईची विशी' या अर्थीं त्या 'गो' पदापुढें षष्ठी प्राप्त होते. आणि षष्ठ्यन्त पद समासामध्यें पूर्वी योजिलें जातें म्हणून गोविंशतिः असें होईल.

मग गोविंशतिः असें रूप न झालें पाहिजे कीं काय ?

तें तर झालें पाहिजे हे खरें; पण विंशतिगवम् असें होणार नाहीं हा दोष येतोच. तसेंच त्रिंशत्पूली, चत्वारिंशत्पूली इत्यादि उदाहरणांमध्यें समानाधिकरण-समास होणार नाहीं.

तसेंच विंशतिः येथें एकवचन होतें असें

---

१—( सू. ५९ ) पङ्क्ति, विंशति, त्रिंशत्, चत्वारिंशत्, पञ्चाशत्, षष्टि, सप्तति, अशीति, नवति आणि शत हे दहा शब्द, क्रमानें दहा, वीस, तीस, चाळीस, पन्नास, साठ, सत्तर, ऐंशी, नव्वद आणि शंभर या दहा अर्थीं निपातन केले आहेत.

२—त्रिंशत् म्ह. तीस ही संख्या; सख्या कांहीं पूल म्हणजे भारे नव्हत; तर त्या संख्येनें युक्त असे पूल आहेत. आणि 'तीस या संख्येनें युक्त' असा अर्थ तर त्रिंशत् शब्दाला येत नाहीं. तेव्हां त्रिंशतां पूलानां समाहारः त्रिंशत्पूली असा समानाधिकरण समास ( २।१।५१ ) होणार नाहीं. पूल म्हणजे कांबीचा भारा.

द्वित्वाद्दशतोर्द्वयोर्द्विवचनमिति द्विवचनं प्राप्नोति ॥ एवं तर्हि परिमाणिनि विंशत्यादयो भविष्यन्ति ।

**परिमाणिनि चेत्पुनः स्वार्थे प्रत्ययविधानम् ॥ २ ॥**

परिमाणिनि चेत्पुनः स्वार्थे प्रत्ययो विधेयः । विंशकः संघः ॥

**षष्ठीवचनविधिश्च ॥ ३ ॥**

षष्ठी च विधेया । गवां विंशतिः । द्रव्यमभिहितं तस्याभिहितत्वात्षष्ठी न प्राप्नोति ॥ एकवचनं च विधेयम् । विंशतिर्गावः । गोभिः सामानाधिकरण्याद् बहुषु बहुवचनम् [ १. ४. २१ ] इति बहुवचनं प्राप्नोति ॥

**अनारम्भो वा प्रातिपदिकविज्ञानाद्यथा सहस्रादिषु ॥ ४ ॥**

अनारम्भो वा पुनर्विंशत्यादीनां न्याय्यः। कथं सिध्यति । प्रातिपदिकविज्ञानात् । कथं प्रातिपदिकाविज्ञानम् । विंशत्यादयो ऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि । यथा सहस्रादिषु । तद्यथा । सहस्रम् अयुतम् अर्बुदमिति न चानुगमः क्रियते भवति चाभिधानम् ॥

यथा सहस्रादिष्वित्युच्यते । अथ सहस्रादिष्वपि कथं भवितव्यम् । सहस्रं गवाम् । सहस्रं गावः । सहस्रगवम् । गोस-

---

मुद्दाम सांगावें लागेल. कारण दोन दसकड्या या अर्थाचा जर विंशतिशब्द आहे तर त्याहून सरळ द्विवचन प्राप्त होत आहे.

तर मग वीस संख्या हें ज्याचें परिमाण अशा 'वीस संख्येनें युक्त' इत्यादि अर्थी विंशति वगैरे शब्द येथें निपातन केले आहेत असें समजतां येईल.

(वा. २) विंशति वगैरे शब्द हे संख्येय या अर्थी असतील तर विंशकः संघः येथें स्वार्थी कन् प्रत्यय होतो असे सांगितलें पाहिजे.

(वा. ३) तसेंच षष्ठी विभक्ति सांगितली पाहिजे आणि एकवचनही सांगितलें पाहिजे. गवां विंशतिः येथें विंशति शब्दाचा 'वीस संख्येने युक्त' इतका अर्थ असल्यामुळें आणि गो (गायी) ह्या त्या संख्येने युक्त अशाच असल्यामुळें गो शब्दाहून षष्ठी होणार नाहीं ती सांगितली पाहिजे. तसेंच विंशतिर्गावः येथें गो याचें विंशति याच्याशीं सामानाधिकरण्य असल्यामुळे बहुषु बहुवचनम् (१।४।२१) यानें विंशति छब्दाहूनही गो शब्दाप्रमाणें बहुवचन प्राप्त होतें.

(वा. ४) अथवा, विंशति वगैरे शब्दांचें निपातन येथें करूं नये हेंच बरें.

पण मग विंशति वगैरे शब्द कसे बरें साधतील ?

प्रातिपदिक-विज्ञानामुळें ते शब्द गृहीत धरतां येतील.

प्रादिपदिक-विज्ञान कसें ?

विंशति वगैरे प्रातिपदिकें हीं अव्युत्पन्न आहेत, म्हणजे त्यांमध्यें अमुक प्रकृति व अमुक प्रत्यय ही कांहीच कल्पना नाहीं; सहस्र वगैरे शब्दांप्रमाणें हें होय. सहस्र अयुत अर्बुद या शब्दांमध्यें अमुक प्रकृति व अमुक प्रत्यय असा कांहींच अनुगम आचार्यांनीं केला नाहीं; तरी देखील त्या शब्दांनीं अर्थाचें प्रतिपादन होतेंच.

ह्या सहस्र वगैरे शब्दांचा दृष्टान्त येथें दिला आहे. पण सहस्रं गवाम्, सहस्रं गावः, सहस्रगवम्, गोसहस्रम् यांपैकी कसा प्रयोग

---

३—विंशति शब्दाहून 'वीस ही संख्या आहे परिमाण ज्याचें असा संघ' या अर्थी पूर्व-सूत्राने कन् प्रत्यय होत असतो. विंशति शब्दाचाच अर्थ जर संख्येय म्हणजे वीस या संख्येनें युक्त असा असेल तर तो कन् प्रत्यय स्वार्थींच करावा लागणार आहे.

४—सहस्र म्ह. हजार, अयुत म्ह. दहा हजार अर्बुद म्ह. दहा-कोटी.

हस्रमिति। यावतात्रापि संदेहो नासूया कर्तव्या यत्रानुगमः क्रियते ॥

ननु चोक्तं विंशत्यादयो दशदर्थे चेत्समासवचनानुपपत्तिः परिमाणिनि चेत्पुनः स्वार्थे प्रत्ययविधानं षष्ठीवचनविधिश्चेति। नैष दोषः। समुदाये विंशत्यादयो भविष्यन्ति। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। संघ इति वर्तते संघः समूहः समुदाय इत्यनर्थान्तरम्। त एते विंशत्यादयः समुदाये सन्तो भाववचना भवन्ति भाववचनाः सन्तो गुणवचना भवन्ति गुणवचनाः सन्तोऽविशिष्टा भवन्त्यन्यैर्गुणवचनैः। अन्येषु च गुणवचनेषु कदाचिद् गुणो गुणिविशेषको भवति। तद्यथा। शुक्लः पट इति। कदाचिद् गुणिना गुणो व्यपदिश्यते। पटस्य शुक्ल इति।

---

करावा असा संशय सहस्र वगैरे शब्दांविषयीं येतोच.

परंतु जरी येथें संशय आला तरी जेथें अनुगम केला आहे तेथें अशी असूया करूं नये.[६]

ते खरें, पण 'विंशत्यादयो दशदर्थे चेत्समासवचनानुपपत्तिः। परिमाणिनि चेत्पुनः स्वार्थे प्रत्ययविधानम्। षष्ठीवचनविधिश्च' (वा. १–३) असा जो दोष दिसतो त्याची वाट काय?

हा दोष येत नाहीं. विंशति वगैरे शब्द येथें समुदाय या अर्थी निपातन केले आहेत असें समजावें.

मग काय, तसें सांगितलें पाहिजे काय?

तसें सांगावयास नको.

पण तसें सांगितलेच नाहीं तर तसें कसें समजावें?

कां बरें? मागून संघ शब्दाची येथें अनुवृत्ति येत आहे. आणि संघ, समूह व समुदाय हे एकच होत; त्यात काहीं निराळा अर्थ होत नाहीं. अशा रीतीनें विंशति वगैरे शब्दांचा समुदाय हा अर्थ सिद्ध झाला म्हणजे ते शब्द एक प्रकारच्या धर्मांचे बोधक आहेत असें अर्थातच निष्पन्न होतें. आणि धर्मवाचक जे शब्द ते गुणवाचक आहेतच. आणि गुणवाचक जर हे शब्द आहेत तर इतर गुणवाचक शब्दांप्रमाणें त्या विंशति वगैरे गुणवाचक शब्दांचे प्रयोग करण्यास कांहींच हरकत नाहीं. इतर गुणवाचक शब्दासंबंधानें पाहिलें तर शुक्ल हा गुण कदाचित् गुणि-द्रव्याचा इतर द्रव्यांपेक्षा विशेष दाखविणारा असा होतो. उदा०—शुक्लः पटः. कदाचित् याच्या उलट त्या गुणाचा इतर गुणांपेक्षा विशेषही गुणि-द्रव्याकडून दाखविला जातो. उदा०—पटस्य शुक्लः. तेव्हां 'विंशति वगैरे शब्द दोन दसकड्या इत्यादि

---

५—तेव्हां जसा प्रयोग पाहून तेथें निर्णय केला जातो तसा येथें विंशति वगैरे शब्दाविषयींही होईल. तेव्हा येथे त्या शब्दांचें निपातन करावयास नको असा अभिप्राय आहे.

६–सहस्र वगैरे शब्दांचा अनुगम केला नाहीं. ही उणीव दाखवून विंशति वगैरे शब्दाचा तरी सूत्रकारांनीं अनुगम का केला असा सूत्रकाराना दोष देणें ही निव्वळ असूया होय, ती योग्य नाहीं कारण शब्द अनन्त असल्यामुळे कांहीं शब्द राहिले असतील. तथापि सूत्रकाराची बहुधा शब्द साधण्याकडेच प्रवृत्ति आहे, व तिकडे नजर देऊन सूत्रकाराची प्रशंसाच केली पाहिजे.

७—मनुष्याचा समुदाय म्हणजे अनेक मनुष्येच होत. तरी पण 'मनुष्याचा' ही षष्ठी जुळण्याकरितां कांहीं तरी भेदाची कल्पना केलीच पाहिजे. म्हणून समुदाय हा एक प्रकारचा धर्मच होतो.

८–गुण व गुणी यामध्यें अभेद विवक्षा केली असता शुक्लः पटः याप्रमाणे विंशतिर्गावः असा प्रयोग होईल आणि त्यामध्ये भेद-विवक्षा केली असतां पटस्य शुक्लः याप्रमाणें गवां विंशतिः असाही प्रयोग होईल.

तद्यदा तावदुच्यते विंशत्यादयो दशदर्थे चेत्समासवचनानुपपत्तिरिति सामानाधिकरण्यं तदा गुणगुणिनोः । वचनपरिहारस्तिष्ठतु तावत् । परिमाणिनि चेत्पुनः स्वार्थे प्रत्ययाविधानमिति संहनने वृत्तः संहनने वर्तिष्यते संख्यासंहनने वृत्तो द्रव्यसंहनने वर्तिष्यते । अथ षष्ठी तदा गुणिना गुणो विशेष्यते ॥

वचनपरिहार उभयोरेव । यदि तर्हीमे विंशत्यादयो गुणवचनाः स्युः सधर्मभिरन्यैर्गुणवचनैर्भवितव्यम्। अन्ये च गुणवचना द्रव्यस्य लिङ्गसंख्ये अनुवर्तन्ते । तद्यथा । शुक्लं वस्त्रम् शुक्ला शाटी शुक्लः कम्बलः शुक्लौ कम्बलौ शुक्लाः कम्बला इति । यदसौ द्रव्यं श्रितो गुणस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तद् गुणस्यापि भवति । विंशत्यादयः पुनर्नानुवर्तन्ते ॥ अन्येऽपि वै गुणवचना नावश्यं द्रव्यस्य लिङ्गसंख्ये अनुवर्तन्ते । तद्यथा । गावो धनम् । पुत्रा अपत्यम् । इन्द्राग्नी देवता । विश्वेदेवा देवता । यावन्तस्ते तां वाशितामनुयन्ति सर्वे ते दक्षिणा समृद्धया इति । अथात्राननुवृत्तौ हेतुः

---

अर्थी आहेत असें समजलें असतां विंशतिगवम् हा समास होणार नाहीं आणि विंशति हें एकवचन होणार नाहीं ' असें म्हटलें आहे (वा.१) खरें; पण त्या वेळीं शुक्लः पटः याप्रमाणें गो आणि त्यांचा समुदाय यांचें सामानाधिकरण्य घ्यावें म्हणजे विंशतिगवम् असा समास होईल. एकवचनासंबंधानें म्हणाल तर तूर्त ती गोष्ट बाजूला राहूं द्या, त्या गोष्टीचा विचार पुढें करतां येईल. आता विंशति वगैरे शब्द हे परिमाणी म्ह. संख्येय या अर्थी असतील तर विंशकः येथें कन् प्रत्यय स्वार्थी सांगावा लागेल, असें जें म्हटलें आहे ( वा. २ ) त्यासंबधानें इतकेंच सांगावयाचें कीं, दसकड्या हें जें संख्येय त्या अर्थी प्रकृत सूत्रावरून तयार झालेला जो विंशति हा शब्द त्याहून 'तितके संख्येय पदार्थ' या अर्थी कन् प्रत्यय करून पुढील तद्धित-वृत्ति करता येईल. आतां षष्ठीसंबंधानें म्हणाल(वा.३)तर जसा पटस्य शुक्लः येथें शुक्ल या गुणाचा इतर गुणांपेक्षां विशेष गुणीकडून दाखविला जातो त्याप्रमाणेंच येथेंही समजलें असतां गवां विंशतिः येथें षष्ठी होईल. आतां समुदाय अर्थ असेल तर दसकड्या दोन असल्यामुळें विंशति शब्दाहून द्विवचन होईल, आणि संख्येय अर्थ असेल तर बहुवचन होईल. तेव्हां या दोन्ही पक्षीं एकवचन कसें ? याचा परिहार असा—जर हे विंशति वगैरे शब्द वर सांगितल्याप्रमाणें गुणवाचक धरले तर इतर गुणवाचक शब्दांसारखीच यांचीही स्थिति असली पाहिजे. आणि शुक्ल वगैरे इतर गुणवाचक शब्द तर द्रव्याच्या लिंगसंख्येलाच अनुसरतात. उदा० शुक्लं वस्त्रम्, शुक्ला शाटी शुक्लः कम्बलः, शुक्लौ कम्बलौ, शुक्लाः कम्बलाः. तेव्हां गुणाचा स्वभाव असा कीं—तो ज्या द्रव्याचा आश्रय करील त्या द्रव्याचें जें लिंग आणि जें वचन तेंच त्या गुणवाचक शब्दाला लागू होतें; आणि विंशति वगैरे शब्द तर आश्रयाच्या लिंग व संख्या यांना अनुसरत नाहींत.[१]

हे सर्व खरें, पण गुणवाचक असे इतर देखील कांही शब्द असे आहेत कीं, जे शब्द द्रव्याच्या लिंगाला व संख्येला अनुसरतात असा नियम नाहीं. उदा० गावः धनम्; पुत्राः अपत्यम्; इन्द्राग्नी देवता; विश्वेदेवाः देवता; यावन्तस्ते तां वाशितामनुयन्ति सर्वे ते दक्षिणा समृद्धयै.

पण आतां असें विचारतों कीं येथें धन

---

१—तेव्हां विंशति हा गुणवाचक शब्दही धन वगैरे शब्दाप्रमाणें आश्रयाच्या लिंगाला व वचनाला अनुसरणार नाहीं. तेव्हा विंशतिः येथें जें एकवचन केलें आहे ते बरोबरच आहे.

शक्यो वक्तुम्। बाढं शक्यो वक्तुम्। कामं तदुच्यताम्। इह कदाचिद् गुणः प्राधान्येन विवक्षितो भवति। तद्यथा। पञ्चोडुपशतानि तीर्णानि। पञ्च फलकशतानि तीर्णानि। अश्वैर्युद्धम्। असिभिर्युद्धमिति। न चासयो युध्यन्ते ऽसिगुणाः पुरुषा युध्यन्ते गुणस्तु खलु प्राधान्येन विवक्षितो भवति। इह तावद् गावो धनमिति धिनोतेर्धनम् एको गुणः स च प्राधान्येन विवक्षितः। पुत्रा अपत्यमित्यपतनादपत्यम् एको गुणः स प्राधान्येन विवक्षितः। इन्द्राग्नी देवता विश्वेदेवा देवतेति दिवेरैश्वर्यकर्मणो देवस्तस्मात्स्वार्थे तल् एको गुणः स प्राधान्येन विवक्षितः। यावन्तस्ते तां वाशितामनुयन्ति सर्वे ते दक्षिणा समृद्धया इति दक्षेर्वृद्धिकर्मणो दक्षिणा एको गुणः स प्राधान्येन विवक्षितस्तस्यैकत्वादेकवचनं भविष्यति। विंशत्यादिषु चाप्येको गुणः स प्राधान्येन विवक्षितस्तस्यैकत्वादेकवचनं भविष्यति॥

---

अपत्य वगैरे शब्द हे गो पुत्र वगैरेंच्या लिंगवचनांना अनुसरले नाहींत याचा कांहीं हेतु सांगतां येईल काय?

होय, खात्रीनें सांगता येईल.

तर मग सांगाच पाहू?

असें पहा कीं, गुण असूनही तो मुख्यत्वानें दाखवावा अशी एखादे वेळीं वक्त्याला विवक्षा असते. उदा० होडग्याची पाच शतें पलीकडे तरून गेलीं, फलकांची पांच शतें पलीकडे तरून गेलीं. अश्वांनीं युद्ध केलें. [11] तलवारींनीं युद्ध केलें. वस्तुतः पाहिलें तर तलवारी कांहीं युद्ध करीत नाहींत; तर तलवारी हातांत घेऊन पुरुष युद्ध करतात. तेव्हा तलवार हें जरी एक प्रकारचें साधन आहे तरी त्यालाच वक्त्यानें मुख्यत्व येथें दिलें आहे. तसेंच गावः धनम् येथें समजावें: 'प्रीति उत्पन्न करणें' या अर्थाच्या धिन्व् धातूपासून धन हा शब्द साधला आहे. प्रीति उत्पन्न करणें हा एक विशेष प्रकारचा गुण आहे; तोच येथें वक्त्याला मुख्यत्वानें दाखवावयाचा आहे. तसेंच पुत्राः अपत्यम् येथें पूर्वजांचें पतन होत नाहीं या गुणानेंच पुत्रांना अपत्य असें ह्मणतात. त्याच एका गुणाची मुख्यत्वानें वक्त्याला तेथें विवक्षा आहे. इन्द्राग्नी देवता, विश्वेदेवाः देवता येथेही तसेंच आहे: ऐश्वर्य या अर्थाच्या दिव् धातूपासून देव शब्द साधला आहे. त्याच्या पुढें स्वार्थी तल् प्रत्यय (५।४।२७) झाला आहे. देव एव देवता. तेव्हां ऐश्वर्यांत असणें हा एक गुण तेथें मुख्यत्वानें दाखवावयाचा आहे. यावन्तस्ते तां वाशितामनुयन्ति सर्वे ते दक्षिणा समृद्ध्यै येथेंही तसेंच समजावें. उत्तरोत्तर वृद्धिंगत होणें या अर्थाच्या दक्ष् धातूपासून दक्षिणा शब्द साधला आहे. तेव्हा तो जो दक्षिणा शब्दानें दाखविलेला एक प्रकारचा गुण [12] तोच तेथें मुख्यत्वानें विवक्षित आहे. तसेंच विंशतिर्गावः इत्यादि ठिकाणींही वीस संख्या हा जो एक गुण तो मुख्यत्वानें विवक्षित आहे. तेव्हा तो गुण एक असल्यामुळें एकवचन होईल.

---

१०—होडग्यांतून लोक पलीकडे गेले हे श्रोत्याला माहीत आहेच. तेथें ती होडगीं पाच दहा नव्हेत तर पांचशें आहेत अशी त्या होडग्याची संख्याच तेथें मुख्यत्वानें दाखवावयाची आहे. फलकांचीं पाच शतें येथेंही तसेंच समजावें. थोडें पाणी असेल तर तेथें विशेष आकाराच्या फळीच्या साधनानें लोक पलीकडे जातात.

११—वस्तुतः मनुष्यांनीच युद्ध केलें. तरी पण ते घोड्यांच्या जिवावर केलें म्हणून येथें घोड्यांना मुख्यत्व समजावें. या कारणानेंच येथें अश्व व असि यांना कर्तृत्व दिलें आहे.

१२—कर्मांच्या फलाची समृद्धि करणें हा गुण दक्षिणा शब्दानें दाखविला आहे.

अयं तर्हि विंशत्यादिषु भाववचनेषु दोषः । गोविंशतिरानीयतामिति भावानयने चोदिते द्रव्यानयनं न प्राप्नोति । नैष दोषः । इदं तावदयं प्रष्टव्यः । अथेह गौरनूबन्ध्योऽजोऽग्नीषोमीय इति कथमाकृतौ चोदितायां द्रव्य आरम्भणालम्भनप्रोक्षणविशसनादीनि क्रियन्त इति । असंभवात् । आकृतावारम्भणादीनां संभवो नास्तीति कृत्वाकृतिसहचरिते द्रव्य आरम्भणादीनि क्रियन्ते । इदमप्येवंजातीयकमेव । असंभवाद् भावानयनस्य द्रव्यानयनं भविष्यति । अथवाव्यतिरेकात् ॥

**[ पञ्चद्दशतौ वर्गे वा ॥ ५ । १ । ६० ॥**

**सप्तनोञ् छन्दसि ॥ ५ । १ । ६१**

**त्रिंशच्चत्वारिंशतोर्ब्राह्मणे संज्ञायां डण् ॥ ५ । १ । ६२ ॥**

**तदर्हति ॥ ५ । १ । ६३ ॥ ]**

---

तर मग आतां गोविंशतिः आनीयताम् इत्यादि वाक्यांमध्यें एकवचनाची उपपत्ति झाली; परंतु तेथें गुणवाचक जे विंशति वगैरे शब्द त्यांमध्यें गुणाला मुख्यत्व विवक्षित असल्यामुळें 'वीस संख्या हा जो गाईंचा गुण तो आणा' असा अर्थ होईल. तेव्हां तेथें गाईचें आनयन प्राप्त होणार नाहीं. हा दोष येत नाहीं. ह्या दोष देणाऱ्याला अगोदर असें विचारावें कीं—गौरनूबन्ध्यः म्हणजे गोपशूचें अनुबंधन करावें, अजोऽग्नीषोमीयः म्हणजे अग्नि व सोम ह्या देवतांना उद्देशून अज पशू द्यावा, येथें गोत्व व अजत्व या जातीसंबंधानें[१] विधि केला असतां तेथें समन्त्रक स्पर्श करणें, बंधन करणें, प्रोक्षण करणे, छेद करणे वगैरे क्रिया त्या आणलेल्या व्यक्तीला कां केल्या जातात ?

असंभवात् म्हणजे त्या स्पर्श करणें वगैरे क्रिया जातीचे ठिकाणीं संभवत नाहींत म्हणून त्या जातीबरोबर नेहमीं तिला आश्रय असलेली जी व्यक्ति तिच्या ठिकाणीं त्या केल्या जातात.

असेंच जर असेल तर मग येथेंही 'वीस संख्या' या गुणाचें आनयन संभवत नसल्यामुळें त्या संख्येचा आश्रय अशा गाई आणल्या जातात. अथवा, जाति व व्यक्ति, गुण व गुणी यामध्ये भेद दिसत नाहीं म्हणजे त्यांतील एकाला सोडून दुसरी वस्तु निराळी दिसत नाहीं. त्यामुळें स्पर्श करणें, आणणें वगैरे क्रिया जाति व गुण यांना सांगितल्या असें जरी आरभीं भासले तरी त्या क्रिया व्यक्ति व गुणी यांसंबंधानेच सांगितल्या आहेत असें समजावें.

---

१३—'गौरनूबन्ध्यः' हा विधि केला आहे. तेथें कोणतीही गो व्यक्ति चालते म्हणून तो विधि सामान्यतः गो या जातीसंबधाने केला आहे असे म्हटले आहे.

१—( सू. ६० ) पञ्चत् आणि दशत् हे दोन शब्द वर्ग या अर्थी विकल्पानें निपातन केले आहेत. उदा०—पञ्च परिमाणमस्य पञ्चत् वर्गः, दशत् वर्गः. एकदां पञ्चकः तसेंच दशक . वर्ग म्हणजे समच होय.

१—( सू. ६१ ) सप्तन् शब्दाहून 'ते आहे परिमाण ज्याचे असा वर्ग' या अर्थी वेदामध्ये अञ् प्रत्यय होतो उदा०—सप्त साप्तानि असृजत्.

१—( सू. ६२ ) त्रिंशत् आणि चत्वारिंशत् या शब्दाहून 'ते आहे परिमाण ज्याचें असा ब्राह्मणभाग' या अर्थी डण् प्रत्यय होतो. पण त्या ब्राह्मणभागाची ती संज्ञा असली पाहिजे. उदा०—त्रिंशदध्यायाः परिमाणमेषां ब्राह्मणानां त्रैंशानि ब्राह्मणानि, चात्वारिंशानि ब्राह्मणानि.

१—( सू. ६३ ) प्रातिपदिकाहून त्याला अर्हति म्हणजे योग्य होतो या अर्थी ठक् ठञ् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—श्वेतच्छत्रमर्हति श्वैतच्छत्रिकः, शतमर्हति शत्यः.

## छेदादिभ्यो नित्यम्
## ॥ ५ । १ । ६४ ॥
## पन्थो ण नित्यम् ॥ ५ । १ । ७६ ॥

**छेदादिपथिभ्यो विग्रहदर्शनान्नित्यग्रहणानर्थक्यम् ॥ १ ॥**

छेदादिपथिभ्यो नित्यग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । विग्रहदर्शनात् । विग्रहो दृश्यते । छेदमर्हति । पन्थानं गच्छतीति॥ विकारार्थं तर्हीदं नित्यग्रहणं क्रियते विकारेण विग्रहो मा भूदिति । विराग विरङ्गं च । पन्थो ण नित्यमिति ।

**विकारार्थमिति चेदकङादिभिस्तुल्यम् ॥ २ ॥**

विकारार्थमिति चेदकङादिभिस्तुल्यमेतत् । यथाकङादिभिर्विकारैर्विग्रहो न भवत्येवमाभ्यामपि न भविष्यति ॥ किं पुनरिहाकर्तव्यं नित्यग्रहणं क्रियत आहोस्विदन्यत्र कर्तव्यं न क्रियते । इहाकर्तव्यं क्रियते । एष एव न्यायो यदुत संनियोगशिष्टानामन्यतरापाय उभयोरप्यभावः । तद्यथा । देवदत्तयज्ञदत्ताभ्यामिदं कर्तव्यमिति देवदत्तापाये यज्ञदत्तोऽपि न करोति ॥

## [शीर्षच्छेदाद्यच्च ॥ ५ । १ । ६५ ॥

(सू. ६४ आणि ७६ वा.१) छेदादिभ्यो नित्यम्' व 'पन्थो ण नित्यम्' या दोन सूत्रामध्यें नित्य-ग्रहण व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असे कीं ' छेदमर्हति' तसेंच 'पन्थानं गच्छति ' असें एकदा प्रत्यय न करता वाक्य दृष्टीस पडतें.

तर मग विकाराकरितां हें नित्यग्रहण केलें आहे. म्हणजे प्रत्यय विकल्पानें होऊं दे, परंतु जेव्हां मागील प्रकृतीला विकार म्हणजे आदेश केला असेल तेव्हां प्रत्यय नित्य झालाच पाहिजे. उदा० विराग शब्दाला विरङ्ग आदेश ( गणसूत्र ). पथिन् शब्दाला पन्थ आदेश. हे आदेश होऊन प्रत्यय मात्र न होतां विग्रहवाक्य होईल तें न झालें पाहिजे.

( वा. २ ) विकाराकरितां नित्य ग्रहण केलें आहे असें म्हणणें असेल तर अकङ् वगैरेंप्रमाणेच हें होय. उदा०—अकङ् (४।१।९७) वगैरे विकार करून प्रत्यय न होतां विग्रहवाक्य होत नाहीं. त्याप्रमाणें येथेंही प्रत्यय न करतां नुसता विकार करून विग्रहवाक्य होणार नाहीं.

तर मग आतां येथे कसें बरें समजावे ? 'नित्यग्रहण करावयाची जरूर नसतां तें केलें आहे ? ' किंवा ' अकङ् वगैरे इतर ठिकाणीं नित्यग्रहण करावयास पाहिजे असतां तें केलें नाहीं ?'

येथें 'करावयास नको असतां तें केलें आहे' असेंच समजावें. कारण, असा न्यायच आहे कीं ' जीं दोन कार्यें एकाच सूत्रानें बरोबर सांगितलीं असतात त्यापैकीं एक केलें नाहीं म्हणजे दुसरेंही होत नाहींच.' उदा०—देवदत्त आणि यज्ञदत्त या दोघानीं मिळून अमुक कार्य करावें अशा समजुतीनें कार्य सुरू केलें असतां जर तेथें देवदत्त आला नाहीं तर यज्ञदत्त हा तें कार्य करीत नाहीं.

१—( सू. ६४ ) छेदादि गणातील शब्दांहून ' त्याला नित्य योग्य होतो ' या अर्थी ठक् वगैरे प्रत्यय होतात. उदा०—छेदं नित्यमर्हति छैदिकः वैनसः.

२—तेव्हां अकङ् आणि इञ् प्रत्यय हे झाले तर दोन्ही होतील. उदा०—सौधातकिः. विकल्प असल्यामुळें न करण्याचा पक्ष घेतला तर सुधातुरपत्यम् या विग्रह वाक्यामध्यें दोन्ही नाहीत; तसेच येथेंही होईल, तेव्हा ' नित्य ' ग्रहण नको

१—( सू. ६५ ) शिरच्छेद शब्दाहून ' त्याला नित्य योग्य ' या अर्थी यत् प्रत्यय होतो आणि शिरच्छेद शब्दातील शिरस् शब्दाला शीर्ष असा आदेश होतो उदा०—शिरच्छेदं नित्यमर्हति शीर्षच्छेद्यः.

**दण्डादिभ्यो यः ॥ ५ । १ । ६६ ॥**

**छन्दसि च ॥ ५ । १ । ६७ ॥**

**पात्राद् घंश्च ॥ ५ । १ । ६८ ॥**

**कडंकरदक्षिणाच्छ च ॥ ५ । १ । ६९ ॥**

**स्थालीबिलात् ॥ ५ । १ । ७० ॥**

**यज्ञर्त्विग्भ्यां घखञौ ॥ ५ । १ । ७१ ॥**

**यज्ञर्त्विग्भ्यां तत्कर्मार्हतीत्युपसंख्यानम् ॥ १ ॥**

यज्ञर्त्विग्भ्यां तत्कर्मार्हतीत्युपसंख्यानं कर्तव्यम् । यज्ञकर्मार्हति यज्ञियो देशः । ऋत्विक्कर्मार्हत्यार्त्विजीनं ब्राह्मणकुलमिति ॥

**पारायणतुरायणचान्द्रायणं वर्तयति ॥ ५ । १ । ७२ ॥**

**तद्वर्तयतीत्यनिर्देशस्तत्रादर्शनात् ॥ १ ॥**

तद्वर्तयतीत्यनिर्देशः । अगमको निर्देशोऽनिर्देशः । पारायणं को वर्तयति । यः परस्य करोति । तुरायणं को वर्तयति । यश्चरुपुरोडाशान्निर्वपति । तत्रादर्शनात् ।

---

( सू. ७१ वा. १ ) यज्ञ आणि ऋत्विज् या शब्दांहून यज्ञ-कर्माला योग्य आणि ऋत्विक्-कर्माला योग्य या अर्थीही क्रमानें घ आणि खञ् हे प्रत्यय होतात असें म्हणावें उदा०—यज्ञकर्म अर्हति इति यज्ञियः देशः. ऋत्विक्-कर्म अर्हति इति आर्त्विजीनं ब्राह्मणकुलम्.

( सू. ७२ वा. १ ) येथें 'तद्वर्तयति' म्हणजे तें तयार करून देतो हा जो अर्थाचा निर्देश केला आहे तो अनिर्देश होय. ज्या पासून इष्ट अर्थाचा बोध होत नाहीं तो अनिर्देशच समजला जातो.

मग पारायण तयार करतो तरी कोण ?

जो दुसऱ्याला म्हणजे शिष्याला शिकवितो तो पारायण तयार करून देतो.

तसेंच तुरायण तयार करतो कोण ?

जो ऋत्विज् चरु पुरोडाश वगैरेंचा निर्वाप करतो तो तुरायण तयार करतो. पण या दोन्ही अर्थीं पारायण व तुरायण या शब्दांहून प्रत्यय

---

१—( सू. ६६ ) दण्डादि गणांतील शब्दाहून 'त्याला योग्य' या अर्थीं य प्रत्यय होतो. उदा०—दण्डमर्हति दण्ड्य.

१—( सू. ६७ ) प्रातिपदिकाहून 'त्याला योग्य' या अर्थीं वेदामध्यें यत् प्रत्यय होतो. उदा०—यूपमर्हति यूप्यः पलाशः.

१—( सू. ६८ ) पात्र शब्दाहून 'त्याला योग्य' या अर्थीं घन् आणि यत् हे प्रत्यय होतात. उदा०—पात्रमर्हति पात्रियः, पात्र्यः.

१—( सू. ६९ ) कडकर आणि दक्षिणा या शब्दाहून 'त्याला योग्य' या अर्थीं छ आणि यत् हे प्रत्यय प्रत्येकाहून होतात. उदा०—कडंकरमर्हति कडंकरीयः, कडंकर्यः गौः; दक्षिणामर्हति दक्षिणीयः दाक्षिण्यः भिक्षुः. उडीद, मूग वगैरे शेतांतील वरचें धान्य काढल्यानंतर राहिलेल्या काष्ठाला कडंकर म्हणतात.

१—( सू. ७० ) स्थालीबिल शब्दाहून 'त्या योग्य' या अर्थीं छ आणि यत् प्रत्यय होतात. उदा०—स्थालीबिलमर्हति स्थालीबिलीया. स्थालीया स्थालीबिल्याः तण्डुलाः. स्थाली म्ह. भाताचें तपेलें. त्याचें बिल म्हणजे आंतील भाग त्याला योग्य म्हणजे वैरण्याला योग्य असे तांदूळ असा अर्थ आहे.

१—( सू. ७१ ) यज्ञ आणि ऋत्विज् या शब्दांहून 'त्याला योग्य' या अर्थीं क्रमानें घ आणि खञ् हे प्रत्यय होतात. उदा०—यज्ञमर्हति यज्ञियो ब्राह्मणः. ऋत्विजमर्हति आर्त्विजीनः.

१—( सू. ७२ ) पारायण, तुरायण आणि चान्द्रायण या शब्दाहून 'ते करतो' या अर्थीं ठञ् प्रत्यय होतो. उदा०—पारायणिकः छात्रः, तौरायणिकः यजमानः. तुरायण नावाचा विशिष्ट यज्ञ आहे. चान्द्रायणिकः तपस्वी. चान्द्रायण हें एक विशिष्ट प्रायश्चित्त आहे.

न च तत्र प्रत्ययो दृश्यते ॥

इङ्यज्योश्च दर्शनात् ॥ २ ॥

इङ्यज्योश्च प्रत्ययो दृश्यते । यः पारायणमधीते स पारायणिक इत्युच्यते । यस्तुरायणेन यजते स तौरायणिक इत्युच्यते ॥

यश्चैवाधीते यश्च परस्य करोत्युभौ तौ वर्तयतः । यश्च यजते यश्च चरुपुरोडाशान्निर्वपत्युभौ तौ वर्तयतः ॥ उभयत्र कस्मान्न भवति । अनभिधानात् ॥

[ संशयमापन्नः ॥ ५ । १ । ७३ ॥ ]

योजनं गच्छति ॥ ५ । १ । ७४ ॥

योजनं गच्छतीति क्रोशशतयोजनशतयोरुपसंख्यानम् ॥ १ ॥

योजनं गच्छतीत्यत्र क्रोशशतयोजनशतयोरुपसंख्यानं कर्तव्यम् । क्रोशशतं गच्छतीति क्रौशशतिकः । योजनशतं गच्छतीति यौजनशतिक इति ॥

ततोऽभिगमनमर्हतीति च ॥ २ ॥

ततोऽभिगमनमर्हतीति च क्रोशशतयोजनशतयोरुपसंख्यानं कर्तव्यम् । क्रोशशतादभिगमनमर्हति क्रौशशतिको भिक्षुः । योजनशतादभिगमनमर्हति यौजनशतिको गुरुः ॥

[ पथः ष्कन् । ५ । १ । ७५ ॥

पन्थो ण नित्यम् ॥ ५।१।७६॥ ]

उत्तरपथेनाऽऽहृतं च ॥ ५।१।७७ ॥

आहृतप्रकरणे वारिजङ्गलस्थलकान्तार-

---

झालेला दिसत नाहीं.

(वा. २) आणि इङ् व यज् या धातूंच्या अर्थीं प्रत्यय झालेला दृष्टीस पडतो. जो पारायणाचें अध्ययन करतो त्या शिष्याला पारायणिक असें लोकांमध्यें म्हणतात. तसेंच, जो तुरायण यज्ञ करतो त्या यजमानाला तौरायणिक असें लोकांमध्यें म्हणतात.

वस्तुतः विचार केला तर जो शिकतो आणि जो दुसऱ्याला शिकवितो ते दोघेही पारायण तयार करणारेच होतात; तसेंच जो यजमान तुरायण यज्ञ करतो आणि जो ऋत्विज् चरु पुरोडाश वगैरेंचा निर्वाप करतो ते दोघेही सारखेच तुरायण तयार करणारे होतात. मग अशी जर वस्तुस्थिति आहे तर त्या दोन्ही अर्थीं प्रत्यय का होत नाहीं?

अनभिधानास्तव प्रत्यय होत नाहीं.

(सू. ७४ वा १) ह्या सूत्रामध्यें क्रोशशत आणि योजनशत या शब्दांहूनही गच्छति या अर्थीं ठञ् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—क्रोशशतं गच्छति क्रौशशतिकः, योजनशतं गच्छति यौजनशतिकः.

(वा. २) क्रोशशत आणि योजनशत या शब्दांहून त्यापासून सामोरें जाण्याला योग्य या अर्थींही ठञ् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०— क्रोशशतात् अभिगमनमर्हति क्रौशशतिकः भिक्षुः, योजनशतात् अभिगमनमर्हति यौजनशतिकः गुरुः.

---

१—(सू. ७३) संशय शब्दाहून 'त्य प्रत प्राप्त झालेला' या अर्थीं ठञ् प्रत्यय होतो. उदा०— संशयं प्राप्तः सांशयिकः स्थाणुः.

१—(सू. ७४) योजन शब्दाहून 'तितकें गमन करतो' या अर्थीं ठञ् प्रत्यय होतो. उदा०— योजनं गच्छति यौजनिकः.

१—(सू. ७५) पथिन् शब्दाहून 'गच्छति' या अर्थीं ष्कन् प्रत्यय होतो. उदा०—पन्थानं गच्छति पथिकः.

१—(सू. ७६) पथिन् शब्दाहून 'नित्य गमन करतो' या अर्थीं ण प्रत्यय होतो. उदा०—पन्थानं नित्य गच्छति पान्थः.

१—(सू ७७) उत्तरपथ शब्दाहून 'त्यानें आणिलेलें' या अर्थीं आणि 'त्यानें गमन करतो' या अर्थीं ठञ् प्रत्यय होतो. उदा०—उत्तरपथेन आहृतम् औत्तरपथिकम्; उत्तरपथेन गच्छति औत्तरपथिकः.

**पूर्वपदादुपसंख्यानम् ॥ १ ॥**

आहृतप्रकरणे वारिजङ्गलस्थलकान्तारपूर्वपदादुपसंख्यानं कर्तव्यम् । वारिपथेन गच्छति वारिपथिकः । वारिपथेनाहृतं वारिपथिकम् । वारि ॥ जङ्गल । जङ्गलपथेन गच्छति जाङ्गलपथिकः । जङ्गलपथेनाहृतं जाङ्गलपथिकम् । जङ्गल ॥ स्थल । स्थलपथेन गच्छति स्थालपथिकः । स्थलपथेनाहृतं स्थालपथिकम् । स्थल ॥ कान्तार । कान्तारपथेन गच्छति कान्तारपथिकः। कान्तारपथेनाहृतं कान्तारपथिकम् ॥

**अजपथशङ्कुपथाभ्यां च ॥ २ ॥**

अजपथशङ्कुपथाभ्यां चेति वक्तव्यम् । अजपथेन गच्छत्याजपथिकः । अजपथेनाहृतमाजपथिकम् । शङ्कुपथेन गच्छति शाङ्कुपथिकः । शङ्कुपथेनाहृतं शाङ्कुपथिकम् ॥

**मधुकमरिचयोरण् स्थलात् ॥ ३ ॥**

मधुकमरिचयोरण् स्थलाद्वक्तव्यः । स्थालपथं मधुकम् । स्थालपथं मरिचम् ॥

**[ कालात् ॥ ५ । १ । ७८ ॥**

**तेन निर्वृत्तम् ॥ ५ । १ । ७९ ॥ ]**

**तमधीष्टो भृतो भूतो भावी ॥ ५ । १ । ८० ॥**

---

( सू. ७७ वा. १ ) ह्या आहृत अर्थाच्या प्रकरणामध्यें वारि, जङ्गल, स्थल आणि कान्तार ह्या पूर्व-पदांच्या पुढील जो पथिन् शब्द तदन्त प्रातिपदिकाहून ' त्यानें (मार्गानें) आणिलेलें ' या अर्थी आणि ' त्यानें ( मार्गानें ) गमन करतो ' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०— वारिपथेन गच्छति वारिपथिकः, वारिपथेन आहृतं वारिपथिकम्. जङ्गलपथेन गच्छति जाङ्गलपथिकः, जङ्गलपथेन आहृतं जाङ्गलपथिकम्. स्थलपथेन गच्छति स्थालपथिकः, स्थलपथेन आहृतं स्थालपथिकम्. कान्तारपथेन गच्छति कान्तारपथिकः, कान्तारपथेन आहृतं कान्तारपथिकम्.

( वा. २ ) अजपथ आणि शङ्कुपथ या शब्दांहूनही ' त्यानें आणिलेलें ' या अर्थी आणि 'त्यानें गमन करतो ' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०— अजपथेन गच्छति आजपथिकः, अजपथेन आहृतम् आजपथिकम्. शङ्कुपथेन गच्छति शाङ्कुपथिकः; शङ्कुपथेन आहृतं शाङ्कुपथिकम्.

( वा. ३ ) स्थल शब्दाच्या पुढील जो पथिन् शब्द तदन्त प्रातिपदिकाहून त्यानें आणिलेलें या अर्थी अण् प्रत्यय होतो उदा०- स्थलपथेन आहृतं स्थालपथं मधुकम्; स्थालपथं मरिचम्.

---

२—वारिपथ म्ह. जलमार्ग. पाण्यातून जाण्याची वाट; किंवा नौकेचा मार्ग. जङ्गलपथ म्हणजे दाट झाडींतून जाण्याची पायवाट स्थलपथ म्ह. गाडीवाट. कान्तारपथ म्ह. अवघड प्रदेशांतील पाऊलवाट.

३—अजपथ म्ह. कड्यांतील मार्ग. ज्यांतून मनुष्याला जाता येत नाहीं; परंतु शेळ्या वर चढतात असा मार्ग. शङ्कुपथ म्हणजे ज्या मार्गानें जलचर प्राण्यांचा संचार होतो तो मार्ग.

४—मधुक म्हणजे ज्येष्ठमध मरिच म्हणजे मिरे स्थलमार्गानें जाणारे पदार्थ अशा अर्थानें गच्छति या अर्थीही हा अण प्रत्यय होतो.

१—( सू. ७८ ) हें अधिकार सूत्र आहे. येथून पुढें व्युष्टादिभ्योऽण् ( ५ । १ । ९७ ) या सूत्रापर्यंत 'कालात्' या पदाचा संबंध आहे.

१—( सू. ७९ ) कालवाचक शब्दाहून ' त्यानें निर्वृत्त म्हणजे होणारें ' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—अह्ना निर्वृत्तम् आह्निकम्.

१—( सू. ८० ) मास वगैरे कालवाचक शब्दांहून मासभर अधीष्ट, भृत, भूत आणि भावी या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—मासम् अधीष्टः मासिकः अध्यापकः दररोज घटका दोन घटकाभर काम करण्याबद्दल प्रार्थना करून महिनाभर नियोजना केलेला. मास

**अधीष्टभृतयोर्द्वितीयानिर्देशोऽनर्थकस्तत्रादर्शनात् ॥ १ ॥**

अधीष्टभृतयोर्द्वितीयानिर्देशोऽनर्थकः । किं कारणम् । तत्रादर्शनात् । न ह्यसौ मासमधीष्यते । किं तर्हि । मुहूर्तमसावधीष्टो मासं तत्कर्म करोति ॥

**सिद्धं तु चतुर्थीनिर्देशात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । चतुर्थीनिर्देशात् । चतुर्थीनिर्देशः कर्तव्यः । तस्मा अधीष्ट इति ॥ स तर्हि चतुर्थीनिर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । तादर्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । मासार्थो मुहूर्तो मासः ॥

**[ मासाद्वयसि यत्खञौ ॥ ५ । १ । ८१ ॥**

**द्विगोर्यप् ॥ ५ । १ । ८२ ॥**

**षण्मासाण्ण्यच्च ॥ ५।१।८३॥ ]**

**अवयसि ठंश्च ॥ ५ । १ । ८४ ॥**

**अवयसि ठंश्चेत्यनन्तरस्यानुकर्षः ॥ १ ॥**

अवयसि ठंश्चेत्यनन्तरस्यानुकर्षो

---

( सू. ८० वा. १ ) अधीष्ट आणि भृत या दोन अर्थी 'तम्' हा द्वितीया निर्देश जुळत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं कालाचा अत्यन्त संयोग असतांना द्वितीया विभक्ति ( २।३।५ ) सांगितली आहे. आणि तो तसा कालाचा संबंध तर त्या दोन अर्थामध्यें दिसत नाहीं. कारण एकसारखें काम करण्याबद्दल अध्यापकाला प्रार्थना केली जात नाहीं; फक्त दररोज मुहूर्तभर शिकवा अशा रीतीनें प्रार्थना केलेला अध्यापक तसें तें काम महिनाभर करतो.

( वा. २ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं चतुर्थीनिर्देश करावा. म्हणजे 'तमधीष्टे' याच्या ऐवजीं 'तस्मै अधीष्ट' असें म्हणावे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण ज्याच्याकरितां जी वस्तु घेतली जाते त्या अर्थाचा शब्द त्या वस्तूला लावता येतो. तेव्हां येथें मासाकरितां जर तो मुहूर्त आहे तर मुहूर्त या अर्थीच येथे मास शब्द घेता येईल.

( सू. ८४ वा. १ ) अवयसि ठंश्च या सूत्रांतील 'च' या शब्दानें जवळच्या ण्यत् प्रत्य-

---

भृतः मासिकः कर्मकरः. सकाळी चार तास दुपारी चार तास असा कांहीं तरी ठराव करून त्यावेळी काम करण्याकरितां महिनाभर नेमलेला चाकर. मासं भूतः मासिकः व्याधिः. ज्या व्याधीपासून महिनाभर रात्रदिवस त्रास होतो असा व्याधि मासं भावी मासिक उत्सवः. महिनाभर होणारा उत्साह.

२—मुहूर्तभर कां होईना, जर एकादें काम दररोज असेल तर तेथें मासाचा अत्यन्त-संयोग समजला जातो असेंही मत आहे

३-तादर्थ्य या अर्थी चतुर्थी येथें (२।३।१३वा.१) झाली आहे

१—( सू. ८१ ) मास शब्दाहून 'भृत' या अर्थी म्हणजे 'महिन्याचा झालेला' या अर्थी वय गम्यमान असताना यत् व खञ् प्रत्यय होतात. उदा०—मासं भृत. मास्य., मासीन.

१–( सू. ८२ ) मास-शब्दान्त जो द्विगु त्याहून 'भृत' या अर्थी वय गम्यमान असतांना यप् प्रत्यय होतो. उदा०—द्वौ मासौ भृत. द्विमास्यः.

१—( सू. ८३ ) षण्मास शब्दाहून 'भृत' या अर्थी ण्यत्, यप् व ठञ् हे प्रत्यय होतात. उदा०—षाण्मास्य, षण्मास्यः, षाण्मासिकः.

१—( सू ८४ ) वयाशिवाय इतर अर्थ असेल तर षण्मास शब्दाहून 'भृत' या अर्थी ठन् आणि ण्यत् हे प्रत्यय होतात. उदा०-षण्मासिकः षाण्मास्यः रोगः.

द्रष्टव्यः ॥ द्वेष्यं विजानीयाद्यबप्यनुवर्तेत इति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्टे ऽवयसि ठंश्चेत्यनन्तरस्यानुकर्ष इति ॥

[ **समायाः खः ॥ ५ । १ । ८५ ॥**

**द्विगोर्वा ॥ ५ । ८६ ॥**

**रात्र्यहःसंवत्सराच्च ॥ ५ । १ । ८७ ॥**

**वर्षाल्लुक् च ॥ ५ । १ । ८८ ॥**

**चित्तवति नित्यम् ॥ ५ । १ । ८९ ॥** ]

**षष्टिकाः षष्टिरात्रेण पच्यन्ते ॥ ५ । १ । ९० ॥**

**षष्टिके संज्ञाग्रहणम् ॥ १ ॥**

षष्टिके संज्ञाग्रहणं कर्तव्यम् । मुद्गा अपि हि षाष्टिरात्रेण पच्यन्ते तत्र मा भूदिति ॥

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् । अनभिधानादिति ॥

[ **वत्सरान्ताच्छश्छन्दसि ॥ ५ । १ । ९१ ॥**

**संपरिपूर्वात् ख च ॥ ५ । १ । ९२ ॥**

---

याची अनुवृत्ति सुचविली आहे. द्विगोर्यप् या सूत्रांतून यप् प्रत्ययाची अनुवृत्ति मात्र येथें करूं नये. ही सूत्रकाराच्या मनांतील गोष्ट आचार्य वार्तिककारांनीं मित्रत्वाच्या नात्यानें येथें 'अवयसि ठंश्चेत्यनन्तरस्यानुकर्षः' ह्या वचनानें सांगितली आहे.

( सू. ९० वा. १ ) 'षष्टिक ही संज्ञा असली पाहिजे' असें येथें म्हणावें. नाहीं तर मूग या अर्थीही षष्टिक असा प्रयोग होऊं लागेल. कारण तेही साठ रात्री गेल्या म्हणजे तयार होतात पण त्या अर्थीं षष्टिक शब्दाचा प्रयोग न झाला पाहिजे.

( वा. २ ) अथवा यासंबंधानें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

अनभिधानात् ( ३।२।१ वा. ५ ) म्हणजे अनभिधानामुळें तेथें प्रत्यय होत नाहीं असें सांगितलें आहे.

---

१—( सू. ८५ ) समा शब्दाहून अधीष्ट वगैरे अर्थीं ख प्रत्यय होतो. उदा०—समामधीष्टः समीनः इत्यादि. समा म्हणजे वर्ष.

१—( सू. ८६ ) समा-शब्दान्त जो द्विगु त्याहून निर्वृत्त, अधीष्ट, इत्यादि पाच अर्थीं ख प्रत्यय विकल्पाने होतो; एकदां ठञ् होतो. द्विसमीन., द्वैसमिकः.

१—( सू. ८७ ) रात्रि, अहन् आणि सवत्सर हे शब्द शेवटी असलेला जो द्विगु त्याहून निर्वृत्त वगैरे पांच अर्थीं ख प्रत्यय विकल्पाने होतो; एकदां ठञ् होतो. उदा०—द्विरात्रीण , द्वैरात्रिकः; द्व्यहीनः, द्वैयह्निकः; द्विसवत्सरीणः, द्विसावत्सरिक,.

१—( सू. ८८ ) वर्ष-शब्दान्त जो द्विगु त्याहून निर्वृत्त वगैरे पाच अर्थीं ख प्रत्यय विकल्पाने होतो, व त्याचा लुकही विकल्पाने होतो. एकदां ठञ् होतो. उदा०—द्विवर्षीणः, द्विवर्ष., द्विवार्षिक.

१—( सू. ८९ ) वर्षशब्दान्त जो द्विगु त्याहून निर्वृत्त वगैरे पाच अर्थीं केलेल्या प्रत्ययाचा नित्य लुक् होतो. पण जो तो निर्वृत्त अधीष्ट इत्यादि अर्थ तो प्राणी असला पाहिजे. उदा०—द्विवर्षः दारकः.

१—( सू. ९० ) 'साठ दिवसांनीं तयार होणारें धान्य' या अर्थीं षष्टिक शब्दाचे येथे निपातन केले आहे. षष्टिरात्र शब्दाहून कन् प्रत्यय आणि रात्र शब्दाचा लोप झाला आहे उदा०—षष्टिकः धान्यविशेषः.

१—( सू. ९१ ) वत्सरशब्दान्त प्रातिपदिकाहून निर्वृत्त वगैरे पांच अर्थीं वेदामध्यें छ प्रत्यय होतो. उदा०—इद्वत्सरीय प्रभव, विभव वगैरे साठ सवत्सरांच्या बारा पंचकांपैकी पाच वर्षांना क्रमाने १ सवत्सर, २ परिवत्सर, ३ इदावत्सर, ४ इद्वत्सर आणि ५ वत्सर अशीं नांवे आहेत.

१—( सू. ९२ ) सम् किंवा परि हे पूर्वी असलेला जो वत्सर शब्द तदन्त प्रातिपदिकाहून निर्वृत्त वगैरे पाच अर्थीं वेदामध्यें ख आणि छ हे प्रत्यय होतात. उदा०—संवत्सरीणः संवत्सरीयः इत्यादि.

## तेन परिजय्यलभ्यकार्यसुकरम् ॥ ५ । १ । ९३ ॥ ]

## तदस्य ब्रह्मचर्यम् ॥५।१।९४॥

### तदस्य ब्रह्मचर्यमिति महानाम्न्यादिभ्य उपसंख्यानम् ॥ १ ॥

तदस्य ब्रह्मचर्यमिति महानाम्न्यादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । महानाम्नीनां ब्रह्मचर्यं माहानाम्निकम् । आदित्यव्रतिकम् ॥

### तच्चरतीति च ॥ २ ॥

तच्चरतीति च महानाम्न्यादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । महानाम्नीश्चरति माहानाम्निकः । आदित्यव्रतिकः ॥ नैष युक्तो निर्देशस्तच्चरतीति । महानाम्न्यो नामर्चो न च ताश्चर्यन्ते व्रतं तासां चर्यते ।नैष दोषः। साहचर्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । महानाम्नीसहचरितं व्रतं महानाम्न्यो व्रतमिति ॥

### अवान्तरदीक्षादिभ्यो डिनिः ॥ ३ ॥

अवान्तरदीक्षादिभ्यो डिनिर्वक्तव्यः । अवान्तरदीक्षी तिलव्रती ॥

### अष्टाचत्वारिंशतो ड्वुंश्च ॥ ४ ॥

अष्टाचत्वारिंशतो ड्वुंश्च डिनिश्च वक्तव्यः । अष्टाचत्वारिंशकः अष्टाचत्वा-

(सू. ९४ वा. १) ह्या सूत्रामध्यें महानाम्नी वगैरे शब्दांहून त्यासंबंधीं ब्रह्मचर्य या अर्थी ठञ् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—महानाम्नीनां ब्रह्मचर्यं माहानाम्निकम्; तसेंच आदित्यव्रतिकम्.

(वा. २) महानाम्नी वगैरे शब्दांहून 'त्याचें आचरण करतो' या अर्थींही ठञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—महानाम्नीः चरति माहानाम्निकः; तसेंच, आदित्यव्रतिकः.

येथें चरति हा अर्थाचा निर्देश बरोबर जुळत नाहीं. कारण, महानाम्नी म्हणून कांहीं ऋचा आहेत; तें कांहीं कर्म नव्हे. म्हणून त्यांचें आचरण करतां येत नाहीं; तर त्या महानाम्नीसंबंधीं जें व्रत त्याचें आचरण करतां येतें. हा दोष येत नाहीं. कारण ज्या दोन पदार्थांचे साहचर्य असते त्या पदार्थांपैकीं एका अर्थाचा शब्द दुसऱ्या अर्थीं वापरण्यांत येतो. तेव्हां महानाम्नीनामक ऋचांशीं ज्या व्रताचें साहचर्य आहे तें व्रत या अर्थींच येथें महानाम्नी शब्द घेऊन त्याच्या पुढें चरति या अर्थीं प्रत्यय केला आहे.

(वा. ३) अवान्तरदीक्षा वगैरे शब्दांहून 'तें आहे ज्याचें' या अर्थीं डिनि प्रत्यय होतो असें म्हणावें उदा०—अवान्तरदीक्षी, तिलव्रती.

(वा. ४) अठ्ठेचाळीस वर्षें या अर्थाच्या अष्टाचत्वारिंशत् या शब्दाहून 'तितक्या कालापर्यंत आहे ब्रह्मचर्य ज्याचें या अर्थीं ड्वुन् प्रत्यय होतो आणि डिनि प्रत्ययही होतो असें म्हणावें. उदा०—अष्टाचत्वारिंशकः, अष्टाचत्वारिंशी.

१—(सू. ९३) कालवाचक प्रातिपदिकाहून 'त्यानें म्हणजे तेवढ्या कालानें परिजय्य, लभ्य, कार्य आणि सुकर' या अर्थीं ठञ् प्रत्यय होतो. उदा०—मासेन परिजय्यः मासिकः व्याधिः. परिजय्य म्हणजे जिंकण्याजोगें. मासेन लभ्यं मासिकम् गृहम्. मासेन कार्यं मासिकं चान्द्रायणम्. कार्य म्ह. करण्याजोगें. मासेन सुकर मासिकम् गृहम्.

१—(सू. ९४) कालवाचक शब्दाहून 'त्या कालीं आहे ब्रह्मचर्य ज्याचें' या अर्थीं ठञ् प्रत्यय होतो. उदा०—मासं ब्रह्मचर्यमस्य मासिक ब्रह्मचारी. दुसरा अर्थ असा. कालवाचक शब्दाहून तो आहे काल ज्याचा असें ब्रह्मचर्य या अर्थीं ठञ् प्रत्यय होतो. उदा०—मास. कालः अस्य मासिकं ब्रह्मचर्यम्.

२—विदामघवन्० (ऐत. आर. ४) इत्यादि त्या ऋचा होत. तसेंच 'आपमापामपः'०(तै. आर. १।१) याही पांच ऋचाना महानाम्नी म्हणतात. अरुणकेतुक यज्ञामध्यें ह्या ऋचांनी उष्णोदकस्पर्श सांगितला आहे.

३—प्रत्येक वेदाच्या अध्ययनाला बारा वर्षें अशीं चारी वेदांच्या अध्ययनाला अठ्ठेचाळीस वर्षें लागतात. आठव्या वर्षीं मुंज झाल्यानंतर त्याच्या पुढें हें अठ्ठेचाळीस वर्षांचें ब्रह्मचर्य होय.

ङिशी ॥

**चातुर्मास्यानां यलोपश्च ॥ ५ ॥**

चातुर्मास्यानां यलोपश्च डुंश्च डिनिश्च वक्तव्यः । चातुर्मासकः चातुर्मासी ॥ अथ किमिदं चातुर्मास्यानामिति ।

**चतुर्मासाण्ण्यो यज्ञे तत्र भवे ॥ ६ ॥**

चतुर्मासाण्ण्यो वक्तव्यो यज्ञे तत्र भवं इत्येतस्मिन्नर्थे । चतुर्षु मासेषु भवानि चातुर्मास्यानि यज्ञाः ॥

**संज्ञायामण् ॥ ७ ॥**

संज्ञायामण्वक्तव्यः । चतुर्षु मासेषु भवा चातुर्मासी पौर्णमासी ॥

**तस्य दक्षिणा यज्ञाख्येभ्यः ॥ ५ । १ । ९५ ॥**

आख्याग्रहणं किमर्थम् । तस्य दक्षिणा यज्ञेभ्य इतीयत्युच्यमाने य एव संज्ञीभूतका यज्ञास्तत उत्पत्तिः स्यात् । आग्निष्टोमिक्यः राजसूयिक्यः वाजपेयिक्यः । यत्र वा यज्ञशब्दोऽस्ति । नावयज्ञिक्यः पाकयज्ञिक्यः । इह न स्यात् । पाञ्चौदनिक्यः दाशौदनिक्यः । आख्याग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति । ये च संज्ञीभूतका यज्ञा ये च न संज्ञीभूतका यत्र च यज्ञशब्दोऽस्ति यत्र च नास्ति तदाख्यामात्रात्सिद्धं भवति ॥

**तत्र च दीयते कार्यं भववत् ॥ ५ । १ । ९६ ।**

---

(वा. ५) चातुर्मास्य शब्दाहून तें आचरण करणारा, या अर्थी डुन् आणि डिनि हे प्रत्यय होतात आणि त्या प्रत्ययांच्या बरोबरच चातुर्मास्य शब्दांतील यकाराचा लोप होतो असें म्हणावें. उदा० चातुर्मासकः, चातुर्मासी.

पण चातुर्मास्य हें काय बरें आहे ?

(वा. ६) चतुर्मास शब्दाहून 'त्यामध्यें होणारा यज्ञ' या अर्थी ण्य प्रत्यय होतो असें म्हणावें उदा०—चतुर्षु मासेषु भवानि चातुर्मास्यानि यज्ञाः.

(वा. ७) चतुर्मास शब्दाहून तत्र भवः या अर्थी अण् प्रत्यय होतो पण तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे असें म्हणावें. उदा०—चतुर्षु मासेषु भवा चातुर्मासी पौर्णमासी.

(सू. ९५) ह्या सूत्रामध्यें आख्या शब्द कशाकरितां घातला आहे ?

'तस्य दक्षिणा यज्ञेभ्यः' एवढेंच सूत्र केलें तर त्या त्या नांवानें प्रसिद्ध असे जे यज्ञ त्यांहूनच येथें प्रत्यय होईल. उदा० आग्निष्टोमिक्यः, राजसूयिक्यः, वाजपेयिक्यः. तसेंच, ज्या नांवामध्यें प्रत्यक्ष यज्ञ शब्दच आहे त्याहूनही येथें प्रत्यय होईल, आणि पाञ्चौदनिक्यः दाशौदनिक्यः येथे होणार नाहीं. आतां सूत्रामध्यें 'आख्या' शब्द घातला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. कारण तेव्हां यज्ञाला लागू पडणारे जे शब्द असा अर्थ होतो; मग ते अग्निष्टोम वगैरे प्रसिद्ध संज्ञा-शब्द असोत अथवा तसे प्रसिद्ध संज्ञा-शब्द नसोत. तसेंच ज्या नांवामध्यें यज्ञ शब्द आहे ते असोत किंवा ज्या नांवामध्यें यज्ञ शब्द नाहीं ते असोत; कसेही शब्द असोत त्या सर्वच शब्दांहून प्रत्यय सिद्ध होतो.

---

१—(सू. ९५) यज्ञाला लागू पडणारे जे शब्द त्यांहून 'त्याची दक्षिणा' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—अग्निष्टोमस्य दक्षिणा आग्निष्टोमिकी

१—(सू. ९६) कालवाचक शब्दाहून 'भव' (४।३।५३) या अर्थी जे प्रत्यय होतात तेच त्याच शब्दाहून 'त्या कालीं दिलें जाणारें' आणि 'त्या कालीं होणारें कार्य' या दोन्ही अर्थी होतात. उदा०—प्रावृषि भवं प्रावृषेण्यम् (४।३।१७) प्रावृषि दीयते प्रावृषेण्यम् प्रावृषि कार्यम् प्रावृषेण्यम्.

**कार्यग्रहणमनर्थकं तत्रभवेन कृतत्वात् ॥ १ ॥**

कार्यग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । तत्रभवेन कृतत्वात् । यद्धि मासे कार्यं मासे भवं तद्भवति तत्र तत्र भवः [४.३.५३] इत्येव सिद्धम् ॥ किमिदं भवान्कार्यग्रहणमेव प्रत्याचष्टे न पुनर्दीयतेग्रहणमपि । यथैव हि यन्मासे कार्यं तन्मासे भवं भवत्येवं यदपि मासे दीयते तदपि मासे भवं भवति तत्र तत्र भव इत्येव सिद्धम् । न सिध्यति । न तन्मासे दीयते । किं तर्हि । मासे गते । एवं तर्ह्यौपश्लेषिकमधिकरणं विज्ञास्यते ॥ एवं तर्हि योगविभागोत्तरकालमिदं पठितव्यम् । तस्य दक्षिणा यज्ञाख्येभ्यः [ ९५ ] तत्र च दीयते । ततः कार्यं भववत्कालादिति ॥

**व्युष्टादिभ्योऽण् ॥ ५ । १ । ९७ ॥**

**अण्प्रकरणेऽग्निपदादिभ्य उपसंख्यानम् ॥ १ ॥**

---

( सू. ९६ वा. १ ) येथें कार्य या अर्थाचा निर्देश करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं–' तत्र भवः' (४।३।५३) या अर्थानेंच तेथें प्रत्यय करितां येईल. कारण, मासामध्यें होणारें जें कार्य तें त्या मासामध्यें असणारच. तेव्हां तेथें 'तत्र भवः' या अर्थानेंच प्रत्यय सिद्ध होतो.

पण, कायहो, हा जो येथें तुम्हीं ( वार्तिककारांनीं ) कार्य या अर्थावरच आक्षेप घेतला तो काय म्हणून ? दीयते या अर्थावरही तसा आक्षेप कां घेतला नाहीं ? कारण, जसें मासामध्यें होणारें कार्य हें त्या मासामध्यें असणारच, तसें त्या मासामध्यें जें दिलें जातें तेंही त्या मासामध्यें असतेंच. तेव्हा 'दीयते' या अर्थीही 'तत्र भवः' या अर्थानेंच प्रत्यय सिद्ध होत आहे.

तशा रीतीनें सिद्ध होणार नाहीं. कारण जें त्या मासासंबंधानें देण्याचें द्रव्य वगैरे असतें तें त्या मासात दिलें न जाता तो मास संपल्यानंतर तें दिलें जातें. तेथें ' तत्र भवः ' हा अर्थ घेतां येत नाहीं.

तर मग ' तत्र भवः ' येथील तत्र या शब्दानें दाखविलेलें अधिकरण औपश्लेषिक घेतां येईल. ( तेव्हां दीयते या अर्थीही तत्र भवः या अर्थानें सिद्धि होत असल्यामुळें दोन्ही अर्थी भववत् हा अतिदेश नको. )

तर मग आतां योगविभागानंतर हा वार्तिककारांनीं आक्षेप घेतला आहे असें समजावें. ते असें–' तस्य दक्षिणा यज्ञाख्येभ्यः ' या पूर्वसूत्रानंतर ' तत्र च दीयते ' एवढेंच एक सूत्र होय. त्याच्या पुढे ' कार्ये भववत् ' हें अतिदेश सूत्र होय. येथें कालात् याची अनुवृत्ति आहेच.

---

२—उपश्लेष म्हणजे जवळ असणें. एखादा पदार्थ तेथें नसून त्याच्या जवळच्या प्रदेशात असला तरी तो तेथें आहे असें म्हणतात. उदा०—वाप्याम् अश्वः. विहिरीवर घोडा नसून विहिरीच्या जवळच्या प्रदेशात असतो. यालाच औपश्लेषिक अधिकरण म्हणतात. तेव्हा त्या मासासंबंधानें जें द्यावयाचें ते त्याच्या पुढील मासांत दिलें तरी तें त्या मासांत दिलें असें म्हणतां येईल. तेव्हां तेथेही ' तत्र भव ' या अर्थानें सिद्धि होईल.

३—हें अतिदेश सूत्र नव्हेच तर स्वतंत्र विधायकच आहे. येथें यज्ञाख्येभ्य याची अनुवृत्ति आहे. उदा०—अग्निष्टोमे दीयते आग्निष्टोमिकम् भक्तम्. तेव्हा याकरिता हे सूत्र पाहिजे असल्यामुळें ' तत्र च दीयते ' यावर वार्तिककारानीं आक्षेप घेतला नाहीं हें बरोबरच आहे

१—( सू ९७ ) व्युष्ट वगैरे शब्दांहून ' तेथें दिलें जातें ' या अर्थी आणि ' तेथील कार्य ' या अर्थी अण् प्रत्यय होतो उदा०—व्युष्टे दीयते वैयुष्टम्, व्युष्टे कार्यं वैयुष्टम् व्युष्ट म्हणजे प्रभा.

अणप्रकरणे ऽग्निपदादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् ॥ त्रीणीमान्यण्ग्रहणानि । व्युष्टादिभ्योऽण् । समयस्तदस्य प्राप्तमृतोरण् [ ५.१.१०४;१०५ ] । प्रयोजनं विशाखाषाढादण्मन्थदण्डयोः [ १०९; ११० ] इति । तत्र न ज्ञायते कतरस्मिन्नणप्रकरणेऽग्निपदादिभ्य उपसंख्यानम् । अविशेषात्सर्वत्र ॥ व्युष्टादिभ्योऽणभवतीत्युक्त्वाग्निपदादिभ्यश्चेति वक्तव्यम् । अग्निपदे दीयते कार्यं वाग्निपदम् । पैलुमूलम् ॥ समयस्तदस्य प्राप्तमृतोरण् । अग्निपदादिभ्यश्चेति वक्तव्यम् । उपवस्ता प्राप्तोऽस्यौपवस्त्रम् । प्राशिता प्राप्तोऽस्य प्राशित्रम् । प्रयोजनं विशाखाषाढादण्मन्थदण्डयोः । अग्निपदादिभ्यश्चेति वक्तव्यम् । चूडा प्रयोजनमस्य चौडम् । श्रद्धा प्रयोजनमस्य श्राद्धम् ॥

**[ तेन यथाकथाचहस्ताभ्यां णयतौ ॥ ५ । १ । ९८ ॥**

**संपादिनि ॥ ५ । १ । ९९ ॥**

**कर्मवेषाद्यत् ॥ ५ । १ । १०० ॥**

**तस्मै प्रभवति संतापादिभ्यः ॥ ५ । १ । १०१ ॥**

---

( सू, ९७ वा. १ ) ह्या अण् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें 'अग्निपद वगैरे शब्दांहून अण् प्रत्यय होतो' असें उपसंख्यान करावें.

आतां येथें तीन ठिकाणीं अण् प्रत्यय सांगितला आहे एक हा 'व्युष्टादिभ्योऽण्' येथें; दुसरा 'समयस्तदस्य प्राप्तम्' (५।१।१०४) याच्या पुढें 'ऋतोरण्' येथें; आणि तिसरा 'प्रयोजनम्' (५।१।१०९) या सूत्राच्या पुढें 'विशाखाषाढादण् मन्थदण्डयोः' येथें. तेव्हां या तिघांपैकीं कोणत्या अण् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें 'अग्निपदादिभ्य उपसंख्यानम्' हें घ्यावें तें समजत नाहीं.

विशेष निर्देश न करतां 'अणप्रकरणे' असें मोघम म्हटलें असल्यामुळें तिन्ही ठिकाणीं तें घेतां येईल. तें असें कीं-व्युष्टादि गणांतील शब्दांहून 'दीयते' आणि 'कार्यम्' या अर्थी अण् प्रत्यय येथें सांगून पुढें अग्निपद वगैरे शब्दांहूनही अण् होतो असें म्हणावें. उदा०-अग्निपदे दीयते कार्यं वा आग्निपदम्. पीलुमूले दीयते कार्यं वा पैलुमूलम् तसेंच 'समयस्तदस्य प्राप्तम्' याच्या पुढें ऋतु शब्दाहून 'तो प्राप्त आहे ज्याला' या अर्थी अण् सांगितला आहे. तेथेंही अग्निपदादिक शब्दांहून अण् होतो असें म्हणावें. उदा०-उपवस्ता प्राप्तः अस्य औपवस्त्रम्; प्राशिता प्राप्तः अस्य प्राशित्रम्. तसेंच 'प्रयोजनम्' याच्या पुढें विशाखा, व अषाढा या शब्दांहून 'तें आहे प्रयोजन ज्याचें' या अर्थी अण् प्रत्यय सांगितला आहे; तेथेंही अग्निपद वगैरे शब्दांहून अण् होतो असें म्हणावें. उदा०-चूडा आहे प्रयोजन ज्याचें तें चौड होय. श्रद्धा हे ज्याचें प्रयोजन ( म्ह. कारण ) आहे तें श्राद्ध होय.

---

२—येथें अग्निपदादिक शब्द म्हणजे अग्निपद शब्दासारखे शब्द घ्यावेत. चूडा श्रद्धा हे शब्द तसे आहेत.

१—(स. ९८) यथाकथाच हा जो शब्दसमुदाय त्याहून 'त्यानें दिलें जाणारें' तसेंच 'त्यानें केलें जाणारें कार्य' या अर्थी ण्य प्रत्यय होतो, आणि त्याच दोन्ही अर्थी हस्त शब्दाहून यत् प्रत्यय होतो. उदा०-यथाकथाच दीयते याथाकथाचम्; यथाकथाच कार्यं याथाकथाचम्. हस्तेन दीयते हस्त्यम् हस्तेन कार्यं हस्त्यम्.

१—( सू. ९९ ) प्रातिपदिकाहून त्यानें 'संपादि' म्हणजे 'शोभणारें' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०-कार्णवेष्टकिकम् मुखम्.

१—( सू. १०० ) कर्म व वेष या शब्दांहून 'त्यानें संपादि' म्हणजे शोभणारें या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—कर्मण्यं शरीरम्; वेष्यो नटः.

१—( सू. १०१ ) संतापादि गणांतील शब्दांहून 'प्रभवति' म्हणजे 'त्याला समर्थ होतो' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—संतापाय प्रभवति सांतापिकः.

**योगाद्यच्च ॥ ५ । १ । १०२ ॥**
**कर्मण उकञ् ॥ ५ । १ । १०३ ।**
**समयस्तदस्य प्राप्तम् ॥५।१।१०४॥**
**ऋतोरण् ॥ ५ । १ । १०५ ॥**
**छन्दसि घस् ॥ ५ । १ । १०६ ॥**
**कालाद्यत् ॥ ५ । १ । १०७ ॥**
**प्रकृष्टे ठञ् ॥ ५ । १ । १०८ ॥**
**प्रयोजनम् ॥ ५ । १ । १०९ ॥**
**विशाखाषाढादण् मन्थदण्डयोः ॥ ५ । १ । ११० ॥ ]**

**अनुप्रवचनादिभ्यश्छः ॥ ५ । १ । १११ ॥**

**छप्रकरणे विशिपूरिपदिरुहिप्रकृतेरनात्सपूर्वपदादुपसंख्यानम् ॥ १ ॥**

छप्रकरणे विशिपूरिपदिरुहिप्रकृतेरनात्सपूर्वपदादुपसंख्यानं कर्तव्यम् । विशि । गेहानुप्रवेशनीयम् । पूरि । प्रपापूरणीयम् । पदि । गोप्रपदनीयम् अश्वप्रपदनीयम् । रुहि । प्रासादारोहणीयम् ॥

**स्वर्गादिभ्यो यत् ॥ २ ॥**

स्वर्गादिभ्यो यत्प्रत्ययो भवति । स्वर्ग्यम् धन्यम् यशस्यम् आयुष्यम् ॥

---

(सू. १११ वा. १) विश्, पूर, पद् आणि रुह् या धातूंच्या मागें कांहीं पूर्वपद असतांना त्या धातूंहून केलेला जो अन् प्रत्यय तदन्त प्रातिपदिकाहून 'तें आहे प्रयोजन ज्याचें' या अर्थी छ प्रत्यय होतो असें या छ प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें उपसंख्यान करावें. उदा०-गेहानुप्रवेशनं प्रयोजनमस्य गेहानुप्रवेशनीयम्; प्रपापूरणीयम्; गोप्रपदनीयम्; अश्वप्रपदनीयम्; प्रासादारोहणीयम्.

(वा. २) स्वर्ग वगैरे शब्दांहून 'तें आहे प्रयोजन ज्याचें' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०- स्वर्ग्यम्; धन्यम्; यशस्यम्; आयुष्यम्

---

१—(सू. १०२) योग शब्दाहून 'त्याला समर्थ होतो' या अर्थी यत् व ठञ् हे प्रत्यय होतात. उदा०—योगाय प्रभवति योग्य, यौगिकः.

१—(सू. १०३) कर्मन् शब्दाहून त्याला समर्थ होणारें धनुष्य या अर्थी उकञ् प्रत्यय होतो. उदा०—कर्मणे प्रभवति कार्मुकम् धनुः.

१—(सू. १०४) समय शब्दाहून 'तो आहे प्राप्त ज्याला' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—समयः प्राप्तः अस्य सामयिकं कार्यम्.

१—(सू. १०५) ऋतु शब्दाहून 'तो आहे प्राप्त ज्याला' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—ऋतुः प्राप्त अस्य आर्तवम् पुष्पम्.

१—(सू. १०६) ऋतु शब्दाहून 'ता आहे प्राप्त ज्याला' या अर्थी वेदामध्यें घस् प्रत्यय होतो. उदा०—ऋतुः प्राप्तः अस्य ऋत्वियम्. येथे ऋतु शब्दाला पद संज्ञा (१।४।१६) झाल्यामुळें गुण (६।४।१४६) झाला नाहीं कारण पद संज्ञेने भ संज्ञेचा बाध केला आहे.

१—(सू. १०७) काल शब्दाहून 'तो आहे प्राप्त ज्याला' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—कालः प्राप्तः अस्य काल्यः पर्जन्यः.

१—(सू. १०८) काल शब्दाहून 'दीर्घ काल ज्याचा' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—कालिकं वैरम्. पुष्कळ दिवसाचे वैर हा अर्थ आहे.

१—(सू. १०९) प्रातिपदिकाहून 'तें आहे प्रयोजन ज्याचें' या अर्थी ठञ् प्रत्यय होतो उदा०—इन्द्रमहः प्रयोजनमस्य ऐन्द्रमहिकं कर्म. इन्द्रमह म्हणजे इन्द्रोत्साह; त्याकरितां केलें जाणारें कर्म हा ऐन्द्रमहिक शब्दाचा अर्थ आहे.

१—(सू. ११०) विशाख आणि आषाढ या शब्दांहून 'तें आहे प्रयोजन ज्याचें' या अर्थी अण् प्रत्यय होतो, परंतु त्या शब्दांचे क्रमानें मन्थ आणि दण्ड हे अर्थ पाहिजेत. विशाखः प्रयोजनमस्य वैशाखः म्हणजे घुसळखांब. विशाख. मन्थः (रवी). आषाढः. ज्याची काठी तयार होते तें काष्ठ. वैशाख व आषाढ या शब्दांचा मन्थ व दण्ड या अर्थीही प्रयोग होतो.

१—(सू. १११) अनुप्रवचन शब्दाहून 'तें आहे प्रयोजन ज्याचें' या अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०-अनुप्रवचनं प्रयोजनमस्य अनुप्रवचनीयः. अनुप्रवचन म्ह. मखोदन.

## पुण्याहवाचनादिभ्यो लुक् ॥ ३ ॥

पुण्याहवाचनादिभ्यो लुग्वक्तव्यः । पुण्याहवाचनम् शान्तिवाचनम् स्वस्तिवाचनम् ॥

## [ समापनात्सपूर्वपदात् ॥ ५ । १ । ११२ ॥ ]

## ऐकागारिकट् चौरे ॥५ । १ । ११३ ॥

## एकागारान्निपातनानर्थक्यं ठञ्प्रकरणात् ॥ १ ॥

एकागारान्निपातनमनर्थकम् । किं कारणम् । ठञ्प्रकरणात् । ठञ् प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते ॥ इदं तर्हि प्रयोजनं चोर इति वक्ष्यामीति । इह मा भूत् । एकागारं प्रयोजनमस्य भिक्षोरिति ॥ यद्येतावत्प्रयोजनं स्यादेकागाराच्चोर इत्येव ब्रूयात् ॥

## आकालिकडाद्यन्तवचने ॥ ५ । १ । ११४ ॥

## आकालान्निपातनानर्थक्यं ठञ्प्रकरणात् ॥ १ ॥

आकालान्निपातनमनर्थकम् । किं कारणम् । ठञ्प्रकरणात् । ठञ्प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते ॥ इदं तर्हि प्रयोजनमेतस्मिन्विशेषे निपातनं करिष्यामि समानकालस्याद्यन्तविवक्षायामिति ॥

---

( वा. ३ ) पुण्याहवाचन वगैरे शब्दांहून 'तें आहे प्रयोजन ज्याचें' या अर्थी केलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें. उदा०— पुण्याहवाचनम्; शान्तिवाचनम्; स्वस्तिवाचनम्.

( सू. ११३ वा. १ ) एकागार शब्दाहून ठञ् प्रत्ययाचें जें येथें निपातन केलें आहे तें व्यर्थ आहे.

काय कारण?

कारण असें कीं, ठञ् प्रत्ययाचें प्रकरण चालूंच आहे. त्याची येथें अनुवृत्ति होईलच.

तर मग येथें निपातन करण्याचा उपयोग असा कीं—चोर या अर्थींच हा शब्द सिद्ध झाला पाहिजे. कारण 'एक अगार आहे प्रयोजन ज्याचें' असा भिक्षु ( संन्याशी ) या अर्थी 'ऐकागारिक' असें न झालें पाहिजे.

पण जर या निपातनाचा एवढाच उपयोग असेल तर 'एकागाराच्चौरे' असेंच सूत्र करतां येईल.

( सू. ११४ वा. १ ) आकाल शब्दाहून ठञ् प्रत्ययाचें जं येथें निपातन केलें आहे तें व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं ठञ् प्रत्ययाचें प्रकरण चालूंच अ हे, त्याची येथें अनुवृत्ति होईलच.

तर मग येथें निपातन करण्याचा उपयोग असा कीं, ज्या वस्तूचे आदि व अन्त हे समान कालींच होतात त्या विशेष अर्थींच हा शब्द सिद्ध झाला पाहिजे.

---

१—( सू. ११२ ) ज्याच्या मागे कांहीं पूर्वपद आहे अशा समापन शब्दाहून 'ते आहे प्रयोजन ज्याचें' या अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—छन्दःसमापनं प्रयोजनमस्य कर्मण छन्दःसमापनीयम्.

१—( सू. ११३ ) 'चोर' या अर्थी ऐकागारिक असा इत्संज्ञक टकार जोडलेला शब्द येथें निपातन केला आहे एक म्हणजे असहाय असें अगार म्ह. घर. तसें घर चोराला प्रवेश करण्याला सुलभ जातें. एकागार आहे प्रयोजन म्हणजे निमित्त ज्याला तो ऐकागारिक म्हणजे चोर.

२—नियमार्थ हे सूत्र पाहिजे.

( सू. ११४ ) ज्याचे आदि व अन्त एकदमच होतात अशी वस्तु (वीज) या अर्थी 'आकालिक' असा इत्संज्ञक टकार जोडलेला शब्द येथें निपातन केला आहे. समानकाल शब्दाहून 'तसे आहेत आदि व अंत ज्याचे' या अर्थी ठञ् प्रत्यय करून समानकाल, या शब्दाला अकाल असा आदेश येथें कल्पिला आहे.

आकालाट्ठंश्च ॥ २ ॥

आकालाट्ठंश्च वक्तव्यः । आकालिकी आकालिका ॥

## तेन तुल्यं क्रिया चेद्वतिः ॥ ५ । १ । ११५ ॥

इदमयुक्तं वर्तते । किमत्रायुक्तम् । यत्तृतीयासमर्थं क्रिया चेत्सा भवतीत्युच्यते कथं च तृतीयासमर्थं नाम क्रिया स्यात् ॥ नैष दोषः । सर्वे एते शब्दा गुणसमुदायेषु वर्तन्ते ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्र इति । आतश्च गुणसमुदाय एवं ह्याह

तपः श्रुतं च योनिश्च
एतद्ब्राह्मणकारकम् ।
तपःश्रुताभ्यां यो हीनो
जातिब्राह्मण एव सः ॥

तथा गौरः शुच्याचारः पिङ्गलः कपिलकेश इत्येतानप्यभ्यन्तरान्ब्राह्मण्ये गुणान्कुर्वन्ति । समुदायेषु च शब्दा वृत्ता अवयवेष्वपि वर्तन्ते । तद्यथा । पूर्वे पञ्चालाः । उत्तरे पञ्चालाः । तैलं भुक्तम् ।

---

(वा. २) आकाल शब्दाहून ठन् व ठञ् हे प्रत्यय होतात असें म्हणावें. उदा०—आकालिकी, आकालिका.

(सू. ११५) हें येथें सूत्रकारांचें करणें अयोग्य दिसतें.

येथें काय बरें अयोग्य आहे असें तुम्हांला वाटतें ?

येथें ' त्याच्याशीं तुल्य ' या अर्थी 'वति' प्रत्यय सांगितला आहे; आणि ज्याच्याशीं तुल्य ती तर क्रिया असावी असें म्हटलें आहे. तेव्हां ज्या पदार्थाशीं तुल्य तो तृतीया विभक्ति लावून दाखविला जाणारा पदार्थ क्रिया कशी असूं शकेल ?

हा दोष येत नाहीं. यांत अयोग्य कांहीं नाहीं. कारण ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, वगैरे सर्व शब्द हे गुणसमुदायाचेच वाचक आहेत; कारण कांहीं अन्तर्गत धर्म पाहूनच ते ते शब्द उपयोगांत आणिले जातात. शिवाय, धर्मांचा समुदायच प्रत्येक शब्दानें दाखविला जातो असें म्हणण्याचें कारण हे कीं:—

तैप: श्रुतं च योनिश्च एतद् ब्राह्मणकारकम् ।
तपः श्रुताभ्यां यो हीनो जातिब्राह्मण एव सः ॥

असें म्हटले आहे. तसेंच गोरा, सदाचरण करणारा, पिंगट वर्णाचा, काळ्या केसाचा, असा ब्राह्मण असतो असेंही ब्राह्मणाचें स्वाभाविक गुण वर्णन केले जातात.

आतां समुदायाचे वाचक शब्द हे त्यांतील अवयव-अर्थींही उपयोगांत येतात. उदा० पूर्व पाञ्चाल देश, उत्तर पाञ्चाल देश, तेल खाल्लें, तूप खाल्लें, हा पांढरा, हा निळा, हा काळा

---

२—आवृत्तः कालो यस्य स आकालः. जो उत्पत्तीचा काल त्याचीच पुनः आवृत्ति. समासिकाल म्हणून पुनरावृत्ति जेथें होते त्या वस्तूला आकाल म्हणतात. त्या आकाल शब्दाहून स्वार्थी हे प्रत्यय होतात

१—(सू ११५) प्रातिपदिकाहून त्याच्या क्रियेशी तुल्य आहे क्रिया ज्याची या अर्थी वत् प्रत्यय होतो. उदा०—ब्राह्मणेन तुल्यं ब्राह्मणवत् आचरति क्षत्रियः. पित्रा तुल्यं पितृवत् प्रजा पालयति नृपः.

२—'तेन तुल्यम्' असें म्हणून पुढें ' क्रिया चेत्' असें म्हटलें आहे. तेव्हा येथें तेन या शब्दानें जो अर्थ घेतला तो क्रिया पाहिजे किंवा तुल्य या शब्दानें जो अर्थ घेतला तो क्रिया पाहिजे असे येथें दोन प्रकार संभवतात. त्यापैकीं पहिला प्रकार घेऊन हा आक्षेप दाखविला आहे.

३—ब्राह्मणेन तुल्यम् ब्राह्मणवत्, पित्रा तुल्यं पितृवत्. येथें ब्राह्मण तसेंच पिता हे शब्द क्रियावाचक नाहींत.

४—चान्द्रायण वगैरे तपश्चर्या, वेदवेदांगांचें अध्ययन, आणि ब्राह्मण जातीच्या आईबापापासून उत्पत्ति ह्या तीन कारणांनीं ब्राह्मणत्व येतें. ज्या ठिकाणीं तप आणि श्रुत हीं पहिलीं दोन कारणें नाहींत तो नुसता जातिब्राह्मण होय.

वृत्तं श्रुतकम् । शुक्लः नीलः कृष्ण इति । एवमयं ब्राह्मणशब्दः समुदाये वृत्तोऽवयवेष्वपि वर्तते ॥

यदि तर्हि तृतीयासमर्थं विशेष्यते प्रत्ययार्थोऽविशेषितो भवति । तत्र को दोषः । तृतीयासमर्थात्क्रियावाचिनो गुणतुल्येऽपि प्रत्ययः स्यात् । पुत्रेण तुल्यः स्थूलः । पुत्रेण तुल्यः पिङ्गल इति । अस्तु तर्हि प्रत्ययार्थविशेषणं यत्तुल्यं क्रिया चेत्सा भवतीति ॥ एवमपि तृतीयासमर्थमविशेषितं भवति । तत्र को दोषः । तृतीयासमर्थादक्रियावाचिनः क्रियातुल्येऽपि प्रत्ययः प्राप्नोति ॥

नैष दोषः । यत्तुल्यं क्रिया चेत्सा भवतीत्युच्यते तुलया च संमितं तुल्यं यदि च तृतीयासमर्थमपि क्रिया प्रत्ययार्थोऽपि क्रिया ततस्तुल्यं भवति ॥ अथवा पुनरस्तु यत्तृतीयासमर्थं क्रिया चेत्सा भवतीत्येव । ननु चोक्तं प्रत्ययार्थोऽविशेषित इति । तत्र को दोषः । तृतीयासमर्था-

---

इत्यादि. त्याप्रमाणेंच येथें ब्राह्मण वगैरे शब्द समुदायवाचक जरी असले तरी त्या समुदायाचा अवयव जो अध्ययन करणें वगैरे क्रियारूपी धर्म त्या अर्थानें ब्राह्मण शब्द येथें उपयोगांत आला आहे असें समजावें.

आतां ' तेन तुल्यम् ' यांपैकीं ' तेन ' या तृतीयान्त पदानें जो घेतला जातो तो क्रिया पाहिजे असा संबंध केला तर तुल्य पदानें जो घेतला जातो तो प्रत्ययार्थ क्रियाच पाहिजे असा विशेष घेतां येत नाहीं.

मग तसा घेतला नाहीं तर दोष काय ?

दोष असा येईल कीं—क्रियावाचक अशा तृतीयान्त शब्दाहून गुणानें तुल्य या अर्थीही वति प्रत्यय होऊं लागेल. उदा० पुत्रेण तुल्यः स्थूलः; पुत्रेण तुल्यः पिङ्गलः.

तर मग आतां ' तेन तुल्यम् ' यांतील तुल्य या पदानें जो प्रत्ययार्थ घेतला आहे तो क्रिया असला पाहिजे म्हणजे जें तुल्य ती क्रिया असली म्हणजे वति प्रत्यय होतो.

असें केलें तरी ' तेन ' या पदानें जो घेतला असेल तो क्रियाच असला पाहिजे असें होणार नाहीं, आणि वाटेल तो घेतां येईल.

मग तसा घेतला तर काय दोष ?

स्थूलांशीं तुल्य असा हा पुत्र आहे, स्थूलांशीं तुल्य असलेला हा गमन करणारा आहे, येथें वति प्रत्यय होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण जें तुल्य ती क्रिया असेल तर असें येथें म्हटलें आहे. आणि तुलेसारखें तें तुल्य होय. तेव्हां तेन या तृतीयान्त पदानें घेतलेलें जे उपमान तें क्रिया असेल, तसेंच तुल्यम् या पदानें घेतलेला प्रत्ययार्थ उपमेय तोही क्रिया असेल तरच तें तुल्य असें बरोबर समजलें जातें.

अथवा तेन या पदानें जें उपमान घेतलें आहे, तें क्रिया असेल तर वति प्रत्यय होतो असाच अर्थ असू दे.

पण तसें घेतलें तर तुल्य पदानें जें उपमेय घेतले आहे तें क्रियाच पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं ना ?

तसें झालें तर दोष तरी कोठें बरें येतो?

---

५—नरकापासून पितरांचें रक्षण करणें हा पुत्रधर्म होय. त्या अर्थानेंच येथें पुत्र शब्द उच्चारला आहे. त्याचा सारखेपणा मात्र येथें स्थौल्यगुण, किंवा पिंगट वर्ण यांनीं घेतला आहे.

६—येथें तुल्य जो पदार्थ तद्वाचक जो पुत्र हा शब्द तो क्रियावाची आहे. परंतु सारखेपणा मात्र क्रियेनें नाहीं.

७—तुला म्हणजे तागडी. ती जशी दोन्ही बाजू अगदीं बरोबर दाखविते त्याप्रमाणेंच जें अगदीं बरोबर असेल तेंच तुल्य होय.

त्क्रियावाचिनो गुणतुल्येऽपि प्रत्ययः प्राप्नोति । पुत्रेण तुल्यः स्थूलः । पुत्रेण तुल्यः पिङ्गल इति । नैष दोषः । यत्तत्तृतीयासमर्थं क्रिया चेत्सा भवतीत्युच्यते तुलया च संमितं तुल्यं यदि च तृतीयासमर्थमपि क्रिया प्रत्ययार्थोऽपि क्रिया ततस्तुल्यं भवति ॥ किं पुनरत्र न्यायः । प्रत्ययार्थविशेषणमेव न्यायः । कुत एतत् । एवं चैव हि कृत्वाचार्येण सूत्रं पठितम् । वतिना सामानाधिकरण्यं कृतम् । अपि च वतेरव्ययेषु पाठो न कर्तव्यो भवति । क्रियायामयं भवँल्लिङ्गसंख्याभ्यां न योक्ष्यते ॥

**तत्र तस्येव ॥ ५ । १ । ११६ ॥**

किमर्थमिदमुच्यते न तेन तुल्यं क्रिया चेद्वतिः [ ११५ ] इत्येव सिद्धम् । न सिध्यति । तृतीयासमर्थात्तत्र प्रत्ययः

---

तेन या तृतीयान्त पदानें क्रियावाचक शब्द घेतला असतां त्याचें इतरांबरोबर गुणांनीं साम्य असलें तरी प्रत्यय होऊं लागेल. उदा० पुत्रेण तुल्यः स्थूलः, पुत्रेण तुल्यः पिङ्गलः.

हा दोष येत नाहीं. कारण ज्याच्याशीं तुल्य ती क्रिया असेल तर असें येथें म्हटलें आहे, आणि तुलेसारखें जें तें तुल्य होय. तेव्हां तेन या तृतीयान्त पदानें घेतलेलें जें उपमान तें क्रिया असेल, तसेंच तुल्यम् या पदानें घेतलेला जो प्रत्ययार्थ उपमेय तोही क्रिया असेल तरच तें तुल्य असें बरोबर समजलें जातें.

अशा रीतीनें दोन्ही पक्षीं दोष येत नाहीं हें खरें, पण त्यांतल्या त्यांत बरा पक्ष कोणता ?

तुल्य पदानें जो प्रत्ययार्थ घेतला आहे तो क्रिया पाहिजे असा अर्थ करणेंच बरें.

असें कशावरुन ?

अशावरुन कीं, असा अर्थ मनांत धरूनच सूत्रकारांनीं हें असें सूत्र केलें आहे कीं ज्यामध्यें क्रियेचें वति या प्रत्ययाशीं सामानाधिकरण्य केलें आहे, ( क्रियया असें म्हणून तेन याच्याशीं सामानाधिकरण्य दाखविलें नाहीं ). शिवाय, वत्—प्रत्ययान्त हें अव्यय आहे असें समजण्याकरितां स्वर वगैरे अव्ययांमध्यें ( १ । १ । ३७ ) जो वत् असा पाठ केला आहे तो करावयास नको. कारण, हा वति प्रत्यय 'तुल्य क्रिया' या अर्थी होत असल्यामुळें तेथें लिंग व संख्या यांचा संबंध मुळींच होणार नाहीं.

( सू. ११६ ) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? तें करावयास नको. कारण या सूत्राचीं उदाहरणें 'तेन तुल्यं क्रिया चेद्वतिः' या पूर्व सूत्रानेंच सिद्ध होतील.

त्यानें सिद्ध होणार नाहींत. कारण, तृतीयान्ताहून त्यानें वति प्रत्यय सांगितला आहे.

---

८—कारण, क्रियेची प्रतीति असत्त्व रूपानें होते. असत्त्व म्हणजे लिंग व संख्या न लागणे. उदा०–पाक, पक्ति व पचन या शब्दामध्यें कर्त्याचा जो व्यापार धातूने दाखविला जातो तोच पुढील प्रत्ययानें दाखविला जातो. दोहोंमध्यें फरक असा कीं, धातूपासून त्या व्यापाराची असत्त्व रूपानें प्रतीति होते. म्हणजे त्या अर्थाला लिंग व संख्या लागत नाहींत. त्याकडे कारकांचा अन्वय होतो. याच अवस्थेंत त्या व्यापाराला क्रिया म्हणतात. आणि तोच व्यापार प्रत्ययानें जेव्हां दाखविला जातो तेव्हा त्याची सत्त्व रूपानें प्रतीति होते. म्हणजे त्या अर्थाला लिंग व संख्या लागतात. त्याकडे कारकाचा अन्वय नाहीं. या अवस्थेत त्या व्यापाराला भाव म्हणतात. उदा० तण्डुलस्य पाकः. येथें तण्डुल या कर्माचा अन्वय धात्वर्थाकडे आहे; प्रत्ययार्थाकडे नाहीं. आणि पाकः या पुंल्लिंगाचा व एकवचनाचा अन्वय प्रत्ययार्थाकडे आहे, धात्वर्थाकडे नाहीं.

१—( सू. ११६ ) सप्तम्यन्त प्रातिपदिकाहून 'त्याचे ठिकाणीं जसें त्याप्रमाणें' या अर्थी आणि षष्ठ्यन्त प्रातिपदिकाहून 'त्याचें जसें त्याप्रमाणें' या अर्थी वति प्रत्यय होतो. उदा०—मथुरायामिव मथुरावत् स्रुघ्ने प्राकारः; देवदत्तस्य इव देवदत्तवत् यज्ञदत्तस्य गावः.

यदान्येन कर्तव्यां क्रियामन्यः करोति तदा प्रत्यय उत्पाद्यते । न च काचिदिवशब्देन योगे तृतीया विधीयते ॥ ननु च सप्तम्यपि न विधीयते एवं तर्हि सिद्धे सति यदिवशब्देन योगे सप्तमीसमर्थाद्वतिं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवतीवशब्देन योगे सप्तमीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । देवेष्विव नाम ब्राह्मणेष्विव नाम एष प्रयोग उपपन्नो भवति ॥

तदर्हम् ॥ ५ । १ । ११७ ॥

किमर्थमिदमुच्यते न तेन तुल्यं क्रिया चेद्वतिः [११५] इत्येव सिद्धम् । न सिध्यति । तृतीयासमर्थात्तत्र यदान्येन कर्तव्यां क्रियामन्यः करोति तदा प्रत्यय उत्पाद्यत इह पुनर्द्वितीयासमर्थादात्मार्हायां क्रियायामर्हतिकर्तरि निश्चितबलाधाने प्रत्यय उत्पाद्यते । ब्राह्मणवद्भवान् वर्तते । एतद्वृत्तं ब्राह्मणमर्हतीति ॥

---

म्हणजे एकानें कर्तव्य जी क्रिया त्यासारखीच दुसरा करतो असा अर्थ असेल तेथेंच त्यानें वति प्रत्यय होत असतो. आणि येथें इव या अर्थीं वति प्रत्यय सांगितला आहे; व इव शब्दाचा योग असतांना तृतीया कोणत्याही सूत्रानें सांगितली नाहीं.

पण इव शब्दाचा योग असतांना सप्तमी तरी कोठें बरें सांगितली आहे ?

तर मग अशा रीतीनें पूर्व सूत्रानें सिद्ध होत असतांनाही आचार्यांनीं जो येथें इव या अर्थीं सप्तम्यन्ताहून वति प्रत्यय सांगितला आहे त्यावरून ते असें सुचवितात कीं इव शब्दाचा योग असतांना सप्तमी होते.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

देवेष्विव नाम[३], ब्राह्मणेष्विव नाम हे प्रयोग साधणें हा त्याचा उपयोग होय.

( सू. ११७ ) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? तें करावयास नको. कारण या सूत्राचीं उदाहरणें ' तेन तुल्यं क्रिया चेद्वतिः ' या सूत्रानेंच सिद्ध होतील.

त्यानें सिद्ध होणार नाहींत. कारण, एकानें कर्तव्य जी क्रिया त्यासारखीच दुसरा करतो असा अर्थ असेल तेथेंच त्यानें तृतीयान्ताहून वति प्रत्यय होत असतो. आणि येथें तर द्वितीयान्ताहून त्याला योग्य अशी क्रिया या अर्थीं खात्रीनें तें काम करण्याला लायक असा त्या क्रियेचा कर्ता असतांना वति प्रत्यय सांगितला आहे. उदा०— ब्राह्मणवत् भवान् वर्तते. ब्राह्मणासारखा तूं वागतोस म्हणजे तुझें हें वर्तन ब्राह्मणाला योग्य आहे.

---

२—येथें षष्ठ्यन्ताहून आणि सप्तम्यन्ताहून 'वति' प्रत्यय सांगितला आहे. त्यापैकीं षष्ठी सामान्यतः संबंध या अर्थीं सांगितली असल्यामुळें ती इव या शब्दाचा योग असताना होऊं शकेल म्हणून षष्ठीविषयीं येथें विचार केला नाहीं. इव शब्दाच्या योगीं सप्तमीचे विधान नाहीं; पण कशी तरी अधिकरणाची विवक्षा करून सप्तमीची कल्पना करावयाची म्हटल्यास तृतीयेची कल्पना करून पूर्व सूत्रानें वति प्रत्यय करता येईल असा अभिप्राय आहे.

३—देवांमध्यें जसें नांव असतें तसें हें नाव आहे, असा अर्थ आहे.

१—( सू. ११७ ) द्वितीयान्त प्रातिपदिकाहून ' त्याला योग्य होणारी क्रिया ' या अर्थीं वति प्रत्यय होतो. उदा०—राजवत् प्रजापालनम्. प्रजापालन ही क्रिया राजाला योग्य आहे असा अर्थ आहे. सूत्रांतील अर्ह शब्दामध्यें अर्हतीत्यर्हन् असा अर्ह् धातूहून कर्ता या अर्थीं अच् ( ३।१।१३४ ) प्रत्यय केला आहे. तो कर्ता येथें प्रजापालन वगैरे क्रियारूपीच घ्यावयाचा आहे.

## उपसर्गाच्छन्दसि धात्वर्थे ॥ ५ । १ । ११८ ॥

अर्थग्रहणं किमर्थं नोपसर्गाच्छन्दसि धाताविल्येवोच्येत । धातुर्वै शब्दः । शब्दे कार्यस्यासंभवादर्थे कार्यं विज्ञास्यते । कः पुनर्धात्वर्थः । क्रिया ॥ इदं तर्हि प्रयोजनमुत्तरपदलोपो यथा विज्ञायेत । धातुकृतोऽर्थो धात्वर्थ इति । कः पुनर्धातुकृतोऽर्थः । साधनम् । किं प्रयोजनम् । साधनेऽयं भवँल्लिङ्गसंख्याभ्यां योक्ष्यते । उद्वतानि उद्वतः । निगतानि निवत इति ॥

## स्त्रीपुंसाभ्यां वत्युपसंख्यानम् ॥ १ ॥

स्त्रीपुंसाभ्यां वत्युपसंख्यानं कर्तव्यम् । स्त्रीवत् पुंवदिति । किं पुनः कारणं न सिध्यति । इमौ नञ्स्नञौ प्राग्भवनादित्युच्येते तौ विशेषविहितौ सामान्यविहितं वतिं बाधेयाताम् ॥ नैष दोषः । आचार्य-

---

[1] ( सू. ११८ ) येथें अर्थ-ग्रहण कशाकरितां केलें आहे? तें करूं नये. उपसर्गाच्छन्दसि धातौ एवढेंच सूत्र करावें. धातु म्हणजे एक प्रकारचा शब्द होय, आणि जें कार्य शब्दाला संभवत नाहीं तें कार्य त्याच्या अर्थाला केलें जातें. तेव्हां धातौ म्हणण्यानें धात्वर्थ घेतां येईल.

धातूचा अर्थ तो कोणता ?

क्रिया हा धातूचा अर्थ होय.

तर मग ह्या सूत्रातील अर्थग्रहणाचा उपयोग असा कीं, उत्तरपदाचा लोप होऊन सिद्ध झालेला जो धात्वर्थ हा शब्द तो येथें उच्चारला आहे असें समजलें पाहिजे. म्हणजे धातुकृत जो धात्वर्थ असा येथें अर्थ आहे.

धातूनें केलेला अर्थ तो कोणता ?

क्रियेचीं जीं साधनें तो धातूनें केलेला अर्थ होय.

धात्वर्थ याचा इतका अर्थ जो केला त्याचा उपयोग काय ?

क्रियेचें साधन या अर्थी उपसर्गाच्या पुढें हा वति प्रत्यय केला म्हणजे अर्थातच त्या वति प्रत्ययान्ताला लिंग व संख्या यांचा संबंध होईल; आणि 'उद्गतानि' या अर्थी उद्वतः असा, तसाच 'निर्गतानि' या अर्थी निवतः असा वतिप्रत्ययान्त शब्दाला विभक्ति लागून प्रयोग सिद्ध होईल.

( वा. १ ) स्त्री आणि पुंस् या शब्दांहून वति प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—स्त्रीवत्; पुंवत्.

पण असें काय कारण आहे कीं, ज्यामुळें 'तेन तुल्यम्' व 'तत्र तस्येव' या सूत्रांनींच स्त्री व पुंस् या शब्दांहून वति प्रत्यय होणार नाहीं ?

त्याचें कारण असें कीं स्त्री व पुंस् या शब्दांहून हे नञ् व स्नञ् प्रत्यय भवन या अर्थाच्या ( ५।२।१ ) पूर्वींच्या सर्व अर्थी सांगितले आहेत. ( ४।१।८७ ) ते विशेषतः त्या शब्दांहून सांगितले असल्यामुळें सामान्यतः सांगितलेल्या या वति प्रत्ययाचा ते बाध करतील.

हा दोष येत नाहीं. कारण पुंस् शब्दाहून वति प्रत्यय करून साधलेला पुंवत् हा शब्द स्त्रियाः पुंवत्० ( ६।३।३४ ) या सूत्रामध्यें सूत्रकारांनीं ज्या अर्थी उच्चारला आहे त्या-

---

१—( सू. ११८ ) वेदामध्ये उपसर्गाहून 'त्या उपसर्गाच्या अर्थानें युक्त असलेल्या क्रियेचें साधन' या अर्थी वति प्रत्यय होतो. उदा०—उद्वत्: येथे उत् या उपसर्गाचाच उद्गत असा अर्थ घेऊन स्वार्थी वत् प्रत्यय होतो असेंही कांहीं लोकांचें म्हणणें आहे. दोन्ही मतां येथे उद्वत् हें अव्यय नव्हे. म्हणून पुढें विभक्ति प्रत्ययाचा लुक् झाला नाहीं.

प्रवृत्तिर्ज्ञापयति न वत्यर्थे नञ्स्नञौ भवत इति यदयं स्त्रियः पुंवदिति निर्देशं करोति। एवमपि स्त्रीवदिति न सिध्यति । योगापेक्षं ज्ञापकम् ॥

## तस्य भावस्त्वतलौ ॥५।१।११९॥

### स्त्रीपुंसाभ्यां त्वतलोरुपसंख्यानम् ॥ १ ॥

स्त्रीपुंसाभ्यां त्वतलोरुपसंख्यानं कर्तव्यम् । स्त्रीभावः स्त्रीत्वम् स्त्रीता । पुंभावः पुंस्त्वम् पुंस्तेति । किं पुनः कारणं न सिध्यति । इमौ नञ्स्नञौ प्राग्भवनादित्युच्येते तौ विशेषविहितौ सामान्यविहितौ त्वतलौ बाधेयाताम् ॥

### वावचनं च ॥ २ ॥

वावचनं च कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । नञ्स्नञावपि यथा स्याताम् । स्त्रीभावः स्त्रैणम् । पुंभावः पौंस्नमिति ॥

### अपवादसमावेशाद्वा सिद्धम् ॥ ३ ॥

अपवादसमावेशाद्वा सिद्धमेतत् । तद्यथा । इमनिच्प्रभृतिभिरपवादैः समावेशो भवति । एवमाभ्यामपि भविष्यति ॥ नैवेश्वर आज्ञापयति नापि धर्मसूत्रकाराः पठन्तीम-निच्प्रभृतिभिरपवादैः समावेशो भवतीति । किं तर्हि । आ च त्वात् [ ५. १.१२० ]

---

वरूनच ते असें सुचवितात कीं वँति प्रत्ययाच्या अर्थी नञ् व स्नञ् हे प्रत्यय होत नाहींत.

तरी पण स्त्रीवत् हा शब्द साधणार नाहीं असा दोष राहतोच.

तसें नाहीं. पुंवत् या निर्देशावरून ' स्त्री-पुंसाभ्याम् ' हें सूत्रच वति प्रत्ययाच्या अर्थी प्रवृत्त होत नाहीं असें ज्ञापक घेतां येईल.

( सू. ११९ वा. १ ) स्त्री आणि पुंस् या शब्दांहून ' त्याचा भाव ' या अर्थी त्व आणि तल् हे प्रत्यय होतात असें उपसंख्यान करावें. उदा०—स्त्रियाः भावः स्त्रीत्वम्; स्त्रीता. पुंसः भावः पुंस्त्वम्, पुंस्ता.

पण असें काय कारण कीं, स्त्री व पुंस् या शब्दांहून त्व व तल् हे प्रत्यय ' तस्य भावः ' या प्रकृत सूत्रानेंच होणार नाहींत ?

त्याचें कारण असें कीं, स्त्री व पुंस् या शब्दांहून हे नञ् व स्नञ् प्रत्यय भवन या अर्थाच्या पूर्वीच्या सर्व अर्थी सांगितले आहेत. ते विशेषतः त्या शब्दांहून सांगितले असल्या-मुळें सामान्यतः सांगितलेल्या या त्व व तल् प्रत्ययांचा बाध करतील.

( वा. २ ) शिवाय हे स्त्री व पुंस् शब्दां-हून सांगितलेले त्व व तल् प्रत्यय विकल्पानें होतात असें सांगावें.

या विकल्पाचा काय उपयोग ?

स्त्रियाः भावः स्त्रैणम्, पुंसः भावः पौंस्नम् असे एकदां नञ् व स्नञ् हे प्रत्ययही झाले पाहिजेत.

( वा. ३ ) अथवा त्व आणि तल् या प्रत्ययांचें उपसंख्यान करावयास नको. कारण या त्व व तल् प्रत्ययांचे अपवाद जे इमनिच् ( ५।१।१२२ ) वगैरे प्रत्यय ते ज्या शब्दां-हून सांगितले आहेत त्या शब्दांहूनही त्व आणि तल् प्रत्यय होतात असा त्यांचा समावेश जर तेथें होतो तर नञ् व स्नञ् या अपवाद प्रत्ययां-बरोबरही समावेश होईलच.

आतां इमनिच् वगैरे अपवाद प्रत्यांबरोबर त्व आणि तल् या प्रत्ययांचा समावेश होतो असा कांहीं ईश्वराचा हुकूम नाहीं व धर्मसूत्र-कारांनींही तसें सांगितलें नाहीं. तर त्या-करितां सूत्रकारानीं ' आ च त्वात् ' असें सूत्रच केलें आहे, तेव्हां त्या यत्नामुळें इमनिच्

---

२—कारण सूत्रकारानीं उच्चारलेल्या पुंवत् या शब्दावरून पुंस् शब्दापुरतीच कल्पना होईल.

१—( सू.११९ ) प्रातिपदिकाहून ' त्याचा भाव' या अर्थी त्व आणि तल् असे प्रत्यय होतात. उदा०—बुद्धिमतः भावः बुद्धिमत्त्वम्; बुद्धिमत्ता. त्वप्रत्ययान्त शब्द नपुंसकलिंगीं चालतो. आणि तल् प्रत्ययान्त शब्द स्त्रीलिंगीं चालतो. तेव्हां तल् प्रत्ययान्ताहून पुढें टाप् प्रत्यय होतो.

इत्येतस्माद्यत्रादिमनिच्प्रभृतिभिरपवादैः समावेशो भवति न चैतावत्राभ्यन्तरौ । एतावप्यत्राभ्यन्तरौ । कथम् । अपवादसदेशा अपवादा भवन्तीति ॥ एतच्चैव न जानीमोऽपवादसदेशा अपवादा भवन्तीति । अपि च कुत एतदेतावप्यत्राभ्यन्तराविति न पुनः पूर्वौ वा स्यातां परौ वा ॥ एवं तर्हि वक्ष्यत्या च त्वादित्यत्र चकारकरणस्य प्रयोजनं नञ्स्नञ्भ्यामपि समावेशो भवतीति ॥

**तस्य भाव इत्यभिप्रायादिष्वतिप्रसङ्गः ॥ ४ ॥**

तस्य भाव इत्यभिप्रायादिष्वतिप्रसङ्गो भवति। इहापि प्राप्नोति । अभिप्रायो देवदत्तस्य मोदकेषु भोजने । ये नो भावास्ते नो भावाः पुत्राः पुत्रैश्चेष्टन्त इति ॥

**सिद्धं तु यस्य गुणस्य भावाद् द्रव्ये शब्दनिवेशस्तदभिधाने त्वतलौ ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । यस्य गुणस्य भावाद् द्रव्ये शब्दनिवेशस्तदभिधाने तस्मिन्गुणे वक्तव्ये प्रत्ययेन भवितव्यं न चाभिप्रायादीनां भावाद् द्रव्ये देवदत्तशब्दो वर्तते ॥

किं पुनर्द्रव्यं के पुनर्गुणाः । शब्दस्पर्श-

---

वगैरे अपवादांबरोबर या त्व आणि तल् प्रत्ययांचा समावेश होतो तो योग्यच आहे. पण तेथें जी त्व प्रत्ययाची ( ५।१।१३६ ) मर्यादा निर्दिष्ट केली आहे त्या मर्यादेंत नञ् व स्नञ् हे प्रत्यय नाहींत.

नञ् व स्नञ् हे प्रत्ययही त्या मर्यादेंत आहेत.

ते हो कसे ?

हे येथे त्व आणि तल् प्रत्यय सांगून पुढें जे इमनिच् ( ५।१।१२२ ) प्रत्ययापासून त्व ( ५।१।१३६ ) प्रत्ययापर्यंत या त्व आणि तल् प्रत्ययांच्या अपवाद प्रत्ययांचें प्रकरण घातलें आहे तेथेंच इतर नञ् व स्नञ् हे अपवादही आहेत, असे समजतां येईल.

त्या अपवाद-प्रकरणांत ते कसे समजतां येतील हेंच आम्हाला कळत नाहीं. शिवाय त्या नञ् व स्नञ् प्रत्ययांची येथें कल्पना केली तरी इमनिच् प्रत्ययाच्या पूर्वी किंवा त्व प्रत्ययाच्या पुढें अशी कल्पना कां होणार नाहीं ? मध्येंच त्यांची कल्पना नियमानें कशी होईल ?

तर मग आतां 'आ च त्वात्' या पुढील सूत्रामध्यें जो 'च' हा शब्द उच्चारला आहे त्याचा उपयोग 'नञ्' व 'स्नञ्' या अपवाद प्रत्ययाबरोबर त्व व तल् या प्रत्ययांचा समावेश होतो असे सांगावयाचा आहे; व त्यानेंच हें साधावें.

( वा. ४ ) 'तस्य भावः' या अर्थी सांगितलेले हे प्रत्यय 'अभिप्राय' या अर्थी होऊं लागतील असा दोष येतो. भोजनामध्यें देवदत्ताचा भाव म्ह. अभिप्राय मोदकाविषयीं आहे तेव्हां अभिप्राय या अर्थी तेथें त्व प्रत्यय होऊं लागेल. 'ये नो भावाः[2] ते नो भावाः पुत्राः पुत्रैश्चेष्टन्ते' असा लोकांमध्यें अभिप्राय या अर्थी भाव शब्दाचा प्रयोग दिसतो.

( वा. ५ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं कोणत्याही द्रव्याला त्यांतील ज्या गुणामुळें जो शब्द लागतो त्या शब्दाहून तो त्याचा गुण या अर्थी हे प्रत्यय होतात. आणि अभिप्रायामुळें कांहीं देवदत्त वगैरे शब्द त्या त्या व्यक्तीला लागणारे नव्हेत.

पण द्रव्य म्हणजे काय व त्यांतील गुण ते कोणते ?

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गन्ध हे

---

२—जो आमचा अभिप्राय आहे तो अभिप्राय कायमच आहे, मुलें हीं मुलांबरोबर खेळणारच, असा या वाक्याचा अर्थ आहे.

रूपरसगन्धा गुणास्ततोऽन्यद् द्रव्यम् ॥ किं पुनरन्यच्छब्दादिभ्यो द्रव्यमाहोस्विदनन्यत्। गुणस्यायं भावाद् द्रव्ये शब्दनिवेशं कुर्वन् ख्यापयत्यन्यच्छब्दादिभ्यो द्रव्यमिति ॥ अनन्यच्छब्दादिभ्यो द्रव्यं न ह्यन्यदुपलभ्यते। पशोः खल्वपि विशसितस्य पर्णशते न्यस्तस्य नान्यच्छब्दादिभ्य उपलभ्यते ॥ अन्यच्छब्दादिभ्यो द्रव्यं तत्त्वनुमानगम्यम्। तद्यथा। ओषधिवनस्पतीनां वृद्धिह्रासौ। ज्योतिषां गतिरिति। को ऽसावनुमानः इह समाने वर्ष्मणि परिणाहे चान्यत्तुलाग्रं भवति लोहस्यान्यत्कार्पासानां यत्कृतो विशेषस्तद् द्रव्यम्। तथा कश्चित् स्पृशन्नेव च्छिनत्ति कश्चिल्लम्बमानोऽपि न च्छिनत्ति यत्कृतो विशेषस्तद् द्रव्यम्। तथा कश्चिदेकेनैव प्रहारेण व्यपवर्गं करोति कश्चिद् द्वाभ्यामपि न करोति यत्कृतो विशेषस्तद् द्रव्यम् ॥ अथवा यस्य गुणान्तरेष्वपि

---

गुण होत. आणि त्यांशिवाय निराळें जें काय असतें तें द्रव्य होय.

पण काय हो, शब्द वगैरे गुणापेक्षां द्रव्य म्हणून कांहीं वस्तु निराळी आहे किंवा नाहीं?

गुणाच्या अस्तित्वामुळें द्रव्याला तो तो शब्द लागतो यावरूनच गुणापेक्षा द्रव्य म्हणून कांहीं निराळें आहे हें सिद्ध होतें.

तसें जरी आहे तरी पण शब्द स्पर्श वगैरे गुणांपेक्षा द्रव्य निराळें नाहीं. कारण, त्या गुणापेक्षा निराळें असें कांहीच उपलब्ध होत नाहीं.[3] असे पहा कीं एखादा पशु मारल्यानंतर त्याचे शेकडो अवयव निरनिराळे करून निरनिराळ्या शेकडों पानावर ठेविले तरी तेथें शब्द स्पर्श रूप वगैरेंपेक्षां निराळें कांहींच दिसत नाहीं.

तरी पण शब्द वगैरे गुणापेक्षा निराळें द्रव्य आहे आणि तें अनुमान-प्रमाणानें सिद्ध होतें. उदा०–ओषधि वनस्पति इत्यादिकांच्या स्वरूपांत बदल झालेला पाहून त्यावरून वृद्धि व ऱ्हास यांचें अनुमान होतें. तसेंच सूर्य चंद्र वगैरे पूर्वेकडे उगवल्यानंतर पश्चिमेकडे गेलेले पाहून त्यावरून त्यांच्या गतीचें अनुमान होतें. तसेंच येथें समजावें.

येथें अनुमान प्रमाण लागू पडण्यासारखा हेतु कोणता?

असे पहा कीं लोखंड आणि कापूस हे दोन पदार्थ उंचीनें व विस्तारानें सारख्या आकाराचे असे घेऊन तागडींत दोन बाजूला दोन ठेविले असता एकीकडचें तागडीचें टोक किती तरी वर जातें आणि दुसरीकडचें किती तरी खालीं जातें. हा फरक ज्यामुळें होतो त्यावरून द्रव्याचें अनुमान करावें. तसेंच, तलवार वगैरे एखादा पदार्थ दुसऱ्या वस्तूला स्पर्श करीतच तिचे तुकडे करून टाकतो; आणि दोरी वगैरे पदार्थ दुसऱ्या वस्तूला घट्ट धरून लोंबकळला तरी त्या वस्तूला कापूं शकत नाहीं. हा फरक ज्यामुळें होतो त्यावरूनच द्रव्याचें अनुमान होतें. तसेंच कुऱ्हाड वगैरे एखादा पदार्थ एका घावाबरोबर दुसऱ्या वस्तूचे दोन तुकडे करतो, आणि पहार वगैरे पदार्थ दोन घावांनींही तुकडे करूं शकत नाहींत. हा फरक ज्यामुळें होतो त्यावरूनच द्रव्याचें अनुमान होतें. अथवा, ज्या कांहीं पदार्थांमध्यें निरनिराळे गुण उत्पन्न होत असूनही तत्त्वाचा विघात होत नाहीं तो पदार्थच द्रव्य होय.

---

३—घट, पट वगैरे पदार्थ दिसतात असें जे आपणाला वाटतें तेथें त्याचे रूप दिसतें. तसेच रस वगैरे गुणही उपलब्ध होतात, पण कोणत्याही इन्द्रियानें त्या गुणापेक्षां निराळ्या द्रव्याची उपलब्धि होत नाहीं.

४—गुरुत्व या गुणामुळें हा फरक होतो. आणि गुण तर द्रव्यांवाचून अन्यत्र कोठेंहीं नसतात. तेव्हां गुरुत्वावरून त्याच्या आश्रय–द्रव्याचें अनुमान होतें.

५—तेव्हां त्या विशेष प्रकारच्या छेदन क्रियेवरून त्या छेदन क्रियेचा आश्रय अशा द्रव्याचें अनुमान होतें.

प्रादुर्भवत्सु तत्त्वं न विहन्यते तद् द्रव्यम्। किं पुनस्तत्त्वम् । तद्भावस्तत्त्वम् । तद्यथा। आमलकादीनां फलानां रक्तादयः पीतादयश्च गुणाः प्रादुर्भवन्त्यामलकं बदरमित्येव भवति ॥ अन्वर्थं खल्वपि निर्वचनम् । गुणसंद्रावो द्रव्यमिति ॥

यदि तर्हि षष्ठीसमर्थाद् गुणे प्रत्यया उत्पद्यन्ते किमियता सूत्रेण । एतावद्वक्तव्यं षष्ठीसमर्थाद्गुण इति ॥ षष्ठीसमर्थाद्गुण इतीयत्युच्यमाने द्विगुणा रज्जुः त्रिगुणा रज्जुः अत्रापि प्राप्नोति ॥ नैष दोषः । गुणशब्दोऽयं बह्वर्थः । अस्त्येव समेष्ववयवेषु वर्तते । तद्यथा । द्विगुणा रज्जुः त्रिगुणा रज्जुरिति । अस्ति द्रव्यपदार्थकः। तद्यथा। गुणवानयं देश इत्युच्यते यस्मिन्गावः सस्यानि च वर्तन्ते । अस्त्यप्राधान्ये वर्तते । तद्यथा । यो यत्राप्रधानं भवति स आह गुणभूता वयमत्रेति । अस्त्याचारे वर्तते । तद्यथा । गुणवानयं ब्राह्मण इत्युच्यते यः सम्यगाचारं करोति । अस्ति संस्कारे वर्तते । तद्यथा । संस्कृतमन्नं गुणवदित्युच्यते ॥ अथवा सर्वत्रैवायं गुणशब्दः समेष्ववयवेषु वर्तते । तद्यथा । द्विगुणमध्ययनं त्रिगुणमध्यय-

---

पण तत्त्व म्हणजे काय बरें ?

त्याचा भाव हेंच तत्त्व होय. म्हणजे गुण फिरले तरी जें कायम राहतें ते तत्त्व होय. उदा०—आंवळा बोर वगैरे फळांना तांबडा रंग पिवळा रंग वगैरे निरनिराळे गुण दिसूं लागले तरी आंवळा तो आंवळाच, व बोर ते बोरच; त्यांत कांहीं फरक होत नाहीं. शिवाय 'द्रव्य' या अन्वर्थ नांवावरूनही गुणापेक्षा द्रव्य निराळें सिद्ध होतें. गुणाचा जो संद्राव म्हणजे आश्रय तें द्रव्य[६] होय.

तर मग अभिप्राय या अर्थी प्रत्यय न होतां 'त्याचा गुण' म्हणजे धर्म या अर्थी प्रत्यय होणार तर त्याकरितां 'यस्य गुणस्य०' (वा. ५) एवढें मोठें सूत्र करावयास नको, तर षष्ठ्यन्ताहून त्याचे गुण या अर्थी प्रत्यय होतात असें सांगणारे 'षष्ठीसमर्थाद् गुणे' एवढेंच सूत्र करावें.

पण 'षष्ठीसमर्थाद् गुणे' असें म्हटलें तर द्विगुणा रज्जुः त्रिगुणा रज्जुः येथेंही गुण या अर्थी प्रत्यय होऊं लागतील. कारण गुण ह्या शब्दाचे अर्थ पुष्कळ आहेत. सारखे अवयव हा गुण शब्दाचा अर्थ आहे. उदा०—द्विगुणा रज्जुः त्रिगुणा रज्जुः. द्रव्य वगैरे पदार्थ हाही गुण शब्दाचा अर्थ आहे. उदा०—ज्या देशामध्यें गाई धान्य वगैरे पदार्थ पुष्कळ आहेत त्या देशाला 'हा गुणवान् देश आहे' असें म्हटलें जातें. तसेंच अप्रधान हाही गुण शब्दाचा अर्थ आहे. उदा०—जो ज्या ठिकाणीं मुख्य नसतो तो तेथें असें म्हणत असतो कीं आम्ही येथें गुणभूत आहोंत. तसेंच, आचार हाही गुणशब्दाचा अर्थ आहे. उदा०—आचारसंपन्न ब्राह्मणाला गुणवान् आहे असें म्हणतात. त्याप्रमाणें संस्कार हाही गुणशब्दाचा अर्थ आहे. उदा० —ज्या अन्नाला चांगला संस्कार झाला आहे त्या अन्नाला 'हें अन्न गुणवत् आहे' असें म्हणतात. अथवा या सर्व ठिकाणी गुण शब्दाचा अर्थ सारखे अवयव हा एकच आहे. उदा० संहिता ग्रन्थाचेच भिन्न भिन्न पदें हे जे अव-

---

६—द्रूयते आश्रीयते इति द्रव्यम्. गुण, क्रिया वगैरेंनीं आपल्याला थारा म्हणून जें स्वीकारलें जातें तें द्रव्य होय. द्रु धातूहून यत् प्रत्यय (३।१।९७) झाला आहे. 'द्रव्यं गुणाश्रये' (अमरकोश नानार्थ १५४) असा अमरकोश आहे.

७—'तस्य गुणे त्वतलौ' एवढेंच सूत्र करावें असे याचें तात्पर्य आहे.

८—रज्जु शब्दाहून 'तिचे अवयव' या अर्थी प्रत्यय होऊं लागेल असें याचें तात्पर्य आहे. याचे पुढें 'नैष दोषः' असा कांहीं प्रतींमध्यें पाठ आहे; पण तो बरोबर नाहीं. (उद्योत).

नमित्युच्यते । चर्चागुणान्क्रमगुणांश्चापेक्ष्य भवति न संहितागुणांश्चर्चागुणांश्च ॥ यद्येवं गुणवदन्नमिति गुणशब्दो नोपपद्यते न ह्यन्नस्य सूपादयो गुणाः समा भवन्ति । नावश्यं वर्ष्मतः परिमाणत एव वा साम्यं भवति । किं तर्हि । युक्तितोऽपि । आतश्च युक्तितो यो हि मुद्गप्रस्थे लवणप्रस्थं प्रक्षिपेन्नादो युक्तं स्यात् । यदि तावददेरन्नं नादोऽत्तव्यं स्यात् । अथानितेरन्नं नादो जग्ध्वा प्राण्यात् ॥

शुक्लादिषु तर्हि वत्यर्थभावाद्वृत्तिर्न प्राप्नोति। शुक्लत्वम् शुक्लतेति ॥ किं पुनः कारणं

यव त्या रूपानें अध्ययन केले ह्मणजे द्विगुण अध्ययन केलें असें म्हणतात, तसेंच क्रम या अवयव रूपानें अध्ययन केलें ह्मणजे त्रिगुण अध्ययन केलें असें ह्मणतात; परंतु संहिता आणि दुसऱ्या संहितेची पदें अशा असम अवयवांचें अध्ययन असेल तेथें द्विगुण असें ह्मणत नाहींत. तेव्हां सारखे अवयव हा गुण शब्दाचा अर्थ सिद्ध होतो.

पण ' सारखे अवयव ' या अर्थानेंच सर्वत्र गुण शब्द लागतो असें म्हणणें असेल तर 'गुणवत् अन्नम्' येथील गुण शब्द जुळत नाहीं. कारण, वरण भात भाजी भाकरी वगैरे जे अन्नाचे अवयव ते सर्व सारखे नसतात.

पण सारखेपणा हा कांहीं उंची विस्तार आकार यांसारख्या प्रमाणानेंच असला पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. तर योग्यतेनेंही सारखेपणा घेतला जातो. शिवाय, योग्यतेनें सारखेपणा घेण्याचें कारण असें कीं शेरभर मुगाच्या उसळींत शेरभर मीठ घातलें तर तें योग्य अन्न होत नाहीं. आणि अन्न हा शब्द भक्षण करणें या अर्थाच्या अद् धातूपासून साधला आहे ह्मणून जें भक्षण केलें जातें तें अन्न असा अर्थ असेल तर तशा त्या उसळीला अन्न ह्मणतां येणार नाहीं. कारण, तशी उसळ कोणीही खाणार नाहीं. आतां जगणें या अर्थाच्या अन् धातूपासून अन्नशब्द साधला आहे असें गृहीत धरलें तर तशी ती उसळ खाल्ल्यानें कोणी जगतो असेंही नाही. ( एकंदरींत द्विगुणा रज्जुः या अर्थी त्व प्रत्यय न होण्याकरितां ' यस्य गुणस्य भावात् ' ( वा. ५ ) असें मोठें सूत्र केले पाहिजे असें सिद्ध झालें. )

तरी पण शुक्लत्वम् शुक्लता इत्यादि उदाहरणामध्यें शुक्ल वगैरे शब्दांहून त्व वगैरे प्रत्यय होणार नाहींत. कारण ज्याची वृत्ति करावयाची

९—ज्या ग्रंथाचें एकदां अध्ययन केलें त्याचेंच पुनः अध्ययन केले म्हणजे तें द्विगुण होते. किंवा पुनः अध्ययन केलें तें थोड्या फरकाने पण त्याच ग्रंथाचे केले असेल तर तेथेंही द्विगुण म्हटलें जातें

१०—हा प्रदेश गुणवान् आहे, येथेंही गाई धान्यें वगैरे पदार्थांचें योग्यतेनें साम्य आहेच. तसेच, आम्ही येथें गुणभूत आहोंत असे जे अमुख्य लोक म्हणतात तेथेंही त्यांच्या हातात कांहीं सत्ता नसल्यामुळे घर दार वगैरे अचेतन पदार्थांसारखेच आम्ही आहोंत असे त्या म्हणण्याचे तात्पर्य आहे. हा ब्राह्मण गुणवान् आहे येथेंही आचार हा ब्राह्मणत्वासारखा म्ह. योग्य असा असल्यामुळें त्याला गुण म्हटले आहे.

११—तेव्हां अन्न या नात्यानें उपयोग होण्याला त्यांतील जो पदार्थ जितका पाहिजे तितका तो असला म्हणजे त्याला सारखा असें म्हणतां येतें. तेथें प्रमाणानें सारखेपणा नसला तरी हरकत नाही.

१२—अभिप्राय या अर्थी हे प्रत्यय होऊं लागतील असा मूळ सूत्रावर दोष येतो; म्हणून ' यस्य गुणस्य भावात् ' इत्यादि मोठे सूत्र करावे असे ( वा. ५ ) सांगितलं आहे. ' तस्य गुणे त्वतलौ ' असें लहान सूत्र करावें तर द्विगुणा रज्जुः असें असेल तेथें रज्जु शब्दाहून हे प्रत्यय होतील असा दोष येतो. तात्पर्य, ' यस्य गुणस्य भावात् द्रव्ये शब्दनिवेशस्तदभिधाने त्वतलौ ' असे मोठें सूत्र केलें पाहिजे असें सिद्ध झालें. पण तसें केलें तरी दोष येतो. कारण द्रव्यवाचक शब्दाहून प्रत्यय सांगितल्यामुळें द्रव्यवाचक शब्दाची वृत्ति होते असें समजतें; आणि शुक्ल वगैरे शब्द तर गुणवाचक आहेत, द्रव्यवाचक नव्हेत असा अभिप्राय आहे.

शुक्लादय एवोदाह्रियन्ते न पुनर्वृक्षादयोऽपि । वृक्षत्वम् वृक्षतेति । अस्त्यत्र विशेषः । उभयवचना ह्येते द्रव्यं चाहुर्गुणं च यतो द्रव्यवचनास्ततो वृत्तिर्भविष्यति ॥ इमेऽपि तर्ह्युभयवचनाः । कथम् । आरभ्यते मतुब्लोपो गुणवचनेभ्यो मतुपो लुग्भवतीति । यतो द्रव्यवचनास्ततो वृत्तिर्भविष्यति ॥ डित्थादिषु तर्हि वर्त्यभावाद्वृत्तिर्न प्राप्नोति । डित्थत्वम् डित्थता डाम्भिट्टत्वामिति । अत्रापि कश्चित्प्राथमकल्पिको डित्थो डाम्भिट्टश्च तेन कृतां क्रियां गुणं वा यः कश्चित्करोति स उच्यते डित्थत्व त एतड्डाम्भिट्टत्वं त एतत् । एवं डित्थाः कुर्वन्ति एवं डाम्भिट्टाः कुर्वन्ति ॥ यस्तर्हि प्राथमकल्पिको डित्थो डाम्भिट्टश्च तस्य वर्त्यभावाद्वृत्तिर्न प्राप्नोति । नैष दोषः । यथैव

---

तोच तेथें नसल्यामुळें वृत्ति होणार नाहीं.

पण हा दोष शुक्ल वगैरेंसंबंधानें येथें काय म्हणून दाखवितां ? वृक्षत्व व वृक्षता येथें का दोष दाखवीत नाहीं.

तेथें दोष दाखविला नाहीं याचें विशेष कारण आहे. तें असें कीं—अनेक धर्मांनीं युक्त धर्मी अशा अर्थाचे वृक्ष वगैरे शब्द असल्यामुळें ते उभयवाचक आहेत म्हणजे द्रव्यवाचकही आहेत आणि गुणवाचकही आहेत. तेव्हां वृक्ष वगैरे शब्द द्रव्यवाचक घेऊन त्यांची वृत्ति होईल.

तर मग शुक्ल वगैरे शब्दही उभयवाचक आहेत असें म्हणतां येतें.

तें कसें ?

असें कीं गुणवचनेभ्यो मतुपो लुक् (५।२।९४ वा. ३) या वचनाने शुक्ल वगैरे शब्दांहून 'तो गुण आहे ज्याचा असें द्रव्य' या अर्थीं केलेल्या मतुप् प्रत्ययाचा लुक् सांगितला आहे. तेव्हां तो लुक् केल्यानंतर शुक्ल वगैरे शब्द द्रव्यवाचक होतात. तेव्हा त्याहून त्व प्रत्यय होऊन वृत्ति होईल.

तर मग डित्थ वगैरे संज्ञा[13]-शब्दांमध्ये ज्याची वृत्ति करावयाची तो नसल्यामुळें वृत्ति होणार नाहीं. उदा०—डित्थत्वम्; डित्थता. डाम्भिट्टत्वम् डाम्भिट्टता.

तेथें देखील ह्या डित्थ व डाम्भिट्ट यांच्या पूर्वीं दुसरा कोणी तरी डित्थ व डाम्भिट्ट असतो. त्याच्यासारखाच हा आहे असें पाहून ह्याला त्या संज्ञा केल्या जातात[14]. त्या पूर्वीच्या डित्थानें जी कांहीं क्रिया केली असेल किंवा त्यापूर्वींच्या डित्थाच्या अंगीं जो कांहीं गुण असेल ती क्रिया करणारा किंवा त्या गुणाचा जो दृष्टीस पडेल त्याला लोक असें म्हणतात कीं हे तुझें डित्थत्व (डित्थपणा) आहे, हें तुझें डाम्भिट्टत्व आहे; डित्थ व डाम्भिट्ट असेंच करतात.

तर मग आता अगदीं पूर्वीचा जो डित्थ किंवा डाम्भिट्ट असेल तेथें ज्याची[15] वृत्ति करावयाची तसा तो शब्द नसल्यामुळें वृत्ति होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण तेथेही प्रथमतः तें नांव ठेवणाऱ्यानें त्याची जी क्रिया पाहून किंवा त्याचा जो गुण पाहून तें नाव ठेविलें तेथें

---

१३—द्रव्यांतील एखाद्या गुणामुळें द्रव्याला लागणारा शब्द असेल तर त्याची वृत्ति होणार म्हणजे त्याहून हे प्रत्यय होणार. कारण 'यस्य गुणस्य भावात्०' (वा. ५) यानें तसेच सांगितलें आहे. आणि डित्थ व डाम्भिट्ट हीं तर कांहीं तरी नांवें ठेविलीं आहेत.

१४—तेव्हां त्या क्रिया किंवा गुण या धर्मांमुळेंच डित्थ वगैरे संज्ञा-शब्द हे त्या द्रव्याला (मनुष्याला) लागतात. तेव्हां 'यस्य गुणस्य०' (वा. ५) यानेंच त्व व तल् प्रत्यय होतील.

१५—जो गुणवाचक शब्द गुणाच्या संबंधामुळें गुणी अशा द्रव्याला लागतो तशा शब्दाची.

कार्थंचित्कःप्रयोग एवं वृत्तिरपि भविष्यति॥

**यदा सर्वे भावाः स्वेन भावेन भवन्ति स तेषां भावस्तदभिधाने ॥ ६ ॥**

किमेभिस्त्रिभिर्भावग्रहणैः क्रियते। एकेन शब्दः प्रतिनिर्दिश्यते द्वाभ्यामर्थः। यद्वा सर्वे शब्दाः स्वेनार्थेन भवन्ति स तेषामर्थ इति। तदभिधाने वा त्वतलौ भवत इति वक्तव्यम्॥ नैवमन्यत्र भवति न हि तेन रक्तं रागात् [४. २. १] इत्यत्र शब्देन रक्ते प्रत्यया उत्पद्यन्ते। शब्देऽसंभवादर्थेन रक्ते प्रत्यया भविष्यन्ति॥ तत्तर्ह्यन्यतरत्कर्तव्यम्। सूत्रं च भिद्यते॥ यथान्यासमेवास्तु। ननु चोक्तं तस्य भाव इत्यभिप्रायादिष्वतिप्रसङ्ग इति।

**उक्तं वा ॥ ७ ॥**

किमुक्तम् अनभिधानादिति। अनभिधानादभिप्रायादिषूत्पत्तिर्न भविष्यति॥

**त्वतल्भ्यां नञ्समासः पूर्वविप्रतिषिद्धं त्वतलोः स्वरसिद्ध्यर्थम् ॥ ८ ॥**

त्वतल्भ्यां नञ्समासो भवति पूर्वविप्र-

---

त्यानें त्या क्रियेचा किंवा गुणाचा जो त्या नांवाशीं काहीं तरी विशिष्ट संबंध कल्पून तें नांव ठेविले असेल तोच विशिष्ट संबंध घेऊन वृत्तीही होईल.

( वा. ६ ) अथवा ' सर्वे भावाः स्वेन भावेन भवन्ति स तेषा भावस्तदभिधाने ' असें सूत्र करावें.

ह्या सूत्रामध्यें भाव शब्द तीन वेळां घालून काय बरें केलें आहे?

सर्वे भावाः ह्या प्रथम भाव शब्दानें ज्याहून प्रत्यय करावयाचा त्या शब्दाचाच निर्देश केला आहे. आणि पुढील दोन भाव शब्दांनीं त्याच्या अर्थाचा निर्देश केलेला आहे. अथवा भाव शब्द काढून ' सर्वे शब्दाः स्वेनार्थेन भवन्ति स तेषामर्थः ' असें म्हणून त्याच [१६]अर्थीं त्व व तल् प्रत्यय होतात असें सांगावें.

इतर ठिकाणीं सांगितलेले प्रत्यय असे होत नाहींत. असें पहा कीं तेन रक्तं रागात् (४।२।१) येथें शब्दानें रंगविलेलें या अर्थीं प्रत्यय होत नाहींत. रंगविणें हें काम लाक्षा वगैरे शब्दानें होत नाहीं असा असंभव असल्यामुळें त्या लाक्षा वगैरे शब्दांच्या अर्थानें रंगविलेलें या अर्थीं प्रत्यय होतील[१७].

तर मग आतां ' यस्य गुणस्य ' (वा. ५) किंवा ' सर्वे भावाः ' ( वा. ६ ) या दोहोंपैकीं कांहीं तरी म्हटलें पाहिजे असें दिसतें.

पण सूत्र फिरवावें लागतें ना ?

तर मग मूळचे सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण 'तस्य भावस्त्वतलौ ' असें मूळचे सूत्र ठेवलें तर अभिप्राय या अर्थीं हे प्रत्यय होऊं लागतील ( वा. ४ ) असा दोष येतो ना ?

( वा. ७ ) अथवा हें मागें सांगितलें आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

अनभिधानात् ( ३।२।१ वा. ५ ) असें मागें सांगितलेंच आहे. तेव्हा अनभिधानामुळें अभिप्राय या अर्थीं त्व व तल् हे प्रत्यय होणार नाहींत.

( वा. ८ ) त्व व तल् या प्रत्ययांपेक्षा नञ्तत्पुरुष समास पूर्व-विप्रतिषेधानें अगोदरच होतो असें म्हणावें.

या पूर्वविप्रतिषेधाचा उपयोग काय ?

---

१६—ज्या शब्दाहून त्व व तल् हे प्रत्यय करावयाचे त्याचा म्हणजे त्या शब्दाचा अर्थ या अर्थीं.

१७—तेव्हां तस्य अपत्यम्, तेन रक्तम् वगैरे इतर ठिकाणीं तत् शब्दानें नाइलाजास्तव प्रकृतिभूत शब्द न घेतां त्याचा अर्थ घेतला तें बरोबरच आहे. पण येथें तत् शब्दानें प्रकृतिभूत शब्द घेतां येतो तर तोच येथें घेणें बरोबर होणार आहे.

तिषेधेन। किं प्रयोजनम्। त्वतलोः स्वरसिद्ध्यर्थम्। त्वतलोः स्वरसिद्धिर्यथा स्यात्। त्वतलोरवकाशः। भावस्य वचनं प्रतिषेधस्यावचनम्। ब्राह्मणत्वम् ब्राह्मणता। नञ्समासस्यावकाशः। प्रतिषेधस्य वचनं भावस्यावचनम्। अब्राह्मणः अवृषलः। उभयवचन उभयं प्राप्नोति। अब्राह्मणत्वम् अब्राह्मणता। नञ्समासो भवति पूर्वविप्रतिषेधेन॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। नात्र त्वतलौ प्राप्नुतः। किं कारणम्। असामर्थ्यात्। कथमसामर्थ्यम्। सापेक्षमसमर्थं भवतीति। यावता ब्राह्मणशब्दः प्रतिषेधमपेक्षते॥ नञ्समासोऽपि तर्हि न प्राप्नोति। किं कारणम्। असामर्थ्यादेव। कथमसामर्थ्यम्। सापेक्षमसमर्थं भवतीति। यावता ब्राह्मणशब्दो भावमपेक्षते॥ प्रधानमत्र तदा ब्राह्मणशब्दो भवति च प्रधानस्य सापेक्ष-

---

अब्राह्मणत्वम् व अब्राह्मणता येथें त्व व तल् या प्रत्ययांमुळें होणारा स्वर कायम राहिला पाहिजे हा त्याचा उपयोग होय. ज्या ठिकाणीं भाव हा अर्थ दाखवावयाचा आहे आणि नञर्थाशीं संबंध करावयाचा नाहीं तेथें त्व व तल् या प्रत्ययांना अवकाश आहे. उदा०— ब्राह्मणस्य भावः ब्राह्मणत्वम्, ब्राह्मणता. तसेंच, त्याच्या उलट ज्या ठिकाणीं भाव हा अर्थ दाखवावयाचा नाहीं आणि नञर्थाशीं संबंध दाखवावयाचा आहे तेथें नञ्तत्पुरुषाला अवकाश आहे. उदा०—न ब्राह्मणः अब्राह्मण; न वृषलः अवृषलः; आणि ज्या ठिकाणीं भाव हा अर्थ व नञर्थाशीं संबंध हे दोन्ही दाखवावयाचे आहेत त्या ठिकाणीं दोघांची प्राप्ति येते. उदा० न ब्राह्मणस्य भावः अब्राह्मणत्वम्, अब्राह्मणता, तेव्हां येथें त्व व तल् या प्रत्ययापेक्षां नञ्तत्पुरुष पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतो.

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण ज्या ठिकाणीं नञर्थाशीं संबंध असतो तेथें त्व, व तल् या प्रत्ययांची प्राप्तीच येत नाहीं.

काय कारण ?

कारण असे कीं तेथें सामर्थ्यच नाहीं.

सामर्थ्यच नाही याचें तरी कारण काय ?

सापेक्ष असेल तें असमर्थ समजावें. आणि येथ ब्राह्मण शब्दाला नञर्थाची अपेक्षा[१९] आहे.

तर मग जसा ताद्धित प्रत्यय प्राप्त होत नाहीं तसा येथें नञ् तत्पुरुषही प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं सामर्थ्यच नाहीं.

येथें सामर्थ्य कां बरें नाहीं ?

सापेक्ष असेल तें असमर्थ समजलें जातें ना ? आणि येथे तर ब्राह्मण शब्द हा सापेक्ष आहे. कारण, भाव या अर्थाकडे त्याचा संबंध झाला आहे.

पण अब्राह्मण या तत्पुरुषामध्यें ब्राह्मण शब्दाला प्राधान्य आहे, आणि जो अर्थ

---

१८—अब्राह्मण असा नञ् तत्पुरुष अगोदर झाला म्हणजे जरी त्यातील पहिला अकार पूर्वपदप्रकृतिस्वरानें ( ६।२।२ ) उदात्त झाला तरी मागून होणारा स्वर प्रबल असल्यामुळे त्व प्रत्यय केल्यानतर त्यांतील अकार प्रत्ययस्वरानें ( ३।१।३ ) उदात्त होऊन बाकीचे मागील सर्व स्वर अनुदात्त ( ६।१।१५८ ) होऊन अब्राह्मणत्वम् असें अन्तोदात्त पद होते. तल् प्रत्यय केला म्हणजे प्रत्ययाच्या पूर्वीचा अकार उदात्त ( ६।१।१९३ ) होऊन अब्राह्मणता असें मध्योदात्त पद होतें. परंतु जर अगोदर त्व व तल् हे प्रत्यय केले व मागून समास केला तर तो समासामुळें मागून होणारा प्रकृतिस्वर प्रबल होऊन पहिलाच अकार उदात्त कायम राहू लागेल असा दोष येतो.

१९—ब्राह्मणाकडे नञाचा संबंध असल्यामुळें तो बाजूला सारून नुसत्या ब्राह्मणाचा भाव या अर्थाकडे संबंध करतां येत नाहीं.

स्यापि समासः ॥ इदं तर्हि प्रयोजनम्। नञ्समासादन्यो भाववचनः स्वरोत्तरपदवृद्ध्यर्थमिति वक्ष्यति तत्र व्यवस्थार्थमिदं वक्तव्यम् ॥

## वा छन्दसि ॥ ९ ॥

वा छन्दसि नञ्समासो वक्तव्यः । निर्वीर्यतां वै यजमान आशास्ते अपशुताम्। अयोनित्वाय । अशिथिलत्वाय । अगोतामनपत्यताम् ॥ भवेदिदं युक्तमुदाहारणम् अयोनित्वाय अशिथिलत्वायेति । इदं त्वयुक्तम् अपशुतामिति न ह्यसौ समासभावमाशास्ते । किं तर्हि । उत्तरपदाभावमाशास्ते । न पशोर्भाव इति ॥

## नञ्समासादन्यो भाववचनः स्वरोत्तरपदवृद्ध्यर्थम् ॥ १० ॥

नञ्समासादन्यो भाववचनो भवति विप्रतिषेधेन । किं प्रयोजनम् । स्वरोत्तरपदवृद्ध्यर्थम् । स्वरार्थमुत्तरपदवृद्ध्यर्थं च ।

---

प्रधान असेल तो जरी अप्रधानामुळें सापेक्ष असला तरी त्याची इतराबरोबर समास वगैरे वृत्ति होते.[२०]

तर मग आतां या पूर्व–विप्रतिषेधाचा उपयोग असा कीं ' नञ्समासादन्यो भाववचनः स्वरोत्तरपदवृद्ध्यर्थम् '( वा. १० ) असें पुढें सांगावयाचें आहे. तेव्हां तेथें व्यवस्था होण्याकरितां हें वार्तिक सांगितलें पाहिजे.[२१]

( वा. ९ ) त्व व तल् या प्रत्ययांपेक्षां नञ्तत्पुरुष पूर्वी होतो हा नियम वेदामध्यें वैकल्पिक समजावा[२२]. उदा०– निर्वीर्यतां वै यजमान आशास्ते अपशुताम्; अयोनित्वाय; अशिथिलत्वाय अगोताम्; अनपत्यताम्.

येथें अयोनित्वाय, व अशिथिलत्वाय हीं उदाहरणें बरोबर आहेत. परंतु अपशुताम् हें उदाहरण मात्र बरोबर नाही. कारण येथें संशयच येत नाहीं. येथें अपशु या समासाहून भाव प्रत्यय करून जो अर्थ पशुभिन्नपणा असा होतो त्याची कांहीं तो इच्छा करीत नाहीं तर उत्तरपदाचा अभाव म्हणजे पशुत्व नको अशीच त्याची इच्छा असते.

( वा. १० ) त्व व तल् या प्रत्ययांहून निराळे जे इमनिच् वगैरे पुढील भाववाचक प्रत्यय ते नञ्-तत्पुरुषापेक्षां परत्वास्तव अगोदर होतात.

याचा काय उपयोग ?

स्वराकरिता आणि उत्तरपदाला होणाऱ्या वृद्धीकरिता त्याचा उपयोग होतो. त्यापैकीं

---

२०—ब्राह्मणाकडे नञर्थाचा संबंध असला तरी ' त्याचा भाव ' या अर्थी तद्धित वृत्ति करण्यास हरकत नाहीं.

२१—त्या वार्तिकामध्यें अन्य शब्द उच्चारला आहे. तो अन्य कोणापेक्षा हे समजण्याकरिता म्हणजे त्व व तल् या दोन प्रत्ययांपेक्षांच पूर्वविप्रतिषेधानें नञ्-तत्पुरुष होतो, बाकीचे इमनिच् वगैरे पुढील प्रत्यय नञ्–तत्पुरुषापेक्षा परत्वास्तव होतात. ह्या व्यवस्थेकरिता ज्या ठिकाणीं कोणत्याही पदार्थाचा नञर्थाशीं संबंध आणि भाव या अर्थाशीं संबंध असे दोन्ही संबंध विवक्षित असतात तेथें त्या दोहोंमध्यें जसा क्रम विवक्षित असेल त्याप्रमाणें अगोदर समास किंवा तद्धित प्रत्यय हे ठरलेच. पणज्या ठिकाणीं दोन्ही संबंधाची बरोबर विवक्षा असेल तेथें कोठें कोण पूर्वी करावा ही व्यवस्था येथें ठरविली आहे.

२२—त्व आणि तल् या प्रत्ययाचा स्वर झाला असेल तर अगोदर नञ्-तत्पुरुष करावा, आणि पूर्वपदाचा प्रकृति-स्वर दिसेल किंवा नञ्-स्वर ( ६।२।१७२ ) दिसेल तर अगोदर त्व व तल् हे प्रत्यय करावे.

स्वरार्थं तावत् । अप्रथिमा अम्रदिमा । उत्तरपदवृद्ध्यर्थम् । अशौक्लयम् अकाण्र्ण्यम् ॥

**आ च त्वात् ॥ ५ । १ । १२० ॥**

किमर्थश्चकारः । अनुकर्षणार्थः । त्वतलावनुकृष्येते । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृतौ त्वतलावनुवर्तिष्येते ॥ अत उत्तरं पठति ॥

**आ च त्वादिति चकारकरणमपवादसमावेशार्थम् ॥ १ ॥**

आ च त्वादिति चकारकरणं क्रियतेऽपवादसमावेशार्थम् । इमनिच्प्रभृतिभिरपवादैः समावेशो यथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । आ त्वादित्येवेमनिच्प्रभृतिभिरपवादैः समावेशो भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनमा त्वाद्याः प्रकृतयस्ताभ्यश्च त्वतलौ यथा स्यातां यतश्चोच्येते । एतदपि नास्ति प्रयोजनम् । आ त्वादित्येवा त्वाद्याः प्रकृतयस्ताभ्यस्त्वतलौ भविष्यतो यतश्चोच्येते ॥ इदं तर्हि प्रयोजनमा त्वाद्येऽर्थास्तत्र त्वतलौ यथा स्यातां यत्र

अप्रथिमा[23] व अम्रदिमा येथें स्वराकरिता उपयोग होतो आणि अशौक्लयम व अकाण्र्ण्यम् येथें उत्तरपदवृद्धीकरिता उपयोग होतो.

( सू. १२० ) या सूत्रामध्यें च हा शब्द कशाकरितां घातला आहे?

अनुवृत्तीकरितां घातला आहे. मागून त्व व तल् या प्रत्ययाची येथें अनुवृत्ती येत आहे.

हा च या शब्दाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण च शब्द नसला तरी पूर्व सूत्रांतून त्व व तल् या प्रत्ययाची अनुवृत्ति तेथें येईलच; हें मनात धरून वार्तिककार सागतात.

( वा. १ ) आ च त्वात् या सूत्रामध्ये जो च हा शब्द घातला आहे तो त्व व तल् या प्रत्ययाचे अपवाद जे इमनिच् वगैरे प्रत्यय त्यांच्या उदाहरणांमध्यें एकदा त्व व तल् हेही प्रत्यय झाले पाहिजेत याकरितां घातला आहे.

च या शब्दाचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण ' आ त्वात् ' एवढेंच सूत्र केलें तरी इमनिच् वगैरे अपवाद प्रत्ययांबरोबर त्व व तल् या प्रत्ययांचा समावेश होईल.

तर मग च या शब्दाचा उपयोग असा कीं त्व प्रत्ययापर्यंत जे इमनिच् वगैरे प्रत्यय ते ज्या ज्या शब्दाहून सांगितले आहेत त्या त्या शब्दाहून हे त्व व तल् प्रत्यय झाले पाहिजेतच, पण आरंभीं जे प्रत्यय सामान्यतः म्हणजे वाटेल त्या शब्दाहून सांगितले आहेत त्या शब्दाहूनही हे प्रत्यय झाले पाहिजेत.

हाही या च शब्दाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण ' आ त्वात् ' असें म्हटलें तरी तेवढ्यानेंही इमनिच् वगैरे त्व प्रत्ययापर्यंत सांगितलेले प्रत्यय ज्या ज्या शब्दाहून सांगितले आहेत त्या त्या शब्दांहूनही हे त्व व तल् प्रत्यय होतील; आणि सामान्यतः सांगितले आहेत तसेही होतील.

तर मग आतां च शब्दाचा उपयोग असा कीं, त्व प्रत्ययापर्यंत मध्ये जो कर्म या अर्थी ष्यञ् प्रत्यय सांगितला आहे त्या अर्थींही हे त्व व तल् प्रत्यय त्या त्या शब्दाहून झाले पाहिजेत आणि जे भाव या अर्थी सांगितले आहेत

२३—येथे पूर्वपदप्रकृतिस्वर (६।२।२) इष्ट आहे समास करून इमनिच् प्रत्यय केला असता तर ' चित ' (६।१।१६३ ) यानें अन्त उदात्त झाला असता. तसेंच, अशौक्ल्यम् येथे समास करून ष्यञ् प्रत्यय ( ५।१।१२३ ) केला तर त्यातील जे उत्तरपद शुक्ल शब्द त्याच्या उकाराला वृद्धि झाली नसती.

१–( सू. १२० ) त्व प्रत्यया-( ५।१।१३६ ) पर्यंत प्रत्येक सूत्रामध्ये त्व व तल् या प्रत्ययाचा संबंध होतो. उदा०—प्रथिमा, पृथुत्वम् , पृथुता. नाहीं तर इमनिच् प्रत्ययानें या त्व व तल् प्रत्ययाचा बाध झाला असता.

चोच्येते । एतदपि नास्ति प्रयोजनम् । आ त्वादित्येवा त्वाद्येऽर्थास्तत्र त्वतलौ भविष्यतो यत्र चोच्येते ॥ इदं तर्हि प्रयोजनमा त्वाद्याः प्रकृतयस्ताभ्यश्च त्वतलौ यथा स्यातां यस्याश्च प्रकृतेरेतस्मिन्विशेषे ऽन्यः प्रत्यय उत्पद्यते । किं कृतं भवति । स्त्रीपुंसाभ्यां त्वतलोरुपसंख्यानं चोदितं तन्न वक्तव्यं भवति ॥

**न नञ्पूर्वात्तत्पुरुषादचतुरसंगतलवणवटबुधकतरसलसेभ्यः ॥ ५ । १ । १२१ ॥**

कस्यायं प्रतिषेधः । त्वतलोरित्याह । नैतदस्ति प्रयोजनम् । इष्येते नञ्पूर्वात्तत्पुरुषात् त्वतलौ । अब्राह्मणत्वम् अब्राह्मणतेति ॥ अत उत्तरं पठति ।

**न नञ्पूर्वादित्युत्तरस्य प्रतिषेधः ॥ १ ॥**

न नञ्पूर्वादित्युत्तरस्य भावप्रत्ययस्य प्रतिषेधः क्रियते ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । परिगणिताभ्यः प्रकृतिभ्य उत्तरो भावप्रत्ययो विधीयते न च तत्र काचिन्नञ्पूर्वा प्रकृतिर्गृह्यते । तदन्तविधिना प्राप्नोति ।

---

ते त्या (भाव या) अर्थींही झाले पाहिजेत.

हा देखील च या शब्दाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'आ त्वात्' असें म्हटलें तरी तेवढ्यानें त्व प्रत्ययापर्यंत मध्यें निर्दिष्ट केलेला जो कर्म अर्थ त्या अर्थींही त्या त्या शब्दाहून त्व व तल् प्रत्यय होतील, व आरंभीं जे भाव या अर्थीं सांगितले आहेत ते त्या अर्थींही होतील.

तर मग आतां च या शब्दाचा उपयोग असा समजावा कीं, त्व प्रत्ययापर्यंत सांगितलेले इमनिच् वगैरे अपवाद प्रत्यय ज्या शब्दाहून सांगितले आहेत त्या शब्दाहून तर हे त्व व तल् प्रत्यय झाले पाहिजेतच, शिवाय ज्या शब्दाहून या भाव व कर्म अर्थीं निराळाच प्रत्यय होत असतो तेथेंही त्व व तल् हे प्रत्यय झाले पाहिजेत.

असा या च शब्दाचा उपयोग समजला असतां त्यानें काय साध्य होतें ?

'स्त्रीपुंसाभ्यां त्वतलोरुपसंख्यानम्' (५।१।११९ वा. १) असें जें वचन केलें आहे तें करावयास नको हें साध्य होतें.

(सू. १२१ )या सूत्रानें कोणत्या प्रत्ययाचा निषेध केला आहे ?

त्व व तल् या प्रत्ययांचा निषेध केला आहे असें म्हणतो.

या सूत्राचा हा उपयोग बरोबरा दिसत नाहीं. कारण नञ्–तत्पुरुषाहून त्व व तल् हे प्रत्यय इष्टच आहेत. उदा० अब्राह्मणत्वम् अब्राह्मणता. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतात.

( वा. १ ) न नञ्पूर्वात्० या सूत्रानें भाव या अर्थीं होणाऱ्या पुढील प्रत्ययांचा निषेध केला आहे.

हाही या सूत्राचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, पुढील प्रत्यय हे ठरविलेल्या शब्दांहूनच सांगितले आहेत. आणि त्या शब्दांमध्यें नञ्–तत्पुरुष कोठेंच येत नाहीं.

---

१—स्त्री व पुंस् या शब्दांहून नञ् व स्नञ् हे प्रत्यय भवन या अर्थापर्यंत निर्दिष्ट केलेल्या सर्व अर्थीं सांगितले आहेत, ते भाव व कर्म या अर्थींही होतातच.

१—( सू. १२१ ) या सूत्राच्या पुढें सांगितलेले जे भाव या अर्थीं प्रत्यय ते नञ्-तत्पुरुषाहून होत नाहीत. पण अचतुर, असंगत, अलवण, अवट, अबुध, अकत, अरस आणि अलस या आठ शब्दांना हा निषेध लागू होत नाहीं. उदा०—अपतित्वम् अपातिता. येथें यक् ( ५।१।१२८ ) प्रत्यय होत नाहीं.

ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिः प्रतिषिध्यते । यत्र तर्हि तदन्तविधिरस्ति पत्यन्तपुरोहितादिभ्यो यक् [ ५. १. १२८ ] इति । यद्येतावत्प्रयोजनं स्यात्तत्रैवायं ब्रूयात्पत्यन्ताद्यग्भवति नञ्पूर्वात्तत्पुरुषान्नेति ॥ एवं तर्हि ज्ञापयत्याचार्य उत्तरो भावप्रत्ययो नञ्पूर्वाद्बहुव्रीहेर्भवतीति । नेष्यते । त्वतलावेवेष्येते । अविद्यमानाः पृथवो ऽस्याप्रृथुः अपृथोर्भावो ऽपृथुत्वम् अपृथुतेति ॥ एवं तर्हि ज्ञापयत्याचार्य उत्तरो भावप्रत्ययो ऽन्यपूर्वात्तत्पुरुषाद्भवतीति । नैवेष्यते । त्वतलावेवेष्येते । परमः पृथुः परमपृथुः परमपृथोर्भावः परमपृथुत्वम् परमपृथुता ॥ एवं तर्हि ज्ञापयत्याचार्य उत्तरो भावप्रत्ययः सापेक्षाद्भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । नञ्समासादन्यो भाववचनः स्वरोत्तरपदवृद्ध्यर्थमित्युक्तं तदुपपन्नं भवति ॥

---

तदन्तविधि ( १।१।७२ ) केला म्हणजे नञ्-तत्पुरुषाहून प्राप्ति येईल.[२]

पण सूत्रामध्यें उच्चारलेल्या प्रातिपदिकानें तदन्तविधि होत नाही असा त्या तदन्तविधीचा निषेध ( १।१।७२ वा. ) आहे.

तर मग सूत्रामध्येंच अन्त शब्द घालून जो प्रत्यय तदन्ताहून सांगितला आहे त्याचा निषेध ह्या प्रकृत सूत्राने होईल. उदा. पत्यन्तपुरोहितादिभ्यो यक् ( ५।१।१२८ ).

जर तेवढेच प्रयोजन असेल तर त्या ठिकाणींच ' पतिशब्दान्त प्रातिपदिकाहून यक् प्रत्यय होतो, आणि नञ्—तत्पुरुषाहून होत नाहीं, असा निषेध सागावा.

तेव्हां असे असूनही ज्या अर्थीं सूत्रकारानीं इमनिच् वगैरे सर्व प्रत्ययांचा निषेध व्हावा या उद्देशानें आरंभींच हा निषेध सांगितला आहे त्या अर्थीं ते असे सुचवितात कीं हे पुढील प्रत्यय ज्या शब्दाहून सांगितले आहेत ते तो शब्द अन्तीं असलेल्या नञ्-समासाहूनही होतात.[३] याचा उपयोग अपृथु या बहुव्रीहून इमनिच् प्रत्यय होतो.

पण अपृथु या बहुव्रीहीहून इमनिच् प्रत्यय मुळींच इष्ट नाहीं. तेथे त्व आणि तल् हेच प्रत्यय इष्ट आहेत. उदा०—अविद्यमानाः पृथवः यस्य सः अपृथुः. अपृथोः भावः अपृथुत्वम्, अपृथुता.

तर मग आतां तें ज्ञापक असे करावें कीं पृथु वगैरे शब्द अन्तीं असलेल्या तत्पुरुषाहून इमनिच् वगैरे प्रत्यय होतात.

तेथें देखील इमनिच् वगैरे प्रत्यय इष्ट नाहीतच. उदाः—परमश्चासौ पृथुश्च परमपृथुः; परमपृथोः भावः परमपृथुत्वम्, परमपृथुता. येथें त्व व तल् हेच प्रत्यय इष्ट आहेत.

तर मग आता तें ज्ञापक असें करावें कीं, भाव या अर्थाचे इमनिच् वगैरे पुढील प्रत्यय ज्या शब्दाहून सागितले आहेत ते शब्द सापेक्ष असले तरी त्यांहून ते प्रत्यय होतात.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

' नञ्समासादन्यो भाववचनः स्वरोत्तरपदवृद्ध्यर्थम्' ( ५।१।११९ वा. १० ) असें जें सांगितलें आहे तें बरोबर जुळतें.

हा देखील या ज्ञापकाचा उपयोग बरो र

---

२—पृथु वगैरे शब्दांहून इमनिच् प्रत्यय पुढील सूत्रानें सांगितला आहे. तेथें तदन्तविधि केला तर अपृथु या नञ्—तत्पुरुषाहून इमनिच् प्रत्ययाची प्राप्ति येते.

३—असें ज्ञापक केलें म्हणजे अपृथु या नञ् तत्पुरुषाहून इमनिच् प्रत्यय होऊ लागेल, तो न व्हावा म्हणून आरंभीं हा निषेध सांगितला पाहिजे, असें चारितार्थ्य येतें.

४—अप्रथिमा व अशौक्ल्यम् येथें पृथु व शुक्ल हे नञर्थाच्या संबंधामुळें सापेक्ष असले तरी त्यांहून इमनिच व ष्यञ् हें प्रत्यय करतां येतात.

एतदपि नास्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति सर्वे एते तद्धिताः सापेक्षाद्भवन्तीति यदयं नञो गुणप्रतिषेधे संपाद्यर्हहितालमर्थास्तद्धिताः [ ६.२.१५५ ] इत्याह ॥

## पृथ्वादिभ्य इमनिज्वा ॥ ५ । १ । १२२ ॥

वावचनं किमर्थम् । वाक्यमपि यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृता महाविभाषा तया वाक्यमपि भविष्यति॥ इदं तर्हि प्रयोजनं त्वतलावपि यथा स्याताम् । एतदपि नास्ति प्रयोजनम् ॥ आ च त्वात् [ ५.१.१२० ] इत्येतस्माद्यत्नात्त्वतलावपि भविष्यतः ॥ अत उत्तरं पठति ।

**पृथ्वादिभ्यो वावचनमण्समावेशार्थम्॥ १ ॥**

पृथ्वादिभ्यो वावचनं क्रियतेऽण्समावेशो यथा स्यात् । पार्थवम् प्रथिमा ॥

## [ वर्णदृढादिभ्यः ष्यञ् च ॥ ५ । १ । १२३ ॥ ]

## गुणवचनब्राह्मणादिभ्यः कर्मणि च ॥ ५ । १ । १२४ ॥

**ब्राह्मणादिषु चातुर्वर्ण्यादीनामुपसंख्यानम् ॥ १ ॥**

ब्राह्मणादिषु चातुर्वर्ण्यादीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । चातुर्वर्ण्यम् चातुर्वैद्यम् चातुराश्रम्यम् ॥

---

दिसत नाहीं. कारण, सर्वच तद्धित प्रत्यय सापेक्ष शब्द असला तरी त्याहून होतात ही गोष्ट 'नञो गुणप्रतिषेधे संपाद्यर्हहितालमर्थास्तद्धिताः' ( ६।२।१५५ ) असें जें हे आचार्य म्हणतात त्यावरूनच सिद्ध होत आहे.

( सू. १२२ ) ह्या सूत्रामध्यें 'वा' हा शब्द कशाकरिता घातला आहे ?

एकदां वृत्ति न होतां वाक्य झालें पाहिजे म्हणून घातला आहे.

वा शब्दाचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण मागून ( ४।१।८२ ) महाविभाषा चालू आहेच. तिनेंच वाक्यही होईल.

तर मग ह्या इमनिच् प्रत्ययाच्या उदाहरणामध्यें त्व व तल् हेही प्रत्यय एकदां झाले पाहिजेत हा या वा शब्दाचा उपयोग होय.

हाही वा शब्दाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण 'आ च त्वात्' हें जें सूत्र आचार्यांनीं केलें आहे तो त्यांचा यत्न त्याकरितांच आहे. त्यानेंच ते प्रत्यय सिद्ध होतील. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतात.

( वा. १ ) पृथु वगैरे शब्दांहून हा जो इमनिच् प्रत्यय विकल्पानें सांगितला आहे तो अशाकरिता कीं एकदां तेथें अण् प्रत्यय ( ५।१।३१ ) झाला पाहिजे. उदा०–पृथोर्भावः प्रथिमा, पार्थवम्.

( सू. १२४ वा. १ ) या ब्राह्मणादि गणामध्यें चातुर्वर्ण्य वगैरे शब्दांचें उपसंख्यान करावें. उदा०–चातुर्वर्ण्यम्, चातुर्वैद्यम्, चातुराश्रम्यम्.

---

१—( सू. १२२ ) पृथु वगैरे शब्दांहून 'त्याचा भाव' या अर्थी इमनिच् प्रत्यय विकल्पाने होतो. उदा०—पृथोर्भावः प्रथिमा, पार्थवम्.

२—नाहीं तर त्या अण् प्रत्ययाचा ह्या इमनिच् प्रत्ययानें नित्य बाध झाला असता.

१—( सू. १२३ ) वर्णविशेषवाचक शब्द आणि दृढादि गणांतील शब्द यांहून 'त्याचा भाव' या अर्थी ष्यञ् व इमनिच् हे प्रत्यय होतात. उदा०—शुक्लस्य भावः शौक्ल्यम्, शुक्लिमा. त्व आणि तल् हे प्रत्ययही होतात. ( ५।१।१२० ) शुक्लत्वम् शुक्लता. याप्रमाणेच दार्ढ्यम् द्रढिमा. दृढत्वम् दृढता.

१—( सू. १२४ ) गुणवाचक शब्द आणि ब्राह्मणादि गणांतील शब्द, यांहून 'त्याचा भाव' किंवा 'त्याचे कर्म' या अर्थी ष्यञ् प्रत्यय होतो. उदा०—जडस्य भाव. कर्म वा जाड्यम् ब्राह्मणस्य भावः कर्म वा ब्राह्मण्यम्. त्व व तल् हेही येथें होतात. कारण ते सर्वत्रच होतात.

२—या गणामध्ये चातुर्वर्ण्य असे ष्यञ् प्रत्ययान्तच शब्द उच्चारले आहेत. येथें ष्यञ् प्रत्यय स्वार्थींच होतो.

## अर्हतो नुम्च ॥ २ ॥

अर्हतो नुम्च ष्यञ्च वक्तव्यः । अर्हतो भाव आर्हन्त्यम् आर्हन्ती ॥

## स्तेनाद्यन्नलोपश्च ॥ ५ । १ । १२५

किमिदं नलोपे वर्णग्रहणमाहोस्वित्संघातग्रहणम् । किं चातः । यदि वर्णग्रहणं स्तेयम् नलोपे कृतेऽयादेशः प्राप्नोति । अथ संघातग्रहणमन्त्यस्य लोपःकस्मान्न भवति । सिद्धो ऽन्त्यस्य लोपो यस्येत्येव तत्रारम्भसामर्थ्यात्सर्वस्य भविष्यति ॥

[ सख्युर्यः ॥ ५ । १ । १२६ ॥ ॥

कपिज्ञात्योर्ढक् ॥ ५।१।१२७ ॥

पत्यन्तपुरोहितादिभ्यो यक् ॥ ५ । १ । १२८ ॥

प्राणभृज्जातिवयोवचनोद्गात्रादिभ्योऽञ् ॥ ५ । १ । १२९ ॥ ]

## हायनान्तयुवादिभ्योऽण् ॥ ५ । १ । १३० ॥

---

राभम्यम्.

(वा. २) अर्हत् शब्दाहून 'त्याचा भाव' या अर्थी ष्यञ् प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाच्या बरोबरच अर्हत् शब्दाला नुम् आगम होतो असें म्हणावें. उदा०—अर्हतः भावः आर्हन्त्यम्, आर्हन्ती.

(सू. १२५) या सूत्रामध्यें नलोपः येथील न हें काय अकार उच्चारणार्थ समजून केवल नकार या व्यंजनाचें ग्रहण आहे किंवा नकार व अकार मिळून न या समुदायाचें ग्रहण आहे ?

या दोहोंमध्यें फरक काय बरें ?

फरक असा कीं जर येथें केवळ व्यंजनाचें ग्रहण असेल तर स्तेयम् या उदाहरणामध्यें नकाराचा लोप झाल्यानंतर पुढील अकाराला मानून अय् आदेश (६।१।७८) प्राप्त होतो. बरें, समुदायाचें ग्रहण असेल तर त्यांतील अकाराचाच लोप 'अलोऽन्त्यस्य' (१।१।५२) या परिभाषेमुळे का होत नाहीं ?

पण जर अन्त्याचा म्ह. फक्त अकाराचाच लोप यानें होईल तर तो 'यस्येति च' (६।४।१४८) यानेंच होत असल्यामुळें येथें सांगावयास नकोच. तेव्हा ज्या अर्थी येथें लोप सांगितला आहे त्या अर्थी त्याच्या सामर्थ्यास्तव न या सर्व समुदायाचा लोप होईल.

---

१—(सू. १२५) स्तेन शब्दाहून 'त्याचा भाव' किंवा 'त्याचें कर्म' या अर्थी यत् प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाच्या बरोबरच स्तेन शब्दांतील 'न' या भागाचा लोप होतो. उदा०—स्तेनस्य भावः कर्म वा स्तेयम्.

१—(सू. १२६) सखि शब्दाहून 'त्याचा भाव' किंवा 'त्याचे कर्म' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—सख्युर्भावः कर्म वा सख्यम्.

१—(सू. १२७) कपि आणि ज्ञाति या शब्दाहून 'त्याचा भाव' किंवा 'त्याचें कर्म' या अर्थी ढक् प्रत्यय होतो. उदा०—कपेर्भावः कर्म वा कापेयम् ज्ञातेर्भावः कर्म वा ज्ञातेयम्.

१—(सू. १२८) पतिशब्दान्त जें प्रातिपदिक आणि पुरोहितादि गणातील जे शब्द त्यांहून 'त्याचा भाव' किंवा 'त्याचें कर्म' या अर्थी यक् प्रत्यय होतो. उदा०—सेनापतेः भावः कर्म वा सैनापत्यम् पुरोहितस्य भाव कर्म वा पौरोहित्यम्.

१—(सू. १२९) प्राणिजातिवाचक शब्द, वयोवाचक शब्द आणि उद्गातृ वगैरे शब्द याहून 'त्याचा भाव' किंवा 'त्याचें कर्म' या अर्थी अञ् प्रत्यय होतो. उदा०—उष्ट्रस्य भाव कर्म वा औष्ट्रम्, कुमारस्य भाव. कर्म वा कौमारम्, उद्गातुर्भाव. कर्म वा औद्गात्रम्.

१—(सू. १३०) हायनशब्दान्त जे शब्द आणि युवन् वगैरे शब्द याहून 'त्याचा भाव' किंवा 'त्याचें कर्म' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—द्विहायनस्य भावः कर्म वा द्वैहायनम्. यूनः भाव. कर्म वा यौवनम्.

## अण्प्रकरणे श्रोत्रियस्य घलोपश्च ॥ १ ॥

अण्प्रकरणे श्रोत्रियस्योपसंख्यानं कर्तव्य घलोपश्च वक्तव्यः । श्रोत्रियस्य भावः श्रौत्रम् ॥

## [ इगन्ताच्च लघुपूर्वात् ॥ ५ । १ । १३१ ॥

## योपधाद् गुरूपोत्तमाद्वुञ् ॥ ५ । १ । १३२ ॥

## द्वंद्वमनोज्ञादिभ्यश्च ॥ ५ । १ । १३३ ॥

## गोत्रचरणाच्छ्लाघात्याकारतदवेतेषु ॥ ५ । १ । १३४

## होत्राभ्यश्छः ॥ ५ । १ । १३५ ॥

## ब्रह्मणस्त्वः ॥ ५ । १ । १३६ ॥ ]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये पञ्चमस्याध्यायस्य प्रथमे पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

( सू. १३० वा. १ ) ह्या अण् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें श्रोत्रिय शब्दाहून ' त्याचा भाव ' किंवा 'त्याचें कर्म' या अर्थी अण् प्रत्यय होतो, आणि अण् प्रत्ययाबरोबर श्रोत्रिय शब्दांतील य या भागाचा लोप होतो असें म्हणावे उदा०— श्रोत्रियस्य भावः श्रौत्रम्.

याप्रमाणे श्री भगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील पांचव्या अध्यायाच्या पहिल्या पादाचें दुसरें आन्हिक समाप्त झालें व पादही समाप्त झाला.

---

१—( सू. १३१ ) ज्या शब्दांतील पहिला अच् लघु आहे आणि दुसरा अच् इक् आहे अशा इगन्त शब्दाहून त्याचा भाव किंवा कर्म या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—शुचेर्भावः कर्म वा शौचम्

१—( सू. १३२ ) ज्या शब्दामध्ये शेवटच्या अचाच्या मागील जवळचा अच् गुरु आहे आणि उपधेला यकार आहे असा जो बहुत अच् असलेला शब्द त्याहून 'त्याचा भाव' किंवा 'त्याचे कर्म' या अर्थी वुञ् प्रत्यय होतो उदा० —रमणायस्य भावः कर्म वा रामणीयकम्

१—( सू. १३३ ) द्वंद्व समासाहून आणि मनोज्ञादि गणातील जे शब्द त्यांहून ' त्याचा भाव ' किंवा ' त्याचें कर्म ' या अर्थी वुञ् प्रत्यय होतो. उदा०—शिष्योपाध्याययोर्भावः कर्म वा शैष्योपाध्यायिका. मनोज्ञस्य भाव. कर्म वा मानोज्ञकम्.

१—( सू. १३४ ) गोत्रवाचक शब्दाहून आणि चरणवाचक शब्दाहून ' त्याचा भाव ' किंवा ' त्याचें कर्म ' या अर्थी वुञ् प्रत्यय होतो, परंतु श्लाघा, अत्याकार आणि तदवेत यांपैकीं कोणता तरी अर्थ गम्यमान असला पाहिजे. श्लाघा म्हणजे प्रौढि मिरविणें अत्याकार म्हणजे दुसऱ्याची निर्भर्त्सना करणे. तदवेत म्हणजे त्याची प्राप्ति झालेला किंवा त्याची माहिती झालेला. त्याची म्हणजे त्या भावाची किंवा त्या कर्माची. उदा०—गार्ग्यस्य भाव कर्म वा गार्गिका, गार्गिकया श्लाघते ( गार्ग्यपणामुळे प्रौढि मिरवितो ). गार्गिकया ऽत्याकुरुते. (गार्ग्यपणामुळे दुसऱ्याला तुच्छ समजतो). गार्गिकामन्वेतः ( गार्ग्यपणाप्रत प्राप्त झालेला किंवा गार्ग्यपणा म्हणजे काय ते ओळखणारा). कठस्य भाव. कर्म वा काठिका.

१—( सू १३५ ) ऋत्विक्विशेषवाचक शब्दाहून ' त्याचा भाव ' किंवा ' त्याचे कर्म ' या अर्थी छ प्रत्यय होतो. उदा०—अच्छावाकस्य भावः कर्म वा अच्छावाकीयम्

१—(सू १३६)ऋत्विक्विशेषवाचक जो ब्रह्मन् शब्द त्याहून त्याचा भाव' किंवा 'त्याचे कर्म ' या अर्थी त्व, प्रत्यय होतो छ प्रत्यय होत नाही, आणि तल् प्रत्ययही होत नाही. उदा०—ब्राह्मणो भावः कर्म वा ब्रह्मत्वम्.

अ. ५ पा. १ समाप्त.

**धान्यानां भवने क्षेत्रे खञ् ॥ ५।२।१ ॥**
**व्रीहिशाल्योर्ढक् ॥ ५।२।२ ॥**
**यवयवकषष्टिकाद्यत् ॥५।२।३॥]**
**विभाषा तिलमाषोमाभङ्गाणुभ्यः ॥ ५।२।४ ॥**

तिलादिभ्यः खञ्च ॥ १ ॥

तिलादिभ्यः खञ्चेति वक्तव्यम् ॥ तिल्यम् तैलीनम् ॥ किमर्थमिदमुच्यते न यता मुक्ते धान्यानां भवने क्षेत्रे खञ् [ ५. २. १ ] इत्येव सिद्धम् । न सिध्यति । किं कारणम् ।

उमाभङ्ग्योरधान्यत्वात् ॥ २ ॥

धान्यानां भवने क्षेत्रे खञित्युच्यते न चोमाभङ्गे धान्ये । चमेषु यत्पठ्यते तद्धान्यं न चैते तत्र पठ्येते ॥

तर्हि खञ्ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । धान्यानां भवने क्षेत्रे खञिति । यदि तदनुवर्तते व्रीहिशाल्योर्ढक् [ २ ] यवयवकषष्टिकाद्यत् [ ३ ] इति खञ्चेति खञपि प्राप्नोति ।

---

(सू. ४) येथें विभाषा असें न म्हणतां खञ् च असें म्हणावें म्हणजे तिला वगैरे शब्दांहून खञ् व यत् हे प्रत्यय होतात असा अर्थ होईल. उदा०— तिल्यम् तैलीनम्.

असें कशाकरतां म्हटलें पाहिजे ? तसें म्हणावयास नको. कारण, विकल्पानें यत् प्रत्यय सांगितला म्हणजे जेव्हां यत् प्रत्यय केला नाहीं तेव्हां 'धान्यानां भवने क्षेत्रे खञ्' (५।२।१) यानेंच खञ् होईल.

तशा रीतीनें सिद्ध होणार नाहीं.

काय कारण ?

(वा. २) 'धान्यानां भवने क्षेत्रे खञ्' येथें धान्यानाम् असें म्हटलें आहे. आणि उमा व भङ्गा हे शब्द तर धान्यवाचक नाहीत. चमेकामध्यें जीं सांगितलीं आहेत तीं धान्यें होत. आणि उमा[3] व भङ्गा हीं धान्यें तेथें नाहींत.

तर मग विभाषा शब्दाच्या ऐवजीं खञ् च असें तेथें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण मागून तें अनुवृत्त आहे.

मागें खञ् ग्रहण कोठें बरें आहे ?

धान्यानां भवने क्षेत्रे खञ् (५।२।१) या सूत्रामध्यें आहे.

तेथे आहे खरें, पण त्याची जर येथें अनुवृत्ति केली तर 'व्रीहिशाल्योर्ढक्' व 'यवयवकषष्टिकाद्यत्' या मधल्या दोन सूत्रांमध्येंही खञ्-ग्रहणाची अनुवृत्ति होईल, आणि व्रीहि वगैरे शब्दांहूनही खञ् प्रत्यय होऊं लागेल.

---

१—(सू. १) धान्यवाचक शब्दांहून त्याचें उत्पत्तिक्षेत्र या अर्थी खञ् प्रत्यय होतो. उदा०—मुद्गानां भवनं क्षेत्रं मौद्गीनम्.

१—(सू. २) व्रीहि आणि शालि या शब्दांहून 'त्याचें उत्पत्तिक्षेत्र' या अर्थी ढक् प्रत्यय होतो. उदा०—व्रीहीणां भवनं क्षेत्रं व्रैहेयम्. शालीनां भवनं क्षेत्रं शालेयम्.

१—(सू. ३) यव, यवक आणि षष्टिक या धान्य-वाचक शब्दांहून 'त्याचें उत्पत्ति-क्षेत्र' या अर्थी यत् प्रत्यय होतो. यवानां भवनं क्षेत्रं यव्यम्; यवक्यम्; षष्टिक्यम्.

१—(सू. ४) तिल माष, उमा, भङ्गा आणि अणु या धान्यवाचक शब्दांहून 'त्याचें उत्पत्तिक्षेत्र' या अर्थी यत् प्रत्यय विकल्पानें होतो..उ०—तिलानां भवनं क्षेत्रं तिल्यम्, तैलीनम्, इत्यादि.

२—चमकामध्यें (तै. स. ४।७।४) 'व्रीहयश्च मे' येथून बारा धान्यें सांगितलीं आहेत.

३—उमा म्ह. जवस. भङ्गा म्ह. तागाचें बीं.

संबन्धमनुवर्तिष्यते । धान्यानां भवने क्षेत्रे खञ् । व्रीहिशाल्योर्ढग्भवति धान्यानां भवने क्षेत्रे खञ् । यवयवकषष्टिकाद्यद्भवति धान्यानां भवने क्षेत्रे खञ् भवति ।विभाषा तिलमाषोमाभङ्गाणुभ्यः। भवनक्षेत्रेखञ्ग्रहणमनुवर्तते धान्यानामिति निवृत्तम्॥अथवा मण्डूकप्लुतयोऽधिकाराः । यथा मण्डूका उत्प्लुत्योत्प्लुत्य गच्छन्ति तद्वदधिकाराः ॥ अथवान्यवचनाच्चकाराकरणात्प्रकृतस्याप-वादो विज्ञायते यथोत्सर्गेण प्रसक्तस्यापवादः । अन्यस्य प्रत्ययस्य वचनाच्चकारस्य चानुकर्षणार्थस्याकरणात्प्रकृतस्य खञो ढग्यतौ बाधकौ भविष्यतो यथोत्सर्गेण प्रसक्तस्यापवादो बाधको भवति ॥ अथवैतज्ज्ञापयत्यनुवर्तन्ते च नाम विधयो न चानुवर्तनादेव भवन्ति । किं तर्हि । यत्नाद् भवन्ति ॥ अथवा यता मुक्ते धान्यानां भवने क्षेत्रे खञित्येव सिद्धम् ।

---

हा दोष येत नाहीं. त्या मधल्या दोन सूत्रांत अनुवृत्ति आली तरी त्या खञ् पदाचा पूर्व सूत्रांमध्यें जसा संबंध झाला आहे तसा त्या संबंधासह अनुवृत्ति करतां येईल. तो असा कीं, 'धान्यानां भवने क्षेत्रे खञ्' या सूत्रामध्यें पदांचा संबंध होऊन जसा अर्थ झाला आहे त्या अर्थासह 'व्रीहिशाल्योर्ढक्' या सूत्रामध्ये 'धान्यानां भवने क्षेत्रे खञ्' याची अनुवृत्ति आणून थेट पूर्वीप्रमाणेच त्याचा अर्थ अनुवाद म्हणून करावयाचा. तसेच पुढें 'यवयवकषष्टिकाद्यत्' येथेंही 'धान्याना भवने क्षेत्रे खञ्' याची अनुवृत्ती करून पूर्वीप्रमाणच अर्थ करावयाचा. त्याच्या पुढे 'विभाषा तिलमाषोमाभङ्गाणुभ्यः' या प्रकृत सूत्रामध्ये 'भवने क्षेत्रे खञ्' या पदांचीच फक्त अनुवृत्ति होते, धान्यानां या पदाची अनुवृत्ति होत नाही.

अथवा अधिकारांची बेडकाप्रमाणे गति असते. बेडकें जसें उड्या मारीत जातात तसेच अधिकारांचेंही असतें. तेव्हा पहिल्या सूत्रामधील खञ्-ग्रहण हें मधल्या दोन सूत्रांमध्ये न लागतां एकदम उडी मारून येथे अनुवृत्त होईल. अथवा मधल्या दोन सूत्रांमध्यें निराळा प्रत्यय सांगितला आहे, व तेथें खञ्-ग्रहणाचा संबध दाखविणारा च शब्द ही घातला नाहीं. तेव्हां तेथे खञ्-ग्रहणाची अनुवृत्ति होऊन खञ् प्रत्ययाचे विधान झाले तरी त्या खञ् प्रत्ययाचा ठक् व यत् हे बाध करतील. जसें सामान्यशास्त्राला अन्यत्र चारितार्थ्य असल्यामुळें अपवादाच्या विषयामध्ये मंदगतीनें येणाऱ्या त्या सामान्यशास्त्राचा अपवाद-शास्त्रानें बाध होतो तसेच येथेंही खञ् ग्रहणाच्या अनुवृत्तीला ह्या चवथ्या सूत्रामध्यें चारितार्थ्य असल्यामुळे मधल्या सूत्रामध्यें अनुवृत्तीनें विधान झालें तरी मंदगतीने येणाऱ्या त्या खञ् प्रत्ययाचा ढक् व यत् हे बाध करतील. अथवा विधायक शब्द अनुवृत्तीनें पुढील सूत्रांत दाखल होतात, पण ते केवळ दाखल होतात म्हणजे त्याचा वाक्यार्थामध्यें प्रवेश होतोच असे नाही तर तसें घडून येण्याला यत्न करावा लागतो असें येथें जो विभाषा-ग्रहण हा यत्न केला आहे त्यावरून ज्ञापित होतें.

अथवा खञ् ग्रहणाची अनुवृत्ती येथें नकोच;

---

४—अनुवृत्ति झाली म्हणजे त्याचा वाक्यार्थमध्ये प्रवेश झालाच पाहिजे असा काहीं नियम नाहीं तर पादपूरणार्थक शब्दाप्रमाणे त्याचा नुसता संबध मात्र होतो. तेव्हां मधल्या सूत्राप्रमाणे येथेंही खञ्ग्रहण अनुवृत्त झालें तरी त्याचा वाक्यार्थात प्रवेश न झाला तर यत् प्रत्ययाचे एकच रूप होईल. तेव्हां दुसरें रूप होण्याकरिता येथे विभाषाग्रहण केले पाहिजे. असे त्याला ज्ञापक केल्यानंतर चारितार्थ्य येते. तेव्हां मधल्या दोन सूत्रात खञ्ग्रहणाची अनुवृत्ति झाली तरी तेवढ्याने काही तेथें खञ् प्रत्यय होणार नाहीं.

ननु चोक्तं न सिध्यति किं कारणम् उमाभङ्ग्योरधान्यत्वादिति । नैष दोषः । धिनोतेर्धान्यमेते चापि धिनुतः ॥ अथवा शणसप्तदशानि धान्यानि ॥

[ सर्वचर्मणः कृतः खखञौ ॥ ५ । २ । ५ ॥ ]

यथामुखसंमुखस्य दर्शनः खः ॥ ५ । २ । ६ ॥ ]

संमुखेति किं निपात्यते ।

संमुखेति समस्यान्तलोपः ॥१॥

संमुखेति समस्यान्तलोपो निपात्यते । सममुखस्य दर्शनः संमुखीनः ॥

[ तत्सर्वादेः पथ्यङ्गकर्मपत्रपात्रं व्याप्नोति ॥ ५ । २ । ७ ॥

आप्रपदं प्राप्नोति ॥ ५ । २ । ८ ॥]

अनुपदसर्वान्नायानयं बद्धाभक्षयतिनेयेषु ॥ ५ । २ । ९ ॥

अयानयं नेय इत्युच्यते तत्र न ज्ञायते

---

तर यत् प्रत्यय विकल्पानें सांगितला म्हणजे जेव्हा तो यत् प्रत्यय होत नाहीं तेव्हा 'धान्यानां भवने क्षेत्रे खञ्' या सूत्रानेच खञ् प्रत्यय होईल.

पण त्यानें खञ् प्रत्यय येथील सगळ्या शब्दांहून होणार नाहीं. कारण, उमा व भङगा हे शब्द धान्यवाचक नव्हेत असें सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'प्रीणन करणे' या अर्थाच्या धिन्व् धातूपासून धान्य हा शब्द साधला आहे. आणि उमा व भङ्गा हेही प्रसिद्ध धान्याप्रमाणे प्रीणन करतातच. अथवा येथें धान्य शब्दानें शणासह सतरा धान्यांचें ग्रहण केलें आहे असें समजावें.

( सू. ६ ) समुख शब्दामध्यें कशाचें निपातन केलें आहे ?

( वा. १ ) संमुख येथें सम शब्दांतील शेवटच्या अकाराच्या लोपाचें निपातन केलें आहे. सम मुखाचा म्हणजे सर्व मुखाचा जो दर्शन म्हणजे आरसा वगैरे तो समुखीन होय.

( सू. ९ ) अयानयाला नेण्यास योग्य असें येथें म्हटलें आहे. परंतु अय म्हणजे काय तसेंच

---

५—व्रीहि, यव, शाळी, बाजरी, गहू वगैरे मुख्य धान्ये, तुरी, हरभरा, मूग, मसूर, उडीद पावटा वगैरे उपस्कारक धान्यें, आणि वरे, सावे नाचणी वगैरे तृणधान्यें मिळून सोळा आणि शण धान्य सतरावें मिळून एकंदर सतरा धान्ये होत

१—( सू. ५ ) सर्वचर्मन् शब्दाहून 'त्यानें केलेलें' या अर्थी ख आणि खञ हे प्रत्यय होतात उदा०—सर्वचर्मीणः, सार्वचर्मीणः. येथें सर्व शब्दाचा संबंध चर्मन् याकडे न होता प्रत्ययार्थाकडे आहे. 'सर्वः चर्मणा कृतः' असा याचा विग्रह आहे

१—( सू. ६ ) पाहण्याचें अधिकरण जो आरशासारखा पदार्थ तो येथें दर्शन शब्दाचा अर्थ आहे यथामुख आणि समुख या शब्दाहून 'त्याचा दर्शन' या अर्थी ख प्रत्यय होतो. यथामुख हा अव्ययीभाव आहे यथामुख दर्शनः यथामुखीन; समस्य मुखस्य दर्शनः संमुखीनः. सम याचा सर्व असा अर्थ आहे.

१—(सू ७) ज्याच्या आरंभी 'सर्व' हा शब्द आहे आणि पथिन्, अङ्ग, कर्मन्, पत्र व पात्र हे शब्द शेवटी आहेत अशा प्रातिपदिकाहून 'त्याला व्यापतो' या अर्थी ख प्रत्यय होतो उदा० – सर्वपथं व्याप्नोति सर्वपथीनः भक्तगणः इत्यादि

१—( सू ८ ) आप्रपद या अव्ययीभाव समासाहून 'त्यापर्यंत पोचणारा' या अर्थी ख प्रत्यय होतो. उदा०—आप्रपदीनः पटः, पायाच्या बोटापर्यंत पोचणारे धोतर

१—( सू ९ ) अनुपद या अव्ययीभाव समासाहून 'त्याला अनुसरून बांधलेलीं' या अर्थी, सर्वान्न शब्दाहून 'भक्षण करतो' या अर्थी, आणि अयानय शब्दाहून तेथें नेण्याला योग्य या अर्थी ख प्रत्यय होतो उदा०—अनुपदं बद्धा अनुपदीना उपानत्; पायाच्या प्रमाणानें बांधलेला जोडा. सर्वान्नं भक्षयति सर्वान्नीन भिक्षुः, अयानयं नेय अयानयीनः शारः.

कोऽयः कोऽनय इति । अयः प्रदक्षिणम् । अनयः प्रसव्यम् । प्रदक्षिणप्रसव्यगामिनां शाराणां यस्मिन्परैः पदानामसमावेशः सोऽयानयः । अयानयं नेयोऽयानयीनः शारः ॥

**परोवरपरम्परपुत्रपौत्रमनुभवति ॥ ५ । २ । १० ॥**

परोवरेति किं निपात्यते ।

**परोवरेति परस्योत्ववचनम् ॥ १ ॥**

परोवरेति परस्यौत्वं निपात्यते । यद्येव परस्यौत्ववचनमिति प्राप्नोति । शकन्धुन्यायेन निर्देशः । अथवा नैवं विज्ञायते परस्यौत्वं निपात्यत इति । कथं तर्हि । परस्य शब्दरूपस्यादेरुत्वं निपात्यत इति । परांश्चावरांश्चानुभवति परोवरीणः ॥

अथ परंपरेति किं निपात्यते ।

**परपरतराणां परंपरभावः ॥ २ ॥**

परपरतराणां परंपरभावो निपात्यते । परांश्च परतरांश्चानुभवति परंपरीणः ॥

**[ अवारपारात्यन्तानुकामं गामी ॥ ५ । २ । ११ ॥ ]**

**समांसमां विजायते ॥ ५।२।१२ ॥**

---

अनय म्हणजे काय तेंच समजत नाहीं.

अय म्हणजे प्रदक्षिण, अनय म्हणजे वाम. डाव्या उजव्या बाजूनें जाणाऱ्या सोंगट्यांच्या ज्या घरांत दुसऱ्याच्या सोंगट्याचा प्रवेश होत नाहीं त्या घरांना अयानय असें म्हणतात. अयानय म्हणजे ( आंतलीं घरें ). अयानयं नेयः अयानयीनः शारः. फिरून आलेली आत जाण्याला योग्य सोंगटी असा अर्थ आहे.

( सू. १० ) येथें परोवर शब्दामध्यें काय निपातन केलें आहे ?

( वा. १ ) परोवर येथें पर शब्दाच्या अकाराला ओत्वाचें निपातन केले आहे.

पण जर ' ओत्ववचनम् ' असा पदच्छेद असेल तर ' परस्यौत्ववचनम् ' अशी वृद्धि ( ६।१।८८ ) झाली पाहिजे.

शकन्धु शब्दासारखें पररूप ( ६।१।९४-वा. ४ ) करून ' परस्योत्व ' हा निर्देश केला आहे. अथवा, पर शब्दाच्या अकाराला ओत्व होतें असा अर्थ करूं नये.

तर मग कसा करावा ?

परस्य म्हणजे पुढील अवर शब्दाच्या आरंभींच्या अकाराला उत्व होतें असें निपातन समजावें. पराश्च अवरांश्चानुभवति परोवरीणः

आतां परंपर या शब्दामध्यें काय निपातन केलें आहे?

( वा. २ ) परपरतर या शब्दाला परम्पर असा आदेश येथें निपातन केला जातो. परांश्च परतरांश्च अनुभवति परम्परीणः.

---

१—( सू. १० ) परावर, परपरतर आणि पुत्रपौत्र या तीन शब्दांहून ' त्याचा अनुभव घेणारा ' या अर्थीं ख प्रत्यय होतो. त्याबरोबर परावर शब्दातील पर शब्दाच्या शेवटच्या अकाराला ओकार आदेश आणि परपरतर शब्दाला परम्पर आदेश यांचें निपातन केलें आहे. उदा०—परान् अवरांश्च अनुभवति परोवरीण , परांश्च परतराश्चानुभवति परम्परीणः; पुत्रपौत्रान् अनुभवति पुत्रपौत्रीणः.

२—वार्तिकामध्यें ओत्ववचनम् असा पदच्छेद न करतां उत्ववचनम् असाच करावा. तेथें गुण (६।१।८७) झाला आहे परोवरीण. या उदाहरणामध्यें ही गुणच झाला आहे

१—( सू. ११ ) अवारपार, अत्यन्त आणि अनुकाम या शब्दाहून ' तसे जाईल ' या अर्थीं ख प्रत्यय होतो. उदा०—अवारपारं गामी ( गमिष्यति ) अवारपारीणः; अत्यन्तीनः शीघ्रगामी; अनुकामीनः यथेच्छगामी.

१—( सू. १२ ) समायां समायाम् याहून ' गर्भ धारण करते ' या अर्थीं ख प्रत्यय होतो आणि पूर्व पदातील सप्तमी विभक्तीचा लुक् न होतां फक्त त्यांतील यकाराचा लोप होतो. उदा०-समांसमीना गौः दर वर्षीं विणारी गाय हा अर्थ आहे.

इह समांसमीना गौः सुपो धातुप्रातिपदिकयोः [ २.४.७१ ] इति सुब्लुक्प्राप्नोति। समां समां विजायत इति यलोपवचनादलुग्विज्ञानम्। समां समां विजायत इति यलोपवचनादलुग्विज्ञानं भविष्यति। यदयं यलोपं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो नात्र लुग्भवतीति।

**समां समां विजायत इति यलोपवचनादलुग्विज्ञानमिति चेदुत्तरपदस्य लुग्वचनम् ॥ १ ॥**

समां समां विजायत इति यलोपवचनादलुग्विज्ञानामिति चेदुत्तरपदस्य लुग्वक्तव्यः ॥

**सिद्धं तु पूर्वपदस्य यलोपवचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत्। कथम्। पूर्वपदस्य यलोपो वक्तव्यः ॥

**अनुत्पत्तावुत्तरपदस्य च वावचनम् ॥ ३ ॥**

अनुत्पत्तौ पूर्वपदस्योत्तरपदस्य च यलोपो वा वक्तव्यः। समां समां विजायते। समायां समायां विजायत इति ॥

**[ अद्यश्वीनावष्टब्धे ॥ ५।२।१३ ॥]**

**आगवीनः ॥ ५ । २ । १४ ॥**

आगवीन इति किं निपात्यते।

**गोराङ्पूर्वादा तस्य गोः प्रतिदानात्कारिणि खः ॥ १ ॥**

गोराङ्पूर्वादा तस्य गोः प्रतिदानात्कारिणि खो निपात्यते। आ तस्य गोः प्रतिदानात्कर्मकारी आगवीनः कर्मकरः ॥

---

( सू. १२ ) समांसमीना गौः येथें पूर्वपदांतील सप्तमी विभक्तिचा ‘ सुपो धातु० ’ ( २।४।७१ ) यानें लुक् प्राप्त होतो.

या सूत्रामध्यें ‘ समायां समाया ’ असें उच्चारावयाचे असतांना यकाराचा लोप करून जें समा समां असें निपातन केले आहे त्याच्या सामर्थ्यास्तव अलुक् होईल. म्हणजे ज्या अर्थी येथें आचार्य यकाराचा लोप करून समा समा असें उच्चारतात त्यावरून ते असें सुचवितात कीं, येथें विभक्तीचा लुक् होत नाहीं.

( वा. १ ) ‘ समा समां विजायते ’ असें यलोपाचें निपातन केलें त्यावरून अलुक् होतो असें असेल तर समांसमीना येथें उत्तर पदामध्यें सप्तमीचा लुक् होतो असें म्हटलें पाहिजे

( वा. २ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें कीं, फक्त पूर्वपदामध्येंच यकाराचा लोप सांगावा.

आता ज्या वेळीं प्रत्यय न होतां विग्रहवाक्यच उच्चारलें जातें तेथें पूर्वपद आणि उत्तर पद या दोन्ही ठिकाणीं यकाराचा लोप विकल्पानें होतो असें म्हणावें. समा समा विजायते; समायां समाया विजायते.

( सू. १४ ) आगवीन शब्दामध्यें काय निपातन केलें आहे ?

( वा. १ ) आङ्-पूर्वक गो शब्दाहून ‘परत आणून देतोंपर्यंत त्या गाईचें कर्म करणारा’ या अर्थी ख प्रत्यय होतो असे येथें निपातन केले आहे. उदा०—आ गोः कर्मकारी आगवीनः कर्मकरः.

---

१—( सू. १३ ) अद्यश्वः याहून ख प्रत्यय होतो ‘ लवकरच वील ’ या अर्थी हें निपातन आहे. श्व या अव्ययांतील टि भागाचा लोप ( ६।४।१४४ वा. ५ ) झाला आहे. उदा०—अद्यश्वीना गौः. आज उद्या इतक्यातच विणारी गाय हा अर्थ आहे.

१—( सू. १४ ) आगो' या शब्दाहून त्याला संभाळण्याकरिता नेमलेला या अर्थी ख प्रत्यय होतो. आगो म्ह. गाय परत आणून पोचवितोंपर्यंत. उदा०—आगवीन . गुराखी हा अर्थ आहे.

**[ अनुग्वलंगामी ॥ ५ । २ । १५ ॥**
**अध्वनो यत्खौ ॥ ५ । २ । १६ ॥**
**अभ्यमित्राच्छ च ॥ ५ । २ । १७ ॥**
**गोष्ठात्खञ् भूतपूर्वे ॥ ५ । २ । १८ ॥**
**अश्वस्यैकाहगमः ॥ ५ । २ । १९ ॥ ]**

**शालीनकौपीने अधृष्टाकार्ययोः ॥ ५ । २ । २० ॥ ]**

किं यः शालायामधृष्टः स शालीनः कूपे वा यदकार्यं तत्कौपीनम् । नेत्याह । उत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । शालाप्रवेशनमर्हत्यधृष्टः स शालीनः । कूपावतरणमर्हत्यकार्यं तत्कौपीनम् ॥

**व्रातेन जीवति ॥ ५ । २ । २१ ॥**

व्रातेन जीवतीत्युच्यते किं व्रातं नाम । नानाजातीया अनियतवृत्तय उत्सेधजीविनः संघा व्राताः । तेषां कर्म व्रातम् । व्रातकर्मणा जीवतीति व्रातीनः ॥

**[ साप्तपदीनं सख्यम् ॥ ५ । २ । २२ ॥ ]**

---

(सू. २०) इतर ठिकाणीं धीट पण शाळेमध्यें भितरा अशा माणसाला शालीन म्हणावयाचें काय ? तसेंच विहिरीमध्यें जे न करण्यासारखे खेळ त्यांना कौपीन म्हणावयाचें कीं काय ?

तसें नाहीं. शालीन व कौपीन या शब्दांमध्यें उत्तरपदाचा लोप झाला आहे असें समजावें. जो भितरा मुलगा धीट होण्याकरिता शालाप्रवेशाला योग्य आहे तो शालीन होय. तसेंच जी वाईट गोष्ट विहिरींत टाकण्याला योग्य आहे ती कौपीन होय. ‘ कूपावतरणाला योग्य ’ हा कौपीन शब्दाचा अर्थ आहे.

( सू. २१ ) येथें ‘ व्रातेन जीवति ’ असें म्हटलें आहे.

पण व्रात म्हणजे काय ?

अनेक जातींचे अनेक प्रकारचा धंदा करणारे, शरीरकष्टानें उपजीविका करणारे अशा अनेक लोकांच्या समुदायाला व्रात म्हणतात. त्यांचें जें कर्म तें येथें व्रात शब्दानें घेतलें आहे. तशा कर्मानें ज्याचें जीवन होतें तो व्रातीन होय.

---

१—( सू. १५ ) अनुगु या अव्ययीभाव समासाहून ‘ सारखा हिंडणारा ’ या अर्थी ख प्रत्यय होतो. अनुगु म्हणजे गाईच्या मागोमाग. उदा०—अनुगवीनः गोपालः.

१—( सू. १६ ) अध्वन् शब्दाहून ‘ सारखा हिंडणारा ’ या अर्थी यत् व ख हे प्रत्यय होतात. उदा०—अध्वन्यः अध्वनीनः.

१—( सू. १७ ) अभ्यमित्र शब्दाहून ‘ सारखा जाणारा ’ या अर्थी छ यत् व ख हे प्रत्यय होतात. उदा०—अभ्यमित्रीयः, अभ्यमित्र्य, अभ्यमित्रीण . नेहमी शत्रूच्या अंगावर चाल करून जाणारा असा अर्थ आहे.

१—( सू. १८ ) प्रथमान्त गोष्ठ शब्दाहून भूतपूर्व या अर्थी खञ् प्रत्यय होतो. भूतपूर्वः गोष्ठः गौष्ठीनः.

१—( सू. १९ ) अश्व शब्दाहून ‘ त्याचा एक दिवसाचा मार्ग ’ या अर्थी खञ् प्रत्यय होतो. उदा०—आश्वीनः अध्वा.

१—( सू. २० ) अधृष्ट या अर्थी शालीन शब्द आणि अकार्य या अर्थी कौपीन शब्द निपातन केले आहेत. उदा०—शालीनः जडः. अधृष्टः म्हणजे धीट नव्हे असा (भित्रा) शाळेत घालण्याला योग्य. कौपीनं पापम्. विहिरीत टाकण्याला योग्य हा अर्थ आहे.

१—( सू. २१ ) काही घरगुती काम करणारे, कांहीं हमाली करणारे, काही गाडी हाकणारे, कांहीं लाकडे फोडणारे, काही शेतीकाम करणारे असे अनेक तऱ्हेचा धंदा करणारे अनेक जातीचे गडी एकत्र राहतात. त्या त्यांच्या समुदायाला व्रात म्हणतात. अशा तऱ्हेने उपजीविका करणाऱ्या गड्याला व्रातीन म्हणतात.

१—( सू २२ ) सख्य म्हणजे मैत्री. या अर्थी साप्तपदीन ह्या शब्दाचें येथें निपातन केलें आहे. सप्तभिः पदैः अवाप्यते तत् साप्तपदीनम्. चांगल्या लोकांची मैत्रीही त्याच्याबरोबर सात पावलें चाललें कीं तेवढ्यानेंही होते.

**हैयंगवीनं संज्ञायाम् ॥५।२।२३॥**

हैयंगवीनमिति किं निपात्यते।

**ह्योगोदोहस्य हियंग्वादेशः संज्ञायां तस्य विकारे ॥ १ ॥**

ह्योगोदोहस्य हियंग्वादेशो निपात्यते संज्ञायां विषये तस्य विकार इत्येतस्मिन्नर्थे। ह्योगोदोहस्य विकारो हैयंगवीनं घृतम्। संज्ञायामिति किमर्थम्। ह्योगोदोहस्य विकार उदश्वित् अत्र मा भूदिति ॥

**[तस्य पाकमूले पील्वादिकर्णादिभ्यः कुणब्जाहचौ ॥५।२।२४॥ ]**

**पक्षात्तिः ॥ ५ । २ । २५ ॥**

मूल इति वक्तव्यम्। पक्षस्य मूलं पक्षतिः। ।॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। मूल इति वर्तते। क्व प्रकृतम्। तस्य पाकमूले पील्वादिकर्णादिभ्यः कुणब्जाहचौ [५. २. २४] इति। यदि तदनुवर्तते पाकेऽपि प्राप्नोति। मूल इत्यनुवर्तते पाक इति निवृत्तम्। कथं पुनरेकयोगनिर्दिष्टयोरेकदेशोऽनुवर्तेतैकदेशो वा निवर्तेत। एगयोगानिर्दिष्टानामप्येकदेशानुवृत्तिर्भवति। तद्यथा। संख्याव्ययादेर्ङीप्

---

(सू. २३) हैयंगवीन शब्दामध्यें काय निपातन केलें आहे ?

(वा. १) 'ह्योगोदोह' शब्दाहून 'त्याचा विकार' या अर्थी खञ् हा प्रत्यय होतो आणि ह्योगोदोह शब्दाला हियंगु असा आदेश होतो. पण तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे, असें येथें निपातन केले आहे. ह्योगोदोहस्य विकारः हैयंगवीनम् घृतम्.

येथें संज्ञा असतांना असें कशाकरितां म्हटलें आहे ?

ह्योगोदोहाचा ताक हाही विकार आहे; पण हैयंगवीन ही संज्ञा ताकाला नाहीं. तेव्हा ताक या अर्थाला हैयंगवीन हा शब्द न लागला पाहिजे.

(सू. २५) मूल इति वक्तव्यम् म्हणजे मूल या अर्थी हा ति प्रत्यय होतो असे म्हणावें. पक्षस्य मूलं पक्षतिः.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण मागून 'मूले' असें अनुवृत्तीनें येत आहे.

मागें मूल शब्द कोठें आहे?

'तस्य पाकमूले पील्वादिकर्णादिभ्यः कुणब्जाहचौ' या मागच्याच सूत्रांत मूल शब्द आहे.

मागच्या सूत्रांत मूलशब्द आहे खरा, पण त्याची जर अनुवृत्ति आणावी तर पाक शब्दाचीही अनुवृत्ति येईल. आणि पक्ष शब्दाहून 'पाक' या अर्थीही ति प्रत्यय होऊं लागेल.

मूल शब्दाचीच अनुवृत्ति आहे. पाक शब्दाची अनुवृत्ति नाहीं.

पण पाक व मूल हे दोन शब्द एकाच सूत्रात बरोबरीनें उच्चारले असताना त्यापैकीं एकाची अनुवृत्ति येथें आहे आणि एकाची नाहीं असें कसें बरें करता येईल ?

एका सूत्रामध्यें बरोबरीनें दोन शब्द उच्चारले असले तरी त्यांतील एकाचीच फक्त अनुवृत्ति होते. उदा०—संख्याव्ययादेर्ङीप् (४।१।

---

१—(सू. २३) याचा अर्थ मुळांत स्पष्ट आहे. ह्योगोदोह म्हणजे काल काढलेलें गाईचें दूध.

१—(सू. २४) पीलु वगैरे शब्दाहून 'त्याचा पाक' या अर्थी कुणप् प्रत्यय होतो आणि कर्ण वगैरे शब्दांहून त्याचें मूल या अर्थी जाहच् प्रत्यय होतो. उदा०—पीलूना पाकः पीलुकुणः. कर्णस्य मूलं कर्णजाहः

१—(सू. २५) पक्ष शब्दाहून 'त्याचें मूळ' या अर्थी ति प्रत्यय होतो. उदा०—पक्षस्य मूलं पक्षतिः. प्रतिपदा तिथि हा अर्थ आहे.

[ ५.१.२६ ] दामहायनान्ताच्च [ २७ ]। संख्यादेरित्यनुवर्ततेऽव्ययादेरिति निवृत्तम्॥

## [ तेन वित्तश्चुञ्चुप्चणपौ ॥ ५ । २ । २६ ॥ ]

## विनञ्भ्यां नानाञौ न सह ॥ ५ । २ । २७ ॥

इह नानेति सहार्थो गम्येत द्वौ हि प्रतिषेधौ प्रकृतमर्थं गमयतः । न न सह सहैवेति ॥ नैष दोषः । नायं प्रत्ययार्थः । किं तर्हि । प्रकृतिविशेषणमेतत् । विनञित्येताभ्यामसहवाचिभ्यां नानाञौ भवतः । कस्मिन्नर्थे । स्वार्थे ॥

## वेः शालच्छङ्कटचौ ॥ ५।२।२८ ॥

कस्मिन्नर्थे शालजादयो भवन्ति ।न सहेति वर्तते । भवेत्सिद्धं विशाले शृङ्गे विशङ्कटे शृङ्गे इति । इह खलु संकटमिति संगतार्थो गम्यते प्रकटमिति प्रगतार्थो गम्यत उत्कटमित्युद्गतार्थो गम्यते ॥ एवं तर्हि साधने शालजादयो भवन्ति । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । उपसर्गेभ्य इमे विधीयन्त

---

२६ ) या सूत्रांतून त्याच्या पुढील ' दामहायनान्ताच्च ' या सूत्रामध्यें फक्त 'संख्यादेः' एवढ्याचीच अनुवृत्ति होते आणि 'अव्ययादेः' याची अनुवृत्ति होत नाही.

( सू. २७ ) ह्या सूत्रानें ' नाना ' हा जो शब्द साधला आहे त्यामध्यें निषेधार्थक नञ् या अव्ययाच्या पुढें 'न सह' या अर्थी 'नाञ्' असा प्रत्यय केला आहे तेव्हां तेथें सह असाच अर्थ होईल. कारण 'न सह' या अर्थामध्यें सह या अर्थाचा एक निषेध आणि दुसरा नञ् या अव्ययाचा अर्थ निषेध असे दोन निषेध मिळून मूळच्याच अर्थाला कायम करतात. 'न सह असें नाहीं' म्हणजे सह असेंच होतें.

हा दोष येत नाहीं. कारण ' न सह ' हा प्रत्ययाचा अर्थच नव्हे. तर तें विनञ्भ्याम् याचें विशेषण आहे. म्हणजे ' न सह ' या अर्थाचें जे वि आणि नञ् त्यांहून क्रमानें ना आणि नाञ् असे प्रत्यय होतात. आतां ते कोणत्या अर्थी होतात असा प्रश्न उद्भवतो; त्याचें उत्तर स्वार्थी होतात हें होय.

( सू. २८ ) 'वेः शालच्०'इत्यादि सूत्रानीं सांगितलेले जे शालच् वगैरे प्रत्यय ते कोणत्या अर्थी होतात ?

मागून ' न सह ' याची अनुवृत्ति आहे तेव्हा ते या अर्थी होतील

अशा रीतीनें विशाले शृङ्गे व विशङ्कटे शृङ्गे हीं उदाहरणें सिद्ध होतीलें. परंतु पुढील सूत्राच्या उदाहरणामध्यें ' न सह ' हा अर्थ भासत नाहीं. तर सङ्कट म्हणजे संगत, प्रकट म्हणजे प्रगत, आणि उत्कट म्ह. उद्गत असे अर्थ भासतात.

तर मग ' क्रियेचें साधन ' या अर्थी हे शालच् वगैरे प्रत्यय होतात असें समजावें.

हे काय बरें बोलावें ?

असें बोलूं नये.

पण सांगितल्याशिवाय ही गोष्ट कशी उमगेल ?

हे प्रत्यय वि सम् वगैरे उपसर्गाच्या पुढें सांगितले आहेत. आणि उपसर्ग तर असे अस-

---

१—( सू. २६ ) प्रातिपदिकाहून ' त्यानें प्रसिद्ध ' या अर्थी चुञ्चुप् व चणप् हे प्रत्यय होतात. उदा०—विद्यया वित्तो विद्य चुञ्चु , विद्याचणः. विद्येनें प्रसिद्धीला आलेला हा अर्थ आहे

१—( सू. २७ ) नसह या अर्थाचे जे वि आणि नञ् त्यांहून क्रमाने ना आणि नाञ् हे प्रत्यय स्वार्थी होतात. उदा०—विना; नाना. यांना अव्यय संज्ञा आहे ( १।१।३८ ) नाना या अव्ययाचा अर्थ विना असाच आहे.

१—( सू. २८ ) क्रियाविशिष्ट साधन म्हणजे विगत इत्यादि अर्थाचा जो वि शब्द त्याहून शालच् व शङ्कटच् हे प्रत्यय स्वार्थी होतात. उदा०—विशाले शृङ्गे, विशङ्कटे शृङ्गे.

२—कारण दोन शिंगे एकमेकाला लागलेलीं नसतात. न सह म्ह. संगत नव्हे असा अर्थ गृहीत धरला आहे.

उपसर्गाश्च पुनरेवमात्मका यत्र कश्चित्क्रियावाची शब्दः प्रयुज्यते तत्र क्रियाविशेषमाहुर्यत्र हि न प्रयुज्यते ससाधनां तत्र क्रियामाहुः। त एत उपसर्गेभ्यो विधीयमानाः ससाधनायां क्रियायां भविष्यन्ति॥ एवमपि भवेत्सिद्धं विशाले शृङ्गे इति। इदं तु न सिध्यति विशालः विशङ्कट इति। एतदपि सिद्धम्। कथम्। अकारो मत्वर्थीयः। विशाले अस्य स्तो विशालः। विशङ्कटे अस्य स्तो विशङ्कट इति॥

**संप्रोदश्च कटच्॥ ५। २। २९॥**

कटच्प्रकरणेऽलाबूतिलोमाभ्यो रजस्युपसंख्यानम्॥ १॥

कटच्प्रकरणेऽलाबूतिलोमाभ्यो रजस्यभिधेय उपसंख्यानं कर्तव्यम्। अलाबूकटः तिलकटः उमाकटः॥

**भङ्गायाश्च॥ २॥**

भङ्गायाश्चेति वक्तव्यम्। भङ्गाकटः॥

**गोष्ठादयः स्थानादिषु पशुनामादिभ्यः॥ ३॥**

गोष्ठादयः प्रत्ययाः स्थानादिष्वर्थेषु पशुनामादिभ्यो वक्तव्याः। गोगोष्ठम् अविगोष्ठम्॥ कटच्च वक्तव्यः। अविकटः उष्ट्रकटः॥ पटच्च वक्तव्यः। अविपटः उष्ट्र-

---

तात कीं, ज्या ठिकाणीं क्रियावाचक असा कोणीतरी धातु असतो त्या ठिकाणीं त्या क्रियेवरील कांहींतरी विशेष ते दाखवितात. आता ज्या ठिकाणीं क्रियावाचक धातूचा प्रयोग नसेल तेथें ते केवळ उपसर्गच क्रिया आणि तिचें साधन इतक्या अर्थाला दाखवितात. तशा प्रकारच्या वि, सम् वगैरे उपसर्गांहून सांगितलेले ते हे शालच् वगैरे प्रत्यय क्रिया आणि तिचे साधन ह्या उपसर्गांच्या अर्थींच होतील.

बरें;पण असें घेतलें तरी विशाले शृङ्गे अशींच उदाहरणें साधतील; परंतु विशाल: विशङ्कटः गौः अशीं उदाहरणें साधणार नाहींत.

हीं देखील उदाहरणें साधतील.

तीं कशीं?

अशीं कीं, विशाल व विशङ्कट या शृङ्गवाचक शब्दाहून मतुप् प्रत्ययाच्या अर्थी सांगितलेला अकार प्रत्यय (५।२।१२७) करावा. विशाले शृङ्गे स्तः यस्य सः, विशङ्कटे शृङ्गे स्तः यस्य सः असा त्याचा विग्रह होय.

(सू. २९ वा. १) ह्या कटच् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें अलाबू, तिल आणि उमा या शब्दांहून 'त्याचें रज' या अर्थी कटच् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. अलाबूनां रजः अलाबूकटः, तिलकटः, उमाकटः.

(वा. २) भङ्गा शब्दाहूनही 'त्याचें रज' या अर्थी कटच् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—भङ्गाकटः.

(वा. ३) पशूंचें नाव वगैरे शब्दांहून 'त्याचें स्थान' इत्यादि अर्थी गोष्ठ वगैरे प्रत्यय होतात असें म्हणावें. उदा०—गवा स्थानं गोगोष्ठम्; अविगोष्ठम्. पशूंचें नांव वगैरे शब्दांहून कटच्[3] प्रत्यय होतो असें म्हणावें. अविकटः उष्ट्रकटः. त्याच शब्दाहून पटच् प्रत्ययही होतो

---

[१]—वि याचा विगत म्हणजे विशेष रीतीनें बाहेर पडलेलीं असा अर्थ घेऊन स्वार्थी प्रत्यय केला म्हणजे विशाले शृङ्गे इत्यादि प्रयोग साधतात.

१—(सू. २९) क्रियाविशिष्ट साधन या अर्थाचे जे सम्, प्र उत् आणि वि त्यांहून स्वार्थी कटच् प्रत्यय होतो. उदा०—सकटम् (गर्दी); प्रकटम्, उत्कटम्, विकटम्.

२—अलाबू म्ह. भोपळा. उमा म्ह. जवस. रजस् म्ह. डेख, कोंडा वगैरे टाकाऊ भाग, भङ्गा म्ह. तागाचे बीं

३—येथ हे कटच् वगैरे प्रत्यय मोघम सांगितले आहेत तरी ह्याचे प्रयोग विशेष अर्थींच दिसतात. सघात या अर्थी कटच् प्रत्यय, विस्तार या अर्थी पटच् प्रत्यय, द्वित्व या अर्थी गोयुग प्रत्यय, स्नेह या अर्थी तैल प्रत्यय आणि उत्पत्तिक्षेत्र या अर्थी शाकट व शाकिन हे प्रत्यय दिसतात.

पटः ॥ गोयुगशब्दश्च प्रत्ययो वक्तव्यः । उष्ट्रगोयुगम् खरगोयुगम् ॥ तैलशब्दश्च प्रत्ययो वक्तव्यः । इङ्गुदतैलम् सर्षपतैलम् ॥

शाकटशब्दश्च प्रत्ययो वक्तव्यः । इक्षुशाकटम् मूलशाकटम् ॥ शाकिनशब्दश्च प्रत्ययो वक्तव्यः । इक्षुशाकिनम् मूलशाकिनम् ॥

उपमानाद्वा सिद्धम् ॥ ४ ॥

उपमानाद्वा सिद्धमेतत् । गवां स्थानं गोष्ठम् । यथा गवां तद्वदुष्ट्राणाम् ॥ कटज्वक्तव्य इति । यथा नानाद्रव्याणां संघातः कट एवमवयः संहता अविकटः ॥ पटच्च वक्तव्य इति । यथा पटः प्रस्तीर्ण एवमवयः प्रस्तीर्णा अविपटः ॥ गोयुगशब्दश्च प्रत्ययो वक्तव्य इति । गोर्युगं गोयुगम् । यथा गोस्तद्वदुष्ट्रस्य । उष्ट्रगोयुगम् ॥ तैलशब्दश्च प्रत्ययो वक्तव्य इति । प्रकृत्यन्तरं तैलशब्दो विकारे वर्तते । एवं च कृत्वा तिलतैलमित्यपि सिद्धं भवति ॥ शाकटशब्दश्च प्रत्ययो वक्तव्य एव । शाकिनशब्दश्च प्रत्ययो वक्तव्य एव ।

[ [१]अवात्कुटारच्च ॥ ५ । २ । ३० ॥ [१]नते नासिकायाः संज्ञायां टीटञ्नाटज्भ्रटचः ॥ ५ । २ । ३१ ॥ [१]बिडज्बिरीसचौ ॥ ५ । २ । ३२ ॥]

[१]इनच् पिटच् चिकचि च ॥ ५ । २ । ३३ ॥

असें म्हणावें. अविपटः उष्ट्रपटः. तसेंच पशूचे नांव वगैरेंहून प्रत्यय या नात्यानें गोयुग शब्द पुढें लावावा. उष्ट्रगोयुगम् खरगोयुगम्. कांहीं प्रातिपदिकांहून पुढें प्रत्यय या नात्याने तैल शब्द लावावा. इङ्गुदतैलम् सर्षपतैलम्. तसेंच कांहीं प्रातिपदिकाहून पुढें प्रत्यय या नात्यानें शाकट शब्द लावावा. इक्षुशाकटम् मूलशाकटम्. तसाच त्याहून पुढे शाकिन शब्दही लावावा. इक्षुशाकिनम्, मूलशाकिनम्.

(वा. ४) अथवा सारखेपणामुळें तशा शब्दांचे प्रयोग होत असल्यामुळें हे सिद्ध होत आहे. गाईच्या स्थानाला गोष्ठ म्हणतात तसेंच उष्ट्रांचे स्थान आहे म्हणून त्याला उष्ट्रगोष्ठ म्हणतात. तसेंच कटच् प्रत्यय सांगावा असें म्हटलें आहे तेथेंही अनेक द्रव्यांच्या समुदायाला कट म्हणतात. तसें अवींच्या समुदायाला अविकट असें म्हणता येईल. तसेंच पटच् प्रत्यय सांगावा असे म्हटलें आहे. तेथेंही पट जसा विस्तीर्ण असतो तसा विस्तीर्ण म्हणजे पसरलेला जो अविसमूह त्याला अविपट म्हणतां येईल. तसेंच गोयुग प्रत्यय सांगितला आहे तोही सांगू नये. गाईचें जें युग तें गोयुग होय. जसें गाईचे युग तसेंच उष्ट्राचें तें उष्ट्रगोयुग होय. तसाच तैल हा जो प्रत्यय सांगितला आहे तोही सांगावयास नको. कारण विकार या अर्थाचा तैल शब्द स्वतत्र आहेच. म्हणूनच तिलतैलम् हा प्रयोग सिद्ध होतो. शाकट प्रत्यय मात्र सांगितला पाहिजे, तसाच शाकिन प्रत्ययही सांगितला पाहिजे.

४—तेव्हा गोष्ठच्, कटच्, पटच्, गो, युग आणि तैल हे प्रत्यय सांगावयास नकोत.

१–(सू. ३०) क्रियाविशिष्ट साधन या अर्थाच्या अव याहून कुटारच् व कटच् हे प्रत्यय स्वार्थी होतात. उदा०—अवाचीन, अवकुटारः, अवकटः.

१–(सू ३१) नासिकेचें जे नमन त्या अर्थाच्या अव या अव्ययाहून टीटच् नाटच् व भ्रटच् हे प्रत्यय संज्ञा असतांना होतात. उदा०—नासिकाया नतम् अवटीटम् अवनाटम् अवभ्रटम्.

१–(सू.३२) ‘नासिकेचे नमन’ या अर्थाच्या ‘नि’ याहून बिटच् आणि बिरीसच् हे प्रत्यय होतात संज्ञा असताना. उदा०—निबिडम्; निबिरीसम्.

१—(सू. ३३) ‘नासिकेचे नमन’ या अर्थाच्या नि याहून इनच् आणि पिटच् हे प्रत्यय होतात आणि त्या प्रत्ययाच्या बरोबर क्रमानें नि शब्दाला चिक् आणि चि हे आदेश होतात. उदा०—चिकिनम्, चिपिटम्.

**इनच्पिटच्काश्चिकचिचिकादेशाश्च ॥ १ ॥**

इनच्पिटच्काः प्रत्यया वक्तव्याश्चिक चि चिगित्येते च प्रकृत्यादेशा वक्तव्याः । चिकिनः चिपिटः चिक्कः ॥

**क्लिन्नस्य चिल्पिलश्चास्य चक्षुषी ॥ २ ॥**

क्लिन्नस्य चिल्पिलित्येतौ प्रकृत्यादेशौ वक्तव्यौ लश्च प्रत्ययोऽस्य चक्षुषी इत्येतस्मिन्नर्थे । क्लिन्ने अस्य चक्षुषी चिल्लः पिल्लः ॥ चुल् च वक्तव्यः । चुल्लः ॥ यद्यस्येत्युच्यते चिल्ले चक्षुषी पिल्ले चक्षुषी इति न सिध्यति तस्मान्नार्थोऽस्यग्रहणेन । कथं चिल्लः पिल्ल इति । अकारो मत्वर्थीयः । चिल्ले अस्य स्तश्चिल्लः । पिल्ले अस्य स्तः पिल्ल इति ॥

**[उपाधिभ्यां त्यकन्नासन्नारूढयोः ॥ ५ । २ । ३४ ॥**

**कर्मणि घटोऽठच् ॥ ५ । २ । ३५ ॥**

**तदस्य संजातं तारकादिभ्य इतच्] ॥ ५ । २ । ३६ ॥**

**प्रमाणे द्वयसज्दघ्नञ्मात्रचः ॥ ५ । २ । ३७ ॥**

---

( सू. ३३ वा. १ ) येथे नि याहून इनच् पिटच् आणि क असे तीन प्रत्यय सागून त्याच्या बरोबर नि शब्दाला चिक, चि, चिक् असें तीन आदेश क्रमानें होतात असें सांगावे. उदा०—चिकिनः चिपिटः चिक्कः.

( वा. २ ) क्लिन्न शब्दाहून 'तसे आहेत नेत्र ज्याचे' या अर्थी ल प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाच्या बरोबर क्लिन्न शब्दाला चिल् किंवा पिल् असा आदेश होतो. क्लिन्ने चक्षुषी अस्य चिल्लः पिल्लः. येथे चुल् असाही आदेश होतो असें म्हणावें. उदा०-चुल्लः.

पण ह्या वार्तिकामध्यें 'अस्य' असें म्हटलें आहे. तेव्हा तशा डोळ्याच्या मनुष्याला चिल्ल वगैरे म्हणतां येईल पण तशा डोळ्याना म्हणतां येणार नाहीं. तेव्हां चिल्ले चक्षुषी पिल्ले चक्षुषी हे प्रयोग साधणार नाहींत तेव्हां वार्तिकामध्यें अस्य हा शब्द घालण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

पण अस्य हा शब्द घातला नाहीं तर तशा डोळ्याच्या मनुष्याला चिल्लः किंवा पिल्लः असें म्हणतां येणार नाहीं.

तशा ठिकाणीं चिल्ल व पिल्ल या शब्दांहून मतुप् प्रत्ययाच्या अर्थी अकार प्रत्यय ( ५।२।१२७ ) करावा म्हणजे ते प्रयोग साधतील. चिल्ले चक्षुषी स्तः यस्य सः चिल्लः, पिल्ले चक्षुषी स्तः यस्य सः पिल्लः.

---

२–नेहमीं ज्याच्या डोळ्यातून पाणी गळतें त्याला चिल्ल आणि पिल्ल असे म्हणतात.

१—( सू. ३४ ) पर्वताच्या जवळचा मार्ग या अर्थाचा उप शब्द आणि पर्वताच्या वरचा भाग या अर्थाचा अधि शब्द याहून स्वार्थी त्यकन् प्रत्यय होतो. उदा०—उपत्यका. अधित्यका.

१—( सू. ३५ ) कर्मन् शब्दाहून घट म्हणजे 'त्या विषयीं नेहमीं तत्पर' या अर्थी अठच् प्रत्यय होतो. उदा०—कर्मणि घटते कर्मठः.

१—( सू. ३६ ) तारकादि गणातील शब्दाहून 'तत् सजातम् अस्य' या अर्थी इतच् प्रत्यय होतो उदा०—तारकाः सजाताः अस्य तारकितम् नभः ( ज्यामध्यें नक्षत्रें दिसू लागलीं आहेत असें आकाश.)

१—( सू. ३७ ) प्रमाणवाचक प्रातिपदिकांहून 'तें आहे ज्याचे' या अर्थी द्वयसच् दघ्नच् आणि मात्रच् हे प्रत्यय होतात. उदा०—जानुद्वयसम् जानुदघ्नम् जलम्. क्रोशमात्रम् नगरम्. इयत्तादर्शक असा कोणताही शब्द येथें प्रमाण शब्दानें घेतला जातो. त्यामुळें जानु व अस्त्र हे शरीरावयववाचक शब्द जेव्हां त्याच अर्थानें दुसऱ्याची इयत्ता दाखवितात तेव्हा त्याहून हे प्रत्यय होतात. जानुद्वयसम्, ऊरुदघ्नम्, अस्रमात्रं जलम्.

**प्रमाण इति किमयं प्रत्ययार्थः ।**

**प्रमाणं प्रत्ययार्थो न**

**प्रमाण इति नायं प्रत्ययार्थः । क तर्हि प्रत्यया भवन्ति ।**

**तद्वति**

**कुत एतत् ।**

**अस्येति वर्तनात् ।**

**अस्येति हि वर्तते । क प्रकृतम् । तदस्य संजातं तारकादिभ्य इतच् [ ५.२.३६ ] इति ॥**

**प्रथमश्च द्वितीयश्च ऊर्ध्वमाने मतौ मम ॥ १ ॥**

**ऊरुद्वयसम् ऊरुदघ्नम् ॥**

**प्रमाणे लः**

**प्रमाणे लो वक्तव्यः । शमः दिष्टिः वितस्तिः ॥**

**द्विगोर्नित्यम्**

**द्विगोर्नित्यं लो वक्तव्यः । द्विशमम् । त्रिशमम् । द्विदिष्टिः त्रिदिष्टिः । द्विवितस्तिः त्रिवितस्तिः ॥ किमर्थमिदमुच्यते । संशये श्रावेणं वक्ष्यति तस्यायं पुरस्तादपकर्षः ।**

**डट् स्तोमे**

**डट् स्तोमे वक्तव्यः पञ्चदशः स्तोमः ॥**

**शच्शनोर्डिनिः ।**

**शच्शनोर्डिनिर्वक्तव्यः । त्रिंशिनो मासाः पञ्चदशिनोऽर्धमासाः ॥ विंशतेश्चेति**

---

(सू. ३७) प्रमाणें असें जें येथें म्हटलें आहे तो प्रत्ययाचा अर्थ समजावयाचा काय ?

( श्लो. १ ) प्रमाण हा प्रत्ययाचा अर्थ नव्हे.

तर मग हे प्रत्यय कोणत्या अर्थी होतात ?

' तें प्रमाण आहे ज्याचें ' या अर्थी होतात.

असें कशावरून ?

'अस्य' असें पद मागून अनुवृत्त येत आहे त्यावरून अस्य हा प्रत्ययार्थ आहे असें समजतें.

अस्य असें पद मागें कोठें बरें आहे ?

' तदस्य संजातं तारकादिभ्य इतच् ' या मागच्याच सूत्रांत आहे.

येथें सांगितलेल्या ह्या तीन प्रत्ययापैकीं पहिला द्वयसच् आणि दुसरा दघ्नच् हे प्रत्यय ऊर्ध्वमान-बोधक शब्दाहूनच होतात असें मला मान्य आहे. उदा०—ऊरुद्वयसम् ऊरुदघ्नम्.

( श्लो. २ ) प्रमाणवाचक शब्दाहून केलेल्या मात्रच् प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें. उदा०—शमः दिष्टिः[3] वितास्तिः.

द्विगूच्या पुढील या प्रत्ययांचा नित्य लुक् होतो असें म्हणावें. उदा०—द्विशम्, त्रिशम्; द्विदिष्टिः, त्रिदिष्टिः; द्विवितास्तिः, त्रिवितास्तिः.

येथें नित्य लुक् कशाकरितां सांगितला आहे ?

इयत्तेबद्दल संशय असतांना पुढें सांगितलेला मात्रच् प्रत्यय शममात्रम् इत्यादि उदाहरणांमध्यें कायम राहतो, परंतु द्विगूच्या पुढे तोही मात्रच् प्रत्यय राहूं नये म्हणून त्याचा हा अपवाद पूर्वी सांगितला आहे.

संख्यावाचक शब्दाहून ' तें आहे प्रमाण ज्याचें असा स्तोम' या अर्थी डट् प्रत्यय होतो. उदा०—पञ्चदशः स्तोमः.

शत् किंवा शन् हीं अक्षरें शेवटीं असलेल्या संख्यावाचक शब्दाहून 'तें आहे प्रमाण ज्याचें ' या अर्थी डिनि प्रत्यय होतो. उदा०—त्रिंशत् दिवसाः प्रमाणं येषां ते त्रिंशिनः मासाः;

---

२—मागें ५।१।१९ टीप ३ पहा.

३—शम, दिष्टि व वितस्ति हीं प्रमाणें आहेत. वितस्ति म्ह. वीत. शम म्ह. हात. दिष्टि म्ह. टीच.

४—पंधरा ऋचा ज्यामध्यें आहेत असा स्तोम म्हणजे ऋक्-समुदाय-विशेष.

वक्तव्यम् । विंशिनोऽङ्गिरसः ॥

**प्रमाणपरिमाणाभ्यां संख्यायाश्चापि संशये ॥ २ ॥**

मात्रज्वक्तव्यः । शममात्रम् दिष्टिमात्रम् वितस्तिमात्रम् । कुडवमात्रम् । पञ्चमात्राः दशमात्राः ॥

**वत्वन्तात्स्वार्थे द्वयसज्मात्रचौ बहुलम् ॥ ३ ॥**

वत्वन्तात्स्वार्थे द्वयसज्मात्रचौ बहुलं वक्तव्यौ । तावदेव तावद्द्वयसम् तावन्मात्रम् । यावदेव यावद्द्वयसम् यावन्मात्रम् ॥

**[पुरुषहस्तिभ्यामण् च ॥५।२।३८॥]**

**यत्तदेतेभ्यः परिमाणे वतुप् ॥ ५ । २ । ३९ ॥**

किमर्थं परिमाण इत्युच्यते न प्रमाण इति वर्तते । एवं तर्हि सिद्धे सति यत्परिमाणग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्प्रमाणमन्यत्परिमाणमिति ॥१॥

**डावतावर्थवैशेष्यान्निर्देशः पृथगुच्यते ।**

नैतज्ज्ञापकसाध्यमन्यत्प्रमाणमन्यत्परिमाणमिति । उक्तोऽत्र विशेषः ॥

**मात्राद्यप्रतिघाताय**

एवं च कृत्वा मात्रादीनां प्रतिघातो न

---

षड्दाशिनः अर्धमासाः; विंशति शब्दाहूनही हा डिनि प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—विंशिनः अङ्गिरसः.

प्रमाणवाचक, परिमाणवाचक आणि संख्या वाचक शब्दांहून 'ते आहे प्रमाण म्हणजे इयत्ता ज्याची' या अर्थी मात्रच् प्रत्यय होतो. परंतु त्या इयत्तेबद्दल संशय असला पाहिजे असें म्हणावें. उदा०—शममात्रम्, दिष्टिमात्रम् वितस्तिमात्रम्, कुडवमात्रम्, पञ्चमात्राः, दशमात्राः.

(वा. १) वतु-प्रत्ययान्त शब्दाहून स्वार्थीच द्वयसच् व मात्रच् हे प्रत्यय बाहुल्येंकरून होतात असें म्हणावें. उदा०— तावत् एव तावद्द्वयसम्; तावन्मात्रम् यावदेव यावद्द्वयसम्, यावन्मात्रम्.

(सू. ३९) येथें 'परिमाणे' असें कशाकरितां म्हटलें आहे ? तें म्हणूं नये. कारण 'प्रमाणे' असें मागून अनुवृत्तीनें येत आहे.

तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांना जें येथें आचार्यांनीं परिमाण-ग्रहण केलें आहे त्यावरून त्यांनीं असें ज्ञापित केलें आहे कीं, प्रमाण निराळें आणि परिमाण निराळें.

(श्लो. १) प्रमाण आणि परिमाण या शब्दांच्या अर्थामध्यें विशेष असल्यामुळें ह्या डावतु प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें प्रमाणापेक्षां निराळा परिमाण शब्द उच्चारला आहे. तेव्हा प्रमाण निराळें आणि परिमाण निराळें या गोष्टीला ज्ञापक देण्याचे कांहीं कारण नाहीं. कारण या दोन शब्दांच्या अर्थामध्यें फरक मागें (५।१।१९ पृ. २४३ पं २५) सांगितलाच आहे.

आणि म्हणूनच यन्मात्रम् व तन्मात्रम् येथें यद् व तद् या शब्दांहून 'प्रमाण' या अर्थी

---

५—येथें ति याचा लोप (६।४।१४२) झाला आहे. अङ्गिरस् हा वेदभाग आहे.

६—शममात्र म्हणजे सुमारें शमाइतकें. कुडव म्ह. पावशेर.

१—(सू. ३८) पुरुष आणि हस्तिन् या प्रमाण दर्शक शब्दाहून 'तें आहे प्रमाण ज्याचें' या अर्थी अण्, द्वयसच् दघ्नच् आणि मात्रच् हे प्रत्यय होतात. उदा०—पौरुषेयम्, पुरुषद्वयसम्, हास्तिनम्

१—(सू. ३९) यद्, तद् आणि एतद् या शब्दांहून 'तें आहे प्रमाण ज्याचें' या अर्थी वतुप् प्रत्यय होतो. उदा०—यत् परिमाणमस्य यावत्; तसेंच तावत् व एतावत्. येथें वतुप् प्रत्यय केल्यानंतर आत्व (६।३।९१) झालें आहे.

२—पूर्वाचार्यांनीं येथें वतुप् प्रत्ययाच्या ऐवजीं 'डावतु' प्रत्यय सांगितला आहे. त्यामुळें टिलोप होतो. ते आत्व करीत नाहींत.

भवति ॥

**भावः सिद्धश्च डावतोः ॥ १ ॥**

डावत्वन्ताच्च मात्रजादीनां भावः सिद्धो भवति ॥

**वतुप्प्रकरणे युष्मदस्मद्भ्यां छन्दसि सादृश्य उपसंख्यानम् ॥ १ ॥**

वतुप्प्रकरणे युष्मदस्मद्भ्यां छन्दसि सादृश्य उपसंख्यानं कर्तव्यम् । न त्वावाँ अन्यो दिव्यो न पार्थिवो न जातो न जनिष्यते । त्वावतः पुरूवसो । यज्ञं विप्रस्य मावतः । त्वत्सदृशस्य मत्सदृशस्येति ॥

**किमिदम्भ्यां वो घः ॥५।२।४०॥**

केन विहितस्य किमिदम्भ्यां वतुपो वो घत्वमुच्यते । एतदेव ज्ञापयत्याचार्यो भवति किमिदम्भ्यां वतुबिति यदयं किमिदम्भ्यामुत्तरस्य वतुपो वो घत्वं शास्ति ॥ अथवा योगविभागः करिष्यते । किमिदम्भ्यां वतुब्भवति । ततो वो घ इति । वश्चास्य घो भवतीति ॥

**किमः संख्यापरिमाणे डति च ॥ ५ । २ । ४१ ॥**

---

मात्रच् वगैरे प्रत्यय करण्याला अडथळा येत नाहीं.

शिवाय या डावतु-प्रत्ययान्त यावत् वगैरे शब्दांहून पुढें 'प्रमाण' या अर्थी मात्रच् वगैरे प्रत्यय अस्तित्वांत आले.

(वा. १) ह्या वतुप् प्रत्ययाच्या प्रकरणामध्ये युष्मद् व अस्मद् या शब्दांहून सादृश्य या अर्थी वेदामध्यें वतुप् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—न त्वावाँ अन्यो दिव्यो न पार्थिवो न जातो न जनिष्यते; त्वावतः पुरूवसो; यज्ञं विप्रस्य मावतः. येथें त्वावत् शब्दाचा तुझ्यासारखा, आणि मावत् शब्दाचा माझ्यासारखा असे अर्थ आहेत.

(सू. ४०) किम् व इदम् शब्दांच्या पुढील ज्या वतुप् प्रत्ययाच्या वकाराला घकार आदेश सांगितला आहे तो वतुप् प्रत्यय कोणत्या बरे शास्त्रानें सांगितला आहे?

ज्या अर्थी आचार्यांनीं किम् व इदम् शब्दांच्या पुढील वतुप् प्रत्ययाच्या वकाराला घकार आदेश सांगितला आहे त्या अर्थी त्यावरूनच असें सूचित होतें कीं, किम् व इदम् शब्दांहून परिमाण या अर्थी वतुप् प्रत्यय होतो.

अथवा येथें योगविभाग करतां येईल तो असा 'किमिदंभ्याम्' एवढेंच एक सूत्र होय. किम् व इदम् या शब्दांहून तें आहे परिमाण ज्याचें या अर्थी वतुप् प्रत्यय होतो असा त्याचा अर्थ होय. त्याच्या पुढें 'वो घः' असें दुसरें सूत्र होय. वतुप् प्रत्ययाच्या वकाराला घकार होतो असा त्याचा अर्थ होय.

---

३—प्रमाण व परिमाण एकच असेल तर यन्मात्रम् येथें मात्रच् प्रत्ययाचा बाध करून प्रकृत सूत्राने वतुप् प्रत्यय झाला असता.

४—तत् प्रस्थादिकं परिमाणमस्य तावत् (शेरभर धान्य) तेवढ्याच विस्ताराचा मातीचा ढीग या अर्थी त्या तावत् शब्दाहून प्रमाण अर्थी मात्रच् प्रत्यय होऊन तावन्मात्रः अयं मृद्राशिः असा प्रयोग होतो. जर वतुप् आणि मात्रच् यांचा अर्थ सारखाच असेल तर येथें दोन प्रत्यय होणार नाहींत.

१—(सू. ४०) किम् आणि इदम् या शब्दांच्या पुढील वतुप् प्रत्ययाच्या वकाराला घकार होतो. उदा०—किम् परिमाणमस्य कियान्. इदं परिमाणमस्य इयान्. येथें हा घकार झाल्यानतर त्याला इय् आदेश, (७।१।२) इदम् व किम् या शब्दाना ईश् व की आदेश (६।३।९०), आणि ईकाराचा लोप (६।४।१४८) होऊन इयत् व कियत् असे शब्द होतात

१—(सू ४१) किम् शब्दाचा अर्थ प्रश्न असा आहे. तो प्रश्न ज्या पदार्थांच्या संख्येच्या इयत्तेबद्दल असेल त्या अर्थी किम् शब्दाहून डति आणि वतुप् हे प्रत्यय होतात. उदा०—का संख्या येषां ते कति, कियन्तः पदार्थाः.

बहुष्विति वक्तव्यम् । इह मा भूत् । कियान् कियन्तौ ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । किमेतत्परिप्रश्ने वर्तते परिप्रश्नश्चानिर्ज्ञातेऽनिर्ज्ञातं च बहुषु । द्व्येकयोः पुनर्निर्ज्ञातम् । निर्ज्ञातत्वाद् द्व्येकयोः परिप्रश्नो न भवति परिप्रश्नाभावात्किमेव तावन्नास्ति कुतः प्रत्ययः ॥

**संख्याया अवयवे तयप्॥५।२।४२॥**

इह कस्मान्न भवति । बहवोऽवयवा अस्याः संख्याया इति । अवयवे या संख्येत्युच्यते न च काचित्संख्यास्ति यस्या बहुशब्दोऽवयवः स्यात् । ननु चेयमस्ति संख्येत्येव । नैषा संख्या संज्ञैषा ॥

**अवयवविधानेऽवयविनि प्रत्ययः ॥ १ ॥**

अवयवविधानेऽवयविनि प्रत्ययो भवतीति वक्तव्यम् । इह मा भूत् । पञ्चावयवाः दशावयवा इति ॥ अथावयविनीत्युच्यमानेऽवयवस्वामिनि कस्मान्न भवति । पञ्च पश्ववयवा देवदत्तस्येति । अवयवशब्दोऽयं गुणशब्दोऽस्येति च वर्तते तेन यं प्रत्यवयवो गुणस्तस्मिन्नवयविनि प्रत्ययेन भवितव्यम् । कं च प्रत्यवयवो गुणः । समुदायम् ॥ यद्येवमवयविनीत्यपि न

---

(सू. ४१) येथें 'बहुत्व संख्या असताना' असें म्हणावें. कारण, एकत्व किंवा द्वित्व विवक्षित असेल तर कियान् कियन्तौ येथें हा ड प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण, किम् शब्दाचा अर्थ प्रश्न असा आहे. आणि प्रश्न हा जी गोष्ट माहीत नसतो तिच्या संबंधानेच उत्पन्न होतो, व बहुत्व असतांनाच संख्या माहीत नाहीं असें होतें. दोन किंवा एक पदार्थ असेल तेथें संख्या माहीत असल्यामुळें प्रश्नच संभवत नाहीं. आणि प्रश्नच नसल्यामुळे किम् या शब्दाचाच प्रयोग होत नाहीं. मग त्याच्या पुढील प्रत्ययाचें नांव कशाला ?

(सू. ४२) 'या संख्येचे बहुत अवयव' येथें हा तयप् प्रत्यय कां होत नाहीं ?

पण अवयव-वाचक जी संख्या असें येथें म्हटलें आहे. आणि अशी तर संख्या एकही दिसत नाहीं कीं जिचा बहुशब्द अवयव असेल.

कां बरें ? संख्या हा शब्दच तसा आहे नौ ?

संख्या हा शब्द संज्ञा शब्द आहे. संज्ञा शब्द म्हणजे कांहीं संख्या नव्हे.

(वा. १) अवयव-वाचक जी संख्या तिच्याहून 'अवयवी' या अर्थी हा प्रत्यय होतो असें म्हणावे. कारण, पांच अवयव दहा अवयव इतकाच अर्थ विवक्षित असेल तेव्हां हा तयप् प्रत्यय न झाला पाहिजे.

पण 'अवयवी' या अर्थी प्रत्यय सांगितला तर अवयवी म्ह. अवयवांचा मालक या अर्थी हा तयप् प्रत्यय कां बरे होणार नाहीं ? उदा०— पाच पशूचे अवयव ज्या देवदत्ताच्या मालकीचे आहेत.

हा दोष येत नाहीं. कारण अवयव हा शब्द गुण-शब्द आहे. आणि 'अस्य' या पदाची येथें अनुवृत्ति आहे. तेव्हां तो अवयवरूपी गुण ज्याचा अवयव असेल त्या अवयवी याच अर्थी हा प्रत्यय होणार आहे.

तो अवयवरूपी गुण कोणाचा बरें अवयव असतो ?

अवयवी जो समुदाय त्याचाच तो अवयव असतो. मालकाचा काहीं तो अवयव नसतो.

असेंच जर आहे तर अवयवी या

---

१—(सू. ४२) संख्यावाचक शब्दाहून 'तितके आहेत अवयव ज्याचे' या अर्थी तयप् प्रत्यय होतो. उदा०—द्वौ अवयवौ यस्य तत् द्वितयम्

२—तेव्हां संख्यावाचक शब्दाहून 'अवयव' या अर्थी तयप् होतो असा सूत्राचा अर्थ नाहीं.

३—बहु, गण, वतु आणि डति हे संख्येचे अवयव आहेत असा अभिप्राय आहे.

वक्तव्यम् । अवयवेषु कस्मान्न भवति । अस्येति वर्तते ॥

## [ द्वित्रिभ्यां तयस्यायज्वा ॥ ५ । २ । ४३ ॥ ]

## उभादुदात्तो नित्यम् ॥५।२।४४॥

किमर्थमुदात्त इत्युच्यते । उदात्तो यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रत्ययस्वरेणाप्येष स्वरः सिद्धः । न सिध्यति । चितोऽन्त उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं प्रसज्येत ॥ अथोदात्त इत्युच्यमाने कुत एतदादेरुदात्तत्वं भविष्यति न पुनरन्तस्येति । उदात्तवचनसामर्थ्याद्यस्याप्राप्तः स्वरस्तस्य भविष्यति । कस्य चाप्राप्तः । आदेः । अन्तस्य पुनश्चित्स्वरेणैव सिद्धम् ॥

## तदस्मिन्नधिकमिति दशान्ताड्डः ॥ ५ । २ । ४५ ॥

इह कस्मान्न भवति । एकादश माषा अधिका अस्मिन्कार्षापणशत इति ॥

### अधिके समानजातौ

समानजातावधिक इष्यते ॥ अथेह

---

अर्थी हा प्रत्यय होतो असेंही मुद्दाम म्हणावयास नकोच.

पण तसें म्हटले नाहीं तर पांच अवयव इतक्याच अर्थाची विवक्षा असतांना हा प्रत्यय कां होणार नाहीं ?

अस्य या पदाची अनुवृत्ति आहे म्हणून होणार नाहीं.

( सू. ४४ ) येथें उदात्तः असें कशाकारितां म्हटलें आहे ?

ह्या अयच् प्रत्ययाचा आदि उदात्त झाला पाहिजे म्हणून म्हटलें आहे.

हा उपयोग बरोबर नाहीं. कारण, प्रत्ययस्वरानें- ( ३।१।३ ) ही आदि-उदात्त स्वर होईल.

तसा आदि उदात्त होणार नाहीं कारण, त्याचा अपवाद 'चितः' ( ६।१।१६३ ) यानें अन्त-उदात्त प्राप्त होतो.

पण येथें 'उदात्तः' असें म्हटलें तरी अयच् प्रत्ययाच्या आदीलाच उदात्त होतो हें कशावरून ? अयच् प्रत्ययाच्या अन्ताला उदात्त कां होत नाहीं ?

अन्ताला उदात्त 'चितः' यानें सिद्धच आहे. तेव्हा येथें जो मुद्दाम उदात्त सांगितला आहे त्याच्या सामर्थ्यास्तव अयच् प्रत्ययापैकीं ज्या वर्णाला उदात्त प्राप्त नाहीं त्यालाच होईल.

कोणाला बरें उदात्त प्राप्त नाहीं ?

आदि वर्णाला उदात्त प्राप्त नाहीं. अन्त वर्णाला तर चितः यानेंच उदात्त सिद्ध होत आहे.

( सू. ४५ ) 'एकादश माषाः अधिकाः अस्मिन् कार्षापणशते' येथें हा 'ड' प्रत्यय कां होत नाहीं ?

( श्लो. १ ) जे पदार्थ ज्या पदार्थांमध्यें अधिक असतील ते दोन्ही पदार्थ एका जातीचेच असले पाहिजेत. तसे असतील तरच हा प्रत्यय इष्ट आहे.

---

( सू. ४३ ) द्वि आणि त्रि या शब्दांच्या पुढील पूर्व सूत्रानें केलेल्या तयप् प्रत्ययाचे स्थानी अयच् आदेश विकल्पानें होतो. उदा०—द्वौ अवयवौ यस्य तत् द्वयम्, द्वितयम्.

१—( सू ४४ ) उभ शब्दाच्या पुढील तयप् प्रत्ययाचे स्थानीं अयच् आदेश नित्य होतो, आणि त्या अयच् प्रत्ययाचा आदि वर्ण उदात्त होतो. उदा०—उभौ अवयवौ यस्य तत् उभयम्.

१—( सू. ४५ ) दशन् शब्द अंतीं असलेल्या संख्यावाचक शब्दाहून तितके आहेत अधिक ज्यामध्यें या अर्थी ड प्रत्यय होतो. उदा०—एकादश माषाः अधिकाः अस्मिन् माषशते तत् एकादशम् शतम्.

२—तेव्हा माष हे जर माषामध्येंच अधिक असते, किंवा कार्षापणामध्ये जर कार्षापणच अधिक असते तर हा प्रत्यय झाला असता.

कस्मान्न भवति । एकादश कार्षापणा अधिका अस्यां कार्षापणत्रिंशतीति ॥

इष्टं शतसहस्रयोः ।

शतसहस्रयोराधिक्य इष्यते ॥ अथेहै-कादशं शतसहस्रमिति कस्याधिक्ये भवितव्यम् ।

यस्य संख्या तदाधिक्ये डः
कर्तव्यो मतो मम ॥

यदि तावच्छतानि संख्यायन्ते शताधिक्ये भवितव्यम् । अथ सहस्राणि संख्यायन्ते सहस्राधिक्ये भवितव्यम् ॥

डविधाने परिमाणशब्दानामाधिक्यस्याधिकरणाभावादनिर्देशः॥ १ ॥

डविधाने परिमाणशब्दानामाधिक्यस्याधिकरणाभावादनिर्देशः । अगमको निर्देशोऽनिर्देशः । न ह्येकादशानां शतमधिकरणम् ॥

सिद्धं तु पञ्चमीनिर्देशात् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । पञ्चमीनिर्देशात् । पञ्चमीनिर्देशः कर्तव्यः । तदस्मादधिकमिति ॥ स तर्हि पञ्चमीनिर्देशः कर्तव्यः। न कर्तव्यः।यद्यपि तावद्व्यापके वैषयिकेवाधिकरणत्वे संभवो नास्त्यौपश्लेषिकमधिकरणं विज्ञास्यते । एकादश

---

तरी पण 'एकादश कार्षापणाः अधिकाःअस्यां त्रिंशति' येथें हा ड प्रत्यय कां होत नाहीं ?

शतामध्यें किंवा सहस्रामध्यें जर काही अधिक पदार्थ दाखववायाचे असतील तरच हा प्रत्यय इष्ट आहे.

आतां एकादश अधिकाः अस्मिन् तत् एकादशं शतसहस्रम्[३] या उदाहणामध्यें अकरा जे अधिक सांगितले आहेत ते काय शेकडे समजावे किंवा हजार समजावे ?

ज्यांची संख्या दाखवावयाची आहे त्यांचे आधिक्य असतांना हा 'ड' प्रत्यय मान्य आहे. जर येथें शेकडे किती ते सहस्र शब्दानें दाखवावयाचे असतील तर अकरा शेकडे अधिक असा अर्थ 'ड' प्रत्ययाचा होईल. आणि जर सहस्र किती तें शत शब्दानें दाखवावयाचे असतील तर अकरा सहस्र अधिक असा 'ड' प्रत्ययाचा अर्थ होईल.

(वा. १) शत, सहस्र या परिमाणशब्दांपासून प्रतीत झालेले जे तितके पदार्थ ते त्यांहून ज्यास्त पदार्थांचे अधिकरण होत नसल्यामुळें त्या 'ड' प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'अस्मिन्नधिकम्' हा अनिर्देश होय. ज्या निर्देशापासून नीट अर्थ मनात येत नाहीं तो अनिर्देश समजावा कारण, अस्मिन् अधिकम् येथें अधिक पदानें घेतलेले जे अकरा वगैरे त्यांचे, अस्मिन् या पदानें घेतलेले जे शत किंवा सहस्र ते त्या अधिकांचें अधिकरण होत नाहीं.

(वा. २) हें सिद्ध होत आहे. तें कसें ?

तें असें कीं ह्या सूत्रामध्यें अस्मिन् या सप्तम्यन्त पदाच्या ऐवजीं पञ्चम्यन्त पदाचा निर्देश करावा. म्हणजे 'तस्मादधिकम्' असें म्हणावें.

तर मग तसा पञ्चमी-निर्देश केला पाहिजे.

करावयास नको; कारण तीनें प्रकारच्या अधिकरणांपैकीं व्यापक आणि वैषयिक ह्या दोन प्रकारचें अधिकरण येथें संभवत नसलें तरी औपश्लेषिक अधिकरण संभवतें. अकरा अधिक

---

३—शतांचें सहस्र तें शतसहस्र म्हणजे एक लक्ष असा अर्थ होतो. आणि सहस्रांचे शत तें शतसहस्र म्हणजे एक लक्षच अर्थ होतो. सहस्राणां शत शतसहस्रम् येथे 'सख्याया अल्पीयसः' ( २ ।२ । ३४ वा ८ ) यानें शत शब्द पूर्वी झाला आहे. तें वार्तिक द्वंद्वामध्येंच येतें असा नियम नाहीं, असें कैयटाचें म्हणणें आहे. आता शत च सहस्रं च शतसहस्रम् या द्वंद्वामध्यें शत आणि सहस्र या दोन्ही संख्या ज्या पदार्थाच्या असतील ते पदार्थ अकरा अधिक असा अर्थ होतो तेथें संशयच येत नाहीं.

४—पुढें ६।१।७२ टीप २ पाहा.

कार्षापणा उपश्लिष्टा अस्मिञ्शत एकादशं शतम् ॥

**शदन्तविंशतेश्च ॥ ५ । २ । ४६ ॥**

किमर्थं शद्ग्रहणे ऽन्तग्रहणम् ।

**शद्ग्रहणेऽन्तग्रहणं प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेरधिकार्थम् ॥ १ ॥**

शद्ग्रहणे ऽन्तग्रहणं क्रियते । प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेस्तदन्तस्य ग्रहणं भवतीतीह न प्राप्नोति एकत्रिंशं शतम् । इष्यते चात्रापि स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीत्यन्तग्रहणम् । एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**संख्याग्रहणं च ॥ २ ॥**

संख्याग्रहणं च कर्तव्यम् । इह मा भूत । गोत्रिंशदधिकास्मिञ्शत इति ॥

**विंशतेश्च ॥ ३ ॥**

विंशतेश्चान्तग्रहणं कर्तव्यम् । इहापि यथा स्यात् । एकविंशं शतम् । चकारात्संख्याग्रहणं च कर्तव्यम् । इह मा भूत । गोविंशतिरधिकास्मिञ्शत इति ॥

---

कार्षापण हे ज्या कार्षापण शताच्याजवळ आहेत ते एकादशशत होय.

( सू. ४६ ) ह्या सूत्रामध्यें शत् शब्दाच्या पुढें अन्त शब्द कशाकरितां घातला आहे ?

( वा. १ ) शत् शब्दाच्या पुढे अन्त शब्द घातला आहे तो अशाकरितां कीं ' प्रत्ययाचें ग्रहण जेथें केलें असेल तेथें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल त्या प्रकृतीला आरंभ करूनच तो प्रत्यय शेवटीं असलेला जो समुदाय त्याचेंच तेथें ग्रहण होतें' अशी परिभाषा आहे. म्हणून एकत्रिंशं शतम् येथे प्रकृत सूत्रानें ड प्रत्यय होणार नाहीं आणि तेथें देखील हा ड प्रत्यय इष्ट आहे. तेव्हां त्याकरितां कांहींतरी यत्न केल्याशिवाय ती गोष्ट सिद्ध होणार नाहीं म्हणून येथें अन्तग्रहण केलें आहे. अशाकरितां हा अन्त शब्द येथें घातला आहे.

हा उपयोग आहे खरा, मग आतां पुढें तुमचें काय म्हणणें आहे ?

( वा २. ) येथें संख्याग्रहण करावें. कारण शत् शब्दान्त जो संख्यावाचक शब्द त्याहूनच हा ' ड ' प्रत्यय झाला पाहिजे. 'गोत्रिंशत् अधिक आहे ज्या शतामध्यें ' या अर्थी गोत्रिंशत् या शब्दाहून हा 'ड' प्रत्यय न झाला पाहिजे.

( वा. ३ ) विंशति शब्दासंबंधानेंही अन्तग्रहण केलें पाहिजे. कारण एकविंशतिः अधिका अस्मिन् शते एकविंशं शतम् येथें एकविंशति शब्दाहूनही हा ड प्रत्यय झाला पाहिजे. शदन्त शब्दाप्रमाणें विंशतिशब्दान्त शब्द ही संख्यावाचकच असला पाहिजे असें विंशतेश्च या वार्तिकांतील च शब्दानें सुचविलें आहे. कारण 'गोविंशति ( वीस गाई ) अधिक आहे ज्या शतामध्यें ' या अर्थी गोविंशति या शब्दाहून ड प्रत्यय न झाला पाहिजे.

---

१—( सू ४६ ) शत शब्द शेवटीं असलेला जो संख्यावाचक शब्द आणि विंशति शब्द यांहून ' तितके आहेत अधिक ज्यामध्यें ' या अर्थी ड प्रत्यय होतो. उदा०—त्रिंशत् अधिका अस्मिन् शते त्रिंशं शतम् ; विंशं शतम्.

२—त्रिदशत् शब्दाहून शत् प्रत्यय आणि त्रिदशत् शब्दाला त्रिन् आदेश होऊन त्रिंशत् शब्द सिद्ध (५।१।५९) झाला आहे. तेव्हां त्रिंशत् शब्दाहून ड प्रत्यय होईल. परंतु एकत्रिंश शतम् येथे त्रिदशत् या प्रकृतीच्या मागें एक शब्द ज्यास्त आला असल्यामुळें एकत्रिंशत् या समुदायाचें शत्प्रत्ययग्रहणानें ग्रहण होणार नाहीं. येथें अन्त शब्द घातला म्हणजे मात्र शत् याच्या मागें कितीही शब्द असले तरी शत्शब्दान्त प्रातिपदिक असलें म्हणजे त्याहून ड प्रत्यय करता येतो.

## संख्याया गुणस्य निमाने मयट् ॥ ५ । २ । ४७ ॥

### निमाने गुणिनि ॥ १ ॥

निमाने गुणिनीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । गुणेषु मा भूत् ॥

### भूयसः ॥ २ ॥

भूयस इति च वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । भूयसो वाचिकायाः संख्याया उत्पत्तिर्यथा स्यादल्पीयसो वाचिकायाः संख्याया उत्पत्तिर्मा भूदिति ॥

### एकोऽन्यतरः ॥ ३ ॥

एकश्चेदन्यतरो भवतीति वक्तव्यम् । इह मा भूत् । द्वौ यवानां त्रय उदश्वित इति ॥

### समानानाम् ॥ ४ ॥

समानानां चेति वक्तव्यम् । इह मा भूत् । एको यवानामध्यर्ध उदश्वित इति ॥

तत्तर्हीदं बहु वक्तव्यम् । न वक्तव्यम् । यत्तावदुच्यते गुणिनीति वक्तव्यमिति न वक्तव्यम् । गुणेषु कस्मान्न भवति । अस्येति वर्तते ॥ यदुक्तं भूयस इति

---

(सू. ४७ वा. १) 'किंमत ज्या भागाची' या अर्थीं सांगितलेला हा मयट् प्रत्यय त्या 'भाग' या अर्थीं न करतां 'तो ज्या वस्तूचा भाग आहे त्या वस्तू' या अर्थीं होतो असें म्हणावें.

याचा उपयोग काय ?

त्या भाग या अर्थीं प्रत्यय न होणें हाच त्याचा उपयोग होय.

(वा. २) ज्या संख्यावाचक शब्दांहून हा प्रत्यय होतो ती संख्या, विक्रेय वस्तूच्या भागाच्या संख्येपेक्षां अधिक असली पाहिजे असें म्हणावें.

याचा उपयोग काय ?

अधिकसंख्यावाचक शब्दांहूनच हा प्रत्यय झाला पाहिजे; न्यूनसंख्यावाचक शब्दांहून हा प्रत्यय न झाला पाहिजे, हा त्याचा उपयोग होय.

(वा. ३) ज्या संख्यावाचक शब्दाहून हा प्रत्यय होतो ती संख्या आणि विक्रेय वस्तूच्या भागाची संख्या या दोन संख्यांपैकीं कोणती तरी संख्या म्हणजे विक्रेय भागाची संख्या ही एकत्वयुक्त संख्याच असली पाहिजे. कारण 'यवांचे दोन भाग किंमत ही आहे ताकाच्या तीन भागांची' या अर्थीं 'यवानां द्वौ भागौ निमानं येषां त्रयाणामुदश्विद्भागानाम्' असें वाक्यच राहिलें पाहिजे.

(वा. ४) त्या दोन्ही भागांची संख्या पुरी असली पाहिजे. कारण यवांचे दोन भाग आणि ताकाचा दीड भाग अशी विवक्षा असेल तेथें हा प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग आतां ह्या सूत्रांत अशी बरीच भर घातली पाहिजे.

भर घालावयास नको. तें असें कीं—आरंभीं 'गुणिनि' (वा. १) असें म्हणावें असें जें म्हटलें आहे ते म्हणावयास नको.

पण मग गुण म्हणजे भाग याच अर्थीं प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

अस्य याची अनुवृत्ति आहे म्हणून होत

---

१—(सू. ४७) कोणत्याही वस्तूच्या एका भागाची किंमत म्हणून दुसऱ्या कोणत्याही पदार्थाचे जितके भाग धरले जातील त्या भागाच्या संख्येचा दर्शक जो संख्यावाचक शब्द त्याहून 'तितक्या भागांनीं विकत घेतला जाणारा आहे भाग ज्या वस्तूचा ती वस्तू' या अर्थीं मयट् प्रत्यय होतो. उदा०—यवानां द्विमयम् उदश्वित्. उदश्वित् म्हणजे ताक. यवाच्या दोन भागानीं ताकाचा एक भाग विकत घेतला जातो.

२—येथें ज्याची किंमत त्याचें अस्य या पदानें ग्रहण होतें. आता चार आण्याचें दूध तसेंच चार आण्यांचें लोणी असें म्हणतात; तेथें जरी दुधाचा एक शेर वगैरे कांही भागच चार आण्याला मिळतो, तसेंच लोण्याचा पावशेर वगैरे कांही भागच चार आण्यांना मिळतो

वक्तव्यमिति न वक्तव्यम् । अल्पीयसो वाचिकायाः संख्याया उत्पत्तिः कस्मान्न भवति । अनभिधानात् ॥ यदुक्तमेकश्चेदन्यतरो भवतीति वक्तव्यमिति न वक्तव्यम् । कस्मान्न भवति द्वौ यवानां त्रय उदश्वित इति । तन्त्रं विभक्तिनिर्देशः ॥ यदप्युच्यते समानानामिति वक्तव्यमिति न वक्तव्यम् । कस्मान्न भवति एको यवानामध्यर्धं उदश्वित इति । अनभिधानात् ॥

निमेये चापि दृश्यते ।

निमेये चापि प्रत्ययो दृश्यते । द्विमया यवाः । त्रिमयाः ॥ किं पुनरिह निमानं किं निमेयं यावतोभयं त्यज्यते । सत्यमेवमेतत् । कचित्तु काचित्प्रसृततरा गतिर्भवति । तद्यथा । समाने त्यागे धान्यं विक्रीणीते यवान्विक्रीणीत इत्युच्यते न कश्चिदाह कार्षापणं विक्रीणीत इति ।

---

नाहीं. तसेंच भूयसः (वा. २) असें जें म्हटलें आहे तेंही म्हणावयास नको.

पण तसें म्हटलें नाहीं तर न्यून संख्येच्या वाचक शब्दाहून हा मयट् प्रत्यय कां होत नाहीं ?

अनभिधानास्तव होत नाहीं. तसेंच एकोऽन्यतरः (वा. ३) म्हणजे विक्रेय वस्तूच्या भागाची संख्या एक हीच असली पाहिजे असें जें म्हटलें आहे तेंही म्हणावयास नको.

पण तसें म्हटलें नाहीं तर 'यवांचे दोन भाग ही किंमत ताकाच्या तीन भागांची' अशी विवक्षा असेल तेव्हां हा प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

सूत्रामध्यें 'गुणस्य' असें जें एकवचन केलें आहे त्यावरून तो एकच भाग घेतला जाईल. तसेंच समानानाम् (वा. ४) म्हणजे संख्या पुरी पाहिजे असें जें म्हटलें आहे तेंही म्हणावयास नको.

पण तसें म्हटलें नाहीं तर 'यवांचा एक भाग ही किंमत ताकाच्या दीड भागाची' अशी विवक्षा असतांना हा प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

अनभिधानास्तव होत नाहीं.

(वा.) विक्रेय भागांची जी संख्या त्या संख्येचा दर्शक जो संख्यावाचक शब्द त्याहूनही हा मयट् प्रत्यय झालेला दिसतो. उदा०— द्विमयाः यवाः, त्रिमयाः यवाः उदश्वितः.

पण, काय हो, येथें यव आणि उदश्वित् यांमध्यें निमान कोणतें आणि निमेय कोणतें म्हणजे किमत कोणती आणि विक्रेय वस्तू कोणती हें कसें बरें समजावें ? कारण दोघांनींही दोन्ही पदार्थ परस्परांना दिले जातात.

हें खरें आहे, पण त्यांतच एखाद्या वस्तूला निमान म्हणण्याविषयीं वक्त्याची शीघ्र प्रवृत्ति होते. असे पहा कीं, आपल्याच मालकीचा पदार्थ दुसऱ्याला देऊन त्याच्या ऐवजीं दुसरा घ्यावयाचा ही स्थिति दोघांही माणसाची सारखीच असतांना त्यांपैकीं एकजणाला धान्य विकतो, यव विकतो असे म्हणतात; पण त्याची किंमत देणाऱ्या दुसऱ्याला रुपया विकतो असें कोणी म्हणत

---

तरी चार आण्याचें दूध अथवा लोणी असा त्या वस्तूच्या नांवानें जसा व्यवहार केला जातो तशी येथे अस्य या पदानें ती वस्तु घेतां येईल. अशा रीतीने वस्तु या अर्थी प्रत्यय सिद्ध होतो. आता 'वस्तूचा भाग' या अर्थी मात्र अनभिधानास्तव प्रत्यय होत नाहीं असें समजावें

३—कोणत्याही वस्तूचा एक भाग हीच किमत भरून त्या किंमतीनें विकत घेतलें जाणारे दुसऱ्या कोणत्याही पदार्थाचे जितके भाग असतील त्या भागांच्या संख्येचा दर्शक जो संख्यावाचक शब्द त्याहून 'ते भाग ज्या वस्तूच्या एक भागानें विकत घेतले जातील ती वस्तु' या अर्थी मयट् प्रत्यय होतो. 'ताकाच्या एका भागानें यवाचे दोन भाग किंवा तीन भाग विकत घेतले जातात' असा अर्थ होतो.

अथवा येनाधिगम्यते तन्निमानं यदधिगम्यते तन्निमेयम् ॥

**तस्य पूरणे डट् ॥ ५ । २ । ४८ ॥**

**तस्य पूरण इत्यतिप्रसङ्गः ॥ १ ॥**

तस्य पूरण इत्यतिप्रसङ्गो भवति । इहापि प्राप्नोति । पञ्चानामुष्ट्रिकाणां पूरणो घट इति ॥

**सिद्धं तु संख्यापूरण इति वचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । संख्यापूरण इति वक्तव्यम् । एवमपि घटे प्राप्नोति संख्येयं ह्यसावद्भिः पूरयति । संख्यापूरण इति ब्रूमो न ब्रूमः संख्येयपूरण इति ॥

**यस्य वा भावादन्यसंख्यात्वं तत्र ॥ ३ ॥**

अथवा यस्य भावादन्या संख्या प्रवर्तते तत्रेति वक्तव्यम् ॥ एवमपि द्वितीये ऽध्यायेऽष्टम इति प्राप्नोति सर्वेषां हि तेषां भावात्संख्या प्रवर्तते । चरमोपजाते पूर्वस्मिंश्चानपगत इति वक्तव्यम् ॥ एवमपि

---

नाहींत. अथवा ज्या साधनानें दुसरा पदार्थ प्राप्त व्हावा अशी इच्छा होते त्या साधनाला निमान म्हणजे किंमत म्हणतात आणि त्या दुसऱ्या पदार्थाला ह्मणजे विकत घेतली जाणारी जी वस्तु तिला निमेय असें ह्मणतात.

( सू. ४८ वा. १ ) येथें 'तस्य पूरणे' एवढेंच म्हटलें असल्यामुळे दोष येतो. 'पञ्चानामुष्ट्रिकाणां पूरणः घटः' येथेंही हा डट् प्रत्यय प्राप्त होत आहे.

( वा. २ ) हे सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं—'संख्यापूरणे' असे सूत्रामध्यें ह्मणावें.

तरी देखील पञ्चानामुष्ट्रिकाणां पूरण:घट:येथे डट् प्रत्यय प्राप्त होत आहेच.

प्राप्त होत नाहीं. कारण, संख्येय जी पांचवी उष्ट्रिका तिचें पूरण हा घट पाण्याच्या योगानें करीतें आहे. आम्ही तर येथें संख्येचें पूरण असताना असें म्हणत आहों;संख्येय पदार्थांचें पूरण असतांना असें म्हणत नाहीं.

( वा. ३ ) अथवा, जो पदार्थ जवळ आल्यानें निराळी संख्या प्रतीत होते त्या संख्यावाचक शब्दाहून तो पदार्थ या अर्थी हा डट् प्रत्यय होतो असें म्हणावें.

तरी पण दुसऱ्या अध्यायालाही अष्टम असें म्हणतां येईल असा दोष येतोच. कारण जसें एका पदार्थाजवळ दुसरा पदार्थ दिसला कीं तेथें द्वित्व ही संख्या प्रतीत होते तसें दुसऱ्या पदार्थापासून आठव्या पदार्थापर्यंत सर्वेच पदार्थ दिसले ह्मणजे आठ ही संख्या प्रतीत होणार.

तर मग येथें असें म्हणावें कीं जी सख्या प्रतीत होण्याला अन्य पदार्थांचें सानिध्य लागत असेल त्यांत पूर्वीच्या पदार्थांचें सानिध्य कायम असून शेवटीं ज्या पदार्थाचें सानिध्य लागतें त्या अर्थी त्या संख्यावाचक शब्दाहून डट् प्रत्यय होतो.

---

१—( सू. ४८ ) संख्यावाचक शब्दाहून त्या संख्येचें पूरण करणारा संख्येय पदार्थ या अर्थी डट् प्रत्यय होतो. उदा०—पञ्चाना पूरणः पञ्चमः. पांच संख्येला पूर्ण करणारा म्हणजे पाचवा असा अर्थ आहे.

२—पांच उष्ट्रिकामध्यें पाणी भरण्याला पुरेल इतका मोठा हा घट आहे उष्ट्रिका म्हणजे पाणी भरण्याची कातड्याची पिशवी ( उद्योत ).

३—चार उष्ट्रिकाना पुरेल इतकें पाणी इतर पात्रामध्ये सामवतें. पण पाचव्या उष्ट्रिकेलाही पुरेल असा हा मोठा घट आहे. तेव्हां ह्या घटानें पाच सख्येच पूरण होत नाही तें पांचव्या उष्ट्रिकेनेच होत आहे त्या पांचव्या उष्ट्रिकेचें पूरण ह्या घटानें केलें जात आहे.

४—अष्टम हे एक उदाहरण कांहीं तरी दाखवावयाचें म्हणून दाखविलें आहे. दुसऱ्या अध्यायाला तृतीय, चतुर्थ असे पुढील सर्वच शब्द लागू होतील असें समजावे.

एकादशीद्वादश्यौ सौविष्टकृती इदं द्वितीयमिदं तृतीयम् दश दशमानीति न सिध्यति । सूत्रं च भिद्यते ॥

यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं तस्य पूरण इत्यतिप्रसङ्ग इति । परिहृतमेतत्सिद्धं तु संख्यापूरण इति वचनादिति । तत्तर्हि संख्याग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । संख्याया गुणस्य निमाने मयट् [ ४७ ] इति ॥ एवं तर्हि नेयं वृत्तिरुपालभ्यते । किं तर्हि । वृत्तिस्थानमुपालभ्यते । वृत्तिरेवात्र न प्राप्नोति । किं कारणम् । प्रत्ययार्थाभावात् । नैष दोषः । वचनात्स्वार्थिको भविष्यति ॥ अथवा पूर्वस्याः संख्यायाः परापेक्षाया उत्पत्तिर्वक्तव्योत्तरा च संख्यादेशो वक्तव्यः ॥ अथवा

---

तरी पण ऐकादशीद्वादश्यौ सौविष्टकृती, इदं द्वितीयमिदं तृतीयम्, दश दशमानि हीं उदाहरणें सिद्ध होणार नाहींत हा दोष येतोच. शिवाय सूत्र फिरवावें लागणारच.

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण मूळचें सूत्र कायम ठेवलें तर ' तस्य पूरण इत्यतिप्रसङ्गः ' ( वा. १ ) असा दोष दाखविला आहे ना ?

सिद्धं तु सख्यापूरण इति वचनात्' (वा.२) असा त्या दोषाचा परिहारही केला आहेच.

तर मग एकंदरींत प्रकृत सूत्रामध्यें संख्याग्रहण केलें पाहिजे.

संख्याग्रहण करावयास नको. कारण मागून अनुवृत्तीनें ते येत आहे.

मागें संख्याग्रहण कोठें बरें आहे ?

' संख्याया गुणस्य निमाने मयट् ' या मागच्याच सूत्रात आहे.

तर मग आता पञ्चानामुष्ट्रिकाणां पूरणः घटः येथे वृत्ति होईल हा दोष वार्तिककारांनीं दिला आहे असें समजूं नये. तर पञ्चमः सप्तमः वगैरे ज्या ठिकाणीं ही वृत्ति इष्ट आहे त्या उदाहरणासंबंधानेंच ' तस्य पूरण इत्यतिप्रसङ्गः ' ( वा. १ ) असा आक्षेप वार्तिककारानीं घेतला आहे असें समजावें. तो असा कीं इष्ट उदाहरणांमध्यें डट् वगैरे प्रत्यय होऊन जी वृत्ति होते तीच होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं या डट् वगैरे प्रत्ययांचा प्रकृतीपेक्षा निराळा असा कांहींच अर्थ दिसत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण प्रत्यय जर सांगितलाच आहे तर तो स्वार्थींच होईल. अथवा पूर्वीच्या सख्यावाचक शब्दाहून पुढील सख्येला दाखविणारा प्रत्यय होईल. आणि

---

५—अकरावी आणि बारावी या स्विष्टकृत् आहुती आहेत येथें अकरा ही सख्या बारा या सख्येबरोबरच प्रतीत होत असल्यामुळें त्या अकरा या संख्येचें ज्ञान होण्याला अकराव्या पदार्थाचे सांनिध्य हे शेवटी आहे असें धरतां येत नाही. म्हणून एकादशी या शब्दामध्यें डट् प्रत्यय 'अकरावी आहुती' या अर्थी होणार नाहीं. तसेंच पाचामध्यें हें दुसरे, हे तिसरे, असें जेव्हा द्वित्व व त्रित्व या संख्येचें ज्ञान पाच या सख्येबरोबर होतें तेव्हां द्वित्व संख्येचे ज्ञान होण्याला दुसऱ्या पदार्थाचें सांनिध्य हें शेवटचे धरता येत नाही; व त्रित्व सख्येचे ज्ञान होण्याला तिसऱ्या पदार्थाचें सांनिध्य हें शेवटचें धरतां येत नाही. तसेंच दहा पदार्थांची एक ओळ अशा शभर पदार्थांच्या दहा ओळी मांडल्या असतां तेथे दहावे पदार्थ दहा आहेत असें ज्ञान होतें. तेथें दहावे ही दहा सख्या प्रतीत होण्याला प्रत्येक ओळींतील दहाव्या पदार्थाचें ज्ञान हें शेवटचें धरता येत नाहीं. त्यामुळें दशम शब्दामध्ये डट् प्रत्यय होणार नाहीं.

६—पञ्चन् याचा पांच असा अर्थ आहे. आणि त्या पांचापेक्षा निराळा असा पञ्चम शब्दापासून कांहींच अर्थ मनात येत नाहीं. तेव्हा चतुर्णां पूरणः पञ्चमः असा पांचवा पदार्थ हा चारांचें पूरण करणारा अशी प्रतीति होते.

न्यूने ऽयं कृत्स्नशब्दो द्रष्टव्यः । चतुर्षु पञ्चशब्दः ॥ अथवा सर्व एव द्व्यादयो ऽन्योऽन्यमपेक्षन्ते । यद्येवं द्वितीयेऽध्याये ऽष्टम इति प्राप्नोति । भवत्येव ॥

प्रकृत्यर्थाद्बहिः सर्वा
वृत्तिः प्रायेण लक्ष्यते ॥
पूरणे स्यात्कथं वृत्ति-
र्वचनादिति लक्ष्यताम् ॥ १ ॥
तस्याः पूर्वा तु या संख्या
तस्या भवतु तद्धितः ।
आदेशश्चोत्तरा संख्या
तथा न्याय्या भविष्यति ॥ २ ॥
न्यूने वा कृत्स्नशब्दोऽयं
पूर्वस्यामुत्तरा यदि ।
सामर्थ्यं च तया तस्या
स्तथा न्याय्या भविष्यति ॥ ३ ॥
अन्योऽन्यं वा व्यपाश्रित्य
सर्वस्मिन्द्व्यादयो यदि ।
प्रवर्तन्ते तथा न्याय्या
वृत्तिर्भवति पूरणे ॥ ४ ॥
बहूनां वाचिका संख्या
पूरणश्चैक इष्यते ।

---

त्या शब्दाला पुढील संख्येचा वाचक शब्द आदेश होईल[७]. अथवा जी संख्या पुरी होते. असें जो शब्द दाखवितो तो शब्द वृत्तीमध्यें त्या संख्येपेक्षां कमी जी मागची संख्या त्या अर्थाचा समजावा. उदा० — पञ्चम या वृत्तीमधील पञ्चन् हा शब्द चार या अर्थाचा समजावा. अथवा द्वि त्रि वगैरे सर्वच शब्द एकमेकाची अपेक्षा करतात.

पण असें असेल तर आठ पदार्थांतील जो दुसरा पदार्थ त्यालाही इतर सातांच्या मानानें आठवा असें म्हणता येईल.

हा दोष नव्हेच; इतर सातांच्या मानानें आठवा असा शब्द सर्वांनाच लागतो व तें इष्टच आहे.

( श्लो. १ ) ह्या तद्धित वृत्तीमध्यें प्रकृतीच्या अर्थापेक्षां प्रत्ययाचा अर्थ बहुधा निराळा दिसतो. तेव्हां येथें पूरण हा अर्थ प्रकृतीच्या अर्थापेक्षां निराळा नसल्यामुळें येथें वृत्ति कशी होते अशी शंका येते खरी, पण येथें सामर्थ्यास्तव स्वार्थीं प्रत्यय होईल.

( श्लो. २ ) विवक्षित संख्येपेक्षा पूर्वीची जी संख्या तद्वाचक शब्दाहून हा पूरण प्रत्यय करून त्या शब्दाला पुढील संख्यावाचक शब्द आदेश केला तर ही वृत्ति बरोबर जुळणार आहे.

(श्लो. ३) अथवा, येथें वृत्तीमधील सर्वच संख्यावाचक शब्द न्यूनसंख्यावाचक घेतले म्हणजे जर पुढील संख्या–शब्द पूर्व संख्येचा वाचक घेतला तर त्या पूर्व संख्येचा पूरण प्रत्ययार्थाशीं अन्वय बरोबर जुळून येईल.

( श्लो. ४ ) अथवा द्वि, त्रि वगैरे सर्वच शब्द समुदायांतील प्रत्येकाला इतरांच्या अपेक्षेनें लावता येतात. म्हणून समुदाय हा प्रकृत्यर्थ घेऊन त्यांतील अवयव हा प्रत्ययार्थ घेतला म्हणजे वृत्ति बरोबर जमते.

( श्लो. ५ ) संख्यावाचक प्रकृति ही त्या सर्व अर्थाची वाचक आहे आणि त्यांतील एक पदार्थ हा प्रत्ययार्थ पूरण आहे. तेव्हा

---

७—चतुर्णां पूरणः असा विग्रह करून त्या चतुर् शब्दाहून डट् प्रत्यय करून त्या चतुर् शब्दाला पञ्चन् शब्द आदेश करावा.

८—जसें उजव्या हातामुळें डावा हात दुसरा होतो तसें उजवा हातही डाव्या हातामुळे दुसरा होणारच. पांच पदार्थांपैकीं इतर चौघांच्या अपेक्षेनें पाचवा असे पाचानाही प्रत्येकी म्हणता येतें तेव्हां पञ्चम या वृत्तीमध्यें ‘ पाच मिळून समुदाय ’ हा प्रकृतीचा अर्थ आणि ‘ त्यांतील कोणी तरी एक ’ हा प्रत्ययाचा अर्थ असा भेद कल्पून वृत्ति करण्यास हरकत नाहीं. स्वार्थीं प्रत्यय करावयास नको.

अन्यत्वादुभयोर्न्याय्या वार्क्षी शाखा निदर्शनम् ॥ ५ ॥

**नान्तादसंख्यादेर्मट् ॥ ५।२।४९ ॥**

**मडादिषु यस्यादिस्तन्निर्देशः ॥ १ ॥**

मडादिषु यस्यादिः क्रियते तन्निर्देशः कर्तव्यः । अस्यादिर्भवतीति वक्तव्यम् । अक्रियमाणे प्रत्ययाधिकारात्प्रत्ययोऽयं विज्ञायेत । तत्र को दोषः ।

**प्रत्ययान्तरे हि स्वरे दोषः ॥२॥**

प्रत्ययान्तरे हि सति स्वरे दोषः स्यात् । विंशतितमः एष स्वरः प्रसज्येत विंशतितम इति चेष्यते ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । प्रकृतं डड्ग्रहणमनुवर्तते । क्व प्रकृतम् । तस्य पूरणे डट् [ ४८ ] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । नान्तादित्येषा पञ्चमी डडिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [ १.१.६७ ] इति । प्रत्ययविधिरयं न च प्रत्ययविधौ पञ्चम्यः प्रकल्पिका भवन्ति । नायं प्रत्ययविधिः । विहितः प्रत्ययः प्रकृतश्चानुवर्तते ॥

---

समुदाय आणि त्यांतील अवयव यामध्यें भेदाची कल्पना करून वृत्ति बरोबर आहे असें म्हणावें. वृक्षस्य इयं वार्क्षी शाखा ही तद्धित वृत्ति वृक्ष आणि त्याची शाखा यांमध्यें भेदाची कल्पना करून केली जाते. ती येथें उदाहरण म्हणून घ्यावी.

( सू. ४९ वा. १ ) हे मट् वगैरे आगम ज्याचे आदि अवयव होतात त्याचा निर्देश केला पाहिजे. म्हणजे डट् प्रत्ययाचा आदि-अवयव मट् आगम होतो असें म्हणावें. तसें म्हटलें नाहीं तर प्रत्ययः ( ३।१।१ ) असा अधिकार मागून चालू असल्यामुळें मट् हा स्वतंत्र प्रत्यय आहे असें समजलें जाईल.

मग तसें समजलें तर दोष कोठें येतो ?

( वा. २ ) हे मट् वगैरे स्वतंत्र प्रत्यय मानले तर स्वरासंबंधानें दोष येतो. विंशतितमः येथें मकाराच्या मागील अकाराला प्रत्यय—स्वर ( ३।१।१ ) होऊन मध्योदात्त होऊं लागेल; पण तेथें अन्तोदात्त स्वर इष्ट आहे.

तर मग येथें 'डटः' असें म्हटलें पाहिजे.

म्हणावयास नको. कारण मागून डट्-ग्रहण अनुवृत्तीनें येत आहे.

मागें डट्-ग्रहण कोठें बरें आहे ?

'तस्य पूरणे डट्' या मागच्याच सूत्रांत आहे.

आहे खरें, पण तेथें तें प्रथमान्त आहे. आणि येथें तर डटः असें षष्ठ्यन्त पाहिजे.

येथें डट् असें प्रथमान्त पद अनुवृत्तीनें आलें तरी नान्तात् ही पञ्चमी तस्मादित्युत्तरस्य ( १ । १ ६७ ) या परिभाषेच्या साहाय्यानें डट् शब्दाच्या पुढील प्रथमेच्या ठिकाणीं षष्ठीची कल्पना करील.

पण हा प्रत्ययविधि आहे ना ? आणि प्रत्ययविधीमध्यें तर पञ्चमीच्या जोरावर षष्ठीची कल्पना होत नसते.

येथें डट् प्रत्ययाचा विधि नाहीं; तो प्रत्यय मागील सूत्रानेंच सांगितला आहे; येथें फक्त त्याची अनुवृत्ती येत आहे.

---

१—( सू. ४९ ) ज्याच्या मागे दुसरा संख्या-वाचक शब्द नाहीं असा जो नकारान्त संख्यावाचक शब्द त्याच्या पुढील डट् प्रत्ययाला मट् असा आगम होतो. उदा०—पञ्चमः.

२—पञ्चम शब्दामध्यें दोष येत नाहीं. पण पुढील तमट् ( ५।२।५६ ) हा अनेकाच् प्रत्यय समजला जाईल. आणि तेथें प्रत्यय-स्वरानें आदि उदात्त तमट् प्रत्ययांतील पहिल्या अकाराला होऊं लागेल. तमट् हा आगम मानला म्हणजे 'आगम अनुदात्त होतात' (३।१।३वा ६) यानें अनुदात्त होत असतो.

**[थट् च च्छन्दसि ॥ ५ । २ । ५० ॥]**

**षट्कातिकातिपयचतुरां थुक् ॥ ५ । २ । ५१ ॥]**

**चतुरश्छयतावाद्यक्षरलोपश्च ॥ १ ॥**

चतुरश्छयतौ वक्तव्यावाद्यक्षरलोपश्च वक्तव्यः । तुरीयम् तुर्यम् ॥

अथ किमर्थं थट्थुकौ पृथक् क्रियेते न सर्वं थडेव वा स्यात्थुगेव वा ।

**थट्थुकोः पृथक्करणं पदान्तविधिप्रतिषेधार्थम् ॥ २ ॥**

थट्थुकोः पृथक्करणं क्रियते पदान्तविधिप्रतिषेधार्थम् । पदान्तविध्यर्थं पदान्तप्रतिषेधार्थं च । पदान्तविध्यर्थं तावत् । पर्णमयानि पञ्चथानि भवन्ति । रथः सप्तथः । पदान्तस्येति नलोपो यथा स्यात् । पदान्तप्रतिषेधार्थम् । षष्ठः । पदान्तस्येति जश्त्वं मा भूत् । इह चतुर्थ इति पदान्तस्येति विसर्जनीयो मा भूदिति ॥

**बहुपूगगणसंघस्य तिथुक् ॥ ५ । २ । ५२ ॥**

बहुकतिपयवतूनां लिङ्गविशिष्टादुत्पत्तिः । बहुकतिपयवतूनां लिङ्गविशिष्टादुत्पत्तिर्वक्तव्या । इहापि यथा स्यात् । बह्वीनां

---

( सू. ५१ वा. १ ) चतुर् शब्दाहून ' चार संख्येचें पूरण करणारा ' या अर्थी छ आणि यत् असे प्रत्यय होतात, आणि त्या प्रत्ययांबरोबर चतुर् शब्दांतील ' च ' या पहिल्या अक्षराचा लोप होतो असें म्हणावें. चतुर्णां पूरणं तुरीयं, तुर्यम्.

आतां पूर्वसूत्रामध्यें थट् आणि येथें थुक् असे दोन निरनिराळे आगम कशाकरितां बरें सांगितले आहेत ? तसे सांगूं नयेत. तर सर्व ठिकाणीं एक ' थट् ' सांगावा, किंवा सर्व ठिकाणीं ' थुक् ' सांगावा.

( वा. २ ) थट् व थुक् हे निराळे पुढील कारणाकरितां केले आहेत; पदान्ताचें कार्य होण्याकरितां थट् केला आहे आणि पदान्ताचें कार्य न होण्याकरितां थुक् केला आहे. त्यांपैकीं पदान्ताचें कार्य होतें असें उदाहरण— पर्णमयानि पञ्चथानि भवन्ति, रथः सप्तथः. पदान्तीं असलेल्या नकाराचा सांगितलेला लोप ( ८ । २ । ७ ) येथें झाला पाहिजे. पदान्ताचें कार्य होत नाहीं याचें उदाहरण षष्ठः. येथें पदान्ताला सांगितलेलें जश्त्व ( ८ । २ । ३९ ) षकाराला न झालें पाहिजे. तसेंच पदान्तीं रेफाला सांगितलेला विसर्ग ( ८ । ३ । १५ ) चतुर्थः येथें रेफाला न झाला पाहिजे.

( सू. ५२ ) बहुशब्द, कतिपयशब्द आणि वतु-प्रत्ययान्त शब्द याहून होणारे जे पूरण अर्थाचे प्रत्यय व आगम ते त्या शब्दांहून स्त्रीलिंगी प्रत्यय केल्यानंतर त्याच्या पुढेंही होतात असें म्हणावें. कारण बह्वीनां

---

१—( सू. ५० ) पूर्व सूत्राच्या विषयामध्येंच एकदां थट् असाही आगम वेदामध्यें होतो. उदा०— पञ्चथानि भवन्ति, पञ्चममिन्द्रियस्यापाकरणम्.

१—( सू. ५१ ) षष्, कति, कतिपय आणि चतुर् या शब्दांना डट् प्रत्यय पुढें असताना थुक् असा आगम होतो. उदा०—षष्ठः, कतिथः, कतिपयथः, चतुर्थः.

२—कारण, थट् हा आगम प्रत्ययाचा आद्यावयव होत असल्यामुळे तो पुढे असतांना मागील पञ्चन् व सप्तन् या शब्दांना पद संज्ञा ( १।४।१७ ) होत आहे.

३—षष् व चतुर् या शब्दांनाच थुक् आगम होत असल्यामुळे षष् व चतुर् याना पद संज्ञेची प्राप्तीही येत नाही. षष्थ व चतुर्थ येथील थकाराला तिची प्राप्ति येते पण तिचाही येथें भ संज्ञेनें ( १।४।१८ ) बाध होतोच

१—( सू. ५२ ) बहु, पूग, गण आणि संघ या शब्दांना तिथुक् असा आगम होतो. डट् प्रत्यय पुढें असताना. उदा०— बहूनां पूरण बहुतिथः; पूगतिथः; गणतिथः, संघतिथः.

पूरणी बहुतिथी । कतिपयानां पूरणी कतिपयथी । तावतीनां पूरणी तावतिथी॥

**बहुकतिपयवतूनां लिङ्गविशिष्टादुत्पत्तिः सिद्धा ॥१॥**

कथम् । प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीति ॥

**पुंवद्वचनं च ॥ २ ॥**

पुंवद्भावश्च वक्तव्यः । बह्वीनां पूरणी बहुतिथी ॥ किमर्थम् । न भस्याढे तद्धिते पुंवद्भवतीति सिद्धम् । भस्येत्युच्यते यजादौ च भं भवति न चात्र यजादिं पश्यामः । किं कारणम् । तिथुका व्यवहितत्वान्न प्राप्नोति ॥ इदमिह संप्रधार्यम् । तिथुक क्रियतां पुंवद्भाव इति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्पुंवाद्भवः । नित्यास्तिथुक् । कृतेऽपि पुंवद्भावे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । तिथुगप्यनित्यः । अन्यस्य कृते पुंवद्भावे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । अस्त्वरङ्गस्तर्हि तिथुक् । कान्तरङ्गता । उत्पत्तिसंनियोगेन

---

पूरणी बहुतिथी, कतिपयानां पूरणी कतिपयतिथी, तावतीनां पूरणी तावतिथी येथें बह्वी, कतिपया आणि तावती या शब्दांहूनही डट् प्रत्यय व तिथुक् व थुक् हे आगम झाले पाहिजेत.

( वा. १ ) बहु, कतिपय, आणि वतु-प्रत्ययान्त शब्द यांहून लिङ्गबोधक प्रत्यय केला असतां तदन्ताहूनही हे प्रत्यय व आगम होतील.

ते कसे ?

'प्रातिपदिकार्चे ग्रहण केलें असेल तेथें लिङ्गबोधक प्रत्ययविशिष्टाचेंही ग्रहण होतें' ( ४ । १ । ४ ) या परिभाषेनेंच तीं उदाहरणें सिद्ध होतात.

( वा. २ ) शिवाय, बह्वी, कतिपया, आणि तावती या स्त्रीलिंगी शब्दांहून पूरण अर्थी डट् प्रत्यय केला असतांना ह्या शब्दांना पुंवद्भाव होतो असें म्हणावें. उदा०– बह्वीनां पूरणी बहुतिथी.

हा पुंवद्भाव कशाकरितां सांगितला पाहिजे ? सांगावयास नकोच. कारण, 'भस्याढे तद्धिते' ( ६।३।३५ वा. ११ ) यानेंच येथें पुंवद्भाव होईल.

पण तेथें 'भस्य' असें म्हटलें आहे ना ? आणि भ संज्ञा तर यकारादि किंवा अजादि प्रत्यय पुढें असतांनाच होत असते ( १ । ४ । १८ ). येथें तर पुढील प्रत्यय यकारादीही नाही आणि अजादीही नाहीं.

काय कारण ?

कारण असें की डट् प्रत्यय जरी अजादि आहे तरी मध्यें तिथुक् वगैरे आगमांनीं व्यवधान असल्यामुळे त्या आगमाच्या मागील बह्वी इत्यादि शब्दांना भ संज्ञा होणार नाहीं.

येथें असा विचार करावा कीं तिथुक् आगम पूर्वी करावा किंवा पुंवद्भाव पूर्वी करावा ?

मग या दोहोंमध्ये काय बरें अगोदर करावें ?

परत्वास्तव पुंवद्भाव अगोदर करावा.

पण तिथुक् आगम नित्य आहे ना ? कारण पुंवद्भाव केल्यानंतरही त्याची प्राप्ति येते आणि पुंवद्भाव करण्याच्या पूर्वींही त्याची प्राप्ति येते.

तरी पण तिथुक् आगम अनित्य आहे. कारण, पुंवद्भाव केल्यानंतर एका शब्दाला म्हणजे बहु याला तो प्राप्त होतो; आणि पुंवद्भाव करण्याच्या पूर्वीं दुसऱ्याला म्ह. बह्वी याला प्राप्त होतो. आणि असा निरनिराळ्या शब्दाला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो.

तर मग तिथुक् आगम हा अन्तरंग आहे म्हणून पुंवद्भावाच्या अगोदर होईल.

तो अन्तरंग कसा ?

असा कीं, प्रत्यय होतांना त्याच्या बरो-

तिथुगुच्यत उत्पन्ने प्रत्यये प्रकृतिप्रत्ययावाश्रित्य पुंवद्भावः। पुंवद्भावोऽप्यन्तरङ्गः। कथम्। उक्तमेतत्सिद्धश्च प्रत्ययविधाविति। उभयोरन्तरङ्गयोः परत्वात्पुंवद्भावः पुंवद्भावे कृते पुनःप्रसङ्गविज्ञानात्तिथुक्सिद्धः। बहुतिथी ॥

[ **वतोरिथुक्** ॥ ५ । २ । ५३ ॥

**द्वेस्तीयः** ॥ ५ । २ । ५४ ॥

**त्रेः संप्रसारणं च** ॥ ५ । २ ५५ ॥

**विंशत्यादिभ्यस्तमडन्यतरस्याम्** ॥ ५ । २ । ५६ ॥

**नित्यं शतादिमासार्धमाससंवत्सराच्च** ॥ ५ । २ । ५७ ॥ ]

**षष्ट्यादेश्चासंख्यादेः** ॥ ५।२।५८ ॥

असंख्यादेरिति किमर्थम्। इह मा भूत्। एकषष्टः द्विषष्टः ॥ असंख्यादेरिति शक्यमवक्तुम्। कस्मान्न भवति एकषष्टः द्विषष्ट इति। षष्टिशब्दात्प्रत्ययो विधीयते कः

---

बरच तिथुक् आगम होत आहे आणि प्रत्यय झाल्यानंतर प्रकृति आणि प्रत्यय यांच्या आश्रयानें प्राप्त होणारा पुंवद्भाव आहे.

पण पुंवद्भावही अन्तरग आहे.

तो कसा ?

असा कीं, प्रत्यय करावयाचा मनांत आणिला कीं अगोदरच पुंवद्भाव होतो. ' सिद्धश्च प्रत्ययविधौ ' ( ४ । २ । ३८ वा १ ) असें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां दोन्ही अन्तरग असल्यामुळें त्यामध्यें परत्वामुळें पुंवद्भाव अगोदरच होईल. आणि पुंवद्भाव केल्यानंतर पुनःप्रसंगविज्ञानानें ( ७।१।८२ वा. ३ ) तिथुक् आगम होऊन बहुतिथी हें उदाहरण साधेल.

( सू ५८ ) येथें ' असंख्यादेः ' असें कशाकरिता म्हटलें आहे ?

एकषष्टः द्विषष्टः येथे एकदां तमट् आगम न झाला पाहिजे.

येथें असंख्यादेः असें म्हटलें नाहीं तरी चालेल.

पण असंख्यादेः असें म्हटलें नाहीं तर एकषष्टः व द्विषष्टः येथे प्रकृत सूत्रानें नित्य तमट् आगम का बरें होत नाहीं ?

षष्टि शब्दाहून तमट् प्रत्यय सांगितला आहे तेव्हां तो एकषष्टि शब्दाहून कसा बरें होईल ? तेव्हां जर एकषष्टि शब्दाहून प्रत्ययच प्राप्त होत

---

१—( सू. ५३ ) वतु-प्रत्ययान्त शब्दाला इथुक् आगम होतो डट् प्रत्यय पुढें असताना उदा०— यावतां पूरणः यावतिथः.

१—( सू ५४ ) द्वि शब्दाहून ' पूरण ' या अर्थी तीय प्रत्यय होतो. उदा०—द्वयोः पूरणः द्वितीयः.

१—( सू. ५५ ) त्रिशब्दाहून ' पूरण ' या अर्थी तीय प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाच्या बरोबरच त्रि शब्दातील रेफाला संप्रसारण म्हणजे ऋकार आदेश होतो. उदा०—तृतीयः. सप्रसारण झाल्यानतर पूर्वरूप ( ६।१।१०८ ) झालें आहे.

१—( सू. ५६ ) विंशति त्रिंशत् वगैरे शब्दांहून आणि तदन्त शब्दांहून पुढे पूरण अर्थी केलेल्या डट प्रत्ययाला तमट असा आगम विकल्पानें होतो. उदा०—विंशतेः पूरणः विंशतितमः, विंशः. एकविंशतितमः, एकविंशः.

१—( सू. ५७ ) शत सहस्र वगैरे शब्द आणि मास, अर्धमास, व संवत्सर हे शब्द याहून पूरण अर्थी केलेल्या डट प्रत्ययाला तमट् आगम नित्य होतो. उदा०—शततमः, सहस्रतमः, मासतमो दिवसः इत्यादि.

१—( सू. ५८ ) ज्याच्या मागें दुसरा सख्याशब्द नाही अशा षष्टि सप्तति वगैरे शब्दाच्या पुढील पूरण अर्थी केलेल्या डट् प्रत्ययाला तमट् आगम नित्य होतो. उदा०—षष्टितमः सप्ततितमः.

२—तमट् हा आगम न सागतां स्वतंत्र प्रत्यय सांगितला आहे असा पक्ष तेथें गृहीत धरला आहे.

प्रसङ्गो यदेकषष्टिशब्दात् स्यात् । नैव प्राप्नोति नार्थः प्रतिषेधेन । तदन्तविधिना प्राप्नोति । ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिः प्रतिषिध्यते ॥ एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यो भवतीह तदन्तविधिरिति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । एकविंशतितमः एतत्सिद्धं भवति ॥

**मतौ छः सूक्तसाम्नोः ॥५।२।५९॥**

**छप्रकरणेऽनेकपदादपि ॥ १ ॥**

छप्रकरणेऽनेकपदादपीति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । अस्यवामीयम् कयाशुभीयम् । किं पुनः कारणं न सिध्यति । अप्रातिपदिकत्वात् ॥

**सिद्धं तु प्रातिपदिकविज्ञानात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रातिपदिकाविज्ञानात् । कथं प्रातिपदिकाविज्ञानम् ।

**स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा [१.१.६८] इति वचनात् ॥ ३ ॥**

स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा भवतीति । एवं योऽसावाम्नायेऽस्यवामशब्दः पठ्यते

---

नाहीं; तर मग निषेध सांगण्यांत काय अर्थ आहे ?

पण तदन्तविधीनें ( १।१।७२ ) एकषष्टि शब्दाहून तमट् प्रत्यय प्राप्त होत आहे ना ?

सूत्रामध्यें ज्या प्रातिपादिकाचें ग्रहण केलें असेल त्यानें तदन्ताचें ग्रहण होत नाहीं. ( १।१।७२ वा. ३ ) असा प्रत्यय-विधींमध्यें त्या तदन्तविधीचा निषेध केला आहे.

तर मग असें असतांना जें येथें आचार्यांनीं ' असंख्यादेः ' असें पद घातलें आहे त्यावरून ते असें सुचवितात कीं ह्या प्रकरणामध्यें तदन्तविधि होतो.

ह्या ज्ञापकाचा उपयोग काय ?

विंशत्यादिभ्यः० ( ५।२।५६ ) या सूत्रामध्यें विंशति शब्दानें तदन्ताचे ग्रहण झाल्यामुळें एक विंशतितमः हें उदाहरण सिद्ध होतें हा त्याचा उपयोग होय.

( सू. ५९ वा. १ ) ह्या छ प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें अनेक पदांहूनही हा मतुप् प्रत्याच्या अर्थीं छ प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण ' अस्यवामीयम् ' ' कयाशुभीयम् ' वगैरे ठिकाणींही हा छ प्रत्यय झाला पाहिजे.

पण येथें प्रकृत सूत्रानें छ प्रत्यय कां बरें होणार नाहीं ?

' अस्यवाम ' ' कयाशुभ ' अशा शब्दांना प्रातिपदिक संज्ञा नाहीं म्हणून होणार नाहीं.

( वा. २) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

' अस्यवाम ' एवढ्या समुदायाला प्रातिपदिक संज्ञा आहे असें समजतें.

त्याला प्रातिपदिक संज्ञा आहे असें कसें बरें समजावें?

(वा. ३) शब्द शास्त्रातील संज्ञाशब्दांवाचून इतर शब्दांचें आपलें स्वरूपच आपलें संज्ञि होतें असें सांगितलें आहे. तेव्हां जो हा वेदामध्यें ' अस्यवाम ' असा शब्द पठित आहे तो शब्दच ' अस्यवामीयम् ' या उदाहरणांतील अस्यवाम या शब्दाचा अर्थ आहे.

---

१—(सू. ५९ ) प्रातिपदिकाहून मतुप् प्रत्ययाच्या ( ५।२।९४ ) अर्थीं छ प्रत्यय होतो परंतु प्रकृत शब्दाचा अर्थ सूक्त किंवा साम असला पाहिजे. उदा०—अच्छावाकशब्दोऽस्मिन्नस्तीति अच्छावाकीयम् सूक्तम्. यज्ञायज्ञीय साम.

२—तेव्हा ज्याप्रमाणे आग्नेयम् या उदाहरणातील अग्नि शब्द हा सूत्रातील अग्नेः या अग्नि शब्दाचा संज्ञी म्हणजे अर्थ असल्यामुळे त्या सूत्रांतील अग्नि शब्दाला प्रातिपदिक संज्ञा होते आणि त्याहून अग्नेः अशी पंचमी (४।२।३३) होते त्याप्रमाणें वेदामधील जे ' अस्य वाम ' हे सूक्ताच्या आरंभीचे शब्द तोच अस्यवामीय सूक्तम् या उदाहरणांतील ' अस्य वाम ' या शब्दाचा अर्थ असल्यामुळे त्या उदाहरणांतील अस्यवाम या अनुकरणाला प्रातिपदिक संज्ञा होईल आणि त्याहून छ प्रत्यय प्रस्तुत सूत्रानेंच होईल.

सोऽस्य पदार्थः ॥ किं पुनरन्य आम्नायशब्दा अन्य इमे । ओमित्याह । कुत एतत् ।

**आम्नायशब्दानामान्यभाव्यं स्वरवर्णानुपूर्वीदेशकालानियतत्वात् ॥४॥**

स्वरो नियत आम्नायेऽस्यवामशब्दस्य । वर्णानुपूर्वी खल्वप्याम्नाये नियतास्यवामशब्दस्य । देशः खल्वप्याम्नाये नियतः । श्मशाने नाध्येयं चतुष्पथे नाध्येयमिति । कालः खल्वप्याम्नाये नियतः । नामावास्यायां न चतुर्दश्यामिति ॥

**पदैकदेशसुबलोपदर्शनाच्च ॥ ५ ॥**

पदैकदेशः खल्वप्याम्नाये दृश्यते । अस्यवामीयम् । ननु चैष सुब्लोपः स्यात् । सुबलोपदर्शनाच्च । सुबलोपः खल्वपि दृश्यते । अस्यवामीयमिति ॥ यदि तर्ह्यन्य

---

पण काय हो, वेदामध्यें पठित शब्द आणि तेच असे समजले जाणारे इतर ठिकाणचे तेच शब्द हे वस्तुतः निरानिराळे आहेत काय ?

होय, निराळे आहेतच असें म्हणतो.

हें कशावरून समजावें ?

(वा.४) वेदातील शब्द हें लोकांतील त्याच शब्दांपेक्षां अगदीं निराळे आहेत ही गोष्ट सिद्ध होते. कारण स्वर, वर्णानुपूर्वी, देश आणि काल हे वैदिक शब्दाचे ठरलेले आहेत तसे लौकिक शब्दांचे नाहींत; उदा०–याच अस्यवाम शब्दाचा स्वर वेदामध्यें ठरलेला आहे. तसा अस्यवाम शब्दांतील वर्णांचा क्रमही वेदामध्यें ठरलेलाच आहे. तसेंच वेदाध्ययनाचा देशही स्मशानामध्यें अध्ययन करूं नये, चवाठ्यावर अध्ययन करूं नये असा ठरलेलाच आहे. तसा अमावस्येला वेदाध्ययन करूं नये, चतुर्दशीमध्यें वेदाध्ययन करूं नये असा वैदिक शब्दोच्चाराचा कालही ठरलेलाच आहे.

(वा.५)पदाचा एक भाग आणि सुप् प्रत्ययाचा अलोप अस्य वामीयम् येथें दृष्टीस पडतो. म्हणून वैदिक शब्दांपेक्षा तेच लोकांतले शब्द निराळे आहेत अस्यवामीयम् येथील अस्यवाम हा शब्द 'अस्यवामस्य' या वैदिक प्रयोगातील एक भाग दिसतो.

पण येथे 'वामस्य' यांतील स्य या सुप् प्रत्ययाचा लोप झाला असेल.

खरोखरच तो सुपाचा लोप झालेला नसावा. कारण, अस्यवामीयम् असा अस्य या पूर्वीच्या पदातील सुप् प्रत्ययाचा लोप केलेला दिसत नाहीं. एकंदरींत वैदिक शब्द निराळे आणि तसेच दिसले तरी लौकिक शब्द निराळे असेंच सिद्ध होतें.

पण जर वैदिक शब्द निराळे आणि तसे

---

१—वेदामध्यें अस्यवाम असे स्वर आहेत. अस्य येथें विभक्तीला उदात्त ( ६।१।१७१ ) झाला आहे. आणि वाम शब्दाचाही अन्त उदात्त ( ६।१।१५९ ) झाला आहे. त्याचें अनुकरण जो अस्यवामीयम् यांतील अस्यवाम शब्द त्याला प्रातिपदिक स्वर अन्त उदात्त ( फिट्सू. १।१ ) होऊन बाकीचे मागील तीनही अच् अनुदात्त ( ६।१।१५८ ) झाले आहेत. तसेंच अनुकरणामध्यें अनुकरण करणाऱ्याच्या इच्छेनें एखादा वर्ण कमज्यास्तही होऊं शकतो. तसेंच स्मशान वगैरे देश आणि अमावास्या वगैरे काल यांच्यामुळें वैदिक शब्दोच्चारणाला निषेध केला जातो. लौकिक शब्दोच्चारणाला नाहीं.

४—जर अस्यवामीयम् येथील अस्यवाम हा वैदिक शब्दच असता तर अर्थबट दिसला नसता.

५—अस्य वामस्य असा दोन पदाचा संबंध भागच येथे निर्दिष्ट आहे. तो अनुकरण म्हणून त्या भागाला प्रातिपदिक संज्ञा असल्यामुळें वाम शब्दाच्या पुढील विभक्तीचा लोप ( २।४।७१ ) झाला आहे

आम्नायशब्दा अन्य इमे मत्वर्थो नोपपद्यते। अस्यवामशब्दोऽस्मिन्नस्तीति । न संज्ञा सांज्ञिनं व्यभिचरति ॥

**अध्यायानुवाकयोर्लुक् ॥ ५ । २ । ६० ॥**

**अध्यायानुवाकाभ्यां वा लुक् ॥ १ ॥**

अध्यायानुवाकाभ्यां वा लुग्वक्तव्यः । स्तम्भः स्तम्भीयः । गर्दभाण्डः गर्दभाण्डीयः । अनुकः अनुकीयः ॥

**[ विमुक्तादिभ्योऽण् ॥ ५।२।६१ ॥**

**गोषदादिभ्यो वुन् ॥ ५।२।६२ ॥**

**तत्र कुशलः पथः ॥ ५ । २ । ६३ ॥**

**आकर्षादिभ्यः कन् ॥ ५।२।६४॥]**

**धनहिरण्यात्कामे ॥ ५।२।६५ ॥**

**धनहिरण्यात्कामाभिधाने ॥ १ ॥**

धनहिरण्यात्कामाभिधान इति वक्तव्यम्॥

**षष्ठ्यर्थे ह्यनिष्टप्रसङ्गः ॥ २ ॥**

षष्ठ्यर्थे हि सत्यानिष्टं प्राप्नोति । धने कामोऽस्येति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । कस्मान्न भवति धने कामोऽ-

---

दिसले तरी लौकिक शब्द निराळे असें असेल तर 'अस्यवामीयम्' येथील'अस्यवाम' हा शब्द सूक्तामध्यें नसल्यामुळें त्याहून अस्यवाम शब्द ज्यामध्यें आहे असा मत्वर्थी प्रत्यय सूक्त या अर्थी होणार नाही.

हा दोष येत नाहीं. संज्ञा शब्दापासून संज्ञीचा बोध होत नाहीं असें कधींच होत नाहीं.[६]

( सू. ६० वा. १ ) अध्याय किंवा अनुवाक हे अर्थ असतांना सांगितलेला हा लुक् विकल्पानें होतो असें म्हणावें. उदा०—स्तम्भः शब्दः अस्मिन्नस्ति अध्याये अनुवाके वा स्तम्भः, स्तम्भीयः; गर्दभाण्डः, गर्दभाण्डीयः, अनुवाकः शब्दोऽस्मिन्नस्ति अध्याये अनुवाकः,अनुवाकीयः. तसेंच दैवासुरः.

( सू. ६५ वा. १ ) धन आणि हिरण्य या शब्दांहून ' इच्छा ' याच अर्थी हा प्रत्यय होतो असें म्हणावें.

इच्छा आहे ज्याची या अर्थी प्रत्यय झाला तर ' धनाविषयीं आहे इच्छा ज्याची ' या अर्थी प्रत्यय होऊं लागेल असें अनिष्ट प्राप्त होईल.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

पण तसें म्हटलें नाहीं तर 'धनाविषयीं आहे इच्छा ज्याची ' या अर्थी हा प्रत्यय कां बरें

---

६—अच्छावाकीयम् यातील अच्छावाक हा शब्द वेदांतील अच्छावाक शब्दाचे अनुकरण असल्यामुळे हा अनुकरण केलेला अच्छावाक शब्द अनुकार्य अशा त्या वैदिक शब्दाची संज्ञा आहे तेव्हां त्यापासून संज्ञीचा म्हणजे वेदांतील शब्दाचा बोध होणारच, आणि तो वेदांतील शब्द सूक्तामध्यें आहे म्हणून मत्वर्थीय प्रत्ययाची येथें कांहीच अडचण नाही.

१—( सू. ६० ) अध्याय किंवा अनुवाक हा अर्थ असेल तर प्रातिपदिकाहून मतुप् प्रत्ययाच्या अर्थी छ प्रत्यय होतो आणि त्याचा विकल्पाने लुक् होतो. उदा०—दीर्घजीवितः दीर्घजीवितीयः अध्यायः, अनुवाको वा.

१—( सू. ६१ ) विमुक्त वगैरे शब्दांहून ' तो आहे ज्यामध्यें असा अध्याय किंवा अनुवाक ' या अर्थी अण् प्रत्यय होतो. उदा०-विमुक्त शब्द ज्यामध्यें आहे असा अध्याय किंवा अनुवाक तो वैमुक्त होय.

१—( सू. ६२ ) गोषद वगैरे शब्दांहून ' तो शब्द आहे ज्यामध्यें असा अध्याय किंवा अनुवाक ' या अर्थी वुन् प्रत्यय होतो. गोषद शब्द ज्यामध्य आहे असा अध्याय किंवा अनुवाक तो गोषदक होय 'इषेत्वक' शब्दही याप्रमाणेच समजावा.

१—( सू. ६३ ) पथिन् शब्दाहून ' मार्गांत कुशल ' या अर्थी वुन् प्रत्यय होतो. उदा०—पथकः. वाटेच्या कामीं हुषार हा अर्थ आहे.

१—( सू. ६४ ) आकर्ष वगैरे शब्दांहून त्या कामीं कुशल या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—आकर्षे कुशलः आकर्षकः.

१—( सू. ६५ ) धन आणि हिरण्य या शब्दांहून ' त्या विषयींची इच्छा ' या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—देवदत्तस्य धनकः.

स्येति । अनभिधानात् ॥

[ स्वाङ्गेभ्यः प्रसिते ॥ ५।२।६६ ॥

उदराट्ठगाद्यूने ॥ ५ । २ । ६७ ॥

सस्येन परिजातः ॥ ५।२।६८ ॥

अंशंहारी ॥ ५ । २ । ६९ ॥

तन्त्रादचिरापहृते ॥ ५।२।७० ॥

ब्राह्मणकोष्णिके संज्ञायाम् ॥ ५ । २ । ७१ ॥]

शीतोष्णाभ्यां कारिणि ॥ ५ । २ । ७२ ॥

किं यः शीतं करोति स शीतको यो वोष्णं करोति स उष्णकः । किं चातः । तुषार आदित्ये च प्राप्नोति ॥ एवं तर्ह्युत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । शीतमिव शीतम् । उष्णमिवोष्णम् । य आशु कर्तव्यानर्थांश्चिरेण करोति स उच्यते शीतक इति । यः पुनराशु कर्तव्यानर्थानाश्वेव करोति स उच्यत उष्णक इति ॥

अधिकम् ॥ ५ । २ । ७३ ॥

अधिकमिति किं निपात्यते । अध्यारूढ-

---

होत नाहीं.

अनभिधानास्तव होत नाहीं.

( सू. ७२ ) येथे जो तुम्हाला शीत करतो त्याला शीतक म्हणावयाचें काय ? तसेंच जो तुम्हांला उष्ण करतो त्याला उष्णक म्हणावयाचे काय ?

असें म्हटले तर काय बरें होईल ?

तसें म्हटलें तर तुषार आणि सूर्य या अर्थी शीतक व उष्णक या शब्दाचे प्रयोग होऊ लागतील.

तर मग येथें उत्तरपदाचा लोप झाला आहे असें समजावे. शीतमिव या अर्थाचा येथें शीत शब्द आहे. तसाच उष्णमिव या अर्थाचा येथें उष्ण शब्द आहे. जें लवकर काम करावयाचें ते उशिरा जो करतो त्याला शीतक म्हणतात. तसेच जें लवकर काम करावयाचें तें लवकरच जो करतो त्याला उष्णक म्हणतात.

( सू. ७३ ) ह्या अधिक शब्दामध्यें काय निपातन केलें आहे ?

' अध्यारूढ ' शब्दाहून स्वार्थी कन् प्रत्यय होतो आणि अध्यारूढ शब्दांतील आरूढ या

---

१—( सू. ६६ ) स्वाङ्गवाचक शब्दाहून ' त्या विषयीं आसक्त ' या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—केशेषु आसक्तः केशकः.

१—( सू. ६७ ) उदर शब्दाहून ' त्याविषयीं आसक्त (आद्यून)' या अर्थी ठक् प्रत्यय होतो उदा०—उदरे आसक्तः औदरिकः आद्यून म्हणजे क्षुधित.

१—( सू. ६८ ) सस्य शब्दाहून ' त्यानें परिजात ' या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०— सस्यकः शालिः. सस्य म्हणजे फल. परिजात म्हणजे सर्वगुणसंपन्न.

१—( सू. ६९ ) अंश शब्दाहून ' तो घेणारा ' या अर्थी कन् प्रत्यय होतो. अंशं हरति अंशकः दायादः ( हिस्सेदार ).

१—( सू. ७० ) तन्त्र शब्दाहून ' त्यांतून नुकताच बाहेर निघालेला ' या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०— तन्त्रात्सद्यः निर्गतः तन्त्रकः पटः. नुकताच विणलेला पट हा अर्थ आहे.

१—( सू. ७१ ) ब्राह्मणक आणि उष्णिका हे दोन शब्द येथें संज्ञा असताना कन् प्रत्यय करून निपातन केले आहेत. ज्या देशामध्ये ब्राह्मण लोक आयुधजीवी आहेत त्या देशाला ब्राह्मणक म्हणतात. उष्णिका म्हणजे पेज.

१—( सू. ७२ ) शीत व उष्ण या शब्दाहून ' तशा रीतीनें काम करणारा ' या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—शीतमिव करोति शीतकः ( थंड आळशी मनुष्य ) उष्णमिव करोति उष्णकः ( झटपट काम करणारा ).

१—( सू. ७३ ) अधिक या शब्दाचें येथें निपातन केलें आहे. अधिक म्हणजे ज्यास्त.

स्योत्तरपदलोपः कंश्च प्रत्ययः । अध्यारूढमधिकमिति ॥ भवेत्सिद्धमध्यारूढो द्रोणः खार्यामधिको द्रोणः खार्यामिति । इदं तु न सिध्यति अध्यारूढा द्रोणेन खारी अधिका द्रोणेन खारीति । गत्यर्थानां हि क्तः कर्तरि विधीयते । गत्यर्थानां वै क्तः कर्मण्यपि विधीयते ॥

**[ अनुकाभिकाभीकः कमिता ॥५।२।७४॥ ]**

**पार्श्वेनान्विच्छति ॥ ५।२।७५ ॥**

किं यः पार्श्वेनान्विच्छति स पार्श्वकः । किं चातः । राजपुरुषे प्राप्नोति ॥ एवं तर्ह्युत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । पार्श्वमिव पार्श्वम् । य ऋजुनोपायेनान्वेष्टव्यानर्थाननृजुनोपायेनान्विच्छति स उच्यते पार्श्वक इति ॥

**अयःशूलदण्डाजिनाभ्यां ठक्ठञौ ॥ ५।२।७६ ॥**

किं योऽयःशूलेनान्विच्छति स आयःशूलिकः । किं चातः । शिवभागवते

---

उत्तरपदाचा लोप होतो. अध्यारूढ म्हणजे ज्यास्त झालेले. तेंच अधिक होय.

पण अशा रीतीनें खारीपेक्षां द्रोण अधिक आहे या अर्थी अधिकः द्रोणः खार्याम् हें सिद्ध होतें. पण द्रोणानें ज्यास्त झालेली खारी या अर्थी अधिका द्रोणेन खारी हा प्रयोग सिद्ध होत नाहीं.

हाही प्रयोग सिद्ध होतो. कारण, गत्यर्थक धातूंहून कर्ता या अर्थी क्त प्रत्यय सांगितला आहे ( ३।४।७२ ) आणि गत्यर्थक धातूहून कर्म या अर्थींही क्त प्रत्यय सांगितला आहे.

( सू. ७५ ) पार्श्वभागानें जो वर्तन करतो त्याला पार्श्वक म्हणावयाचें कीं काय ?

तसें म्हटलें तर काय बरें होईल ?

तसें म्हटलें तर राजाच्या मागोमाग असणारा जो चाकर त्या अर्थींही पार्श्वक शब्दाचा प्रयोग होऊं लागेल.

तर मग येथें उत्तरपदाचा लोप झाला आहे असें समजावें. पार्श्वमिव या अर्थाचा येथें पार्श्व शब्द आहे. जो सरळ मार्गानें मिळण्यासारखे पदार्थ आड मार्गानें मिळण्याविषयीं यत्न करतो त्याला ‘ पार्श्वक ’ म्हणतात.

( सू. ७६ ) जो लोखंडाच्या शूलानें वर्तन करतो त्याला आयःशूलिकः असें म्हणावयाचें कीं काय ?

तसें म्हटलें तर काय बरें होईल ?

---

२—द्रोण हे परिमाण खारीपेक्षां कमी आहे. ज्या ठिकाणी खारीपेक्षां द्रोणभर धान्य अधिक असते तेथे खारीवर द्रोण असतो म्हणजे द्रोण हा खारीचे अध्यारोहण करतो. अध्यारूढ शब्दामध्यें कर्ता या अर्थी क्त प्रत्यय केला म्हणजे द्रोण हा अध्यारूढ होतो; आणि कर्म या अर्थी केला म्हणजे ज्याचे आरोहण केले जातें ती म्हणजे येथे खारी हा अध्यारूढ शब्दाचा अर्थ होतो तेव्हां दोन्ही प्रयोग साधतात. खारी म्हणजे दीडमणी ( खंडी ). द्रोण म्हणजे अदमण.

१—( सू. ७४ ) अनुक अभिक आणि अभीक ह्या तीन शब्दाचे येथे निपातन केलें आहे. तिन्ही शब्दांचा कामुक असा अर्थ आहे.

१—( स. ७५ ) ‘ पार्श्व म्हणजे आडमार्ग त्याने वागतो ’ या अर्थी पार्श्व शब्दाहून कन् प्रत्यय होतो. उदा०—पार्श्वकः.

१—( सू. ७६ ) अय शूल आणि दण्डाजिन या शब्दांहून ‘ त्यानें वर्तन करतो ’ या अर्थी क्रमानें ठक् आणि ठञ् हे प्रत्यय होतात. अयःशूल म्हणजे लोखंडाचा शूल ( त्रिशूल ). त्रिशूल हा तीक्ष्ण असतो तसा जो तीक्ष्ण उपाय तो येथें अय.शूल शब्दाचा अर्थ आहे. तसेंच अजिन ( म्हणजे कातडें ) हे जवळ बाळगून काही लोक ढोंग करतात. ढोंग हाच अर्थ येथे दण्डाजिन शब्दाचा आहे. उदा०—अयःशूलेन अन्विच्छति आयःशूलिकः. तीक्ष्ण उपाय करणारा साहसी मनुष्य हा अर्थ आहे. दण्डाजिनेन अन्विच्छति दाण्डाजिनिकः. ढोंगी मनुष्य हा अर्थ आहे.

प्राप्नोति ॥ एवं तर्ह्युत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः। अयःशूलमिवायःशूलम्। यो मृदुनोपायेनान्वेष्टव्यानर्थान्रभसेनान्विच्छति स उच्यत आयःशूलिकः ॥

## तावतिथं ग्रहणमिति लुग्वा ॥ ५ । २ । ७७ ॥

### तावतिथं ग्रहणमिति लुग्वावचनानर्थक्यं विभाषाप्रकरणात् ॥ १ ॥

तावतिथं ग्रहणमिति लुग्वावचनमनर्थकम्। किं कारणम्। विभाषाप्रकरणात्। प्रकृता महाविभाषा तयैतत्सिद्धम्॥

### तावतिथेन गृह्णातीति लुक् ॥ २ ॥

तावतिथेन गृह्णातीत्युपसंख्यानं कर्तव्यं लुक् वक्तव्यः। षष्ठेन गृह्णाति षट्कः ॥

## [ स एषां ग्रामणीः ॥ ५।२।७८ ॥]

## शृङ्खलमस्य बन्धनं करभे ॥ ५ । २ । ७९ ॥

### शृङ्खलमस्य बन्धनं करभ इत्यनिर्देशः ॥ १ ॥

शृङ्खलमस्य बन्धनं करभ इत्यनिर्देशः। अगमको निर्देशोऽनिर्देशः। न हि तस्य शृङ्खलं बन्धनं शृङ्खलवत्यासौ रज्ज्वा बध्यते ॥

### सिद्धं तु तद्वन्निर्देशाल्लुक्च ॥ २ ॥

---

तसें म्हटलें तर शिवभागवतोला 'आयःशूलिक' म्हणावें लागेल.

तर मग येथें उत्तरपदाचा लोप झाला आहे असें समजावें. अयःशूलमिव या अर्थाचा येथें अयःशूल शब्द आहे. जो सुकुमार उपायानें मिळण्यासारखे पदार्थ तीक्ष्ण उपायांनीं मिळण्याविषयीं प्रयत्न करतो त्याला 'आयः शूलिक' म्हणतात.

(सू. ७७ वा. १) 'तावतिथं ग्रहणमिति लुग्वा' हें वचन निरर्थक आहे.

काय कारण ?

कारण असें कीं मागून महाविभाषा (४।१।८२) चालूच आहे. तिनेंच हे सिद्ध होत आहे.

(वा. २) पूरण प्रत्ययान्त शब्दाहून 'तितक्यानें एखाद्या ग्रंथाचें ग्रहण करतो' या अर्थी कन् प्रत्यय होतो आणि त्या पूरण प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें. उदा०:—षष्ठेन गृह्णाति षट्कः.

(सू. ७९ वा. १) 'शृङ्खलमस्य बन्धनं करभे' हा अनिर्देश होय. ज्या निर्देशापासून नीट अर्थ मनांत येत नाहीं तो अनिर्देश होय. कारण, शृङ्खल कांहीं त्या करभाचें बंधन होत नाहीं तर त्या शृङ्खलाला लावलेल्या दोरीनें तो करभ बांधिला जातो.

---

२—शिवो भगवान् भक्तिरस्य शिवभागवतः म्हणजे शिवोपासक भगवद्भक्त. शंकराचें त्रिशूल आयुध आहे म्हणून तें त्रिशूल हें चिन्ह कांहीं शैव लोक आपल्या जवळ बाळगतात.

१—(सू. ७७) तावतिथ या शब्दानें पूरणप्रत्ययान्ताचें ग्रहण होतें. द्वितीय तृतीय वगैरे पूरणप्रत्ययान्त शब्दांचा दुसरें तिसरें असा जो अर्थ आहे तें दुसरें तिसरें म्हणून एखाद्या ग्रंथाचें ग्रहण विवक्षित असेल तर त्या पूरण-प्रत्ययान्त शब्दाहून स्वार्थी कन् प्रत्यय होतो, आणि त्या कन् प्रत्ययाचा लुक् विकल्पानें होतो. उदा०—पञ्चमक ग्रहणम्; पञ्चमं ग्रहणम्. हे पांचवें अध्ययन आहे.

२—लुक् हा कन् प्रत्ययाचा न करतां पूरण प्रत्ययाचाच केला तर मात्र हें सूत्र निरर्थक होत नाहीं.

१—(सू. ७८) प्रातिपदिकाहून 'तो मुख्य आहे ज्यामध्यें' या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—देवदत्त मुख्य येषां ते देवदत्तकाः एते जनाः.

१—(सू. ७९) शृङ्खल शब्दाहून 'तें आहे बंधन ज्याचें असा करभ' या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—शृङ्खलकः करभः करभ म्हणजे लहान उंट. त्याच्या पायाला जें लाकडाचें बंधन केलें असतें तें शृङ्खल होय.

सिद्धमेतत् । कथम् । तद्वन्निर्देशः कर्तव्यो लुक्च वक्तव्यः। शृङ्खलवद्बन्धनमिति।। स तर्हि तद्वन्निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्य । इह यमन्तरेण यस्य प्रवृत्तिर्भवति तत्तस्य निमित्तत्वाय कल्पते न चान्तरेण शृङ्खलं बन्धनं प्रवर्तते ।। अथवा साहचर्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । शृङ्खलसहचरितं बन्धनं शृङ्खलं बन्धनमिति ।।

[ उत्कं[1] उन्मनाः ।। ५ । २ । ८० ।।

कालप्रयोजनाद्रोगे ।। ५।२।८१ ।।

तदस्मिन्नन्नं प्राये संज्ञायाम्

।। ५ । २ । ८२ ।। ]

प्राये संज्ञायां वटकेभ्य इनिः ।। १ ।।

प्राये संज्ञायां वटकेभ्य इनिर्वक्तव्यः । वटकिनी पौर्णमासी ।।

[ कुल्माषादञ् ।। ५ । २ । ८३ ।। ]

श्रोत्रियंश्छन्दोऽधीते ।।५।२।८४।।

किं निपात्यते ।

श्रोत्रियंश्छन्दोऽधीत इति वाक्यार्थे पदवचनम् ।। १ ।।

---

( वा. २ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं, ह्या सूत्रामध्यें शृङ्खलवत् असें म्हणावें. आणि त्या शृङ्खलवत् शब्दाहून हा कन् प्रत्यय केला म्हणजे त्या शृङ्खल शब्दाच्या पुढील मतुप् प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें.

तर मग सूत्रामध्यें तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. असें पहा की— कोणत्याही कार्याची निमित्तभूत जी वस्तु ती ज्या पदार्थाच्या साहाय्याशिवाय आपलें कार्य करूं शकत नाहीं त्या पदार्थालाही त्या कार्याचें निमित्त असें म्हणतां येतें. आणि येथें तर शृङ्खलाशिवाय नुसत्या दोरीनें करभाचें योग्य बंधन होत नाहीं. अथवा ज्या पदार्थाला ज्या वस्तूचें साहचर्य असतें त्या पदार्थाचा बोधक शब्द त्या वस्तूला लावतां येतो. तेव्हां येथें दोरीच्या बंधनाला शृङ्खलाचें साहचर्य असल्यामुळें त्या बंधनालाच येथें शृङ्खल असें म्हटलें आहे.

( सू. ८२ वा. १ ) वटक हें अन्न प्रायः ज्या पौर्णमासीच्या दिवशी केलें जातें त्या पौर्णमासीची संज्ञा असतांना वटक शब्दाहून इनि प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०-वटकिनी पौर्णमासी.

(सू. ८४) येथें काय निपातन केलें आहे ?

---

१—( सू. ८० ) ' उत्सुक ' या अर्थी उत्क असा शब्द येथें निपातन केला आहे. उदा०—उत्कः देवदत्तः.

१—( सू. ८१ ) फल आणि कारण असे प्रयोजन शब्दाचे दोन अर्थ आहेत, कालवाचक शब्दाहून ' त्या कालीं असलेला रोग ' या अर्थी कन् प्रत्यय होतो; फलवाचक शब्दाहून ' तें ज्यापासून उत्पन्न होतें असा रोग ' या अर्थी कन् प्रत्यय होतो, आणि कारणवाचक शब्दाहून त्यामुळें झालेला रोग या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—द्वितीये ( दिवसे ) भवः द्वितीयकः ज्वरः. विषपुष्पैर्जनितः विषपुष्पकः ज्वरः.

१—( सू. ८२ ) अन्नवाचक शब्दाहून ' प्रायशः तें अन्न असतें ज्या दिवशीं ' या अर्थी कन् प्रत्यय होतो, पण तो प्रत्ययान्त शब्द त्या कालाचा संज्ञा असला पाहिजे. उदा०—गुडापूपा. प्रायेण अन्नमस्यां गुडापूपिका पौर्णमासी.

१—( सू. ८३ ) कुल्माष शब्दाहून ' प्रायशः तें अन्न असतें ज्या दिवशीं ' या अर्थी अञ् प्रत्यय होतो, तो प्रत्ययान्त शब्द त्या कालाची संज्ञा असला पाहिजे. उदा०—कुल्माषाः प्रायेण अन्नमस्या कौल्माषी पौर्णमासी. कुल्माष म्हणजे घुगऱ्या.

१—( सू. ८४ ) ' वेदाध्ययन करणारा ' या अर्थी श्रोत्रियन् असें इस्तककनकारासहित येथें निपातन केलें आहे.

छन्दोऽधीत इत्यस्य वाक्यस्यार्थे श्रोत्रियन्नित्येतत्पदं निपात्यते ॥

**छन्दसो वा श्रोत्रभावस्तदधीत इति घंश्च ॥ २ ॥**

छन्दसो वा श्रोत्रभावो निपात्यते तदधीत इत्येतस्मिन्नर्थे घंश्च प्रत्ययः । छन्दोऽधीते श्रोत्रियः ॥

## श्राद्धमनेन भुक्तमिनिठनौ ॥ ५ । २ । ८५ ॥

**इनिठनोः समानकालग्रहणम् ॥ १ ॥**

इनिठनोः समानकालग्रहणं कर्तव्यम् । अद्य भुक्ते श्वः श्राद्धिक इति मा भूत् ॥

**उक्तं वा ॥२॥**

किमुक्तम् । अनभिधानादिति ॥

**[ पूर्वादिनिः ॥ ५ । २ । ८६ ॥**

**सपूर्वाच्च ॥ ५ । २ । ८७ ॥**

**इष्टादिभ्यश्च ॥ ५ । २ । ८८ ॥**

**छन्दसि परिपन्थिपरिपरिणौ पर्यवस्थातरि ॥ ५ । २ । ८९ ॥**

**अनुपद्यन्वेष्टा ॥ ५ । २ । ९० ॥ ]**

## साक्षाद्द्रष्टरि संज्ञायाम् ॥ ५ । २ । ९१ ॥

---

(वा. १) 'छन्दः अधीते' म्हणजे 'वेदाचें अध्ययन करतो' या वाक्याच्या अर्थी श्रोत्रिय असें पद येथें निपातन केलें आहे आणि त्यालाच इत्संज्ञक नकार जोडला आहे.

(वा. २) अथवा छन्दस् शब्दाहून 'त्याचें अध्ययन करतो' या अर्थी घन् प्रत्यय आणि त्याच्या बरोबरच छन्दस् शब्दाला श्रोत्र आदेश, असें येथें निपातन समजावें. तेव्हां 'छन्दः अधीते इति श्रोत्रियः' असें होतें.

(सू. ८५ वा. १) ह्या इनि व ठन् प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें समानकाल हा शब्द घालावा. कारण आज जो श्राद्धान्न भक्षण करतो त्याला उद्यां 'श्राद्धिक' असें म्हणतां कामा नये.

(वा. २) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे?

अनभिधानात् (३।२।१ वा. ५) असें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां अनभिधानास्तव तसा प्रयोग होणार नाहीं. म्हणजे आज श्राद्धान्न भक्षण करणाऱ्याला उद्यां श्राद्धिक असें म्हटलें जाणार नाहीं.

---

१—(सू. ८५) श्राद्ध शब्दाहून 'ते अन्न भक्षण केलें ज्यानें' या अर्थी इनि आणि ठन् असे प्रत्यय होतात. उदा०—श्राद्ध भुक्तमनेन श्राद्धी, श्राद्धिकः.

१—(सू. ८६) पूर्व शब्दाहून 'पूर्वी ज्याने केलें' या अर्थी इनि प्रत्यय होतो. उदा०—पूर्वं कृतमनेन पूर्वी.

१—(सू. ८७) ज्याच्या मागे कांहीं तरी पूर्वपद आहे असा जो पूर्व शब्द तदन्ताहूनही 'ते केलें ज्यानें' या अर्थी इनि प्रत्यय होतो. उदा०—पूर्वं कृतमनेन कृतपूर्वी.

१—(सू. ८८) इष्ट वगैरे शब्दांहूनही 'तें केलें ज्यानें' या अर्थी इनि प्रत्यय होतो. उदा०—इष्टमनेन इष्टी.

१—(सू. ८९) वेदामध्यें परिपन्थिन् आणि परिपरिन् हे दोन शब्द 'प्रतिपक्षी' या अर्थी निपातन केले आहेत. उदा०—मा त्वा परिपरिणो विदन्; मा त्वा परिपन्थिनो विदन्.

१—(सू. ९०) 'अन्वेषण करणारा' म्हणजे शोधणारा या अर्थी अनुपदी असें इन्–प्रत्ययान्त शब्दाचें येथे निपातन केलें आहे. उदा०—अनुपदी गवाम्

१—(सू. ९१) 'प्रत्यक्ष पाहणारा' या अर्थी साक्षात् शब्दाहून इनि प्रत्यय होतो. परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—साक्षाद् द्रष्टा साक्षी. 'प्रत्यक्ष पाहणारा मध्यस्थ' असा अर्थ आहे.

संज्ञायामिति किमर्थम्। त्रिभिः साक्षाद् दृष्टं भवति यश्च ददाति यस्मै च दीयते यश्चोपद्रष्टा तत्र सर्वत्र प्रत्ययः प्राप्नोति। संज्ञाग्रहणसामर्थ्याद्धनिकान्तेवासिनोर्न भवति॥

**क्षेत्रियच्परक्षेत्रे चिकित्स्यः ॥ ५ । २ । ९२ ॥**

किं निपात्यते।

**क्षेत्रियः श्रोत्रियवत् ॥ १ ॥**

क्षेत्रियः श्रोत्रियवन्निपात्यते। परक्षेत्रे चिकित्स्य इत्येतस्य वाक्यस्यार्थे क्षेत्रियजित्येतत्पदं निपात्यते॥

**परक्षेत्राद्वा तत्र चिकित्स्य इति परलोपो घच्च ॥ २ ॥**

परक्षेत्राद्वा तत्र चिकित्स्य इत्येतस्मिन्नर्थे परलोपो निपात्यते घच्च प्रत्ययः। परक्षेत्रे चिकित्स्यः क्षेत्रियः॥

**[ इन्द्रियमिन्द्रलिङ्गमिन्द्रदृष्टमिन्द्रसृष्टमिन्द्रजुष्टमिन्द्रदत्तमिति वा ॥ ५ । २ । ९३ ॥ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये पञ्चमस्याध्यायस्य द्वितीये पादे प्रथममाह्निकम् ॥

---

(सू. ९१) येथें 'संज्ञायाम्' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

एखादें कृत्य होताना तें तिघांच्या दृष्टीस पडतें. जो देतो व ज्याला देतो असे दोघे, आणि तिसरा उपद्रष्टा. या तिन्ही अर्थी हा प्रत्यय प्राप्त होतो. परंतु साक्षी ही संज्ञा उपद्रष्ट्याचीच असल्यामुळें त्याच अर्थी यानें प्रत्यय होतो. देणारा श्रीमान् मनुष्य आणि ज्याला दिलें जातें तो मनुष्य या दोघानाही साक्षी म्हणत नाहींत.

(सू. ९२) येथे काय निपातन केलें आहे?

(वा. १) श्रोत्रिय (५।२।८४) शब्दाप्रमाणें क्षेत्रिय हें निपातन समजावें. 'परक्षेत्रे चिकित्स्यः' म्हणजे 'दुसऱ्या शरीरामध्यें जन्मान्तरीं चिकित्सा करण्याला योग्य असा हा रोग आहे' या वाक्याच्या अर्थी क्षेत्रिय असें पद येथें निपातन केलें आहे व त्यालाच इत्संज्ञक चकार जोडला आहे.

(वा. २) अथवा परक्षेत्र या शब्दाहून 'तेथें चिकित्सा करण्याला योग्य' या अर्थी घच् प्रत्यय आणि त्याच्या बरोबर परक्षेत्र शब्दांतील पर शब्दाचा लोप असें येथें निपातन समजावें. तेव्हां 'परक्षेत्रे चिकित्स्यः इति क्षेत्रियः' असें होतें.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पांचव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

---

१—(सू. ९२) 'जन्मान्तरीं तपासला जाणारा रोग म्हणजे असाध्य रोग' या अर्थी क्षेत्रियच् असें इत्संज्ञकचकारासहित येथे निपातन केलें आहे.

१—(सू. ९३) इन्द्र शब्दाहून घ प्रत्यय करून इन्द्रिय असा अन्त उदात्त असलेला शब्द येथे निपातन केला आहे त्याचा अर्थ चक्षु, श्रोत्र वगैरे इन्द्रिये हा प्रसिद्धच आहे. इन्द्रिय शब्दाची व्युत्पत्ति अनेक प्रकारें संभवते त्यांपैकीं कांही तऱ्हा येथें दाखविल्या आहेत: (१) इन्द्र म्हणजे आत्मा; त्याचें लिंग म्हणजे अनुमापक चिन्ह. (२) आत्म्यानें स्वतः-करिता पाहिलेलें (३) आत्म्याने स्वतःकरितां उत्पन्न केलेलें. (४) आत्म्याने स्वतःकरितां स्वीकारलेलें. (५) आत्म्याने स्वतःकरिता त्या त्या विषयाकडे पाठविलेलें.

अ. ५ पा. २ आ. १ समाप्त

## तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप्

॥ ५ । २ । ९४ ॥

**किमर्थमिमावर्थावुभौ निर्दिश्येते अस्यास्मिन्निति न यद्यस्य भवति तस्मिन्नपि तद्भवति यच्च यस्मिन्भवति तत्तस्यापि भवति । नैतयोरावश्यकः समावेशः । भवन्ति हि देवदत्तस्य गावो न च तास्तस्मिन्नाधृता भवन्ति । भवन्ति च पर्वते वृक्षा न च ते तस्य भवन्ति ॥**

**अथास्तिग्रहणं किमर्थम् । सत्तायामर्थे प्रत्ययो यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । न सत्तां पदार्थो व्यभिचरति ॥**

**इदं तर्हि प्रयोजनं संप्रतिसत्तायां यथा स्याद्भूतभविष्यत्सत्तायां मा भूत् । गावोऽस्यासन् गावोऽस्य भवितार इति । न तर्हीदानीमिदं भवति गोमानासीत् गोमान्भवितेति । भवति न त्वेतस्मिन्वाक्ये । यद्येतस्मिन्वाक्ये स्याद्यथेहास्तेः प्रयोगो न**

---

(सू. ९४) येथें 'तें आहे ज्याचें' आणि 'तें आहे ज्या ठिकाणी' असे निरनिराळे दोन अर्थ कशाकरितां बरें दाखविले आहेत? ते दोन दाखवावयास नकोत. दोहोंपैकीं कोणताही एक अर्थ दाखविला तरी चालेल. कारण, जी वस्तु ज्याची असते ती त्या ठिकाणीं असतेच. तसेंच जी वस्तु ज्या ठिकाणीं असते ती त्याचीही असतेच.

ह्या दोन्ही गोष्टी सर्व ठिकाणीं असतातच असा कांहीं नियम नाही. असें पहा कीं— देवदत्ताच्या मालकीच्या गाई आहेत; परंतु देवदत्त कांहीं त्या गाईंचें अधिकरण होत नाहीं. तसेंच पर्वतावर वृक्ष असतात परंतु ते कांहीं पर्वताच्या मालकीचे असत नाहींत.

आतां येथें अस्ति असें कशाकरितां म्हटलें आहे?

'अस्ति' या अर्थी प्रत्यय झाला पाहिजे म्हणजे प्रत्ययाच्या अर्थामध्यें 'अस्ति' या अर्थाचा प्रवेश झाला पाहिजे याकरितां म्हटलें आहे.

ह्या याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण कोणत्याही अर्थी प्रत्यय सांगितला तरी त्या पदार्थाचें तेथें अस्तित्व नाहीं असें कधींच होत[2] नाहीं.

तर मग येथें अस्ति शब्दाचा असा उपयोग समजावा कीं— वर्तमानकाळीं अस्तित्व असेल तरच हा मतुप् प्रत्यय झाला पाहिजे. गाई ज्याच्या पूर्वी होत्या, किंवा पुढें ज्याच्या गाई होतील त्याला त्या वेळच्या गाईंच्या अस्तित्वामुळें आतां गोमान् असें म्हणतां कामा नये.

तर मग आतां 'हा पूर्वी गोमान् होता', 'हा पुढें गोमान् होईल' असे प्रयोग[3] होत नाहींत काय?

तसे प्रयोग होतात. पण 'गावोऽस्य आसन्' या वाक्यामध्यें जसें त्या वेळचें गाईंचें अस्तित्व दाखविलें जातें तसें 'गोमान् आसीत्' या प्रयोगानें दाखविलें जात नाहीं. जर त्या वेळचें गाईंचें अस्तित्व दाखविणारा 'गोमान् आसीत्' किंवा 'गोमान् भविता' असा प्रयोग होईल तर गोमान् आणि यवमान् येथें गाई आणि यव यांचें अस्तित्व दाखविणारा अस्ति

---

१—(सू. ९४) प्रातिपदिकाहून 'ते आहे ज्याचें' या अर्थी किंवा 'ते आहे ज्याचे ठिकाणीं' या अर्थी मतुप् प्रत्यय होतो. उदा०—गोमान्; गाई ज्याच्या आहेत तो गाईचा मालक हा अर्थ आहे. त्याप्रमाणेंच वृक्षवान्; ज्या ठिकाणीं झाडें आहेत असा पर्वत वगैरे पदार्थ हा अर्थ आहे.

२—म्हणूनच 'तस्यापत्यम्' (४।१।९२) वगैरे सूत्रांमध्य अर्थाचा निर्देश करताना 'अस्ति' शब्द घातला नाहीं.

३—गाईंचें त्या वेळचें अस्तित्व घेऊन हे प्रयोग होत असतात ते आता जुळणार नाहींत.

भवति. गोमान् यवमानित्येवमिहापि न स्यात् गोमानासीत् गोमान्भवितेति । सति चाप्यस्तेः प्रयोगे यथेह बहुवचनं श्रूयते गावोऽस्यासन् गावोऽस्य भवितार इत्येवमिहापि स्यात् गोमानासीत् गोमान्भवितेति । का तर्हीयं वाचोयुक्तिः गोमानासीत् गोमान्भवितेति । एषैषा वाचोयुक्तिः । नैषा गवां सत्ता कथ्यते । किं तर्हि । गोमत्सत्तैषा कथ्यते । अस्त्यत्र वर्तमानकालो ऽस्तिः । कथं तर्हि भूतभविष्यत्सत्ता गम्यते । धातुसंबन्धे प्रत्ययाः [ ३.४.१ ] इति ॥

इदं तर्हि प्रयोजनमस्तियुक्ताद्यथा स्यादनन्तरादियुक्तान्मा भूदिति । गावोऽस्यानन्तराः गावोऽस्य समीप इति । अथ क्रियमाणेऽप्यस्तिग्रहण इह कस्मान्न भवति गावोऽस्य सन्त्यनन्तराः गावोऽस्य सन्ति समीप इति । असामर्थ्यात् । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । यथैव तर्हि क्रियमाणेऽस्तिग्रहणेऽसामर्थ्यादनन्तरादिषु न भवत्येवमक्रियमाणेऽपि न भविष्यति । अस्त्यत्र विशेषः । क्रियमाणे

शब्दाचा जसा प्रयोग होत नाहीं तसा गोमान् आसीत् व गोमान् भविता येथेंही अस्ति शब्दाचा प्रयोग न झाला पाहिजे. शिवाय गाईचें अस्तित्व दाखविणारा ‘गोमान् आसीत्’ अथवा ‘गोमान् भविता’ हा प्रयोग असेल तर ‘गावः अस्य आसन्’ तसेंच ‘गावः अस्य भवितारः’ येथें जसें बहुवचन होतें त्याप्रमाणें येथेंही बहुवचन झालें पाहिजे.

तर मग आतां ‘गोमान् आसीत्’ अथवा ‘गोमान् भविता’ ह्या उक्तीची योजना तरी कशी करावी?

त्या प्रयोगाची योजना अशी– तेथें कांहीं आसीत् व भविता या पदांनीं गाईचें अस्तित्व दाखविलें जात नाहीं; तर गाईच्या मालकाचें अस्तित्व दाखविलें जातें.

पण येथें मतुप् प्रत्ययाच्या अर्थांतील ‘अस्ति’ हा शब्द वर्तमानकाल दाखविणारा आहे ना? तर मग त्यानें भूतकाळची किंवा भविष्यकाळची गाईची सत्ता कशी बरें दाखविली जाईल?

‘धातुसंबन्धे प्रत्ययाः’ ( ३ । ४ । १ ) या सूत्रानें येथें मतुप् प्रत्ययाच्या अर्थांतील ‘अस्ति’ येथील लट् प्रत्यय भूतकाळीं तसाच भविष्यकाळीं केला आहे असें समजावें.

तर मग आतां येथें ‘अस्ति’ हा शब्द घालण्याचा उपयोग असा समजावा कीं गाई वगैरे पदार्थांचा अस्तीशीं योग असेल तरच हा मतुप् प्रत्यय झाला पाहिजे. अनन्तर वगैरे इतर अर्थांकडे गाई वगैरेंचा संबंध असेल तर तेथें मतुप् प्रत्यय न झाला पाहिजे. उदा०– गावः अस्यः अनन्तराः, गावः अस्य समीपे.

पण या सूत्रामध्यें ‘अस्ति’ हा शब्द घातला तरी देखील ‘गावः अस्य सन्ति अनन्तराः’ तसेंच ‘गावः अस्य सन्ति समीपे’ अशी अनन्तर वगैरे अर्थ असूनच अस्ति ह्या अर्थाची विवक्षा केली असतां मतुप् प्रत्यय कां होत नाहीं?

सामर्थ्य नाहीं म्हणून होत नाहीं.

हें असामर्थ्य येथें कसें बरें समजावें?

सापेक्ष असेल तें असमर्थ समजावें असा न्यायच[४] आहे.

तर मग आतां येथें अस्तिग्रहण केलें असतां ज्याप्रमाणें अनन्तर वगैरे अर्थांची विवक्षा असतांना असामर्थ्यामुळें वृत्ति होत नाहीं म्हणजे मतुप् प्रत्यय होत नाहीं त्याप्रमाणेंच येथें अस्ति शब्द नसला तरी असामर्थ्यामुळें मतुप् प्रत्यय होणार नाहीं.

तसें नाहीं. येथें अस्ति शब्द घालण्यांत आणि न घालण्यांत फरक आहे. तो असा

४—तेव्हां गो हें पद अनन्तर समीप या अर्थाच्या संबंधामुळें सापेक्ष होतें म्हणून तें असमर्थ होतें म्हणजे वृत्ति करण्याला योग्य होत नाहीं. कारण समर्थांचीच वृत्ति होत असते. ( २।१।१ ).

ऽस्तिग्रहणे नान्तरेण तृतीयस्य पदस्य प्रयोगमनन्तरादयोऽर्था गम्यन्ते । अक्रियमाणे पुनरस्तिग्रहणे ऽन्तरेणापि तृतीयस्य पदस्य प्रयोगमनन्तरादयोऽर्था गम्यन्ते ॥

अथेह कस्मान्न भवति । चित्रगुः शबलगुरिति । बहुव्रीहिणोक्तत्वान्मत्वर्थस्य ॥ अथेह कस्मान्न भवति । चित्रा गावोऽस्य सन्तीति । कुतः कस्मान्न भवति किमवयवादाहोस्वित्समुदायात् । अवयवात्कस्मान्न भवति । असामर्थ्यात् । कथमसामर्थ्यम् । सापेक्षमसमर्थं भवतीति । समुदायात्तर्हि कस्मान्न भवति । अप्रातिपदिकत्वात् । ननु च भो आकृतौ शास्त्राणि प्रवर्तन्ते । तद्यथा । सुप्सुपेति वर्तमाने ऽन्यस्य चान्यस्य च समासो भवति । सत्यमेवमेतत् । आकृतिस्तु प्रत्येकं परिसमाप्यते । यावत्येतत्परिसमाप्यते ङ्याप्प्रातिपदिकादिति तावत उत्पत्त्या भवितव्यमवयवे

---

कीं— येथें अस्ति शब्द घातला म्हणजे प्रयोगामध्यें अस्ति या अर्थाची विवक्षा करावीच लागते. त्यामुळें गावः सन्ति या दोन पदाशिवाय अनन्तर वगैरे तिसरें पद कांहींही उच्चारलें नाहीं तर त्या अनन्तर वगैरे अर्थांची मुळींच प्रतीति होत नाहीं. आणि येथें अस्ति शब्द घातला नाहीं तर अनन्तर वगैरे तिसरें कांहींच पद उच्चारले नाहीं तरी गावः असें नुसतें म्हटलें असतां अनन्तर वगैरे अर्थ मनात येणारच.[५]

आतां ‘ चित्रगुः ’ तसेंच ‘ शबलगुः ’ येथे बहुव्रीहि समास केला असतां त्याहून मतुप् प्रत्यय कां होत नाहीं ?

चित्रविचित्र आहेत गाई ज्याच्या असा बहुव्रीहीनेच मतुप् प्रत्ययाचा अर्थ उक्त होतो म्हणून होत नाहीं.

आतां ‘चित्राः गावः सन्ति यस्य’ या बहुव्रीहीच्याच वाक्यामध्यें मतुप् प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

पण ‘ कां होत नाहीं ’ हा प्रश्न ‘ वाक्याच्या अवयव शब्दाहून कां होत नाहीं ’ किंवा ‘ सबंध वाक्याहून कां होत नाहीं ’ यापैकीं कोणासंबंधानें समजावा ?

बरें; तर मग अवयवाहून कां होत नाहीं ?

सामर्थ्य नाहीं म्हणून होत नाहीं.

असामर्थ्य कसें ?

सापेक्ष असेल तें असमर्थच समजलें जातें.

तर मग सबंध वाक्याहून हा मतुप् प्रत्यय कां होत नाहीं ?

वाक्याला प्रातिपदिक संज्ञा नाहीं म्हणून त्याहून मतुप् होत नाहीं.

पण, काय हो, जातीकडे नजर देऊनच शास्त्रें प्रवृत्त होतात ना ? उदा०—सुपा अशी अनुवृत्ति आणून सुबन्ताबरोबर सांगितलेला समास हा निरनिराळ्या अनेक सुबन्तांबरोबर होतो.

ही गोष्ट खरी आहे, पण जाति ही प्रत्येक व्यक्तीवर पूर्णपणानें असते. म्हणून येथें ङ्याप्प्रातिपदिकात् याची अनुवृत्ति आणून ङ्यन्त, आबन्त, आणि प्रातिपदिक यांहून सांगितलेला तद्धित प्रत्यय जातीकडे नजर देऊन प्रवृत्त झाला तरी ज्या ठिकाणी ङ्यन्तत्व, आबन्तत्व आणि प्रातिपदिकत्व या जातींची पूर्णता असेल त्या ठिकाणींच तो प्रवृत्त होईल. आणि पञ्च गावः येथें प्रातिपदिकत्वाची पूर्णता तर पञ्च व गो या एकेक अवयवावर आहे; त्यांच्या समुदायावर नाहीं.[६]

---

५—तात्पर्य, येथें अस्ति हा शब्द घातला पाहिजे असें सिद्ध झालें.

६—तसें येथें वाक्यामध्ये अनेक प्रातिपदिकांहून मिळून एकदम हा प्रत्यय कां होत नाही असा अभिप्राय आहे. कारण, प्रातिपदिकत्व जाति ही एकच अनेकांवर आहे.

चैतत्परिसमाप्यते न समुदाये ॥ अथेह कस्मान्न भवति । पञ्च गावोऽस्य सन्ति पञ्चगुः दशगुरिति । प्रत्येकमसामर्थ्यात्समुदायादप्रातिपदिकत्वात्समासात्समासेनोक्तत्वात् । नैतत्सारम् । उक्तेऽपि हि प्रत्ययार्थे उत्पद्यते द्विगोस्तद्धितः । तद्यथा । द्वैमातुरः पाञ्चनापितिरिति । नैष द्विगुः । कस्तर्हि । बहुव्रीहिः । अपवादत्वाद् द्विगुः प्राप्नोति । अन्तरङ्गत्वाद्बहुव्रीहिर्भविष्यति । कान्तरङ्गता । अन्यपदार्थे बहुव्रीहिर्वर्तते विशिष्टे ऽन्यपदार्थे तद्धितार्थे द्विगुस्तस्मिंश्चास्य तद्धितेऽस्तिग्रहणं क्रियते ॥

यदि तर्ह्यतिप्रसङ्गाः सन्ति बहुव्रीहावप्यस्तिग्रहणं कर्तव्यमस्तियुक्ताद्यथा स्यादनन्तरादियुक्तान्मा भूदिति । अथ न सन्ति तद्धितविधावपि नार्थोऽस्तिग्रहणेन । सत्यमेवमेतत् । क्रियते त्विदानीं तद्धितविधावस्तिग्रहणम् । तद्वै क्रियमाणमपि प्रत्ययविध्यर्थं नोपाध्यर्थम् । अस्तिमानिति मतुब्यथा स्यात् । किं च कारणं न स्यात् ।

---

आतां पञ्च गावः सन्ति अस्य पञ्चगुः[७] दशगुः येथें हा मतुप् प्रत्यय कां होत नाहीं ?

तो न होण्याचें कारण असें कीं, प्रत्येक पदाहून करावा तर सामर्थ्य नाहीं व समुदायाहून करावा तर प्रातिपदिक संज्ञा नाहीं. आणि समास झाल्यानंतर त्याहून करावा तर समासानेंच तो अर्थ उक्त होतो.

समासाहून न होण्याचें जें कारण दाखविलें आहे तें खरें नव्हे. कारण द्विगु समासानें अर्थ उक्त असतांनाही द्विगूहून तद्धित प्रत्यय उत्पन्न होतोच. उदा. द्वयोः मात्रोः अपत्यं द्वैमातुरः, पञ्चानां नापितानामयं पाञ्चनापितिः.

द्विगुहून तद्धित प्रत्यय होऊं दे. पण पञ्च गावः सन्ति अस्य पञ्चगुः, तसाच दशगुः हा द्विगु समास नव्हेच.

तर हा समास कोणता ?

हा बहुव्रीहि समास आहे.

पण बहुव्रीहीचा अपवादत्वास्तव बाध करून येथें द्विगु समास प्राप्त होतो ना ?

अंतरंगत्वास्तव येथें बहुव्रीहीच होईल.

पण बहुव्रीहि अन्तरङ्ग कसा बरें ?

सामान्यतः अन्य पदार्थीं बहुव्रीहि होतो; आणि तद्धितार्थीं होणारा द्विगु हा विशिष्ट अन्य पदार्थीं होतो. कारण द्विगूचें निमित्त असलेल्या अशा ह्या तद्धित मतुप् प्रत्ययाचा अर्थ सांगतांना अस्तिग्रहण केलें आहे.

तर मग आतां जर अनन्तर वगैरे अर्थीं हा मतुप् प्रत्यय होऊं नये म्हणून येथें अस्तिग्रहण केलें असेल तर बहुव्रीहीमध्यें तसेच दोष येऊं नयेत म्हणून तेथेंही अस्तिग्रहण केलें पाहिजे. कारण नुसता अस्त्यर्थाशीं योग असेल तरच बहुव्रीहि झाला पाहिजे; अनन्तर वगैरे अर्थ असतांना न झाला पाहिजे. आतां अनभिधानामुळें अनन्तर वगैरे अर्थीं बहुव्रीहि होत नाहीं तेव्हां तेथें दोष नाहीं असें असेल तर त्याच रीतीनें येथेंही दोष येणार नाहींत. एकंदरींत येथें अस्तिग्रहण नको.

हें सर्व खरें आहे. तथापि येथें ज्याअर्थी आचार्यांनीं अस्तिग्रहण केलें आहे त्याअर्थी अर्थामध्यें विशेष दाखविण्याकरितां तें केलेंच नाहीं तर स्वतंत्र अस्ति शब्दाहून प्रत्यय सांगण्याकरितां केलें आहे असें समजतें. कारण अस्ति शब्दाहून मतुप् प्रत्यय होऊन अस्तिमान् असा प्रयोग झाला पाहिजे.

पण अस्तिमान् असा प्रयोग कां बरें

---

७—हा द्विगु समास आहे म्हणून शंकाकार पुनः प्रश्न विचारीत आहे.

८—अस्ति-ग्रहण नसलें म्हणजे त्या तद्धितार्थीं होणारा द्विगु हा कांहीं बहुव्रीहीपेक्षां बहिरंग होत नाहीं. तेव्हां 'पञ्चगु येथें बहुव्रीहीचा बाध करून अपवादत्वास्तव द्विगु होईल व त्यापुढें मतुप् प्रत्यय होऊं लागेल ' हा दोष कायम राहतो.

अप्रातिपदिकत्वात् । नैष दोषः । अव्ययमेषोऽस्तिशब्दो नैषास्तेर्लट् । कथमव्ययत्वम् । विभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च निपाता भवन्तीति निपातसंज्ञा निपातोऽव्ययमित्यव्ययसंज्ञा । एवमपि न सिध्यति । किं कारणम् । अस्तिसामानाधिकरण्ये मतुब्विधीयते न चास्तेरस्तिना सामानाधिकरण्यम् ॥ तदेतत्क्रियमाणमपि प्रत्ययविध्यर्थं नोपाध्यर्थं तस्माद् द्विगोस्तद्धितस्य प्रतिषेधो वक्तव्यो यदि तन्नास्ति सर्वत्र मत्वर्थे प्रतिषेध इति । सति हि तस्मिंस्तेनैव सिद्धम् ॥

अथ मत्वर्थीयान्मत्वर्थीयेन भवितव्यम् । न भवितव्यम् । किं कारणम् । अर्थगत्यर्थः शब्दप्रयोगः । अर्थं संप्रत्याययिष्यामीति शब्दः प्रयुज्यते । तत्रैकेनोक्तत्वात्तस्यार्थस्य द्वितीयस्य प्रयोगेण न भवितव्यम् । कि कारणम् । उक्तार्थानामप्रयोग इति । न तर्हीदानीमिदं भवति दण्डिमती शाला हस्तिमत्युपत्य-

होणार नाहीं?

प्रातिपदिक संज्ञा नसल्यामुळें सामान्य सूत्रानें तेथें मतुप् प्रत्यय होणार नाहीं.

हा दोष येत नाही. कारण अस्तिमान् येथील अस्ति हें अस् धातूहून लट् प्रत्यय करून साधलेलें क्रियापद नव्हे; तर येथें अस्ति हें अव्यय आहे.

अस्ति या शब्दाला अव्यय संज्ञा कशी बरें होते?

विभक्तिप्रत्ययान्तासारखे जे शब्द दिसतात त्यांना निपात संज्ञा होते (१।४।५८ गण. सूत्र) अशी अस्ति याला येथें निपात संज्ञा होते. नंतर निपाताला अव्यय संज्ञा (१।१।३८) होते. अशा रीतीनें अस्ति याला अव्यय संज्ञा होते.

तरी देखील अस्ति या अव्ययाहून मतुप् प्रत्यय होणार नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं अस्ति या अर्थाशीं सामानाधिकरण्य असतांना मतुप् प्रत्यय होतो; आणि येथें तर अस्ति याच अर्थाला अस्ति याच अर्थाशीं सामानाधिकरण्य मुळींच संभवत नाहीं. तेव्हां येथें सामान्य सूत्रानें सिद्धि नसल्यामुळें अस्तिमान् हा प्रयोग साधण्याकरितां स्वतंत्र रीतीनें प्रत्ययविधानार्थ अस्तिग्रहण केलें आहे; तेव्हां तें कांहीं अर्थामध्यें विशेष दाखविण्याकरितां नव्हे. एकंदरींत द्विगूपेक्षां बहुव्रीहि अन्तरङ्ग होत नसल्यामुळें पञ्चगु येथें द्विगूच होईल. तेव्हां जर 'सर्वत्र मत्वर्थे प्रतिषेधः' (२।१।५१ वा ११) असें वचन नसेल तर त्या द्विगूहून तद्धित मतुप् प्रत्ययाचा निषेध सांगितला पाहिजे. आणि तें जर वचन असेल तर त्यानेंच हें सिद्ध होईल, म्हणजे द्विगूचाच निषेध होईल.

आता या मत्वर्थीय प्रत्ययान्ताहून पुन्हां पुढें दुसरा मत्वर्थीय प्रत्यय व्हावा किंवा होऊं नये?

हा प्रश्न उपस्थित होण्याचें कारण काय?

कारण असें कीं, शब्दाचा प्रयोग हा अर्थाचें ज्ञान होण्याकारितांच होत असतो. तेव्हां दुसऱ्याला अर्थ कळवीन असें मनांत आणूनच वक्ता हा शब्दांचा प्रयोग करतो. तेव्हां एका मत्वर्थीय प्रत्ययानें अर्थ उक्त होत असल्यामुळें पुन्हां त्या अर्थीं दुसरा मत्वर्थीय प्रत्यय होणार नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं, कोणत्याही शब्दानें एकादा अर्थ उक्त झाला म्हणजे त्या अर्थीं पुनः दुसऱ्या शब्दाचा प्रयोग होत नाहीं असा न्यायच आहे.

तर मग दण्डिमती शाला, हस्तिमती उपत्यका हे प्रयोग होत नाहींत काय?

१—दण्ड व हस्त या शब्दांहून 'तें आहे ज्याचें' या मत्वर्थी इनि प्रत्यय (५।२।११५) करून त्या

केति । भवति । अर्थान्तरे वृत्तादर्थान्तरे वृत्तिः । षष्ठ्यर्थे वा वृत्तं सप्तम्यर्थे वर्तते सप्तम्यर्थे वा वृत्तं षष्ठ्यर्थे वर्तते ॥ अथ मत्वन्तान्मतुपा भवितव्यम् । गोमन्तोऽस्य सन्ति यवमन्तो ऽस्य सन्तीति । न भवितव्यम् । किं कारणम् । यस्य गोमन्तः सन्ति गावोऽपि तस्य सन्ति तत्रोक्तो गोभिरभिसंबन्धे प्रत्यय इति कृत्वा तद्धितो न भविष्यति । न तर्हीदानीमिदं भवति दण्डिमती शाला हस्तिमत्युपत्यकेति । भवति । अर्थान्तरे वृत्तादर्थान्तरे वृत्तिर्भविष्यति । षष्ठ्यर्थे वा वृत्तं सप्तम्यर्थे वर्तते सप्तम्यर्थे वा वृत्तं षष्ठ्यर्थे वर्तते ॥ इहापि सप्तम्यर्थे वा वृत्तं षष्ठ्यर्थे वर्तते षष्ठ्यर्थे वा वृत्तं सप्तम्यर्थे वर्तते । अन्यथाजातीयकः खल्वपि गोभिरभिसंबन्धे प्रत्ययो ऽन्यथाजातीयकस्तद्वता । येनैव खल्वपि हेतुनैतद्वाक्यं भवति गोमन्तोऽस्य सन्ति यवमन्तो ऽस्य सन्तीति तेनैव हेतुना वृत्तिरपि प्राप्नोति । तस्मान्मत्वर्थीयान्मतुबादेः प्रति-

---

निराळ्या अर्थीं वृत्ति आहे त्यामुळें तसे प्रयोग होतात. अस्य अशा षष्ठीच्या अर्थीं पूर्वी वृत्ति झालेली आहे व पुढें अस्मिन् अशा सप्तमीच्या अर्थीं वृत्ति करावयाची आहे. अथवा याच्या उलट सप्तमीच्या अर्थीं पूर्वीं वृत्ति झालेली आहे व पुढें षष्ठीच्या अर्थीं वृत्ति करावयाची असेल तेथेंही दोन मत्वर्थी प्रत्यय होतील.

आतां गोमन्तः अस्य सन्ति, यवमन्तः अस्य सन्ति अशा तऱ्हेच्या अर्थाची विवक्षा असतांना गोमत् व यवमत् या मतुप्-प्रत्यान्त शब्दांहून पुनः पुढें दुसरा मतुप् प्रत्यय झाला पाहिजे ना ?

तेथें असा मतुप् प्रत्यय होऊं नये.

काय कारण ?

कारण असें कीं गाईचे मालक ज्या पुरुषाचे आहेत तेथें गाई देखील त्या पुरुषाच्या आहेत असें म्हणतां येतें. तेव्हां तेथें गाईशीं संबंध दाखविणारा एक मतुप् प्रत्यय केलाच आहे म्हणून पुन्हां त्या अर्थीं दुसरा मतुप् प्रत्यय होणार नाहीं.

तर मग आतां दण्डिमती शाला व हस्तिमती उपत्यका हे प्रयोग होत नाहींतच काय ?

तसे प्रयोग होतात, कारण एका अर्थी पहिली वृत्ति झाल्यानंतर पुन्हा दुसऱ्या अर्थीं वृत्ति होईल. अस्य अशा षष्ठीच्या अर्थीं पूर्वीं वृत्ति झालेली आहे तेथें पुन्हा पुढें अस्मिन् अशा सप्तमीच्या अर्थीं वृत्ति होईल.

तर मग तसें गोमत् येथेंही सप्तमीच्या अर्थीं पूर्वीं वृत्ति झालेली आहे. आणि पुढें षष्ठीच्या अर्थीं करावयाची आहे; तेव्हां मतुप प्रत्ययान्ताहून मतुप् प्रत्यय होऊं लागेल. शिवाय, असें पहा कीं गाईशीं संबंध दाखविणारा प्रत्यय खरोखरच एक प्रकारचा आणि त्या गाईच्या मालकाशीं संबंध दाखविणारा प्रत्यय निराळ्या प्रकारचा [११] दिसतो. शिवाय तें कांहीं असो, गोमन्तः अस्य सन्ति, यवमन्तः अस्य सन्ति इत्यादि वाक्यें जो कांहीं अर्थ मनांत धरून उच्चारलीं जातात त्याच अर्थीं गोमत् व यवमत् शब्दाची पुनः मत्वर्थी वृत्ति प्राप्त होते. तेव्हां मत्वर्थीय-प्रत्ययान्त शब्दाहून पुढें

---

दण्डिन् व हस्तिन् या शब्दांहून पुढें ' तें आहे ज्या ठिकाणीं ' या अर्थीं मतुप् प्रत्यय केला आहे. हस्त म्हणजे हत्तीची सोंड. उपत्यका म्हणजे पर्वताच्या जवळची जमीन.

१०—'गाई आहेत ज्या गोठ्यामध्यें आणि पुढे तो गोठा आहे ज्याच्या मालकीचा या अर्थीं, किंवा याच्या उलट 'गाई आहेत ज्याच्या मालकीच्या आणि पुढें तो मालक ज्या ठिकाणीं राहतो तें घर' या अर्थीं प्रत्यय होईल.

११—त्या पुरुषाच्या मालकीच्या गाई आहेत असा संबंध दाखविणारा गोमत् येथील मतुप् प्रत्यय आहे; आणि तो पुरुष कोणाचा तरी चाकर आहे असा संबंध दाखविणारा पुढें मतुप् प्रत्यय करावयाचा आहे.

षेधो वक्तव्यः । तं चापि ब्रुवता समानवृत्तौ सरूप इति वक्तव्यम् । भवति हि दण्डिमती शाला हस्तिमत्युपत्यकेति ॥

[१२]शैषिकान्मतुबर्थीयाच्छैषिको मतुबर्थिकः
सरूपः प्रत्ययो नेष्टः सनन्तान्न सनिष्यते॥

किं पुनरिमे मतुप्प्रभृतयः सन्मात्रे भवन्ति । एवं भवितुमर्हति ।

मतुप्प्रभृतयः सन्मात्रे चेदतिप्रसङ्गः॥१॥

मतुप्प्रभृतयः सन्मात्रे चेदतिप्रसङ्गो भवति । इहापि प्राप्नोति । व्रीहिरस्य यवोऽस्येति ॥ तस्माद्भूमादिग्रहणं कर्तव्यम् । के पुनर्भूमादयः ।

भूमनिन्दाप्रशंसासु नित्ययोगेऽतिशायने।
संसर्गेऽस्तिविवक्षायां भवन्ति मतुबादयः॥

भूम्नि । गोमान् यवमान् ॥ निन्दायाम् । ककुदावर्ती संखादकी ॥ प्रशंसायाम् । रूपवान् वर्णवान् ॥ नित्ययोगे । क्षीरिणो वृक्षाः । कण्टकिनो वृक्षा इति ॥ अतिशायने । उदरिणी कन्या ॥ संसर्गे । दण्डी छत्त्री ॥ तर्हि भूमादिग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । कस्मान्न भवति

---

मतुप् वगैरे प्रत्ययांचा निषेध सांगितला पाहिजे आणि तो निषेध सांगतांना ' पहिली वृत्ति जशी केली असेल तशीच वृत्ति पुनः कर्तव्य असेल तर तो मत्वर्थीय प्रत्यय होत नाहीं आणि पूर्वी जो प्रत्यय केला असेल तोच प्रत्यय पुनः होत नाहीं ' असें म्हणावें. आणि तसें म्हटलें म्हणजेच दण्डिमती शाला हस्तिमती उपत्यका असे प्रयोग होतात.

पण काय हो. हे मतुप् वगैरे प्रत्यय ' ती वस्तु आहे ज्याची ' किंवा ' ती वस्तु आहे ज्या ठिकाणीं ' या अर्थी सांगितले आहेत. तेव्हां ती वस्तु तेथें थोडीशी किंवा क्षणभर असली तरी तेवढ्या अस्तित्वामुळें ते प्रत्यय होतात ना ?

ते प्रत्यय होण्यास कांहींच हरकत दिसत नाहीं.

(वा.१)हे मतुप् वगैरे प्रत्यय थोड्याशा अस्तित्वानें होतील तर दोष येतो. 'व्रीहि आहे ज्याचा' अथवा 'यव आहे ज्याचा' या अर्थी व्रीहिमान् अथवा यवमान् असें कोणत्याही मनुष्याला म्हणतां[१३] येईल. म्हणून भूमा वगैरे अर्थ गम्यमान असतांना हे प्रत्यय होतात असें म्हणावें.

ते भूमा वगैरे अर्थ कोणते ?

(श्लो.१)बाहुल्य, निन्दा, प्रशंसा, नित्य-संबंध, अतिशय आणि विद्यमान-संबंध यांपैकीं कोणताही एक अर्थ गम्यमान होत असून जर अस्ति या अर्थाची विवक्षा असेल तर हे मतुप् वगैरे प्रत्यय होतात. गोमान् व यवमान् येथें बाहुल्य अर्थ आहे. ककुदा[१४]वर्ती व संखादकी येथें निन्दा प्रतीत होत आहे. रूपवान् व वर्णवान् येथें प्रशंसा भासते. क्षीरिणो वृक्षाः[१५] व कण्टकिनो वृक्षाः येथें कायमचा संबंध आहे. उदरिणी कन्या येथें मोठ्या पोटाची असा अर्थ मनात येतो. दण्डी छत्री येथें हल्लीं हातानें दण्ड किंवा छत्र धरलेला असा अर्थ गम्यमान होतो.

तर मग हे भूमा वगैरे अर्थ निमित्त म्हणून धरले पाहिजेत.

तसे मुद्दाम धरावयास नकोत.

---

१२—याचा अर्थ मागें (३।१।७ भाग ३ पृष्ठ३२) पहा.

१३—कारण व्रीहीचे किंवा यवाचे एक दोन कण भिकाऱ्याजवळही असू शकतात.

१४—ककुद् म्हणजे बैलाचें वशिंड; त्या वशिंडाप्रमाणें वर आलेलें जे नाभिचक्र त्याला ककुदावर्त म्हणतात. तसेंच ज्यांनीं ओले, वाळलेले, कच्चे, भाजलेले वगैरे सर्व प्रकारचे पदार्थ भक्षण केले जातात त्या दातांना सखादक म्हणतात. सखादकी म्हणजे खादाड.

१५—अगदीं लहान झाड असलें तरी ज्याला आरंभापासून चीक असतो व कांटे असतात असा वृक्ष.

व्रीहिरस्य यवोऽस्येति ।

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् । अनभिधानादिति ॥ इतिकरणः खल्वपि क्रियते ततश्चेद्विवक्षा भूमादियुक्तस्यैव च विवक्षा । गोमान् यवमान् । भूमादियुक्तस्यैव सत्ता कथ्यते न हि कस्यचिद्यवो नास्ति । संखादकी ककुदावर्ती । निन्दायुक्तस्यैव सत्ता कथ्यते न हि कश्चिन्न संखादकी । रूपवान् वर्णवान् । प्रशंसायुक्तस्यैव सत्ता कथ्यते न हि कस्यचिद्रूपं नास्ति । क्षीरिणो वृक्षाः कण्टकिनो वृक्षा इति । नित्ययुक्तस्यैव सत्ता कथ्यते न हि कस्यचित्क्षीरं नास्ति उदरिणी कन्येति । अतिशायनयुक्तस्यैव सत्ता कथ्यते न हि कस्यचिदुदरं नास्ति । दण्डी छत्री । संसर्गयुक्तस्यैव सत्ता कथ्यते न हि कस्यचिद्दण्डो नास्ति ॥ यावतीभिः खल्वपि गोभिर्वाहदोहप्रसवाः कल्पन्ते तावतीषु सत्ता कथ्यते । कस्यचिच्चतसृभिः कल्पन्ते कस्यचिच्छतेनापि न प्रकल्पन्ते ॥

**सन्मात्रे चर्षिदर्शनात् ।**

सन्मात्रे च पुनर्ऋषिर्दर्शयति मतुपम् । यवमतीभिरद्भिर्यूपं प्रोक्षतीति ॥

---

पण तसें म्हटलें नाहीं तर 'व्रीहिरस्य' अथवा 'यवोऽस्य' या अर्थी म्हणजे एखादा यवाचा किंवा व्रीहीचा कण ज्याच्या जवळ आहे या अर्थी मतुप् प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

(वा. २) अथवा हें मागें सांगितलेंच आहे ?

तें काय सांगितलें आहे ?

अनभिधानात् (३।२।१) असें मागें सांगितलेंच आहे. शिवाय, प्रकृत सूत्रामध्यें इति हा शब्द घातला आहे त्यावरून विवक्षा असेल तेथेंच हा प्रत्यय होतो असें सिद्ध होतें. आणि विवक्षा तर भूमा वगैरे अर्थ असतांनाच असते. असें पहा कीं—बाहुल्य असेल तेथेंच गोमान् अथवा यवमान् असें लोक बोलतात. कारण, कोणाजवळही एखादा यवाचा कण नाहीं असें नसतेंच. तसेंच, संखादकी व ककुदावर्ती असें निन्दा करण्याच्या उद्देशानेंच लोक बोलतात. कारण मुळींच काहीं खात नाहीं असा कोणीच नसतो. तसेंच रूपवान् अथवा वर्णवान् असें प्रशंसा करण्याच्या उद्देशानेंच लोक बोलतात. कारण, कांहींही रूप नाहीं असा कोणीच नसतो. तसेंच क्षीरिणः वृक्षाः, किंवा कण्टकिनः वृक्षाः असे क्षीर वगैरेंचा कायमचा संबंध दाखविण्याच्या उद्देशानेंच लोक बोलतात. एरवीं, चीक नाहीं असें एकही झाड नसतें. तसेंच, उदरिणी कन्या असें मोठ्या पोटाची असेल तिलाच उद्देशून लोक बोलतात. एरवीं पोट नाहीं अशी कोणीच नसते. तसेंच दण्डी किंवा छत्री असें हातांत काठी किंवा छत्री घेतलेल्यांनाच लोक बोलतात. एरवीं काठी किंवा छत्री ज्याला नाहीं असा कोणीच नसतो.

आतां असें पहा[१६] कीं—ओझें वाहणें वगैरे कामाच्या उपयोगीं पडणारा एखादा बैल, तशीच एखादी दुभती गाय, एखादी व्यायला झालेली गाय असें ज्याच्या जवळ असेल त्याला गोमान् असे म्हणतात. एखाद्या साधारण मनुष्याजवळ तशाच चार पांच गाई असल्या कीं तेवढ्यानेंच तो गोमान् होतो. आणि राजासारख्याजवळ तशा शंभर गाई असल्या तरी तेवढ्यानें त्याला गोमान् म्हणत नाहींत. कारण त्याच्या ऐपतीच्या मानानें त्या कमीच होतात.

शिवाय, भूमा वगैरे कांहीं नसतांना नुसत्या अस्तित्वानेंच मतुप् प्रत्यय केलेला वेदामध्यें दृष्टीस पडतो. उदा० — यव[१७]मतीभिरद्भिर्यूपं

---

१६—येथून पुढें 'भूमनिन्दा०' इत्यादि म्हणण्यांत अर्थ नाहीं असें सिद्ध होत आहे.

१७—येथे पाण्यामध्ये चारदोनच यव टाकलेले असतात. तात्पर्य 'भूमनिन्दा०' हें कांहीं म्हणावयास नको.

**गुणवचनेभ्यो मतुपो लुक् ॥ ३ ॥**

गुणवचनेभ्यो मतुपो लुग्वक्तव्यः । शुक्लः कृष्ण इति ॥ अव्यतिरेकात् सिद्धम् । न गुणो गुणिनं व्यभिचरतीति ।

**अव्यतिरेकात्सिद्धमिति चेद् दृष्टो व्यतिरेकः ॥ ४ ॥**

दृश्यते व्यतिरेकः । तद्यथा । पटस्य शुक्ल इति ॥

**तथा च लिङ्गवचनसिद्धिः ॥ ५ ॥**

एवं च कृत्वा लिङ्गवचनानि सिद्धानि भवन्ति । शुक्लं वस्त्रम् शुक्ला शाटी शुक्लः कम्बलः शुक्लौ कम्बलौ शुक्लाः कम्बला इति । यदसौ द्रव्यं श्रितो भवति गुणस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तद्गुणस्यापि भवति ॥

**रसादिभ्यश्च ॥ ५ । २ । ९५ ॥**

किमर्थमिदमुच्यते न तदस्यास्त्यस्मिन्निन्त्येव मतुप्सिद्धः ।

**रसादिभ्यः पुनर्वचनमन्यनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

रसादिभ्यः पुनर्वचनं क्रियते ऽन्येषां मत्वर्थीयानां प्रतिषेधार्थम् । मतुबेव यथा स्याद्ये ऽन्ये मत्वर्थीयाः प्राप्नुवन्ति ते मा भूवन्निति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । दृश्यन्ते ह्यन्ये रसादिभ्यो मत्वर्थीयाः । रसिको नटः । उर्वशी वै रूपिण्यप्सरसाम् । स्पर्शिको वायुरिति ॥

---

प्रोक्षति.

(वा. ३) गुणवाचक शब्दाच्या पुढील मतुप् प्रत्ययाचा लुक् होतो असें म्हणावें उदा०— शुक्लः पटः; कृष्णः पटः.

अव्यतिरेकात्सिद्धम् म्हणजे गुणवाचक शब्द हा नेहमीं गुणी या अर्थानेंच उपयोगांत येतो; तेव्हां तोच त्याचा अर्थ असल्यामुळें लुकाशिवायच सिद्धि होईल असें म्हणाल तर तसें नाहीं. कारण—

(वा. ४) पटस्य शुक्लः असा त्याचा निराळा प्रयोगही दृष्टीस पडतो.

(वा. ५) तसा मतुप् प्रत्ययाचा लुक् करूनच शुक्लः पटः इत्यादि उदाहरणें सिद्ध होतात. म्हणूनच शुक्लं वस्त्रम्, शुक्ला शाटी, शुक्लः कम्बलः, शुक्लौ कम्बलौ, शुक्लाः कम्बलाः अशीं शुक्ल शब्दाला लागलेलीं निरनिराळीं लिंगें व निरानिराळीं वचनें बरोबर जुळतात. कारण, शुक्ल वगैरे गुण हा जेथें ज्या द्रव्याचा आश्रय घेतो तेथें त्या द्रव्याचें लिंग व त्याचें वचन त्या गुणवाचक शब्दाला लागलेलें असतें.

(सू. ९५) हें सूत्र कशाकरितां केलें आहे? तें करावयास नको. कारण या सूत्रांचीं उदाहरणें ' तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप् ' या पूर्वसूत्रानेंच सिद्ध होतात.

(वा. १) ' रसादि ' गणांतील शब्दांहून जो येथें पुनः मतुप् प्रत्यय सांगितला आहे तो मत्वर्थीय प्रत्ययांच्या निषेधाकरितां सांगितला आहे. म्हणजे 'रसादि' गणांतील शब्दांहून मतुप् प्रत्ययच झाला पाहिजे. जे कांहीं या मतुप् प्रत्ययाच्या अर्थी दुसरे प्रत्यय प्राप्त होतात ते न झाले पाहिजेत.

हा याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण ह्या रस वगैरे शब्दांहून दुसरे मत्वर्थीय प्रत्यय झालेले प्रयोगामध्यें दृष्टीस पडतात. उदा०— रसिकः नटः; उर्वशी वै रूपिण्यप्सरसाम्; स्पर्शिकः वायुः.

---

१—(सू. ९५) रस वगैरे शब्दांहून ' तें आहे ज्याचें ' किंवा ' तें आहे ज्या ठिकाणीं ' या अर्थी मतुप् प्रत्यय होतो. उदा०—रसवान् येथें या मतुप् प्रत्ययानें ठन् प्रत्ययाचा (५।२।११५) बाध झाला आहे.

२—रस व स्पर्श या शब्दांहून मत्वर्थी ठन् प्रत्यय (५।२।११५) झाला आहे. आणि रूप शब्दाहून इनि प्रत्यय (५।२।११५) झाला आहे.

**प्राणिस्थादातो लजन्यतरस्याम् ॥ ५ । २ । ९६ ॥**

इह कस्मान्न भवति । चिकीर्षास्यास्ति जिहीर्षास्यास्तीति । प्राण्यङ्गादिति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । कस्मान्न भवति चिकीर्षास्यास्ति जिहीर्षास्यास्तीति । अनभिधानात् ॥

**सिध्मादिभ्यश्च ॥ ५ । २ । ९७ ॥**

सिध्मादिषु यान्यकारान्तानि तेभ्यो लचा मुक्ते इनिठनौ प्राप्नुत इनिठनौ च नेष्येते ।

**लजन्यतरस्यामिति समुच्चयः ॥ १ ॥**

लजन्यतरस्यामिति समुच्चयोऽयं न विभाषा । लच् मतुप् ॥ कथं पुनरेतज्ज्ञायते लजन्यतरस्यामिति समुच्चयोऽयं न विभाषेति ।

**पिच्छादिभ्यस्तुन्दादीनां नानायोगकरणं ज्ञापकमसमावेशस्य ॥ २ ॥**

यदयं पिच्छादिभ्यस्तुन्दादीनां नानायोगं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः समुच्चयोऽयं न विभाषेति । यदि विभाषा स्यान्नानायोगकरणमनर्थकं स्यात् । तुन्दादीन्यपि

---

( सू. ९६ ) चिकीर्षा अस्य अस्ति तसेंच जिहीर्षा अस्य अस्ति, येथें चिकीर्षा व जिहीर्षा या आकारान्त शब्दांहून प्रकृत सूत्रानें लच् प्रत्यय कां बरें होत नाहीं ? तो होऊं लागेल; पण तो न व्हावा याकरितां 'प्राणिस्थात्' याच्या ऐवजीं 'प्राण्यङ्गात् असें' प्रकृत सूत्रामध्यें म्हणावें.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

पण तसें म्हटलें नाहीं तर चिकीर्षा अस्य अस्ति, जिहीर्षा अस्य अस्ति येथें लच् प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

अनभिधानास्तव होत नाहीं.

( सू. ९७ ) या ' सिध्मादि ' गणामध्यें जे शब्द ऱ्हस्व-अकारान्त आहेत त्यांहून हा वैकल्पिक लच् प्रत्यय जेव्हां होत नाहीं तेव्हां त्यांहून इनि व ठन् हे प्रत्यय ( ५।२।११५ ) होऊं लागतील. आणि ते इनि व ठन् हे प्रत्यय तर त्यांहून इष्ट नाहींत.

( वा. १ ) लच् अन्यतरस्याम् अशीं जीं पदें पूर्व सूत्रांतून येथें अनुवृत्त होतात त्यांतील 'अन्यतरस्याम्' याचा 'समुच्चय' असा येथें अर्थ आहे. विकल्प हा अर्थ येथें नाहीं. म्हणजे लच् आणि मतुप् या दोन्ही प्रत्ययांचें येथें विधान केलें आहे.

पण येथें ' लजन्यन्तरस्याम् ' यांतील ' अन्यतरस्याम् ' याचा समुच्चय अर्थ येथें आहे, विकल्प हा अर्थ येथें नाहीं हें कशावरून समजतें ?

( वा. २ ) आचार्योनीं पिच्छादि गणांतील शब्दांहून इलच् प्रत्यय सांगणारें (५।२।१००) सूत्र करून त्यांपेक्षां निराळे जे तुन्दादिगणांतील शब्द त्यांहून इलच् प्रत्यय सांगणारें (५।२।११७) सूत्र केलें आहे त्यावरून त्यांनीं असें सुचविलें आहे की येथें प्रत्ययांचा समुच्चय आहे, विकल्प नाहीं. जर विकल्प असता तर निरनिराळीं दोन सूत्रें उगीचच केलीं असें होईल. पिच्छादि गणामध्येंच तुन्दादि गणांतील

---

१—( सू. ९६ ) प्राण्यामध्यें असलेला जो पदार्थ तद्वाचक आकारान्त जो शब्द त्या शब्दाहून मत्वर्थी लच् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—चूडालः; चूडावान्.

२—चिकीर्षा म्हणजे एखादें कृत्य करण्याची इच्छा. जिहीर्षा म्हणजे एखादी वस्तु हरण करण्याची इच्छा. इच्छा हा प्राणिधर्म असल्यामुळें प्राण्यामध्यें ती असते.

१—( सू. ९७ ) सिध्म वगैरे शब्दांहून मत्वर्थी लच् व मतुप् हे प्रत्यय होतात. उदा०—सिध्मलः, सिध्मवान्. सिध्म म्ह. शिबें. ( श्वेतकुष्ट).

२—अन्यतरस्याम् याचा विकल्प असा अर्थ येथें घेतला तर पिच्छादि गणांतील अकारान्त शब्दांहून इलच् प्रत्यय जेव्हां होत नाहीं त्या वेळीं इनि,

पिच्छादिष्वेव पठेत् ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यन्नानायोगकरणे प्रयोजनम् । किम् । तुन्दादिषु यान्यनकारान्तानि तेभ्य इनिठनौ यथा स्याताम् ॥ यानि तर्ह्यकारान्तानि तेषां पाठः किमर्थः । ज्ञापकार्थ एव ॥

अपर आह । तुन्दादिभ्यः पिच्छादीनां नानायोगकरणं ज्ञापकमसमावेशस्य । यदयं तुन्दादिभ्यः पिच्छादीनां नानायोगं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः समुच्चयो न विभाषेति । यदि विभाषा स्यान्नानायोगकरणमनर्थकं स्यात् । पिच्छादीन्यपि तुन्दादिष्वेव पठेत् ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यन्नानायोगकरणे प्रयोजनम् । किम् । पिच्छादिषु यान्यनकारान्तानि तेभ्य इनिठनौ मा भूतामिति । यानि तर्ह्यकारान्तानि तेषां पाठः किमर्थः । ज्ञापकार्थ एव ॥

---

सर्व शब्द घातले असते.

हें ज्ञापक बरोबर जमत नाहीं. कारण निरनिराळीं दोन सूत्रें करण्याचा उपयोग निराळा आहे.

तो कोणता बरें ?

तो असा कीं—तुन्दादि गणामध्यें ऱ्हस्वअकारान्तांशिवाय जे शब्द आहेत त्यांहून इनि व ठन् हे प्रत्यय झाले पाहिजेत.

तर मग आतां तुन्दादि गणामध्यें ऱ्हस्वअकारान्त जे शब्द आहेत त्यांचा तर तेथें पाठ व्यर्थ होतोच ना ? तेव्हां त्यावरून हें ज्ञापक होईलच[3].

येथें दुसरा कोणी वैयाकरण 'तुन्दादिभ्यः पिच्छादीनां नानायोगकरणं ज्ञापकमसमावेशस्य' (वा. २) याचा अर्थ पुढें दिल्याप्रमाणें करतो[4]:—आचार्यांनीं तुन्दादि गणांतील शब्दांहून इलच् प्रत्यय सांगणारें सूत्र करून त्यापेक्षां निराळें पिच्छादि गणांतील शब्दांहून इलच् प्रत्यय सांगणारें सूत्र केलें आहे. त्यावरून त्यांनीं असें सुचविलें आहे कीं—येथें प्रत्ययाचा समुच्चय आहे, विकल्प नाहीं. जर विकल्प असता तर निरनिराळीं दोन सूत्रें उगीच केलीं असें होईल. तुन्दादि गणामध्येंच पिच्छादि गणांतील सर्व शब्द त्यानें घातले असते.

हें ज्ञापक बरोबर जमत नाहीं. कारण निरनिराळीं दोन सूत्रें करण्याचा उपयोग निराळा आहे.

तो कोणता बरें ?

तो असा कीं—पिच्छादि गणामध्यें ऱ्हस्वअकारान्तांशिवाय जे शब्द आहेत त्यांहून इनि व ठन् हे प्रत्यय न झाले पाहिजेत.

तर मग आतां त्या पिच्छादि गणामध्यें ऱ्हस्वअकारान्त जे शब्द आहेत त्यांचा तर तेथें पाठ व्यर्थ होतोच ना ? तेव्हां त्यावरून हें ज्ञापक होईलच.

---

ठन् व मतुप् असे प्रत्यय होऊन चार रूपें होतील. 'तुन्दादिभ्य इलच्च' (५।२।११७) येथील 'च' शब्दानें इनि व ठन् यांचा समुच्चय होऊन त्या तुन्दादि गणांतील शब्दाहून चार प्रत्यय होऊन चार प्रकारचीं रूपें होतात, व तीं इष्टही आहेत. तशींच पिच्छादि गणांतील अकारान्त शब्दाचीं चार रूपें होतील. तरी दोन सूत्रें निरनिराळीं करावयास नकोत. येथील 'अन्यतरस्याम्' याचा अर्थ समुच्चय घेतला म्हणजे येथें फक्त मतुप् प्रत्ययाचाच समुच्चय होतो. कारण इनि व ठन् हे प्रत्यय अजून सांगितलेच नाहींत. मतुप् प्रत्ययाचा मात्र समुच्चय सर्वच प्रत्ययांबरोबर होतो.

३—पिच्छादि गणांतील अकारान्त शब्द आणि तुन्दादि गणांतील अकारान्त शब्द या सर्वांचीं रूपें सारखींच जर होतील तर कांहीं शब्द इकडे व काही शब्द तिकडे असा आचार्यांनीं भेद दाखविला नसता. पण ज्या अर्थी भेद दाखविला आहे त्या अर्थी असें सूचित होतें कीं येथील अन्यतरस्याम् याचा अर्थ समुच्चय आहे.

४—ह्या योजना करणाऱ्यानें ह्या वार्तिकामध्यें 'पिच्छादिभ्यस्तुन्दादीनाम्' याच्या ऐवजी 'तुन्दादिभ्यःपिच्छादीनाम्' असा पाठ घेतला आहे.

**वस्य च पुनर्वचनं सर्वविभाषार्थम् ॥३॥**

वस्य खल्वपि पुनर्वचनं क्रियते सर्वविभाषार्थम् । केशाद्वोऽन्यतरस्याम् [ ५. २. १०९ ] इति । एतदेव ज्ञापयत्याचार्यः समुच्चयो न विभाषेति ॥

द्युद्रुभ्यां नित्यार्थमेकेऽन्यतरस्यांग्रहणमिच्छन्ति । कथम् । विभाषामध्येऽयं योगः क्रियते विभाषामध्ये ये विधयो नित्यास्ते भवन्तीति ॥

**[ वत्सांसाभ्यां कामबले ॥ ५ । २ । ९८ ॥**

**फेनादिलच् ॥ ५ । २ । ९९ ॥]**

**लोमादिपामादिपिच्छादिभ्यः शनेलचः ॥ ५ । २ । १०० ॥**

**नप्रकरणे दद्रा ह्रस्वत्वं च ॥ १ ॥**

नप्रकरणे दद्रा उपसंख्यानं कर्तव्यं ह्रस्वत्वं च वक्तव्यम् । दद्रुणः ॥

अत्यल्पमिदमुच्यते । शाकीपलालीदद्रूणां ह्रस्वत्वं चेति वक्तव्यम् । शाकिनम् पलालिनम् दद्रुणम् ॥

---

( वा. ३ ) शिवाय पुढें 'व' हा प्रत्यय सांगतांना जें 'केशाद्वोऽन्यतरस्याम्' (५।२।१०९) येथें पुन्हां 'अन्यतरस्याम्' असें म्हटलें आहे तें तेथें सर्वांचा विकल्प झाला पाहिजे आणि पाळीपाळीनें व, इनि, ठन् आणि मतुप् हे चारी प्रत्यय झाले पाहिजेत यांकरितां म्हटलें आहे. त्यावरूनही आचार्य असें सुचवितात कीं– प्रकृत 'अन्यतरस्याम्' याचा समुच्चय हा अर्थ आहे; विकल्प हा अर्थ नाहीं.

येथें कांहीं लोक असें म्हणतात कीं— 'केशाद्वोऽन्यतरस्याम्' येथें जें 'अन्यतरस्याम्' ग्रहण केलें आहे तें त्याच्या पूर्वीच्या 'द्युद्रुभ्यां मः' (५।२।१०८) या सूत्रानें सांगितलेला प्रत्यय नित्य व्हावा याकरिता केलें आहे.

तें कसें ?

असें कीं– दोन विकल्पांच्या मध्यें 'द्युद्रुभ्यां मः' हें सूत्र आहे. आणि दोन विकल्पांच्या मध्यें जे विधी असतात ते नित्यच होतात असा न्याय आहे.

( सू. १०० वा. १) ह्या 'न' प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें 'दद्रू शब्दाहून मत्वर्थी न प्रत्यय होतो आणि दद्रू शब्दांतील शेवटच्या ऊकाराला ऱ्हस्व होतो' असें म्हणावें. उदा० दद्रूः अस्यास्तीति दद्रुणः; दद्रू म्हणजे कोरडी खरूज (दादरा).

हें फार थोडें सांगितलें आहे. येथें तर शाकी, पलाली आणि दद्रू या तीन शब्दांहून न प्रत्यय होतो आणि तिन्ही शब्दांच्या शेवटच्या अचाला ऱ्हस्व होतो असें म्हणावें. उदा०–शाकिनम् पलालिनम् दद्रुणम्.

---

५—प्रकृत 'अन्यतरस्याम्' याचा जर विकल्प हा अर्थ असता तर त्याच्या अनुवृत्तीनेंच तेथे विकल्प झाला असता.

१—( सूत्र ९८ ) प्रेम या अर्थाचा वत्स शब्द आणि बल या अर्थाचा अंस शब्द यांहून मत्वर्थी लच् प्रत्यय होतो. उदा०—वत्सलः (प्रेमळ मनुष्य); अंसलः ( बलवान मनुष्य ). प्रेम आणि बल हे अर्थ लच् प्रत्यय करतांनाच ह्या शब्दांना घेतले जातात. त्यामुळें त्या अर्थांच्या वत्स व अंस शब्दांहून मतुप् प्रत्यय होत नाहीं.

१—( सू. ९९ ) फेन शब्दाहून मत्वर्थी इ लच् आणि लच् असे प्रत्यय होतात. उदा०—फेनिलः, फेनलः. एकदां मतुप् होतोच. उदा०—फेनवान्.

१—(सू. १००) लोमन् वगैरे शब्दांहून मत्वर्थी 'श' प्रत्यय होतो, पामन् वगैरे शब्दांहून मत्वर्थी 'न' प्रत्यय होतो, आणि पिच्छ वगैरे शब्दांहून मत्वर्थी 'इलच्' प्रत्यय होतो. उदा०— लोमशः; पामनः; पिच्छिलः. एकदां मतुप् प्रत्यय होतोच. उदा०— लोमवान्, पिच्छवान्.

२—शाकी म्ह. मोठें शाक. पलाली म्ह. मोठें पलाल.

**विष्वगित्युत्तरपदलोपश्चाकृतसंधेः ॥ २ ॥**

विष्वगित्युपसंख्यानं कर्तव्यमुत्तरपदलोपश्चाकृतसंधेर्वक्तव्यः । विष्वग्गतान्यस्य विषुणः ॥

**प्रज्ञाश्रद्धार्चाभ्यो णः॥५।२।१०१॥**

**वृत्तेश्च ॥ १ ॥**

वृत्तेश्चेति वक्तव्यम् । वार्त्तम् ॥

**तपःसहस्राभ्यां विनीनी ॥ ५ । २ । १०२ ॥**

**अण् च ॥ ५ । २ । १०३ ॥**

किमर्थं तपःशब्दाद्विन्विधीयते नासन्तादित्येव सिद्धम् ।

**तपसो विन्वचनमण्विधानात् ॥ १ ॥**

तपसो विन्वचनं क्रियते तपःशब्दादण्विधीयते स विशेषविहितः सामान्यविहितं विनं बाधेत ॥

**अण्प्रकरणे ज्योत्स्नादिभ्य उपसंख्यानम् ॥ २ ॥**

अण्प्रकरणे ज्योत्स्नादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । ज्यौत्स्नः तामिस्रः कौण्डलः कौतपः वैपादिकः ॥

**[ सिकताशर्कराभ्यां च ॥ ५ । २ । १०४ ॥**

**देशे लुबिलचौ च ॥ ५।२।१०५ ॥**

(वा. २) 'विषु म्ह. नाना प्रकारचीं अञ्च् म्ह. गमनें तीं आहेत ज्याची' या अर्थी 'विषु अञ्च्' या संधि न केलेल्या शब्दाहून न प्रत्यय होतो आणि त्या शब्दांतील अञ्च् या उत्तरपदाचा लोप होतो असें म्हणावें. उदा०— विष्वक् गतानि अस्य विषुणः.

(सू. १०१ वा.१) वृत्ति शब्दाहूनही हा ण प्रत्यय होतो. उदा० वार्तः.

( सू. १०२,१०३ ) येथें तपस् शब्दाहून विन् प्रत्यय कशाकरितां सांगितला आहे? तो सांगावयास नको. तर अस् हीं अक्षरें शेवटीं असलेल्या शब्दांहून मत्वर्थीं विनि प्रत्यय ( ५ । २ । १२१ ) सांगितला आहे, त्यानेंच येथेंही काम भागेल.

( वा. १ ) येथें तपस् शब्दाहून जो हा अण् प्रत्यय सांगितला आहे तो विशेषविहित असल्यामुळें सामान्यतः सांगितलेल्या त्या विन् प्रत्ययाचा ( ५ । २ । १२१ ) बाध करील म्हणून येथें मुद्दाम तपस् शब्दाहून विन् प्रत्यय सांगितला आहे.

( वा. २ ) ह्या अण् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें ज्योत्स्ना वगैरे शब्दांहून मत्वर्थीं अण् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—ज्योत्स्ना अस्ति अस्मिन् ज्यौत्स्नः, तामिस्रः, कौण्डलः, कौतपः, वैपादिकः.

१—( सू. १०१ ) प्रज्ञा, श्रद्धा व अर्चा या शब्दाहून मत्वर्थीं ण प्रत्यय होतो. उदा०—प्रज्ञा अस्ति यस्य प्राज्ञः; श्राद्धः; आर्चः. मतुप्ही होतोच. उदा०—प्रज्ञावान्, श्रद्धावान्, अर्चावान्.

२—वृत्ति. अस्यास्तीति वार्तः. एकदां वृत्तिमान् असें होतेंच.

१—( सू. १०२ ) तपस् आणि सहस्र या शब्दाहून मत्वर्थीं विनि आणि इनि असे प्रत्यय क्रमानें होतात. उदा०—तपस्वी, सहस्री.

१—( सू. १०३ ) तपस् आणि सहस्र या शब्दांहून मत्वर्थीं अण् प्रत्ययही होतो. उदा०— तापसः, साहस्रः.

२—येथे ज्योत्स्ना, तमिस्रा, कुण्डल, कुतप आणि विपादिका या शब्दांहून अण् प्रत्यय झाला आहे. ज्योत्स्ना म्हणजे चांदणें. तमिस्रा म्हणजे अंधकार. कुतप म्हणजे दिवसाचा आठवा मुहूर्त. विपादिका म्ह. पायाचा फोड.

१—( सू. १०४ ) सिकता आणि शर्करा या शब्दाहून मत्वर्थीं अण् प्रत्यय होतो. उदा०—सैकतः घटः, शार्करं मधु

१—( सू. १०५ ) सिकता आणि शर्करा या शब्दांच्या पुढील मत्वर्थीय प्रत्ययाचा लुप् होतो व एकदां इलच् अण् व मतुप् हे प्रत्यय देश हा अर्थ गम्यमान असतांना होतात. उदा०—सिकताः, सिकतिलः, सैकतः, सिकतावान् देशः. तसेंच शर्करा, शर्करिलः, शार्करः, शर्करावान् देशः.

दन्त उन्नत उरच् ॥ ५।२।१०६ ॥]

## ऊषसुषिमुष्कमधो रः ॥ ५ । २ । १०७ ॥

अयं मधुशब्दो ऽस्त्येव द्रव्यपदार्थको ऽस्ति रसवाची । आतश्च रसवाच्यपि मधुन्येव हि मध्विदं मधुरमिति प्रयुज्यते । तद्यो रसवाची तस्येदं ग्रहणम् । यदि हि द्रव्यपदार्थकस्य ग्रहणं स्यादिहापि प्रसज्येत । मध्वस्मिन्घटेऽस्ति ॥

### रप्रकरणे खमुखकुञ्जेभ्य उपसंख्यानम् ॥ १ ॥

रप्रकरणे खमुखकुञ्जेभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । खरः मुखरः कुञ्जरः ॥ नगाच्चेति वक्तव्यम् । नगरम् ॥

[द्युद्रुभ्यां मः ॥ ५ । २ । १०८ ॥]

## केशाद्वोऽन्यतरस्याम् ॥ ५ । २ । १०९ ॥

### वप्रकरणे मणिहिरण्याभ्यामुपसंख्यानम् ॥ १ ॥

वप्रकरणे मणिहिरण्याभ्यामुपसंख्यानं कर्तव्यम् । मणिवः हिरण्यवः ॥

### छन्दसीवनिपौ च ॥ २ ॥

छन्दसीवनिपौ च वक्तव्यौ वश्च मतुप् च । रथीरभून्मुद्गलानी गविष्टौ । सुम-

---

( सू. १०७ ) या मधु शब्दाचा गोड पदार्थ असा अर्थ आहे; तसाच गोडी असाही त्याचा अर्थ आहे. गोडी असाही मधु शब्दाचा अर्थ असें म्हणण्याचें कारण हें आहे कीं मधु याच अर्थी ' हें मधु मधुर आहे ' असा प्रयोग होतो. तेव्हां त्यांत जो गोडी या अर्थाचा मधु शब्द आहे त्याचें येथें ग्रहण केलें आहे. जर 'गोड पदार्थ' या अर्थाचा मधु शब्द येथें घेतला तर मधु ज्यामध्यें आहे असा घट या अर्थीही मधुर असा प्रयोग होऊं लागेल.

ह्या ' र ' प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें ख, मुख आणि कुञ्ज या शब्दांहून मत्वर्थी र प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—खरः, मुखरः, कुञ्जरः. नग शब्दाहूनही हा ' र ' प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० नगरम्.

( सू. १०९ वा. १ ) ह्या ' व ' प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें मणि आणि हिरण्य या शब्दांहून मत्वर्थी ' व ' प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—मणिवः नागविशेषः; हिरण्यवः निधिविशेषः.

( वा. २ ) प्रातिपदिकांहून मत्वर्थी ई आणि वनिप् हे प्रत्यय वेदामध्यें होतात. तसेंच व आणि मतुप् हेही प्रत्यय होतात; उदा०— ' रथीरभून्मुद्गलानी गविष्टौ '.

---

१—( सू. १०६ ) दन्त शब्दाहून ' उन्नत दांत ज्याचे आहेत तो' या अर्थी उरच् प्रत्यय होतो. उदा०—उन्नताः दन्ताः अस्य दन्तुरः.

१—( सू. १०७ ) ऊष, सुषि, मुष्क आणि मधु या शब्दांहून मत्वर्थी 'र' प्रत्यय होतो. उदा०—ऊषरं क्षेत्रम्, ऊष म्हणजे खारी माती सुषिरं काष्ठम्. सुषि म्हणजे बीळ. मुष्करः पशुः. मुष्क म्हणजे अण्डकोश. मधुरः गुडः.

२—खर म्हणजे गाढव; ख म्हणजे छिद्र. गाढवाचें कंठछिद्र मोठें असतें म्हणूनच त्याचा शब्द मोठा होतो. येथें भूमनिन्दा यांपैकीं अतिशय हा अर्थ गम्यमान आहे. तसेंच मुखर येथेंही आहे. मुखर म्हणजे बोलका. ' ह्याला अतिशय तोंड आहे ' असें लोक म्हणतात. कुंजर म्हणजे हत्तीची हनवटी. नग म्हणजे वृक्ष.

१—( सू. १०८ ) द्यु आणि द्रु या शब्दांहून मत्वर्थी 'म' प्रत्यय होतो. उदा०—द्युमः, द्रुमः. हे रूढिशब्द असल्यामुळें एकदा मतुप् प्रत्यय होत नाहीं.

१—( सू. १०९ ) केश शब्दाहून मत्वर्थी 'व' प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—केशवः, केशी, केशिकः, केशवान्

२—रथ व सुमङ्गल या शब्दांहून ई प्रत्यय होऊन रथी, व सुमङ्गली असे दीर्घईकारान्त शब्द होतात. ऋत

ङ्गलीरियं वधूः । ऋतावानम् । मघवानमीमहे । उद्वा च उद्वती च ॥

मेधारथाभ्यामिरनिरचौ ॥ ३ ॥

मेधारथाभ्यामिरनिरचौ वक्तव्यौ । मेधिरः रथिरः ॥

अपर आह । वप्रकरणे ऽन्येभ्योऽपि दृश्यत इति वक्तव्यम् । बिम्बावम् कुररावम् इष्टकावम् ॥

[ गाण्ड्यजगात्संज्ञायाम् ॥ ५ । २ । ११० ॥

काण्डाण्डादीरन्नीरचौ ॥ ५ । २ । १११ ॥]

रजःकृष्यासुतिपरिषदो वलच् ॥ ५ । २ । ११२ ॥

वलच्प्रकरणेऽन्येभ्योऽपि दृश्यते ॥ १ ॥

वलच्प्रकरणे ऽन्येभ्योऽपि दृश्यत इति वक्तव्यम् । भ्रातृवलः पुत्रवलः उत्सङ्गवलः ॥

[ दन्तशिखात्संज्ञायाम् ॥ ५ । २ । ११३ ॥

ज्योत्स्नातमिस्राशृङ्गिणोर्जस्विन्नूर्जस्वलगोमिन्मलिनमलीमसाः ॥ ५ । २ । ११४ ॥ ]

---

' सुमङ्गलीरिय वधू: ', ' ऋतावानम् मघवानमीमहे '; ' उद्वा च उद्वती च '

( वा. ३ ) मेधा आणि रथ या शब्दांहून वेदामध्यें मत्वर्थी इरन् आणि इरच् हे प्रत्यय क्रमानें होतात. उदा० मेधिर:; रथिर:.

येथें दुसरा कोणी वैयाकरण असे म्हणतो कीं ह्या ' व ' प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें इतरही काहीं शब्दांहून हा ' व ' प्रत्यय मत्वर्थी दिसतो असें म्हणावें उदा०—बिम्बावम्, कुररावम्, इष्टकावम्.

( सू. ११२ वा. १ ) ह्या ' वलच् ' प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें ' इतरही कांहीं शब्दांहून हा वलच् प्रत्यय मत्वर्थी दिसतो ' असें म्हणावें. उदा०— भ्रातृवल:, पुत्रवल:. उत्सङ्गवल:.

---

आणि मघ याहून वनिप् प्रत्यय झाला आहे. ऋत शब्दाला दीर्घ ( ६।३।१३७ ) झाला आहे. ऊर्ध्वगति या अर्थाच्या उद् याहून व प्रत्यय आणि वनिप् प्रत्यय केल्यानंतर पुढे स्त्रीलिंगी टाप प्रत्यय आणि ङीप् प्रत्यय झाले आहेत

१—तेव्हा त्याचेही विधान करावे

१—( सू ११० ) गाण्डि आणि गाण्डी अशी दोन्ही प्रकारची पदें येथे संधि करून निर्दिष्ट केलीं आहेत. ते दोन्ही शब्द आणि अजग शब्द यांहून मत्वर्थी ' व ' प्रत्यय होतो; परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—गाण्डिवम्, गाण्डीवम् ( अर्जुनाचे धनुष्य ) अजगवम् ( शिवाचें धनुष्य ).

१—( सू. १११ ) काण्ड आणि आण्ड या शब्दाहून मत्वर्थी ईरन् आणि ईरच् हे प्रत्यय क्रमानें होतात. उदा०—काण्डीर:; आण्डीर:

१—( सू. ११२ ) रजस्, कृषि, आसुति, आणि परिषद् या शब्दांहून मत्वर्थी वलच् प्रत्यय होतो. उदा०—रजस्वला स्त्री , कृषीवल (शेतकरी) ; आसुतीवल: शौण्डिक . परिषद्वल राजा. आसुति म्हणजे अभिषव ( कुटणे, पिळणे वगैरे ). मद्यें तयार करतांना या क्रिया होतात.

१—( सू. ११३ ) दन्त व शिखा या शब्दाहून मत्वर्थी वलच् प्रत्यय होतो. पण तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे उदा०—दन्तावल: गज. शिखावल. मयूर .

१—( सू ११४ ) ज्योत्स्ना वगैरे आठ शब्द येथें मत्वर्थी निपातन केले आहेत. ज्योतिस् शब्दाहून ' ते ज्यामध्ये आहे ' या अर्थी न प्रत्यय आणि इकाराचा लोप होतो. ज्योत्स्ना म्हणजे चांदणें. तमिस्रा म्हणजे काळोखी रात्र तमस् शब्दाहून र प्रत्यय आणि सकाराच्या मागील अकाराला इकार झाला आहे. शृङ्ग शब्दाहून इन प्रत्यय होतो ऊर्ज् म्हणजे बल. ऊर्ज् शब्दाहून विन् आणि वल हे प्रत्यय आणि ऊर्ज्

**अत इनिठनौ ॥ ५ । २ । ११५ ॥**

**इनिठनोरेकाक्षरात्प्रतिषेधः ॥ १ ॥**

इनिठनोरेकाक्षरात्प्रतिषेधो वक्तव्यः । स्ववान् खवान् ॥ अत्यल्पमिदमुच्यते ।

**एकाक्षरात्कृतो जातेः**
**सप्तम्यां च न तौ स्मृतौ ।**

एकाक्षरात् । स्ववान् खवान् । कृतः । कारकवान् हारकवान् । जातेः । वृक्षवान् प्लक्षवान् व्याघ्रवान् सिंहवान् । सप्तम्यां च न तौ । दण्डा अस्यां शालायां सन्तीति ॥ यदि कृतो नेत्युच्यते कार्यी कार्यिक इति न सिध्यति । तथा च यदि जातेर्नेत्युच्यते तण्डुली तण्डुलिक इति न सिध्यति ॥ एवं तर्हि नायं समुच्चयः कृतश्च जातेश्चेति । किं तर्हि । जातिविशेषणं कृद्ग्रहणं कृद्या जातिरिति । कथं कारकवान् हारकवान् । अनभिधानान्न भविष्यति ॥ यद्येवं नार्थोऽनेन । कथं स्ववान् वृक्षवान् सिंहवान् व्याघ्रवान् दण्डा अस्यां शालायां सन्तीति । अनभिधानान्न भविष्यति ॥

(सू. ११५ वा. १) एक अक्षराच्या शब्दाहून हे इनि व ठन् प्रत्यय होत नाहींत असें म्हणावें उदा० स्ववान्; खवान्.

येथें हा निषेध फारच थोड्या ठिकाणीं सांगितला आहे.

(श्लो. १) एकाक्षरी शब्द, कृत्-प्रत्ययान्त शब्द आणि जाति-शब्द यांहून हे इनि व ठन् प्रत्यय होत नाहींत, आणि 'तें आहे ज्याठिकाणीं' या सप्तमीच्या अर्थीं हे इनि व ठन् प्रत्यय होत नाहींत. एकाक्षरी शब्दाचीं उदाहरणें स्ववान् व खवान्; कृत्-प्रत्ययान्त शब्दाचें उदाहरण कारकवान्, तसेंच हारकवान्; जाति-शब्दाचीं उदाहरणें वृक्षवान्, प्लक्षवान्, व्याघ्रवान्, सिंहवान्. सप्तमीच्या अर्थीं इन् व ठन् प्रत्यय होत नाहींत याचें उदाहरण दण्डाः सन्ति शालायाम् अस्याम्.

पण जर कृत्-प्रत्ययान्त शब्दाहून इनि व ठन् हे प्रत्यय होत नाहींत तर कार्यी व कार्यिकः हीं उदाहरणें सिद्ध होणार नाहींत. तसेंच जाति-शब्दाहून इनि व ठन् प्रत्यय होत नाहींत तर तण्डुली व तण्डुलिकः हीं उदाहरणें सिद्ध होणार नाहींत.

तर मग या निषेध वाक्यामध्यें कृतः आणि जातेः हे दोन निरनिराळे निषेध आहेत असें समजूं नये.

तर मग कसें समजावें ?

असें समजावें कीं कृतः हें जातीचें विशेषण आहे म्हणजे 'कृत्-प्रत्ययान्त जो जातिवाचक शब्द त्याहून इनि व ठन् हे प्रत्यय होत नाहींत असा एकच निषेध समजावा.

पण तसें असेल तर कारकवान् व हारकवान् येथें कारक व हारक हे शब्द जातिशब्द नसल्यामुळें निषेध प्रवृत्त होणार नाहीं.

अनभिधानास्तव तेथें इनि व ठन् प्रत्यय होणार नाहींत.

मग असेंच जर असेल तर हा निषेध मुळींच नको.

पण निषेध मुळींच नसेल तर स्ववान्, वृक्षवान्, सिंहवान्, दण्डाः सन्ति अस्यां शालायाम् इत्यादि निषेधाच्या उदाहरणांमध्यें इनि व ठन् कां बरें होणार नाहींत. ?

अनभिधानास्तव होणार नाहींत.

---

शब्दाला असुक् आगम होतो. गो शब्दाहून मिन् प्रत्यय होतो. मल शब्दाहून इन आणि ईमस हे प्रत्यय होतात.

१—(सू. ११५) ऱ्हस्व-अकारान्त शब्दांहून मत्वर्थी इनि व ठन् हे प्रत्यय होतात. उदा०—दण्डी, दण्डिकः. एकदां मतुप् प्रत्यय होतोच. उदा०—दण्डवान्.

२—दण्ड म्हणजे दमन करण्याचें साधन. दण्ड हा यौगिक शब्द आहे; जाति शब्द नव्हे. म्हणून दण्डी वसेंच दण्डिकः येथें हा निषेध प्रवृत्त होत नाहीं.

## व्रीह्यादिभ्यश्च ॥ ५ । २ । ११६ ॥

शिखादिभ्य इनिर्वाच्य इकन्यवखदादिषु ।

किं प्रयोजनम् । नियमार्थम् । इनिरेव शिखादिभ्य इकनेव यवखदादिभ्यः ॥

**शिखायवखदादिभ्यो नियमस्यावचनं निवर्तकत्वात् ॥ १ ॥**

शिखायवखदादिभ्यो नियमस्यावचनम् । किं कारणम् । निवर्तकत्वात् । किं निवर्तकम् । अनभिधानम् ॥

## [तुन्दादिभ्य इलच्च ॥५। २ ११७॥]

## ऐकगोपूर्वाट्ठञ् नित्यम् ॥ ५ । २ । ११८ ॥

नित्यग्रहणं किमर्थम् । विभाषा मा भूत् । नैतदस्ति प्रयोजनम् । पूर्वस्मिन्नेव योगे विभाषाग्रहणं निवृत्तम् । एवं तर्हि सिद्धे सति यन्नित्यग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः प्रागेतस्माद्योगाद्विभाषेत्यनुवर्तत इति ॥

अथात इत्यनुवर्तत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्तत ऐकगविको न सिध्यति ।

(सू. ११६) व्रीह्यादि गणांतील जे शिखा मेखला वगैरे शब्द त्यांहून एकटा इनि प्रत्यय होतो. तसेंच त्या गणातील यवखद, कुमारी वगैरे जे शब्द त्यांहून एकटा ठन् प्रत्यय होतो आणि त्या गणांतील इतर शब्दांहून दोन्ही प्रत्यय होतात.

हें वचन कशाकरतां पाहिजे?

नियमाकरितां पाहिजेः शिखा वगैरे शब्दांहून इनि हा एकच प्रत्यय होतो तसेंच यवखद वगैरे शब्दांहून ठन् हा एकच प्रत्यय होतो.

(वा. १) शिखादि शब्दांहून आणि यवखदादि शब्दांहून एकेकच प्रत्यय होतो हा नियम सांगावयास नको.

काय फारण?

कारण असें कीं तेथें दुसऱ्या प्रत्ययाची निवृत्ति करणारें निराळें कारण आहे.

तें दुसऱ्या प्रत्ययाची निवृत्ति करण्याचें कारण कोणतें बरें?

अनभिधान हें तें कारण होय.

( सू. ११८ ) येथें नित्यम् असें कशाकरितां म्हटलें आहे?

येथें सांगितलेला ठञ् प्रत्यय विकल्पानें होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण पूर्व सूत्रामध्येंच विकल्पाची अनुवृत्ति नाहीं.

तर मग अशा रीतीनें सिद्धि होत असतांना जें येथें आचार्योनीं नित्यग्रहण केलें आहे त्यावरून ते असें सुचवितात कीं-ह्या सूत्रापर्यंत विकल्प अनुवृत्त[2] होतो.

आतां ह्या सूत्रामध्यें ' अत: ' या पदाची अनुवृत्ति आहे कीं नाहीं?

ह्या दोहोंमध्यें फरक काय बरें होतो?

फरक असा होतो कीं—जर ' अतः ' याची अनुवृत्ति असेल तर ' एकगो ' हा शब्द ऱ्हस्व-अकारान्त नसल्यामुळें ' ऐकगविकः ' हें उदाहरण साधणार नाहीं.

पण येथें समासान्त टच् प्रत्यय (५।४।९१) झाल्यानंतर एकगव या ऱ्हस्व अकारान्त शब्दाहून हा ठञ् प्रत्यय होईल.

तरी पण गौशकटिकः हें उदाहरण साधणार

१—( सू. ११६ ) व्रीहि वगैरे शब्दांहून मत्वर्थी इनि व ठन् हे प्रत्यय होतात. उदा०—व्रीही, व्रीहिकः; शिखी.; यवखदिकः.

१—( सू ११७ ) तुन्द वगैरे शब्दांहून मत्वर्थी इलच् इनि व ठन् हे प्रत्यय होतात. उदा०—तुन्दिलः, तुन्दी, तुन्दिकः; मतुप् प्रत्यय सर्वत्र होतोच. उदा०--तुन्दवान्

१—( सू. ११८ ) ज्याच्या आरंभीं 'एक' किंवा 'गो' शब्द आहे अशा ऱ्हस्वअकारान्त शब्दाहून मत्वर्थीं नित्य ठञ् प्रत्यय होतो. उदा०—एकशतमस्यास्तीति ऐकशतिकः ; गौशतिकः. येथें मतुप् प्रत्यय होत नाहीं.

२—त्यामुळें 'तुन्दादिभ्य इलच्च' या मागील सूत्रामध्यें विकल्पाचा संबध होतो म्हणून एकदां मतुप् प्रत्यय होतो.

समासान्ते कृते भविष्यति । एवमपि गौशकटिको न सिध्यति ।अथ निवृत्तमिहापि प्राप्नोति गोविंशतिरस्यास्तीति । निवृत्तम् । कस्मान्न भवति गोविंशतिरस्यास्तीति । अनभिधानान्न भविष्यति ॥

[ शतसहस्रान्ताच्च निष्कात् ॥ ५ । २ । ११९ ॥]

रूपादाहतप्रशंसयोर्यप् ॥ ५ । २ । १२० ॥

यप्प्रकरणे ऽन्येभ्योऽपि दृश्यते ॥ १ ॥

यप्प्रकरणे ऽन्येभ्यो ऽपि दृश्यत इति वक्तव्यम् । हिम्याः पर्वताः गुण्या ब्राह्मणाः ॥

नाहीं. कारण गोशकटी हा शब्द ऱ्हस्व अकारान्त नाहीं.

बरें, आतां येथें ' अतः ' याची अनुवृत्ति केली नाही तर ' गोविंशतिः अस्ति अस्य ' या अर्थी गोविंशति शब्दाहून ठञ् प्रत्यय होऊं लागेल.

तर मग या दोन पक्षांमध्यें अनुवृत्ति न करणें हाच पक्ष बरा.

पण मग 'गोविंशतिः अस्य अस्ति' या अर्थी गोविंशति शब्दाहून ठञ् होऊं लागेल ना ?

अनभिधानास्तव तेथें ठञ् प्रत्यय होणार नाहीं.

( सू. १२० वा. १ ) ह्या यप् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें ' इतर कांहीं शब्दांहूनही हा यप् प्रत्यय झालेला दिसतो ' असें विधान करावें. हिमं प्रशस्तमस्ति येषु ते हिम्याः पर्वताः; प्रशस्ताः गुणाः सन्ति येषां ते गुण्याः ब्राह्मणाः.

[ अस्मायामेधास्रजो विनिः ॥ ५ । २ । १२१ ॥]

बहुलं छन्दसि ॥ ५ । २ । १२२ ॥

छन्दोविन्प्रकरणे ऽष्ट्रामेखलाद्वयोभयरुजाहृदयानां दीर्घश्च ॥ १ ॥

छन्दोविन्प्रकरणे ऽष्ट्रामेखलाद्वयोभयरुजाहृदयानां दीर्घश्चेति वक्तव्यम् । अष्ट्रावी मेखलावी द्वयावी उभयावी रुजावी हृदयावी ॥

मर्मणश्चेति वक्तव्यम् । मर्मावी ॥

सर्वत्रामयस्य ॥ २ ॥

सर्वत्रामयस्योपसंख्यानं कर्तव्यम् । आमयावी ॥

(सू. १२२ वा. १) ह्या वैदिक प्रयोगांतील विन् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें अष्ट्रा, मेखला, द्वय, उभय, रुजा आणि हृदय या शब्दांहून मत्वर्थी विन् प्रत्यय होतो आणि त्याच्या बरोबर द्वय आणि हृदय या शब्दांच्या शेवटच्या अकाराला दीर्घ होतो असें म्हणावें. उदा०—अष्ट्रावी, मेखलावी, द्वयावी, उभयावी रुजावी, हृदयावी.

मर्मन् शब्दाहून हा विन् प्रत्यय होतो आणि मर्मन् शब्दातील दुसऱ्या अकाराला दीर्घ होतो. उदा०—मर्मावी.

( वा. २ ) लोकांमध्यें व वेदामध्यें सर्व ठिकाणीं आमय शब्दाहून मत्वर्थी विन् प्रत्यय होतो आणि आमय शब्दांतील शेवटच्या अकाराला दीर्घ होतो असें म्हणावें. उदा०—आमयावी.

१—( सू. ११९ ) निष्क शब्दाच्या पुढील जो शत किंवा सहस्र शब्द तदन्त प्रातिपदिकाहून मत्वर्थी ठञ् प्रत्यय होतो. उदा०—निष्कशतमस्यास्ति नैष्कशतिक; नैष्कसहस्रिकः.

१—( सू. १२० ) ताडितरूप किंवा प्रशस्तरूप या अर्थाच्या रूप शब्दाहून मत्वर्थी यप् प्रत्यय होतो. उदा०—रूप्यः कार्षापण.; आघात वगैरेमुळे आकारांत बदल झालेला रुपया. रूप्यः पुरुष.; प्रशस्तरूपवान् पुरुष.

१—( सू. १२१ ) अस् हे वर्ण अन्ती असलेले शब्द आणि माया, मेधा व स्रज् हे शब्द यांहून मत्वर्थी विनि प्रत्यय होतो. उदा०—यशस्वी; मायावी; मेधावी; स्रग्वी.

१—( सू. १२२ ) पूर्व सूत्राने सांगितलेला विनि प्रत्यय वेदामध्ये बाहुल्येंकरून होतो. उदा०—अग्ने तेजस्विन्; सूर्यो वर्चस्वान्

शृङ्गवृन्दाभ्यामारकन् ॥ ३ ॥

शृङ्गवृन्दाभ्यामारकन्वक्तव्यः । शृङ्गारकः वृन्दारकः ॥

फलबर्हाभ्यामिनच् ॥ ४ ॥

फलबर्हाभ्यामिनज्वक्तव्यः । फलिनः बर्हिणः ॥

हृदयाच्चालुरन्यतरस्याम् ॥ ५ ॥

हृदयाच्चालुर्वक्तव्यो ऽन्यतरस्याम् । हृदयालुः हृदयी हृदयिकः हृदयवान् ॥

शीतोष्णतृप्रेभ्यस्तन्न सहते ॥ ६ ॥

शीतोष्णतृप्रेभ्यस्तन्न सहत इति चालुर्वक्तव्यः । शीतालुः उष्णालुः तृप्रालुः ॥

हिमाच्चेलुः ॥ ७ ॥

हिमाच्चेलुर्वक्तव्यस्तन्न सहत इत्येतस्मिन्नर्थे । हिमेलुः ॥

बलाच्चोलः ॥ ८ ॥

बलाच्चोलो वक्तव्यस्तन्न सहत इत्येतस्मिन्नर्थे । बलूलः ॥

वातात्समूहे च ॥ ९ ॥

वातात्समूहे च तन्न सहत इत्येतस्मिन्नर्थे चोलो वक्तव्यः । वातूलः ॥

पर्वमरुद्भ्यां तप् ॥ १० ॥

पर्वमरुद्भ्यां तब्वक्तव्यः । पर्वतः मरुत्तः ॥

ददातिवृत्तं वा ॥ ११ ॥

ददातिवृत्तं वा पुनरेतद्भविष्यति । मरुद्भिर्दत्तो मरुत्तः ॥

[ ऊर्णाया युस्[1] ॥ ५ । २ । १२३ ॥

वाचो ग्मिनिः[1] । ५ । २ १२४ ॥]

आलजाटचौ बहुभाषिणि[1] ॥ ५ । २ । १२५ ॥

---

(वा. ३) शृङ्ग आणि वृन्द या शब्दांहून मत्वर्थी आरकन् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—शृङ्गारकः; वृन्दारकः.

(वा.४) फल व बर्ह या शब्दांहून मत्वर्थी इनच् प्रत्यय होतो असें म्हणावें उदा०—फलिनः बर्हिणः.

(वा. ५) हृदय शब्दाहून मत्वर्थी 'चालु' प्रत्यय विकल्पानें होतो असें म्हणावें. 'चालु' यांतील चकार इत्संज्ञक आहे. उदा०—हृदयालुः, हृदयी, हृदयिकः, हृदयवान्.

(वा. ६) शीत, उष्ण आणि तृप्र या शब्दांहून 'तें सहन न करणारा' या अर्थी चालु प्रत्यय होतो. उदा०-शीतं न सहते शीतालुः; उष्णालुः; तृप्रालुः. तृप्र म्ह. पुरोडाश किंवा दुःख.

(वा. ७) हिम शब्दाहून 'तें सहन न करणारा' या अर्थी चेलु प्रत्यय होतो असें म्हणावे. उदा० हिमं न सहते हिमेलुः.

(वा. ८) बल शब्दाहून 'तें सहन न करणारा' या अर्थी ऊल प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० बलूलः.

(वा. ९) वात शब्दाहून 'समूह' या अर्थी किंवा 'तें न सहन करणारा' या अर्थी ऊल प्रत्यय होतो. उदा० वातानां समूहः वातूलः; वातं न सहते वातूलः.

(वा. १०) पर्व आणि मरुत् या शब्दांहून मत्वर्थी तप् प्रत्यय होतो. उदा०पर्वतः; मरुत्तः.

(वा. ११) अथवा दा धातूपासून निष्पन्न जें 'दत्त' असें शब्दस्वरूप त्याच्या अर्थी मरुत्तः हा शब्द साधावा. मरुद्भिः दत्तः मरुत्तः.

---

१—(सू १२३) ऊर्णा शब्दाहून मत्वर्थी युस् प्रत्यय होतो, उदा०—ऊर्णायुः ऊर्णा म्हणजे लोकर. ऊर्णायु म्हणजे मेंढरू. प्रत्ययातील सकाराला इत्संज्ञा आहे म्हणून ऊर्णा शब्दाला पद संज्ञा (१।४।१६) आहे; भ संज्ञा नाहीं. म्हणून लोप (६।४।४८) होत

१—(सू १२४) वाच् शब्दाहून मत्वर्थी ग्मिनि प्रत्यय होतो. उदा०—प्रशस्ता वाक् अस्यास्ति वाग्मी

१—(सू १२५) वाच् शब्दाहून मत्वर्थी आलच् व आटच् हे प्रत्यय होतात बहुभाषी हा अर्थ

**कुत्सित इति वक्तव्यम्।** यो हि सम्यग्बहु भाषते वाग्मीत्येव स भवति ॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। नानायोगकरणसामर्थ्यान्न भविष्यति ॥

**स्वामिन्नैश्वर्ये ॥ ५। २। १२६ ॥**

इह कस्मान्न भवति। स्वमस्यास्तीति। नैष दोषः। नायं प्रत्ययार्थः। किं तर्हि। प्रकृतिविशेषणमेतत्। स्वामिन्नैश्वर्ये निपात्यत इति ॥

**[ अर्शआदिभ्योऽच् ॥ ५। २। १२७ ॥**

**द्वंद्वोपतापगर्ह्यात्प्राणिस्थादिनिः ॥ ५। २। १२८ ॥ ]**

**वातातीसाराभ्यां कुक्च ॥ ५। २। १२९ ॥**

पिशाचाच्चेति वक्तव्यम्। पिशाचकी वैश्रवणः ॥

**[ वयसि पूरणात् ॥ ५। २। १३० ॥**

**सुखादिभ्यश्च ॥ ५। २। १३१ ॥**

**धर्मशीलवर्णान्ताच्च ॥ ५। २। १३२ ॥**

---

(सू. १२५) येथें 'कुत्सिते' असें म्हणावें. म्हणजे निंदा गम्यमान असतांनाच हे प्रत्यय होतात. जो मनुष्य बहुभाषी असून उत्तम बोलतो त्याला 'वाग्मी' असेंच म्हणतात.

तर मग तसें येथें सूत्रामध्यें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण ज्या अर्थी हें सूत्र निराळें केलें आहे त्याच्या सामर्थ्यास्तव पूर्व सूत्र आणि हें सूत्र यांचा निरनिराळा विषय आहे अशी कल्पना होईल.

(सू. १२६) 'स्वम् अस्य अस्ति' या अर्थी स्वामिन् हें निपातन कां समजूं[2] नये.

हा दोष येत नाहीं. कारण ऐश्वर्य याचा संबंध प्रत्ययार्थाकडे नाहीं; तर त्या प्रत्ययार्थाची जी स्व ही प्रकृति तिच्याकडे संबंध आहे. ऐश्वर्य या अर्थाचा जो शब्द त्याचें हें 'स्वामिन्' असें निपातन केलें आहे.

(सू. १२९) पिशाच शब्दाहूनही मत्वर्थी इन् प्रत्यय होतो आणि त्या शब्दाला कुक् आगम होतो असें म्हणावें. उदा० पिशाचकी वैश्रवणः.

---

१—( सू. १२६ ) ऐश्वर्य या अर्थाच्या स्व-शब्दाहून मत्वथा आमिन् प्रत्यय होतो असे येथें निपातन केलें आहे.

२—कारण, स्व म्ह. द्रव्य वगैरे; तें ज्याचें आहे त्याला ऐश्वर्य असतेंच.

१—( सू. १२७ ) अर्शस् वगैरे शब्दांहून मत्वर्थी अच् प्रत्यय होतो. अर्शांसि विद्यन्ते अस्य स अर्शसः. चकार इत्संज्ञक आहे. अर्शस् म्ह. मूळव्याध.

१—( सू. १२८ ) प्राण्यामध्यें असलेल्या पदार्थांचा वाचक जो द्वंद्व समास, तसेंच प्राण्यामध्यें असलेला जो रोग व निन्द्य पदार्थ तद्वाचक जो शब्द त्याहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो. उदा०—कटकवलयिनी; कुष्ठी; ककुदावर्ती.

१—( सू. १२९ ) वात आणि अतीसार या शब्दांहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो व त्या प्रत्ययाच्या बरोबरच त्या शब्दांना कुक् आगम होतो. उदा०—वातः अस्य अस्ति वातकी; अतीसारकी.

१—( सू. १३० ) पूरणप्रत्ययान्त शब्दांहून वय गम्यमान असतांना मत्वर्थी इनि प्रत्यय होतो. उदा०—पञ्चमः अस्ति यस्य पञ्चमी उष्ट्रः. पञ्चम शब्दानें पांचवा महिना किंवा पांचवें वर्ष वगैरे काल विवक्षित आहे. त्यामुळें वयाची प्रतीति होते.

१—( सू. १३१ ) सुखादि गणांतील शब्दांहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो. सुखमस्ति अस्य सुखी.

१—( सू. १३२ ) धर्म, शील व वर्ण हे शब्द शेवटीं असलेला जो शब्द त्याहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो. उदा०—ब्राह्मणधर्मी; ब्राह्मणशीली; ब्राह्मणवर्णी.

**हस्ताज्जातौ ॥ ५ । २ । १३३ ॥**
**वर्णाद् ब्रह्मचारिणि॥५।२।१३४॥]**
**पुष्करादिभ्यो देशे ॥५।२।१३५ ॥**

**इनिप्रकरणे बलाद्बाहूरुपूर्वपदादुपसंख्यानम् ॥ १ ॥**

इनिप्रकरणे बलाद्बाहूरुपूर्वपदादुपसंख्यानं कर्तव्यम् । बाहुबली ऊरुबली ॥

**सर्वादेश्च ॥ २ ॥**

सर्वादेश्चेनिर्वक्तव्यः । सर्वधनी सर्वबीजी सर्वकेशी ॥

**अर्थाच्चासंनिहिते ॥ ३ ॥**

अर्थाच्चासंनिहित इनिर्वक्तव्यः । अर्थी । असंनिहित इति किमर्थम् । अर्थवान् ॥

**तदन्ताच्च ॥ ४ ॥**

तदन्ताच्चेति वक्तव्यम् । धान्यार्थी हिरण्यार्थी ॥ किमर्थं तदन्तादित्युच्यते न तदन्तविधिना सिद्धम् । ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिः प्रतिषिध्यते ॥ एवं तर्हीनन्तेन सह समासो भविष्यति । धान्येनार्थी धान्यार्थी । स हि समासो न प्राप्नोति ॥ यदि पुनरयमर्थयतेर्णिनिः स्यात् । एवमपि क्रियामेव कुर्वाणे स्यात् । तूष्णी-

---

(सू. १३५ वा. १) ह्या इनि प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें बाहु तसेंच ऊरु या पूर्व पदाच्या पुढील जो बल शब्द तदन्त समासाहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा० बाहुबली; ऊरुबली.

(वा. २) 'सर्व' हा शब्द आरंभीं असलेल्या शब्दाहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० सर्वधनी, सर्वबीजी, सर्वकेशी.

(वा. ३) अर्थ शब्दाहून इनि प्रत्यय होतो, परंतु अर्थ जवळ नसून त्याची अपेक्षा करणारा असा अर्थ असला पाहिजे. उदा० अर्थी.

'अर्थ जवळ नसावा' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

अर्थ जवळ असेल तर 'अर्थः अस्ति अस्य' या अर्थी अर्थवान् असा मतुप् प्रत्यय होतो.

(वा. ४) अर्थ-शब्दान्त जो शब्द त्याहूनही इनि प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० धान्यार्थी, हिरण्यार्थी.

येथे 'तदन्ताच्च' असें कशाकरितां म्हटलें आहे ? तसें म्हणावयास नको. कारण, 'अर्थाच्चासंनिहिते' येथें तदन्तविधि (१।१।७२) केला म्हणजे इष्टसिद्धि होईल. पण ज्या प्रातिपदिकाचें ग्रहण केले असेल त्यानें तदन्तविधि होत नाहीं (१।१।७२ वा. ३) असा निषेध आहे ना ?

तर मग अर्थ शब्दाहूनच इन् प्रत्यय करून त्या अर्थिन् अशा इन् प्रत्ययान्त शब्दाबरोबरच धान्य वगैरे शब्दांचा समास करावा म्हणजे धान्येन अर्थी धान्यार्थी इत्यादि उदाहरणें साधतील.

पण अर्थ शब्दाबरोबर सांगितलेला समास (२।१।३०) अर्थिन् शब्दाबरोबर होणार नाहीं.

आता जर अर्थ शब्दाहून इनि प्रत्यय न करतां अर्थ धातूहून स्वार्थी णिच् प्रत्यय करून पुढें णिनि हा कृत् प्रत्यय (३।२।७) केला तर त्या अर्थिन् शब्दाबरोबर तृतीया-तत्पुरुष (२।१।३२) होईल.

पण अर्थ धातूचा अर्थ 'याचना करणें' ही क्रिया; ती करीत असतांनाच अर्थी असा प्रयोग होतो ना ?

---

१—(सू. १३३) हस्त शब्दाहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो, परंतु त्या प्रत्ययान्त शब्दापासून पश्वादी जाति दाखविली असली पाहिजे. उदा०—हस्तः अस्ति अस्य हस्ती. हस्त म्हणजे सोंड.

१—(सू. १३४) वर्ण शब्दाहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो; पण, या शब्दाचा ब्रह्मचारी हा अर्थ असला पाहिजे. उदा० वर्णी ब्रह्मचारी.

१—(सू. १३५) पुष्कर वगैरे शब्दांहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो. त्या प्रत्ययान्त शब्दांपासून देशविशेषाची प्रतीति झाली पाहिजे उदा०—पुष्करिणी.

मप्यासीनो यस्तत्समर्थान्याचरति सोऽभिप्रायेण गम्यतेऽर्थ्ययमनेनेति ॥ एवं तर्ह्ययमर्थशब्दोऽस्त्येव द्रव्यपदार्थकः । तद्यथा । अर्थवानयं देश इत्युच्यते यस्मिन्गावः सस्यानि च वर्तन्ते । अस्ति क्रियापदार्थको भावसाधनः । अर्थनमर्थ इति । तद्यः क्रियापदार्थकस्तस्येदं ग्रहणम् । एवं च कृत्वार्थिकप्रत्यर्थिकावपि सिद्धौ भवतः ॥

[ बलादिभ्यो मतुबन्यतरस्याम् ॥ ५ । २ । १३६ ॥

संज्ञायां मन्माभ्याम् ॥ ५ । २ । १३७ ॥

कंशंभ्यां बभयुस्तितुतयसः ॥ ५ । २ । १३८ ॥

तुन्दिबलिवटेर्भः ॥ ५।२।१३९ ॥

अहंशुभमोर्युस् ॥ ५ । २ । १४० ॥ ]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये पञ्चमस्याध्यायस्य द्वितीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

तसेंच कांहीं नाहीं. याचना न करतां घरीं बसला असला तरी जो याचनेला उपयोगी पडण्यासारख्या गोष्टी करीत असतो त्याला देखील त्याच्या मनांतील अभिप्राय ओळखून 'हा अमुक वस्तूमुळें अर्थी आहे' म्हणजे 'याला अमुक वस्तू पाहिजे आहे' असें लोक म्हणतातच.

तर मग आतां अर्थ शब्दाचे दोन अर्थ आहेत. त्यापैकीं एक द्रव्य म्हणजे वस्तु असा अर्थ आहे उदा० ज्या देशामध्यें गाई, धान्य फळें वगैरे वस्तूंची समृद्धि आहे त्या देशाला अर्थवान् अयं देशः असें लोक म्हणतात. तसेंच 'अर्थनम् अर्थः' येथें भावीं घञ् प्रत्यय केला म्हणजे याचना करणें ही क्रिया अर्थ शब्दाचा अर्थ होतो. या दोन अर्थांपैकी क्रिया या अर्थाचा जो अर्थ शब्द तो 'अर्थाच्चासंनिहिते' येथें घेतला आहे असें समजावें; आणि तो अर्थ शब्द घेतला म्हणजे त्याहून ठन् प्रत्यय करून आर्थिक व प्रत्यर्थिक हेही शब्द सिद्ध होतील.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पांचव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें व पादही समाप्त झाला.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पांचव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादातील दुसरें आन्हिक समाप्त झालें; व पादही समाप्त झाला.

---

१—( सू. १३६ ) बलादि गणातील शब्दांहून मत्वर्थी मतुप् आणि इनि असे प्रत्यय होतात. बलवान्, बली.

१—( सू. १३७ ) 'मन्' किंवा 'म' हीं अक्षरें ज्याच्या शेवटीं आहेत अशा शब्दाहून मत्वर्थी इनि प्रत्यय होतो. परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—प्रथिमिनी; होमिनी.

१—( सू. १३८ ) कम् आणि शम् यांहून मत्वर्थी ब, भ, युस, ति, तु, त आणि यस् हे सात प्रत्यय होतात. उदा०—कम्बः, कम्भः, कंयुः, कन्तिः, कन्तुः, कन्तः कंयः. त्याप्रमाणेंच शम्बः, शम्भः, शंयुः, शन्तिः, शन्तुः, शंतः शंयः. कम् म्ह. उदक. शम् म्ह. सुख.

१—( सू. १३९ ) तुन्दि, बलि आणि वटि या शब्दांहून मत्वर्थी 'भ' प्रत्यय होतो. उदा०-तुन्दिभः; बलिभः; वटिभः. तुन्दि म्ह मोठी नाभि. बलि म्ह म्हातारपणीं अंगावर वळी पडते ती वटि म्ह. रहाटाचा दोर.

१—( सू १४० ) अहम् आणि शुभम् यांहून मत्वर्थी युस् प्रत्यय होतो. येथील सकार इत्संज्ञक आहे. उदा०—अहंयुः, शुभंयुः. अहकारानें युक्त, आणि कल्याणानें युक्त असे या शब्दांचे क्रमानें अर्थ आहेत.

अ. ५ पा. २ समाप्त.

**प्राग्दिशो विभक्तिः ॥ ५ । ३ । १ ॥**

विभक्तित्वे किं प्रयोजनम् ।

**विभक्तित्वे प्रयोजनमित्प्रतिषेधः ॥ १ ॥**

इदानीम् । न विभक्तौ तुस्माः [ १.३. ४ ] इतीत्त्वप्रतिषेधः सिद्धो भवति ॥ यद्येवं किमोऽत् [ ५.३ १२ ] क प्रेप्सन्दीव्यसे कार्धमासाः अत्रापि प्राप्नोति ॥

**तौ चोक्तम् ॥ २ ॥**

किमुक्तम् । विभक्तौ तवर्गप्रतिषेधोऽतद्धित इति ॥

**इदमो विभक्तिस्वरश्च ॥ ३ ॥**

इदमो विभक्तिस्वरश्च प्रयोजनम् । इतः इह । इदमस्तृतीयादिर्विभक्तिरुदात्ता भवतीत्येष स्वरः सिद्धो भवति ॥

**त्यदादिविधयश्च ॥ ४ ॥**

त्यदादिविधयश्च प्रयोजनम् । यतः यत्र। कुतः कुत्र । विभक्ताविति त्यदादिविधयः सिद्धा भवन्ति ॥

**किंसर्वनामबहुभ्योऽद्व्यादिभ्यः ॥ ५ । ३ । २ ॥**

**बहुग्रहणे संख्याग्रहणम् ॥ १ ॥**

बहुग्रहणे संख्याग्रहणं कर्तव्यम् । इह

---

( सू. १ ) पुढील प्रत्ययांना विभक्तिसंज्ञा सांगण्याचा उपयोग काय ?

( वा. १ ) इत्संज्ञेचा निषेध होणें हे विभक्तिसंज्ञेचें प्रयोजन होय. इदानीम् या उदाहरणामध्यें 'दानीम्' या प्रत्ययाच्या मकाराला प्राप्त झालेल्या इत् संज्ञेचा (१।१।३) 'न विभक्तौ तुस्माः' ( १।३।४ ) या सूत्रानें निषेध सिद्ध होतो.

पण जर तो निषेध येथें लागू होईल तर 'क प्रेप्सन् दीव्यसे', 'क्वार्धमासाः' येथे क या पदामध्यें किमोत् ( ५।३।१२ ) या सूत्रानें जो अत् प्रत्यय झाला आहे त्याच्या तकारालाही इत्संज्ञेचा निषेध होऊं लागेल.

( वा. २ ) तवर्गाविषयीं मागें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

'विभक्तौ तवर्गप्रतिषेधोऽतद्धिते' ( १।३।४ वा. १ ) असें मागें सांगितलेंच आहे.

( वा. ३ ) शिवाय, इदम् शब्दाच्या पुढील ह्या प्रत्ययांना विभक्तिस्वर होतो हें विभक्तिसंज्ञेचें प्रयोजन होय. उदा०—इतः, इह. येथें इदम् शब्दाच्या पुढील तसिल् ( ५।३।७) व ह ( ५।३।११ ) या प्रत्ययाना तृतीयादि विभक्तीला सांगितलेला उदात्त स्वर ( ६।१। ६८ ) सिद्ध होतो.

( वा. ४ ) त्यद् वगैरे शब्दाना सांगितलेले विधी येथें होतात. हेंही विभक्तिसंज्ञेचें प्रयोजन होय. यत, यत्र; कुतः, कुत्र. येथें विभक्ति पुढें असताना सांगितलेलें अत्व ( ७।२।१०२ ) व कु आदेश (७।२।१०४) हे होतात.

( सू. २ वा. १ ) ह्या सूत्रांतील बहु शब्दानें संख्यासंज्ञक ( १।१।२३ ) बहु

---

१—( सू. १ ) हे अधिकार–सूत्र आहे. यापुढं 'दिक्शब्देभ्यः०' (५।३।२७) या सूत्राच्या पूर्वीपर्यंत जे प्रत्यय सांगितले आहेत त्याना 'विभक्ति' अशी संज्ञा होते. त्यामुळें प्रथमा द्वितीया वगैरे विभक्तिप्रत्यय केले असताना जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं हे प्रत्यय केले असतांना होतात. उदा०—अत्व, कु आदेश वगैरे (७।२।८४-११३). हे विभक्तिसंज्ञक प्रत्यय केल्यानंतर त्या प्रत्ययान्त शब्दांना अव्यय संज्ञा ( १।१।३८ ) होते.

१—( सू. २ ) किम् , द्वि, युष्मद्, अस्मद् आणि भवत् या चार शब्दाशिवाय सर्वनामसंज्ञक शब्द आणि संख्यासंज्ञक बहु शब्द यांहूनच पुढील प्रत्यय होतात हे अधिकार सूत्र आहे.

मा भूत् बहौ बहोरिति ॥

अथ किमर्थं किम उपसंख्यानं क्रियते न सर्वनाम्न इत्येव सिद्धम् ।

**द्व्यादिप्रतिषेधात्किम उपसंख्यानम् ॥ २ ॥**

द्व्यादिप्रतिषेधात्किम उपसंख्यानं क्रियते। अद्व्यादिभ्य इति प्रतिषेधे प्राप्ते किम उपसंख्यानं क्रियते ॥

**[ इदम इश् ॥ ५ । ३ । ३ ॥ एतेतौ रथोः ॥ ५ । ३ । ४ ॥]**

**एतदोऽन् ॥ ५ । ३ । ५ ॥**

कायं नकारः श्रूयते । न कचिच्छ्रूयते लोपोऽस्य भवति नलोपः प्रातिपदिकान्तस्य [ ८.२.७ ] इति । यदि न कचिच्छ्रूयते किमर्थमुच्चार्यते । अनेकाल्शित्सर्वस्य [ १.१.५५ ] इति सर्वादेशो यथा स्यात्॥ क्रियमाणेऽपि वै नकारे सर्वादेशो न प्राप्नोति । किं कारणम् । नलोपे कृत एकाल्त्वात् । इदमिह संप्रधार्यम् । नलोपः क्रियतां सर्वादेश इति किमत्र कर्तव्यम् ।

---

शब्दाचेंच ग्रहण होतें असें म्हणावें. कारण, बहौ[२] व बहोः येथें हे प्रत्यय न झाले पाहिजेत.

आतां ह्या सूत्रामध्यें किम् शब्दाचें ग्रहण कशाकरितां केलें आहे ? तें करावयास नको. कारण, त्याला सर्वनामसंज्ञा असल्यामुळें सर्वनाम शब्दानेंच त्याचें ग्रहण होईल.

( वा. २ ) द्वि शब्दापासून पुढील सर्वनामसंज्ञक शब्दांचा येथें ' अद्व्यादिभ्यः ' असा निषेध केला असल्यामुळें आणि सर्वनाम गणामध्यें द्वि शब्दाच्या पुढें किम् शब्द असल्यामुळें किम् शब्द मुद्दाम निराळा उच्चारला आहे.

( सू. ५ ) ह्या अन् आदेशाचा नकार कोठें बरें राहतो ? कोठेंच रहात नाहीं. नलोप: प्रातिपदिकान्तस्य ( ८।२।७ ) ह्यानें सर्वत्र त्याचा लोप होतो.

मग कोठेंच जर रहात नाहीं तर तो उच्चारला तरी कशाला ? अ एवढाच आदेश कां सांगितला नाहीं. ?

अनेकाल्शित्सर्वस्य ( १ । १ । ५५ ) या परिभाषेनें एतद् या सर्वाचे स्थानीं आदेश झाला पाहिजे म्हणून नकार लावला आहे.

पण नकार लावला तरी सर्वादेश होणार नाहीच.

काय कारण ?

ारण असें कीं नकाराचा लोप केल्यानंतर ह्या आदेशामध्यें एकच अल् असतो.

पण अगोदर येथें असा विचार केला पाहिजे कीं नलोप आधीं करावा किंवा सर्वादेश करावा ?

मग ह्या दोहोंमध्यें येथें अगोदर काय बरें

---

२—येथें बहु शब्दाचा विपुल असा अर्थ आहे. या अर्थी बहु शब्दाला संख्या संज्ञा नाहीं. बहौ या सप्तम्यन्ताहून त्रल् प्रत्यय (५।३।१०) होत नाहीं. बहोः या पञ्चम्यन्ताहून तसिल् प्रत्यय (५।३।७) होत नाहीं.

१—( सू. ३ ) ह्या प्रकरणांतील विभक्ति संज्ञक प्रत्यय पुढें असतांना इदम् शब्दाला इश् आदेश होतो. उदा०—इह येथें सप्तम्यन्त इदम् शब्दाहून ह प्रत्यय (५।३।११) झाला आहे.

१—( सू. ४ ) रेफादि विभक्ति-प्रत्यय पुढें असतांना इदम् शब्दाला एत आदेश होतो, आणि थकारादि विभक्ति पत्यय पुढें असतांना इदम् शब्दाला इत् आदेश होतो. उदा०—एतर्हि; इत्थम्. येथें र्हिल् (५।३।१६) आणि थम् (५।३।२४) प्रत्यय झाले आहेत.

१—( सू. ५ ) एतद् शब्दाला विभक्ति-प्रत्यय पुढे असतांना अन् आदेश होतो. उदा०—अत्र.

२—ज्या उदाहरणामध्यें नकाराच्या लोपाचें निमित्त पुढें संभवणार आहे तेथें अगोदरच नकाराचा लोप होतो असा त्या सूत्राचा अर्थ गृहीत धरला आहे.

परत्वान्नलोपः । असिद्धो नलोपस्तस्यासिद्धत्वात्सर्वादेशो भवति । परिगणितेषु कार्येषु नलोपोऽसिद्धो न चेदं तत्र परिगण्यते । एवं तर्ह्यानुपूर्व्या सिद्धमेतत् । नात्राकृते सर्वादेशे प्रातिपदिकसंज्ञा प्राप्नोति न चाकृतायां प्रातिपदिकसंज्ञायां नलोपः प्राप्नोति । तदानुपूर्व्या सिद्धमेतत् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । अलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यकारस्याकारवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वान्तरेण नकारं सर्वादेशो भविष्यति । अस्त्यन्यदकारस्याकारवचने प्रयोजनम् । किम् । येऽन्येऽकारादेशाः प्राप्नुवन्ति तद्बाधनार्थम् । तद्यथा । मो राजि समः क्वौ [ ८.३.२५ ] इति मकारस्य मकारवचनसामर्थ्यादनुस्वारादयो न भवन्ति । तस्मान्नकारः कर्तव्यः ॥ न कर्तव्यः । क्रियते न्यास एव । प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । अ अ अ इति । सोऽनेकाल्शित्सर्वस्येति सर्वादेशो भविष्यति ॥

## एतद इति योगविभागः ॥ १ ॥

एतद इति योगविभागः कर्तव्यः । एतद एत इदित्येतावादेशौ भवतो रथोः ।

---

करावें ?

परत्वास्तव नलोप अगोदर करावा.

पण नलोप असिद्ध ( ८:२।१ ) आहे. तेव्हां तो असिद्ध असल्यामुळें पूर्वी सर्वादेश होईल.

पण कांहीं ठरलेलीं कार्यें कर्तव्य असतांनाच नलोप असिद्ध होतो. ( ८।२।२ ) आणि सर्वादेश हें कार्य तर त्या कार्यांमध्यें गणलेलें नाहीं.

तर मग हें उदाहरण क्रमानेंच सिद्ध होतें असें समजावें. असें पहा कीं–येथें सर्वादेश झाला नाहीं तर त्या अन् याला प्रातिपदिक संज्ञाच होणार नाहीं. आणि प्रातिपदिक संज्ञा झाली नाहीं म्हणजे नलोपाची प्राप्तीच येत नाहीं. तेव्हां नाइलाजास्तव सर्वादेश अगोदर होत असल्यामुळें ओघानेंच हें उदाहरण सिद्ध होत आहे.

सर्वादेश होणें हा नकाराचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. त्याकरितां नकार नको. नुसता अकारच आदेश सांगितला तर अलोऽन्त्यस्य ( १ । १ । ५२ ) या परिभाषेनें तो अन्त्य वर्णाला होईल. आणि एतद् शब्दाच्या दकाराला अत्व ( ७ । २ । १०२ ) केल्यानंतर त्या अकाराला प्रकृत सूत्रानें अकारच आदेश करण्यांत कांहीं उपयोग नाहीं. म्हणून सामर्थ्यास्तव सर्वादेश होईल.

पण अकाराला अकार करण्याचा दुसराच उपयोग संभवतो.

तो कोणता ?

अकाराला जे पररूप वगैरे दुसरे आदेश प्राप्त होतात त्यांचा बाध करणें हा उपयोग होय. उदा० ' मो राजि समः क्वौ ' (८।३'२५) येथें मकाराला मकारच आदेश सांगितला म्हणून त्याच्या सामर्थ्यास्तव मकाराला अनुस्वार वगैरे दुसरीं कार्यें होत नाहींत. एकंदरींत येथें सर्वादेश होण्याकरितां नकार लावला पाहिजे.

नकार लावावयास नको. अ अ या दोन अकारांचा संधि व पररूप (६।१।९७) करून अ॰ असा निर्देशच केला आहे. तेथें प्रश्लेषानें दोन अकार म्हणजे ' अ अ ' एवढा प्रत्यय आहे. तेव्हां तो अनेकाल्शित्सर्वस्य या परिभाषेनें सहजच सर्वादेश होईल.

( वा. १ ) येथें ' एतदः ' असें निराळें सूत्र करावें. तेथें पूर्वसूत्राची अनुवृत्ति होऊन ' एतद् शब्दाला रेफादि आणि थकारादि

---

३—एकंदरींत सर्वादेश होण्याकरितां नकार पाहिजे असें सिद्ध झालें.

ततोऽन् । अश्च भवत्येतद इति ॥ केन विहिते थकार एतद आदेश उच्यते ।

**एतदश्च थम उपसंख्यानम् ॥ २ ॥**

एतदश्च थम उपसंख्यानं कर्तव्यम् । एतत्प्रकारमित्थम् ॥ तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । एतज्ज्ञापयति भवत्यत्र थमुरिति यदयं थकारादावादेशं शास्ति । कुतो नु खल्वेतज्ज्ञापकादत्र थमुर्भविष्यति न पुनर्य एवासावविशेषविहितस्थकारादिस्तस्मिन्नादेशः स्यात् । इदमा थकारादिं विशेषयिष्यामः । इदमो यस्थकारादिरिति ॥

**[सर्वस्य सोऽन्यतरस्यां दि ॥ ५ । ३ । ६ ॥]**

**पञ्चम्यास्तसिल ॥ ५ । ३ । ७ ॥**

**( सप्तम्यास्त्रल् ॥ ५ । ३ । १० ॥ )**

इदं विचार्यत इमे तसिलादयो विभक्त्यादेशा वा स्युः परे वेति । कथं चादेशाः स्युः कथं वा परे । यदि पञ्चम्याः सप्तम्या इति षष्ठी तदादेशाः । अथ पञ्चमी

---

विभक्ति पुढें असतांना क्रमानें एत आणि इत् असे आदेश होतात ' असा त्याचा अर्थ होय. त्याच्या पुढें ' अन् ' असें दुसरें सूत्र होय. ' एतद् शब्दाला विभक्तिप्रत्यय पुढें असतांना अन् आदेश होतो ' असा त्याचा अर्थ होय.

आतां एतद् शब्दाहून कोणत्या सूत्रानें थकारादि प्रत्यय केला असतां ह्या ' एतदः ' या सूत्रानें इत् आदेश होतो.

( वा. २ ) एतद् शब्दाहून प्रकार अर्थी थम् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. एतत्प्रकारम् इत्थम्.

तर मग तसें उपसंख्यान केलें पाहिजे.

उपसंख्यान करावयास नको. कारण, ज्या अर्थी आचार्यांनीं थकारादि प्रत्यय पुढें असतांना एतद् शब्दाला इत् आदेश सांगितला आहे त्या अर्थी त्यांनीं असें सुचविलें आहे कीं एतद् शब्दाहून थमु प्रत्यय होतो.

पण या ज्ञापकामुळें एतद् शब्दाहून थमु प्रत्यय करून तेथें ' एतदः ' या सूत्रानें इत् आदेश होतो असेंच कशावरून समजावयाचें ? जो हा सामान्य सूत्रानें ( ५ । ३ । २३ ) थकारादि प्रत्यय थाल् सांगितला आहे तो करून मागील एतद् शब्दाला इत् आदेश होतो असें कां बरें समजूं नये ?

असें समजता येत नाहीं. कारण, ' एतदः ' या सूत्रामध्यें इदम् शब्दाची अनुवृत्ति होते; आणि इदम् शब्दाहून होणारा जो थकारादि प्रत्यय म्हणजे थमु प्रत्यय तो पुढें असतांनाच इत् आदेश होतो.[५]

( सूत्र ७, १० ) येथें असा प्रश्न उद्भवतो कीं हे तासिल् वगैरे प्रत्यय, किम् सर्वनाम वगैरे शब्दांच्या पुढील विभक्तीचे स्थानीं होतात अथवा त्या विभक्तिप्रत्ययान्तांहून पुढें होतात ?

पण येथें हा प्रश्न कां बरें उद्भवतो ? ते आदेश तरी कसे होतील ? व पुढें तरी कसे होतील ?

सूत्रांतील सप्तम्याः व पञ्चम्याः या पदांतील सप्तमी व पञ्चमी या शब्दांच्या पुढील विभक्ति षष्ठी घेतली तर आदेश होतील, आणि पञ्चमी घेतली तर पुढें होतील.

---

४—एतद् शब्दाहून हिंल् प्रत्यय (५।३।२१) केला असतां ' अन् ' या सूत्रानें जो अन् आदेश प्राप्त होतो त्याचा बाध करून एतदः या पहिल्या सूत्रानें एत आदेश होतो हें त्याचें उदाहरण होय. एतस्मिन् काले एतर्हि.

५—तेव्हां इदम् शब्दाहून प्रकार अर्थीं थाल् प्रत्ययाचा बाध करून थमु प्रत्यय ( ५।३।२४ ) होतो. तसा ज्ञापकानें सुचविलेला थमु प्रत्यय एतद् शब्दाहून प्रकार अर्थीं थाल् प्रत्ययाचा बाध करून होतो.

१–( सू. ६ ) ह्या प्रकरणांतील दकार आरंभीं असलेला विभक्ति प्रत्यय पुढे असतांना सर्व शब्दाला स आदेश विकल्पानें होतो. उदा०--सदा, सर्वदा.

१—( सू. ७ ) पञ्चम्यन्त किम्, सर्वनाम आणि बहु यांहून स्वार्थी तसिल् प्रत्यय होतो. उदा०—कस्मादिति कुतः; यस्मादिति यतः; बहुभ्य इति बहुतः.

ततः परे । कुतः संदेहः । समानो निर्देशः ॥ कश्चात्र विशेषः ।

**तसिलादयो विभक्त्यादेशाश्चेत्सुब्लुक्स्वरगुणदीर्घैत्त्वौत्त्वस्मायादिविधिप्रतिषेधः ॥ १ ॥**

तसिलादयो विभक्त्यादेशाश्चेत्सुब्लुक्स्वरगुणदीर्घैत्त्वौत्त्वस्मायादिविधीनां प्रतिषेधो वक्तव्यः । सुब्लुक् । ततस्त्यः यतस्त्यः । तत्रत्यः यत्रत्यः । सुपो धातुप्रातिपदिकयोः [ २.४.७१ ] इति सुब्लुक्प्राप्नोति । सुब्लुक् ॥ स्वर । यदा तदा । अनुदात्तौ सुप्पितौ [ ३.१.४ ] इत्येष स्वरः प्राप्नोति । स्वर ॥ गुण । कस्मात् कुतः । घेर्ङिति [ ७.३.१११ ] इति गुणः प्राप्नोति । गुण ॥ दीर्घ । तस्मिन् तर्हि । अतो दीर्घो यञि सुपि च [ ७.३.१०१; १०२ ] इति दीर्घत्वं प्राप्नोति । दीर्घ ॥ एत्त्व। तेषु तत्र । बहुवचने झल्येत् [ ७.३.१०३] इत्येत्त्वं प्राप्नोति । एत्त्व ॥ औत्त्व । कस्मिन् कुत्र । इदुद्भ्यामौदच्च घेः [ ७.३.११७-११९ ] इत्यौत्त्वं प्राप्नोति । औत्त्व ॥ स्मायादिविधिः । तस्मात् ततः तस्मिन् तत्र । ङसिङ्योः स्मात्स्मिनौ [ ७.१.१५ ] इति स्मायादयः प्राप्नुवन्ति॥

**पञ्चमीनिर्देशात्सिद्धम् ॥ २ ॥**

सन्तु परे ॥ यदि परे समानशब्दानां

---

हा संशय कां बरें येतो ?

सप्तम्याः व पञ्चम्याः हीं रूपें पञ्चमीचीं व षष्ठीचीं सारखींच होतात म्हणून संशय येतो.

ह्या दोहोंमध्यें फरक काय बरें होतो ?

( वा. १ ) जर तसिल् व त्रल् हे पञ्चमी व सप्तमी यांचे स्थानीं आदेश होतील तर ते सुप् आहेत असें समजून त्यांचा लुक् व त्याना स्वर, आणि ते पुढें असतांना गुण, दीर्घ, एत्व, औत्व व स्मात् वगैरे आदेश हे विधी होऊं लागतील व त्याचा निषेध करावा लागेल. उदा०—ततस्त्यः व तत्रत्यः येथें तसिल् व त्रल् या प्रत्ययांचा 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' (२।४।७१) या सूत्रानें सुप् समजून लुक् होऊं लागेल. यदा व तदा येथें 'दा' या प्रत्ययाला सुप् समजून अनुदात्तौ सुप्पितौ (३।१।४) यानें अनुदात्त स्वर होऊं लागेल. कस्मात् इति कुतः येथें तसिल् प्रत्यय पुढें असतांना 'घेर्ङिति' (७।३।१११) या सूत्रानें गुण होऊं लागेल. तस्मिन् इति तर्हि येथें र्हिल् प्रत्यय पुढें असतांना 'अतो दीर्घो यञि' याच्या पुढील 'सुपि च' (७।३।१०२) या सूत्रानें दीर्घ होऊं लागेल. तेषु इति तत्र येथें त्रल् प्रत्यय पुढें असतांना बहुवचने झल्येत् (७।३।१०३) या सूत्रानें एत्व होऊं लागेल. कस्मिन् इति कुत्र येथें त्रल् प्रत्ययाला इदुद्भ्याम् व औत् या सूत्रांच्या पुढील 'अच्च घेः' (७।३।११९) या सूत्रानें औत्व होऊं लागेल. तस्मात् इति ततः तसेंच, तस्मिन् इति तत्र येथें तसिल् व त्रल् या प्रत्ययांचे स्थानीं 'ङसिङ्योः स्मात्स्मिनौ' (७।१।१५) या सूत्रानें स्मात् व स्मिन् हे आदेश होऊं लागतील.

( वा. २ ) सूत्रांतील पञ्चम्याः व सप्तम्याः हे निर्देश पञ्चमी विभक्तीनें केलेले आहेत असें गृहीत धरलें म्हणजे हें सिद्ध होत आहे. तेव्हां हे तसिल् वगैरे प्रत्यय पञ्चमी वगैरे विभक्तींच्या स्थानीं न करतां त्या विभक्तिप्रत्ययान्ताहून पुढेंच होणारे असोत.

पण जर हे प्रत्यय पुढें होतील तर 'ह्या प्रत्ययासारखे जे दुसरे शब्द त्यांना हे आदेश होत नाहींत' असा निषेध सांगितला पाहिजे.

---

२—'ततस्' या तसिल्-प्रत्ययान्ताहून त्यप् (४।२।१०४) केल्यानतर त्या त्यप्-प्रत्ययान्त शब्दाला प्रातिपदिक सज्ञा (१।२।४६) झाल्यामुळें त्याचा अवयव तसिल् आहे, आणि स्थानिवद्भावानें तो सुप् आहे.

प्रतिषेधो वक्तव्यः । तस्मात्तस्यति । यस्मात्तस्यति । पञ्चम्यन्तात्परस्य तसेस्तासिलभवतीति तसिल्प्राप्नोति ।

**अनादेशे स्वार्थविज्ञानात्समानशब्दाप्रतिषेधः ॥ ३ ॥**

अनादेशे स्वार्थविज्ञानात्समानशब्दानामप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । तसिल्कस्मान्न भवति । स्वार्थविज्ञानात् । पञ्चम्यन्तात्परस्य तसेः स्वार्थे वर्तमानस्य तसिला भवितव्यं न चात्र पञ्चम्यन्तात्परस्तसिः स्वार्थे वर्तते ॥

## तसेश्च ॥ ५ । ३ । ८ ॥

किमर्थं तसेस्तसिलुच्यते ।

**तसेस्तसिल्वचनं स्वरार्थम् ॥ १ ॥**

तसेस्तसिल्वचनं क्रियते स्वरार्थम् । लिति प्रत्ययात्पूर्वमुदात्तं भवतीत्येष स्वरो यथा स्यात् ॥ ननु चायं तसिल्तसिं बाधिष्यते । न सिध्यति । परत्वात्तसिः प्राप्नोति । तसिलोऽवकाशः । ततो हीयते । ततोऽवरोहति । तसेरवकाशः । ग्रामत आगच्छति । नगरत आगच्छति । इहोभयं प्राप्नोति । तत आगच्छति । यत आगच्छतीति । परत्वा-

---

उदा०—तस्मात्[१] तस्यति, यस्मात् तसेंच तस्यति येथें पञ्चम्यन्ताच्या पुढील तसीला सांगितलेला तसिल् आदेश (५।३।८) तस् धातूचे स्थानीं प्राप्त होतो.

( वा. ३ ) आदेश पक्ष न घेतां हे तसिल् वगैरे प्रत्यय पुढें होतात असें घेतलें तरी स्वार्थी जो तसि असें समजलें जात असल्यामुळें समान शब्दासंबंधानें अप्रतिषेध होय. अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय.

तर मग तस्मात् तस्यति व यस्मात् तस्यति येथें तसिल् आदेश का होत नाहीं ?

स्वार्थविज्ञानात् म्हणजे पञ्चम्यन्ताच्या पुढील स्वार्थी असलेला जो तसि त्याला तसिल् होणार, आणि तस्मात् तस्यति व यस्मात् तस्यति येथें तर तस् धातु हा मागील पञ्चम्यन्ताच्या अर्थी मुळींच नाहीं.

( सू. ८ ) तसि प्रत्ययाचे स्थानीं तसिल् हा आदेश कशाकरितां सांगितला आहे ?

( वा. १ ) येथें तसि प्रत्ययाचे स्थानीं तसिल् आदेश स्वराकरितां सांगितला आहे. लकार इत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना त्या प्रत्ययाच्या पूर्वीचा वर्ण उदात्त होतो. (६।१।१९३) हा उदात्त स्वर येथें झाला पाहिजे.

पण येथें पूर्व सूत्रानें सांगितलेला तसिल् प्रत्यय हा त्या तसि प्रत्ययाचा बाध करून होईलच.

अशा रीतीनें इष्टसिद्धि होणार नाहीं. कारण तो तसि प्रत्यय ह्या तसिल् प्रत्ययाचा परत्वास्तव बाध करील. ह्या तसिल् प्रत्ययाला ततः[२] हीयते तसेंच ततः अवरोहति येथें अवकाश आहे ग्रामतः आगच्छति व नगरतः आगच्छति येथें तसि प्रत्ययाला अवकाश आहे. आणि ततः आगच्छति व यतः आगच्छति येथें तसि आणि तसिल् या दोघांचीही

---

१—पंचमीच्या स्थानीं जो तसि प्रत्यय त्याला तसिल् आदेश होतो असा 'तसेश्च' या पुढील सूत्राचा अर्थ आदेश-पक्षीं होईल. 'प्रतियोगे पञ्चम्यास्तसिः' (५।४।४४) येथेंही पंचमीला आदेशच तसि प्रत्यय होईल तस्यति या क्रियापदांतील तस् धातु हा पंचमीचा आदेश नव्हे म्हणून त्याला तसिल् होत नाहीं. पण 'पुढें प्रत्यय होतो' या पक्षीं पुढील तसिचें स्थानीं तसिल् होतो असा अर्थ झाल्यामुळें तस् धातूला तसिल् आदेश होऊं लागेल.

१—( सू. ८ ) कोणत्याही पञ्चम्यन्त शब्दाहून स्वार्थी तसि प्रत्यय पुढें (५।४।४४,४५) सांगितला आहे. तो तसि प्रत्यय जर किम्, सर्वनामें आणि बहु या शब्दाहून केला तर त्याचे स्थानीं तसिल् आदेश होतो, उदा०—कुतः आगतः; यतः; बहुतः.

२—तसि प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें (५।४।४५) 'अहीयरुहोः' असा निषेध केला असल्यामुळें येथें त्या तसि प्रत्ययाची प्राप्ति नाहीं.

त्रसिः प्राप्नोति । तस्मात्सुष्ठूच्यते तसेस्तसेल्वचनं स्वरार्थमिति ॥

**पर्यभिभ्यां च ॥ ५ । ३ । ९ ॥**

पर्यभिभ्यां च सर्वोभयार्थे ॥ १ ॥

पर्यभिभ्यां चेति यदुच्यते तत्सर्वोभयार्थे द्रष्टव्यम् । यावत्सर्वतस्तावत्परितः । यावदुभयतस्तावदभितः ॥

**सप्तम्यास्त्रल् ॥ ५ । ३ । १० ॥**

**इदमो हः ॥ ५ । ३ । ११ ॥**

**किमोऽत् ॥ ५ । ३ । १२ ॥**

**वा ह च च्छन्दसि ॥ ५ । ३ । १३ ॥]**

**इतराभ्योऽपि दृश्यन्ते**

॥ ५ । ३ । १४ ॥

इह कस्मान्न भवति । सः तौ ते । भवदादिभिर्योग इति वक्तव्यम् । के पुनर्भवदादयः । भवान् दीर्घायुः देवानांप्रियः आयुष्मानिति । स भवान् तत्र भवान् ततो भवान् । तं भवन्तम् तत्र भवन्तम् ततो भवन्तम् । तेन भवता तत्र भवता ततो भवता । तस्मै भवते तत्र भवते ततो भवते । तस्माद्भवतः तत्र भवतः ततो भवतः । तस्य भवतः तत्र भवतः ततो भवतः । तस्मिन्भवति तत्र भवति ततो भवति ॥ स दीर्घायुः तत्र दीर्घायु

---

प्राप्ति येते. तेव्हां तेथें परत्वास्तव तसि प्रत्यय प्राप्त होतो. म्हणून त्या तसि प्रत्ययाचे स्थानीं प्रकृत सूत्रानें जो स्वराकरितां तसिल् आदेश सांगितला आहे तो बरोबरच आहे.

(सू. ९ वा. १) 'पर्यभिभ्यां च' या सूत्रानें जो हा तसिल् प्रत्यय सांगितला आहे तो सर्व या अर्थाच्या 'परि' याहून आणि उभय या अर्थाच्या 'अभि' याहून होतो असें म्हणावें. सर्वतः याचा जो अर्थ आहे तोच परितः याचा अर्थ आहे; आणि उभयतः याचा जो अर्थ आहे. तोच अभितः याचा अर्थ आहे.

(सू. १४) ह्या प्रकृत सूत्रानें सः तौ ते येथें तसिल् व त्रल् हे प्रत्यय कां बरें होत नाहींत ? ते न व्हावे याकरितां 'भवत् वगैरे शब्दांचा योग असतांनाच ते होतात' असें म्हणावें.

भवत् वगैरे शब्द ते कोणते बरें ?

भवान्, दीर्घायुः देवानांप्रियः, आयुष्मान् हे ते शब्द होत. उदा०—स भवान् या अर्थी तत्र भवान् तसेंच ततो भवान् असें होतें. तसेंच तं भवन्तम् या अर्थीं तत्र भवन्तम् व ततो भवन्तम्; तेन भवता या अर्थी तत्र भवता आणि ततो भवता; तस्मै भवते या अर्थी तत्र भवते तसेंच ततो भवते; तस्मात् भवतः या अर्थीं तत्र भवतः व ततो भवतः; तस्य भवतः या अर्थीं तत्र भवतः व ततो भवतः; तस्मिन् भवति या अर्थीं तत्र भवति आणि ततो भवति. स दीर्घायुः या अर्थीं तत्र दीर्घायुः व ततो दीर्घायुः; तं दीर्घायुषम् या

---

१—(सू. ९) परि आणि अभि यांहून स्वार्थी तसिल् प्रत्यय होतो. उदा०—परितः अभितः.

१—(सू. १०) किम्, सर्वनामें, आणि बहु या सप्तम्यन्तांहून स्वार्थी त्रल् प्रत्यय होतो. उदा०—कस्मिन् इति कुत्र. यस्मिन् इति यत्र. बहुषु इति बहुत्र

१—(सू. ११) सप्तम्यन्त इदम् शब्दाहून स्वार्थी ह प्रत्यय होतो. उदा०—अस्मिन् इति इह.

१—(सू. १२) सप्तम्यन्त किम् शब्दाहून स्वार्थी अत् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—कस्मिन् इति क्व; कुत्र. पुढील सूत्रांतून 'वा' या पदाचा येथें अपकर्षानें संबंध होत आहे.

१—(सू. १३) सप्तम्यन्त किम् शब्दाहून स्वार्थी ह प्रत्यय वेदामध्यें होतो उदा०—कुह, क्व, कुत्र.

१—(सू. १४) किम्, सर्वनामें आणि बहु याहून प्रथमा द्वितीया वगैरे इतर विभक्ति प्रत्यय केले असतां त्याहून हे तसिल् व त्रल् प्रत्यय झालेले दिसतात; तेव्हा तेथें ते करावे उदा०—स भवान् ततो भवान्; तत्र भवान्.

ततो दीर्घायुः । तं दीर्घायुषम् तत्र दीर्घायुषम् ततो दीर्घायुषम् ॥ स देवानांप्रियः तत्र देवानांप्रियः ततो देवानांप्रियः । तं देवानांप्रियम् तत्र देवानांप्रियम् ततो देवानांप्रियम् ॥ स आयुष्मान् तत्रायुष्मान् तत आयुष्मान् । तमायुष्मन्तम् तत्रायुष्मन्तम् तत आयुष्मन्तम् ॥

**[ सर्वैकान्यकिंयत्तदः काले दा ॥ ५ । ३ । १५ ॥**

**इदमो र्हिल् ॥ ५ । ३ । १६ ॥ ]**

**अधुना ॥ ५ । ३ । १७ ॥**

अधुनेति किं निपात्यते । इदमोऽश्भावो धुना च प्रत्यय इदमो वा लोपो ऽधुना च प्रत्ययः । अस्मिन्काले ऽधुना ॥

**दानीं च ॥ ५ । ३ । १८ ॥**

इदानीम् । इदमस्तृतीयादिर्विभक्तिरुदात्ता भवतीत्येष स्वरः प्राप्नोति ।

**दानीमिति निपातनात्स्वरसिद्धिः ॥ १ ॥**

दानीमिति निपातनात्स्वरसिद्धिर्भविष्यति । आद्युदात्तनिपातनं करिष्यते स निपातनस्वरो विभक्तिस्वरस्य बाधको भविष्यति ॥

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् आदौ सिद्धमिति ॥

---

अर्थी तत्र दीर्घायुषम्,आणि ततो दीर्घायुषम्. स देवानांप्रियः या अर्थी तत्र देवानांप्रियः, व ततो देवानांप्रियः; तं देवानां प्रियम् या अर्थी तत्र देवानांप्रियम् व ततो देवानांप्रियम् स आयुष्मान् या अर्थी तत्र आयुष्मान् व तत आयुष्मान्; तम् आयुष्मन्तम् या अर्थी तत्र आयुष्मन्तम् व तत आयुष्मन्तम् इत्यादि प्रयोग होतात असें समजावें.

( सू. १७ ) अधुना येथें काय निपातन केलें आहे ?

सप्तम्यन्त इदम् शब्दाहून 'धुना' प्रत्यय व इद् शब्दाला 'अश्' आदेश असें निपातन केलें आहे. किंवा अधुना प्रत्यय व इदम् शब्दाचा लोप असें निपातन केलें आहे. उदा० अस्मिन् काले इति अधुना.

(सू. १८) इदानीम् येथें इदम् शब्दाच्या पुढें दानीम् या प्रत्ययाला तृतीयादि विभक्तीला उदात्त होतो ( ६।१।१७१) असा सांगितलेला उदात्त होऊं लागेल.[2]

(वा. १) येथें दानीम् हें तसें (म्हणजे स्वरासहित निपातन केलें असल्यामुळें इष्ट स्वर सिद्ध होतो. दानीम् हें येथें आदिउदात्त असलेलें असें निपातन केलें जाईल. तेव्हां तो निपातनस्वर विभक्तिस्वराचा बाधक होईल.

अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

आदौ सिद्धम् ( ६।१।१६१ वा. ४ ) असें सांगितलें आहे.

---

१—( सू. १५ ) सर्व, एक, अन्य, किम्, यद् आणि तद् या सप्तम्यन्त शब्दांहून स्वार्थी दा प्रत्यय होतो. परंतु तो स्वार्थ काल हा असला पाहिजे; उदा०—सर्वस्मिन् काले इति सर्वदा; सदा; एकदा. अन्यदा; कदा; यदा; तदा.

१—( सू. १६ ) सप्तम्यन्त इदम् शब्दाहून काल या स्वार्थी 'र्हिल्' प्रत्यय होतो उदा०—अस्मिन् काले इति एतर्हि.

१—( सू. १७ ) सप्तम्यन्त इदम् शब्दाचेच काल या स्वार्थी 'अधुना' असे निपातन केले आहे. उदा०—अस्मिन् काले इति अधुना.

१—( सू. १८ ) सप्तम्यन्त इदम् शब्दाहूनच काल या स्वार्थी 'दानीम्' प्रत्यय होतो. उदा०—अस्मिन् काले इदानीम्.

२—तेव्हां इदानीम् हे पद अन्तउदात्त होऊं लागेल.

३ तेव्हां विभक्ति--स्वर उदात्त झाला तरी तो 'आदे. परस्य' (१।१।५४) या परिभाषेनें आदलाच होतो म्हणून इदानीम् असें मध्योदात्त पद होतें.

## तदो दा च ॥ ५ । ३ । १९ ॥

**तदो दावचनमनर्थकं विहितत्वात् ॥ १ ॥**

तदो दावचनमनर्थकम् । किं कारणम् । विहितत्वात् । विहितोऽत्र प्रत्ययः सर्वैकान्यकिंयत्तदः काले दा [५.३.१५] इति ॥

## तयोर्दार्हिलौ च च्छन्दसि ॥ ५ । ३ । २० ॥

**तयोरिति प्रातिपदिकनिर्देशः ॥ १ ॥**

तयोरिति प्रातिपदिकनिर्देशो द्रष्टव्यः ॥ द्वेष्यं विजानीयाद्योगयोर्वा प्रत्यययोर्वेति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्टे तयोरिति प्रातिपदिकनिर्देश इति ॥

## [ अनद्यतने र्हिलन्यतरस्याम् ॥ ५ । ३ । २१ ॥ ]

## सद्यः परुत्परार्यैषमः परेद्यव्यद्य पूर्वेद्युरन्येद्युरन्यतरेद्युरितरेद्युरपरेद्युरधरेद्युरुभयेद्युरुत्तरेद्युः ॥ ५ । ३ । २२ ॥

सद्य इति किं निपात्यते ।

**समानस्य सभावो द्यश्चाहनि ॥ १ ॥**

समानस्य सभावो निपात्यते द्यश्च प्रत्ययोऽहन्यभिधेये । समानेऽहनि सद्यः ॥ परुत्परारीति किं निपात्यते ।

**पूर्वपूर्वतरयोः परभाव उदारी च संवत्सरे ॥ २ ॥**

पूर्वपूर्वतरयोः परभावो निपात्यत उदारी च प्रत्ययौ सवत्सरेऽभिधेये । पूर्व-

---

(सू. १९ वा. १) तद् शब्दाहून हा 'दा' प्रत्यय सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं 'सर्वैकान्यकिंयत्तदः काले दा' (५।३।१५) या सूत्रानें दा प्रत्यय सांगितलाच आहे.

(सू. २० वा. १) 'तयोः' या तद् शब्दानें इदमः आणि तदः या मागील दोन प्रातिपदिकांचा निर्देश केला आहे असें समजावें. मागील दोन सूत्रांचा किंवा मागील दोन प्रत्ययांचा येथील 'तद्' शब्दानें परामर्श केला आहे ही गोष्ट येथें ग्राह्य नाही असा येथें आचार्य वार्तिककार हे मित्रत्वाच्या नात्यानें सूत्रकारांच्या मनांतील अभिप्राय 'तयोरिति०' ह्या वार्तिकानें स्पष्ट करीत आहेत.

(सू. २२) येथें सद्यः या शब्दामध्यें काय निपातन केले आहे ?

(वा. १) सप्तम्यन्त समान शब्दाहून 'दिवस' या अर्थी द्यस् प्रत्यय तसाच समान या शब्दाला 'स' आदेश निपातन केला जातो. समानेऽहनि इति सद्यः.

परुत् आणि परारि येथें काय निपातन केलें आहे ?

(वा. २) सप्तम्यन्त पूर्व शब्दाहून वर्ष या स्वार्थी उत् प्रत्यय तसाच पूर्व शब्दाला पर आदेश निपातन केला आहे. उदा० पूर्वस्मिन् वर्षे इति परुत्. तसेंच सप्तम्यन्त पूर्वतर

---

१—(सू. १९) सप्तम्यन्त तद् शब्दाहून काल या स्वार्थी दा आणि दानीम् हे प्रत्यय होतात. उदा०—तदा; तदानीम्

१—(सू. २०) वेदामध्ये सप्तम्यन्त अशा इदम् व तद् या शब्दांहून क्रमाने दा आणि र्हिल् प्रत्यय काल या स्वार्थी होतात एकदा त्या शब्दाहून प्राप्त झालेले इतर प्रत्ययही होतात उदा०—अस्मिन् काले इदा; तस्मिन् काले तर्हि; इदानीम्, तदानीम्.

१—(सू. २१) किम्, सर्वनाम आणि बहु या सप्तम्यन्त शब्दाहून 'अनद्यतन काल' या स्वार्थी र्हिल् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—कर्हि, कदा, यर्हि, यदा, इत्यादि.

१—(सू. २२) सद्यः, परुत, परारि, ऐषमः; परेद्यवि, अद्य, पूर्वेद्यु, अन्येद्यु, अन्यतरेद्युः, इतरेद्युः, अपरेद्युः, अधरेद्यु, उभयेद्युः आणि उत्तरेद्यु असे चौदा शब्द येथे निपातन केले आहेत.

स्मिन संवत्सरे परुत् । पूर्वतरे संवत्सरे परारि ॥

ऐषम इति किं निपात्यते ।

इदमः समसण् ॥ ३ ॥

इदमः समसण्प्रत्ययो निपात्यते संवत्सरेऽभिधेये । अस्मिन्संवत्सर ऐषमः ॥ परेद्यवीति किं निपात्यते ।

परस्मादेद्यव्यहनि ॥ ४ ॥

परस्मादेद्यविप्रत्ययो निपात्यतेऽहन्यभिधेये । परस्मिन्नहनि परेद्यवि ॥

अद्येति किं निपात्यते ।

इदमोऽश्भावो द्यश्च ॥ ५ ॥

इदमोऽश्भावो निपात्यते द्यश्च प्रत्ययोऽहन्यभिधेये । अस्मिन्नहन्यद्य ॥

पूर्वेद्युरन्येद्युरन्यतरेद्युरितरेद्युरपरेद्युरधरेद्युरुभयेद्युरुत्तरेद्युरिति किं निपात्यते ।

पूर्वान्यान्यतरेतरापराधरोभयोत्तरेभ्य एद्युसुच् ॥ ६ ॥

पूर्वान्यान्यतरेतरापराधरोभयोत्तरेभ्य एद्युसुच्प्रत्ययो निपात्यतेऽहन्यभिधेये । पूर्वस्मिन्नहनि पूर्वेद्युः अन्यस्मिन्नहन्यन्येद्यु. । अन्यतरस्मिन्नहन्यन्यतरेद्युः । इतरस्मिन्नहनीतरेद्युः । अपरस्मिन्नहन्यपरेद्युः । अधरस्मिन्नहन्यधरेद्युः।उभयोरह्नोरुभयेद्युः। उत्तरस्मिन्नहन्युत्तरेद्युः ॥

द्युश्चोभयात् ॥ ७ ॥

उभयशब्दाद् द्युश्च वक्तव्यः । तस्मान्मनुष्येभ्य उभयेद्युः ॥

[प्रकारवचने थाल्

॥ ५ । ३ । २३ ॥

---

शब्दाहून वर्ष या स्वार्थी आरि प्रत्यय तसाच पूर्वतर शब्दाला पर आदेश निपातन केला जातो. उदा०—पूर्वतरे वर्षे इति परारि.

एषमः येथें काय निपातन केले आहे,

(वा. ३) सप्तम्यन्त इदम् शब्दाहून वर्ष या स्वार्थी समसण्[२] प्रत्यय निपातन केला जातो. उदा०—अस्मिन्संवत्सरे ऐषमः.

परेद्यवि येथें काय निपातन केलें आहे ?

(वा. ४) पञ्चम्यन्त पर शब्दाहून दिवसे या स्वार्थी 'एद्यवि' असा प्रत्यय निपातन केला जातो. उदा०—परस्मिन् अहनि इति परेद्यवि.

अद्य येथें काय निपातन केलें आहे ?

(वा. ५) सप्तम्यन्त इदम् शब्दाहून दिवस या स्वार्थी 'द्य' प्रत्यय आणि इदम् शब्दाला अश् आदेश यांचें येथें निपातन केलें आहे. उदा०—अस्मिन् अहनि इति अद्य.

आतां पूर्वेद्युः, अन्येद्युः,अन्यतरेद्युः, इतरेद्युः, अपरेद्युः, अधरेद्युः, उभयेद्युः, आणि उत्तरेद्युः ह्या आठ शब्दांमध्यें काय निपातन केलें आहे ?

(वा. ६) पूर्व, अन्य, अन्यतर, इतर, अपर, अधर, उभय आणि उत्तर या सप्तम्यन्त शब्दांहून दिवस या स्वार्थी एद्युसुच्[३] प्रत्यय निपातन केला जातो. उदा०—पूर्वस्मिन् अहनि इति पूर्वेद्युः, अन्यस्मिन् अहनि इति अन्येद्युः, अन्यतरस्मिन् अहनि इति अन्यतरेद्युः, इतरस्मिन् अहनि इति इतरेद्युः, अपरस्मिन् अहनि इति अपरेद्युः, अधरस्मिन् अहनि इति अधरेद्युः, उभयोः अह्नोः इति उभयेद्युः, उत्तरस्मिन् अहनि इति उत्तरेद्युः.

(वा. ७) उभय शब्दाहून द्युस् असाही प्रत्यय त्याच अर्थी होतो असे म्हणावे. उदा० तस्मान्मनुष्येभ्य उभयेद्युः.

---

२—समसण् प्रत्ययांतील शेवटचे अकार व णकार हे इत्संज्ञक आहेत. इदम् शब्दाहून समसण् प्रत्यय केल्यानंतर इदम् शब्दाला इश् आदेश (५।३।३) व नंतर त्याला वृद्धि (७।२।११७) व षत्व (८।३।५९) हीं कार्ये होऊन 'ऐषमः' हें रूप साधलें आहे.

३—एद्युसुच् प्रत्ययांतील शेवटचे उकार व चकार इत्संज्ञक आहेत

१—(सू. २३) प्रकार या अर्थाचे दर्शक जे किम्, सर्वनामे, व बहु हे शब्द त्यांहून स्वार्थी थाल प्रत्यय होतो. उदा०—केन प्रकारेण, कथा इत्यादि.

## इदमस्थमुः ॥ ५ । ३ । २४ ॥

## किमश्च ॥ ५ । ३ ॥ २५ ॥

## थां हेतौ च च्छन्दसि ॥ ५ । ३ । २६ ]

## दिक्शब्देभ्यः सप्तमीपञ्चमीप्रथमाभ्यो दिग्देशकालेष्वस्तातिः ॥ ५ । ३ । २७ ॥

इह कस्मान्न भवति । पूर्वस्मिन्देशे वसतीति । नैष देशो देशविशेषणमेतत् ।।

## दक्षिणोत्तराभ्यामतसुच् ॥ ५ । ३ । २८ ॥

किमर्थमतसुच् क्रियते न तसुजेव क्रियेत । तत्रायमप्यर्थः स्वरार्थश्चकारो न कर्तव्यो भवति । प्रत्ययस्वरेणैव सिद्धम् । का रूपसिद्धिः दक्षिणतो ग्रामस्य उत्तरतो ग्रामस्य। दाक्षिणोत्तरशब्दावकारान्तौ तसुच्शब्दः प्रत्ययः । भवेत्सिद्धं यदा अकारान्तौ यदा तु खल्वाकारान्तौ तदा न सिध्यति । तदापि सिद्धम् । कथम् । पुंवद्भावेन । कथं पुंवद्भावः । तसिलादिष्वा कृत्वसुचः [६.

---

( सू. २७ ) पूर्वस्मिन् देशे वसति येथें प्रकृत सूत्रानें पूर्वस्मिन् या सप्तम्यन्ताहून अस्ताति प्रत्यय कां होत नाहीं ?

पूर्व हा शब्द देशवाचक नव्हे; तर देशाचें ते विशेषण आहे.

( सू. २८ ) येथें अतसुच् असा अकारादि प्रत्यय कशाकरितां केला आहे ? तसा करूं नये. तर तसुच् असाच करावा. शिवाय, तसुच् केला असतां दुसरी एक गोष्ट अशी साधते कीं स्वराकरिता चकार लावावयास नको. प्रत्यय स्वरानें-(३।१।३) च इष्ट रूप सिद्ध होत आहे.

पण प्रत्ययाचा आदि अकार नसेल तर दक्षिणतः ग्रामस्य व उत्तरतः ग्रामस्य हीं उदाहरणें कशीं साधतील ?

का बरें ? दक्षिण व उत्तर हे शब्द ह्रस्व-अकारान्त आहेत आणि तसुच् असा तर प्रत्यय आहे.

असें सिद्ध होईल खरें, पण हे शब्द ह्रस्व-अकारान्त घेतले तर. पण आकारान्त घेतले असतां दाक्षिणतः व उत्तरतः हीं रूपें सिद्ध होणार नाहींत.

तेव्हांही सिद्ध होतील.

ती कशीं बरें ?

पुंवद्भावानें सिद्ध होतील.

कसा बरें येथें पुंवद्भाव होईल ?

' तसिलादिष्वाकृत्वसुचः' ( ६।३।३५ ) यानें पुंवद्भाव होईल.

---

१—( सू. २४ ) प्रकार या अर्थाचा दर्शक जो इदम् शब्द त्याहून स्वार्थी थमु प्रत्यय होतो. उदा०—अनेन प्रकारेण इत्थम्.

१—( सू. २५ ) प्रकार या अर्थाचा दर्शक जो किम् शब्द त्याहूनही स्वार्थी थमु प्रत्यय होतो. उदा०— केन प्रकारेण कथम्

१—( सू. २६ ) हेतु किंवा प्रकार या अर्थाचा दर्शक जो किम् शब्द त्याहून वेदामध्ये था प्रत्यय होतो. उदा०—केन हेतुना कथा, केन प्रकारेण कथा.

१—( सू. २७ ) सप्तम्यन्त, पञ्चम्यन्त किंवा प्रथमान्त आणि दिशा, देश, किंवा काल या अर्थानें उपयोगांत आलेले असे जे दिग्वाचक शब्द त्याहून स्वार्थी अस्ताति प्रत्यय होतो. उदा०—पुरस्तात् वसति, पूर्वेकडे राहतो. पुरस्तात् आगतः, पूर्व देशांतून आला. पुरस्तात् रमणीयः कालः, पूर्वीचा काल चांगला गेला. येथे पूर्व शब्दाला पुर् आदेश (५।३।४०) झाला आहे.

१—( सू. २८ ) सप्तम्यन्त, पञ्चम्यन्त किंवा प्रथमान्त असे आणि दिशा, देश व काल या अर्थानें उपयोगांत आलेले जे दक्षिण आणि उत्तर हे शब्द त्याहून स्वार्थी अतसुच् प्रत्यय होतो. उदा०— दक्षिणतः वसति, उत्तरतः वसति. दक्षिणतः आगतः, उत्तरतः आगत.. उत्तरतः रमणीय. कालः. पुढील काल चांगला आहे. काल या अर्थी दक्षिण शब्दाचें उदाहरण नाही.

३.३५ ] इति ॥ न सिध्यति । भाषितपुंस्कस्य पुंवद्भावो न चैतौ भाषितपुंस्कौ । ननु च भो दक्षिणशब्द उत्तरशब्दश्च पुंसि भाष्येते । समानायामाकृतौ यद्भाषितपुंस्कमित्युच्यत आकृत्यन्तरे चैतौ भाषितपुंस्कौ । दाक्षिणोत्तरेति दिक्शब्दौ दक्षिण उत्तर इति व्यवस्थाशब्दौ । यदि पुनर्दिक्शब्दा अपि व्यवस्थाशब्दाः स्युः । कथं यानि दिगुपदिष्टानि कार्याणि । दिशो यदा व्यवस्थां वक्ष्यन्ति ॥ यदि तर्हि यो यो दिशि वर्तते स स दिक्शब्दो रमणीयादिष्वतिप्रसङ्गो भवति । रमणीया दिक् शोभना दिगिति ॥ अथ मतमेतद्दिशि दृष्टो दिग्दृष्टः दिग्दृष्टः शब्दो दिक्शब्द इति दिशं यो न व्यभिचरति न रमणीयादिष्वतिप्रसङ्गो भवति पुंवद्भावस्तु न प्राप्नोति ॥ एवं तर्हि सर्वनाम्नो वृत्तिमात्रे पुंवद्भावो वक्तव्यो दक्षिणोत्तरपूर्वाणा-

---

त्यानें पुंवद्भाव येथें होणार नाहीं. कारण भाषितपुंस्क शब्दाला त्यानें पुवद्भाव सागितला आहे. आणि दक्षिणा व उत्तरा हे शब्द तर भाषितपुंस्क नव्हेत.

पण काय हो, दक्षिण व उत्तर हे शब्द पुंल्लिंगी आहेतच ना ?

पुल्लिंगी आहेत खरे, पण ज्या अर्थानें स्त्रीलिंगीं शब्द चालतो त्याच अर्थानें जर तो शब्द पुंल्लिंगीं चालत असेल तरच त्याला भाषितपुंस्क म्हणतात. आणि दक्षिण व उत्तर हे शब्द तर निराळ्या अर्थी पुंल्लिंगी चालतात. दक्षिणा व उत्तरा असे स्त्रीलिंगी शब्द दिशा या अर्थाचे आहेत; व दक्षिण व उत्तर असे जे शब्द पुंल्लिंगीं चालतात ते फक्त व्यवस्था दाखविणारे आहेत.

आतां दिशा या अर्थानें जेथे पूर्वा वगैरे शब्दांचा प्रयोग होतो तेथेंही ते शब्द व्यवस्था दाखविणारेच आहेत असें म्हणावें तर दिक्-शब्दाला म्हणून जीं कार्ये सांगितलीं आहेत तीं त्यांनाच कशीं होतील ? कारण दिग्वाचक असे ज्या शब्दाना म्हणतात तेही व्यवस्थावाचकच असल्यामुळें खरे दिग्वाचक नव्हेतच. आतां, जर कोणत्याहि अर्थाचा का असेना जो शब्द दिशा या अर्थी उपयोगांत येतो त्या शब्दाला दिक्-शब्द म्हणावयाचें असें जर घेतले तर रमणीय वगैरे शब्दांना देखील दिक्-शब्द म्हणावें लागेल.कारण रमणीया दिक् व शोभना दिक् असे प्रयोग होतात. आता जर ' दिशि दृष्टः दिग्दृष्टः दिग्दृष्टः शब्दः दिक्-शब्दः असा विग्रह घेऊन जो शब्द दिशा या अर्थाला कधींच सोडीत नाही तोच दिक्-शब्द होय असें मत घेतलें तर रमणीया वगैरे शब्दांना दिक्-शब्द असें म्हणतां येणार नाही, व त्यामुळें दोषही येणार नाहीं हें खरे, पण त्या दक्षिणा व उत्तरा या दिक-शब्दांना पुंवद्भाव मात्र होणार नाहीं.

तर मग ' सर्वनाम्नो वृत्तिमात्रे पुंवद्भावो वक्तव्यः ' म्हणजे सर्वनामसंज्ञक शब्दांना कोणत्याही वृत्तीमध्यें पुंवद्भाव होतो असे वचन करावें. दक्षिणोत्तरपूर्वाणाम् या द्वंद्वामध्यें

---

२—पूर्वा, दक्षिणा वगैरे शब्दाचा दिशा या अर्थानें जेव्हा प्रयोग होतो तेव्हां ' कोणापेक्षां पूर्वा ' अशा प्रकारची अपेक्षा उत्पन्न होत नाही. आणि त्या अर्थाचे ते शब्द स्त्रीलिंगीच असतात. जेव्हां ते शब्द देश किंवा काल या अर्थाने उपयोगांत येतात तेव्हां तेथें ' कोणापेक्षां पूर्व ' इत्यादि प्रकारची अपेक्षा कायमची असते, तेव्हांच त्या शब्दांना व्यवस्थावाची असें म्हणतात. त्या वेळीं ते शब्द पुल्लिंगीही चालतात.

३—कारण, जो शब्द दिशा या अर्थाला कधींही सोडीत नाही तो दिक्-शब्द भाषितपुंस्क नाही.

मित्येवमर्थम् ॥

विशेषणार्थं तर्हि । क्व विशेषणार्थेनार्थः। षष्ठ्यतसर्थप्रत्ययेन [२.३.३०] इति । षष्ठी तसर्थप्रत्ययेनेत्युच्यमान इहापि स्यात्। ततो ग्रामात् । यतो ग्रामादिति ॥

**[ विभाषा परावराभ्याम् ॥ ५ । ३ । २९ ॥**

**अञ्चेर्लुक् ॥ ५ । ३ । ३० ॥]**

**उपर्युपरिष्टात् ॥ ५ । ३ । ३१ ॥**

उपर्युपरिष्टादिति किं निपात्यते ।

**ऊर्ध्वस्योपभावो रिल्रिष्टातिलौ च ॥१॥**

ऊर्ध्वस्योपभावो रिल्रिष्टातिलौ च प्रत्ययौ निपात्येते । उपरि उपरिष्टात् ॥

**पश्चात् ॥ ५ । ३ । ३२ ॥**

पश्चादिति किं निपात्यते ।

**अपरस्य पश्चभाव आतिश्च प्रत्ययः ॥ १ ॥**

अपरस्य पश्चभावो निपात्यत आतिश्च प्रत्ययः । पश्चात् ॥

**दिक्पूर्वपदस्य च ॥ २ ॥**

---

पुंवद्भाव झाला पाहिजे; आणि अशा वचनानेंच दक्षिणतः व उत्तरतः येथे पुंवद्भाव होईल.

तर मग विशेष दाखविण्याकरिता अतसुच् असा अकारादि प्रत्यय केला आहे असें समजावें.

तसा विशेष दाखविण्याचा उपयोग कोठें बरें होतो ?

षष्ठ्यतसर्थप्रत्ययेन ( २ । ३ । ३० ) ह्या सूत्रामध्यें उपयोग होतो. जर तेथें ' षष्ठी तसर्थप्रत्ययेन ' असे सूत्र केलें तर ततो ग्रामात् व यतो ग्रामात् येथेंही त्या सूत्रानें षष्ठी होऊं लागेल.

( सू. ३१ ) उपरि व उपरिष्टात् येथें काय निपातन केलें आहे ?

( वा. १ ) सप्तम्यन्त पञ्चम्यन्त किंवा प्रथमान्त ऊर्ध्व शब्दाहून रिल् आणि रिष्टातिल् हे प्रत्यय स्वार्थी होतात आणि ऊर्ध्व शब्दाला 'उप' असा आदेश होतो असे निपातन केलें आहे. उदा० उपरि, उपरिष्टात्.

( सू. ३२ ) पश्चात् येथें काय निपातन केलें आहे ?

( वा. १ ) सप्तम्यन्त पञ्चम्यन्त किंवा प्रथमान्त अशा अपर शब्दाहून आति प्रत्यय आणि अपर शब्दाला पश्च आदेश असें येथें निपातन केलें आहे, उदा-० पश्चात् वसति.

( वा. २ ) दिग्वाचक पूर्वपदाच्या पुढील

---

४—हें पुंवद्भावाचे वचन म्हणजे भाष्यकारांचीच इष्टि आहे. एकंदरींत तसुच् असा प्रत्यय सांगितला तरी इष्टसिद्धि होते म्हणून त्या प्रत्ययाला अकार नको.

५—तत. येथे तद् शब्दाहून तसिल् प्रत्यय(५।३ ७) झाला आहे. त्याचा योग असल्यामुळे ग्रामात् येथे अन्य-शब्द--योगी पचमी (२।३।२९) होत असते तिचा बाध करून षष्ठी होईल. कारण, ' तसर्थप्रत्ययेन ' येथील तस् याने तसिल् प्रत्ययाचेंही ग्रहण संभवतें.

१—( सू. २९ ) सप्तम्यन्त पञ्चम्यन्त किंवा प्रथमान्त अशा पर आणि अवर या शब्दांहून स्वार्थी अतसुच् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—परतः वसति, अवरत. वसति; परतः आगत ; अवरतः आगतः; परतः रमणीयम् , अवरतः रमणीयम्. एकदा परस्तात् वसति इत्यादि रूपे होतात.

१—( सू. ३० ) सप्तम्यन्त पञ्चम्यन्त किंवा प्रथमान्त असा अञ्च् धातु शेवटीं असलेला जो दिक्-शब्द त्याच्या पुढील अस्ताति प्रत्ययाचा लुक् होतो, उदा०—प्राच्याम् इति प्राक्. येथें ङीप् प्रत्ययाचाही लुक् (१।२।४९) झाला आहे प्राच्याः इति प्राक्, प्राची इति प्राक्

१—( सू. ३१ ) उपरि आणि उपरिष्टात् हे दोन शब्द अस्ताति प्रत्ययाच्या अर्थीच निपातन केले आहेत. उदा०—उपरि वसति.

१-( सू. ३२ ) पश्चात् हा अस्ताति प्रत्ययाच्या अर्थी निपातन केला आहे. उदा०—पश्चात् वसति.

दिक्पूर्वपदस्य चापरस्य पश्चभावो वक्तव्य आतिश्च प्रत्ययः । दक्षिणपश्चात् उत्तरपश्चात् ॥

**अर्धोत्तरपदस्य च समासे ॥ ३ ॥**

अर्धोत्तरपदस्य च समासेऽपरस्य पश्चभावो वक्तव्यः । दक्षिणपश्चार्धः उत्तर-पश्चार्धः ॥

**अर्धे च ॥ ४ ॥**

अर्धे च परतोऽपरस्य पश्चभावो वक्तव्यः । पश्चार्धः ॥

**[ पश्च पश्चा च छन्दसि ॥ ५ । ३ । ३३ ॥**

**उत्तराधरदक्षिणादातिः ॥ ५ । ३ । ३४ ॥ ]**

**एनबन्यतरस्यामदूरेऽपञ्चम्याः ॥ ५ । ३ । ३५ ॥**

**अपञ्चम्या इति प्रागसः ॥ १ ॥**

अपञ्चम्या इति यदुच्यते प्रागसस्तद् द्रष्टव्यम् ॥ द्वेष्यं विजानीयादविशेषेणेत उत्तरमपञ्चम्या इति । तदाचार्यः सुहृद्भूत्वान्वाचष्टेऽपञ्चम्या इति प्रागस इति ॥

**दक्षिणादाच् ॥ ५ । ३ । ३६ ॥**

किमर्थश्चकारः । स्वरार्थः । चितोऽन्त उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यात् ॥

---

जो अपर शब्द त्याहूनही अस्ताति प्रत्यया-प्रमाणेंच आति प्रत्यय होतो आणि अपर शब्दाला पश्च आदेश होतो. उदा० दक्षिण-पश्चात्, उत्तरपश्चात्.

( वा. ३ ) दिग्वाचक पूर्वपदाच्या पुढील जें समासांतील उत्तरपद त्या उत्तरपदामध्यें अर्ध शब्द उत्तरपद पुढें असतांना अपर शब्दाला पश्च आदेश होतो. उदा० दक्षिण-पश्चार्धः; उत्तरपश्चार्धः.

( वा. ४ ) अर्ध शब्द पुढें असतांना अपर शब्दाला पश्च आदेश होतो असें म्हणावें. उदा० अपरश्चासौ अर्धश्च पश्चार्धः.

( सू. ३५ वा. १ ) येथें अपञ्चम्याः असें जें म्हटलें आहे तें अस् प्रत्ययाच्या ( ५ । ३ । ३९ ) पूर्वीपर्यंतच आहे. अस् प्रत्ययाच्या पूर्वीच असा विशेष न घेतां पुढें अपञ्चम्याः याचा संबंध होतो ही गोष्ट येथें ग्राह्य नाहीं असा सूत्रकारांच्या मनांतील अभिप्राय येथें ' अपञ्चम्या इति प्रागसः ' या वार्तिकानें वार्तिककार स्पष्ट करीत आहेत.

( सू. ३६ ) ह्या आच् प्रत्ययाला चकार कशाकरितां लावला आहे ?

स्वराकरितां लावला आहे. चितः ( ६ । १ । १६३ ) ह्या सूत्रानें जो चित् प्रत्ययाला अन्त उदात्त सांगितला आहे तो येथें झाला पाहिजे.

---

२—' अर्धे च ' हें वार्तिक दिग्वाचक पूर्वपद नसतांनाही प्रवृत्त होतें. ह्यानेच पूर्वीचें वार्तिक गतार्थ होत आहे.

१—( सू. ३३ ) पश्चात् याच्या अर्थीच वेदामध्यें एकदां पश्च आणि पश्चा असे दोनही शब्द निपातन केले आहेत.

१—(सू. ३४) सप्तम्यन्त पञ्चम्यन्त किंवा प्रथमान्त असे जे उत्तर, अधर आणि दक्षिण हे शब्द त्यांहून स्वार्थीं आति प्रत्यय होतो. उदा०—उत्तरस्याम् इति उत्तरात् इत्यादि.

१—( सू. ३५ ) सप्तम्यन्त किंवा प्रथमान्त असे जे उत्तर अधर आणि दक्षिण हे शब्द त्यांहून स्वार्थीं एनप् प्रत्यय विकल्पानें होतो. परंतु अवधि आणि अवधिमान् या दोहोंमध्यें सामीप्य असलें पाहिजे. उत्तरस्मिन् इति उत्तरेण ग्रामं नदी. गांवाला लागूनच उत्तरेकडे नदी आहे. इतर दिक् शब्दांहूनही हा एनप् प्रत्यय होतो. पूर्वेण ग्रामम् इत्यादि.

१—( सू. ३६ ) सप्तम्यन्त किंवा प्रथमान्त अशा दक्षिण शब्दाहून स्वार्थीं आच् प्रत्यय होतो. उदा०—दक्षिणस्याम् इति दक्षिणा इत्यादि.

नैतदस्ति प्रयोजनम्। एकाजयं तत्र नार्थः स्वरार्थेन चकारेणानुबन्धेन। प्रत्ययस्वरेणैव सिद्धम्॥ विशेषणार्थस्तर्हि। क विशेषणार्थेनार्थः। अन्यारादितरर्तेदिक्शब्दाञ्चूत्तरपदाजाहियुक्ते [२.३.२९]॥

[ आहि च दूरे ॥ ५ । ३ । ३७ ॥

उत्तराच्च ॥ ५ । ३ । ३८ ॥

पूर्वाधरावराणामसिपुरधवश्चैषाम् ॥ ५ । ३ । ३९ ॥

अस्ताति च ॥ ५ । ३ । ४० ॥

विभाषावरस्य ॥ ५ । ३ । ४१ ॥ ]

संख्याया विधार्थे धा ॥ ५ । ३ । ४२ ॥

विधार्थ इत्युच्यते को विधार्थो नाम। विधाया अर्थो विधार्थः। यद्येवमेका गोविधा एका हस्तिविधा अत्रापि प्राप्नोति॥

---

हा चकाराचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. ह्या आच् प्रत्ययामध्यें एकच अच् आहे. तेव्हां तेथें अन्त उदात्त स्वर होण्याकरितां इत्संज्ञक चकार नको; प्रत्ययस्वरानेंच ( ३ । १ । ३ ) इष्टसिद्धि होईल.

तर मग विशेष दाखविण्याकरितां आच् प्रत्ययाला चकार लावला आहे असें समजावें.

तसा विशेष दाखविण्याचा उपयोग कोठें बरें होतो ?

अन्यारादितरर्तेदिक्शब्दाञ्चूत्तरपदाजाहियुक्ते ( २ । ३ । २९ ) या सूत्रामध्यें उपयोग होतो.

(सू.४२) येथें 'विधार्थे' असें म्हटलें आहे. पण विधार्थ म्हणजे काय बरें ?

विधायाः अर्थः विधार्थः. विधा शब्दाचा जो अर्थ तो विधार्थ होय.

पण असें जर असेल तर एका गोविधा तसेंच एका हस्तिविधा येथेंही एका शब्दाहून धा प्रत्यय होऊं लागेल. तर मग—

---

२—प्रत्यय--स्वर जरी आदि--उदात्त सांगितला आहे तरी एकाच् प्रत्ययामध्यें अन्त उदात्त झाला काय आणि आदि उदात्त झाला काय तो एकालाच होणार असल्यामुळें फरक होत नाहीं.

३—जर चकार नसेल तर आ याचा योग असतांनाच पंचमी होते असा अर्थ होईल. आणि वाक्य किंवा स्मरण या अर्थाचें द्योतक जें अडित् आ असें अव्यय त्याचा योग असतांनाही पंचमी होऊं लागेल.

१—( सू. ३७ ) सप्तम्यन्त किंवा प्रथमान्त दक्षिण शब्दाहून स्वार्थी आहि व आच् हे प्रत्यय होतात. परंतु अवधि आणि अवधिमान् ह्या दोहोंमध्यें बरेंच अंतर असलें पाहिजे. उदा०—दक्षिणाहि दक्षिणा वा ग्रामात् पर्वतः. गावाच्या दक्षिणेकडे बऱ्याच अंतरावर पर्वत आहे असा अर्थ आहे.

१—( सू. ३८ ) सप्तम्यन्त किंवा प्रथमान्त उत्तर शब्दाहून स्वार्थी आहि व आच् हे प्रत्यय होतात, परंतु अवधि आणि अवधिमान् यांमध्ये बरेच अतर असलें पाहिजे. उदा०—उत्तरस्याम् इति उत्तराहि, उत्तरा ग्रामात् पर्वतः. गांवाच्या उत्तरेकडे बऱ्याच अंतरावर पर्वत आहे असा अर्थ आहे.

१—( सू. ३९ ) सप्तम्यन्त पञ्चम्यन्त किंवा प्रथमान्त अशा पूर्व, अधर आणि अवर या शब्दाहून स्वार्थी असि प्रत्यय होतो. आणि त्या प्रत्ययाच्या बरोबर ह्या तीन शब्दांना क्रमानें पुर् अध् आणि अव् असे आदेश होतात. उदा०—पूर्वस्मिन् इति पुरः, अधरस्मिन् इति अधः. अवरस्मिन् इति अवः. इत्यादि.

१—( सू. ४० ) पूर्व, अधर आणि अवर ह्या तीन शब्दांना क्रमानें पुर् अध् आणि अव् असे आदेश अस्ताति प्रत्यय पुढें असतांना होतात. उदा०—पूर्वस्मिन् इति पुरस्तात् इत्यादि.

१—( सू. ४१ ) अवर शब्दाला अव् आदेश विकल्पानें होतो अस्ताति प्रत्यय पुढें असतांना. उदा०—अवस्तात्, अवरस्तात्.

१—( सू. ४२ ) संख्यावाचक शब्दाहून क्रियेचा विशेष प्रकार या स्वार्थी धा प्रत्यय होतो. उदा०—एकधा भुङ्क्ते, द्विधा.

२—विधा शब्दाचा अन्न असा अर्थ आहे. तेव्हां बैलाचें एक अन्न, हत्तीचें एक अन्न या अर्थी धा प्रत्यय होऊं लागेल.

एवं तर्हि

**धाविधानं धात्वर्थपृथग्भावे ॥ १ ॥**

धाविधानं धात्वर्थपृथग्भाव इति वक्तव्यम् । कः पुनर्धात्वर्थपृथग्भावः । किं यत्तद्देवदत्तः कंसपात्र्यां पाणिनौदनं भुङ्क्त इति । नेत्याह । कारकपृथक्त्वमेतत् । यत्तर्हि तत्काल्ये भुङ्क्ते सायं भुङ्क्त इति । नेत्याह । कालपृथक्त्वमेतत् । यत्तर्हि शीतं भुङ्क्त उष्णं भुङ्क्त इति । नेत्याह । गुणपृथक्त्वमेतत् । कस्तर्हि धात्वर्थपृथग्भावः। कारकाणां प्रवृत्तिविशेषः क्रिया ॥ यद्येवं क्रियाप्रकारेऽयं भवति । विधयुक्तगताश्च प्रकारे भवन्ति । एवंविधम् एवंयुक्तम् एवंगतम् एवंप्रकारमिति ॥

**[ अधिकरणविचाले च ॥ ५ । ३ । ४३ ॥ ]**

**एकाद्धो ध्यमुञन्यतरस्याम् ॥ ५ । ३ । ४४ ॥**

**सहभावे ध्यमुञ् ॥ १ ॥**

सहभावे ध्यमुञ्वक्तव्यः । ऐकध्यं राशिं कुरु ॥ स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः । अधिकरणविचाल इत्युच्यते न चावश्यं स एवाधिकरणविचालो यदेकमनेकं क्रियते यदप्यनेकमेकं क्रियते सोऽप्यधिकरणविचालः ॥

---

(वा. १) 'धात्वर्थपृथग्भाव' या अर्थी हा 'धा' प्रत्यय होतो असें म्हणावें.

'धात्वर्थपृथग्भाव म्हणजे काय? देवदत्तः कांस्यपात्र्या पाणिना ओदनं भुङ्क्ते, म्हणजे देवदत्त हा कांशाच्या भांड्यामधून हातानें भात खातो येथें जे अनेक प्रकार दिसतात तो धात्वर्थपृथग्भाव कीं काय?

तो धात्वर्थपृथग्भाव नव्हे असें म्हणतों. तो कारकांचा निराळेपणा आहे.

तर मग सकाळीं खातो, संध्याकाळीं खातो येथें जे अनेक प्रकार दिसतात तो धात्वर्थपृथग्भाव कीं काय?

तोही नव्हे. तो कालाचा निराळेपणा आहे.

तर मग गार अन्न खातो, ऊन अन्न खातो येथें जे अनेक प्रकार दिसतात तो धात्वर्थपृथग्भाव कीं काय?

तोही नव्हे. तो गुणांचा निराळेपणा आहे.

तर मग आतां धात्वर्थपृथग्भाव म्हणजे समजावें तरी काय?

कारकांची जी विशेष प्रकारची प्रवृत्ति तिला क्रिया म्हणतात; त्या क्रियेचा जो निराळेपणा तो धात्वर्थपृथग्भाव होय.

तर मग क्रियेचा प्रकार या अर्थी धा प्रत्यय होतो असें ठरतें. प्रकार या अर्थीच विध, युक्त, गत हे शब्द आहेत. एवंविधम्, एवंयुक्तम्, एवगतम्, एवंप्रकारम् या सर्वांचा अर्थ एकच आहे.

(सू. ४४ वा. १) एकीकरणरूप अर्थ गम्यमान असेल तर तेथें ध्यमुञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—ऐकध्यं राशिं कुरु.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण 'अधिकरणविचाले' असें येथें म्हटलें आहे. आणि अधिकरण म्हणजे वस्तु, त्याचा विचाल म्हणजे स्वरूपांत फरक. हा फरक एकाचे अनेक भाग केले म्हणजे तेथेंच होतो असें नाहीं तर अनेकांचें एकीकरण केलें असतां तेथेंही अधिकरणविचाल आहेच.

---

३—तेव्हां प्रकार या अर्थाचा विध असा अकारान्त शब्द सूत्रांत उच्चारला आहे, असे समजावें. वि उपसर्गपूर्वक धा धातूहून भाव या अर्थी क प्रत्यय झाला आहे.

१—(सू ४३) द्रव्यांच्या संख्येमध्यें बदल झालेला दाखवावयाचा असेल तर संख्यावाचक शब्दाहून स्वार्थी धा प्रत्यय होतो. उदा०—एकं राशिं पञ्चधा कुरु. अनेकमेकधा कुरु.

१—(सू ४४) एक शब्दाच्या पुढील धा प्रत्ययाला ध्यमुञ् आदेश विकल्पानें होतो. उदा०—एकधा राशिं कुरु, ऐकध्यम्.

**द्वित्र्योश्च धमुञ् ॥ ५ । ३ । ४५ ॥**

**धमुञन्तात्स्वार्थे डदर्शनम् ॥ १ ॥**

धमुञन्तात्स्वार्थे डो दृश्यते स च विधेयः । पथि द्वैधानि । संशये द्वैधानि ॥

**[एधाच्च ॥ ५ । ३ । ४६ ॥]**

**याप्ये पाशप् ॥ ५ । ३ । ४७ ॥**

**पाशपि कुत्सितग्रहणम् ॥ १ ॥**

पाशपि कुत्सितग्रहणं कर्तव्यम् । वैयाकरणपाशः याज्ञिकपाशः । यो हि यापयितव्यो याप्यस्तत्र मा भूदिति ॥

अथ वैयाकरणः शरीरेण कृशो व्याकरणेन च शोभनः कर्तव्यो वैयाकरणपाश इति । न कर्तव्यः । कथम् । यस्य भावाद् द्रव्ये शब्दनिवेशस्तदभिधाने तद्गुणे वक्तव्ये प्रत्ययेन भवितव्यं न च कार्श्यस्य भावाद् द्रव्ये वैयाकरणशब्दः ॥

**पूरणाद्भागे तीयादन् ॥ ५।३।४८ ॥**

पूरणग्रहणं शक्यमकर्तुं न ह्यपूरणस्तीयशब्दोऽस्ति यत्र दोषः स्यात् । ननु चायमस्ति मुखतीयः पार्श्वतीय इति ।

---

(सू. ४५ वा. १) धमुञ् प्रत्ययान्ताहून स्वार्थी 'ड' प्रत्यय झालेला दिसतो. तेव्हां त्याचें विधान करावें. उदा०—पथि द्वैधानि, संशये द्वैधानि.

(सू. ४७ वा. १) ह्या पाशप् प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'याप्ये' या शब्दाच्या ऐवजीं 'कुत्सित' हा शब्द घालावा. उदा० वैयाकरणपाशः, याज्ञिकपाशः. याप्य म्हणजे दूर ठिकाणीं पाठविण्याला योग्य; हा जो याप्य शब्दाचा अर्थ आहे त्या अर्थी पाशप् प्रत्यय न झाला पाहिजे.

आतां जो वैयाकरण शास्त्रामध्यें चांगला पण शरीरानें कृश असल्यामुळें निन्द्य झालेला असतो त्याला वैयाकरणपाश म्हणावें काय ?

त्याला वैयाकरणपाश म्हणूं नये.

तें कां ?

ज्या धर्माच्या अस्तित्वामुळें तो धर्मवाचक शब्द धर्मीला लागतो तो त्याचा धर्म निंद्य असा दाखवावयाचा असेल तरच तेथें हा पाशप् प्रत्यय होणार आहे; आणि येथें तर कृशपणामुळें काहीं त्याला वैयाकरण शब्द लागलेला नाहीं.

(सू. ४८) ह्या सूत्रामध्यें 'पूरणात्' हें पद घातलें नाहीं तरी चालेल. कारण, पूरणार्थकाशिवाय दुसरा 'तीय' शब्दच तसा नाहीं, कीं ज्या ठिकाणीं हा अन् प्रत्यय होईल हा दोष देतां येईल.

पण मुखतीयः पार्श्वतीयः येथें तसा 'तीय' शब्द आहे ना ?

---

१—(सू. ४५) द्वि आणि त्रि या शब्दांच्या पुढील धा प्रत्ययाला धमुञ् आदेश विकल्पानें होतो. द्वैधम्, द्विधा; त्रैधम्, त्रिधा.

१—(सू. ४६) द्वि आणि त्रि या शब्दांच्या पुढील धा प्रत्ययाला एधाच् आदेश विकल्पानें होतो. उदा०—द्वेधा, त्रेधा.

१—(सू. ४७) निन्दा गम्यमान असतांना प्रातिपदिकाहून स्वार्थी पाशप् प्रत्यय होतो. उदा०—कुत्सितः वैयाकरणः वैयाकरणपाशः.

१—(सू. ४८) तीय हा जो पूरण प्रत्यय (५।२।५४, ५५) तदन्त प्रातिपदिकाहून भाग या स्वार्थी अन् प्रत्यय होतो उदा०—द्वितीयः भागः. द्वितीय शब्दाला येथें आदि उदात्त स्वर (६।१।१९७) होतो.

२—'मुखपार्श्वतसोरीय' (४।३।६० श्लो. २) या वचनानें मुखतस् व पार्श्वतस् यांहून ईय प्रत्यय झाला आहे व अस् याचा लोप झाला आहे.

अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येत्येवमस्य न भविष्यति ॥ उत्तरार्थं तर्हि पूरणग्रहणं कर्तव्यम् । प्रागेकादशभ्योऽच्छन्दसि [ ४९ ] इति पूरणाद्यथा स्यात् ॥

**[ प्रागेकादशभ्योऽच्छन्दसि ॥ ५ । ३ । ४९ ॥**

**षष्ठाष्टमाभ्यां ञ च ॥ ५।३।५० ॥**

**मानपश्वङ्गयोः कन्लुकौ च ॥ ५ । ३ । ५१ ॥ ]**

**एकादाकिनिच्चासहाये ॥ ॥ ५ । ३ । ५२ ॥**

**एकादाकिनिचि द्विबह्वर्थे प्रत्ययविधानम् ॥ १ ॥**

एकादाकिनिचि द्विबह्वर्थे प्रत्ययो विधेयः । एकाकिनौ एकाकिन इति । किं पुनः कारणं न सिध्यति । एकशब्दोऽयं संख्यापदं संख्यायाश्च संख्येयमर्थः ॥

**सिद्धं तु संख्यादेशवचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । द्विबह्वर्थायाः संख्याया एकशब्द आदेशो वक्तव्यः ॥

**असहायस्य वा ॥ ३ ॥**

असहायस्य वैकशब्द आदेशो वक्तव्यः ।

---

तेथें तो अनर्थक आहे. आणि 'अर्थवानाचें ग्रहण संभवत असतांना अनर्थकाचें ग्रहण करूं नये' अशी परिभाषा आहे. तेव्हां मुखतीय याहून अन् प्रत्यय होणार नाहीं.

तर मग पुढील सूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरितां येथें पूरणात् असें म्हटलें पाहिजे. 'प्रागेकादशभ्योऽच्छन्दसि' या पुढील सूत्रानें सांगितलेला अन् प्रत्यय पूरणप्रत्ययान्त शब्दाहूनच झाला पाहिजे.

( सू. ५२ वा. १ ) हा जो एक शब्दाहून आकिनिच् प्रत्यय सांगितला आहे तेथें दोन आणि बहुत असे अर्थ असतांनाही हा प्रत्यय होतो असें म्हणावें. उदाः— एकाकिनौ एकाकिनः.

पण येथे ह्या प्रकृत सूत्रानेंच कां बरें आकिनिच् प्रत्यय होणार नाहीं?

एक हा संख्या-शब्द आहे आणि त्या संख्याशब्दाचा संख्येय पदार्थ असा अर्थ आहे.?

( वा. २ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

दोन आणि बहुत या अर्थांचा जो संख्याशब्द त्याला 'एक' हा शब्द आदेश होतो असें म्हणावें.

( वा. ३ ) अथवा येथें असहाय शब्दाला

---

१—(सू. ४९) एकादशाच्या पूर्वीचे जे पूरणप्रत्ययान्त संख्यावाचक शब्द त्यांहून भाग या स्वार्थी अन् प्रत्यय होतो; पण वैदिक प्रयोगामध्यें होत नाहीं. उदा०—पञ्चमः भागः.

१—( सू. ५० ) षष्ठ आणि अष्टम या शब्दांहून भाग या स्वार्थी ञ आणि अन् असे प्रत्यय होतात; पण वैदिक प्रयोगामध्यें होत नाहींत. उदा०—षाष्ठः, षष्ठः, आष्टमः, अष्टमः.

१—( सू. ५१ ) षष्ठ शब्दाहून भाग या स्वार्थी एकदां कन् प्रत्यय होतो. परंतु तो भाग एक प्रकारचें परिमाण असेल तर; तसेंच अष्टम शब्दाहून भाग या स्वार्थी केलेल्या प्रत्ययाचा एकदां लुक् होतो. परंतु तो भाग पशूचे अंग असेल तर. उदा०—षष्ठकः मानविशेषः, अष्टमः पश्वङ्गरूपो भागः.

१—(सू. ५२) असहाय या अर्थाच्या 'एक' या शब्दाहून स्वार्थी आकिनिच् व कन् प्रत्यय होतात, आणि एकदां त्यांचा लुक्ही होतो. उदा०—एकाकी, एककः, एकः.

२—तेव्हां अर्थातच संख्येय पदार्थ दोन किंवा बहुत असतील तर आकिनिच् प्रत्यय या सूत्रानें होणार नाहीं.

असहाय एकाकी । असहायावेकाकिनौ । असहाया एकाकिनः । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमेकादाकिनिच्चि द्विबह्वर्थे प्रत्ययविधानमिति । नैष दोषः । अयमेकशब्दोऽस्त्येव संख्यापदम् । तद्यथा । एकः द्वौ बहव इति । अस्त्यन्यार्थे वर्तते । तद्यथा । सधमादो द्युम्न एकास्ताः । अन्या इत्यर्थः । अस्त्यसहायवाची । तद्यथा । एकाग्नयः एकहलानि एकाकिभिः क्षुद्रकैर्जितमिति । तद्योऽसहायवाची तस्यैष प्रयोगः ॥

[ भूतपूर्वे चरट् ॥ ५ । ३ । ५३ ॥ षष्ठ्या रूप्य च ॥ ५ । ३ । ५४॥]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये पञ्चमस्याध्यायस्य तृतीये पादे प्रथममाह्निकम् ॥

---

'एक' शब्द आदेश होतो असें म्हणावें. तेव्हां एक असहाय या अर्थी एकाकी असें होईल; दोन असहाय या अर्थी एकाकिनौ असें होईल आणि बहुत असहाय या अर्थी एकाकिनः असें होईल.

अशा रीतीनें सिद्ध होतें खरें, पण सूत्रामध्यें फिरवाफिरव करावी लागते.

तर मग आतां मूळचें आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण मूळचे सूत्र ठेवलें तर ' दोन आणि बहुत असे अर्थ असतांनाही हा आकिनिच् प्रत्यय होतो असें म्हणावें ' असें सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. असें पहा कीं हा 'एक' शब्द संख्यावाची तर आहेच. उदा०—एकः द्वौ बहवः. तसेंच अन्य या अर्थाचाही 'एक' शब्द आहे. उदा०—सधमादो द्युम्न एकास्ताः. येथें 'एक' शब्दाचा अन्य असा अर्थ आहे. तसेंच असहाय या अर्थाचाही 'एक' हा शब्द आहे. उदा०—एकाग्नयः, एकहलानि, एकाकिभिः क्षुद्रकैर्जितम्. तेव्हां त्यांत जो असहाय या अर्थाचा 'एक' शब्द आहे त्याचाच एकाकी हा प्रयोग आहे असें समजावें.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पांचव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

---

१—( सू. ५३ ) भूतपूर्वींच्या अर्थाचा वाचक जो शब्द त्याहून स्वार्थी चर हा प्रत्यय होतो. उदा० भूतपूर्वः आढ्यः इति आढ्यचरः

२—( सू. ५४ ) षष्ठ्यन्त प्रतिपादिकाहून ' त्याचा भूतपूर्व पदार्थ ' या अर्थी रूप्य आणि चरट असे प्रत्यय होतात. उदा० देवदत्तस्य भूतपूर्वः इति देवदत्तरूप्यः, देवदत्तचरः गौः.

अ. ५. पा ३. आ. १ समाप्त.

## अतिशायने तमबिष्ठनौ ॥ ५ । ३ । ५५ ॥

अतिशायन इत्युच्यते किमिदमतिशायन इति । देश्याः सूत्रनिबन्धाः क्रियन्ते । यावद् ब्रूयात्प्रकर्षे ऽतिशय इति तावदतिशायन इति ॥

कस्य पुनः प्रकर्षे प्रत्यय उत्पद्यते । ङ्याप्प्रातिपदिकात् [ ४. १. १. ] इति वर्तते ङ्याप्प्रातिपदिकस्य प्रकर्षे । ङ्याप्प्रातिपदिकं वै शब्दो न च शब्दस्य प्रकर्षापकर्षौ स्तः । शब्देऽसंभवादर्थे कार्यं विज्ञास्यते । कः पुनर्ङ्याप्प्रातिपदिकार्थः । द्रव्यम् । न वै द्रव्यस्य प्रकर्ष इष्यते । एवं तर्हि गुणः ॥

एवमपि गुणग्रहणं कर्तव्यम् । द्रव्यमपि ङ्याप्प्रातिपदिकार्थो गुणोऽपि । तत्र कुत एतद् गुणस्य प्रकर्षे भविष्यति न पुनर्द्रव्यस्य प्रकर्ष इति ॥ क्रियमाणे चापि गुणग्रहणे समानगुणग्रहणं कर्तव्यं शुक्लात्कृष्णे मा भूदिति । न तर्हीदानीमिदं

---

( सू. ५५ ) येथें अतिशायने असें म्हटलें आहे. पण अतिशायन म्हणजे काय ?

प्रचारांत असलेले शब्द हे साधु शब्द अशा दृष्टीनेंच सूत्रकारांनीं सूत्रामध्यें ग्रथित केलेले असतात. तेव्हां प्रकर्ष व अतिशय हे शब्द ज्या अर्थानें बोलण्यांत येतात त्याच अर्थाचा येथील अतिशायेन शब्द आहे.

आतां कोणाचा प्रकर्ष दाखवावयाचा असतांना हे प्रत्यय होतात ?

ङ्याप्प्रातिपदिकात् असा अधिकार येत आहे. तेव्हा त्या ङ्याप्प्रातिपदिकांचाच प्रकर्ष समजावा.

पण ङ्यन्त, आबन्त आणि प्रातिपदिक हे विशिष्ट प्रकारचे शब्द आहेत. आणि शब्दाला प्रकर्ष किंवा अपकर्ष असें कांहींच सांगतां येत नाहीं.

जें कार्य शब्दाला संभवत नाहीं तें कार्य त्याच्या अर्थाला समजावें. तेव्हां येथें ङ्यन्त, आबन्त, आणि प्रादिपदिक यांच्या अर्थांचा प्रकर्ष घ्यावा.

ङ्यन्त, आबन्त, व प्रातिपदिकें यांचा अर्थ कोणता समजावा ?

विशेष प्रकारचें द्रव्य हा त्यांचा अर्थ आहे.

पण द्रव्याचा प्रकर्ष दाखवावयाचा असतांना हे प्रत्यय इष्ट नाहींत.

तसें आहे तर त्यांतील गुणाचा प्रकर्ष घ्यावा.

तर मग त्याकरितां प्रकृत सूत्रामध्यें गुणग्रहण केलें पाहिजे.

गुणग्रहण करावयास नको. कारण द्रव्य हाही शब्दाचा अर्थ आहे. आणि त्या द्रव्यांतील गुण हाही त्या शब्दाचा अर्थच आहे.

मग असेंच जर आहे तर त्यांतील गुणाचा प्रकर्ष दाखवावयाचा असतांनाच हे प्रत्यय होतील आणि द्रव्याचा प्रकर्ष दाखवावयाचा असतांना होणार नाहींत हें कशावरून ? शिवाय गुण ग्रहण केलें तरी तेवढ्यानें भागणार नाहीं, तर समानगुण असें म्हटलें पाहिजे. कारण, कृष्ण वर्णापेक्षां शुक्ल वर्णामध्यें एक प्रकारचा उत्कर्ष समजून शुक्ल शब्दाहून हा तमप् प्रत्यय होऊं लागेल तो न झाला पाहिजे.

तर मग आतां अध्वर्युर्वै श्रेयान् म्हणजे

---

१—( सू. ५५ ) कोणत्याही वस्तूचा प्रकर्ष विवक्षित असेल तर तद्वाचक शब्दाहून स्वार्थी तमप् व इष्ठन् हे प्रत्यय होतात. सर्व इमे आढ्याः अयमेषामतिशयेन आढ्य; आढ्यतमः; अतिशयेन पटुः पटिष्ठः.

२— तेव्हां अतिउपसर्गपूर्वक शी धातूहून भाव या अर्थी ल्युट् प्रत्यय आणि शी धातूला गुण आणि अय् आदेश झाल्यानंतर उपधाअकाराला छान्दस निपातनामुळें दीर्घ झाला आहे.

भवति । अध्वर्युर्वै श्रेयान्पापीयान्प्रतिप्रस्थाता । अन्धानां काणतम इति ॥ समानगुण एषा स्पर्धा भवति । अध्वर्युर्वै श्रेयानन्येभ्यः प्रशस्येभ्यः । पापीयान्प्रतिप्रस्थातान्येभ्यः पापेभ्यः । अन्धानां काणतम इति कणिरयं सौक्ष्म्ये वर्तते । सर्वे इमे किंचित्पश्यन्त्ययमेषां काणतम इति ॥ अदूरविप्रकर्ष इति वक्तव्यम् । इह मा भूत् । महान्सर्षपः महान्हिमवानिति॥ जातेर्नेति वक्तव्यम् । इह मा भूत् । वृक्षोऽयम् प्लक्षोऽयमिति । न तर्हीदानीमिदं भवति । गोतरः गोतरा अश्वतर इति । नैष जातेः प्रकर्षः । कस्य तर्हि । गुणस्य । गौरयं यः शकटं वहति । गोतरोऽयं यः शकटं वहति सीरं च । गौरियं या समां समां विजायते । गोतरेयं या समां समां

---

अध्वर्यु अतिशय पुण्यवान् आहे, पापीयान् प्रतिप्रस्थाता म्हणजे प्रतिप्रस्थाता अतिशय पापी आहे, अन्धानां काणतमः म्हणजे आंधळ्यापेक्षा काणा बरा असे प्रयोग होत नाहींतच की काय ?

हे प्रयोग होतात, पण येथे समान गुणापेक्षांच प्रकर्ष आहे. कारण येथें समान गुणांशींच स्पर्धा आहे. असे पहा कीं अध्वर्युर्वै श्रेयान् अन्येभ्यः प्रशस्येभ्यः म्हणजे हा अध्वर्यु इतर पुण्यवान् लोकांपेक्षा अतिशय पुण्यवान् आहे असा त्या वाक्याचा अर्थ आहे. तसेंच हा प्रतिप्रस्थाता इतर पापी लोकापेक्षा अतिशय पापी आहे असा त्या वाक्याचा अर्थ आहे. अन्धानां काणतमः येथेंही समान जातीयापेक्षाच प्रकर्ष आहे. काण शब्द कण् धातूपासून साधला आहे. कण् धातूचा अर्थ थोडें पाहणें असा आहे व त्या अर्थी काण शब्दाचा प्रयोगही दृष्टीस पडतो. 'सर्वे इमे किंचित् पश्यन्ति अयमेषां काणतमः' म्हणजे हे सर्व लोक थोडे पाहणारे ( काणे– ) च आहेत, आणि हा तर त्यांच्यामध्ये अतिशय काणा आहे.

ज्या दोहोंमध्यें एकापेक्षां दुसऱ्याचा प्रकर्ष दाखवावयाचा असतो त्या दोहोंमध्यें फार अंतर नसावें असें येथें म्हटलें पाहिजे. कारण महान् सर्षपः, महान् हिमवान् येथें हे प्रत्यय न झाले पाहिजेत.

जातेर्न म्हणजे जाति शब्दाहून जर जातीमुळें प्रकर्ष विवक्षित असेल तर हे प्रत्यय होत नाहीत असें म्हणावें. कारण वृक्षोऽयं प्लक्षोऽयम् येथें हे प्रत्यय न झाले पाहिजेत.

तर मग आता गोतरः गोतरा, अश्वतरः अश्वतरा हे प्रयोग होत नाहींत काय?

हे प्रयोग होतात, कारण येथें जातीचा प्रकर्ष विवक्षित नसला म्हणजे झालें.

मग येथें कोणाचा बरें प्रकर्ष आहे?

येथें गुणाचा प्रकर्ष आहे. तो असा कीं– जो गाडा ओढणारा सशक्त बैल तो गौः, आणि जो गाडा ओढतो एवढेंच नव्हे तर नांगरही ओढतो तो गोतर. तसेंच, जी गाय प्रत्येक वर्षी विते ती गौः, आणि जी प्रत्येक वर्षीं विते एवढेंच नव्हे तर जिला पाडी होते ती गोतरा होय. तसेंच जो चार योजनें सहज

---

३— कारण, अध्वर्यु आणि प्रतिप्रस्थाता हे पुण्यवान् या दृष्टीने येथें समान धर्माचे असे विवक्षित नाहीत; आणि पापी या दृष्टीनेंही समान असे विवक्षित नाहीत; तसेच, आधळा व काणा हेही समान नव्हेत; कारण काणा कांहीं आधळा नसतो व आधळा कांही काणा नसतो असा अभिप्राय आहे.

४— थोडें पाहणे म्ह पुष्कळ अशानें न पाहणें. तेव्हां काणा हा आंधळ्याच्याच जातींतील होतो. तसेंच ज्याची दृष्टी फारच कमी झाली आहे त्याला आधळा म्हणतात, तेव्हा आंधळाही काण्याच्याच जातींतला आहे.

५— सर्षप म्ह. मोहोरी. ही वरीपेक्षा मोठी आहे; परन्तु मोहोरीपेक्षा हिमवान् पर्वत मोठा अशा अर्थाची विवक्षा असेल तेव्हा हा प्रत्यय होत नाही.

६— हा सामान्य कसला तरी वृक्ष आहे आणि हा तर प्लक्ष नावाचा वृक्ष आहे. येथें प्लक्षत्व जातीमुळें इतर वृक्षांपेक्षा प्रकर्ष विवक्षित आहे.

विजायते स्त्रीवत्सा च । अश्वोऽयं यश्चत्वारि योजनानि गच्छति । अश्वतरोऽयं योऽष्टौ योजनानि गच्छति ॥ तथा तिङश्च [ ५. ३. ५६. ] इत्यत्र क्रियाग्रहणं कर्तव्यं साधनप्रकर्षे मा भूत् ॥

नैष दोषः । यत्तावदुच्यते गुणग्रहणं कर्तव्यमिति न कर्तव्यम् । यस्य प्रकर्षोऽस्ति तस्य प्रकर्षे भविष्यति गुणस्य चैव प्रकर्षो न द्रव्यस्य । कथं ज्ञायते । एवं हि दृश्यते लोके । इह समान आयामे विस्तारे पटस्यान्योऽर्घो भवति काशिकस्यान्यो माथुरस्य । गुणान्तरं खल्वपि शिल्पिन उत्पादयमाना द्रव्यान्तरेण प्रक्षालयन्ति । अन्येन शुद्धं धौतकं कुर्वन्त्यन्येन शैफालिकमन्येन माध्यामिकम् ॥ यदप्युच्यते क्रियमाणे चापि गुणग्रहणे समानगुणग्रहणं कर्तव्यं शुक्लात्कृष्णे मा भूदिति । न कर्तव्यम् । समानगुण एव स्पर्धा भवति न ह्याढ्याभिरूपौ स्पर्धेते । वाचकेन खल्वप्युत्पत्तव्यं न च शुक्लात्कृष्णे प्रत्यय

---

जातो तो अश्व होय. आणि जो आठ योजनें सहज जातो तो अश्वतर होय. तसेंच 'तिङश्च' या पुढील सूत्रामध्यें क्रियाग्रहण करावें. कारण क्रियेचा प्रकर्ष असतांनाच हा प्रत्यय झाला पाहिजे. क्रियेच्या साधनांचा प्रकर्ष असतांना हा प्रत्यय न झाला पाहिजे.

हे दोष येत नाहींत. गुणांचा प्रकर्ष असतांनाच हा प्रत्यय व्हावा, द्रव्याचा प्रकर्ष असतांना न व्हावा याकरितां गुणग्रहण करावें असें जें म्हटलें आहे तें म्हणावयास नको. कारण ज्याचा प्रकर्ष संभवेल त्याचा प्रकर्ष दाखविणाराच हा प्रत्यय होईल, आणि प्रकर्ष तर कोणत्या तरी गुणांचाच संभवतो, त्याशिवाय नुसत्या द्रव्याचा प्रकर्ष कोठेंही असत नाहीं.

हें कशावरून बरें समजावें ?

अशावरून समजावें कीं लोकांमध्येंच पहा एखाद्या वस्त्राची लांबी व रुंदी सारखीच असली तरी त्याच्या कांहीं गुणांकडे नजर देऊन काशी देशाचा मनुष्य त्याची एक किंमत करतो तर मथुरेकडील मनुष्य निराळीच त्याची किंमत करतो. शिवाय, त्याच वस्त्रामध्यें निरनिराळे गुण उत्पन्न करणारे कसबी लोक निरनिराळे पदार्थ लावून त्यानें प्रक्षालन करतात. कोणी कांहीं पदार्थ लावून अगदीं धुवट करतात, कोणी कांहीं वस्तु घेऊन तिच्या योगानें शैफालिक करतात, तर कोणी तिसराच एखादा पदार्थ घेऊन त्याच्या योगानें माध्यमिक करतात.

तसेंच समानगुण असें येथे म्हणावें. कारण कृष्ण वर्णापेक्षां शुक्ल वर्णामध्यें उत्कर्ष समजून तेथें त्या अर्थीं हा प्रत्यय न झाला पाहिजे.

परंतु समानगुण असें येथें म्हणावयास नको. कारण समान गुण असलेल्या लोकांमध्यें स्पर्धा उत्पन्न होते. एखादा श्रीमान् मनुष्य आणि एखादा रूपवान् मनुष्य या दोघांमध्यें कांहीं स्पर्धा उत्पन्न होत नाहीं. शिवाय ज्या ठिकाणीं प्रत्ययापासून प्रकर्ष या अर्थाचा बोध होण्याजोगा असेल तेथेंच तो प्रत्यय उत्पन्न होतो. आणि येथें तर कृष्ण वर्णापेक्षां शुक्ल वर्णामध्यें जो कांहीं प्रकर्ष आहे तो प्रकर्ष शुक्ल शब्दाच्या पुढें तमप् प्रत्यय केला तरी

---

७— स्वयंपाक चांगला करीत असेल तरच देवदत्तः पचतितमाम् असा प्रयोग होतो जो साधने म्हणजे लाकडे चांगलीं वाळकीं घेतो, भांडे मोठे घेतो तशा ठिकाणी पचतितमाम् असा प्रयोग होत नाही

८— हल्ली जसें कपड्याला कोणी साबण लावतात, कोणी पाण्यामध्ये क्षार पदार्थ टाकून त्यांत ते कपडे उकळतात, कोणी कपड्याला इस्तरी करतात तशा प्रकारच्या ज्या पूर्वकाली तऱ्हा होत्या त्यांपैकीच धौतक, शैफालिक व माध्यमिक ह्या असाव्या.

उत्पद्यमानो वाचकः स्यात् ॥ यदप्युच्यते ऽदूरविप्रकर्ष इति वक्तव्यमिति न वक्तव्यम् । अदूरविप्रकर्ष एव स्पर्धा भवति न हि निष्कधनः शतनिष्कधनेन स्पर्धते ॥ यदप्युच्यते जातेर्नेति वक्तव्यमिति न वक्तव्यम् ।जननेन या प्राप्यते सा जातिर्न चैतस्यार्थस्य प्रकर्षापकर्षौ स्तः ॥ यदप्युच्यते तिङश्चेत्यत्र क्रियाग्रहणं कर्तव्यं साधनप्रकर्षे मा भूदिति न कर्तव्यम् । साधनं वै द्रव्यं न च द्रव्यस्य प्रकर्षापकर्षौ स्तः ॥

किं पुनरेकं शौक्ल्यमाहोस्विन्नाना । किं चातः । यद्येकं प्रकर्षो नोपपद्यते न हि तेनैव तस्य प्रकर्षो भवति । अथ नाना समानगुणग्रहणं कर्तव्यं शुक्लात्कृष्णे मा भूदिति ॥ अस्त्वेकं शौक्ल्यं तत्तु विशेषवत् । किंकृतो विशेषः । अल्पत्वमहत्त्वकृतः ॥ अथवा पुनरस्त्वेकं निर्विशेषं च । ननु

---

त्यापासून त्या प्रकर्षाचा बोध होत नाहीं.

तसेंच ज्या दोन पदार्थांमध्यें एकापेक्षां दुसऱ्याचा प्रकर्ष दाखवावयाचा त्या दोन पदार्थांमध्यें फार अंतर नसावें, असें जें म्हटलें आहे तेंही म्हणावयास नको. कारण, फार अंतर नसेल तरच त्यांमध्यें स्पर्धा उत्पन्न होत असते. कारण, एकच निष्क ज्याच्या जवळ आहे तो शेकडो निष्क ज्याच्या जवळ आहेत त्याच्याशीं कधींच स्पर्धा करीत नाहीं.

तसेंच जातिवाचक शब्दाहून हा प्रत्यय होत नाहीं असें म्हणावें असें जें म्हटलें आहे तेंही म्हणावयास नको. कारण जन्माबरोबरच जी प्राप्त होते तिला जाति म्हणतात. आणि अशा तऱ्हेचा जो पदार्थ तो त्या पदार्थाचें अस्तित्व आहे तोपर्यंत एकाच तऱ्हेनें कायम राहणार. तेव्हां त्याला प्रकर्ष व अपकर्ष यांपैकीं कांहींच संभवत नाहीं.

तसेंच, ‘ तिङश्च ’ या पुढील सूत्रामध्यें क्रियाग्रहण करावें. कारण, क्रियेचाच प्रकर्ष असतांना हा प्रत्यय झाला पाहिजे क्रियेच्या साधनाचा प्रकर्ष असतांना हा प्रत्यय न झाला पाहिजे असें जें म्हटलें आहे तेंही म्हणावयास नको. कारण, साधन म्हणून जें असतें तो एखादा पदार्थ असतो आणि त्या पदार्थांत तर त्यांतील गुणाकडे नजर दिल्याशिवाय प्रकर्ष किंवा अपकर्ष मुळींच दाखवितां येत नाहींत.

पण काय हो, पांढरा वगैरे जो रंग आहे तो सर्व पांढऱ्या पदार्थांचा एकच आहे किंवा निराळा आहे ?

या दोन पक्षांमध्यें फरक काय बरें आहे ?

फरक असा आहे कीं—जर सर्व ठिकाणचा पांढरा रंग एकच असेल तर प्रकर्ष मुळींच संभवत नाहीं. कारण आपणच आपल्यापेक्षां ज्यास्त योग्यतेचा असें म्हणता येत नाहीं. आतां, जर भिन्न भिन्न पदार्थांचा पांढरा रंग निरनिराळा आहे असें घ्यावें तर समानगुण अशाच पदार्थांमध्यें एकापेक्षां दुसऱ्याचा प्रकर्ष विवक्षित असतांना असें म्हटलें पाहिजे, कारण कृष्ण वर्णापेक्षां शुक्ल वर्णामध्यें उत्कर्ष समजून तेथें त्या अर्थीं हा प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग आतां सर्व ठिकाणचा पांढरा रंग एकच आहे असेंच मत असूं दे. पण पांढऱ्या रंगामध्यें विशेष मात्र आहे.

तो विशेष कशामुळें बरें होतो ?

अल्पत्व व महत्व यांमुळें विशेष होतो. म्हणजे एकच पांढरा रंग खरा, पण कोठें तो कमी तर कोठे तो ज्यास्त असतो. अथवा सर्व ठिकाणचा पांढरा रंग एकच आहे व त्यांत कोठें विशेष नाहीं असेंच मत असूं दे.

पण सर्व ठिकाणचा पांढरा रंग एकच असेल तर प्रकर्ष मुळींच संभवत नाहीं. कारण आपणच

चोक्तं प्रकर्षो नोपपद्यते न हि तेनैव तस्य प्रकर्षो भवतीति । गुणान्तरेण प्रच्छादनात्प्रकर्षो भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु नाना । ननु चोक्तं समानगुणग्रहणं कर्तव्यं शुक्लात्कृष्णे मा भूदिति । न कर्तव्यम् । समानगुण एव स्पर्धा भवति न ह्याढ्याभिरूपौ स्पर्धेते । वाचकेन खल्वप्युत्पत्तव्यं न च शुक्लात्कृष्ण उत्पद्यमानो वाचकः स्यात् ॥

किमन्तात्पुनरुत्पत्त्या भवितव्यम् । द्वितीयान्तादतिशय्यमानात् । शुक्लमतिशेते शुक्लतरः । कृष्णमतिशेते कृष्णतरः । यदि द्वितीयान्तादतिशय्यमानात् कालोऽतिशेते कालीं कालितर इति प्राप्नोति कालतर इति चेष्यते । तथा काल्यतिशेते कालं कालतरेति प्राप्नोति कालितरेति चेष्यते ।

---

आपल्यापेक्षां ज्यास्त योग्यतेचा असें म्हणता येत नाही असे सांगितलें आहे ना ?

एकच जरी असला तरी इतर गुणाच्या मिश्रणामुळें त्याचाच कोठें उत्कर्ष म्हणतां येईल.

अथवा भिन्न भिन्न पदार्थांचा पांढरा रंग निरानिराळा आहे असेंच मत असूं दे.

पण तसे घेतले असता ‘ समानगुणग्रहण ’ करावें लागेल कारण, कृष्ण वर्णापेक्षा शुक्ल वर्णामध्यें उत्कर्ष समजून तेथें त्या अर्थी हा प्रत्यय न झाला पाहिजे असें सांगितलें आहे ना ?

समानगुणग्रहण करावयास नको. कारण समान गुणाच्याच वस्तूंमध्यें स्पर्धा उत्पन्न होते. एखादा श्रीमान् मनुष्य आणि एखादा रूपवान् मनुष्य या दोघांमध्यें कधींही स्पर्धा उत्पन्न होत नाही. शिवाय, ज्या ठिकाणीं प्रत्ययापासून प्रकर्ष अर्थाचा बोध होण्याजोगा असेल तेथेंच तो प्रत्यय उत्पन्न होतो, आणि येथें तर कृष्ण वर्णापेक्षा शुक्ल वर्णामध्ये जो कांहीं प्रकर्ष आहे त्या प्रकर्षाचा शुक्ल शब्दाच्या पुढें तमप् प्रत्यय केला तरी त्यापासून बोध होत नाही.

आतां शुक्ल वगैरे शब्दाहून जो तरप् प्रत्यय होतो तो त्या शब्दाला कोणती विभक्ति पुढें लावून करावा ?

प्रकृष्ट गुणानें अतिक्रमण केला जाणारा जो अपकृष्ट गुण तद्वाचक अशा द्वितीयान्त गुणवाचक शब्दाहून तरप् प्रत्यय करावा. उदा०—शुक्लम् अतिशेते शुक्लतरः; कृष्णम् अतिशेते कृष्णतरः.

जर असा अतिक्रमण केला जाणारा जो अपकृष्ट गुण तद्वाचक द्वितीयान्त शब्दाहून हा प्रत्यय होतो असें असेल तर कालीम् अतिशेते कालः कालतरः असें रूप इष्ट आहे तेथें काल शब्दाहून कालितरः असें भलतेंच रूप होऊं लागेल. तसेंच कालं अतिशेते काली कालितरा असें इष्ट आहे तेथें काली शब्दाहून हा प्रत्यय न होतां काल शब्दाहून होऊन कालतरा

---

९— मोगरा, धोतरा, चाफा इत्यादि फुलांचा पांढरा रंग एकच आहे तरी पण मोगऱ्यामध्यें सुगंध या इतर गुणामुळें तेथें पांढऱ्या रंगाची योग्यता ज्यास्त समजली जाते.

१०— दुधाचा पांढरा रंग ताकापेक्षा ज्यास्त प्रकृष्ट आहे. आणि ताकाचा पांढरा रंग दुधापेक्षा कमी प्रतीचा म्हणजे अपकृष्ट आहे. शुक्लतर शब्दामध्यें जो शुक्ल शब्द आहे तो जर ताकाचा पांढरा रंग दाखविणारा असेल तर त्या द्वितीयान्त शुक्ल शब्दाहून ‘ तम् अतिशेते ’ म्हणजे त्याचें अतिक्रमण करणारा या अर्थी तरप् प्रत्यय होईल. आणि जर तो शुक्लतर शब्दातील शुक्ल शब्द दुधाचा पांढरा रंग दाखविणारा असेल तर त्या प्रथमान्त शुक्ल शब्दाहून प्रकृष्ट या स्वार्थी तरप् प्रत्यय होईल.

तथा गार्ग्योऽतिशेते गर्गान्गर्गतर इति प्राप्नोति गार्ग्यतर इति चेष्यते । तथा गर्गा अतिशेरते गार्ग्यं गार्ग्यतरा इति प्राप्नोति गर्गतरा इति चेष्यते ॥ एवं तर्हि प्रथमान्तात्स्वार्थिको भविष्यति । कालोऽतिशेते कालतरः । काल्यतिशेते कालितरा । गार्ग्योऽतिशेते गार्ग्यतरः । गर्गा अतिशेरते गर्गतराः । यदि प्रथमान्तात्स्वार्थिकः कुमारितरा किशोरितरा अव्यतिरिक्तं वय इति कृत्वा वयसि प्रथमे [ ४. १. २०. ] इति ङीप्प्राप्नोति । तरपोक्तत्वात्स्त्रीप्रत्ययो न भविष्यति । टाबपि तर्हि न प्राप्नोति । उक्तेऽपि हि भवन्त्येते टाबादयः । उक्तमेतत्स्वार्थिकाष्टाबादय इति । ङीबपि तर्हि प्राप्नोति ॥ एवं तर्हि गुणोऽभिधीयते । एवमपि लिङ्गवचनानि न सिध्यन्ति । शुक्लतरम् शुक्लतरा शुक्लतरः शुक्लतरौ शुक्लतरा इति । आश्रयतो लिङ्गवचनानि भवि-

असें होऊं लागेल. तसेच गर्गान् अतिशेते गार्ग्यः गार्ग्यतरः असें रूप इष्ट आहे तेथे गार्ग्य शब्दाहून हा प्रत्यय न होतां गर्ग शब्दाहून होऊन गर्गतरः असें रूप होऊं लागेल. तसेच गार्ग्यम् अतिशेरते ते गर्गतराः असें इष्ट आहे तेथें गर्ग शब्दाहून हा प्रत्यय न होता गार्ग्य शब्दाहून होऊन गार्ग्यतराः असें रूप होऊं लागेल.

तर मग आतां अतिक्रमण करणारा जो प्रकृष्ट गुण तद्वाचक प्रथमान्त शब्दाहून स्वार्थी हा प्रत्यय होतो असें समजतां येईल. कालीम् अतिशेते कालः असा अर्थ विवक्षित असतांना काल शब्दाहूनच हा प्रत्यय होऊन कालतरा असें रूप होईल.तसेंच कालम् अतिशेते काली या अर्थी कालितरा असें होईल. गर्गान् अतिशेते गार्ग्यः या अर्थी गार्ग्यतरः असें होईल. आणि गार्ग्यम् अतिशेरते गर्गाः या अर्थी गर्गतराः असें होईल.

पण जर प्रकृष्टगुणवाचक अशा प्रथमान्त शब्दाहून स्वार्थी हा प्रत्यय होईल तर कुमारितरा व किशोरितरा येथें वयोवाचक कुमारी व किशोरी या शब्दांपेक्षां निराळा अर्थ होत नसल्यामुळे त्या तरप्प्रत्ययान्त शब्दांहून 'वयसि प्रथमे' (४।१।२०) या सूत्राने ङीप् प्रत्यय होऊं लागेल[११].

पण स्वार्थी तरप् प्रत्यय हा कुमारी शब्दाच्या अर्थातील स्त्रीत्वालाही दाखवितो म्हणून त्याहून पुनः पुढें स्त्रीत्व या अर्थी ङीप् प्रत्यय होणार नाहीं असें म्हणावे तर टाप्ही होणार नाहीं.

आतां अर्थ उक्त असला तरी टाप् वगैरे प्रत्यय होतात. कारण टाप् वगैरे प्रत्यय हे स्वार्थींच होणारे आहेत असें असेल तर ङीप्ही प्राप्त होणारच.

तर मग आतां ह्या प्रत्ययानें प्रकृष्ट गुणांचें प्रतिपादन केलें जातें[१२].

पण तसें म्हटलें तर ह्या प्रत्ययान्त शब्दाला लिंग व वचन मुळींच लागणार नाहींत. उदा० शुक्लतरम्, शुक्लतरा, शुक्लतरः शुक्लतरौ शुक्लतराः.

आश्रयावरून त्याला लिंगवचनें होतील.

११—आठ दहा वर्षांच्या मुलीला कुमारी अथवा किशोरी म्हणतात. त्याहीपेक्षां लहान पांच सहा वर्षांच्या मुलीला कुमारितरा म्हणतात. येथें कुमार शब्दाहून डीप् प्रत्यय झालाच आहे तरप् प्रत्यय हा स्वार्थीच झाला तर कुमारितर हा शब्दही साक्षात् वयोवाचक असल्यामुळें त्याहून डीप् प्रत्यय होऊ लागेल. आणि जर कुमारीम् अतिशेते कुमारितरा असा अतिक्रमण करणारी या अर्थी तरप् प्रत्यय केला तर पञ्चवर्षा व अष्टवर्षा हे शब्द साक्षात् वयोवाचक नव्हेत म्हणून जसा डीप् होत नाहीं तसा कुमारितरा हाही शब्द साक्षात् वयोवाचक नव्हे म्हणून डीप् होत नाहीं असें म्हणता येतें.

१२—तेव्हा कुमारीच्या गुणाचे प्रतिपादन केलें तरी कुमारीचें प्रतिपादन केले नसल्यामुळें ङीप् प्रत्यय होणार नाहीं.

ष्यन्ति । गुणवचनानां हि शब्दानामाश्रयतो लिङ्गवचनानि भवन्ति । तद्यथा । शुक्लं वस्त्रम् शुक्ला शाटी शुक्लः कम्बलः शुक्लौ कम्बलौ शुक्लाः कम्बला इति । यदसौ द्रव्यं श्रितो भवति गुणस्तस्य यल्लिङ्गं वचनं च तद्गुणस्यापि भविष्यति ॥ अथवा क्रियाभिधीयते । एवमपि लिङ्गवचनानि न सिध्यन्ति । आश्रयतो लिङ्गवचनानि भविष्यन्ति । एवमपि द्विवचनं प्राप्नोति यश्च ह्यतिशेते यश्चातिशय्यत उभौ तौ तस्याश्रयौ भवतः । नैष दोषः । कथम् । शेतिरकर्मकः । अकर्मका अपि धातवः सोपसर्गाः सकर्मका भवन्ति । कर्मोपदिष्टा विधयः कर्मस्थभावकानां कर्मस्थक्रियाणां वा भवन्ति कर्तृस्थभावकश्च शेतिः ॥

अथ यद्येव द्वितीयान्तादुत्पत्तिः प्रथमान्ताद्वा स्वार्थिकोऽथापि गुणोऽभिधीयतेऽथापि क्रिया किं गतमेतदियता सूत्रेणाहोस्विदन्यतरस्मिन्पक्षे भूयः सूत्रं कर्तव्यम् । गतमित्याह । कथम् । यदा तावद् द्विती-

---

गुणवाचक शब्दांना आश्रयावरूनच लिंगवचनें होत असतात. उदा०—शुक्लं वस्त्रम्, शुक्ला शाटी, शुक्लः कम्बलः, शुक्लौ कम्बलौ, शुक्लाः कम्बलाः. तेव्हां गुण हा ज्या द्रव्याचा आश्रय घेतो त्या द्रव्याचें जें लिंग व वचन असेल तें लिंग व वचन त्या गुणालाही लागू होईल.

अथवा ह्या अतिशायनार्थी प्रत्ययानें ‘आक्रमण करणें’ ही क्रियाच प्रतिपादन केली जाते.

पण क्रियेचें प्रतिपादन केलें तर ह्या प्रत्ययान्त शब्दाला लिंग व वचन मुळींच लागणार नाहींत.

आश्रयावरून त्या क्रियावाचक शब्दाला लिंगवचनें होतील.

पण असें म्हटलें तर शुक्लतर वगैरे शब्दांहून द्विवचन प्राप्त होतें. कारण, प्रकृष्टो गुणः अपकृष्टं गुणम् अतिशेते येथें जो अतिक्रमण करतो आणि ज्याचें अतिक्रमण करतो ते दोघेही त्या अतिशयन क्रियेचे आश्रय आहेत.

हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

असा कीं— शी धातु हा अकर्मक [१३]आहे. पण मूळचे अकर्मक धातू सुद्धां उपसर्ग लागल्यानें सकर्मक होतात ना ?

तरी पण कर्मामुळें होणारे विधी हे कर्मस्थभावक[१४] अथवा कर्मस्थक्रियक असा धातु असेल तरच होत असतात; आणि शी धातु हा उपसर्ग लागल्यामुळे सकर्मक असला तरी कर्तृस्थभावकच[१५] आहे.

पण काय हो, ‘अपकृष्टगुणवाचक अशा द्वितीयान्त शब्दाहून त्याचें अतिक्रमण करणारा या अर्थी हा आतिशायनिक प्रत्यय होतो’ (१) अथवा ‘प्रकृष्टगुणवाचक अशा प्रथमान्त शब्दाहून स्वार्थी हा प्रत्यय होतो’ (२) किंवा ‘अतिक्रमण करण्याचें साधन जो प्रकृष्ट गुण त्या अर्थी हा प्रत्यय होतो’ (३) किंवा ‘अतिक्रमण करणें ही जी क्रिया त्या अर्थी हा प्रत्यय होतो’ (४) असे जे ह्या सूत्राचे चार प्रकारचे अर्थ दाखविले ते चारी अर्थ जेवढें सूत्र आहे तेवढ्याच सूत्रांतून निघतात किंवा एखादा अर्थ करतांना ह्या सूत्रामध्यें कांहीं ज्यास्त पदें घालावीं लागतात ?

आहे तेवढ्या सूत्रांतूनच ते चारी अर्थ निघतात असे म्हणतो.

तें कसें ?

तें असें कीं— अपकृष्टगुणवाचक अशा

---

१३—अकर्मक धातु असेल तेथे क्रियेचे आश्रय दोन नसतात; एकटा कर्ताच असतो.

१४—कर्मस्थभावक आणि कर्मस्थक्रियक वगैरे शब्दांच्या अर्थासंबधाने ( ३।१।८७ टीप ७ ) पहा.

१५—कर्तृस्थभावक धातूमध्यें क्रियेची प्रवृत्ति कर्मामध्ये होत नसल्यामुळे ‘कर्म हा त्या क्रियेचा आश्रय धरून येथें द्विवचन होईल’ असें म्हणतां येत नाही.

यान्तादुत्पत्तिः प्रथमान्ताद्वा स्वार्थिकस्तदा कृत्यल्युटो बहुलम् [ ३.३.११३ ] इत्येवमत्र ल्युड्भविष्यति । यदा गुणोऽभिधीयते तदा न्यायसिद्धमेव यदापि क्रिया तदापि न्यायसिद्धमेव ॥ अथवातिशाययतीत्यतिशायनम् । कः प्रयोज्यार्थः । गुणा गुणिनं प्रयोजयन्ति गुणी वा गुणान्प्रयोजयति । कः पुनरिह शेत्यर्थः । इह यो यत्र भवति शेतेऽसौ तत्र गुणाश्च गुणिनि शेरते ॥

शेत्यर्थः कारितार्थो वा
निर्देशोऽयं समीक्षितः ।
शेत्यर्थे नास्ति वक्तव्यं
कारितार्थं ब्रवीमि ते ॥
गुणी वा गुणसंयोगाद्
गुणो वा गुणिना यदि ।
अभिव्यज्येत संयोगात्
कारितार्थो भविष्यति ॥

---

द्वितीयान्त शब्दाहून प्रत्यय होतो, किंवा प्रकृष्ट गुणवाचक अशा प्रथमान्त शब्दाहून स्वार्थी हा प्रत्यय होतो या दोन्ही अर्थाचे वेळीं सूत्रांतील अतिशायन या शब्दामध्ये ल्युट् प्रत्यय कर्ता या अर्थी केला आहे तो 'कृत्यल्युटो बहुलम्' (३।३।११३) यानें होईल. आतां गुणवाचकच हा प्रत्यय होतो या अर्थाचे वेळीं तो ल्युट् प्रत्यय करण या अर्थी केला आहे तो या रीतसर 'करणाधिकरणयोश्च' (३।३।११७) या सूत्रानेंच सिद्ध होत आहे. तसेंच क्रियावाचक हा प्रत्यय होतो या अर्थाचे वेळीं ल्युट् प्रत्यय हा भाव या अर्थाचा पाहिजे आणि तोही रीतसर ल्युट् च ( ३।३।११५ ) या सूत्रानेंच सिद्ध होत आहे.

अथवा अतिशाययति इति आतिशायनम्[१६] असा विग्रह येथें करावा.

पण येथें प्रयोज्य अर्थ कसा बरें जुळतो ?

कां बरें ? गुण हे गुणीला प्रयोजक होतात[१७], अथवा गुणी गुणांना प्रयोजक होतो.

पण येथें शी धातूचा अर्थ काय बरें आहे ?

असें पहा कीं जो ज्या ठिकाणीं असतो त्या ठिकाणीं 'स शेते' असा व्यवहार[१८] होतो. तेव्हां गुण हे गुणीचे ठिकाणीं शेरते म्ह. राहतात.

( श्लो. १ ) अतिक्रमण करून राहणें किंवा अतिक्रमण करून राहविणें या अर्थाचा अतिशायन हा शब्द आहे असें दिसतें. त्यात अतिक्रमण करून राहणें या अर्थी कांहीं सांगावयाचें नाहीं. अतिक्रमण करून राहविणें या अर्थासंबधानें तुला सांगतों.

( श्लो. २ ) गुणी मनुष्य हा गुणामुळें लोकामध्यें पुढारी दिसतो, किंवा गुण हे गुणी मनुष्यामुळें लोकांमध्यें चमकतात. तेव्हां येथें इतरांना अतिक्रमण करून राहविणें हा अर्थ बरोबर जुळतो.

---

१६—पूर्वी अतिउपसर्गपूर्वक शी धातूहून कर्ता या अर्थी ल्युट् प्रत्यय करून निपातनास्तव दीर्घ केला होता. ( टीप २ ). आतां शी धातूहून णिच प्रत्यय ( ३।१।२६ ) करून पुढे ल्युट् प्रत्यय केला आहे. णिच् प्रत्ययामुळें वृद्धि (७।२।११५) आणि आय आदेश ( ६।१।७८ ) होऊन अतिशायन असे रूप होतें.

१७—गुणी हा इतरांचें अतिक्रमण करून राहतो ( गुणी इतरान् अतिशेते ), आणि गुण हे गुणाला तशा रीतीनें राहवितात (गुणाः गुणिना इतरान् अतिशाययन्ति ). तेव्हां पूर्वी दाखविलेल्या चार अर्थांपैकीं तिसरा अर्थ सिद्ध होतो. अथवा गुण हे इतरांचें अतिक्रमण करून राहतात ( गुणाः इतरान् अतिशेरते ) आणि गुणी हा गुणाना तशा रीतीनें राहवितो ( गुणी गुणैः इतरान् अतिशाययति ). तेव्हां पूर्वी दाखविलेल्या चार अर्थांपैकीं दुसरा अर्थ सिद्ध होतो.

१८—तेव्हा अतिशायन शब्दातील 'शी' धातूचा अर्थ असणें अथवा राहणें हा आहे. जलाशय शब्दामध्यें शी धातूचा अर्थ असणें हाच आहे. पाणी असतें त्या सरोवर वगैरेंना जलाशय म्हणतात.

इहास्यापि सूक्ष्माणि वस्त्राण्यस्यापि सूक्ष्माणि वस्त्राणीति परत्वादातिशायिकः प्राप्नोति ।

**अतिशायने बहुव्रीहावुक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । पूर्वपदातिशय आतिशायिकाद्बहुव्रीहिः सूक्ष्मवस्त्रतराद्यर्थ उत्तरपदातिशय आतिशायिको बहुव्रीहेर्बह्वाढ्यतराद्यर्थ इति ॥

इह त्रीणि शुक्लानि वस्त्राणि प्रकर्षापकर्षयुक्तानि । तत्र पूर्वमपेक्ष्योत्तरे द्वे तरबन्ते । तत्र द्वयोस्तरबन्तयोरेकस्मात्प्रकर्षयुक्ताच्छुक्लतरशब्दादुत्पत्तिः प्राप्नोति शुक्लशब्दादेव चेष्यते ।

**शुक्लतरस्य शुक्लभावात्प्रकृतेः प्रत्ययविज्ञानम् ॥ २ ॥**

शुक्लतरशब्दे शुक्लशब्दोऽस्ति तस्मादुत्पत्तिर्भविष्यति ॥

नैतद्विवदामहे शुक्लतरशब्दे शुक्लशब्दोऽस्ति नास्तीति । किं तर्हि । शुक्लतरशब्दोऽप्यस्ति तत उत्पत्तिः प्राप्नोति ॥

**तदन्ताच्च स्वार्थे छन्दसि दर्शनं श्रेष्ठतमायेति ॥ ३ ॥**

तदन्तादातिशायिकान्तात्स्वार्थे छन्दस्यातिशायिको दृश्यते । देवो वः सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मणे ॥

एवं तर्हि मध्यमाच्छुक्लशब्दात्पूर्वपरा-

---

आतां ' ह्याची सूक्ष्म वस्त्रें आहेत आणि त्याहीपेक्षा सूक्ष्म आहेत वस्त्रे ज्याचीं ' या अर्थी बहुव्रीहीचा परत्वास्तव बाध करून सूक्ष्म शब्दाहून हा आतिशायिक प्रत्यय प्राप्त होतो.

( वा. १ ) आतिशायिक प्रत्यय आणि बहुव्रीहि यांची प्राप्ति आली असता त्यासंबंधानें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

' पूर्वपदातिशये आतिशायिकाद् बहुव्रीहिः सूक्ष्मवस्त्रतराद्यर्थः'; तसेंच 'उत्तरपदातिशये आतिशायिको बहुव्रीहेर्बह्वाढ्यतराद्यर्थः' ( २।१।६९ वा. ६,७. ) असें सांगितलेंच आहे.

आतां एखाद्या ठिकाणीं एक मळकट दुसरें स्वच्छ आणि तिसरें धुवट अशीं कमज्यास्त पांढरीं तीन तऱ्हेचीं वस्त्रें आहेत, त्या तिन्हींमध्यें पहिल्यापेक्षां पुढील दोन शुक्लतर आहेत, त्या दोन शुक्लतरांमध्यें एक ज्यास्त शुक्लतर आहे अशा अर्थाची विवक्षा असतांना शुक्लतर या तरप्-प्रत्ययान्ताहून पुन्हा दुसरा तरप् प्रत्यय प्राप्त होतो. आणि ज्यास्त शुक्लतर या अर्थींही शुक्ल शब्दाहूनच तरप् प्रत्यय इष्ट आहे.

( वा. २ ) शुक्लतराला शुक्लपणा असल्यामुळें शुक्ल या प्रकृतीहून तेथें प्रत्यय होतो असें समजतें. जेथे शुक्लतर शब्द लागतो तेथें शुक्लशब्दही लागतो तेव्हां तेथें शुक्ल शब्दाहून प्रत्यय होईल.

शुक्लतर शब्द ज्याला लागतो त्याला शुक्ल शब्द लागतो किंवा नाहीं याविषयीं आमचा वादच नाहीं. तर, शुक्लतर शब्द त्याला लागतो ना ? तेव्हां त्या शुक्लतर शब्दाहून तरप् प्रत्यय प्राप्त होतो एवढेंच आमचें म्हणणें आहे.

(वा. ३) शिवाय, त्या आतिशायिक-प्रत्ययान्ताहून स्वार्थीं आतिशायिक प्रत्यय झालेला वेदामध्यें दृष्टीस पडतो. उदा०-देवो वः सविता प्रार्पयतु श्रेष्ठतमाय कर्मणे ( तै. सं. १।१।१ )

तर मग आतां येथे पूर्वी दाखविलेल्या तीन तऱ्हेच्या वस्त्रांपैकीं मध्यम असा जो शुक्ल त्याहून पूर्वींच्या व पुढच्या या दोघांच्या अपेक्षेनें प्रत्यय होईल, असा तुमचा भाव

---

१९—येथें प्रशस्य शब्दाहून इष्ठन् प्रत्यय व पुन्हा तदन्ताहून तमप् प्रत्यय केला आहे तेव्हां शुक्लतर शब्दाहून पुन्हां तरप् प्रत्यय होण्यास हरकत दिसत नाहीं असा शंकाकाराचा अभिप्राय आहे.

२०—शुक्लतर याहून अतिशय या अर्थीं प्रत्यय कां होत नाहीं असा प्रश्न जो विचारतो त्याला दोघांची अपेक्षा आहेच. कारण, शुक्लतर असे म्हणावयाला पूर्वींच्याची अपेक्षा आहे, आणि त्याहून पुढें पुढच्याच्या

पेक्षादुत्पत्तिर्वक्तव्या । मध्यमश्च शुक्लशब्दः पूर्वमपेक्ष्य प्रकृष्टः परमपेक्ष्य न्यूनो न च न्यूनः प्रवर्तते ॥ अथवोत्पद्यतां लुग्भविष्यति ॥ वाचकेन खल्वप्युत्पत्तव्यं न च शुक्लतरशब्दादुत्पद्यमानो वाचकः स्यात् ॥ न खल्वपि बहूनां प्रकर्षे तरपा भवितव्यम् । केन तर्हि । तमपा ॥

पूर्वेण स्पर्धमानोऽयं मध्यमो लभते सितः।
परस्मिन्न्यूनतामेति न च न्यूनः प्रवर्तते ॥
अपेक्ष्य मध्यमः पूर्वमाधिक्यं लभते सितः ।
परस्मिन्न्यूनतामेति यथामात्यः स्थिते नृपे॥
अस्तु वापि तरस्तस्मान्नापशब्दो भविष्यति।
वाचकश्चेत्प्रयोक्तव्यो वाचकश्चेत्प्रयुज्यताम्

[तिङश्च ॥ ५ । ३ । ५६ ॥]

द्विवचनविभज्योपपदे तरबीयसुनौ ॥ ५ । ३ । ५७ ॥

---

दिसतो. कारण मध्यम शुक्ल हा पूर्वीच्या मानानें प्रकृष्ट आहे आणि पुढच्या मानानें अपकृष्ट आहे.

पण जो ज्या ठिकाणीं अपकृष्ट आहे त्या ठिकाणीं तो प्रकृष्ट या नात्यानें प्रवृत्त होत नाहीं[२१]. अथवा, पुढे दुसरा तरप् प्रत्यय होऊं दे; पहिला लुप्त होईल[२२]. शिवाय ज्या ठिकाणीं प्रत्ययापासून प्रकर्ष या अर्थाचा बोध होण्याजोगा असेल तेथेंच तो प्रत्यय उत्पन्न होतो. आणि येथें तर शुक्लतरापेक्षां जो प्रकर्ष त्याचा बोध शुक्लतर शब्दाच्या पुढे जरी तरप् प्रत्यय केला तरी त्यापासून होत नाहीं. शिवाय, दोन्ही प्रकर्षांची येथें विवक्षा असेल तर हा प्रकर्ष बहुतामध्यें होतो. आणि तसा प्रकर्ष दाखविणारा तर तरप् प्रत्यय मुळींच नाहीं.

मग कोणता प्रत्यय तसा प्रकर्ष दाखवितो? तमप् प्रत्यय हा तसा प्रकर्ष दाखवितो[२३].

(श्लो.१) जो मध्यम पांढरा पूर्वीच्याशीं स्पर्धा करणारा पण पुढच्याशीं तुलना केली असतां अपकृष्ट ठरणारा असा होतो तेथें तो अपकृष्ट झाल्यामुळें पूर्वीच्यापेक्षां आपला प्रकर्ष दाखविण्यास प्रवृत्त होत नाहीं.

(श्लो. २) मध्यम पांढरा पूर्वीच्यापेक्षां अधिक असतो खरा; पण पुढच्याच्या मानानें तेथें तो कमीच समजला जातो. उदा – प्रधान हा एरव्हीं मोठा खरा, पण राजाजवळ असतांना त्या ठिकाणीं राजालाच मुख्य समजतात.

(श्लो. ३) अथवा शुक्लतर याहून तरप् प्रत्यय होईना कां, तेवढ्याने कांहीं तो अपशब्द होणार नाहीं; पण वाचक असेल तर त्याचा प्रयोग करावा असा नियमच जर आहे तर तेथें दुसरा तरप् प्रत्यय करून त्यापासून लोकांना बोध होत असेल तर त्याचा प्रयोग खुशाल करावा[२४].

---

अपेक्षेनेंच तरप् प्रत्ययाचे आपादन करता येणार आहे.

२१—तात्पर्य, येथें जर मधल्यापेक्षां तिसऱ्याचा प्रकर्ष दाखवावयाचा आहे तर येथें तो मधला जरी पूर्वीपेक्षां प्रकृष्ट आहे तरी त्या मधल्याला शुक्लतर हा प्रकर्षवाचक शब्द देतां येणार नाहीं.

२२—लुप्त होईल म्हणजे उत्पन्नच होणार नाही कारण दुसऱ्याच्या प्रकर्षाची विवक्षा आहे तेथें पहिला प्रकर्ष विवक्षित नसतो.

२३—तेव्हां तेथें सर्वांत ज्यास्त प्रकर्ष दाखविणारा तमप् प्रत्यय होऊन शुक्लतमः असें रूप होतें.

२४—तात्पर्य, तरप्–प्रत्ययान्ताहून पुन्हां तरप् प्रत्यय करून सिद्ध झालेल्या शब्दाच्या प्रयोगापासून लोकांना विवक्षित अर्थाचा बोध होत नाहीं म्हणून तसा तरप् प्रत्यय होत नाही.

१—(सू. ५६) कोणत्याही क्रियेचा प्रकर्ष विवक्षित असेल तर त्या क्रियावाचक क्रियापदाहून स्वार्थीं तमप् प्रत्यय होतो. उदा० अयमेषामतिशयेन पचति इति पचतितमाम्, येथें तमप् प्रत्ययाच्या पुढें आम् (५।४।११) प्रत्यय झाला आहे.

१—(सू. ५७) द्व्यर्थप्रतिपादक शब्द उपपद असतांना किंवा ज्यापासून विभाग दाखवावयाचा असेल तद्वाचक शब्द उपपद असताना आणि प्रकर्षविवक्षा असतांना प्रातिपदिकाहून व क्रियापदाहून तरप्

द्विवचन इत्युच्यते तत्रेदं न सिध्यति। दन्तोष्ठस्य दन्ताः स्निग्धतराः । पाणिपादस्य पादौ सुकुमारतरौ । अस्माकं च देवदत्तस्य च देवदत्तोऽभिरूपतर इति ।। यदि पुनर्द्व्यर्थोपपद इत्युच्येत । तत्रायमप्यर्थो विभज्योपपदग्रहणं न कर्तव्यं भवति । इहापि सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतरा इति द्व्यर्थोपपद इत्येव सिद्धम् ।। नैवंजातीयिका द्व्यर्थता शक्या विज्ञातुम् । इहापि प्रसज्येत । सांकाश्यकानां पाटलिपुत्रकाणां च पाटलिपुत्रका अभिरूपतमा इति । अवश्यं खल्वपि विभज्योपपदग्रहणं कर्तव्य यो हि बहूनां विभागस्तदर्थम् । सांकाश्यकेभ्यश्च पाटलिपुत्रकेभ्यश्च माथुरा अभिरूपतरा इति ।। तत्तर्हि द्व्यर्थोपपद इति वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नेदं पारिभाषिकस्य द्विवचनस्य ग्रहणम् । किं तर्हि । अन्वर्थग्रहणम् । उच्यते वचनम् द्वयोरर्थयोर्वचनं द्विवचनमिति ।। एवमपि

---

( सू. ५७ ) येथें द्विवचन असें म्हटलें आहे. तेव्हां 'दन्तोष्ठस्य दन्ताः स्निग्धतराः' तसेंच 'पाणिपादस्य पादौ सुकुमारतरौ' येथे द्विवचनान्त उपपद नसल्यामुळे हीं उदाहरणे साधणार नाहींत. तसेंच 'अस्माकं च देवदत्तस्य च देवदत्तः अभिरूपतरः' हेंही उदाहरण साधणार नाहीं.

आतां जर 'द्व्यर्थ म्हणजे दोन पदार्थांचा दर्शक शब्द उपपद असताना' असे येथें म्हटलें तर हें सिद्ध होईल, एवढेंच नव्हे तर दुसरी एक गोष्ट अशी होते कीं 'विभज्य उपपद असतांना' असें जे सूत्रामध्यें निराळें निमित्त धरलें आहे ते धरावयास नको. सांकाश्यकेभ्यः पाटलिपुत्रका अभिरूपतराः हें त्याचें उदाहरण 'द्व्यर्थ उपपद असतांना' या म्हणण्यानेंच सिद्ध होतें. कारण, सांकाश्य नगरांतील लोकांचा समुदाय एक आणि पाटलिपुत्र नगरांतील लोकांचा समुदाय दुसरा असे दोन अर्थ जवळच्या पदापासून येथें मनांत येत आहेत.

असे दोन अर्थ घेणें बरोबर नाहीं. कारण, तसे घेतले तर 'सांकाश्यकानां पाटलिपुत्रकाणां च पाटलिपुत्रका अभिरूपतमाः' येथेंही तमप् प्रत्ययाचा बाध करून तरप् प्रत्यय होऊं लागेल.

शिवाय, जेथें बहुतामध्यें विभाग दाखविला जातो तेथें हे प्रत्यय होण्याकरितां 'विभज्य उपपद असतांना' हे निराळें निमित्त धरलेंच पाहिजे. उदा० सांकाश्यकेभ्यश्च पाटलिपुत्रकेभ्यश्च माथुरा अभिरूपतराः.

तर मग आतां दन्तोष्ठस्य दन्ताः स्निग्धतराः इत्यादि उदाहरणें साधण्याकरितां द्विवचन शब्द काढून त्याच्या ऐवजी 'द्व्यर्थ शब्द उपपद असतांना' असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण, येथें द्विवचन हा शब्द संज्ञा म्हणून (१।४।१०२) उच्चारला आहे असे समजूं नये. तर तो येथें अन्वर्थ शब्द आहे. उच्यते इति वचनम्. द्वयोः वचनम्

---

आणि ईयसुन् हे प्रत्यय होतात; तमप् व इष्ठन् होत नाहींत. उदा०—अयमनयोरतिशयेन आढ्यतरः; अयमनयोरतिशयेन पचतितराम्; अयमनयोः पटीयान्; माथुराः पाटलिपुत्रकेभ्य आढ्यतराः.

२—दात व ओंठ यामध्ये दांत हे अतिशय स्निग्ध आहेत. पाणिपाद म्हणजे हातपाय यामध्यें पाय हे अतिशय सुकुमार आहेत. येथें दात व ओठ हे पदार्थ दोन आहेत व हात व पाय हेही पदार्थ दोन आहेत तरी एकवद्भाव ( २।४।२ ) झाल्यामुळें द्विवचन झाले नाहीं. तसेंच आमच्या व देवदत्ताच्या मध्यें देवदत्त हा चांगलाच देखणा आहे. येथे अस्माकम् हे बहुवचन एक व्यक्ति असतानाच 'अस्मदो द्वयोश्च' ( १।२।५९ ) या सूत्राने झाले आहे, आणि देवदत्तस्य हें एकवचन आहे; द्विवचनान्त उपपद नाहीं.

३—असाच अन्वर्थ शब्द 'युवावौ द्विवचने' (७।२।९२) येथें घेतला आहे.

**तरबीयसुनोरेकद्रव्यस्योत्कर्षापकर्षयोरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

तरबीयसुनोरेकद्रव्यस्योत्कर्षापकर्षयोरुपसंख्यानं कर्तव्यम् । परुद्भवान् पटुरासीत् पटुतरश्चैषम इति ॥

**सिद्धं तु गुणप्रधानत्वत् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । गुणप्रधानत्वात् । गुणप्रधानोऽयं निर्देशः क्रियते गुणान्तरयोगाच्चान्यत्वं भवति । तद्यथा । तमेव गुणान्तरयुक्तं वक्तारो भवन्त्यन्यो भवान्संवृत्त इति ॥

**अजादी गुणवचनादेव ॥५।३।५८॥**

एवकारः किमर्थः । नियमार्थः नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धे विधिरारभ्यमाणोऽन्तरेणैवकारं नियमार्थो भविष्यति ॥ इष्टतोऽवधारणार्थस्तर्हि । यथैवं विज्ञायेत अजादी गुणवचनादेवेति । मैवं विज्ञायि । अजादी एव गुणवचनादिति । किं च स्यात् । न व्यञ्जनादी गुणवचनात्स्याताम् ॥

---

द्विवचनम्. तरी पण—

(वा. १) एकाच पदार्थाचे उत्कर्ष व अपकर्ष असतील तेथें उत्कर्ष दाखविणारे हे प्रत्यय होतात असें उपसख्यान करावे. उदा॰—'परुत् भवान् पटुः आसीत् पटुतरश्च ऐषमः' म्हणजे गेल्या वर्षी तूं कुशल होतासच, पण यंदां ज्यास्त कुशल झाला आहेस.

(वा. २) हे सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं, 'परुत् भवान् पटुरासीत् पटुतरश्चैषमः' या उदाहरणांतील पटु शब्दामध्ये पटुत्व म्हणजे कौशल्य या गुणाला मुख्यत्व आहे; तेव्हा तो गुण गतवर्षीचा आणि यंदाचा निराळा असल्यामुळे त्याच्या संबंधानें त्याच्या आश्रयामध्यें भेदाची कल्पना करतां येईल. वहिवाटही लोकांमध्यें अशी आहे कीं एखाद्या मनुष्यामध्यें कांहीं निराळा गुण दृष्टीस पडला कीं 'तूं आतां निराळा झालास' असें त्याला लोक बोलतात.

(सू ५८) ह्या सूत्रामध्यें एव शब्द कशाकरितां घातला आहे ?

हे सूत्र नियमार्थ आहे हें समजण्याकरितां घातला आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, जी गोष्ट सिद्ध आहे तीच गोष्ट पुनः सांगितली असली तर तो विधि आपोआपच नियमार्थ होतो; तें समजण्याला एव शब्दाची जरूर लागत नाहीं.

हें सूत्र नियमार्थ आहे हें समजेल, परंतु तो नियम इष्ट असेल तसाच झाला पाहिजे याकरितां एव शब्द घातला आहे म्हणजे इष्ठन् आणि ईयसुन् हे अजादि प्रत्यय गुणवाचक शब्दाहूनच होतात असाच नियम येथें झाला पाहिजे, 'गुणवाचक शब्दाहून हे अजादि प्रत्ययच होतात' असा नियम न झाला पाहिजे.

तसा नियम झाला तर कोठें बरें दोष येईल ?

व्यंजन म्ह. तकार आरंभीं असलेले तरप् व तमप् हे प्रत्यय गुणवाचक शब्दाहून होणार नाहींत.

---

१—(सू. ५८) पूर्वीच्या सूत्रांनी सांगितलेले जे प्रकर्षद्योतक अजादि प्रत्यय म्हणजे इष्ठन् आणि ईयसुन् हे सर्व प्रकारच्या शब्दाहून न करता फक्त गुणवाचक शब्दांहूनच करावे. तेव्हां आढ्य वगैरे शब्दांहून ते होत नाहीत.

२—तसा नियम झाला तर पटुतरः व पटुतमः येथें गुणवाचक पटु शब्दाहून तरप् व तमप् हे प्रत्यय होणार नाहीत.

**[ तुश्छन्दसि ॥ ५ । ३ । ५९ ॥ ]**

**प्रशस्यस्य श्रः ॥ ५ । ३ । ६० ॥**

इदमयुक्तं वर्तते। किमत्रायुक्तम्। अजादी गुणवचनादेव [५८] इत्युक्त्वागुणवचनानामप्यजाद्योरादेशा उच्यन्ते। नैष दोषः। एतदेव ज्ञापयति भवत एतेभ्योऽगुणवचनेभ्योऽप्यजादी इति यदयमजाद्योः परत आदेशाञ्शास्ति। एवमपि तयोरिति वक्तव्यं स्यात्। तयोः परत इति॥ यदि पुनरयं विधिर्विज्ञायेत। नैवं शक्यम्। व्यञ्जनादी हि न स्यातामुपाधीनां च संकरः स्यात्पुनर्विधानादजाद्योः। ननु

---

( सू. ६० ) हें येथें सूत्रकारांचें करणें अयोग्य दिसतें.

येथें अयोग्य असें काय बरें आहे ?

अयोग्य हें कीं अजादि प्रत्यय हे गुणवाचक शब्दाहूनच होतात असे सांगून येथें गुणवाचक नव्हे अशा प्रशस्य शब्दाला ते अजादि प्रत्यय पुढें असताना श्र हा आदेश सांगितला आहे.

हा दोष येत नाहीं. कारण, प्रशस्य वगैरे शब्दांना अजादि प्रत्यय पुढें असतांना जे येथें आचार्यांनीं आदेश सागितले आहेत त्या आचार्यांच्या कृतीवरूनच असें सिद्ध होतें कीं हे प्रशस्य वगैरे शब्द गुणवाचक नाहींत, तरी पण त्याहून इष्ठन् व ईयसुन् हे अजादि प्रत्यय होतात.

तरी पण, ह्या सूत्रामध्यें 'तयोः' असें पद घातलें पाहिजे म्हणजे ते अजादि प्रत्यय इष्ठन् व ईयसुन् पुढें असतांना श्र आदेश होतो असा अर्थ होईल. आतां, जर हें सूत्र प्रत्ययविधायकही मानलें तर ज्ञापक मानावयास नको. पण तसे करणें शक्य नाहीं. कारण व्यजनादि जे तरप् व तमप् प्रत्यय ते प्रशस्य शब्दाहून होणार नाहीत.[3] शिवाय, 'द्विवचनविभज्योपपद' ह्या निमित्ताचा संकर होईल. कारण येथें प्रशस्य शब्दाहून त्या अजादि ,प्रत्ययांचें निराळें विधान केलें जात आहे.

पण येथें निराळें विधान केलें तरी 'अतिशायने इष्ठन्' ह्या परस्परसंबद्ध अशा पदांची व तशीच 'द्विवचनविभज्योपपदे ईयसुन्' ह्या परस्परसंबद्ध अशा पदांची अनुवृत्ति येथें आणतां येईल.

---

१—( सू. ५९ ) धातूहून तृन् ( ३।२।१३५ ) व तृच् ( ३।१।१३३ ) प्रत्यय सागितले आहेत. ते तृन्-प्रत्ययान्त व तृच्–प्रत्ययान्त शब्द क्रियाशब्द होतात, गुणवाचक शब्द होत नाहीत. तरी त्याहून इष्ठन् व ईयसुन् हे अजादि प्रत्यय वेदामध्यें होतात. उदा०—अतिशयेन कर्ता करिष्ठ. इयमनयोरतिशयेन दोग्ध्री दोहीयसी धेनु. येथें दोग्ध्री शब्दाला पुवद्भाव ( ६।३।३५ वा. ११ ) झाला आहे व तृ प्रत्ययाचा लोप (६।४।१५४) झाला आहे.

१—( सू. ६० ) इष्ठन् व ईयसुन् हे प्रत्यय पुढे असतांना प्रशस्य शब्दाला श्र आदेश होतो. उदा०—श्रेष्ठः; श्रेयान्.

२—प्रशस्य शब्दाला 'अजादी गुणवचनादेव' हा नियम लागू नाही एवढेंच ह्या ज्ञापकाने ठरविले आहे इष्ठन् व ईयसुन् हे प्रत्यय त्या त्या सूत्रांनींच करावयाचे आहेत. पुढें दाखविलेला निमित्तांचा संकर होत नाहीं.

३—प्रशस्य शब्दाहून इष्ठन् व ईयसुन् हे अजादि प्रत्यय होतात; आणि त्यांच्याबरोबरच प्रशस्य शब्दाला श्र आदेश होतो असा अर्थ होईल आणि ह्या सूत्रानें सांगितलेले हे अजादि प्रत्यय पूर्वसूत्रांनी प्राप्त झालेल्या तरप् व तमप् या प्रत्ययांचा बाध करतील.

४—' प्रशस्यस्य श्र ' ह्या सूत्रामध्यें ' द्विवचनविभज्योपपदे ' ह्या पदाची अनुवृत्ति केली तर तें निमित्त येथें इष्ठन् प्रत्ययालाही लागू होईल आणि अनुवृत्ति केली नाही तर तें निमित्त नसतांनाही ईयसुन् प्रत्यय होईल हा संकर होय.

५—आणि येथेंही तो संबंध कायम ठेवतां येईल.

चैते विशेषा अनुवर्तेरन्। यद्यप्येतेऽनुवर्तेरन्व्यञ्जनादी तर्हि न स्याताम्। एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत एतेभ्योऽगुणवचनेभ्योऽप्यजादी इति यदयमजाद्योरादेशं शास्ति। ननु चोक्तं तयोरिति वक्तव्यमिति। न वक्तव्यम्। प्रकृतमजादिग्रहणमनुवर्तते। क्व प्रकृतम्। अजादी गुणवचनादेवेति। तद्वै प्रथमानिर्दिष्टं सप्तमीनिर्दिष्टेन चेहार्थः। अर्थाद्विभक्तिविपरिणामो भविष्यति। तद्यथा। उच्चानि देवदत्तस्य गृहाणि। आमन्त्रयस्वैनम्। देवदत्तमिति गम्यते। देवदत्तस्य गावोऽश्वा हिरण्यम्। आढ्यो वैधवेयः। देवदत्त इति गम्यते। पुरस्तात्षष्ठीनिर्दिष्टं सदर्थात्प्रथमानिर्दिष्टं द्वितियानिर्दिष्टं च भवति। एवमिहापि पुरस्तात्प्रथमानिर्दिष्टं सदर्थात्सप्तमीनिर्दिष्टं भविष्यति॥

**[ज्य च॥ ५। ३। ६१॥**

**वृद्धस्य च॥ ५। ३ ६२॥**

**अन्तिकबाढयोर्नेदसाधौ ॥ ५। ३। ६३॥**

---

जरी अनुवृत्ति आणली तरी त्या अजादि प्रत्ययांनीं तरप् व तमप् या प्रत्ययांचा बाध होत असल्यामुळें प्रशस्य शब्दाहून तरप् व तमप् प्रत्यय होणार नाहींत हा दोष येणारच.

तर मग येथें प्रत्ययाचें विधान करूंच नये. तर पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ज्ञापकच घ्यावें. तें असें कीं—अजादि प्रत्यय पुढें असतांना येथें आचार्यांनीं प्रशस्य वगैरे शब्दांना आदेश सांगितले आहेत या आचार्यांच्या कृतीवरून असें ज्ञापित होतें कीं हे प्रशस्य वगैरे शब्द गुणवाचक नाहींत तरी त्यांहून इष्ठन् व ईयसुन् हे अजादि प्रत्यय होतात.

पण तेथें तयोः असें म्हटलें पाहिजे असें सांगितले आहे ना ?

तसें म्हणावयास नको. कारण मागून अजादी या पदाची अनुवृत्ति करतां येईल.

मागें अजादि पद कोठें बरें आहे ?

अजादी गुणवचनादेव ( ५।३।५८ ) ह्या सूत्रामध्यें आहे.

आहे हें खरें, पण तेथें तें प्रथमा विभक्तीत उच्चारलें आहे. आणि येथे तर सप्तमी विभक्तीत असणें जरूर आहे.

अजादी असें प्रथमान्त पद येथें अनुवृत्तीनें आलें तरी तें अर्थाच्या धोरणानें विभक्ति विपरिणाम होऊन सप्तमीच्या अर्थानें येथे लावतां येईल. उदा०—देवदत्ताचीं घरें उंच उंच आहेत असें सांगून पुढें ' त्याला हाक मार ' असें म्हटलें असता ' त्या देवदत्ताला ' असा अर्थ साहजिकच मनांत येतो. तसेंच बैल घोडे सोनें हें सर्व देवदत्ताचें आहे असें सांगून पुढें ' रांडलेक गबर आहे ' असें म्हटलें असता तो देवदत्त गबर आहे असाच अर्थ मनांत येतो. म्हणजे देवदत्त हा शब्द पूर्ववाक्यांत षष्ठी विभक्ति लावून उच्चारला असला तरी प्रथमा व द्वितीया विभक्ती लावून त्याचा संबंध मनांत येतो. त्याप्रमाणे येथेही पूर्व सूत्रामध्ये प्रथमा विभक्ति लावून उच्चारलेला असा अजादी हा शब्द येथें सप्तमी विभक्ति लावून घेतां येईल.

---

१—( सू. ६१ ) इष्ठन् व ईयसुन् हे प्रत्यय पुढें असतांना प्रशस्य शब्दाला ज्य असाही आदेश होतो उदा०—ज्येष्ठः, ज्यायान्.

१—( सू. ६२ ) इष्ठन् व ईयसुन् हे प्रत्यय पुढे असतांना वृद्ध शब्दाला ज्य असा आदेश होतो उदा०—अतिशयेन वृद्धः ज्येष्ठः अयमनयोरतिशयेन वृद्धः इति ज्यायान्.

१—( सू. ६३ ) इष्ठन् व ईयसुन् हे प्रत्यय पुढें असतांना अन्तिक शब्दाला नेद असा आदेश होतो, आणि बाढ शब्दाला साध असा आदेश होतो. उदा०—नेदिष्ठः, नेदीयान्; साधिष्ठ , साधीयान्.

## युवाल्पयोः कनन्यतरस्याम् ॥ ५ । ३ । ६४ ॥

## विन्मतोर्लुक् ॥ ५ । ३ । ६५ ॥]

## प्रशंसायां रूपप् ॥ ५ । ३ । ६६

स्त्रीलिङ्गेनायं निर्देशः क्रियत एकवचनान्तेन च तेन स्त्रीलिङ्गादेवोत्पत्तिः स्यादेकवचनान्ताच्च पुंनपुंसकलिङ्गाद् द्विवचनबहुवचनान्ताच्च न स्यात्। नैष दोषः। नायं प्रत्ययार्थः। किं तर्हि। प्रकृत्यर्थविशेषणमेतत्। प्रशंसायां यत्प्रातिपदिकं वर्तते तस्माद् रूपब्भवति। कस्मिन्नर्थे। स्वार्थ इति। स्वार्थिकाश्च प्रकृतितो लिङ्गवचनान्यनुवर्तन्ते ॥

## प्रकृतेर्लिङ्गवचनाभावात्तिङ्प्रकृतेरम्भाववचनम् ॥ १ ॥

प्रकृतेर्लिङ्गवचनाभावात्तिङ्प्रकृते रूपपोऽम्भावो वक्तव्यः। पचतिरूपम् पचतोरूपम् पचन्तिरूपमिति ॥

## सिद्धं तु क्रियाप्रधानत्वात् ॥ २ ॥

सिद्धमेतत्। कथम्। क्रियाप्रधान-

---

( सू. ६६ ) येथें प्रशंसायाम् हा जो प्रत्ययार्थाचा निर्देश आहे तो स्त्रीलिंगी आणि एकवचनानें केलेला आहे तेव्हां हा प्रशंसा या स्वार्थी होणारा प्रत्यय तशाच प्रकृतीहून म्हणजे स्त्रीलिंगी एकवचनान्त प्रकृतीहूनच होईल. पुल्लिंगी आणि नपुसकलिंगी शब्दांहून तसेच द्विवचनान्त आणि बहुवचनान्त शब्दांहून होणार नाहीं.[2]

हा दोष येत नाहीं. कारण, प्रशंसायाम् हा प्रत्ययाचा निर्देशच नव्हे. तर प्रकृत्यर्थाचें हें विशेषण आहे. म्हणजे प्रशंसा या अर्थाचें दर्शक जें प्रातिपदिक त्याहून रूपप् होतो असा या सूत्राचा अर्थ समजावा. तो कोणत्या अर्थी होतो अशी जिज्ञासा असेल तर तो स्वार्थी होतो हेंच त्याचें उत्तर होय. आणि स्वार्थिक प्रत्यय तर मूळ शब्दाच्या लिंगवचनांना अनुसरतात असा न्यायच आहे.[3]

( वा. १ ) क्रियापदाहून हा रूपप् प्रत्यय होतो त्या ठिकाणीं क्रियापदाला लिंग तसेंच वचन नसल्यामुळें त्या रूपप्–प्रत्ययान्ताच्या पुढील विभक्तीला अम् आदेश होतो असें वचन करावें. उदा.–पचतिरूपम् पचतोरूपम् पचन्तिरूपम्.

( वा. २ ) हें सिद्ध होत आहे.

ते कसें ?

असे कीं क्रियाप्रधानत्वात् म्हणजे क्रिया-

---

१—( सू. ६४ ) इष्ठन् व ईयसुन् हे प्रत्यय पुढे असताना युवन् आणि अल्प या शब्दांना कन् असा आदेश विकल्पानें होतो. उदा०—कनिष्ठः, कनीयान्; यविष्ठः, यवीयान्, अल्पिष्ठ , अल्पीयान्.

१—( सू. ६५ ) विन्-प्रत्ययान्त आणि मतुप्–प्रत्ययान्त शब्दाहून इष्ठन् व ईयसुन् हे प्रत्यय केले असता त्या विन् व मतुप या प्रत्ययांचा लुक् होतो. उदा०—अतिशयेन स्रग्वी स्रजिष्ठः. अनयोरयं स्रजीयान्. अतिशयेन त्वग्वान् त्वचिष्ठः; अनयारयं त्वचीयान्

१—( सू. ६६ ) प्रशंसा विवक्षित असतांना प्रशस्तार्थवाचक शब्दाहून स्वार्थी रूपप् प्रत्यय होतो तसाच क्रियापदाहूनही रूपप् प्रत्यय होतो. उदा०—प्रशस्त. वैयाकरणः वैयाकरणरूपः; प्रशस्तं पचति इति पचतिरूपम्.

२—प्रशस्तता हा प्रत्ययार्थ आहे असे गृहीत धरून हा आक्षेप घेतला आहे. आता प्रशंसा याचा अर्थ प्रशस्तता असा न घेतां प्रशंसा याच अर्थी हा प्रत्यय सांगावयाचा असता तर तस्य भावः ( ५।१।११९ ) याप्रमाणें तस्य प्रशंसायाम् असे आचार्यांनी सूत्र केलें असते. शिवाय, हें स्वार्थी प्रत्ययांचे प्रकरण आहे. तेव्हां प्रशस्तता या अर्थी हा प्रत्यय सांगितला असावा असें दिसते.

३—तेव्हां वैयाकरणरूपः इत्यादि उदाहरणांमध्यें प्रत्ययान्त शब्द पुल्लिंगी चालण्याला हरकत नाहीं.

त्वात् । क्रियाप्रधानमाख्यातं भवत्येका च क्रिया । द्रव्यप्रधानं नाम । कथ पुनर्ज्ञायते क्रियाप्रधानमाख्यातं भवति द्रव्यप्रधानं नामेति । यत्क्रियां पृष्टस्तिङाचष्टे । किं देवदत्तः करोति पचतीति । द्रव्यं पृष्टः कृताचष्टे । कतरो देवदत्तः यः कारको हारक इति ॥ यदि तर्ह्येका क्रिया द्विवचनबहुवनानि न सिध्यन्ति । पचतः पचन्तीति । नैतानि क्रियापेक्षाणि । किं तर्हि । साधनापेक्षाणि । इहापि तर्हि प्राप्नुवन्ति । पचतिरूपम् पचतोरूपम् पचन्तिरूपमिति । तिङोक्तत्वात्तस्याभिसंबन्धस्य न भविष्यति । एकवचनमपि तर्हि न प्राप्नोति । समयाद् भविष्यति । द्विवचनबहुवचनान्यपि तर्हि समयात् प्राप्नुवन्ति एवं तर्ह्येकवचनमुत्सर्गः करिष्यते तस्य द्विबह्वोरर्थयोर्द्विवचनबहुवचने अपवादौ भविष्यतः । एवमपि नपुंसकत्वं वक्तव्यम्

पदामध्यें क्रियेला मुख्यत्व असतें, व क्रिया तर एकच असते. आणि प्रातिपदिकामध्यें द्रव्याला म्हणजे क्रियेच्या आश्रयाला मुख्यत्व असतें

आतां क्रियापदामध्ये क्रियेला मुख्यत्व असतें आणि प्रातिपदिकामध्यें क्रियाश्रयाला मुख्यत्व असतें हें कशावरून समजतें ?

अशावरून समजतें कीं—कि देवदत्तः करोति म्हणजे देवदत्त काय करतो असा क्रियेबद्दल प्रश्न केला असतां त्याचें उत्तर पचति म्हणजे स्वयंपाक करतो असें क्रियेनें मिळतें; आणि कतरः देवदत्तः म्हणजे देवदत्त कोणता असा द्रव्यासंबंधानें प्रश्न केला असतां त्याचें उत्तर यः कारकः अथवा हारकः म्हणजे कांहीं कृत्य करणारा जो तोच देवदत्त अथवा जो कांहीं पदार्थ नेणारा तो देवदत्त असें कारक अथवा हारक या कृत्-प्रत्ययान्त शब्दानें मिळतें.

पण जर क्रिया एकच धरावयाची असें असेल तर पचतः किंवा पचन्ति असें जें द्विवचन किंवा बहुवचन क्रियापदामध्ये दिसतें तें जुळणार नाहीं.

हे द्विवचन व बहुवचन प्रत्यय क्रियेला धरून झालेले नव्हेतच. तर क्रियेचा आश्रय आणि जीं कर्ता व कर्म हीं साधनें त्यांना धरून होत आहेत. कसे कां होईनात, त्या पचति पचतः पचन्ति यांहून रूपप् प्रत्यय केल्यानंतर त्या रूपप्-प्रत्ययान्त शब्दाच्या पुढें तिन्ह वचनें होऊं लागतील. उदा० पचतिरूपम् पचतोरूपम् पचन्तिरूपम्.

क्रियापदामधील प्रत्ययानेंच साधनांच संख्येशीं संबंध होत असल्यामुळें फिरून त्या अर्थी रूपप्—प्रत्ययान्ताहून पुढें प्रत्यय होणा नाहींत.

तर मग रूपप्—प्रत्ययान्ताहून एकवचन देखील होणार नाहीं.

प्रत्यय पुढें केलाच पाहिजे असा नियम ( ३।१।२ वा. ११ ) असल्यामुळें एकवचन होईल.

तर मग त्याच नियमावरून द्विवचन व बहुवचन हे प्रत्यय देखील प्राप्त होतात.

तर मग आतां एकवचन जे एकत्व अर्थ असताना सांगितलें आहे ( १।४।२२ ) तें तसें न सांगतां मोघमच सांगितलें जाईल, आणि द्वित्व अर्थ असतांना सांगितलेलें द्विवचन ( १।४।२२ ) व बहुत्व अर्थ असतांना सांगितलेले बहुवचन ( १।४।२१ ) हीं द्वित्व व बहुत्व असतांना त्या एकवचनाचा बाध करतील.

अशा रीतीने पचतिरूपम् पचतोरूपम् इत्यादि उदाहरणामध्यें एकवचन झालें तरी तेथें तो शब्द नपुंसकलिंगी समजावा असें सांगितलें पाहिजे.[४]

४—तसें सांगितले म्हणजे अतोऽम् (७।१।२४) यानें इष्टसिद्धि होईल, आणि येथें ( वा. १ ) अम् आदेश सांगावयास नको असें म्हणतां येईल.

न वक्तव्यम्। लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वालिङ्गस्य ॥

वृषलादिभ्य उपसंख्यानम् ॥ ३ ॥

वृषलादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम्। वृषलरूपः दस्युरूपः चोररूप इति ॥

सिद्धं तु प्रकृत्यर्थवैस्पष्ट्यवचनात् ॥ ४ ॥

सिद्धमेतत्। कथम्। प्रकृत्यर्थस्य वैस्पष्ट्य इति वक्तव्यम्। वृषलरूपोऽयम् अप्ययं पलाण्डुना सुरां पिबेत्। चोररूपोऽयम् अप्ययमक्ष्णोरञ्जनं हरेत्। दस्युरूपोऽयम् अप्ययं धावतो लोहितं पिबेत् ॥

[ईषदसमाप्तौ कल्पब्देश्यदेशीयरः ॥ ५ । ३ । ६७ ॥]

ईषदसमाप्तौ क्रियाप्रधानत्वाल्लिङ्गवचनानुपपत्तिः ॥ १ ॥

ईषदसमाप्तौ क्रियाप्रधानत्वाल्लिङ्गवचनयोरनुपपत्तिः। पटुकल्पः पटुकल्पौ पटुकल्पा इति। एकोऽयमर्थ ईषदसमाप्तिर्नाम तस्यैकत्वादेकवचनं प्राप्नोति ॥

प्रकृत्यर्थविशेषणत्वात्सिद्धम् ॥ २ ॥

सिद्धमेतत्। कथम्। नायं प्रत्ययार्थः।

---

तसें सांगावयास नको. कारण लिंग हें कोठेंच सांगावयास नको. तें लौकिक प्रयोगावरच अवलंबून समजणारें आहे.

(वा. ३) वृषल[5] वगैरे शब्दांहून रूपप् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०- वृषलरूपः, दस्युरूपः, चोररूपः.

(वा. ४) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें कीं–प्रकृत्यर्थस्य वैस्पष्ट्ये, म्हणजे प्रकृत्यर्थाची विशेष स्पष्टता विवक्षित असतांना रूपप् प्रत्यय होतो असें म्हणावें[6].उदा०-वृषलरूपः अयम्, म्हणजे हा अस्सल शूद्र आहे, कांदा खातो हें कांहींच नाहीं, त्याबरोबर हा दारू सुद्धा पीईल. चोररूपः अयम् म्हणजे हा अट्टल चोर आहे, डोळ्यांतील काजळ सुद्धां काढून घेईल. दस्युरूपः अयम्. म्हणजे हा उचल्या आपल्या कामांत मोठा तरबेज आहे, मनुष्य धावत असतांनाही त्याचें रक्तसुद्धां हिरावून घेईल.

(सू. ६७ वा. १) एखादी गोष्ट पूर्ण न होणें म्हणजे क्रिया पूर्ण न होणें, अशा रीतीनें मुख्यत्वानें क्रियाच प्रतीत होत असल्यामुळें कल्पप् वगैरे प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दांना लिंग व वचन हीं जुळत नाहींत. उदा०- पटुकल्पः[2] पटुकल्पौ पटुकल्पाः. कारण, पुरी न होतां थोडी उरलेली म्हणजे एखादी क्रियाच असणार ती एकच असल्यामुळें एकवचनच फक्त होईल.

(वा. २) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें कीं ईषदसमाप्ति हा कांहीं प्रत्ययार्थाचा निर्देश नव्हे; तर प्रकृत्यर्थाचें विशेषण

---

५—वृषल म्हणजे शूद्र हा त्रैवर्णिक नव्हे. तेव्हां या वृषल, दस्यु वगैरे शब्दांपासून निंदा गम्यमान होते, प्रशंसा होत नाहीं. म्हणून प्रकृत सूत्रानें रूपप् प्रत्यय येथें सिद्ध होत नाहीं.

६—प्रकृत्यर्थाची विशेष स्पष्टता झाली म्हणजे त्या कामांत त्याची ज्यास्त हुषारीच प्रतीत होते. तेव्हां त्या दृष्टीनें ती त्याची एक प्रकारची प्रशंसाच होते. तेव्हां सूत्रानेंच येथें रूपप् प्रत्यय होईल.

१—(सू. ६७) जी एखादी गोष्ट पूर्ण झाल्यासारखीच, पण थोडी कमी असल्यामुळें 'पूर्ण झाली' असें म्हणतां येत नाहीं तद्वाचक शब्दाहून कल्पप्, देश्य, आणि देशीयर् हे प्रत्यय होतात. उदा०— ईषदसमाप्तः पटुः इति पटुकल्पः, पटुदेश्यः, पटुदेशीयः. क्रियापदाहूनही हे प्रत्यय होतात. उदा०—ईषदसमाप्तं पचति पचतिकल्पम्.

२—चांगला पूर्ण पटु होण्याला जेवढें शिक्षण पाहिजे तितकें पुरें मिळालें नाहीं त्यामुळें त्याला पटुकल्प म्हणतात. शिक्षण ही क्रियाच येथें ईषदसमाप्त घ्यावयाची आहे. आणि क्रियेला तर लिंग व वचन कांहीच नसतें.

किं तर्हि । प्रकृत्यर्थविशेषणमेतत् । ईषदसमाप्तौ यत्प्रातिपदिकं वर्तते तस्मात् कल्पबादयो भवन्ति । कस्मिन्नर्थे । स्वार्थे इति । स्वार्थिकाश्च प्रकृतितो लिङ्गवचनान्यनुवर्तन्ते ॥

प्रकृत्यर्थे चेल्लिङ्गवचनानुपपत्तिः ॥ ३ ॥

प्रकृत्यर्थे चेल्लिङ्गवचनयोरनुपपत्तिः । गुडकल्पा द्राक्षा । तैलकल्पा प्रसन्ना । पयस्कल्पा यवागूरिति ॥

सिद्धं तु तत्संबन्ध उत्तरपदार्थे प्रत्ययवचनात् ॥ ४ ॥

सिद्धमेतत् । कथम् । तत्संबन्ध ईषदसमाप्तिसंबन्ध उत्तरपदार्थे प्रत्ययो भवतीति वक्तव्यम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमीषदसमाप्तौ क्रियाप्रधानत्वाल्लिङ्गवचनानुपपत्तिरिति । परिहृतमेतत्प्रकृत्यर्थविशेषणत्वात्सिद्धमिति । ननु चोक्तं प्रकृत्यर्थे चेल्लिङ्गवचनानुपपत्तिरिति । नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति स्वार्थिका अतिवर्तन्तेऽपि लि[ङ्ग]वचनानीति यदयं णचः

---

आहे. म्हणजे, ईषदसमाप्ति या अर्थाचें दर्शक जें प्रातिपदिक त्याहून हे कल्पप् वगैरे प्रत्यय होतात असा या सूत्राचा अर्थ आहे. ते कोणत्या अर्थी होतात अशी जिज्ञासा असेल तर ते स्वार्थीं होतात हेंच त्याचें उत्तर होय. आणि स्वार्थिक प्रत्यय तर मूळ शब्दाच्या लिंगवचनाला अनुसरतात असा न्यायच आहे.

( वा. ३ ) हे प्रत्यय स्वार्थीं होत असल्यामुळे त्या प्रत्ययान्त शब्दाना मूळ शब्दाचीच लिङ्गवचनें लागतात असें असेल तर कांहीं ठिकाणचीं लिंगवचनें जुळत नाहींत. उदा०-गुडकल्पा[३] द्राक्षा; तैलकल्पा प्रसन्ना, पयस्कल्पा यवागू:

( वा. ४ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं प्रकृत्यर्थाचा ईषदसमाप्ति असा संबंध ज्या दुसऱ्या पदार्थांशीं असेल त्या अर्थी हे प्रत्यय होतात असें सांगावें.

अशा रीतीनें सिद्ध होईल खरें, पण सूत्र फिरवावें लागतें ना ?

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण मूळचें सूत्र ठेवलें तर ईषदसमाप्तीही क्रियेचीच संभवते म्हणून त्या अर्थी केलेल्या प्रत्ययापासून मुख्यत्वानें क्रियेचाच बोध होत असल्यामुळें त्या ‘ प्रत्ययान्त ’ शब्दाला लिङ्ग व वचन हीं जुळत नाहींत असें सांगितलें आहे ना ?

ईषदसमाप्ति हें प्रकृत्यर्थाचें विशेषण आहे असा त्याचा परिहारही पण केलाच आहे.

पण ईषदसमाप्ति हा प्रकृतीचा अर्थ मानला व प्रत्यय स्वार्थी केला तरी गुडकल्पा द्राक्षा वगैरे कांहीं ठिकाणीं लिंगवचनें जुळत नाहींत असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाही. कारण आचार्य सूत्रकारांनीं ‘ णचः स्त्रियामञ् ’ ( ५।४।१४ ) या सूत्रामध्यें जें स्त्रियाम् असें म्हटलें आहे त्या आचार्यांच्या कृतीवरून असें ज्ञापित होतें कीं स्वार्थिक प्रत्यय हे मूळ शब्दाच्या लिंगवच-

---

३—द्राक्षा ही इतकी गोड आहे कीं जरा कमी पण हिला गूळ म्हणण्यास हरकत नाहीं. याप्रमाणेंच तैलकल्पा प्रसन्ना, व पयस्कल्पा यवागू या उदाहरणाचे अर्थ समजावे प्रसन्ना म्हणजे दारू; यवागू म्हणजे पेज.

४—गुडकल्पा द्राक्षा येथें गुडाचा द्राक्षेशीं ईषदसमाप्ति हा संबंध आहे. द्राक्षा ही किंचित् कमी पण निव्वळ गूळ आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं अशी विवक्षा आहे. तेव्हां द्राक्षा या अर्थीं प्रत्यय झाल्यामुळें गुडकल्पा हें स्त्रीलिंगी एकवचनीं रूप झालें आहे तें बरोबरच आहे.

स्त्रियामञ् [ ५. ४. १४ ] इति स्त्रीग्रहणं करोति । यद्येतज्ज्ञाप्यते बहुगुडो द्राक्षा बहुतैलं प्रसन्ना बहुपयो यवागूरित्यत्रापि प्राप्नोति । नाप्यतिवर्तन्ते ॥

किं पुनरिहोदाहरणम् । पटुकल्पः मृदुकल्प इति । नैतदस्ति । निर्ज्ञातस्यार्थस्य समाप्तिर्वा भवति विसमाप्तिर्वा गुणश्चानिर्ज्ञातः ॥ इदं तर्हि । गुडकल्पा द्राक्षा तैलकल्पा प्रसन्ना पयस्कल्पा यवागूरिति । द्रव्यमप्यनिर्ज्ञातम् ॥ इदं तर्हि । कृतकल्पम् भुक्तकल्पम् पीतकल्पमिति ।

**क्तान्तात्प्रत्ययविधानानुपपत्तिः**

**क्तस्य भूतकाललक्षणत्वात् कल्पादीनां चासमाप्तिवचनात् ॥ ५ ॥**

क्तान्तात्प्रत्ययविधेरनुपपत्तिः । किं कारणम् । क्तस्य भूतकाललक्षणत्वात् । भूतकाललक्षणः क्तः । कल्पादीनां चासमाप्तिवचनात् । विसमाप्तिवचनाश्च कल्पादयः । न चास्ति संभवो यद् भूतकालश्च स्यादसमाप्तिश्चेति ॥

**सिद्धं त्वाशंसायां भूतवद्वचनात् ॥ ६ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । आशंसायां भूतवच्च [ ३. ३. १३२ ] इत्येवमत्र क्तो

---

नांचें अतिक्रमणही करतात.

पण असें जर ज्ञापन केलें तर बहुगुडः द्राक्षा, बहुतैलं प्रसन्ना, बहुपयः यवागूः येथे बहुच् हा स्वार्थी प्रत्ययकेल्यानंतर मूळच्या गुड शब्दाच्या लिंगवचनांचा अतिक्रम होऊन बहुगुड वगैरे शब्दांना स्त्रीलिंग प्राप्त होईल.

स्वार्थिक प्रत्यय हे मूळ शब्दांच्या लिंगवचनांचा अतिक्रम करीत नाहींत असे देखील आहे.

आतां या प्रकृत सूत्राचें उदाहरण तरी कोणतें बरें ?

पटुकल्पः मृदुकल्पः इत्यादि उदाहरणे आहेत कीं.

हीं उदाहरणें संभवत नाहींत. कारण, ज्या पदार्थाचें पूर्णपणानें ज्ञान झालेले असतें तो पदार्थ पुरा तयार झाला आहे किंवा थोडा शिल्लक राहिला आहे हें सांगतां येईल. आणि पटुत्व मृदुत्व वगैरे गुण तर सहज समजणारे नव्हेत.

तर मग गुडकल्पा द्राक्षा, तैलकल्पा प्रसन्ना, पयस्कल्पा यवागूः हीं द्रव्याचीं उदाहरणें घ्या.

पण द्रव्य देखील कशांत कोणतें किती आहे हें सहज समजण्यासारखें नसते.

तर मग आता कृतकल्पम् भुक्तकल्पम् पीतकल्पम् हीं क्रियेचीं उदाहरणें घ्या.

(वा. ५) क्त–प्रत्ययान्त शब्दाहून हे कल्पप् वगैरे प्रत्यय करतां येणार नाहींत.

काय कारण ?

कारण असें कीं–क्तस्य भूतकाललक्षणत्वात् म्हणजे क्त प्रत्यय हा भूतकालची क्रिया असेल तरच होणार, आणि कल्पादीना चासमाप्तिवचनात् म्हणजे कल्पप् वगैरे प्रत्यय तर क्रिया पूर्ण सपली नसेल अशा स्थितीला दाखविणारे असे येथे होणार आहेत; आणि एखाद्या क्रियेचा भूतकाल, व त्या क्रियेची समाप्ति न होणें ह्या दोन गोष्टी एकदम संभवणाऱ्या नव्हेत.

( वा. ६ ) हें सिद्ध होत आहे.

ते कसे ?

तें असें कीं क्रिया समाप्त होण्यापूर्वी त्या क्रियेचा भूतकाल नसला तरी ‘ आशसायां भूतवच्च ’ (३।३।१३२) यानें तेथें क्त प्रत्यय

---

५—नाहीं तर णच् हा प्रत्यय (३।३।४३) स्त्रीलिंगीच सांगितला असल्यामुळें त्याच्या पुढें स्वार्थी अञ् प्रत्यय केला असतां स्त्रीलिंगच कायम राहील. तेव्हा ‘ णचः स्त्रियामञ् ’ या सूत्रामध्ये स्त्रियाम् हें व्यर्थ होईल.

भविष्यति ॥ इदं चाप्युदाहरणं पटुकल्पः मृदुकल्प इति। ननु चोक्तं निर्ज्ञातस्यार्थस्य समाप्तिर्वा भवति विसमाप्तिर्वा गुणश्चानिर्ज्ञात इति। लोकतो व्यवहारं दृष्ट्वा गुणस्य निर्ज्ञानम्। तद्यथा। पटुरयं ब्राह्मण इत्युच्यते यो लघुनोपायेनार्थान्साधयति। पटुकल्पोऽयमित्युच्यते यो न तथा साधयति ॥ इदं चाप्युदाहरणं गुडकल्पा द्राक्षा तैलकल्पा प्रसन्ना पयस्कल्पा यवागूरिति। ननु चोक्तं द्रव्यमप्यनिर्ज्ञातमिति। लोकतो द्रव्यमपि निर्ज्ञातम् ॥

होईल. शिवाय, पटुकल्पः मृदुकल्पः यासारखीं गुणाची उदाहरणें या सूत्राला देतां येतातच.

पण ज्या पदार्थाचें पूर्णपणाने ज्ञान झालेलें असतें तोच पदार्थ पूर्ण आहे किंवा अपुरा राहिला आहे असें समजतें. आणि पटुत्व मृदुत्व वगैरे गुण तर सहज समजणारे नव्हेत असें सांगितलें आहे ना ?

लोकांतील व्यवहार पाहून गुणांचेही पूर्णपणानें ज्ञान होण्यास हरकत नाहीं. असें पहा कीं जो थोडयाच प्रयत्नानें इष्ट गोष्ट साधतो त्याला लोक 'पटुरयं ब्राह्मणः' म्हणजे 'हा ब्राह्मण हुषार आहे' असें म्हणतात. आणि ज्याला तितकें साधत नाहीं त्याला 'पटुकल्पः अयम्' म्हणजे 'हा तितका हुषार दिसत नाहीं' असें म्हणतात. तसेंच 'गुडकल्पा द्राक्षा, तैलकल्पा प्रसन्ना, पयस्कल्पा यवागूः' हीं द्रव्याचीं उदाहरणेंही या सूत्राला देतां येतील.

पण त्यासंबंधानेंही 'कोणतें द्रव्य कशांत किती आहे हें सहज समजण्यासारखें नसतें' असें सांगितलें आहे ना ?

तें देखील लोकांतील व्यवहार पाहून समजण्यासारखें असतेंच.

( सू. ६८ ) येथें विभाषाग्रहण कशाकरितां केलें आहे ?

## विभाषा सुपो बहुच् पुरस्तात्तु ॥ ५ । ३ । ६८ ॥

विभाषाग्रहणं विमर्थम्। विभाषा बहुज्यथा स्याद्बहुचा मुक्ते वाक्यमपि यथा स्यात्। नैतदस्ति प्रयोजनम्। प्रकृता महाविभाषा तया वाक्यमपि भविष्यति॥ इदं तर्हि प्रयोजनं कल्पादयोऽपि यथा स्युरिति। एतदपि नास्ति प्रयोजनम्। बहुजप्युच्यते कल्पादयोऽपि तदुभयं वचनाद् भविष्यति। नैव शक्यम्। आक्रियमाणे हि विभाषाग्रहणे ऽनवकाशो

हा बहुच् प्रत्यय विकल्पानें झाला पाहिजे. म्हणजे एकदा बहुच् प्रत्यय होत नाहीं त्या वेळी 'ईषदसमाप्तः पटुः' अशा तऱ्हेचें वाक्यही झालें पाहिजे.

हा विभाषा ग्रहणाचा उपयोग बरोबर दिसत नाही. कारण महाविभाषा मागून ( ४।१।८२ ) चालू आहेच, तिनेंच इतर प्रत्ययांचे बाबतींत जसें होतें तसें येथेही एकदां वाक्य राहीलच.

तर मग येथील विभाषाग्रहणाचा उपयोग असा समजावा कीं ईषदसमाप्तीची विवक्षा असतांनाच एकदां पूर्व सूत्रानें सांगितलेले कल्पप् वगैरे प्रत्ययही झाले पाहिजेत.

हाही विभाषाग्रहणाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण ह्या सूत्राने बहुच् प्रत्ययही सांगितला आहे आणि पूर्व सूत्रानें कल्पप् वगैरे प्रत्ययही सांगितले आहेत. तेव्हां ज्या अर्थीं सांगितलेच आहेत त्या अर्थीं ते सर्वच प्रत्यय पाळीपाळीनें होतील.

असें होणें शक्य नाहीं. कारण, येथें विभाषाग्रहण केलें नाहीं तर अर्थातच नित्य म्हणून सांगितलेला हा बहुच् प्रत्यय अनवकाश

१—( सू. ६८ ) जी एखादी गोष्ट पूर्ण झाल्यासारखीच, पण थोडी कमी असल्यामुळें पूर्ण झाली असे म्हणतां येत नाहीं तद्वाचक सुबन्त शब्दाला त्या शब्दाच्या मागें बहुच् प्रत्यय विकल्पानें होतो. ईषदसमाप्तः पटुः इति बहुपटुः, पटुकल्पः.

बहुच्कल्पादीन् बाधेत । कल्पादयोऽप्यनवकाशास्ते वचनाद् भविष्यन्ति । सावकाशाः कल्पादयः । कोऽवकाशः । तिङन्तान्यवकाशः ॥

अथ सुब्ग्रहणं किमर्थम् । सुबन्तादुत्पत्तिर्यथा स्यात् प्रातिपदिकान्मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । नास्त्यत्र विशेषः सुबन्तादुत्पत्तौ सत्यां प्रातिपदिकाद्वा ॥ यद्येवमिहापि नार्थः सुब्ग्रहणेन सुप आत्मनः क्यच् [ ३. १. ८. ] इति । इहापि नास्ति विशेषः सुबन्तादुत्पत्तौ सत्यां प्रातिपदिकाद्वा । अयमस्ति विशेषः। सुबन्तादुत्पत्तौ सत्यां पदसंज्ञा सिद्धा भवति प्रातिपदिकादुत्पत्तौ सत्यां पदसंज्ञा न प्राप्नोति । ननु च प्रातिपदिकादप्युत्पत्तौ सत्यां पदसंज्ञा सिद्धा । कथम् । आरभ्यते नः क्ये [ १. ४. १५. ] इति । तच्चावश्यं वक्तव्यं सुबन्तादुत्पत्तौ सत्यां नियमार्थम् । तदेव प्रातिपदिकादुत्पत्तौ सत्यां विध्यर्थं भविष्यति ॥ इदं तर्हि

असल्यामुळें पूर्व सूत्रानें सांगितलेल्या कल्पप् वगैरे प्रत्ययांचा बाध करील.

पण कल्पप् वगैरे प्रत्यय देखील अनवकाश आहेतच. तेव्हां तेही एकदां वचनसामर्थ्यास्तव होतीलच.

असें होणार नाहीं. कारण कल्पप् वगैरे प्रत्ययांना अवकाश आहे.

तो कोठें बरें अवकाश आहे ?

पचतिकल्पम् इत्यादि क्रियापदस्थलीं त्या प्रत्ययांना अवकाश आहे.

आतां ह्या सूत्रामध्यें सुपः असें कशाकारितां म्हटलें आहे ?

पटुस् या सुप्-प्रत्ययान्ताच्या मागें हा बहुच् प्रत्यय झाला पाहिजे, पटु या प्रातिपदिकाच्या मागें होता कामां नये.

हा सुपः याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, येथें पटु+स् या सुबन्ताच्या मागें बहुच् प्रत्यय झाला काय आणि पटु या प्रातिपदिकाच्या मागें झाला काय यांत कांहीं फरकच नाहीं.

असें असेल तर मग 'सुप आत्मनः क्यच्' ( ३।१।८ ) या सूत्रामध्यें देखील सुपः असें म्हणावयास नको. कारण त्या सूत्राच्या पुत्रीयति वगैरे उदाहरणांमध्ये देखील पुत्र अम् या सुबन्ताच्या पुढें क्यच् प्रत्यय झाला काय आणि पुत्र या प्रातिपदिकाच्या पुढें झाला काय त्यात कांहीं फरकच नाहीं.

पण तेथें फरक आहे. सुप्-प्रत्ययान्ताहून क्यच् झाला तर त्या सुप् प्रत्ययान्ताला पदसंज्ञा ( १।१।१४) होते; आणि नुसत्या प्रातिपदिकाहून क्यच् झाला तर पदसंज्ञा प्राप्त होत नाहीं.

पण नुसत्या प्रातिपदिकाहून क्यच् प्रत्यय झाला तरी तेथें पदसंज्ञा सिद्ध होत आहे.

ती कशी ?

अशी की— क्यच् प्रत्यय पुढें असतांना पदसंज्ञेकरितां 'नः क्ये' ( १।४।१५ ) असें निराळे सूत्र केलेंच आहे. आणि तें सूत्र दोन्ही पक्षीं अवश्य पाहिजेच. सुबन्ताहून क्यच् प्रत्यय केला त्या पक्षीं राजन् वगैरे नकारान्त शब्दांनाच पदसंज्ञा होण्याकरितां नियमार्थ पाहिजे, आणि प्रातिपदिकाहून क्यच् प्रत्यय होतो या पक्षीं तेथेंच पदसंज्ञा होण्याकरितां विध्यर्थ पाहिजे [४].

तर मग आतां येथें सुपः असें म्हणण्याचा

२—कारण, ह्या प्रकृत सूत्रामध्ये सुपः असें म्हटलें असल्यामुळें क्रियापदाहून ह्या बहुच् प्रत्ययाची प्राप्ति येत नाही.

३—कारण, क्यच्—प्रत्ययान्ताला धातुसंज्ञा (३।१।३२) होत असल्यामुळें त्या अम् प्रत्ययाचा लुक् (२।४।७१) च होत आहे.

४—तात्पर्य इतकेंच कीं ' सुप आत्मनः क्यच् ' या सूत्रामध्यें सुपः याचा उपयोग असो अथवा नसो येथें सुपः याचा जो उपयोग दाखविला तो बरोबर नाहीं असें सिद्ध झालें.

क्रियते स्वरो न सिध्यति । बहुपटव एवं स्वरः प्रसज्येत बहुपटव इति चेष्यते । पठिष्यति ह्याचार्यश्चितः सप्रकृतेर्बह्वकजर्थमिति । स्वरः कथम् ।

**स्वरः प्रातिपदिकत्वात् ॥ २ ॥**

सुब्लुकि कृते प्रातिपदिकत्वात्स्वरो भविष्यति ॥

अथ तुग्रहणं किमर्थम् ।

**तुग्रहणं नित्यपूर्वार्थम् ॥ ३ ॥**

तुग्रहणं क्रियते नित्यं पूर्वो यथा स्याद्विभाषा मा भूदिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । न विभाषाग्रहणेन पूर्वमभिसंबध्यते । किं तर्हि बहुजभिसंबध्यते । विभाषा बहुज्भवतीति । यदा च भवति तदा नित्यं पूर्वो भवति ॥ इदं तर्हि प्रयोजनं प्रागुत्पत्तेर्यल्लिङ्गं वचनं च तदुत्पन्नेऽपि प्रत्यये यथा स्यात् । बहुगुडो द्राक्षा । बहुतैलं प्रसन्ना । बहुपयो यवागूरिति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । स्वार्थिकोऽयं स्वार्थिकाश्च प्रकृतितो लिङ्गवचनान्यनुवर्तन्ते ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्तुग्रहणं करोति

---

पटु+जस् या सुबन्ताहून मागें बहुच् प्रत्यय होत असल्यामुळें इष्ट स्वर सिद्ध होत नाहीं. बहुपटवः येथें अन्त उदात्त होऊं लागेल; आणि बहुपटवः येथें मध्य उदात्त इष्ट आहे. कारण, 'चितः सप्रकृतेर्बह्वकजर्थम्' ( ६।१।१६३ वा. १ ) असें वार्तिककार सांगणारच आहेत.

आतां येथें इष्ट असलेला मध्य उदात्त स्वर कसा बरें साधावा ?

(वा. २) पटु+जस् या सुबन्ताहून मागें बहुच् प्रत्यय केल्यानंतर जस् प्रत्ययाचा लुक् होतो. नंतर बहुपटु याला प्रातिपदिक-स्वर ( फिट् सू. १।१ ) म्हणजे अन्त उदात्त होईल.

आतां येथें तु शब्द कशाकरितां घातला आहे ?

( वा. ३ ) येथें तु शब्द घातला आहे तो अशाकरितां कीं बहुच् हा प्रत्यय पूर्वी नित्य झाला पाहिजे. ' पूर्वी विकल्पानें होतो ' म्हटल्यास एकदां परही होतो असा भलताच अर्थ न झाला पाहिजे.

तु शब्दाचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, पुरस्तात् म्हणजे 'पूर्वी होतो' याचेकडे विभाषा याचा संबंध करावयाचा नाहीं. तर बहुच् प्रत्यय हा विकल्पानें होतो असा बहुच् प्रत्ययाकडे त्या विभाषा पदाचा संबंध करावयाचा. अर्थात् जेव्हां तो बहुच् प्रत्यय होईल तेव्हां मात्र पूर्वीच होईल.

तर मग आतां ह्या तु शब्दाचा उपयोग असा समजावा कीं हा बहुच् प्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वी शब्दाचें जें लिंग व जें वचन तेंच प्रत्यय झाल्यानंतरही कायम राहिलें पाहिजे. उदा०—बहुगुडः द्राक्षा, बहुतैलं प्रसन्ना, बहुपयः यवागूः.

हाही तु शब्दाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण हा बहुच् प्रत्यय स्वार्थिक आहे. आणि स्वार्थिक प्रत्यय तर स्वभावतः मूळ शब्दाच्या लिंगवचनांनाच अनुसरतात.

तर मग असें असतांनाही आचार्यांनीं जो येथें तु शब्द घातला आहे त्यावरून त्यांनीं असें

---

६—चित् प्रत्यय आणि त्याची प्रकृति मिळून जो समुदाय त्याचा अन्त उदात्त होतो असा त्या वार्तिकाचा अर्थ आहे. तेव्हां पटु-जस् या सुबन्ताहून मागें बहुच् केला तर बहु-पटु-जस् या समुदायाच्या अन्ताला म्हणजे जस् प्रत्ययांतील अकाराला उदात्त होऊं लागेल. आणि पटु या प्रातिपदिकाहून मागें बहुच् केला म्हणजे बहुपटु या समुदायाच्या अन्ताला म्हणजे उकाराला उदात्त इष्ट आहे तो सिद्ध होतो. मागें (१।२।४५वा. ६;भाग १ पृष्ठ ३५०पं. ३) पहा.

७—पुरस्तात् या शब्दाची आवृत्ति करावी. पुरस्तात् म्हणजे पूर्वी. ' देशाच्या मानानें पूर्वी ' या अर्थानें शब्दाच्या मागें प्रत्यय होतो. आणि ' कालाचे मानानें पूर्वी ' या अर्थानें प्रत्यय करण्याचे पूर्वींचें लिंग व वचन प्रत्यय केल्यानंतरही लागू होतें.

तज्ज्ञापयत्याचार्यः स्वार्थिका अतिवर्तन्तेऽपि लिङ्गवचनानीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । गुडकल्पा द्राक्षा तैलकल्पा प्रसन्ना पयस्कल्पा यवागूरित्येतत्सिद्धं भवति ॥

**तमादिभ्यः कल्पादयो विप्रतिषेधेन ॥ ४ ॥**

तमादिभ्यः कल्पादयो भवन्ति विप्रतिषेधेन । तमादीनामवकाशः । प्रकर्षस्य वचनमीषदसमाप्तेरवचनम् । पटुतरः पटुतमः । कल्पादीनामवकाशः । ईषदसमाप्तेर्वचनं प्रकर्षस्यावचनम् । पटुकल्पः मृदुकल्पः । उभयवचने उभयं प्राप्नोति । पटुकल्पतरः मृदुकल्पतरः । कल्पादयो भवन्ति विप्रतिषेधेन ॥ यद्येवमीषदसमाप्तेः प्रकर्षे तमादिः प्रत्ययः प्राप्नोति प्रकृतेरेव च प्रकर्ष इष्यते ।

**तमादिरीषत्प्रधानात् ॥ ५ ॥**

तमादिरीषत्प्रधानाद्यदि भवन्तस्य प्रकर्षोऽस्ति तस्य प्रकर्षे भविष्यति । कस्य च प्रकर्षोऽस्ति । प्रकृतेरेव ॥

**[प्रकारवचने जातीयर् ॥५।३।६९॥**

**प्रागिवात्कः ॥ ५ । ३ । ७० ॥]**

**अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक् टेः ॥ ५ । ३ । ७१ ॥**

**कस्य च दः ॥ ५ । ३ । ७२ ॥**

---

सुचविले आहे कीं स्वार्थिक प्रत्यय हे काहीं ठिकाणीं मूळ शब्दाच्या लिंगवचनांचे अतिक्रमणही करतात.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

गुडकल्पा द्राक्षा, तैलकल्पा प्रसन्ना, पयस्कल्पा यवागूः हीं उदाहरणें सिद्ध होतात.

( वा. ४ ) ईषदसमाप्ति हा अर्थ असतांना सांगितलेले हे कल्पप् वगैरे प्रत्यय तमप् वगैरे आतिशायनिक प्रत्ययांपेक्षां विप्रतिषेधानें परत्वास्तव अगोदर होतात. ज्या ठिकाणीं प्रकर्षाची विवक्षा आहे आणि ईषदसमाप्ति या अर्थाची विवक्षा नाहीं त्या ठिकाणीं तमप् वगैरे प्रत्ययांना अवकाश आहे. उदा० पटुतरः, पटुतमः. आतां याच्या उलट ज्या ठिकाणीं ईषदसमाप्ति या अर्थाची विवक्षा आहे आणि प्रकर्षाची विवक्षा नाहीं त्या ठिकाणीं कल्पप् वगैरे प्रत्ययांना अवकाश आहे. उदा०-पटुकल्पः मृदुकल्पः; पण ज्या ठिकाणीं दोन्ही अर्थांची विवक्षा आहे त्या ठिकाणीं त्या दोन्ही प्रत्ययांची प्राप्ति येते तेथें कल्पप् वगैरे प्रत्यय विप्रतिषेधानें अगोदर होतात. उदा०—पटुकल्पतरः; मृदुकल्पतरः.

पण असें असेल तर ज्या ठिकाणीं ईषदसमाप्ति याचा प्रकर्ष विवक्षित असेल तेथें कल्पप् वगैरे प्रत्यय केल्यानंतर त्या प्रत्ययान्ताहून तमप् वगैरे प्रत्यय प्राप्त होतात. आणि प्रकृत्यर्थाचाच प्रकर्ष असताना हे तमप् वगैरे प्रत्यय इष्ट आहेत.

( वा. ५ ) असें पहा कीं-ईषदसमाप्ति या अर्थीं कल्पप् वगैरे प्रत्यय करून पुढें हे तमप् वगैरे प्रत्यय केले तरी ते कल्पप्-प्रत्ययान्त शब्दाच्या अर्थांपैकीं ज्याचा प्रकर्ष संभवेल त्याच अर्थाचे प्रकाशक होतील.

प्रकर्ष कोणाचा बरें संभवतो ?

प्रकृत्यर्थाचा संभवतो.

---

८--पटुकल्प याहून तरप् प्रत्यय होतो. तेथें पटुत्वाचाच प्रकर्ष प्रतीत होतो. कारण, असमाप्तीचा प्रकर्ष असेल तर तेथें त्या समाप्तीमध्ये ईषत्त्वपणाच असत नाहीं. म्हणून ईषदसमाप्तीचा प्रकर्ष असं म्हणतां येत नाहीं.

१—( सू. ६९ ) प्रातिपदिकाहून 'त्या प्रकारचा' या अर्थाची विवक्षा असताना स्वार्थीं जातीयर् प्रत्यय होतो. उदा०—पटुप्रकारः पटुजातीयः.

१—( सू. ७० ) हें अधिकार सूत्र आहे. 'इवे प्रतिकृतौ' ( ५ । ३ । ९६ ) या सूत्राच्या पूर्वीं निर्दिष्ट केलेले जे अज्ञात वगैरे पुढील अर्थ ते विवक्षित असताना अव्यय आणि सर्वनाम शब्दामध्ये टिसंज्ञक ( १ । १ । ६४ ) भागाच्या पूर्वी स्वार्थीं अकच् प्रत्यय होतो. क्रियापदामध्येंही हा अकच् प्रत्यय होतो. उदा०—उच्चकैः; सर्वके; पचतकि.

१—( सू. ७१ ) इव या अर्थाच्या

१—( सू. ७२ ) ककारान्त अव्ययाला पूर्व सूत्रानें अकच् प्रत्यय केल्यानतर त्या अव्ययाच्या शेवटीं असलेल्या ककाराला दकार आदेश होतो. धिक्, आणि हिरुक् यांना अकच् व हा दकार केल्यानंतर धकित्, व

किमयं सुबन्तस्य प्राक्टेर्भवत्याहोस्विङ्याप्प्रातिपदिकस्य । कुतः संदेहः । उभयं प्रकृतम् । अन्यतरच्छक्यं विशेषयितुम् । किं चातः । यदि सुबन्तस्य युष्मकाभिः अस्मकाभिः युष्मकासु अस्मकासु युवकयोः आवकयोरिति न सिध्यति । अथ प्रातिपदिकस्य त्वयका मयका त्वयकि मयकीत्यत्रापि प्राप्नोति । अस्तु सुबन्तस्य । कथं युष्मकाभिः अस्मकाभिः युष्मकासु अस्मकासु युवकयोः आवकयोरिति ।

अनोकारसकारभकारादाविति वक्तव्यम् ॥

अकच्प्रकरणे तूष्णीमः काम् ॥ १ ॥

अकच्प्रकरणे तूष्णीमः काम् वक्तव्यः ।

आसितव्यं किल तूष्णीका-
मेतत्पश्यत चिन्तितम् ॥

शीले को मलोपश्च ॥ २ ॥

शीले को मलोपश्च वक्तव्यः । तूष्णींशीलः तूष्णीकः ॥

इह भिनत्ति छिनत्तीति श्रमि कृते शप्प्राप्नोति । बहुकृतम् बहुभुक्तम् बहु-

---

( सू. ७२ ) येथें सांगितलेला अकच् प्रत्यय सुबन्ताच्या टि भागाच्या पूर्वी होतो किंवा ङ्यन्त आबन्त आणि प्रातिपदिक या शब्दांच्या टि भागाच्या पूर्वी होतो ?

हा संशय येथें कां बरें उत्पन्न होतो ?

संशय उत्पन्न होण्याचे कारण असें कीं मागून ङ्याप्प्रातिपदिकात् याचीही अनुवृत्ति येथें येईल; व सुपः याचीही अनुवृत्ति येथें येईल. तेव्हां त्या दोहोंपैकीं कोणाचाही टिसंज्ञक भाग येथें घेतां येईल.

मग या दोहोंमध्यें फरक काय ?

फरक असा कीं—जर सुबन्ताचा टि भाग घेतला तर युष्मकाभिः अस्मकाभिः युष्मकासु अस्मकासु युवकयोः आवकयोः हीं उदाहरणें सिद्ध होणारें नाहींत. आतां प्रातिपदिकाचा टि भाग घेतला तर त्वयका मयका त्वयकि मयकि येथेंही सुबन्ताच्याच टि भागाच्या पूर्वी अकच् होऊं लागेल.

तर मग आतां सुबन्ताच्याच टि भागाच्या पूर्वी अकच् होतो असाच अर्थ असूं दे

पण तसा अर्थ घेतला तर युष्मकाभिः अस्मकाभिः युष्मकासु अस्मकासु युवकयोः आवकयोः हीं उदाहरणें कशीं साधावीं ?

त्याकरितां 'अनोकारसकारभकारादौ' असें येथें म्हणावें. म्हणजे ओकारादि, सकारादि आणि भकारादि प्रत्यय नसेल तेथेंच सुबन्ताच्या टि भागाच्या पूर्वी अकच् प्रत्यय होईल.

(वा. १) ह्या अकच् प्रत्ययाच्या प्रकरणामध्ये तूष्णीम् या अव्ययाला अकच् प्रत्ययाच्या ऐवजीं काम् असा आगम होतो असें म्हणावें. उदा० आसितव्यं किल तूष्णीकाम्; स्वस्थ बसावें असा अर्थ आहे.

(वा. २) 'स्वस्थ बसण्याचा स्वभाव आहे ज्याचा' या अर्थी तूष्णीम् या अव्ययाहून क प्रत्यय होतो आणि तूष्णीम् यांतील मकाराचा लोप होतो. उदा० तूष्णींशीलः तूष्णीकः.

आतां भिनत्ति छिनत्ति वगैरे ठिकाणीं धातूमधील अचापुढें श्नम् प्रत्यय (३।१।७८) झाल्यानंतर धातूच्या पुढें शप् (३।१।६८) प्रत्यय प्राप्त होतो. तसेंच बहुकृतम् बहुभुक्तम् व

---

२—युष्माभिः या सुबन्ताचा टि-भाग इ हा होतो. त्याच्या पूर्वी म्हणजे भकाराच्या पुढें अकच् होऊन भलतेंच रूप होईल. तसेंच युष्मासु व अस्मासु येथें उकाराच्या पूर्वी व सकाराच्या पुढें अकच् होईल. तसेंच युवयोः येथें ओः याचे पूर्वी म्हणजे यकाराच्या पुढें अकच् होऊं लागेल.

३—त्वया येथें त्वम् या शब्दातील अम् या टि भागाच्या पूर्वी व वकाराच्या पुढें अकच् होऊन भलतेंच रूप त्वकया असें होईल

४—काम् या आगमाचा मकार इत्संज्ञक आहे. तेव्हां का असा आगम तूष्णीम् यांतील ईकाराच्या पुढे (१।१।७४) होतो.

पीतम् बहुचि कृते कल्पादयः प्राप्नुवन्ति। उच्चकैः नीचकैः अकचि कृते कादयः प्राप्नुवन्ति। ननु च अम्बहुजकचोऽपवादास्ते बाधका भविष्यन्ति।

**अम्बहुजकक्षु नानादेशत्वादुत्सर्गप्रतिषेधः ॥ ३ ॥**

अम्बहुजकक्षु नानादेशत्वादुत्सर्गस्य प्रतिषेधो वक्तव्यः। समानदेशैरपवादैरुत्सर्गाणां बाधनं भवति नानादेशत्वान्न प्राप्नोति ॥

**कविधेस्तमादयः पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ ४ ॥**

कविधेस्तमादयो भवन्ति पूर्वविप्रतिषेधेन। कविधेरवकाशः। कुत्सादीनां वचनं प्रकर्षस्यावचनम्। पटुकः मृदुकः। तमादीनामवकाशः। प्रकर्षस्य वचनं कुत्सादीनामवचनम्। पटुतरः पटुतमः। उभयवचन उभयं प्राप्नोति। पटुतरकः पटुतमकः। तमादयो भवन्ति पूर्वविप्रतिषेधेन ॥

**कदाचिच्छिन्नकतरादयः ॥ ५ ॥**

कदाचिच्छिन्नकतरादयो भवन्ति विप्रतिषेधेन। छिन्नकतरम् छिन्नकतमम् ॥

**एकदेशिप्रधानश्च समासः ॥ ६ ॥**

एकदेशिप्रधानश्च समासः कविधेर्भवति पूर्वविप्रतिषेधेन। अर्धपिप्पलिका अर्धकोशातकिका ॥

---

बहुपीतम् येथें कृत भुक्त व पीत या शब्दांच्या पूर्वी बहुच् प्रत्यय केल्यानंतर त्या शब्दांच्या पुढें कल्पप् वगैरे प्रत्यय प्राप्त होतात. तसेंच, उच्चकैः व नीचकैः येथें टि भागाच्या पूर्वी अकच् प्रत्यय केल्यानंतर त्या अव्ययांच्या पुढें क वगैरे प्रत्यय प्राप्त होतात.

पण अम्, बहुच् आणि अकच् हे प्रत्यय त्या शप् कल्पप् आणि क यांचे अपवाद आहेत; तेव्हां ते त्यांचा बाध करतील.

(वा. ३) अम्, बहुच् व अकच् हे जरी शप् कल्पप् आणि क यांचे अपवाद आहेत तरी ते निरनिराळ्या ठिकाणीं होत असल्यामुळें ते झाल्यानंतर मागून शप् वगैरे उत्सर्ग प्रत्यय पुढें होऊं लागतील त्यांचा प्रतिषेध सांगितला पाहिजे. कारण, उदाहरणामध्यें एकाच ठिकाणीं दोघांचीं प्राप्ति येईल तर त्यामधील अपवादानें उत्सर्गाचा बाध होतो. तेव्हां येथें भिन्न देश असल्यामुळें बाध होणार नाहीं.

(वा. ४) क प्रत्ययापेक्षां तमप् वगैरे प्रत्यय पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतात. ज्या ठिकाणीं कुत्सा वगैरे अर्थाची विवक्षा आहे आणि प्रकर्षाची विवक्षा नाहीं तेथें क वगैरे प्रत्ययांना आवकाश आहे. उदा० पटुकः मृदुकः. उलट ज्या ठिकाणी प्रकर्षाची विवक्षा आहे व कुत्सा वगैरे अर्थाची विवक्षा नाहीं तेथें तमप् वगैरे प्रत्ययांना अवकाश आहे उदा० पटुतरः पटुतमः. आणि ज्या ठिकाणीं दोन्ही प्रकारच्या अर्थांची विवक्षा आहे त्या ठिकाणीं त्या दोन्ही प्रत्ययांची प्राप्ति येते व तेथें तमप् वगैरे आतिशायनिक प्रत्यय पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतात. उदा०– पटुतरकः पटुतमकः.

(वा. ५) क्वचित् स्थलीं छिन्नकतर असेही प्रयोग होतात. म्हणजे आतिशायनिक प्रत्ययापेक्षां क वगैरे प्रत्यय हेच परत्वास्तव अगोदर होतात. उदा० छिन्नकतरम्, छिन्नकतमम्.

(वा. ६) ज्यामध्यें एकदेशीला मुख्यत्व असतें असा समास हा ह्या क प्रत्ययापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतो. उदा अर्धपिप्पलिका, अर्धकोशातकिका.

---

५—पिप्पलीचें कुत्सित अर्ध अशा अर्थाची विवक्षा असतांना एकदेशिसमास (२।२।२) आणि क प्रत्यय (५।३।७४) प्राप्त होतात. येथें क प्रत्यय पूर्वी झाला असता तर अर्धकपिप्पली असें मलतेंच रूप झालें असतें. येथें पिप्पली ही एकदेशी म्ह. अवयवी आणि अर्ध हा तिचा अवयव

उत्तरपदार्थप्रधानश्च संज्ञायां कन्विध्यर्थम् ॥ ७ ॥

उत्तरपदार्थप्रधानश्च समासः कविधेर्भवति पूर्वविप्रतिषेधेन । किं प्रयोजनम् । संज्ञायां कन्विध्यर्थम् । संज्ञायां कन्यथा स्यात् । नवग्रामकम् नवराष्ट्रकम् नवनगरकम् ॥

कदाचिद् द्वन्द्वः ॥८॥

कदाचिद् द्वन्द्वः कविधेर्भवति पूर्वविप्रतिषेधेन । प्लक्षकन्यग्रोधकौ प्लक्षन्यग्रोधकाविति वा ॥

[अज्ञाते ॥ ५ । ३ । ७३ ॥ कुत्सिते ॥ ५ । ३ । ७४ ॥]

इह कुत्सितकः अनुकम्पितक इति स्वशब्देनोक्तत्वात्तस्यार्थस्य प्रत्ययो न प्राप्नोति । नैष दोषः । कुत्सितस्यानुकम्पायां भविष्यत्यनुकम्पितस्य कुत्सायाम् ॥ अथवा

स्वार्थमभिधाय शब्दो
निरपेक्षो द्रव्यमाह समवेतम् ।
समवेतस्य च वचने
लिङ्गं वचनं विभक्तिं च ॥

---

(वा. ७) ज्यामध्यें उत्तर पदार्थाला मुख्यत्व असतें असा समास हा ह्या क प्रत्ययापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतो.

ह्याचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं संज्ञा शब्दामध्यें समासाहून कन् प्रत्यय झाला पाहिजे. उदा०— नवग्रामकम्; नवराष्ट्रकम्; नवनगरकम्.

(वा. ८) क्वचित् स्थलीं द्वंद्व समास हा ह्या क प्रत्ययापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतो; तेव्हां प्लक्षन्यग्रोधौ व प्लक्षकन्यग्रोधकौ असे दोन्ही प्रकारचे प्रयोग होतात.

(सू. ७४) कुत्सितकः व अनुकम्पितकः येथें कुत्सित व अनुकम्पित या शब्दांनींच तो तो अर्थ उक्त होत असल्यामुळें कुत्सित शब्दाहून प्रकृत सूत्रानें क प्रत्यय होणार नाहीं; आणि अनुकम्पित शब्दाहून 'अनुकम्पायाम्' (५।३।७६) यानें कन् होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं.

कारण, कुत्सिताविषयीं अनुकम्पा विवक्षित असतांना कुत्सित शब्दाहून 'अनुकम्पायाम्' या सूत्रानें कन् प्रत्यय होईल. तसाच अनुकम्पिताविषयीं कुत्सा विवक्षित असतांना अनुकम्पित शब्दाहून प्रकृत सूत्रानें क प्रत्यय होईल. अथवा—

(श्लो. १) शब्द हा प्रथमतः कोणाचीही अपेक्षां न धरतां प्रवृत्तिनिमित्त जो आपला स्वार्थ त्याचें प्रतिपादन करून नंतर त्या प्रवृत्तिनिमित्ताचा आश्रय जें द्रव्य त्याचें प्रतिपादन करतो. आणि त्या आश्रयाचें प्रतिपादन केलें असतां त्याचें लिंग, संख्या, व कारक यांचें प्रतिपादन करतो.

---

आहे. जरी येथें शब्दतः मुख्यत्व अर्धाला आहे तरी 'अर्धी पिंपळी' असें आर्थिक मुख्यत्व एकदेशीला आहे म्हणून या समासाला एकदेशिप्रधान समास असें म्हणतात. पिप्पली म्हणजे पिंपळी. कोशातकी म्हणजे घोतरा, किंवा घोसाळें; आघाडा हाही अर्थ आहे.

६—त्यामुळें समास-स्वर अन्त उदात्त झाला तरी मागून कन् प्रत्ययामुळें आदि उदात्त स्वर (६ । १ । १९७) होतो व तोच कायम राहतो.

१—(सू. ७३) अज्ञात अर्थाची विवक्षा असतांना प्रातिपदिकाहून स्वार्थीं क प्रत्यय होतो, उदा०—अज्ञातः अश्वः अश्वकः.

१—(सू. ७४) कुत्सित अर्थाची विवक्षा असतांना प्रातिपदिकाहून स्वार्थीं क प्रत्यय होतो.

अभिधाय तान्विशेषान्
अपेक्षमाणश्च कृत्स्नमात्मानम् ।
प्रियकुत्सनादिषु पुनः
प्रवर्ततेऽसौ विभक्त्यन्तः ॥

कथं पुनरिदं विज्ञायते । कुत्सितादीनामर्थे इति । आहोस्वित्कुत्सितादिसमानाधिकरणात्प्रातिपदिकादिति । कश्चात्र विशेषः ।

**कुत्सितादीनामर्थे चेल्लिङ्गवचनानुपपत्तिः ॥ १ ॥**

कुत्सितादीनामर्थे चेल्लिङ्गवचनयोरनुपपत्तिः । पटुकम् पटुका पटुकः पटुकौ पटुका इति । एकोऽयमर्थः कुत्सितं नाम तस्यैकत्वादेकवचनमेव प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि कुत्सितादिसमानाधिकरणात्प्रातिपदिकादिति ।

**कुत्सितादिसमानाधिकरणादिति चेदतिप्रसङ्गो यथा टाबादिषु ॥ २ ॥**

कुत्सितादिसमानाधिकरणादिति चेदतिप्रसङ्गो भवति यथा टाबादिषु । कथं च टाबादिषु । उक्तं तत्र स्त्रीसमानाधिकरणादिति चेद् भूतादिष्वतिप्रसङ्ग इति । एवमिहापि कुत्सितादिसमानाधिकरणादिति चेदतिप्रसङ्गो भवति । इदं घृतकम् इदं तैलकम् । इदंशब्दादपि प्राप्नोति ॥

**सिद्धं तु येन कुत्सितादिवचनं तद्युक्ता-**

---

( श्लो. २ ) लिंग वगैरे हे सर्व विषय प्रतिपादन केल्यानंतर तो विभक्त्यन्त शब्द आपलें स्वरूप पूर्ण प्रकाशित करून तशा रूपानेंच प्रिय, कुत्सा वगैरे बाह्य अर्थांशीं संबंध पावतो.[२]

आतां येथें कुत्सित वगैरे शब्दांच्या अर्थीं[३] क वगैरे प्रत्यय होतात, किंवा ‘ कुत्सितादिसमानाधिकरणात् ’ म्हणजे कुत्सित जो पदार्थ तद्वाचक अशा कोणत्याही शब्दांहून हे प्रत्यय होतात या दोन अर्थांपैकीं कोणता अर्थ येथें घ्यावयाचा आहे ?

ह्या दोन अर्थांमध्यें फरक काय बरें होतो ?

( वा. १ ) कुत्सित शब्दाच्या अर्थीं क प्रत्यय होईल तर तो कप्रत्ययान्त शब्द मूळ शब्दाप्रमाणें तिन्ही लिंगीं व तिन्ही वचनीं चालतो तें जुळणार नाहीं. उदा०—पटुकम्, पटुका, पटुकः पटुकौ पटुकाः. कुत्सित म्हणजे कुत्सा; तो एकच अर्थ असल्यामुळें फक्त एकवचनच प्राप्त होत आहे.

तर मग कुत्सित जो पदार्थ त्याचा वाचक अशा कोणत्याही शब्दाहून क प्रत्यय होतो असाच अर्थ असूं दे.

(वा. २) कुत्सित पदार्थाच्या वाचक अशा कोणत्याही शब्दाहून क प्रत्यय होईल तर टाप् वगैरे प्रत्ययाप्रमाणेंच येथेंही दोष येईल.

टाप् वगैरे प्रत्ययांसंबंधानें दोष कसा बरें येतो ?

स्त्रीसमानाधिकरणादिति चेद्भूतादिष्वतिप्रसङ्गः ( ४।१।३ वा. ३ ) असा दोष तेथें दाखविलाच आहे तसा येथेंही ‘ कुत्सितादिसमानाधिकरणात् ’ असें म्हटलें असतां इदंघृतकम् इदंतैलकम् येथें इदम् या शब्दाहूनही क प्रत्यय होऊं लागेल असा दोष येतो.

---

उदा०—कुत्सितः अश्वः अश्वकः.

२.—पद हें स्वार्थी परिपूर्ण होऊन नंतर अर्थान्तराशीं संबंध पावतें हा न्यायच येथें फलित होतो. तेव्हां कुत्सित शब्दाचें प्रवृत्तिनिमित्त कुत्सा निराळी व त्या कुत्सिताची जी कुत्सा ती बाह्यार्थ कुत्सा निराळी, त्या बाह्यार्थ कुत्सेचा द्योतक असा क प्रत्यय कुत्सित शब्दाहून होण्यास कांहीं हरकत नाहीं. एखादा चांगला मनुष्य वस्तुतः कुत्सित नसून जर त्याची कोणी लबाडीनें कुत्सा केली तर तेथें ती योग्य कुत्सा नसल्यामुळें कुत्सेचीच कुत्सा होते. तेथें या कुत्सितक शब्दाचा प्रयोग होतो.

३.—कुत्सित शब्दामधील क्त प्रत्यय भाव या अर्थी घेतला म्हणजे कुत्सित शब्दाचा अर्थ कुत्सा असा होतो.

त्स्वार्थे प्रत्ययविधानात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । येन कुत्सितादयोऽर्था गम्यन्ते तद्युक्तात्स्वार्थे प्रत्ययो भवतीति वक्तव्यम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं कुत्सितादीनामर्थे चेल्लिङ्गवचनानुपपत्तिरिति । नैष दोषः । नायं प्रत्ययार्थः। किं तर्हि । प्रकृत्यर्थविशेषणमेतत् । कुत्सितादिषु यत्प्रातिपदिकं वर्तते तस्मात्कादयो भवन्ति । कस्मिन्नर्थे । स्वार्थ इति । स्वार्थिकाश्च प्रकृतितो लिङ्गवचनान्यनुवर्तन्ते ॥

[ संज्ञायां कन् ॥ ५ । ३ । ७५ ॥

अनुकम्पायाम् ॥ ५ । ३ । ७६ ॥

नीतौ च तद्युक्तात् ॥ ५ । ३ । ७७ ॥

बह्वचो मनुष्यनाम्नष्ठज्वा ॥ ५ । ३ । ७८ ॥

घनिलचौ च ॥ ५ । ३ । ७९ ॥

प्राचामुपादेरडज्वुचौ च ॥ ५ । ३ । ८० ॥

---

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें कीं ज्या धर्मामुळें कुत्सित वगैरे अर्थ गम्यमान होतात त्या धर्मानें युक्त अशा अर्थाच्या शब्दाहून स्वार्थी क प्रत्यय होतो असें म्हणावें.

अशा रीतीनें सिद्ध होईल, पण सूत्र तसें फिरवावें लागतें ना ?

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण मूळचेंच सूत्र ठेवलें तर 'कुत्सित वगैरे शब्दांच्या अर्थी क प्रत्यय होईल म्हणून लिंगवचनें जुळणार नाहींत' (वा. १) असें आतांच सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं, कारण 'कुत्सिते' या शब्दानें येथें प्रत्ययार्थाचा निर्देश केला आहे असें समजूं नये. तर 'कुत्सिते' हें येथें प्रकृत्यर्थाचें विशेषण आहे. तेव्हां 'कुत्सित वगैरे अर्थीचें जें प्रातिपदिक त्याहून हे क वगैरे प्रत्यय होतात' असा अर्थ आहे. आतां ते प्रत्यय कोणत्या अर्थी होतात अशी जिज्ञासा असेल तर ते प्रत्यय स्वार्थी होतात हेंच त्याचें उत्तर होय. आणि स्वार्थिक प्रत्यय तर मूळ शब्दाच्या लिंगवचनांनाच अनुसरतात. तेव्हां पटुकम् पटुका वगैरे सर्व प्रकारचे प्रयोग होतील.

---

१—( सू. ७५ ) कुत्सा अर्थ गम्यमान असतांना प्रातिपदिकाहून स्वार्थीं कन् प्रत्यय होतो, तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०— शूद्रकः नाम कश्चित्. कन् प्रत्ययामुळें येथें आदि उदात्त स्वर ( ६।१।१९७ ) होतो.

१—( सू. ७६ ) दया अर्थ गम्यमान असतांना प्रातिपदिकाहून क वगैरे प्रत्यय होतात. उदा०—पुत्रकः. क्रियापदाहूनही हा प्रत्यय होतो.

१—( सू. ७७ ) नीतीमध्यें म्ह. साम दान वगैरे व्यवहारांमध्यें दया अर्थ गम्यमान असतांना प्रातिपदिकाहून क वगैरे प्रत्यय होतात. उदा०—हन्त ते धानकाः. क्रियापदाहूनही हा प्रत्यय होतो. उदा०—एहि अद्धि. येथे अकच् होऊन एहकि अद्धकि वगैरे रूपें होतात.

१—( सू. ७८ ) नीतीमध्यें दया अर्थ गम्यमान असतांना बह्वच् असें जें मनुष्यनाम त्याहून स्वार्थीं ठच् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—अनुकम्पितः देवदत्तः देविकः. येथें दत्त याचा लोप ( ५ । ३ । ८३ ) झाला आहे. एकदां देवदत्तकः असें रूप होतें.

१—( सू. ७९ ) पूर्वसूत्राच्या विषयामध्यें एकदां घन् व इलच् हेही प्रत्यय होतात. उदा०—अनुकम्पितः देवदत्तः देवियः, देविलः.

१—(सू. ८०) पूर्वसूत्राच्याच विषयामध्यें एकदां उप आरंभीं असलेल्या बह्वच् मनुष्यनामाहून अडच् व वुच् हेही प्रत्यय होतात. उदा०—अनुकम्पित उपेन्द्रदत्तः उपडः, उपकः, उपिकः, उपियः, उपिलः, उपेन्द्रदत्तकः.

## जातिनाम्नः कन् ॥ ५ । ३ । ८१ ॥

## अजिनान्तस्योत्तरपदलोपश्च ॥ ५ । ३ । ८२ ॥]

## ठाजादावूर्ध्वं द्वितीयादचः ॥ ५ । ३ । ८३ ॥

### चतुर्थात्

चतुर्थाल्लोपो वक्तव्यः । बृहस्पतिदत्तकः बृहस्पतिकः । प्रजापतिदत्तकः प्रजापतिकः ॥

### अनजादौ च

अनजादौ च लोपो वक्तव्यः । देवदत्तकः देवकः । यज्ञदत्तकः यज्ञकः ॥

### लोपः पूर्वपदस्य च ।

पूर्वपदस्य च लोपो वक्तव्यः । देवदत्तकः दत्तकः । यज्ञदत्तकः दत्तकः ॥

### अप्रत्यये तथैवेष्टः

देवदत्तः दत्तः । यज्ञदत्तः दत्तः ॥

### उवर्णाल्ल इलस्य च ॥

उवर्णादिलस्य च लोपो वक्तव्यः। भानुदत्तकः भानुलः । वसुदत्तकः वसुलः ॥ अथ ठग्रहणं किमर्थं नेके कृते ऽजादावित्येव सिद्धम् ।

### ठग्रहणमुको द्वितीयत्वे कविधानार्थम् ॥ १ ॥

ठग्रहणं क्रियत उको द्वितीयत्वे कवि-

---

( सू. ८३ श्लो १ ) या सूत्रामध्यें दुसऱ्या अचाच्या पुढील भागाचा लोप होतो असें म्हटलें आहे. पण कांहीं ठिकाणीं चवथ्या अचाच्या पुढील भागाचा लोप होतो असें म्हणावें. उदा०—बृहस्पतिदत्तकः बृहस्पतिकः, प्रजापतिदत्तकः प्रजापतिकः.

तसेंच अजादिरहित म्हणजे हलादि प्रत्यय पुढें केला असला तरीही कांहीं ठिकाणीं दुसऱ्या अचाच्या पुढील भागाचा लोप होतो असें म्हणावें. उदा०—देवदत्तकः देवकः; यज्ञदत्तकः यज्ञकः.

तसेंच कांहीं ठिकाणीं पूर्वपदाचाही लोप होतो असें म्हणावें. उदा०—देवदत्तकः; दत्तकः; यज्ञदत्तकः दत्तकः.

तसेंच कांहीं ठिकाणीं प्रत्यय केला नसला तरीही पूर्वपदाचा किंवा उत्तरपदाचा लोप इष्ट आहे. उदा०देवदत्तः, दत्तः.

उवर्णान्त पूर्वपद असेल तर उत्तरपदाचा लोप होतो आणि पुढील इल प्रत्ययाच्या इकाराचा लोप होतो. उदा०—भानुदत्तकः भानुलः; वसुदत्तकः वसुलः.

आतां या सूत्रामध्यें ठ-ग्रहण कशाकरितां केलें आहे? तें करावयास नको. कारण ठ याला इक आदेश ( ७।३।५० ) केल्यानंतर तो प्रत्यय अजादीच होत असल्यामुळें अजादि प्रत्यय पुढें असतांना या म्हणण्यानेंच काम भागेल.

( वा. १ ) ठ-ग्रहण अशाकरितां केलें आहे कीं ज्या ठिकाणीं प्रातिपदिकांतील दुसरा अच् उक् या प्रत्याहारापैकीं वर्ण असेल त्या

---

१— ( सू. ८१ ) मूळचा जातिवाचक असून मनुष्याचें नांव ठेवण्याकरितां उपयोगांत आणलेला असा जो शब्द त्याहून नीतीमध्यें अनुकम्पा गम्यमान असतांना कन् प्रत्यय विकल्पानें होतो. उदा०—व्याघ्रकः. एकदा पूर्वींचे प्रत्यय होतात.

१—( सू. ८२ ) अजिन-शब्दान्त जें मनुष्यनाम त्याहून कन् प्रत्यय होतो, आणि त्या मनुष्यनामांतील अजिन या उत्तरपदाचा लोप होतो दया गम्यमान असतांना. उदा० —अनुकम्पितः व्याघ्राजिनः व्याघ्रकः.

१—( सू. ८३ ) ह्या प्रागिवीय प्रकरणामध्यें ठ आणि अजादि प्रत्यय हे जर बहच् शब्दाहून केलेले असतील तर तेथें त्या शब्दामधील दुसऱ्या अचाच्या पुढील भागाचा लोप होतो. उदा०—अनुकम्पितः देवदत्तः देविकः, देवियः, देविलः,

धिर्यथा स्यात् । वायुदत्तकः वायुकः । पितृदत्तकः पितृकः ॥

**अजादिलक्षणे हि माथितिकादिवत्प्रसङ्गः ॥ २ ॥**

अजादिलक्षणे हि माथितिकादिवत्प्रसज्येत । तद्यथा । माथितं पण्यमस्य माथितिक इत्यकारलोपे कृते तान्तादिति कादेशो न भवति । एवमिहापि न स्यात् ।।

**द्वितीयादचो लोपे संध्यक्षरद्वितीयत्वे तदादेर्लोपवचनम् ॥ ३ ॥**

द्वितीयादचो लोपे कर्तव्ये संध्यक्षरद्वितीयत्वे तदादेर्लोपो वक्तव्यः । लहोडः लहिकः । कहोडः काहिकः ॥

**शेवलसुपरिविशालवरुणार्यमादीनां तृतीयात् ॥ ५ । ३ । ८४ ॥**

**वरुणादीनां च तृतीयात्स चाकृतसंधीनाम् ॥ १ ॥**

वरुणादीनां च तृतीयाल्लोप उच्यते स चाकृतसंधीनां वक्तव्यः । सुपर्याशीर्दत्तः सुपरिकः सुपरियः सुपरिलः ॥

इह षडङ्गुलिः षडिक इत्यजादिलोपे कृते पदसंज्ञा न प्राप्नोति । तत्र को दोषः ।

---

ठिकाणीं पुढील ठ प्रत्ययाला क आदेश (७।३।५१) झाला पाहिजे. उदा०—वायुदत्तकः, वायुकः; पितृदत्तकः, पितृकः.

( वा. २ ) ठ-ग्रहण न करतां अजादि प्रत्ययामुळें जर येथें दत्त याचा लोप केला तर अगोदर इक आदेश करावा लागत असल्यामुळें माथितिक वगैरेंप्रमाणें येथेंही इक आदेशच कायम राहील. ज्याप्रमाणें ' मथितं पण्यमस्य माथितिकः ' येथें मथित शब्दाहून ठक् प्रत्यय ( ४ । ४ । ५१ ) व त्याला इक आदेश ( ७ । ३ । ५० ) केल्यानंतर त्या इक या अजादि प्रत्ययामुळें मथित शब्दांतील शेवटच्या अकाराचा लोप ( ६ । ४ । १४८ ) केला असतां प्रातिपदिक तकारान्त जरी झालें तरी क आदेश ( ७ । ३ । ५१ ) होत नाहीं, त्याप्रमाणें वायुकः येथेंही क आदेश होणार नाहीं.

( वा. ३ ) प्रकृत सूत्रानें दुसऱ्या अचाऱ्या पुढील भागाचा लोप ज्या ठिकाणीं होतो तेथें जर तो दुसरा अच् संध्यक्षर असेल तर त्या संध्यक्षराला धरून पुढील भागाचा लोप होतो असें म्हणावें. उदा०—लहोडः, लहिकः, कहोडः, कहिकः.

( सू. ८४ वा. १ ) ह्या सूत्रांतील वरुण, शेवल, वगैरे शब्द आरंभीं असलेल्या मनुष्यनामांतील जो तिसऱ्या अचाच्या पुढील भागाचा लोप सांगितला आहे तो संधि न करतांच करावा. उदा०—अनुकम्पितः सुपर्याशीर्दत्तः[2], सुपरिकः, सुपरियः, सुपरिलः.

पण षडङ्गुलिदत्तः षडिकः येथें अजादि प्रत्यय पुढें आहे म्हणून लोप केला असतां षष् याला पद संज्ञा प्राप्त होत नाहीं[3].

पद संज्ञा झाली नाहीं तर दोष काय येईल ?

---

१—( सू. ८४ ) शेवल, सुपरि, विशाल, वरुण, आणि अर्यमन् हे शब्द आरंभीं असलेल्या मनुष्य-नामांतील तिसऱ्या अचाच्या पुढील भागाचा लोप होतो ठ किंवा अजादि प्रत्यय पुढे असतांना. उदा०— अनुकम्पितः शेवलदत्त. शेवलिकः शेवालियः

२—येथें सुपरि यांतील इकाराला संधिकार्य यण् ( ६ । १ । ७७ ) करण्याचे पूर्वीं आशीर्दत्त याचा लोप झाला म्हणून इकाराला यण् झाला नाहीं.

३—षडङ्गुलिदत्त यांतील दुसरा अच् जो अकार त्याच्या पुढील भागाचा पूर्वे सूत्रानें लोप केल्यानंतर त्या अकाराचा लोप ( ६ । ४ । १४८ ) होतो. नंतर षष् याला भ संज्ञा ( १ । ४ । १८ ) प्राप्त होते. तिनें सुप्तिङन्तं पदम् ( १ । ४ । १४ ) आणि ' स्वादिष्वस०' ( १ । ४ । १७ ) या दोन्ही सूत्रांनीं प्राप्त झालेल्या पद संज्ञेचा बाध होईल.

जश्त्वं न स्यात् ।

षडिके जश्त्व उक्तम् ॥ २ ॥

किमुक्तम् । सिद्धमचः स्थानिवत्त्वादिति । यद्येवं

वाचिकादिषु पदवृत्तप्रतिषेधः ॥ ३ ॥

वाचिकादिषु पदवृत्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । वागाशीर्दत्तः वाचिक इति ॥

सिद्धमेकाक्षरपूर्वपदानामुत्तरपदलोपवचनात् ॥ ४ ॥

सिद्धमेतत् । कथम् । एकाक्षरपूर्वपदानामुत्तरपदस्य लोपो वक्तव्यः ॥ इहापि तर्हि प्राप्नोति । षडङ्गुलिः षडिक इति ।

षषष्ठाजादिवचनात्सिद्धम् ॥ ५ ॥

षषष्ठाजादिवचनात्सिद्धमेतत् ॥

अल्पे ॥ ५ । ३ । ८५ ॥

ह्रस्वे ॥ ५ । ३ । ८६ ॥

किमर्थमिमावुभावर्थौ निर्दिश्येते न यदल्पं ह्रस्वमपि तद्भवति यच्च ह्रस्वमल्पमपि तद्भवति । नैतयोरावश्यकः समावेशः । अल्पं घृतम् अल्पं तैलमित्युच्यते न काश्चिदाह ह्रस्वं घृतम् ह्रस्वं तैलमिति । तथा ह्रस्वः पटः ह्रस्वः शाटक इत्युच्यतेन काश्चिदाह अल्पःपटः अल्पः शाटक इति ॥

[ संज्ञायां कन् ॥ ५ । ३ । ८७ ॥

---

षष् शब्दाच्या शेवटच्या षकाराला जश्त्वानें ( ८ । २ । ३९ ) डकार होतो तो होणार नाहीं.

( वा. २ ) षडिक शब्दामधील जश्त्वासंबंधानें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

' सिद्धमचः स्थानिवत्त्वात् ' (१।४।१८ वा. २ ) असें सांगितलेंच आहे.

पण असें असेल तर—

( वा. ३ ) वाचिक वगैरे शब्दांमध्यें पदकार्याचा प्रतिषेध केला पाहिजे. वागाशीर्दत्तः वाचिकः.

( वा. ४ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तें असें कीं पूर्वपद जर एकाक्षरी असेल तर तेथें सबंध उत्तरपदाचा लोप होतो असें म्हणावें.

तर मग षडङ्गुलिदत्तः षडिकः येथेंही अङ्गुलिदत्त या उत्तरपदाचा लोप होऊं लागेल.

( वा. ५ ) षडिकः येथें लक्ष्यानुरोधानें अङ्गुलिदत्त या उत्तरपदाचा लोप न करतां ' ठाजादावूर्ध्वं० ' या पूर्वसूत्रानें दुसऱ्या अचाच्या पुढील भागाचाच लोप होतो त्यामुळें तें सिद्ध होतें.

( सू. ८५, ८६ ) अल्प आणि ह्रस्व असे निरानिराळे दोन अर्थ कशाकरितां निर्दिष्ट केले आहेत ? तसे करूं नयेत. कारण जें अल्प आहे तें ह्रस्व असतेंच, आणि जें ह्रस्व असतें तें अल्प असतेंच.

पण सर्व ठिकाणीं या दोन धर्मांचा समावेश असतोच असा नियम नाहीं अल्पं घृतम् अल्पं तैलम् असें म्हणतात. तेथें ह्रस्वं घृतम् ह्रस्वं तैलम् असें कोणीही म्हणत नाहींत. तसेंच ह्रस्वः पटः ह्रस्वः शाटकः असें म्हणतात. तेथें अल्पः पटः अल्पः शाटकः असें कोणी म्हणत नाहींत.

---

१—( सू. ८५ ) अल्प म्हणजे थोडें हा अर्थ गम्यमान असतांना प्रातिपदिकाहून स्वार्थी क वगैरे प्रत्यय होतात. अल्पं तैलं तैलकम्.

१—( सू. ८६ ) ऱ्हस्व म्हणजे लहान हा अर्थ गम्यमान असतांना प्रातिपदिकाहून स्वार्थी क वगैरे प्रत्यय होतात. ऱ्हस्वः वृक्षः वृक्षकः.

१—( सू. ८७ ) प्रातिपदिकाहून स्वार्थी कन् प्रत्यय होतो परंतु तो प्रत्ययान्त शब्द ऱ्हस्वपणामुळें कोणाची तरी संज्ञा असली पाहिजे. उदा०—वंशकः.

**कुटीशमीशुण्डाभ्यो रः ॥ ५ । ३ । ८८ ॥ ]**

**कुटीशमीशुण्डाभ्यः प्रत्ययसंनियोगेन पुंवद्वचनम् ॥ १ ॥**

कुटीशमीशुण्डाभ्यः प्रत्ययसंनियोगेन पुंवद्भावो वक्तव्यः । कुटी कुटीरः । शमी शमीरः । शुण्डा शुण्डार इति । किं पुनः कारणं न सिध्यति । स्वार्थिकोऽयं स्वार्थिकाश्च प्रकृतितो लिङ्गवचनान्यनुवर्तन्ते ॥

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् । स्वार्थिका अतिवर्तन्तेऽपि लिङ्गवचनानीति ॥

**[ कुत्वा डुपच् ॥ ५ । ३ । ८९ ॥**

**कासूगोणीभ्यां ष्टरच् ॥५।३।९०॥]**

**वत्सोक्षाश्वर्षभेभ्यश्च तनुत्वे ॥ ५ । ३ । ९१ ॥**

**वत्सादिभ्यस्तनुत्वे कार्श्ये प्रतिषेधः ॥१॥**

वत्सादिभ्यस्तनुत्वे कार्श्ये प्रतिषेधो वक्तव्यः । कृशो वत्सो वत्सतर इति मा भूदिति ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । यस्य गुणस्य हि भावाद् द्रव्ये शब्दनिवेशस्तदभिधाने तस्मिन्गुणे वक्तव्ये

---

( ८८ वा. १ ) कुटी, शमी आणि शुण्डा या शब्दांहून र प्रत्यय केला असतां तो र-प्रत्ययान्तशब्द पुल्लिंगाप्रमाणें चालतो असें म्हणावें. कुटी कुटीरः, शमी शमीरः, शुण्डारः

पण येथें पुल्लिंगीच शब्द कां बरें चालणार. नाहींत ?

हा र प्रत्यय स्वार्थी होत आहे आणि स्वार्थिक प्रत्यय तर मूळ शब्दाच्या लिंगवचनांनाच अनुसरतात असा न्यायच आहे.

( वा. २ ) अथवा हें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे.

स्वार्थिक प्रत्यय हे मूळ शब्दाच्या लिंगवचनांचा अतिक्रमही करतात. (५।३।६७ पृ. ४६१-४६२ ) असें मागें सांगितलें आहे.

( सू. ९१ वा. १ ) वत्स वगैरे शब्दांहून तनुत्व अर्थ गम्यमान असतांना जो हा ष्टरच् प्रत्यय सांगितला आहे तो तनुत्व म्हणजे कार्श्य गम्यमान असतांना होत नाहीं असा प्रतिषेध सांगावा. कारण, कृशः वत्सः या अर्थी वत्सतरः असा प्रयोग न झाला पाहिजे.

तर मग तसा प्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण ज्या धर्माच्या अस्तित्वामुळें वत्स वगैरे शब्द प्राण्याला लागतात तो धर्म दाखवावयाचा असतांना

---

१—( सू. ८८ ) ऱ्हस्वपणा विवक्षित असतांना कुटी, शमी, आणि शुण्डा या शब्दांहून स्वार्थी र प्रत्यय होतो, उदा०—ऱ्हस्वा कुटी कुटीरः इत्यादि.

१—( सू. ८९ ) ऱ्हस्वपणा विवक्षित असतांना कुतू शब्दाहून स्वार्थी डुपच् प्रत्यय होतो. उदा०—ऱ्हस्वा कुतूः कुतुपः. तेलाची बुधली हा अर्थ आहे.

१—( सू. ९० ) ऱ्हस्वपणा विवक्षित असतांना कासू आणि गोणी या शब्दांहून स्वार्थी ष्टरच् प्रत्यय होतो. उदा०—ऱ्हस्वा कासूः कासूतरी. शक्ति नावाचें आयुध हा अर्थ आहे. ऱ्हस्वा गोणी गोणतिरी.

१—( सू. ९१ ) वत्स, उक्षन्, अश्व आणि ऋषभ हे शब्द ज्या धर्मामुळें आपल्या अर्थाला दाखवितात त्या धर्मामध्यें कमीपणा विवक्षित असतांना त्या शब्दांहून स्वार्थी ष्टरच् प्रत्यय होतो. उदा०—वत्सतरः म्हणजे तरुण बैल. वत्स म्हणजे बाल. बाल्य धर्माचा कमीपणा म्हणजेच तारुण्यावस्थाप्राप्ति. उक्षतरः म्ह. म्हातारा बैल. उक्षा म्हणजे तरुण बैल. तारुण्याचा कमीपणा म्हातारपणामध्यें होतो. अश्वतरः म्ह. खेचर ज्याचे आईबाप अश्व जातीचे आहेत तो अश्व होय. गाढव आणि घोडी यांपासून खेचराची उत्पत्ति होते. ऋषभतर म्हणजे अशक्त बैल. ऋषभ याचा सशक्त बैल असा अर्थ आहे.

प्रत्ययेन भवितव्यं न च कार्श्यस्य भावाद् द्रव्ये वत्सशब्दः ॥

**किंयत्तदोर्निर्धारणे द्वयोरेकस्य डतरच् ॥ ५ । ३ । ९२ ॥**

**वा बहूनां जातिपरिप्रश्ने डतमच् ॥ ५ । ३ । ९३ ॥**

**किमादीनां द्विबह्वर्थे प्रत्ययविधानादुपाध्यानर्थक्यम् ॥ १ ॥**

किमादीनां द्विबह्वर्थे प्रत्ययविधानादुपाधिग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । बहिर्धारणं निर्धारणमिति । यावता द्वयोरेकस्यैव बहिर्धारणं भवति ॥

अपर आह । बहूनां जातिपरिप्रश्ने डतमाजित्यत्र बहुग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । किमित्येतत्परिप्रश्ने वर्तते परिप्रश्नश्चानिर्ज्ञाते ऽनिर्ज्ञातं च बहुषु । द्व्येकयोः पुनर्निर्ज्ञातम् । निर्ज्ञातत्वाद् द्व्येकयोः परिप्रश्नो न परिप्रश्नाभावात्किमेव नास्ति कुतः प्रत्ययः ॥

**एकाच्च प्राचाम् ॥ ५ । ३ । ९४ ॥**

प्राग्वचनं किमर्थम् । विभाषा यथा

---

जर त्या शब्दाचा प्रयोग होईल तरच तेथें त्या धर्माचा कमीपणा दाखविणारा हा प्रत्यय होतो आणि कृशपणामुळें कांहीं वत्स हा शब्द प्राण्याला लागलेला नाहीं.

( सू. ९३ वा. १ ) दोहोंपैकीं किंवा बहुतांपैकीं जो पदार्थ त्याचा दर्शक अशा किम् वगैरे शब्दांहून हा प्रत्यय सांगितला असल्यामुळें येथें जें एकत्व वगैरे निमित्त धरलें आहे तें व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं निर्धारण म्हणजे निराळा काढणें. तेव्हां तें निर्धारण तर दोहोंमध्यें एकाचेंच होणारें आहे.

येथें दुसरा कोणी वैयाकरण या वार्तिकाचा अभिप्राय वर्णन करतांना असें म्हणतो कीं पुढील सूत्रामध्यें 'बहूनां जातिपरिप्रश्ने डतमच्' येथें बहूनां शब्द घातला आहे तो व्यर्थ आहे.

काय कारण ?

कारण असें कीं—किम् शब्दाचा अर्थ प्रश्न असा आहे. आणि प्रश्न तर जी गोष्ट बरोबर समजलेली नसते तिच्याच संबंधानें संभवतो आणि तशी स्थिति पदार्थ बहुत असतील तेथें संभवते. ज्या ठिकाणीं दोन किंवा एकच पदार्थ असेल तेथें त्याचें ज्ञान असणारच. म्हणून तेथें प्रश्नच संभवत नाहीं आणि प्रश्नच नसल्यामुळें किम् या शब्दाचा प्रयोग नाहीं. मग तेथें त्या प्रत्ययाचें नांवच काढावयास नको.

( सू. ९४ ) येथें प्राचाम् असें कशाकरितां म्हटलें आहे.

एक शब्दाहून हे प्रत्यय विकल्पानें झाले

---

१—( सू. ९२ ) दोहोंपैकी एकाचें निर्धारण म्हणजे पृथक्करण गम्यमान असेल तेथें त्या निर्धारण केल्या जाणाऱ्या वस्तूचा दर्शक जो किम् यद् किंवा तद् शब्द त्याहून स्वार्थी डतरच् प्रत्यय होतो. उदा०—कतरः भवतोः कठः, कतर; भवतोः पटुः, कतरः भवतोः पाचकः, कतरः भवतोः देवदत्तः, भवतोर्यतर; कठः इत्यादि.

१–(सू.९३) बहुतांपैकीं एकाचें जें जातीनें निर्धारण त्यासंबंधीं प्रश्न असतांना किम् शब्दाहून आणि तसेंच निर्धारण ज्या वस्तूचें विवक्षित असेल त्या वस्तूच्या दर्शक अशा यद् व तद् या शब्दांहून विकल्पानें डतमच् प्रत्यय होतो. उदा०—कतमो भवतां कठः, एतेषां यतरः कठः, एतेषां ततरः कठः, को भवतां कठः, एतेषां यः कठः, एतेषां स कठः

२—शिवाय दोहोंपैकी एकाचें निर्धारण असेल तेथें पूर्वसूत्रानें सांगितलेल्या डतरच् प्रत्ययानें या डतमच् प्रत्ययाचा बाध होत असल्यामुळें बहूनाम् या शब्दाचा येथें कांहीं उपयोग नाहीं.

१–( सू. ९४ ) निर्धारण केल्या जाणाऱ्या वस्तूच्या दर्शक अशा शब्दाहून दोघांपैकीं एकाचें निर्धारण असतांना डतरच् प्रत्यय आणि बहुतांपैकीं एकाचें निर्धारण असतांना डतमच् प्रत्यय असे विकल्पानें होतात. उदा०—भवतोरेकतरः; भवतामेकतमः.

स्यात् ।

**प्राग्वचनानर्थक्यं च विभाषाप्रकरणात् ॥ १ ॥**

प्राग्वचनमनर्थकम् किं कारणम् । विभाषाप्रकरणात् । प्रकृता महाविभाषा तयैव सिद्धम् ॥

**अवक्षेपणे कन् ॥ ५ । ३ । ९५ ॥**

अवक्षेपणे कन्विधीयते कुत्सिते कः क एतयोरर्थयोर्विशेषः । अवक्षेपणं करणं कुत्सितं कर्म । अवक्षेपणं वै कुत्सितं करणं तेन यत्कुत्स्यते तदपि कुत्सितं भवति तत्र कुत्सितमित्येव सिद्धं भवति ॥ एवं तर्हि यत्परस्य कुत्सार्थमुपादीयते तदिहोदाहरणम् । व्याकरणकेन नामायं गर्वितः । याज्ञिक्यकेन नामायं गर्वितः । यत्स्वकुत्सार्थमुपादीयते तत्तत्रोदाहरणम् । देवदत्तकः यज्ञदत्तकः ॥

**[ इवे प्रतिकृतौ ॥ ५ । ३ । ९६ ॥**

**संज्ञायां च ॥ ५ । ३ । ९७ ॥]**

**लुब् मनुष्ये ॥ ५ । ३ । ९८ ॥**

किमर्थं मनुष्ये लुबुच्यते न लुगेवोच्येत ।

**लिङ्गसिद्ध्यर्थं लुब्मनुष्ये ॥ १ ॥**

लिङ्गसिद्ध्यर्थं मनुष्ये लुबुच्यते । चञ्चेव चञ्चा । वध्रिकेव वध्रिका खरकुटीव । खरकुटी ॥

---

पाहिजेत म्हणून म्हटलें आहे.

(वा.१) येथें ‘ प्राचाम् ’ हा शब्द निरर्थक घातला आहे.

काय कारण ?

कारण असें कीं–‘विभाषाप्रकरणात्’ म्हणजे महाविभाषा मागून अनुवृत्तीनें येत आहे त्यामुळेंच हें सिद्ध होत आहे.

( सू. ९५ ) येथें अवक्षेपण या अर्थी कन् प्रत्यय सांगितला आहे; आणि पूर्वी ( ५।३।७४ ) कुत्सित या अर्थी क प्रत्यय सांगितला आहे. पण ह्या दोन अर्थांमध्यें कोणता बरें फरक आहे ?

अवक्षेपण म्हणजे निन्देचें कारण, आणि कुत्सित म्हणजे ज्याची निन्दा केली जाते तें निंदेचें कर्म.

पण अवक्षेपण म्ह. निंदेचें जें कारण तें स्वतः कुत्सित असतेंच, म्हणूनच त्याच्यामुळें ज्याची निंदा केली जाते तेंही कुत्सित होतें. तेव्हां ‘ कुत्सिते ’ या सूत्रानेंच करणाहूनही प्रत्यय सिद्ध होईल.

तर मग आतां जो पदार्थ स्वतः कुत्सित नसून केवळ कांहीं तरी कमीपणामुळें दुसऱ्याच्या निंदेला कारणीभूत होतो तो ह्या प्रकृत सूत्राचें उदाहरण होय. उदा० व्याकरणकेन नाम अयं गर्वितः, याज्ञिक्यकेन नाम अयं गर्वितः.

आतां जो पदार्थ दुसऱ्याच्या संबंधानें स्वतः निंदेला पात्र होतो तो ‘ कुत्सिते ’ याचेंच उदाहरण होय. उदा० देवदत्तकः, यज्ञदत्तकः.

( सू. ९८ ) येथें मनुष्य वाच्य असतांना जो हा लुप् सांगितला आहे तो कशाकरितां ? तो सांगावयास नको. लुक् सांगावा.

( वा. १ ) मूळ शब्दाचें लिंग कायम राहण्याकरितां ( १।२।५१ )[१] हा येथें मनुष्य वाच्य असतांना कन् प्रत्ययाचा लुप् सांगितला आहे उदा० चञ्चा इव चञ्चा, वध्रिका इव वध्रिका, खरकुटी इव खरकुटी.

---

१—( सू. ९५ ) जी वस्तु स्वतः कुत्सित नसून कांहीं कारणानें तिच्या योगानें दुसऱ्याची निंदा होते त्या वस्तूचा वाचक जो शब्द त्याहून स्वार्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—व्याकरणकेन त्वं गर्वितः.

१—( सू. ९६ ) प्रातिपदिकाहून त्यासारखी प्रतिकृति या अर्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—अश्व इव प्रतिकृतिः अश्वकः.

१—( सू. ९७ ) प्रातिपदिकाहून इवार्थी कन् प्रत्यय होतो परंतु तो प्रत्ययान्त शब्द कोणाचीतरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—अश्वकः नाम कश्चित् वृक्षादिः.

१—( सू. ९८ ) मनुष्याची संज्ञा असेल तर पूर्वसूत्रानें केलेल्या कन् प्रत्ययाचा लुप् होतो उदा०—चञ्चा इव चञ्चा नाम कश्चिन्मनुष्यः.

**जीविकार्थे चापण्ये ॥५।३।९९॥**

अपण्य इत्युच्यते तत्रेदं न सिध्यति । शिवः स्कन्दः विशाख इति । किं कारणम् । मौर्यैर्हिरण्यार्थिभिरर्चाः प्रकल्पिताः । भवेत्तासु न स्यात् । यास्त्वेताः संप्रतिपूजार्थास्तासु भविष्यति ॥

**[ देवपथादिभ्यश्च ॥५।३।१००॥**
**वस्तेर्ढञ् ॥ ५ । ३ । १०१ ॥**
**शिलाया ढः ॥ ५ । ३ । १०२ ॥**
**शाखादिभ्यो यः ॥५।३।१०३॥**
**द्रव्यं च भव्ये ॥ ५ । ३ । १०४ ॥**
**कुशाग्राच्छः ॥ ५ । ३ । १०५ ॥ ]**

**समासाच्च तद्विषयात्**
**॥ ५ । ३ । १०६ ॥**

तदित्यनेन किं प्रतिनिर्दिश्यते । छः । कथं पुनः समासो नाम च्छविषयः स्यात् ।

---

( सू. ९९ ) येथें 'अपण्ये' असें म्हटलें आहे. तेव्हां शिवः स्कन्दः, विशाखः हीं उदाहरणें सिद्ध होत नाहींत.

काय कारण ?

कारण असें कीं—द्रव्येच्छु अशा मौर्य लोकांनीं शिव स्कन्द वगैरेंच्या प्रतिमा तयार केल्या आहेत, व त्या विकून आपणाला द्रव्य मिळेल हा हेतु आहे.

तशाच इच्छेनें ज्या प्रतिमा तयार केल्या असतील त्या ठिकाणीं लुप् न होईल, पण हल्लीं पूजेकरितां ज्या केल्या आहेत त्या ठिकाणीं लुप् होईल. आणि शिवः, स्कन्दः, विशाखः अशीं रूपें होतील.

( सू. १०६ ) येथें तद्विषयात् येथील तद् या सर्वनाम शब्दानें कशाचा परामर्श केला आहे ?

छ प्रत्ययाचा परामर्श केला आहे.

पण तद्विषयात् हें समासाचें विशेषण आहे. आणि छ प्रत्ययाच्या विषयामध्यें कसा बरें समास असूं शकेल ?

---

१—( सू. ९९ ) इवार्थीं केलेल्या कन् प्रत्ययाचा लुप् होतो पण त्या प्रत्ययान्त शब्दाचा जो अर्थ तो विकावयाचा पदार्थ नसून जीविकासाधन असला पाहिजे उदा०—वासुदेव इव प्रतिकृतिः वासुदेवः. देवळांतील पूजेची मूर्ति हा अर्थ आहे. कारण ती पुजाऱ्याच्या जीविकेचें साधन होते.

१—( सू. १०० ) देवपथ वगैरे शब्दांहून इवार्थीं केलेल्या कन् प्रत्ययाचा लुप् होतो उदा०—देवपथः. हंसपथः.

१—( सू. १०१ ) वस्ति शब्दाहून इवार्थीं ढञ् प्रत्यय होतो. उदा०—वस्तिरिव वास्तेयम्.

१—( सू. १०२ ) शिला शब्दाहून इवार्थीं ढ प्रत्यय होतो. उदा०—शिलेव शिलेयम्.

१—( सू. १०३ ) शाखादि गणांतील शब्दांहून इवार्थीं य प्रत्यय होतो. उदा०—शाखा इव शाख्यः.

१—( सू. १०४ ) द्रु शब्दाहून इवार्थीं य प्रत्यय करून द्रव्य या शब्दाचें येथें निपातन केलें आहे. या द्रव्य शब्दाचा अर्थ 'अत्यन्त उपयुक्त अशी मोठ्या योग्यतेची आनन्ददायक वस्तु' असा आहे. उदा०—तत्तस्य किमपि द्रव्यम्.

( सू. १०५ ) कुशाग्र शब्दाहून इवार्थीं छ प्रत्यय होतो. उदा०—कुशाग्रमिव कुशाग्रीया बुद्धिः.

१—(सू. १०६) इवार्थीं केलेल्या समासाहून इवार्थीं छ प्रत्यय होतो. उदा०-काकतालीयः देवदत्तस्य वधः. काकतालीय शब्दामध्यें काकताल ही समासवृत्ति होय आणि त्या समासाहून पुढें इवार्थीं छ प्रत्यय होणें ही तद्धितवृत्ति होय. ह्या दोन्हीही वृत्ती निरनिराळ्या इवार्थीं झाल्या आहेत. समासवृत्तीच्या जोरावर काक शब्दाचा अर्थ काकागमन आणि ताल शब्दाचा अर्थ तालपतन असा आहे. या गोष्टीचा जसा एकदम आकस्मिक योग झाला तसा एका विशेष ठिकाणीं देवदत्त जावयाला आणि तेथें चोर यावयाला एकच गांठ पडणें हा इवार्थीं समास होय. नंतर 'तालाच्या आघातानें कावळा मृत झाला तसा चोराच्या आघातानें देवदत्त मृत झाला' ह्या इवार्थीं तद्धित छ प्रत्यय झाला आहे.

एवं तर्हीवार्थः । यदि तर्हि समासोऽपीवार्थे प्रत्ययोऽपि समासेनोक्तत्वात् प्रत्ययो न प्राप्नोति । एवं तर्हि द्वाविवार्थौ । कथम् । काकागमनमिव तालपतनमिव काकतालम् काकतालमिव काकतालीयम् ॥

[ शर्करादिभ्योऽण् ॥ ५।३।१०७ ॥

अङ्गुल्यादिभ्यष्ठक् ॥५।३।१०८॥

एकशालायाष्ठजन्यतरस्याम् ॥ ५ । ३ । १०९ ॥

कर्कलोहितादीकक् ॥ ५।३।११० ॥

प्रत्नपूर्वविश्वेमात्थाल् छन्दसि ॥ ५ । ३ । १११ ॥

पूगाञ्ञ्योऽग्रामणीपूर्वात् ॥ ५ । ३ । ११२ ॥

व्रातच्फञोरस्त्रियाम् ॥५।३।११३॥

आयुधजीविसंघाञ्ञ्यड्वाहीकेष्वब्राह्मणराजन्यात् ॥ ५ । ३ । ११४ ॥

वृकाट्टेण्यण् ॥ ५ । ३ । ११५ ॥

दामन्यादित्रिगर्तषष्ठाच्छः ॥ ५ । ३ । ११६ ॥

---

तर मग त्या तद् शब्दानें इव या अर्थाचा परामर्श केला आहे असें समजावें.

इवार्थाचा जर परामर्श केला तर इवार्थीच समास, आणि इवार्थीच हा छ प्रत्यय होणार तेव्हा इवार्थ हा समासानेंच उक्त होत असल्यामुळें त्याच अर्थी पुनः छ प्रत्यय होणार नाहीं.

तर मग आतां येथें इवार्थ दोन आहेत. काकागमनमिव तालपतनमिव काकतालम् हा समासाचा इवार्थ निराळा, आणि काकतालमिव काकतालीयम् हा प्रत्ययाचा इवार्थ निराळा.

---

( सू. १०७ ) शर्करा वगैरे शब्दांहून इवार्थी अण् प्रत्यय होतो उदा०—शर्करा इव शार्करम्.

१—( सू. १०८ ) अङ्गुली वगैरे शब्दांहून इवार्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०—अङ्गुलीव आङ्गुलिकम्.

( सू. १०९ ) एकशाला शब्दाहून इवार्थी ठच् प्रत्यय व एकदां ठक् प्रत्यय होतो. उदा०—एकशालेव एकशालिकः, ऐकशालिकः.

१—( सू. ११० ) कर्क आणि लोहित या शब्दांहून इवार्थी ईकक् प्रत्यय होतो. उदा०—कर्क इव कार्कीकः. लोहित इव लौहितीकः. कर्क म्हणजे पांढरा घोडा.

१—( सू. १११ ) प्रत्न, पूर्व, विश्व आणि इम या शब्दांहून इवार्थी थाल् प्रत्यय होतो. उदा०—तं प्रत्नथा पूर्वथा विश्वथेमथा.

१—( सू. ११२ ) पूग म्हणजे भिन्न भिन्न प्रकारच्या अनेक लोकांचा संघ; तद्वाचक शब्दाहून स्वार्थी ञ्य प्रत्यय होतो. उदा०—लौहितध्वज्यः. पण तो संघवाचक शब्द त्यांतील पुढाऱ्याच्या नांवावर लाभलेला नसावा. उदा०—एका संघाचा देवदत्त पुढारी आहे म्हणून त्या संघाला देवदत्तक (५।२।७८) म्हणतात. त्याहून हा ञ्य प्रत्यय होत नाहीं. या ञ्य प्रत्ययापासून सात सूत्रांनीं सांगितलेल्या प्रत्ययांना तद्राज अशी संज्ञा (५।३।११९) आहे. म्हणून बहुवचनी या प्रत्ययांचा लुक् (२।४।६२) होतो. उदा०—लोहितध्वजाः.

१—( सू. ११३ ) व्रात म्हणजे शारीरिक कष्टानें उपजीविका करणाऱ्या भिन्नभिन्न प्रकारच्या अनेक लोकांचा संघ. तद्वाचक शब्दाहून तसेंच च्फञ्-(४।१।९८) प्रत्ययान्त शब्दाहून स्वार्थी ञ्य प्रत्यय होतो, पण स्त्रीत्व-विवक्षा नसली पाहिजे. उदा०—कापोतपाक्यः, कपोतपाकाः; कौञ्जायन्यः.

१—( सू. ११४ ) वाहीक देशांतील आयुधजीवी लोकांचा जो संघ तद्वाचक शब्दाहून स्वार्थी ञ्युट् प्रत्यय होतो. तो संघ ब्राह्मण व क्षत्रिय यांशिवाय असावा. उदा०—क्षौद्रक्यः, क्षुद्रकाः.

१—( सू. ११५ ) आयुधजीवि मनुष्यांचा वाचक जो वृक शब्द त्याहून स्वार्थी टेण्यण् प्रत्यय होतो. उदा०—वार्केण्यः, वृकाः.

१—( सू. ११६ ) ज्यामध्यें त्रिगर्त हा सहावा आहे असे आयुधजीवि लोकांचे निरनिराळे कौण्डोपरथ वगैरे सहा गट आहेत; तद्वाचक शब्दाहून आणि दामन्यादि गणांतील शब्दाहून स्वार्थी छ प्रत्यय होतो. उदा०—दामनीयः, दामनयः. कौण्डोपरथीयाः, कौण्डोपरथाः.

पर्श्वादियौधेयादिभ्यामणञौ ॥ ५ । ३ । ११७ ॥]

अभिजिद्विदभृच्छालावच्छिखावच्छमीवदूर्णावच्छ्रुमदणो यञ् ॥ ५ । ३ । ११८ ॥

अणो गोत्राद्गोत्रवचनम् ॥ १ ॥

अणो गोत्राद्गोत्रग्रहणं कर्तव्यम्। गोत्रादिति वक्तव्यम्। इह मा भूत्। आभिजितो मुहूर्तः। आभिजितः स्थालीपाक इति। गोत्रमिति च वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। आभिजितकः। गोत्राश्रयो वुञ्यथा स्यात्॥ गात्रेमिति शक्यमकर्तुम्। कथमाभिजितकः। गोत्रादयं स्वार्थिको गोत्रमेव भवति॥

[ञ्यादयस्तद्राजाः ॥ ५।३।११९ ॥]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये पञ्चमस्याध्यायस्य तृतीये पादे द्वितीयमाह्निकम्॥ पादश्च समाप्तः॥

---

( सू. ११८ वा. १ ) हा जो येथें अण्-प्रत्ययान्त अशा अभिजित् वगैरे शब्दांहून स्वार्थी यञ् प्रत्यय सांगितला आहे तेथें तो अण् प्रत्यय गोत्र या अर्थी केलेला असला पाहिजे. शिवाय, जो यञ् प्रत्यय होतो तो गोत्रार्थी केलेल्या यञ् प्रत्ययासारखा समजावा असें म्हणावें. कारण, अभिजिता नक्षत्रेण युक्तः आभिजितः मुहूर्तः (४।२।३) तसेंच अभिजित् देवता अस्य आभिजितः स्थालीपाकः (४।२।२४) येथें अण्प्रत्ययान्ताहून हा यञ् प्रत्यय न झाला पाहिजे याकरितां गोत्रार्थी जो अण् असें म्हटलें पाहिजे. तसेंच होणारा जो हा यञ् प्रत्यय तो गोत्रार्थक यञ् प्रत्ययासारखा समजावा असेंही म्हटलें पाहिजे.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं—आभिजितकः येथें गोत्र-प्रत्ययान्ताहून सांगितलेला वुञ् प्रत्यय (४।३।१२६) झाला पाहिजे.

हा यञ् प्रत्यय गोत्रार्थक यञ् प्रत्ययासारखा समजावा असें म्हटलें नाहीं तरी चालेल.

पण तसें म्हटलें नाहीं तर आभिजितकः येथें वुञ् प्रत्यय कसा होईल ?

हा यञ् प्रत्यय गोत्रार्थक प्रत्ययान्ताहून होत आहे. तेव्हां हा स्वार्थी होत असल्यामुळें हा गोत्रार्थक आहे असें सहजच समजतां येईल.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पांचव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें व पादही समाप्त झाला.

---

१—( सू. ११७ ) आयुधजीविसंघवाचक अशा पर्शु वगैरे शब्दांहून स्वार्थी अण् प्रत्यय होतो आणि तशाच प्रकारच्या यौधेय वगैरे शब्दांहून स्वार्थी अञ् होतो. उदा०—पार्शवः, पर्शवः ; यौधेयः, यौधेयाः.

१—( सू. ११८ ) अभिजित्, विदभृत्, शालावत्, शिखावत्, शमीवत्, ऊर्णावत् आणि श्रुमत् यांहून अण् प्रत्यय केला असतां तदन्ताहून स्वार्थी यञ् प्रत्यय होतो. उदा०—अभिजितः अपत्यम् आभिजित्यः. अभिजित् शब्दाहून अपत्य अर्थी अण् (४।१।९२) प्रत्यय झाला आहे व पुढे हा यञ् प्रत्यय झाला आहे. वैदभृत्यः वैदभृताः इत्यादि.

१—( सू. ११९ ) ञ्य प्रत्ययाला (५।३।११२) आरंभ करून आतापर्यंत सात सूत्रांनीं सांगितलेले जे प्रत्यय त्यांना तद्राज अशी संज्ञा होते म्हणून त्या प्रत्ययांचा बहुत्व विवक्षा असतांना लुक् (२।४।६२) होतो. उदा०—लोहितध्वजाः, कपोतपाकाः इत्यादि.

अ. ५ पा. ३ समाप्त.

**पादशतस्य संख्यादेर्वीप्सायां वुन् लोपश्च ॥ ५ । ४ । १ ॥**

**पादशतग्रहणमनर्थकमन्यत्रापि दर्शनात् ॥ १ ॥**

पादशतग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । अन्यत्रापि दर्शनात् । अन्यत्रापि हि वुन् दृश्यते । द्विमोदकिकां ददाति ॥

**[दण्डव्यवसर्गयोश्च ॥ ५ । ४ । २॥]**

**स्थूलादिभ्यः प्रकारवचने कन् ॥ ५ । ४ । ३ ॥**

**कन्प्रकरणे चञ्चद्बृहतोरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

कन्प्रकरणे चञ्चद्बृहतोरुपसंख्यानं कर्तव्यम् । चञ्चत्कः बृहत्कः ॥

**अनत्यन्तगतौ क्तात् ॥ ५ । ४ । ४ ॥**

**अनत्यन्तगतौ क्तान्तात्तमादयः पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ १ ॥**

अनत्यन्तगतौ क्तान्तात्तमादयो भवन्ति पूर्वविप्रतिषेधेन । अनत्यन्तगतौ क्तान्तात्कन्भवतीत्यस्यावकाशः । अनत्यन्तगतेर्वचनं प्रकर्षस्यावचनम् । भिन्नकम् । छिन्नकम् । तमादीनामवकाशः । प्रकर्षस्य वचनमनत्यन्तगतेरवचनम् । पटुतरः पटु-

---

(सू. १) ह्या सूत्रामध्यें ' पादशतस्य ' असें जें म्हटलें आहे तें निरर्थक आहे.

काय कारण ?

कारण असें कीं–पाद व शत हे शब्द नसले तरी हा वुन् प्रत्यय झालेला दिसतो. उदा०—द्विमोदकिकां ददाति.

(सू. ३ वा. १) ह्या कन् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें चञ्चत् आणि बृहत् या शब्दांहून ' त्या प्रकारचा ' या अर्थी कन् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०- चञ्चत्कः, बृहत्कः.

(सू. ४ वा. १) अनत्यन्तगति हा अर्थ विवक्षित असतांना क्त-प्रत्ययान्ताहून हा जो कन् प्रत्यय सांगितला आहे त्यापेक्षां तम वगैरे प्रत्यय पूर्व-विप्रतिषेधानें होतात. ज्या ठिकाणीं अनत्यन्तगति हा अर्थ विवक्षित आहे आणि प्रकर्ष अर्थाची विवक्षा नाहीं त्या ठिकाणीं ' अनत्यन्तगतौ क्तात् ' या प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या कन् प्रत्ययाला अवकाश आहे; उदा० छिन्नकम् भिन्नकम्. याच्या उलट ज्या ठिकाणीं प्रकर्ष या अर्थाची विवक्षा आहे आणि अनत्यन्तगति या अर्थाची विवक्षा नाहीं त्या ठिकाणीं तम वगैरे प्रत्ययांना (५।३।५५) अवकाश आहे; उदा० पटुतरः पटुतमः. पण ज्या ठिकाणीं दोन्ही

---

१—(सू. १) ज्या शब्दाच्या शेवटीं पाद किंवा शत हे शब्द आहेत आणि आरंभी संख्या शब्द आहे त्याहून वीप्सा गम्यमान असतांना स्वार्थीं वुन् प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाबरोबरच पाद व शत या शब्दांतील शेवटच्या अकाराचा लोप होतो. उदा०— द्वौ द्वौ पादौ ददाति द्विपदिकां ददाति. येथे ' पादः पत् ' (६।४।१३०) यानें पद् आदेश झाला आहे. तो कर्तव्य असतांना लोपाला स्थानिवद्भाव (१।१।५७) मात्र होत नाही. कारण हा अकाराचा लोप या प्रकृत सूत्रानेंच झाला असल्यामुळे तो पराच्या निमित्तानें झालेला नाहीं.

१—(सू. २) ज्या शब्दाच्या शवटीं पाद किंवा शत हा शब्द आहे आणि आरंभी संख्या शब्द आहे त्याहून स्वार्थीं वुन् प्रत्यय होतो. पण दंड करणे किंवा दान करणे यांपैकीं व्यवहार असला पाहिजे. वीप्सा नसली तरी हरकत नाहीं. उदा०—द्वौ पादौ इति द्विपदिकां दण्डितः; द्विपदिकां ददाति इत्यादि.

१—(सू. ३) स्थूल वगैरे शब्दांहून ' त्या प्रकारचा ' या अर्थीं कन् प्रत्यय होतो. उदा०— स्थूलप्रकारः स्थूलकः.

१—(सू. ४) अनत्यन्तगति म्हणजे क्रियेचा सर्व बाजूंनें संबंध झालेला नसणें या अर्थाची विवक्षा असतांना क्त-प्रत्ययान्ताहून कन् प्रत्यय होतो. उदा०—छिन्नकम्. अर्धवट तुटलेले हा अर्थ आहे.

तमः । उभयवचन उभयं प्राप्नोति । भिन्नतरकम् छिन्नतरकम् । तमादयो भवन्ति पूर्वविप्रतिषेधेन ॥

**तदन्ताच्च स्वार्थे कन्वचनम् ॥ २ ॥**

तदन्ताच्च स्वार्थे कन्वक्तव्यः भिन्नतरकम् छिन्नतरकम् ॥

**नं सामिवचने ॥ ५ । ४ । ५ ॥**

**सामिवचने प्रतिषेधानर्थक्यं प्रकृत्यभिहितत्वात् ॥ १ ॥**

सामिवचने प्रतिषेधोऽनर्थकः । किं कारणम् । प्रकृत्याभिहितत्वात् । प्रकृत्याभिहितः सोऽर्थ इति कृत्वा कन्न भविष्यति ॥

**[बृहत्या आच्छादने ॥५ । ४ । ६॥]**

**अषडक्षाशितंग्वलंकर्मालंपुरुषाध्युत्तरपदात्खः ॥ ५ । ४ । ७ ॥**

**अध्युत्तरपदात्प्रत्ययविधानानुपपत्तिर्विग्रहाभावात् ॥ १ ॥**

अध्युत्तरपदात्प्रत्ययविधेरनुपपत्तिः । किं कारणम् । विग्रहाभावात् । विग्रहपू-

---

अर्थांची विवक्षा असेल त्या ठिकाणीं दोन्ही प्रत्ययांची प्राप्ति येते. तेथें तम वगैरे प्रत्यय पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतात. उदा० भिन्नतरकम्; छिन्नतरकम्.

(वा. २) त्या तम वगैरे प्रत्ययान्तांहून स्वार्थीं कन् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० भिन्नतरकम्; छिन्नतरकम्.

(सू. ५ वा. १) सामिवचन म्हणजे अर्ध या अर्थाचा वाचक शब्द तो उपपद असतांना हा जो कन् प्रत्ययाचा प्रतिषेध सांगितला आहे तो निरर्थक आहे.

काय कारण ?

कारण असें कीं मूळ शब्दानेंच तो अर्थ उक्त होतो म्हणून पुन्हां त्याहून त्या अर्थीं प्रत्यय होणारच नाहीं.

(सू. ७ वा. १) ज्या शब्दामध्यें अधि उत्तरपद आहे त्याहून ख प्रत्यय करतां येणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं जी येथें तद्धित प्रत्यय करून वृत्ति करावयाची आहे त्या अर्थीं विग्रहच दाखवितां येत नाहीं. विग्रह पूर्वी दाखवूनच तेथें वृत्तीमध्यें तद्धित प्रत्यय

---

२—एखादी वस्तु संबंध तुटलेली नाहीं पण जेवढा भाग तुटला आहे तेवढा मात्र पुरा तुटला आहे अशा ठिकाणीं कन् प्रत्ययाचा बाध करून तम प्रत्यय केला म्हणजे मागून भिन्नतर हे क-प्रत्ययान्त नसल्यामुळे कन् प्रत्ययाची प्राप्ति येत नाहीं. म्हणून पुढील वार्तिकानें येथें तर-प्रत्ययान्ताहून स्वार्थीं कन् प्रत्यय सांगितला आहे. अनत्यन्तगति या अर्थाचा बोध येथें शक्य असल्यास प्रकरणावरून होईल.

१—(सू. ५) अर्ध या अर्थाचा वाचक शब्द उपपद असतांना पूर्वसूत्रानें कन् प्रत्यय करूं नये. उदा०—सामिकृतम्; अर्धकृतम्

१—(सू. ६) आच्छादन अर्थ गम्यमान असतांना बृहती शब्दाहून स्वार्थीं कन् प्रत्यय होतो. उदा०—बृहतिका. पांघरण्याचें वस्त्र हा अर्थ आहे.

१—(सू. ७) अषडक्ष, आशितंगु, अलंकर्मन्, अलंपुरुष हे शब्द आणि अधिशब्द उत्तरपद असलेले शब्द याहून स्वार्थीं ख प्रत्यय होतो. उदा०—अषडक्षीण: मन्त्र:. सहा आहेत अक्षि म्हणजे नेत्र ज्यामध्यें तो षडक्ष होय. बहुव्रीहीहून समासान्त षच् प्रत्यय (५।४।११३) झाला आहे. न षडक्ष: अषडक्ष: अषडक्ष एव अषडक्षीण:; दोघांनीच केलेली मसलत हा अर्थ आहे. आशित म्ह. चारल्या आहेत गाई ज्यामध्यें असें जें रान तें आशितंगु. येथ निपातनामुळेंच आशित शब्दाला मुम् आगम झाला आहे; त्याहून हा स्वार्थीं ख प्रत्यय होतो. उदा०—आशितंगवीनम्. अलंकर्मीण:, कर्मणे अलम् असा चतुर्थी तत्पुरुष झाला आहे. तसाच अलंपुरुषीण: येथेंही समजावा राजाधीन:.

र्विका तद्धितोत्पत्तिर्न चाध्युत्तरपदेन विग्रहो दृश्यते ॥

तस्मात्तत्रेदमिति सधीनर् ॥ २ ॥

तस्मात्तत्रेदमिति सधीनर्प्रत्ययो वक्तव्यः। राजनीदं राजाधीनम् ॥ यदि सधीनर्क्रियते सकारस्येत्संज्ञा न प्राप्नोति । इह च श्र्यधीनः भ्र्वधीन इत्यङ्गस्येतीयङुवङौ स्याताम् । सूत्रं च भिद्यते ॥

यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमध्युत्तरपदात्प्रत्ययविधानानुपपत्तिर्विग्रहाभावादिति । नैष दोषः । अस्ति कारणं येनात्र विग्रहो न भवति । किं कारणम् । नित्यप्रत्ययोऽयम् । के पुनर्नित्यप्रत्ययाः । तमादयः प्राक्कनो ञ्यादयः प्राग्वुन आमादयः प्राङ् मयटो बृहतीजात्यन्ताः समासान्ताश्चेति ॥ एवं तर्हि नायं प्रत्ययविधिरुपालभ्यते । किं तर्हि । प्रकृतिरुपालभ्यते । अध्युत्तरपदा प्रकृतिर्नास्ति । किं कारणम् । विग्रहाभावात् । विग्रहपूर्विका समासवृत्तिर्न चाधिना विग्रहो

---

होत असतो. आणि अधि हा शब्द उत्तरपद आहे असा विग्रह तर कोठेंही प्रयोगांत आढळत नाहीं.

( वा. २ ) तेव्हां ' तत्र इदम् ' येथील इदम् म्हणजे हें या अर्थीं कोणत्याही शब्दाहून ' सधीनर् ' प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०— राजनि इदम् राजाधीनम्.

पण जर सधीनर् प्रत्यय केला तर त्या प्रत्ययांतील सकाराला कोणत्याच सूत्रानें इत्संज्ञा प्राप्त होत नाहीं. तसेंच श्र्यधीनः व भ्र्वधीनः येथें श्री व भ्रू या शब्दांहून हा अधीन प्रत्यय केला असतां श्री व भ्रू यांना अंग संज्ञा ( १ । ४ । १३ ) होत असल्यामुळें तेथें इयङ् व उवङ् [६।४।७७] आदेश होऊं लागतील. शिवाय, मूळचें सूत्र फिरवावें लागणारच.

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण मूळचें सूत्र कायम ठेविलें तर अधि शब्दानें विग्रह होत नसल्यामुळें अधि शब्द उत्तरपद असलेल्या शब्दाहून ख प्रत्यय करतां येणार नाहीं, असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. येथें विग्रह दाखवितां येत नाहीं याचें कारण निराळें आहे.

हें काय बरें कारण ?

हा येथें ख प्रत्यय नित्य होत आहे, हें तें कारण होय.

पण असे नित्य प्रत्यय कोणते कोणते बरें आहेत ?

कन् ( ५ । ३ । ९५ ) प्रत्ययाच्या पूर्वीपर्यंत तम ( ५ । ३ । ५५ ) वगैरे प्रत्यय, वुन् ( ५ । ४ । १ ) प्रत्ययाच्या पूर्वीपर्यंत ञ्य ( ५ । ३ । ११२ ) वगैरे प्रत्यय, मयट् ( ५ । ४ । २१ ) प्रत्ययाच्या पूर्वीपर्यंत आम् ( ५ । ४ । ११ ) वगैरे प्रत्यय, तसेंच बृहती शब्दापासून ( ५ । ४ । ६ ) पुढील सूत्र सोडून जात्यन्त शब्दापर्यंत ( ५।४।९ ) सांगितलेले प्रत्यय, आणि त्याप्रमाणेंच समासान्त ( ५ । ४ । ६८–१६० ) प्रत्यय हे सर्व प्रत्यय नित्य होत.

तर मग आतां ' अध्युत्तरपदात् (वा.१) या वार्तिकानें येथें प्रत्यय होणार नाहीं असा आक्षेप केला आहे असें समजूं नये.

मग या वार्तिकाचा अभिप्राय काय समजावयाचा ?

अभिप्राय असा आहे कीं—प्रकृतीसंबंधानें येथ आक्षेप केला आहे म्हणजे ज्या अध्युत्तरपदाहून हा ख प्रत्यय करावयाचा तो मूळ शब्दच तयार होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं— जी येथें 'राजाधि' इत्यादि प्रकारची वृत्ति करावयाची त्या अर्थीं विग्रहच दाखवितां येत नाहीं. विग्रह पूर्वी दाख-

दृश्यते। एवं तर्हि बहुव्रीहिर्भविष्यति। किं कृतं भवति। भवति वै कश्चिदस्वपदविग्रहोऽपि बहुव्रीहिः। तद्यथा। शोभनं मुखमस्याः सुमुखीति। नैवं शक्यम्। इह हि महदधीनमित्यात्त्वकपौ प्रसज्येयाताम्। एवं तर्ह्यव्ययीभावो भविष्यति। एवमप्यधेः पूर्वनिपातः प्राप्नोति। राजदन्तादिषु पाठः करिष्यते। अथवा सप्तमीसमासोऽयम्। अधिः शौण्डादिषु पठ्यते॥

## विभाषाञ्चेरदिक्स्त्रियाम्

॥५।४।८॥

दिग्ग्रहणं किमर्थम्। अस्त्रियामितीयत्युच्यमाने प्राचीना ब्राह्मणी अवाचीना शिखेत्यत्रापि प्रसज्येत। दिग्ग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति॥ अथ स्त्रीग्रहणं किमर्थं यावता दिक्शब्दः स्त्रीविषय एव। भवति वै कश्चिद्दिक्शब्दोऽस्त्रीविषयोऽपि। तद्यथा। प्राक् प्राचीनम् प्रत्यक् प्रतीचीनम्। उदक् उदीचीनम्॥

## [जात्यन्ताच्छ बन्धुनि ॥५।४।९॥

येथें तर अधि या शब्दानें विग्रह कोठेंही प्रयोगांत आढळत नाहीं.

तर मग आतां अधि शब्द उत्तरपद असलेला 'राजाधि' अशा प्रकारचा शब्द बहुव्रीहीनें साधतां येईल.

तो कसा बरें येथें समजावा?

कां बरें? अस्वपदविग्रह- (म्ह. ज्याचा विग्रह समासांतील पदानें दाखवितां येत नाहीं असा-) ही बहुव्रीहि असतोच. जसा शोभनं मुखमस्याः सुमुखी असा विग्रह होतो त्याप्रमाणें येथें राजा स्वामी यस्य राजाधिः असा विग्रह होईल.

असें होणें शक्य नाहीं. कारण, बहुव्रीहि असेल तर महदधीनम् येथें महदाधि या बहुव्रीहींतील महत् या पूर्वपदाला आत्व (६।४।४६) होऊं लागेल. आणि सर्वच ठिकाणीं बहुव्रीहीहून समासान्त कप् (५।४।१५४) प्रत्यय होऊं लागेल.

तर मग आता राजाधि वगैरे शब्द अव्ययीभाव (२।१।६) समासानें साधतां येतील.

तरी पण तेथें अधि शब्दाला उपसर्जन संज्ञा (१।२।४३) होऊन पूर्वनिपात (२।२।३०) प्राप्त होतो ना?

राजाधि वगैरे शब्दांची राजदन्तादि गणामध्यें कल्पना केली म्हणजे परनिपात(२।२।३१) होईल. अथवा हे राजाधि वगैरे शब्द सप्तमीतत्पुरुषानें साधावे. शौण्डादि गणामध्यें (२।१।४०) अधि हा शब्द घातला म्हणजे झालें.

(सू. ८) येथें दिक् शब्द कशाकरितां घातला आहे?

अशाकरिता घातला आहे कीं—अस्त्रियाम् असा येथें सामान्यतः स्त्रीलिंगाचा निषेध केला तर प्राचीना ब्राह्मणी, अवाचीना शिखा येथेंही या ख प्रत्ययाचा निषेध होऊं लागेल. येथें दिक् शब्द उच्चारला म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

आतां येथें स्त्री-ग्रहण कशाकरितां केलें आहे? तें करावयास नको, कारण दिग्वाचक शब्द स्त्रीलिंगीच दिसत असतात.

पण कांहीं ठिकाणीं दिग्वाचक शब्दही इतर लिंगी दिसतात. तेथें ख प्रत्यय झाला पाहिजे. उदा०—प्राक् प्राचीनम्, प्रत्यक् प्रतीचीनम्, उदक् उदीचीनम्.

---

१—(सू ८) अञ्च् धातु शेवटीं असलेल्या प्राच् वगैरे शब्दांहून स्वार्थी ख प्रत्यय विकल्पानें होतो. परंतु तो शब्द स्त्रीलिंगी दिग्वाचक नसावा. प्राक्, प्राचीनम्.

१—(सू. ९) जाति हा शब्द शेवटीं असलेला जो जातिमान् या अर्थाचा शब्द त्याहून स्वार्थी छ प्रत्यय होतो, उदा०— ब्राह्मणजातीयः. येथें ब्राह्मणजातीय या शब्दाचा अर्थ जातीनें ब्राह्मण असा आहे. तोच ब्राह्मणजातीय होय.

**स्थानान्ताद्विभाषा सस्थानेनेति चेत् ॥ ५ । ४ । १० ॥**

**किमेत्तिङव्ययघादाम्वद्रव्यप्रकर्षे ॥ ५ । ४ । ११ ॥**

**[ अमु च च्छन्दसि ॥ ५ । ४ । १२ ॥**

**अनुगादिनष्ठक् ॥ ५ । ४ । १३ ॥ ]**

**णचः स्त्रियामञ् ॥ ५ । ४ । १४ ॥**

स्त्रीग्रहणं किमर्थं न स्वार्थिकोऽयं स्वार्थिकाश्च प्रकृतितो लिङ्गवचनान्यनुवर्तन्ते । एवं तर्हि सिद्धे सति यत्स्त्रीग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः स्वार्थिका अतिवर्तन्ते ऽपि लिङ्गवचनानीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । गुडकल्पा द्राक्षा तैलकल्पा प्रसन्ना पयस्कल्पा यवागूरित्येतत्सिद्धं भवति ॥

**[ अणिनुणः ॥ ५ । ४ । १५ ॥**

**विसारिणो मत्स्ये ॥ ५ । ४ । १६ ॥**

**संख्यायाः क्रियाभ्यावृत्तिगणने कृत्वसुच् ॥ ५ । ४ । १७ ॥**

**द्वित्रिचतुर्भ्यः सुच् ॥ ५।४।१८ ॥**

**एकस्य सकृच्च ॥ ५ । ४ । १९ ॥**

---

(सू. १४) येथें 'स्त्रियाम्' असें कशाकरितां म्हटलें आहे? तें म्हणूं नये. कारण हा अञ् प्रत्यय स्वार्थी होणारा आहे. आणि स्वार्थिक प्रत्यय तर मूळ शब्दाचें जें लिंग व वचन त्यालाच अनुसरतात असा न्याय आहे.

तर मग आतां अशा रीतीनें इष्ट-सिद्धि होत असतांनाही येथें जें आचार्यांनीं स्त्रियाम् असें म्हटलें आहे त्यावरून ते असें सूचित करतात कीं—'स्वार्थिक प्रत्यय हे मूळ शब्दाच्या लिंगवचनांचें अतिक्रमणही करतात.'

या ज्ञापकाचा उपयोग काय?

उपयोग असा कीं—गुडकल्पा द्राक्षा, तैलकल्पा प्रसन्ना, पयस्कल्पा यवागूः हे प्रयोग सिद्ध होतात.

---

१—( सू. १० ) समान आहे स्थान ज्याचें तो सस्थान म्ह बरोबरीचा मनुष्य. हा सस्थान अर्थ ज्यामध्यें आहे असा जो स्थानशब्दान्त शब्द त्याहून स्वार्थी छ प्रत्यय विकल्पानें होतो. 'उदा०—पितृस्थानः, पितृस्थानीय', पित्रा तुल्यः असा अर्थ आहे.

१—( सू. ११ ) किम्, एकारान्त क्रियापद आणि अव्यय यांहून केलेला जो तरप् किंवा तमप् प्रत्यय तदन्त शब्दांहून स्वार्थी आम् प्रत्यय होतो, परंतु द्रव्याशिवाय गुण क्रिया इत्यादिकांचाच प्रकर्ष विवक्षित असला पाहिजे उदा०- कितमाम्, प्राह्णेतमाम्; पचतितराम्; उच्चैस्तराम्.

१—( सू. १२ ) पूर्वसूत्राचा विषय असेल तेथें वेदामध्य एकदा अम् असाही प्रत्यय होतो. उदा०—प्रतरम्.

१—( सू. १३ ) अनुगादिन् शब्दाहून स्वार्थी ठक् प्रत्यय होतो. उदा०— आनुगादिकः.

१—( सू. १४ ) णच्–( ३।३।४३ ) प्रत्ययान्ताहून स्वार्थी अञ् प्रत्यय स्त्रीलिंगामध्यें होतो. उदा०—व्यावक्रोशी.

२—मागें ( ५।३।६७ टीप ३,४,५ ) पाहणें.

१—( सू १५ ) इनुण् ( ३।३।४४ ) प्रत्ययान्ताहून स्वार्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—सांराविणम्.

१—( सू. १६ ) विसारिन् शब्दाहून स्वार्थी अण् प्रत्यय होतो. त्या प्रत्ययान्तशब्दाचा मत्स्य अर्थ असला पाहिजे. उदा०— वैसारिणः मत्स्यः.

१—( सू. १७ ) ज्या ठिकाणीं पुनः पुनः क्रिया केली जाते त्या ठिकाणीं ती क्रिया किती वेळां केली जाते त्या संख्येचा दर्शक जो संख्याशब्द त्याहून स्वार्थी कृत्वसुच् प्रत्यय होतो. उदा०—पञ्चकृत्वः भुङ्क्ते.

१—( सू. १८ ) पूर्वसूत्राच्या विषयामध्यें द्वि, त्रि, आणि चतुर् या शब्दाहून कृत्वसुच् प्रत्यय न होतां सुच् प्रत्यय होतो. उदा०—द्विर्भुङ्क्ते; त्रिर्भुङ्क्ते; चतुर्भुङ्क्ते.

१—( सू. १९ ) ज्या ठिकाणीं क्रिया एकदांच केली जाते त्या ठिकाणीं त्या क्रियेची संख्या दाखविणारा जो एक शब्द त्याहून सुच् प्रत्यय होतो आणि त्या प्रत्ययाबरोबरच त्या 'एक' शब्दाला सकृत् असा आदेश होतो. उदा०—सकृत् भुङ्क्ते. येथें सकृत् याच्या पुढील सुच् प्रत्ययाचा लोप (६।१।६८) झाला आहे.

सकृदादेशे ऽभ्यावृत्तिग्रहणं निवर्त्यम् । किं प्रयोजनम् । पुनःपुनरावृत्तिरभ्यावृत्तिर्नैकस्य पुनःपुनरावृत्तिर्भवति ॥

अथ क्रियाग्रहणनुवर्तेत उताहो न । किं चार्थोऽनुवृत्त्या । बाढमर्थः । इह मा भूत् । एको भुङ्क्त इति ॥ अथानुवर्तमानेऽपि क्रियाग्रहण इह कस्मान्न भवति एकः पाक इति । पूर्वयोश्चापि योगयोः कस्मान्न भवति द्वौ पाकौ त्रयः पाकाः चत्वारः पाकाः पञ्च पाकाः दश पाका इति । नैतत्क्रियागणनम् । किं तर्हि । द्रव्यगणनमेतत् । कथम् । कृदभिहितो भावो द्रव्यवद्भवतीति ॥ इहापि तर्हि द्रव्यगणनान्न प्राप्नोति सकृद्भुक्त्वा सकृद्भोक्तुमिति । पूर्वयोश्चापि योगयोर्द्विर्भुक्त्वा द्विर्भोक्तुम् त्रिर्भुक्त्वा त्रिर्भोक्तुम् पञ्चकृत्वो भुक्त्वा पञ्चकृत्वो भोक्तुम् दशकृत्वो भुक्त्वा दशकृत्वो भोक्तुमिति द्रव्यगणनान्न प्राप्नोति ॥ यदि खल्वपि पुनःपुनरावृत्ति-

---

( सू. १९ ) 'एक' या शब्दाला सकृत् हा आदेश सांगणाऱ्या ह्या सूत्रामध्यें अभ्यावृत्ति या शब्दाची अनुवृत्ति करूं नये.

काय कारण ?

कारण असें कीं अभ्यावृत्ति म्हणजे पुन्हां पुन्हां क्रिया करणें. तेव्हां एकदाच क्रिया केली असेल तेथें पुन्हां पुन्हां आवृत्ति होतच नाहीं !

आतां ह्या सूत्रामध्यें मागून क्रिया या शब्दाची अनुवृत्ति करावयाची कीं नाहीं ?

पण येथें क्रिया शब्दाच्या अनुवृत्तीचा उपयोग आहे काय ?

आहे तर, चांगलाच उपयोग आहे. एकः भुङ्क्ते येथें सुच् प्रत्यय व सकृत् आदेश होतां कामा नये.

पण येथें क्रिया शब्दाची अनुवृत्ति केली तरी 'एकः पाकः' येथें प्रकृत सूत्रानें सुच् प्रत्यय व सकृत् आदेश कां बरें होत नाहींत ? तसेंच पूर्वीच्या दोन सूत्रांसंबंधानेंही असाच प्रश्न उद्भवतोः द्वौ पाकौ, त्रयः पाकाः, चत्वारः पाकाः येथें पूर्वसूत्रानें सुच् प्रत्यय कां होत नाहीं ? तसेंच पञ्च पाकाः, दश पाकाः येथें संख्यायाः० ह्या सूत्रानें कृत्वसुच् प्रत्यय कां होत नाहीं ?

येथें हे प्रत्यय न होण्याचें कारण असें आहे कीं एकः पाकः, द्वौ पाकौ इत्यादि उदाहरणांमध्यें संख्या शब्दांनीं केलेली गणना क्रियेची होतच नाहीं.

तर त्या शब्दांनीं येथें कोणाची बरें गणना होते ?

द्रव्याची गणना होते.

ती कशी ?

ती अशी कीं, कृत् प्रत्ययानें प्रतिपादन केलेला धात्वर्थ हा द्रव्यासारखा होतो.

तर मग सकृद् भुक्त्वा सकृद् भोक्तुम् येथेंही एक शब्दानें द्रव्याचीच गणना होते असल्यामुळें प्रकृत सूत्राची प्रवृत्ति होणार नाहीं. पूर्वीच्या दोन सूत्रांसंबंधानेंही असाच प्रश्न उद्भवतो. द्विर्भुक्त्वा द्विर्भोक्तुम् त्रिर्भुक्त्वा त्रिर्भोक्तुम् येथें पूर्वसूत्रानें सुच् प्रत्यय होणार नाहीं. तसेंच पञ्चकृत्वः भुक्त्वा पञ्चकृत्वः भोक्तुम् दशकृत्वः भुक्त्वा दशकृत्वः भोक्तुम् येथें 'संख्याया क्रिया०' या सूत्रानें कृत्वसुच् प्रत्यय होणार नाहीं. कारण तेथेंही संख्याशब्दानें द्रव्याचीच गणना होत आहे. शिवाय

---

२—मोदक, पुरणपोळी वगैरे पदार्थ द्विपक्व होत. आंतील पुरणाचा पहिला पाक व पुनः मोदक, पोळी यांचा पाक. तसेंच कांहीं पाक असे आहेत कीं त्यांकरितां पदार्थ तीनदां किंवा त्यांहून अधिक वेळां सुद्धां भट्टींत घालावे लागतात.

३—म्हणूनच पाकः पाकौ येथें लिंग व वचन हीं लागलीं आहेत. लिंग व वचन हे द्रव्याचे धर्म होत.

४—कारण, येथेंही क्त्वा प्रत्यय (३।४।२१) व तुमुन् प्रत्यय (३।३।१०) हे कृत् प्रत्ययच आहेत.

रभ्यावृत्तिर्द्विरावृत्ते सकृदिति स्यात्रिरावृत्ते द्विरिति ॥

एवं तर्ह्यनुवर्ततेऽभ्यावृत्तिग्रहणं न तु पुनःपुनरावृत्तिरभ्यावृत्तिः । किं तर्हि । अभिमुखी प्रवृत्तिरभ्यावृत्तिः । पूर्वा च परे प्रत्यभिमुखी परे च पूर्वां प्रत्यभिमुख्यौ ॥ यदप्युच्यतेऽनुवर्तमानेऽपि क्रियाग्रहण इह कस्मान्न भवति एकः पाक इति पूर्वयोश्चापि योगयोर्द्वौ पाकौ त्रयः पाकाः चत्वारः पाकाः पञ्च पाकाः दश पाका इति परिहृतमेतन्नैतात्क्रियागणनम् किं तर्हि द्रव्यगणनमेतत् कथम् कृदाभिहितो भावो द्रव्यवद्भवतीति । ननु चोक्तमिहापि तर्हि द्रव्यगणनान्न प्राप्नोति सकृद् भुक्त्वा सकृद्भोक्तुमिति पूर्वयोश्चापि योगयोर्द्विर्भुक्त्वा द्विर्भोक्तुम् त्रिर्भुक्त्वा त्रिर्भोक्तुम् पञ्चकृत्वो भुक्त्वा पञ्चकृत्वो भोक्तुम् दशकृत्वो भुक्त्वा दशकृत्वो भोक्तुमिति द्रव्यगणनान्न प्राप्नोतीति । नैष दोषः । क्रिया-

---

अभ्यावृत्ति शब्दाचा खरोखरच अर्थ पाहिला तर पुनः पुनः आवृत्ति हा आहे. तेव्हां ज्या ठिकाणीं दोनदां क्रिया झालेली असते तेथें अभ्यावृत्ति एकदांच होत आहे असें समजलें जाईल. तसेंच तीनदां क्रिया असेल तेथें अभ्यावृत्ति दोनदांच समजली जाईल.

तर मग आतां येथें अभ्यावृत्ति शब्दाची अनुवृत्ति तर आहेच. परंतु त्याचा अर्थ मात्र येथें 'पुनः पुनः आवृत्ति' हा नाहीं.

तर मग येथें त्या अभ्यावृत्ति शब्दाचा काय अर्थ समजावयाचा ?

'अभिमुख अशी जी क्रियेची प्रवृत्ति' ती येथें अभ्यावृत्ति होय. प्रथमतः होणारी क्रिया देखील दुसऱ्यानदां व तिसऱ्यानदां होणाऱ्या क्रियांना अभिमुख असतेच, तसेंच त्या क्रियाही प्रथमतः होणाऱ्या क्रियेला अभिमुख असतातच.[६]

तसेंच आणखी जें म्हटलें आहे कीं 'क्रिया शब्दाची येथें अनुवृत्ति केली तरी एकः पाकः येथें प्रकृत सूत्रानें सुच् प्रत्यय व सकृत् आदेश कां होत नाहीं व द्वौ पाकौ, त्रयः पाकाः चत्वारः पाकाः, पञ्च पाकाः, दश पाकाः येथें पूर्वीच्या सूत्रांनीं सुच् व कृत्वसुच् प्रत्यय कां होत नाहींत' त्याचा परिहार केलाच आहे. तो असा कीं—येथें क्रियेची गणनाच नाहीं; तर द्रव्याचीच गणना आहे. कारण कृत् प्रत्ययानें प्रतिपादन केलेला धात्वर्थ हा द्रव्यासारखा दिसतो.

पण त्यानंतर "एकः पाकः याप्रमाणें सकृद् भुक्त्वा तसेंच सकृद् भोक्तुम् येथेंही सकृत् असा प्रयोग होणार नाहीं व द्विर्भुक्त्वा द्विर्भोक्तुम् त्रिर्भुक्त्वा त्रिर्भोक्तुम् पञ्चकृत्वः भुक्त्वा पञ्चकृत्वः भोक्तुम् दशकृत्वः भुक्त्वा दशकृत्वः भोक्तुम् येथें पूर्वीच्या सूत्रांनीं सुच् व कृत्वसुच् हे प्रत्यय होणार नाहींत, कारण तेथेंही द्रव्याचीच गणना होत आहे" असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं.

कारण तेथें क्रियेची गणना होत असल्या-

---

५—तेव्हां तशा ठिकाणीच प्रकृत सूत्रानें सुच् प्रत्यय व सकृत् आदेश होतील आणि एकंदर क्रिया तीनदां झाली असेल तेथेंच द्विर्भुङ्क्ते असा प्रयोग होईल.

६—मोदक वगैरे पदार्थ तयार करतांना जेव्हां अनेक वेळां पाक होतो तेव्हां त्या पाकक्रिया परस्परांच्या अपेक्षेनेंच होत असतात. दुसऱ्यानदां पाक करावयाचा आहे या उद्देशानेंच पहिली पाकक्रिया केली जाते. व पहिली पाकक्रिया झाली म्हणूनच पुढील पाकक्रिया होतात तेव्हां त्या सर्वच क्रिया एकमेकीला अभिमुख आहेत असें म्हणता येतें. आतां ज्या ठिकाणीं एकदांच क्रिया होते तेथेंही क्रिया ही फलप्राप्ति होण्याला अभिमुख असतेच तेव्हां तेथेंही अभ्यावृत्ति असल्यामुळें प्रकृत सूत्रानें सकृत् शब्दाचा प्रयोग करतां येईल.

गणनाद्भविष्यति । कथम् । कृदभिहितो भावो द्रव्यवदपि क्रियावदपि भवति ॥

**[ विभाषा बहोर्धाऽविप्रकृष्टकाले ॥ ५ । ४ । २० ॥**

**तत्प्रकृतवचने मयट् ॥५ । ४ । २१॥**

**समूहवच्च बहुषु ॥ ५ । ४ । २२ ॥**

**अनन्तावसथेतिहभेषजाञ्ञ्यः ॥ ५ । ४ । २३ ॥ ]**

**देवतान्तात्तादर्थ्ये यत् ॥५।४।२४॥**

देवतान्तादित्युच्यते तत्रेदं न सिध्यति । पितृदेवत्यमिति । किं कारणम् । न हि पितरो देवता ॥ नैष दोषः । दिवेरैश्वर्यकर्मणो देवस्तस्मात्स्वार्थे तल् । एवं च कृत्वा देवदेवत्यमपि सिद्धं भवति ॥

---

मुळें हे प्रत्यय होतील.

पण तेथें क्रियेची गणना कशी बरें समजावी?

अशी समजावी कीं—कृत् प्रत्ययानें प्रतिपादन केलेला धात्वर्थ हा द्रव्यासारखाही दिसतो आणि क्रियेसारखाही दिसतो.[७]

( सू. २४ ) 'देवता शब्द शेवटीं असलेल्या प्रातिपदिकाहून' असें येथें म्हटलें आहे. तेव्हां पितृदेवत्यम् हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं—पितर हे कांहीं देव नव्हेत.

हा दोष येत नाहीं. कारण, ह्या सूत्रांतील देवता शब्दामध्यें जो देव शब्द आहे तो देवजातीचा या अर्थाचा जाति शब्द नव्हे; तर ऐश्वर्य या अर्थाचा दिव् धातूपासून साधलेला यौगिक शब्द आहे. दीव्यतीति देवः अशी त्याची व्युत्पत्ति आहे. त्या देव शब्दाहून पुढें स्वार्थी तल् प्रत्यय झाला आहे. आणि असा देव शब्द आहे म्हणूनच देवदेवत्यम्[२] हाही प्रयोग सिद्ध होतो.

---

७—याची व्यवस्था साधारणतः अशी आहे की धातूपासून जी आपल्या अर्थाची प्रतीति होते ती सर्व ठिकाणीं क्रियारूपानेंच होते, व पुढें स्वार्थी केलेल्या कृत् प्रत्ययानें जी त्याच अर्थाची प्रतीति होते ती द्रव्य या रूपानेंच होते. त्या दोहोंमध्यें मुख्यत्व मात्र ज्या ठिकाणीं अव्यय संज्ञेला कारणीभूत कृत् प्रत्यय असेल तेथें धातूपासून प्रतीत होणाऱ्या अर्थाला असतें आणि घञ् वगैरे इतर कृत्प्रत्ययस्थलीं प्रत्ययापासून प्रतीत होणाऱ्या अर्थाला असतें.

१—( सू. २० ) पुन्हा पुन्हां केली जाणारी जी क्रिया तिची गणना दाखविणारा जो बहु हा संख्याशब्द त्याहून धा प्रत्यय विकल्पानें होतो, परतु त्या अनेक वेळां होणाऱ्या क्रियांमध्यें फार अंतर नसावें. उदा०—बहुधा दिवसस्य भुङ्क्ते; बहुकृत्व.

१—( सू. २१ ) एखादा पदार्थ कांहीं ठिकाणीं पुष्कळ असतो अशा अर्थाची विवक्षा असतांना त्या पदार्थवाचक शब्दाहून स्वार्थी मयट् प्रत्यय होतो. उदा०—अन्नमयम्. बहु अन्नम् अत्र वर्तते अन्नमयो यज्ञः. असाही प्रयोग होतो. तेथें पुष्कळ अन्न ज्यामध्यें आहे असा अन्नमय शब्दाचा अर्थ लक्षणेनें समजावा.

१—( सू २२ ) पूर्व सूत्राच्या विषयामध्यें त्या पदार्थांची बहुत्व संख्या विवक्षित असेल तर त्या पदार्थाच्या वाचक अशा ज्या शब्दाहून समूह या अर्थी जो प्रत्यय होत असतो तो प्रत्यय व मयट् प्रत्यय असे दोन्ही प्रत्यय त्या शब्दाहून स्वार्थी होतात. उदा०—मोदकिकम्, मोदकमयम् मोदक शब्दाहून समूह या अर्थीं ठक् प्रत्यय (४।२।४७) होत असतो.

१—( सू. २३ ) अनन्त, आवसथ, इतिह आणि भेषज या चार शब्दांहून स्वार्थी ञ्य प्रत्यय होतो. उदा०—अनन्त एव आनन्त्यम्, इत्यादि.

१—( सू २४ ) देवता शब्द शेवटीं असलेल्या प्रातिपदिकाहून 'त्याकरितां जें' या अर्थी यत् प्रत्यय होतो. उदा०—अग्निदेवतार्थं इदम् अग्निदेवत्यम्.

२—जर देव हा शब्द केवळ जाति-शब्दच असेल तर त्याचा देवदेवत्यम् असा दोनदां प्रयोग करतां येणार नाही.

[पादार्घाभ्यां च ॥ ५ । ४ । २५ ॥
अतिथेर्ञ्यः ॥ ५ । ४ । २६ ॥]
देवात्तल् ॥ ५ । ४ । २७ ॥
तलि स्त्रीलिङ्गवचनम् ॥ १ ॥

तलि स्त्रीलिङ्गं वक्तव्यम् । देवता । किं पुनः कारणं न सिध्यति । देवशब्दोऽयं पुँल्लिङ्गः स्वार्थिकश्चायं स्वार्थिकाश्च प्रकृतितो लिङ्गवचनान्यनुवर्तन्ते ॥

उक्तं वा ॥ २ ॥

किमुक्तम् । स्वार्थिका अतिवर्तन्तेऽपि लिङ्गवचनानीति ॥

[अवेः कः ॥ ५ । ४ । २८
यावादिभ्यः कन् ॥ ५ । ४ । २९ ॥]
लोहितान्मणौ ॥ ५ । ४ । ३० ॥
लोहिताल्लिङ्गबाधनं वा ॥ १ ॥

लोहिताल्लिङ्गबाधनं वेति वक्तव्यम् । लोहितिका लोहिनिका ॥

अक्षरसमूहे छन्दस उपसंख्यानम् ॥२॥

अक्षरसमूहे छन्दस उपसंख्यानं कर्तव्यम् । ओ श्रावयेति चतुरक्षरम् । अस्तु

---

( सू, २७ वा, १ ) तल्-प्रत्ययान्त शब्द स्त्रीलिंगीं चालतो असें सांगावें. उदा० —देव एव देवता.

पण येथें सांगितल्याशिवाय हा शब्द स्त्रीलिंगीं कां बरें चालणार नाहीं ?

न चालण्याचें कारण असें कीं देव हा मूळ शब्द पुंल्लिंगी आहे, व पुढें झालेला तल् प्रत्यय हा स्वार्थींच आहे. आणि स्वार्थिक प्रत्यय तर मूळ शब्दाच्या लिंगवचनाला अनुसरतात असा न्यायच आहे.

( वा. २ ) अथवा हें मागें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

स्वार्थिक प्रत्यय हे मूळ शब्दाच्या लिंगवचनांचा अतिक्रमही करतात (५।३।६७) असें मागें सांगितलेंच आहे.

( सू. ३० वा. १ ) लोहित शब्दाहून स्वार्थीं होणाऱ्या ह्या कन् प्रत्ययानें लिंगप्रत्ययाचा बाध विकल्पानें होतो असें म्हणावें. लोहितिका, लोहिनिका.

( वा. २ ) छन्दस् शब्दाहून स्वार्थीं यत् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०—

ओ श्रावयेति चतुरक्षरम् । अस्तु श्रौषडिति चतुरक्षरम् । ये यजामहे इति पञ्चाक्षरम् ।

---

१—( सू. २५ ) पाद व अघ या शब्दाहून 'त्याकरितां जें' या अर्थी यत् प्रत्यय होतो उदा०— पादार्थमुदकं पाद्यम्. अर्घ्यम्.

१—( सू. २६ ) अतिथि शब्दाहून 'त्याकरितां जे' या अर्थी ञ्य प्रत्यय होतो. उदा०—अतिथये इदम् आतिथ्यम्.

१—( सू. २७ ) देव शब्दाहून स्वार्थी तल प्रत्यय होतो उदा०—देव एव देवता.

१—( सू. २८ ) अवि शब्दाहून स्वार्थी क प्रत्यय होतो उदा०—अविरेवाविकः.

१—( सु. २९ ) याव वगैरे शब्दांहन स्वार्थी कन् प्रत्यय होतो उदा० याव एव यावकः.

१—( सू. ३० ) लोहित शब्दाहून स्वार्थी कन् प्रत्यय मणि हा अर्थ विवक्षित असतांना होतो. उदा०— लोहित एव लोहितकः मणिः.

२—स्वार्थाची उपस्थिति प्रथमतःच होत असल्यामुळें स्वार्थीं होणारा प्रत्यय अंतरंग आहे. तो स्त्रीलिंगबोधक डीप् ( ४।१।३९ ) प्रत्ययाचा बाध करून अगोदर होईल नंतर लोहितक याहून स्त्रीलिंगबोधक टाप् व इत्त्व (७।३।४४) होऊन लोहितिका असें एकच रूप होईल. ह्या स्वार्थीं कन् प्रत्ययानें लिंगप्रत्ययाचा बाध विकल्पानें केला म्हणजे एकदां अगोदर स्त्रीलिंगबोधक डीप् प्रत्यय व नकार आदेश होऊन लोहिनी असें होतें व नंतर पुढें कन् प्रत्यय केला म्हणजे लोहिनिका असेंही एकदां रूप होतें.

३—ओ श्रावय (४) अस्तु श्रौषट् (४) ये यजामहे (५) यज (२) वषट् (२) हीं सतरा (१७) अक्षरें मिळून छन्द होय. छन्द एव छन्दस्यः. हें वार्तिक आणि पुढील दोन वार्तिकें मागें (४।४।१४० वा. १-३) गेली आहेत.

श्रौषडिति चतुरक्षरम् । ये यजामह इति पञ्चाक्षरम् । यजेति द्व्यक्षरम् । द्व्यक्षरो वषट्कारः । एष वै सप्तदशाक्षरश्छन्दस्यः प्रजापतिर्यज्ञमनुविहितः ॥

छन्दसि बहुभिर्वसव्यैरुपसंख्यानम् ॥ ३ ॥

छन्दसि बहुभिर्वसव्यैरुपसंख्यानं कर्तव्यम् । हस्तौ पृणस्व बहुभिर्वसव्यैः ॥

अग्निरीशे वसव्यस्येति ॥ ४ ॥

अग्निरीशे वसव्यस्येत्युपसंख्यानं कर्तव्यम् ॥

उक्तं वा ॥ ५ ॥

किमुक्तम् । स्वार्थविज्ञानात्सिद्धमिति ॥

अपस्यो वसानाः । अपो वसानाः ॥ स्व ओक्ये । स्व ओके ॥ कव्योऽसि हव्यसूदन कविरसि ॥ रौद्रेणानीकेन कव्यतायै । कवितायै ॥ आमुष्यायणस्य । अमुष्यपुत्रस्य ॥ क्षेम्यस्येशे । क्षेमस्येशे ॥ क्षेम्यमध्यवस्यति । क्षेममध्यवस्यति ॥ आयुर्वर्चस्यम् । वर्च एव वर्चस्यम् ॥ निष्केवल्यम् । निष्केवलम् ॥ उक्थ्यम् । उक्थम् ॥ जन्यं ताभिः सजन्यं ताभिः । जनं ताभिः सजनं ताभिः ॥ स्तोमैर्जनयामि नव्यम् । नवम् ॥ प्रणो नव्येभिः । नवैः ॥ ब्रह्म पूर्व्यम् । पाथः पूर्व्यम् । तनुषु पूर्व्यम् । पूर्वम् ॥ पूर्व्याहः पूर्वाह्णः ॥ पूर्व्या विशः

---

यजेति द्व्यक्षरम् । द्व्यक्षरो वषट्कारः । एष वै सप्तदशाक्षरः छन्दस्यः प्रजापतिर्यज्ञमनुविहितः ॥

( वा- ३ ) वेदामध्यें बहुभिर्वसव्यैः येथें वसु शब्दाहून यत् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०-हस्तौ पृणस्व बहुभिर्वसव्यैः.

( वा. ४ ) अग्निरीशे वसव्यस्य येथें वसु शब्दाहून यत् प्रत्यय होतो असें म्हणावें.

( वा. ५ ) अथवा हें मागें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

स्वार्थविज्ञानात्सिद्धम् ( ४।४।१४० वा. ४ ) असें सांगितलेंच आहे.

वेदांमधील बरींच रूपें स्वार्थी यत् वगैरे प्रत्यय करून सिद्ध होतात. उदा०-अप् शब्दाचें द्वितीया बहुवचन अपः असें होतें. त्या अपस् शब्दाहून स्वार्थी यत् प्रत्यय होतो. अपस्यः वसानाः म्हणजे अपः वसानाः. उदक पांघरणारे असा अर्थ आहे. अप् शब्दापुढील द्वितीयेचा अलुक् झाला आहे. ओक ( ७।३।६४ ) शब्दाहून यत् प्रत्यय होतो. उदा०---स्व ओक्ये; स्वे ओके असा अर्थ आहे. कवि शब्दाहून यत् प्रत्यय होतो. उदा०--कव्योऽसि मधूसूदन, कविः असि असा अर्थ आहे. रौद्रेणानीकेन कव्यतायै येथें कव्यतायै याचा कवितायै असा अर्थ आहे. अमुष्य याहून फक् प्रत्यय व षष्ठीचा अलुक् होतो. अमुष्य पुत्रस्य असा अर्थ आहे. क्षेम शब्दाहून यत् प्रत्यय होतो; उदा० क्षेम्यस्येशे; क्षेमस्येशे असा अर्थ आहे. क्षेम्यमध्यवस्यति क्षेममध्यवस्यति असा अर्थ आहे. वर्चस् शब्दाहून यत् प्रत्यय होतो. उदा०---आयुर्वर्चस्यम्; वर्चः एव वर्चस्यम् असा अर्थ आहे. निष्केवल शब्दाहून यत् प्रत्यय होतो. उदा०-निष्केवलम् एव निष्केवल्यम्. उक्थ शब्दाहून यत् प्रत्यय होतो;उक्थम् एव उक्थ्यम्. जन आणि सजन शब्दांहून यत् प्रत्यय होतो. उदा०--जन्यं ताभिः, सजन्यं ताभिः; जनं ताभिः सजनं ताभिः असा अर्थ आहे. नव शब्दाहून यत् प्रत्यय होतो. स्तोमैर्जनयामि नव्यम्, नवम् असा अर्थ आहे. तसेंच प्र णो नव्येभिः येथें नव्येभिः याचा नवैः असा अर्थ आहे. पूर्व शब्दाहून यत् प्रत्यय होतो उदा०--ब्रह्म पूर्व्यम् पाथः पूर्व्यम् तनुषु पूर्व्यम्. पूर्वम् असा अर्थ आहे. त्याप्रमाणेंच पूर्व्याहः याचा पूर्वाह्णः असा

पूर्वा विशः ॥ पूर्व्यासः । पूर्वासः ॥ स प्र पूर्व्यः । स प्र पूर्वः ॥ आग्निं वः पूर्व्यम् । पूर्वम् ॥ तं जुषस्व यविष्ठ्य । यविष्ठ ॥ होत्रवाहं यविष्ठ्यम् । यविष्ठम् ॥ त्वं ह यद्यविष्ठ्य । यविष्ठ ॥ समावद्वसति समावद्गृह्णाति । समं वसति समं गृह्णाति ॥ समावद्देवयज्ञे हस्तौ । समम् । समावद्वीर्यावहानि । समानि॥ समावद्वीर्याणि करोति । समानि॥ ईवत उ लोकम् । य ईवते ब्रह्मणे । य इयते ॥

**नवस्य नू त्नप्तनखाश्च ॥ ६ ॥**

नवस्य नू इत्ययमादेशो वक्तव्यः । त्नप्तनखाश्च प्रत्यया वक्तव्याः । नूत्नम् नूतनम् नवीनम् ॥

**नश्च पुराणे प्रात् ॥ ७ ॥**

नश्च पुराणे प्राद्वक्तव्यः । त्नप्तनखाश्च प्रत्यया वक्तव्याः । प्रणम् प्रत्नम् प्रतनम् प्रीणम् ॥

**[ वर्णे चानित्ये ॥ ५ । ४ । ३१ ॥**

**रक्ते ॥ ५ । ४ । ३२ ॥**

**कालाच्च ॥ ५ । ४ । ३३ ॥**

**विनयादिभ्यष्ठक् ॥ ५ । ४ । ३४ ॥**

**वाचो व्याहृतार्थायाम् ॥५।४।३५॥]**

**तद्युक्तात्कर्मणोऽण् ॥ ५ । ४ । ३६ ॥**

तदित्यनेन किं प्रतिनिर्दिश्यते । वागेव वाचा व्याह्रियते तत्कर्मणा क्रियते ॥

---

अर्थ आहे. पूर्व्या विशः याचा पूर्वा विशः असा अर्थ आहे. पूर्व्यासः याचा पूर्वासः असा अर्थ आहे. स प्र पूर्व्यः याचा स प्र पूर्वः असा अर्थ आहे. अग्निं वः पूर्व्यम् येथें पूर्व्यम् याचा पूर्वम् असा अर्थ आहे. यविष्ठ शब्दाहून यत् प्रत्यय होतो. उदा०--तं जुषस्व यविष्ठ्य; यविष्ठ असा अर्थ आहे. त्याप्रमाणेंच होत्रवाहं यविष्ठ्यम् येथें यविष्ठम् असा अर्थ आहे. त्वं ह यद्यविष्ठ्य येथेंही यविष्ठ असा अर्थ आहे. 'सम' शब्दाहून 'आवतु' प्रत्यय होतो. उदा०-समावद्वसति, समावद्गृह्णाति सम वसति समं गृह्णाति असे अर्थ आहेत. तसेंच समावद्देवयज्ञे हस्तौ येथें समम् असा अर्थ आहे; समावद्वीर्यावहानि येथें समानि असा अर्थ आहे; आणि समावद्वीर्याणि करोति येथे समानि असा अर्थ आहे. इयते शब्दाच्या इकाराला दीर्घ होतो. ईवत उ लोकम्; य ईवते ब्रह्मणे; य इयते असा अर्थ आहे.

( वा. ६ ) नव शब्दाला नू आदेश होतो आणि पुढें त्नप्, तन, आणि ख हे प्रत्यय होतात असें म्हणावें. नूत्नम्, नूतनम् नवीनम्

( वा. ७ ) पुराण या अर्थाच्या प्र शब्दाहून न प्रत्यय होतो आणि त्नप्, तन, व ख हेही प्रत्यय होतात असें म्हणावें. उदा०-प्रणम्, प्रत्नम्, प्रतनम्, प्रीणम्.

( सू. ३६ ) ह्या सूत्रांतील तत् शब्दानें कशाचा परामर्श केला आहे ?

वाणीचा परामर्श केला आहे. जें निरोप

---

१—( सू. ३१ ) क्षणिक जो रक्तवर्ण तद्वाचक लोहित शब्दाहून स्वार्थी कन् प्रत्यय होतो. उदा० — लोहितकः कोपेन.

१—( सू. ३२ ) रंगविलेला जो पदार्थ तद्वाचक लोहित शब्दाहून स्वार्थी कन् प्रत्यय होतो. उदा०— लोहितकः पटः.

१—( सू. ३३ ) क्षणिक काळा वर्ण किंवा रंगविलेला काळा वर्ण या अर्थाच्या काल शब्दाहून स्वार्थी कन् प्रत्यय होतो. उदा०—कालकं मुखं वैलक्षण्येन; कालकः पटः.

१—( सू. ३४ ) विनय वगैरे शब्दांहून स्वार्थी ठक् प्रत्यय होतो. उदा० —विनय एव वैनयिकः.

१—( सू. ३५ ) वाच् शब्दाहून स्वार्थी ठक् प्रत्यय होतो, पण त्या वाणीचा अर्थ पूर्वी प्रकाशित झाला असला पाहिजे उदा०—वाक् एव वाचिकम्. संदेश ( निरोप ) हा अर्थ आहे.

१—( सू. ३६ ) कर्मन् शब्दाहून स्वार्थी अण् प्रत्यय होतो, परंतु तें कर्म संदेशानें युक्त असलें पाहिजे. उदा०--कर्म एव कार्मणम्. संदेशाप्रमाणें केलें जाणारें कर्म हा अर्थ आहे.

**अण्प्रकरणे कुलालवरुडनिषादचण्डालामित्रेभ्यश्छन्दसि ॥ १ ॥**

अण्प्रकरणे कुलालवरुडनिषादचण्डालामित्रेभ्यश्छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम्। कौलालः वारुडः नैषादः चाण्डालः आमित्रः॥

**भागरूपनामभ्यो धेयः ॥ २ ॥**

भागरूपनामभ्यो धेयो वक्तव्यः। भागधेयम् रूपधेयम् नामधेयम् ॥

**मित्राच्छन्दसि ॥ ३ ॥**

मित्राच्छन्दसि धेयो वक्तव्यः। मित्रधेये यतस्व ॥

**अणमित्राच्च ॥ ४ ॥**

अणमित्राच्चेति वक्तव्यम्। मैत्रः आमित्रः ॥

सांनाय्यानुजावरानुषूकचातुष्प्राश्यराक्षोघ्नवैयातवैकृतवारिवस्कृताग्रायणाग्रहायणसांतपनानि निपात्यन्ते। सांनाय्यम् आनुजावरः आनुषूकः चातुष्प्राश्यः राक्षोघ्नः वैयातः वैकृतः वारिवस्कृतः आग्रायणः आग्रहायणः सांतपनः ॥

**आग्नीध्रसाधारणादञ् ॥ ५ ॥**

आग्नीध्रसाधारणादञ्वक्तव्यः। आग्नीध्रम् साधारणम् ॥

**अयवसमरुद्भ्यां छन्दसि ॥ ६ ॥**

अयवसमरुद्भ्यां छन्दस्यञ्वक्तव्यः। आयवसे वर्धन्ते। मारुतं शर्धः ॥

**नवसूरमर्तयविष्ठेभ्यो यत् ॥ ७ ॥**

नवसूरमर्तयविष्ठेभ्यो यद्वक्तव्यः। नव्यः सूर्यः मर्त्यः यविष्ठ्यः ॥

**क्षेमाद्यः ॥ ८ ॥**

क्षेमाद्यो वक्तव्यः। क्षेम्यस्तिष्ठन्प्रतरणः सुवीरः ॥

**[ ओषधेरजातौ ॥ ५ । ४ । ३७ ॥**

म्हणून सांगितलेल्या निरोपाप्रमाणें केलें जाणारें कर्म तें कार्मण होय.

( वा. १ ) ह्या अण् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें कुलाल, वरुड, निषाद, चण्डाल आणि अमित्र या शब्दांहून स्वार्थी अण् प्रत्यय वेदामध्यें होतो असें म्हणावें. उदा० कुलाल एव कौलालः, वारुडः, नैषादः, चाण्डालः, आमित्रः.

( वा. २ ) भाग, रूप आणि नामन् या शब्दांहून स्वार्थी धेय प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० भागधेयम्; रूपधेयम्, नामधेयम् .

( वा. ३ ) वेदामध्यें मित्र शब्दाहून स्वार्थी धेय प्रत्यय होतो असें म्हणावें उदा० मित्रधेये यतस्व.

( वा. ४ ) अमित्र आणि मित्र या दोन्ही शब्दांहून स्वार्थी अण् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा० मैत्रः, आमित्रः.

सांनाय्य, आनुजावर, आनुषूक, चातुष्प्राश्य, राक्षोघ्न, वैयात, वैकृत, वारिवस्कृत, आग्रयण, आग्रहायण, आणि सांतपन हे शब्द स्वार्थी अण्-प्रत्ययान्त निपातन केले जातात. उदा० सांनाय्यम्; आनुजावरः; आनुषूकः; चातुष्प्राश्यः; राक्षोघ्नः; वैयातः, वैकृतः; वारिवस्कृतः; आग्रायणः; आग्रहायणः; सांतपनः.

( वा. ५ ) आग्नीध्र आणि साधारण या शब्दांहून स्वार्थी अञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—आग्नीध्रम्; साधारणम्.

( वा. ६ ) अयवस आणि मरुत् या शब्दांहून स्वार्थी अञ् प्रत्यय वेदामध्यें होतो, असें म्हणावें. उदा०—आयवसे वर्धन्ते, मारुतं शर्धः.

( वा. ७ ) नव, सूर, मर्त, आणि यविष्ठ या शब्दाहून स्वार्थी यत् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—नव्यः; सूर्यः; मर्त्यः; यविष्ठ्यः.

( वा. ८ ) क्षेम शब्दाहून स्वार्थी य प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—क्षेम्यस्तिष्ठन् प्रतरणः सुवीरः.

१—( सू. ३७ ) ओषधि शब्दाहून स्वार्थी अण् प्रत्यय होतो, परंतु तो ओषधि शब्द जातिवाचक नसला पाहिजे. उदा० —ओषधिः एव औषधम्.

**प्रज्ञादिभ्यश्च ॥ ५ । ४ । ३८ ॥**

**मृदस्तिकन् ॥ ५ । ४ । ३९ ॥**

**सस्नौ प्रशंसायाम् ॥ ५ । ४ । ४० ॥**

**वृकज्येष्ठाभ्यां तिल्तातिलौ च च्छन्दसि ॥ ५ । ४ । ४१ ॥ ]**

**बह्वल्पार्थाच्छस्कारकादन्यतरस्याम् ॥ ५ । ४ । ४२ ॥**

**बह्वल्पार्थान्मङ्गलामङ्गलवचनम् ॥ १ ॥**

बह्वल्पार्थान्मङ्गलवचनं कर्तव्यम् । बहुशो देहि । अनिष्टेषु श्राद्धादिषु मा भूदिष्टेषु प्राशित्रादिषु यथा स्यात् । अल्पशो देहि । इष्टेषु प्राशित्रादिषु मा भूदनिष्टेषु श्राद्धादिषु यथा स्यात् ॥

**[ संख्यैकवचनाच्च वीप्सायाम् ॥ ५ । ४ । ४३ ॥ ]**

**प्रतियोगे पञ्चम्यास्तसिः ॥ ५ । ४ । ४४ ॥**

**तसिप्रकरण आद्यादिभ्य उपसंख्यानम् ॥ १ ॥**

तसिप्रकरण आद्यादिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । आदितः मध्यतः अन्ततः ॥

---

( सू. ४२ वा. १ ) मंगलकार्यांमधील व्यवहार असेल तरच बह्वर्थक शब्दाहून आणि अमंगल कार्यामधील व्यवहार असेल तरच अल्पार्थक शब्दाहून हा शस् प्रत्यय होतो असें म्हणावें. ‘ बहुशः देहि ’ असा प्रयोग श्राद्ध वगैरे अमंगलकार्यांमध्यें न झाला पाहिजे; तर प्राशित्रे वगैरे ठिकाणींच झाला पाहिजे. तसाच ‘ अल्पशः देहि ’ असा प्रयोग प्राशित्र वगैरे ठिकाणीं न झाला पाहिजे, तर अमंगल अश श्राद्ध वगैरे ठिकाणींच झाला पाहिजे.

( सू. ४४ वा. १ ) ह्या तसि प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें आदि वगैरे शब्दांहून तसि प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा० आदितः; मध्यतः; अन्ततः. येथें हा प्रत्यय सर्व विभक्त्यन्तांहून होतो.

---

१—( सू ३८ ) प्रज्ञ वगैरे शब्दांहून स्वार्थी अण् प्रत्यय होतो. उदा०—प्रज्ञ एव प्राज्ञः.

१—( सू. ३९ ) मृद् शब्दाहून स्वार्थी तिकन् प्रत्यय होतो. उदा०--मृद् एव मृत्तिका.

१—( सू. ४० ) मृद् शब्दाहून स्वार्थी स आणि स्न हे प्रत्यय होतात प्रशंसा अर्थ गम्यमान असतांना. उदा०—मृत्सा, मृत्स्ना. हे प्रत्यय रूपप् (५।३।६६) प्रत्ययाचा बाध करितात.

१—( सू ४१ ) प्रशंसा गम्यमान असताना वेदामध्ये वृक शब्दाहून तिल् प्रत्यय तसाच ज्येष्ठ शब्दाहून तातिल् प्रत्यय स्वार्थी होतो. उदा०—वृकतिः; ज्येष्ठतातिः. येथे रूपप् प्रत्ययाचा बाध होतो.

१—( सू. ४२ ) बह्वर्थक शब्द आणि अल्पार्थक शब्द याहून स्वार्थी शस् प्रत्यय होतो, परंतु ते बहु किंवा अल्प असलेले पदार्थ कोणत्या तरी क्रियेचे कारक असले पाहिजेत. उदा०—बहूनि ददाति बहुशः; अल्पं ददाति अल्पशः.

२—येथें ‘ मङ्गलामङ्गलवचनम् ’ याच्या ऐवजीं ‘ मङ्गलवचनम् ’ एवढाच पाठ कांहीं पुस्तकांमध्ये आहे. आभ्युदयिक कार्यामध्यें पुष्कळ देणें हें मंगल होय आणि श्राद्ध वगैरे पितृकार्यामध्यें थोडें देणें हें मंगल होय, असा त्याचा अभिप्राय समजावा.

३—प्राशित्र हें यज्ञांतील पात्र आहे. ब्रह्मा हा ऋत्विज् त्या पात्राने पुरोडाशांतील भाग घेतो. यज्ञ हें आभ्युदयिक मंगल कर्म आहे.

१—( सू. ४३ ) संख्यावाचक शब्द आणि एकवचनान्त शब्द याहून वीप्सा गम्यमान असतांना स्वार्थी शस् प्रत्यय विकल्पानें होतो. द्वौ द्वौ इति द्विशः द्विश. मोदकौ ददाति; पादम् पादम् इति पादशः पादशः कार्षापणं ददाति.

१—( सू ४४ ) प्रति शब्दाच्या योगी जी पंचमी (२।३।११) सांगितली आहे तदन्ताहून स्वार्थी तसि प्रत्यय विकल्पाने होतो. उदा०—अभिमन्युरर्जुनतः प्रति. प्रतिनिधि असा अर्थ येथें गम्यमान होत आहे.

[ अपादाने चाहीयरुहोः ॥५।४।४५॥

अतिग्रहाव्यथनक्षेपेष्वकर्तरि तृतीयायाः ॥ ५ । ४ । ४६ ॥

हीयमानपापयोगाच्च ॥ ५।४।४७ ॥

षष्ठ्या व्याश्रये ॥ ५ । ४ । ४८ ॥

रोगाच्चापनयने ॥ ५ । ४ । ४९ ॥ ]

कृभ्वस्तियोगे संपद्यकर्तरि च्विः ॥ ५ । ४ । ५० ॥

च्विविधावभूततद्भावग्रहणम् ॥ १ ॥

च्विविधावभूततद्भावग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । संपद्यन्ते यवाः । संपद्यन्ते शालय इति ॥ अथ क्रियमाणेऽपि वा अभूततद्भावग्रहण इह कस्मान्न भवति । संपद्यन्तेऽस्मिन्क्षेत्रे शालय इति ।

प्रकृतिविवक्षाग्रहणं च ॥ २ ॥

प्रकृतिविवक्षाग्रहणं च कर्तव्यम् ॥

---

( सू. ५० वा. १ ) ह्या च्वि प्रत्यय सांगणाऱ्या शास्त्रामध्यें 'अभूततद्भावे' असें म्हणावें; म्हणजे संपद्यतीचा कर्ता हा वस्तुतः तसा नसून तसा कल्पिलेला असला पाहिजे. कारण संपद्यन्ते यवाः व संपद्यन्ते शालयः येथें वस्तुस्थितीच तशी असतांना यव व शालि यांहून च्वि प्रत्यय न झाला पाहिजे.

आतां येथें अभूततद्भावे असें म्हटलें तरी 'संपद्यन्तेऽस्मिन् क्षेत्रे शालयः' म्हणजे ह्या शेतामध्यें शाली होतात येथें च्वि प्रत्यय कां बरें होत नाहीं ?

( वा. २ ) प्रकृतीच विकाराच्या रूपानें संपद्यतीचा कर्ता अशी विवक्षित असली पाहिजे तरच हा च्वि प्रत्यय होतो असें म्हणावें.

---

१—( सू. ४५ ) अपादान कारक या अर्थी जी पंचमी (२।३।२८) सांगितली आहे तदन्ताहून स्वार्थी तसि प्रत्यय विकल्पानें होतो, परंतु तें अपादान ज्या क्रियेचे असेल त्या क्रियेचा वाचक 'ओहाक् त्यागे' हा 'हा' धातु किंवा 'रुह्' धातु यांपैकीं कोणाचाही प्रयोग नसावा. उदा०—ग्रामतः ग्रामात् आगच्छति.

१—( सू. ४६ ) अतिग्रह, अव्यथन व क्षेप यांपैकीं अर्थ गम्यमान असताना तृतीयान्ताहून स्वार्थीं तसि प्रत्यय होतो, परंतु ती तृतीया कर्ता या अर्थी केलेली नसावी. उदा०—चारित्रेण चारित्रतः अतिगृह्यते देवदत्तः म्हणजे या देवदत्ताचें चारित्र लोकांचें अतिक्रमण करून आहे, असा या देवदत्ताविषयीं लोकांचा ग्रह आहे. चारित्रेण चारित्रत. न व्यथते देवदत्तः म्हणजे देवदत्त हा आपल्या चारित्रामुळें केव्हांही व्यथित होत नाहीं. चारित्रेण चारित्रतः क्षिप्यते देवदत्त., देवदत्त हा वाईट आचरणामुळे लोकांकडून निंदित होतो.

१—( सू. ४७ ) तृतीयान्ताहून स्वार्थी हीयमान किंवा पाप यांचा योग असतांना तसि प्रत्यय होतो परंतु ती तृतीया कर्ता या अर्थी केलेली नसावी. उदा०—चारित्रेण, चारित्रतः हीयते. चारित्रेण, चारित्रतः पापः.

१—( सू. ४८ ) षष्ठी-प्रत्ययान्ताहून स्वार्थी तसि प्रत्यय होतो अनेक पक्षांचा आश्रय गम्यमान असतांना-उदा० - देवा अर्जुनतः अभवन्. आदित्याः कर्णतः अभवन्.

१—( सू ४९ ) रोगविशेषवाचक षष्ठ्यन्त शब्दाहून त्याचा प्रतीकार हा अर्थ गम्यमान असतांना स्वार्थीं तसि प्रत्यय होतो. उदा०—छर्दिकायाः छर्दिकातः कुरु. छर्दिका म्हणजे वमनव्याधि, तिचा प्रतीकार कर असा अर्थ आहे.

१—( सू. ५० ) कृ. भू , व अस् या धातूंचा योग असताना संपद्यति या क्रियेचा जो कर्ता म्हणजे होणारा जो पदार्थ त्याहून स्वार्थी च्वि प्रत्यय होतो; तो होणारा पदार्थ वस्तुतः तसा नसून तसा होणारा असला पाहिजे. उदा०— अशुक्लः शुक्लः संपद्यते तं करोति शुक्लीकरोति, शुक्लीभवति शुक्लीस्यात्. येथें शुक्ल शब्दाहून च्वि प्रत्यय झाल्यानंतर त्यांतील इत्संज्ञक चकाराचा इकाराचा आणि वकाराचा लोप (६।१।६७) होऊन प्रत्ययांपैकीं कांहीं शिल्लक रहात नाहीं. आणि मागील अकाराला ईत्व (७।४।३२), निपात संज्ञा (१।४।६१), व अव्यय संज्ञा (१।१।३७) होतात.

**समीपादिभ्य उपसंख्यानम् ॥ ३ ॥**

समीपदिभ्य उपसंख्यानं कर्तव्यम् । समीपीभवति अभ्याशीभवति आन्तिकीभवति । किं पुनः कारणं न सिध्यति । न ह्यसमीपं समीपं भवति । किं तर्हि । असमीपस्थं समीपस्थं भवति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । तात्स्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति ॥

**[ अरुर्मनश्चक्षुश्चेतोरहोरजसां लोपश्च ॥ ५ । ४ । ५१ ॥**

**विभाषा साति कार्त्स्न्ये॥५।४।५२॥**

**अभिविधौ संपदा च ॥५।४।५३॥**

**तदधीनवचने ॥ ५ । ४ । ५४ ॥**

**देये त्रा च ॥५ । ४ । ५५॥**

**देवमनुष्यपुरुषपुरुमर्त्येभ्यो द्वितीयासप्तम्योर्बहुलम् ॥ ५ । ४ । ५६ ॥ ]**

**अव्यक्तानुकरणाद् द्व्यजवरार्धादनितौ डाच् ॥ ५ । ४ । ५७ ॥**

---

( वा. ३ ) समीप वगैरे शब्दांहून च्वि प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. उदा०— समीपी भवति; अभ्याशी भवति; आन्तिकी भवति.

पण येथें मूळ सूत्रानेंच च्वि प्रत्यय कां बरें सिद्ध होत नाहीं ?

तो सिद्ध न होण्याचें कारण असें कीं जो समीप देश नव्हे तो कांहीं समीप देश समजला जात नाहीं; तर त्या दूर देशांत असलेली वस्तु ही जवळच्या प्रदेशांतील समजली जाते.

तर मग तसें उपसंख्यान केलें पाहिजे.

उपसंख्यान करावयास नको. कारण येथें समीप शब्दाचा अर्थ समीप देशांतील वस्तु असा घेतां येईल.

---

१—( सू. ५१ ) अरुस्, मनस्, चक्षुस्, चेतस्, रहस् आणि रजस् या शब्दांहून पूर्वसूत्राच्या विषयामध्येंच च्वि प्रत्यय होतो आणि त्याच्याबरोबरच त्या शब्दांच्या शेवटच्या सकाराचा लोप होतो. उदा०— अनरुः अरुः संपद्यते तं करोति अरूकरोति. येथें सकाराचा लोप झाल्यानंतर उकाराला दीर्घ (७।४।२६) झाला आहे.

१—( सू. ५२ ) विकार जर सर्व प्रकृतीचा विवक्षित असेल तर त्या विकारवाचक शब्दाहून च्वि प्रत्ययाच्या विषयींमध्ये साति प्रत्यय विकल्पानें होतो. एकदां च्वि प्रत्ययही होतो. उदा०—कृत्स्नम् शस्त्रम् अग्निः संपद्यते अग्निसात् भवति; अग्नीभवति.

१—( सू. ५३ ) अनेक प्रकृतींचा विकार जर विवक्षित असेल तर त्या विकारवाचक शब्दाहून च्वि प्रत्ययाच्या विषयामध्ये साति प्रत्यय विकल्पानें होतो. कृ, भू आणि अस् यांप्रमाणें सम्-पूर्वक पद् धातूचा योग असेल तरीही हा साति प्रत्यय होतो. उदकसात् संपद्यते लवणं वर्षासु सर्वत्र.

१—( सू. ५४ ) कृ, भू, अस् आणि सम्-पूर्वक पद् धातु यांचा योग असतांना प्रातिपदिकाहून त्याच्या अधीन या अर्थी साति हा प्रत्यय होतो, उदा०-राजाधीनं करोति राजसात् करोति.

१—( सू. ५५ ) कृ, भू, अस् आणि सम्-पूर्वक पद या धातूंचा योग असतांना प्रातिपदिकाहून 'त्याच्या अधीन' या अर्थी त्रा आणि साति हे प्रत्यय होतात परंतु ती अधीन होणारी वस्तु देय असली पाहिजे. उदा०-ब्राह्मणसात् ब्राह्मणत्रा करोति गृहम्. देय म्हणून ब्राह्मणाच्या स्वाधीन करतो हा अर्थ आहे.

१—( सू. ५६ ) द्वितीयान्त किंवा सप्तम्यन्त असे जे देव, मनुष्य, पुरुष, पुरु आणि मर्त्य हे शब्द त्यांहून स्वार्थी त्रा प्रत्यय बाहुल्येंकरून होतो. देवान् इति देवत्रा गच्छति; देवेषु इति देवत्रा ऐश्वर्यम्.

१—( सू. ५७ ) ज्याच्या अर्ध्या भागामध्यें कमीत कमी दोन अच् आहेत असे जे ध्वनीचें अनुकरण त्याहून कृ, भू, अथवा अस् याचा योग असतांना स्वार्थी डाच् प्रत्यय होतो. पुढे इति शब्द मात्र नसला पाहिजे. उदा० पटपटाकरोति. येथें पटत् ह्या अनुकरणाला द्वित्व (८।१।१२ वा.८) पुढे प्रकृत सूत्रानें डाच् प्रत्यय, पुढील पटत् यांतील अत् या टिभागाचा लोप ( ६।४।४३ ) पूर्वीच्या पटत् यांतील तकार आणि त्याच्या पुढील पकार या दोहोंचे स्थानीं पररूपानें पकार ( ६।१।१०० ) हीं कार्यें झालीं आहेत.

किमर्थश्चकारः । स्वरार्थः । चितोऽन्त उदात्तो भवतीत्यन्तोदात्तत्वं यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । एकाजयं तत्र नार्थः स्वरार्थेन चकारेणानुबन्धेन । प्रत्ययस्वरेणैव सिद्धम् ॥ अत उत्तरं पठति ।

डाचि चित्करणं विशेषणार्थम् ॥ १ ॥

डाचि चित्करणं क्रियते विशेषणार्थम् । क विशेषणार्थेनार्थः । लोहितादिडाज्भ्यः क्यष् [ ३. १. १३. ] इति । डा इति ह्युच्यमान इडा अतोऽपि प्रसज्येत । अर्थवद्ग्रहणे नानार्थकस्येत्येवमेतस्य न भविष्यति । इह तर्हि प्राप्नोति । नाभा पृथिव्या निहितो दविद्युतत् । तस्माच्चकारः कर्तव्यः ॥

[ कृञो द्वितीयतृतीयशम्बबीजात्कृषौ ॥ ५ । ४ । ५८ ॥

संख्यायाश्च गुणान्तायाः ॥ ५ । ४ । ५९ ॥

समयाच्च यापनायाम् ॥५।४।६०॥

सपत्रनिष्पत्रादतिव्यथने ॥ ५ । ४ । ६१ ॥

---

( सू. ५७ ) ह्या डाच् प्रत्ययाला चकार कशाकरितां जोडला आहे ?

स्वराकरितां जोडला आहे कारण चितः (६।१।१६३) या सूत्रानें ह्या प्रत्ययाचा अन्त उदात्त झाला पाहिजे.

ह्या चकाराचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण ह्या डाच् प्रत्ययामध्यें अच् एकच आहे. तेव्हां तेथें अन्त उदात्त होण्याकरितां इत्संज्ञक चकार जोडावयास नको. प्रत्ययस्वरानें ( ३।१।३ ) आदि उदात्त झाला तरी त्या अचालाच होईल. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतात—

(वा. १ ) ह्या डाच् प्रत्ययाला जो चकार जोडला आहे तो विशेषणाकरितां जोडला आहे.

विशेषणाकरितां जोडण्याचा उपयोग कोठें बरें होतो ?

लोहितादिडाज्भ्यः क्यष् (३।१।१३) ह्या सूत्रामध्यें होतो. जर तेथें चकार न उच्चारतां डा असेंच उच्चारलें तर इडा ह्या शब्दाहूनही त्या सूत्रानें क्यष् होऊं लागेल.

पण अर्थवानाचें ग्रहण संभवत असतांना अनर्थकाचें ग्रहण करूं नये ह्या परिभाषेनें इडा ह्या शब्दांतील डा हा अनर्थक असल्यामुळें क्यष् सांगणाऱ्या सूत्रामधील डा शब्दानें त्याचें ग्रहण होणार नाहीं.

तरी पण 'नाभा पृथिव्या निहितो दविद्युतत्'' येथें नाभि शब्दाच्या पुढील विभक्तिप्रत्ययाला डा आदेश ( ७।१।३९ ) होतो त्याचेंही ग्रहण होऊं लागेल. तेव्हां एकंदरींत तेथें चकार जोडला पाहिजे.

---

१—( सू. ५८ ) नांगरणें या क्रियेच्या संबंधानें उपयोगांत आलेले जे द्वितीय, तृतीय, शम्ब आणि बीज हे शब्द त्यांहून स्वार्थीं डाच् प्रत्यय कृ धातूचा योग असतांना होतो. उदा०—द्वितीया करोति, दुसऱ्यानदां नांगरतो. तृतीया करोति. शम्बा करोति, उलट नांगरतो. बीजा करोति; येथें बीजशब्दाचा बीजासह नांगरणें असा अर्थ आहे.

१—( सू. ५९ ) गुण हा शब्द पुढें असलेला जो संख्या शब्द तो जर नांगरणे या क्रियेकडे लावला असेल तर त्याहून कृ धातूचा योग असतांना स्वार्थीं डाच् प्रत्यय होतो. उदा०—द्विगुणा करोति क्षेत्रम्. दुप्पट नांगरतो असा अर्थ आहे.

१—( सू. ६० ) योग्य वेळ टाळणें हा अर्थ गम्यमान असतांना समय शब्दाहून कृ धातूचा योग असतांना डाच् प्रत्यय होतो. उदा०—समया करोति; भलत्या कामाकडे काळ घालवितो हा अर्थ आहे.

१—( सू. ६१ ) अतिशय व्यथा हा अर्थ गम्यमान असतांना सपत्र आणि निष्पत्र या शब्दांहून स्वार्थीं डाच् प्रत्यय कृ धातूचा योग असतांना होतो. उदा०—सपत्रा करोति मृगम्. मृगाच्या शरीरामध्यें पिसाऱ्यासकट बाण खोचतो. निष्पत्रा करोति मृगम् मृगाच्या शरीरांतून आरपार पलीकडे बाण घालवितो.

**निष्कुलान्निष्कोषणे ॥ ५।४।६२ ॥**

**सुखप्रियादानुलोम्ये ॥ ५।४।६३ ॥**

**दुःखात्प्रातिलोम्ये ॥ ५। ४। ६४ ॥**

**शूलात् पाके ॥ ५। ४। ६५ ॥**

**सत्यादशपथे ॥ ५। ४। ६६ ॥ ]**

**मद्रात्परिवापणे ॥ ५। ४। ६७ ॥**

भद्राच्चेति वक्तव्यम् । भद्राकरोति ॥

**समासान्ताः ॥ ५। ४। ६८ ॥**

अन्तग्रहणं किमर्थम् । अन्तो यथा स्यात् । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रत्ययपरत्वेनाप्येतत्सिद्धम् ॥ इदं तर्हि प्रयोजनं तद्ग्रहणेन ग्रहणं यथा स्यात् । कानि पुनस्तद्ग्रहणस्य प्रयोजनानि ।

**प्रयोजनमव्ययीभावद्विगुद्वन्द्वतत्पुरुषबहुव्रीहिसंज्ञाः ॥ १ ॥**

अव्ययीभावः प्रयोजनम् । प्रतिराजम् उपराजम् । अव्ययीभावश्च समासो नपुंसकलिङ्गो भवतीति नपुंसकलिङ्गता यथा

---

( सू. ६७ ) भद्र शब्दाहून हा डाच् प्रत्यय होतो असें म्हणावें उदा० भद्राकरोति.

( सू. ६८ ) येथें अन्त शब्द कशाकरितां घातला आहे ?

पुढील प्रत्यय समासाच्या शेवटीं झाले पाहिजेत म्हणून घातला आहे.

हा याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण प्रत्यय हे पुढें होतात ( ३।१।२ ) असें सांगितलेंच आहे. त्यानेंच हें सिद्ध होत आहे.

तर मग आतां अन्त शब्दाचा उपयोग असा कीं, समास शब्दानें ह्या प्रत्ययासकट समुदायाचें ग्रहण झालें पाहिजे.

समास शब्दानें प्रत्ययासकट समुदायाचें ग्रहण करण्याचा उपयोग काय ?

( वा. १ ) हे समासाचे पुढील प्रत्यय समासाचे अन्तावयव होतात म्हणून त्या प्रत्ययान्त समुदायाला अव्ययीभाव वगैरे संज्ञा होतात. त्यांपैकीं अव्ययीभाव संज्ञेचा उपयोग असा कीं अव्ययीभाव समास नपुंसकलिंगीं चालतो (२।४।१८) असें सांगितलें असल्यामुळें प्रतिराजम् उपराजम् इत्यादि ठिकाणीं टच् प्रत्यय (५।४।१०८) केल्यानंतर प्रतिराज उपराज वगैरे अव्ययीभाव

---

१—( सू ६२ ) निष्कुल शब्दाहून स्वार्थी डाच् प्रत्यय होतो आंतील आंतडीं बाहेर काढणें हा अर्थ गम्यमान असतांना. उदा०—निष्कुला करोति पशून्. शरीराच्या आंतील मूळचे अवयव असा ह्या निष्कुल शब्दांतील कुल शब्दाचा अर्थ आहे.

१—( सू ६३ ) अनुकूल वर्तन करणें हा अर्थ विवक्षित असतांना सुख व प्रिय या शब्दांहून कृ धातूचा योग असतांना स्वार्थीं डाच् प्रत्यय होतो. उदा०—सुखा करोति; प्रिया करोति.

१—( ६४ ) प्रतिकूल वर्तन करणें हा अर्थ विवक्षित असतांना दुःख शब्दाहून कृ धातूचा योग असतांना स्वार्थीं डाच् प्रत्यय होतो. उदा०—दुःखा करोति.

१—( सू. ६५ ) पाक करणें हा अर्थ विवक्षित असतांना शूल शब्दाहून कृ धातूचा योग असतांना स्वार्थीं डाच् प्रत्यय होतो. उदा०—शूले पचति इति शूलाकरोति मांसम् मांस भाजण्याकरितां शूलावर घेतो हा अर्थ आहे.

१—( सू. ६६ ) शपथ हा अर्थ नसलेल्या अशा सत्य शब्दाहून कृ धातूचा योग असतांना स्वार्थी डाच् प्रत्यय होतो. उदा०— सत्या करोति. खरें करून दाखवितो असा अर्थ आहे.

१—( ६७ ) मुंडन हा अर्थ गम्यमान असतांना मद्र शब्दाहून स्वार्थी डाच् प्रत्यय होतो कृ धातूचा योग असतांना, उदा०— मद्राकरोति. मद्र शब्दाचा अर्थ मंगल असा आहे. मुंडनानें मंगल साधतो.

१—( सू. ६८ ) समासान्त म्हणजे ‘समासाचा अन्त–अवयव’ असा अधिकार येथून पुढें पाद संपेपर्यंत आहे.

स्यात्। नैतदस्ति प्रयोजनम्। लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य। इदं तर्हि प्रयोजनं नाव्ययीभावादतोऽम्त्वपञ्चम्याः [२.४.८३] इत्येष विधिर्यथा स्यात्। अव्ययीभाव॥ द्विगु। द्विगुसंज्ञा च प्रयोजनम्। पञ्चगवम् दशगवम्। द्विगुश्च समासो नपुंसकलिङ्गो भवतीति नपुंसकलिङ्गता यथा स्यात्। नैतदस्ति प्रयोजनम्। लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य। इदं तर्हि प्रयोजनं द्विपुरी त्रिपुरी द्विगोरकारान्तादितीकारो यथा स्यात्। एतदपि नास्ति प्रयोजनम्। पुरशब्दोऽयमकारान्तस्तेन समासो भविष्यति। आतश्चाकारान्त एवं ह्याह।

क्षेमे सुभिक्षे कृतसंचयानि
पुराणि राज्ञां विनयन्ति कोपम् इति॥

इदं तर्हि प्रयोजनं द्विधुरी त्रिधुरी द्विगोरकारान्तादिति ङीब्यथा स्यात्। द्विगु॥ द्वन्द्व। द्वन्द्वसंज्ञा च प्रयोजनम्। वाक्त्वचम् स्रक्त्वचम्। द्वन्द्वश्च समासो नपुंसकलिङ्गो भवतीति नपुंसकलिङ्गता यथा स्यात्। नैतदस्ति प्रयोजनम्। लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य। इदं तर्हि प्रयोजनं कोशश्च

---

नपुंसकलिंगी चालले पाहिजेत.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण अमुक शब्द अमुक लिंगीं चालतो असें मुळीं कोठेंच सांगावयास नको. लिंग हें लौकिक प्रयोगावर अवलंबून आहे.

तर मग आतां अव्ययीभाव संज्ञेचा उपयोग असा कीं 'नाव्ययीभावादतोऽम् त्वपञ्चम्याः' ( २।४।८३ ) या सूत्रानें प्रतिराज व उपराज या अव्ययीभावांच्या पुढील विभक्तिप्रत्ययाला अम् आदेश झाला पाहिजे.

द्विगुसंज्ञेचा उपयोग असा कीं 'द्विगुसमास हा नपुंसकलिंगीं चालतो' (२।४।१७) असें सांगितलें आहे त्यामुळें पञ्चगवम् व दशगवम् येथें टच् प्रत्यय केल्यानंतर ( ५।४।९२ ) पञ्चगव तसाच दशगव हा द्विगु नपुंसकलिंगी चालला पाहिजे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण अमुक शब्द अमुक लिंगीं चालतो असें मुळीं कोठेंच सांगावयास नको. लिंग हें लौकिक प्रयोगावर अवलंबून आहे.

तर मग द्विगुसंज्ञेचा उपयोग असा कीं द्विपुरी त्रिपुरी येथें समासान्त अ प्रत्यय (५।४।७४) केल्यानंतर द्विपुर तसाच त्रिपुर हा अकारान्त द्विगु समजून पुढें द्विगोः (४।१।२१) यानें ङीप् हा स्त्री-प्रत्यय झाला पाहिजे.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, येथें रेफान्त पुर् या शब्दाशीं समास न करतां पुर अशा अकारान्त शब्दाशीं समास करावा म्हणजे झालें. आणि पुर असा अकारान्त शब्द तर आहेच. कारण— 'क्षेमे सुभिक्षे कृतसंचयानि पुराणि राज्ञां विनयन्ति कोपम्' असा प्रयोगच आहे.

तर मग आतां द्विधुरी, त्रिधुरी येथें समासान्त अ प्रत्यय ( ५।४।७४ ) झाल्यानंतर द्विधुर तसाच त्रिधुर हा अकारान्त द्विगु समजून पुढें द्विगोः यानें ङीप् हा स्त्री-प्रत्यय झाला पाहिजे.

द्वंद्व समासाचा उपयोग असा कीं—द्वंद्व समास हा नपुंसकलिंगीं चालतो (२।४।१७) असें सांगितलें असल्यामुळें वाक्त्वचम् व स्रक्त्वचम् येथें टच् प्रत्यय (५।४।१०६) केल्यानंतर वाक्त्वच तसाच स्रक्त्वच हा अकारान्त द्वद्व नपुंसकलिंगीं चालला पाहिजे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण अमुक शब्द अमुक लिंगीं चालतो असें मुळीं कोठेंच सांगावयास नको. लिंग हें लौकिक प्रयोगावर अवलंबून असतें.

तर मग द्वंद्व संज्ञेचा उपयोग असा कीं—

निषच्च कोशनिषदम् कोशनिषादिनी द्वन्द्वोपतापगर्ह्यात्प्राणिस्थादिनिः [ ५.२.१२८ ] इतीनिर्यथा स्यात् । द्वन्द्व ।। तत्पुरुष । तत्पुरुषसंज्ञा च प्रयोजनम् । परमधुरा उत्तमधुरा । परवल्लिङ्गं द्वन्द्वतत्पुरुषयोः । [ २.४.२६ ] इति परवल्लिङ्गता यथा स्यात्। नैतदस्ति प्रयोजनम् । उत्तरपदार्थप्रधानस्तत्पुरुषः । इदं तर्हि प्रयोजनम् । अर्धधुरा । एतदपि नास्ति प्रयोजनम् । लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य । इदं तर्हि निर्धुरः अव्ययं तत्पुरुषे प्रकृतिस्वरं भवतीत्येष स्वरो यथा स्यात् । तत्पुरुष ।। बहुव्रीहि । बहुव्रीहिसंज्ञा च प्रयोजनम् । उच्चधुरः नीचधुरः । बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदं भवतीत्येष स्वरो यथा स्यात् ।।

## नं पूजनात् ।। ५ । ४ । ६९ ।।

इदं विप्रतिषिद्धम् । को विप्रतिषेधः । परिगणिताभ्यः प्रकृतिभ्यः समासान्तो विधीयते न च तत्र काचित्पूजनान्वा प्रकृतिर्निर्दिश्यते ।। नैतद्विप्रतिषिद्धम् ।। नैवं

---

कोशश्च निषच्च कोशनिषदम् येथें टच् प्रत्यय समासान्त ( ५।४।१०६ ) झाल्यानंतर कोशनिषद हा अकारान्त द्वंद्व समजून त्याच्या पुढें 'द्वंद्वोपतापगर्ह्यात्प्राणिस्थादिनिः' (५।२।१२८) या सूत्रानें इनि प्रत्यय होऊन कोशनिषादिनी असें झालें पाहिजे. तत्पुरुष संज्ञेचा उपयोग असा कीं —परमधुरा व उत्तमधुरा येथें समासान्त अ प्रत्यय ( ५।४।७४ ) झाल्यानंतर परमधुर तसाच उत्तमधुर हा अकारान्त तत्पुरुष समजून त्याला 'परवल्लिङ्गं द्वंद्वतत्पुरुषयोः' (।२४।२६) यानें धुर् या उत्तरपदाप्रमाणें स्त्रीलिंग समजलें पाहिजे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण तत्पुरुषामध्यें स्वभावतःच उत्तरपदार्थाला प्राधान्य असतें. तेव्हां आपोआप त्याचेंच लिंग समजलें जाईल.

तर मग धुरः अर्धम् अर्धधुरा येथें अर्धधुर हा अकारान्त तत्पुरुष समजून त्याला धुर् या उत्तरपदाप्रमाणें स्त्रीलिंग समजलें पाहिजे.

हाही उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण अमुक शब्द अमुक लिंगीं चालतो असें मुळीं कोठेंच सांगावयास नको. लिंग हे लौकिक प्रयोगावर अवलंबून असतें.

तर मग धुरः निष्क्रान्तः निर्धुरः येथें समासान्त अ प्रत्यय (५।४।६४, झाल्यानंतर निर्धुर हा अकारान्त तत्पुरुष समजून त्यांतील निर् या अव्ययाला पूर्वपदप्रकृतिस्वर (६।२।२) झाला पाहिजे.

बहुव्रीहि संज्ञेचा उपयोग असा कीं— उच्चा धूः यस्य उच्चधुरः, नीचा धूः यस्य नीचधुरः येथें समासान्त अ प्रत्यय (५।४।७४) झाल्यानंतर उच्चधुर तसाच नीचधुर हा अकारान्त बहुव्रीहि समजून त्यांतील उच्च तसेंच नीच या पूर्वपदाला 'बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम्' (६।२।१) यानें प्रकृतिस्वर झाला पाहिजे.

( सू. ६९ ) हें येथें आचार्यांचें करणें विरुद्ध दिसतें.

येथें काय बरें विरुद्ध आहे ?

असें विरुद्ध आहे कीं—कांहीं ठराविक शब्द घेऊन तदन्त समासाहून समासान्त प्रत्यय सांगितले आहेत; पण त्यांत पूजनार्थक शब्द घेऊन तदन्त समासाहून समासान्त प्रत्यय कोठेंच सांगितलेला दिसत नाहीं.

---

२. कारण परमधुरा येथें जसें उत्तर–पदार्थाला प्राधान्य आहे तसें अर्धधुरा येथें नाहीं.

१—( सू ६९ ) पूजनार्थक जे सु व अति त्यांच्या पुढील जे उत्तर–पद तदन्त समासाहून समासान्त होत नाहीं. उदा०— सुराजा, अतिराजा. राजानमतिक्रान्तः अतिराजः येथें अति हा पूजनार्थक शब्द नसल्यामुळें हा निषेध येत नाहीं.

२. तेव्हां अर्थातच तेथें निषेध सांगणें विरुद्ध होतें

विज्ञायते याभ्यः प्रकृतिभ्यः समासान्तो विधीयते न चेत्ताः पूजनान्ता भवन्तीति । कथं तर्हि । न चेत्ताः पूजनात्परा भवन्तीति॥

**पूजायां स्वतिग्रहणम् ॥ १ ॥**

पूजायां स्वतिग्रहणं कर्तव्यम् । सुराजा अतिराजा । क मा भूत् । परमगवः उत्तमगवः ॥

**प्राग्बहुव्रीहिग्रहणं च ॥ २ ॥**

प्राग्बहुव्रीहिग्रहणं च कर्तव्यम् । इह मा भूत् । स्वक्षः अत्यक्ष इति ॥

**किमः क्षेपे ॥ ५ । ४ । ७० ॥**

क्षेप इति किमर्थम् । कस्य राजा किंराजः ॥ क्षेप इति शक्यमकर्तुम् । कस्मान्न भवति कस्य राजा किंराज इति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति ॥

**[ नञस्तत्पुरुषात् ॥ ५ । ४ । ७१ ॥**
**पथो विभाषा ॥ ५ । ४ । ७२ ॥ ]**
**बहुव्रीहौ संख्येये डजबहुगणात्**

---

यांत कांहीं विरुद्ध नाहीं. जें विशेष शब्द धरून तदन्त समासाहून समासान्त प्रत्यय सांगितले आहेत ते समास पूजनार्थक शब्द शेवटीं असलेले असतील तर हा निषेध येतो असा अर्थ समजूं नये. तर समासान्त प्रत्यय सांगतांना जे विशेष शब्द घेतले आहेत ते शब्द पूजनार्थक शब्दाच्या पुढें नसतील तर ते समासान्त प्रत्यय होतात असें तात्पर्य समजावें.

( वा. १ ) येथें सु व अति हे दोन पूजनार्थक शब्द घ्यावयाचे असें म्हणावें. उदा०— सुराजा, अतिराजा.

सु व अति हे दोनच पूजनार्थक शब्द घ्यावयाचे असें म्हटल्यानें कोठें बरें हा निषेध होत नाहीं ?

परमगवः, उत्तमगवः वगैरे ठिकाणीं समासान्त टच् प्रत्यय ( ५।४।९२ ) होतो. त्याचा निषेध होत नाहीं.

( वा. २ ) ' प्राग् बहुव्रीहेः ' असें येथें म्हणावें; म्हणजे बहुव्रीहि-ग्रहणाच्या(५।४।११३) पूर्वी सांगितलेले जे समासान्त प्रत्यय त्यांचाच हा निषेध होईल. शोभने अक्षिणी यस्य स्वक्षः, अतिशयिते अक्षिणी यस्य अत्यक्षः, इत्यादि ठिकाणीं षच् या समासान्त प्रत्ययाचा ( ५।४।११३ ) हा निषेध न झाला पाहिजे.

( सू. ७० ) येथें क्षेपे असें कशाकारितां म्हटलें आहे ?

कस्य राजा किंराजः येथें समासान्त टच् प्रत्यय ( ५।४।९१ ) होतो त्याचा हा निषेध न झाला पाहिजे. तेथें किम् हा शब्द प्रश्न या अर्थाचा आहे.

ह्या सूत्रामध्यें क्षेपे असें म्हटलें नाहीं तरी चालेल.

पण क्षेपे असें म्हटलें नाहीं तर कस्य राजा किंराजः येथें हा निषेध कां बरें होणार नाहीं ?

' लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त या दोहोंमध्यें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें ' या परिभाषेनें ' किं क्षेपे ' ( २।१।६४ ) यानें किम् शब्द उच्चारून सांगितलेला जो प्रतिपदोक्त समास तेथेंच हा निषेध होईल.

---

१—( सू. ७० ) क्षेप म्ह. निंदा या अर्थाच्या किम् शब्दाच्या पुढील जो शब्द तदन्त समासाहून समासान्त प्रत्यय होत नाहीं. उदा०—कुत्सितः राजा किंराजा.

१—( सू. ७१ ) नञ् या अव्ययाच्या पुढील जे शब्द तदन्त तत्पुरुषाहून समासान्त प्रत्यय होत नाहीं. उदा० —न राजा अराजा.

१—( सू. ७२ ) नञ् या अव्ययाच्या पुढील जो पथिन् शब्द तदन्त तत्पुरुषाहून समासान्त प्रत्यय विकल्पानें होत नाही. उदा०— न पन्थाः अपन्थाः, अपथम्.

१—( सू. ७३ ) संख्येय या अर्थाच्या संख्याशब्दाबरोबर जो अव्यय वगैरेंचा बहुव्रीहि समास ( २।२।२५ ) सांगितला आहे त्याहून समासान्त डच् प्रत्यय होतो; परंतु बहु व गण हे संख्या शब्द नसावे. उदा०—दशानां समीपे ये सन्ति ते उपदशाः.

॥ ५ । ४ । ७३ ॥

**डच्प्रकरणे संख्यायास्तत्पुरुषस्योपसंख्यानं निस्त्रिंशाद्यर्थम् ॥ १ ॥**

डच्प्रकरणे संख्यायास्तत्पुरुषस्योपसंख्यानं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । निस्त्रिंशाद्यर्थम् । निस्त्रिंशानि वर्षाणि । निश्चत्वारिंशानि वर्षाणि ॥

**अन्यत्राधिकलोपात् ॥ २ ॥**

अन्यत्राधिकलोपादिति वक्तव्यम् । इह मा भूत् । एकाधिका विंशतिरेकविंशतिः । द्व्यधिका विंशतिर्द्वाविंशतिः ॥

अव्ययादेरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । गोत्रिंशत् गोचत्वारिंशदिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । यद्यप्येतदुच्यतेऽथवैतर्ह्यन्यत्राधिकलोपादित्येतन्न क्रियते ॥

**अक्पूर्ब्धूःपथामानक्षे ॥५।४।७४॥**

अनक्ष इति कथमिदं विज्ञायते । न चेदक्षधूरन्तः समास इति । आहोस्विन्न चेदक्षः समासार्थ इति । किं चातः । यदि विज्ञायते न चेदक्षधूरन्तः समास इति सिद्धमक्षस्य धूः अक्षधूरिति । इदं तु न सिध्यति दृढधूरयमक्षः । अस्तु तर्हि न चेदक्षः समासार्थ इति । सिद्धं दृढधूरक्ष इति । इदं तु न सिध्यति अक्षस्य धूः अक्षधूरिति ॥ एवं तर्हि नैवं विज्ञायते न चेदक्षधूरन्तः समास इति नापि न चेदक्षः

( सू. ७३ वा. १ ) ह्या डच् प्रत्ययाच्या प्रकरणामध्यें संख्या शब्दाशीं झालेला जो तत्पुरुष त्याहूनही डच् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें.

याचा काय उपयोग ?

निस्त्रिंश वगैरे उदाहरणें साधणें हा त्याचा उपयोग होय उदा०—त्रिंशतः निर्गतानि निस्त्रिंशानि वर्षाणि, तसेंच निश्चत्वारिंशानि वर्षाणि. (निरादयः क्रान्ताद्यर्थे० २।२।१८ भाग २ पृ. ३५० पं. १० पहा ).

( वा. २ ) ज्या तत्पुरुषामध्यें अधिक शब्दाचा लोप झाला असेल त्याशिवाय इतर ठिकाणीं हा डच् प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण एकाधिका विंशतिः एकविंशतिः तसेंच द्व्यधिका विंशतिः द्वाविंशतिः येथें हा डच् प्रत्यय न झाला पाहिजे.

त्याप्रमाणेंच संख्या शब्दाशीं झालेला तत्पुरुष समास हा अव्ययादि असेल तरच तेथें हा डच् प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण, गोत्रिंशत् गोचत्वारिंशत् येथें हा डच् प्रत्यय न झाला पाहिजे.

तर मग अव्ययादेः असें म्हटलें पाहिजे.

जरी तसें म्हटलें तरी 'अन्यत्राधिकलोपात्' हें म्हणावयास नको. दोहींकडून सारखेंच.

( सू. ७४ ) येथें अनक्षे याचा एकट्या धुर् शब्दाकडेच संबंध संभवतो. पण तो कसा समजावा—'अक्ष या शब्दाजवळचा जो धुर् शब्द तदन्त शब्द नसला पाहिजे' असा अर्थ आहे किंवा 'अक्ष या अर्थी समास न झाला पाहिजे' असा अर्थ आहे ?

या दोन अर्थांमध्यें फरक कोणता बरें ?

'अक्ष शब्दाच्या जवळचा जो धुर् शब्द तदन्त समास नसावा' असा अर्थ समजला तर अक्षस्य धूः अक्षधूः हें उदाहरण सिद्ध होतें; पण दृढा धूः अस्य दृढधूः अयमक्षः हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.

तर मग अक्ष या अर्थी समास नसावा असाच अर्थ असूं दे.

पण तसा अर्थ घेतला तर दृढधूः अक्षः हें उदाहरण सिद्ध होतें, परंतु अक्षस्य धूः अक्षधूः हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.

तर मग आतां 'अक्ष शब्दाच्या जवळचा जो धुर् शब्द तदन्त समास नसावा' असाही आम्ही अर्थ घेत नाहीं, आणि 'अक्ष या अर्थी समास नसावा' असाही अर्थ घेत नाहीं.

१—( सू ७४ ) ऋच्, पुर्, अप्, धुर्, आणि पथिन् हे शब्द अन्तीं असलेल्या समासाहून अ प्रत्यय समासान्त होतो; परंतु अक्ष संबंधी धुर् नसावी. अक्ष म्हणजे चाकाचा कणा. उदा०—बह्वृचः इत्यादि.

समासार्थ इति । कथं तर्हि । न चेदक्षस्य धूरिति । एवं च कृत्वा नापि न चेदक्षधूरन्तः समास इति विज्ञायते नापि न चेदक्षः समासार्थ इत्यथ चोभयोर्न भवति ॥

**[ अच् प्रत्यन्ववपूर्वात्सामलोम्नः ॥ ५ । ४ । ७५ ॥ ]**

**अक्ष्णोऽदर्शनात् ॥ ५ । ४ । ७६ ॥**

अदर्शनादित्युच्यते तत्रेदं न सिध्यति । कबराक्षम् ॥ अदर्शनादिति शक्यमकर्तुम् । कथं ब्राह्मणाक्षि क्षत्रियाक्षि । अप्राण्यङ्गादिति वक्तव्यम् ॥

**अचतुरविचतुरसुचतुरस्त्रीपुंसधेन्वनडुहर्क्सामवाङ्मनसाक्षिभ्रुवदारगवोर्वष्ठीवपदष्ठीवनक्तंदिवरात्रिंदिवाहर्दिवसरजसनिःश्रेयसपुरुषायुषद्व्यायुषत्र्यायुषर्ग्यजुषजातोक्षमहोक्षवृद्धोक्षोपशुनगोष्ठश्वाः ॥ ५ । ४ । ७७ ॥**

आद्यास्त्रयो बहुव्रीहयः । अद्रष्टा चतुर्णामचतुरः । विद्रष्टा चतुर्णां विचतुरः । सुद्रष्टा चतुर्णां सुचतुरः ॥ ततः पर एका-

---

तर मग कसा अर्थ करतां ?

'धुर् ही अक्षासंबंधी नसावी' असा अर्थ करतों. असा अर्थ केला असतां 'अक्ष शब्दाच्या जवळचा जो धुर् शब्द तदन्त समास नसावा' असाही अर्थ नको; आणि 'अक्ष हा समासाचा अर्थ नसावा' असाही अर्थ नको; आणि दोन्ही उदाहरणांमध्यें समासान्ताचा निषेध सिद्ध होतो.

( सू. ७६ ) अदर्शनात् असें येथें म्हटलें आहे. तेव्हां 'कबराक्षम्' हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.

तर मग येथें 'अदर्शनात्' असें म्हटलें नाहीं तरी चालेल.

पण 'अदर्शनात्' असें म्हटलें नाहीं तर ब्राह्मणाक्षि, क्षत्रियाक्षि, येथेंही हा अच् प्रत्यय होऊं लागेल.

अदर्शनात् असें न म्हणतां त्याच्या ऐवजीं 'अप्राण्यङ्गात्' असें म्हणावें म्हणजे झालें.

( सू. ७७ ) येथें पहिले तीन शब्द बहुव्रीहि समासानें झाले आहेत: न पाहिले आहेत चार-चौघे पुरुष ज्यानें तो अचतुर ( १ ) होय, अचतुर याच्या पुढें समासान्त अच् प्रत्यय झाला आहे. तसेंच विशेषतः पाहिले आहेत चार पुरुष ज्यानें तो विचतुर ( २ ) होय; चांगले पाहिले आहेत चार पुरुष ज्यानें तो सुचतुर ( ३ ) होय. या तीन शब्दांच्या पुढें अकरा शब्द

---

१—( सू. ७५ ) प्रति, अनु आणि अव यांच्या पुढील जो सामन् किंवा लोमन् शब्द तदन्त समासाहून अच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—प्रतिसामम्, प्रतिलोमम्, इत्यादि.

१—( सू. ७६ ) नेत्र याशिवाय इतर अर्थांचा जो अक्षि शब्द तदन्त समासाहून अच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—पुष्कराक्षम्.

२—दर्शन म्हणजे पाहण्याचे साधन; आणि कबराक्ष हेंही एक प्रकारचें पाहण्याचें साधन आहे. घोड्यानें समोर पाहण्याकरतां जे त्याच्या डोळ्यावर लावतात त्याला कबराक्ष म्हणतात.

१—( सू. ७७ ) अचतुर वगैरे २५ शब्द समासान्त अच् प्रत्यय करून निपातन केले आहेत. निपातनामुळेंच कांहीं शब्दांमध्यें इतर कार्येंही होतात. अष्ठीवत् शब्दांतील अत् या टिभागाचा लोप, पादशब्दाला पद् आदेश, रात्रिशब्दाच्या पुढें मकार, श्वन् शब्दाच्या टिलोपाचा अभाव आणि संप्रसारण हीं कार्यें त्या त्या ठिकाणीं होतात. रात्रौ, अहनि आणि दिवा हे शब्द सप्तम्यर्थी असूनही निपातनास्तव द्वंद्व होतो. तसेंच अहर्दिव येथें दोन्ही पदांचा एकच अर्थ असून केवळ वीप्सा या अर्थीं द्वंद्व निपातनामुळेंच होतो. अष्ठीवत् ( ८।२।१२ ) म्हणजे शरीरांतील हाडें असलेला एक भाग.

दश द्वन्द्वाः । स्त्रीपुंस धेन्वनडुह ऋक्साम वाङ्मनस अक्षिभ्रुव दारगव ऊर्वष्ठीव पदष्ठीव नक्तंदिव रात्रिंदिव अहर्दिव ॥ ततोऽव्ययीभावः । सह रजसा सरजसम् ॥ ततस्तत्पुरुषः । निश्चितं श्रेयो निःश्रेयसम् ॥ ततः षष्ठीसमासः। पुरुषस्यायुःपुरुषायुषम् ॥ ततो द्विगू । द्वे आयुषी द्व्यायुषम् त्रीण्यायूंषि त्र्यायुषम् ॥ ततो द्वन्द्वः । ऋक् च यजुश्च ऋग्यजुषम् ॥ जातादय उक्षान्ताः समानाधिकरणाः । जात उक्षा जातोक्षः । महानुक्षा महोक्षः । वृद्ध उक्षा वृद्धोक्षः ॥ ततोऽव्ययीभावः । शुनः समीपमुपशुनम् ॥ ततः सप्तमीसमासः । गोष्ठे श्वा गोष्ठश्वः ॥

**चतुरोऽच्प्रकरणे त्र्युपाभ्यामुपसंख्यानम् ॥ १ ॥**

चतुरोऽच्प्रकरणे त्र्युपाभ्यामुपसंख्यानं कर्तव्यम् । त्रिचतुराः उपचतुराः ॥

**ब्रह्महस्तिभ्यां वर्चसः ॥५।४।७८॥**

पल्यराजभ्यां चेति वक्तव्यम् । पल्यवर्चसम् राजवर्चसम् ॥

**[अवसमन्धेभ्यस्तमसः ॥ ५ । ४ । ७९ ॥**

**श्वसोवसीयः श्रेयसः ॥ ५।४।८० ॥**

---

द्वंद्व समासानें झाले आहेत. स्त्रीपुंस (४) धेन्वनडुह (५) ऋक्साम (६) वाङ्मनस (७) अक्षिभ्रुव (८) दारगव (९) उर्वष्ठीव (१ ) पदष्ठीव (११) नक्तंदिव (१२) रात्रिंदिव (१३) आणि अहर्दिव (१४). ह्यानंतर सह रजसा सरजसम् (१५) हा अव्ययीभाव समासानें झालेला शब्द आहे. त्यानंतर निश्चितं श्रेयः नि श्रेयसम् (१६) हा तत्पुरुष समासानें झालेला शब्द आहे. त्यानंतर पुरुषास्याऽऽयुः पुरुषायुषम् (१७) हा षष्ठीतत्पुरुष समासानें झालेला शब्द आहे. त्यानंतर द्वयोः आयुषोः समाहारः द्व्यायुषम् (१८) त्रयाणामायुषां समाहारः त्र्यायुषम् (१९) असे दोन द्विगु समासानें साधिलेले शब्द आहेत. त्यानंतर ऋक् च यजुश्च ऋग्यजुषम् (२०) असा द्वंद्व समासानें साधिलेला शब्द आहे. त्यानंतर जातश्चासौ उक्षा च जातोक्षः (२१) महांश्चासौ उक्षा च महोक्षः (२२) वृद्धश्चासौ उक्षा च वृद्धोक्षः (२३) हे तीन कर्मधारय समासानें साधिलेले शब्द आहेत. त्यानंतर शुनःसमीपमुपशुनम् (२४) हा अव्ययीभाव समासानें झालेला शब्द आहे व त्यानंतर गोष्ठे श्वा गोष्ठश्वः (२५) हा सप्तमीतत्पुरुष समासानें झालेला शब्द आहे.

(वा. १) येथें कांहीं ठिकाणीं समासाच्या शेवटीं चतुर् शब्द आला असतां अच् प्रत्यय समासान्त सांगितला आहे; याच प्रकरणांत त्रि व उप यांच्या पुढें चतुर् शब्द आला तर तेथेंही त्या समासाहून अच् प्रत्यय होतो असें उपसंख्यान करावें. त्रयो वा चत्वारो वा त्रिचतुराः; चतुर्णां समीपे ये सन्ति ते उपचतुराः.

(सू. ७८) पल्य आणि राजन् या शब्दांच्या पुढें वर्चस् शब्द आला तर तदन्त समासाहून अच् प्रत्यय होतो असें म्हणावें. उदा०—पल्यवर्चसम्; राजवर्चसम्.

---

१—(सू. ७८) ब्रह्मन् व हस्तिन् या शब्दांच्या पुढील जो वर्चस् शब्द तदन्त समासाहून अच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—ब्रह्मवर्चसम्, हस्तिवर्चसम्.

१—(सू. ७९) अव, सम्, आणि अन्ध या शब्दांच्या पुढील जो तमस् शब्द तदन्त समासाहून अच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०— अवतमसम्; संतमसम्; अन्धतमसम्.

१—(सू. ८०) श्वस् शब्दाच्या पुढील जे वसीयस् व श्रेयस् शब्द तदन्त समासाहून अच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—श्वोवसीयसम्, श्वःश्रेयसम् ते भूयात्.

अन्ववतप्ताद्रहसः ॥ ५ । ४ । ८१ ॥
प्रतेरुरसः सप्तमीस्थात् ॥५।४।८२॥
अनुगवमायामे ॥ ५ । ४ । ८३ ॥
द्विस्तावा त्रिस्तावा वेदिः ॥ ५ । ४ । ८४ ॥
उपसर्गादध्वनः ॥ ५ । ४ । ८५ ॥
तत्पुरुषस्याङ्गुलेः संख्याव्ययादेः ॥ ५ । ४ । ८६ ॥]
अहःसर्वैकदेशसंख्यातपुण्याच्च रात्रेः ॥ ५ । ४ । ८७ ॥

अहर्ग्रहणं द्वन्द्वार्थम् ॥ १ ॥

अहर्ग्रहणं द्वन्द्वार्थं द्रष्टव्यम् ॥ किमुच्यते द्वन्द्वार्थमिति न पुनस्तत्पुरुषार्थमपि स्यात् । तत्पुरुषाभावात् । न हि राज्यन्तोऽहरादिस्तत्पुरुषोऽस्ति ॥

अह्नोऽह्न एतेभ्यः ॥ ५ । ४ । ८८ ॥

अह्नोऽह्नवचनानर्थक्यं चाह्नष्टखोर्नियमवचनात् ॥ १ ॥

अह्नोऽह्नवचनमनर्थकम् । किं कारणम् । अह्नष्टखोर्नियमवचनात् । अह्नष्टखोरेव

(सू. ८७ वा. १) ह्या सूत्रामध्यें जो अहन् शब्द उच्चारला आहे तो द्वंद्वाकरितां उच्चारला आहे, असें समजावें.

द्वंद्वाकरितां असें कां म्हणतां ? तत्पुरुषाकरतांही नाहीं कां उपयोगी पडणार ?

पण तत्पुरुष समास संभवतच नाहीं. कारण रात्रि शब्द उत्तरपद आणि अहन् पूर्वपद असा तत्पुरुष समास संभवतच नाहीं.

(सू. ८८ वा. १) हा जो अहन् शब्दाला अह्न आदेश सांगितला आहे तो निरर्थकच आहे; तर नुसता अच् प्रत्ययच सांगावा. म्हणजे उपधालोपानें-(६।४।१३४) च काम भागेल.

काय कारण ?

कारण असें कीं अह्नष्टखोरेव (६।४।४५)

---

१(सू. ८१) अनु अव, आणि तप्त या शब्दांच्या पुढील जो रहस् शब्द तदन्त समासाहून अच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०— अनुरहसम; अवरहसम्; तप्तरहसम्.

१—(सू. ८२) प्रति शब्दाच्या पुढें असलेला असा जो सप्तम्यर्थी उरस् शब्द तदन्त समासाहून अच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—उरसि इति प्रत्युरसम्.

१—(सू. ८३) अनुगव असा अच्-प्रत्ययान्त शब्द येथें निपातन केला आहे, आयाम म्हणजे दैर्घ्य हा अर्थ गम्यमान असतांना. उदा०— अनुगवं यानम्. येथें 'यस्य चाऽऽयामः' (२।१।१६) यानें अव्ययीभाव समास झाला आहे.

१—(सू. ८४) वेदि म्ह. यज्ञभूमि हा अर्थ असतांना द्विस्तावा व त्रिस्तावा हे दोन शब्द अच्-प्रत्ययान्त येथें निपातन केले आहेत. येथेंसमास तसाच तावत् यांतील अत् या टिभागाचा लोप निपातनामुळेंच होतो. प्रकृतियागामध्यें जेवढी वेदि सांगितली आहे त्यापेक्षां दुप्पट व तिप्पट असा अर्थ आहे.

१—(सू. ८५) उपसर्गाच्या पुढें जो अध्वन् शब्द तदन्त समासाहून अच् प्रत्यय होतो. उदा०— प्रगतः अध्वानं प्राध्वः रथः.

१—(सू ८६) संख्या आणि अव्यय यांच्या पुढील जो अङ्गुलिशब्द तदन्त समासाहून अच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०— द्वे अङ्गुली प्रमाणमस्य द्व्यङ्गुलम्. येथें तद्धितार्थी द्विगु समास (२।१।५१) झाला आहे. अङ्गुलिभ्यः निर्गतं निरङ्गुलम्.

१—(सू. ८७) अहन्, सर्व, एकदेशवाचक शब्द, संख्यात आणि पुण्य शब्द तसेच संख्या शब्द आणि अव्यय शब्द या शब्दांच्या पुढील जो रात्रि शब्द तदन्त जो समास त्याहून अच् प्रत्यय समासान्त होतो. यांपैकीं अहन् शब्दाचा उपयोग फक्त द्वंद्वामध्यें व इतर शब्दांचा उपयोग तत्पुरुषामध्यें करावा. अहश्च रात्रिश्च अहोरात्रः; सर्वा चासौ रात्रिश्च सर्वरात्रः.

१—(सू. ८८) संख्या, अव्यय, सर्व, एकदेशवाचक शब्द, संख्यात आणि पुण्य या शब्दांच्या पुढील जो अहन् शब्द त्याला अह्न आदेश समासान्त होतो उदा०—द्वयोरह्नोर्भवः द्व्यह्नः, अत्यह्नः, सर्वाह्णः इत्यादि.

[६.४.१४५] इत्येतन्नियमार्थं भविष्यति ॥

**न संख्यादेः समाहारे ॥५।४।८९॥**

**उत्तमैकाभ्यां च ॥ ५ । ४ । ९० ॥**

**राजाहःसखिभ्यष्टच् ॥५।४।९१॥**

**गोरतद्धितलुकि ॥ ५ । ४ । ९२ ॥**

**अग्राख्यायामुरसः ॥ ५।४।९३ ॥**

**अनोश्मायःसरसां जातिसंज्ञयोः ॥ ५ । ४ । ९४ ॥**

**ग्रामकौटाभ्यां च तक्ष्णः ॥ ५ । ४ । ९५ ॥**

**अतेः शुनः ॥ ५ । ४ । ९६ ॥**

**उपमानादप्राणिषु ॥ ५।४।९७ ॥**

**उत्तरमृगपूर्वाच्च सक्थ्नः ॥ ५ । ४ । ९८ ॥**

**नावो द्विगोः ॥ ५ । ४ । ९९ ॥**

**अर्धाच्च ॥ ५ । ४ । १०० ॥**

**खार्याः प्राचाम् ॥ ५ । ४ । १०१ ॥**

---

हें नियमार्थ सूत्र होईल तेव्हां टिलोप (६।४।४४) होणारच नाहीं.

१—( सू. ८९ ) संख्या शब्दाच्या पुढील जो अहन् शब्द त्याला समाहारद्विगूमध्ये अह्न आदेश होत नाहीं. उदा०— द्वयोरह्नोः समाहारो द्व्यहः.

१—( सू. ९० ) पुण्य आणि एक या शब्दांपुढील जो अहन् शब्द त्याला अह्न आदेश होत नाहीं. उदा०— पुण्याहम्; एकाहः.

१—( सू. ९१ ) राजन्, अहन्, आणि सखि हे शब्द अन्तीं असलेल्या तत्पुरुष समासाहून टच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—महाराजः, मद्रराजः, उत्तमाहः, राजसखः,

१—( सू. ९२ ) गोशब्दान्त तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त होतो, परंतु तेथें तद्धित प्रत्ययाचा लुक् झालेला नसावा. उदा०— परमश्चासौ गौश्च परमगवः.

१—( सू. ९३ ) उरस्–शब्दान्त तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त होतो, पण त्या उरस् शब्दाचा मुख्य असा अर्थ असला पाहिजे. उदा०— अश्वानामुरोऽश्वोरसम्. मुख्य अश्व असें तात्पर्य.

१—( सू. ९४ ) अनस्, अश्मन्, अयस्, आणि सरस् हे शब्द अंतीं असलेला जो तत्पुरुष त्याहून टच् प्रत्यय समासान्त होतो; परंतु तो प्रत्ययान्त शब्द जातिशब्द असला पाहिजे, किंवा कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०— उपानसम्, महानसम् इत्यादि.

१—( सू. ९५ ) ग्राम आणि कौट या शब्दांच्या पुढील जो तक्षन् शब्द तदन्त तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त होतो. तो प्रत्ययान्त जातिशब्द किंवा संज्ञाशब्द असला पाहिजे. उदा०-ग्रामतक्षः, कौटतक्षः. कुट्यां भवः कौटः स्वतन्त्रः. कौट जो तक्षा म्हणजे सुतार तो कौटतक्ष होय.

१—( सू. ९६ ) अति या शब्दाच्या पुढील जो श्वन् शब्द तदन्त तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०— अतिश्वः वराहः.

१—( सू ९७ ) प्राणिभिन्नाला उपमान झालेला जो श्वा तद्वाचक श्वन् शब्द अंतीं असलेल्या तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त होतो, आकर्षः श्वा इव आकर्षश्वः. येथें 'उपमितम्०' ( २।१।५६ ) यासूत्रानें उपमानोत्तरपद कर्मधारय झाला आहे. आकर्षश्वः म्हणजे कुत्र्याच्या आकाराचा धोंडा.

१—( सू. ९८ ) उत्तर, मृग, आणि पूर्व हे शब्द तसेच उपमानवाचक शब्द यांहून पुढें जो सक्थि शब्द तदन्त तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—उत्तरसक्थम्, मृगसक्थम्, पूर्वसक्थम्. फलकमिव सक्थि फलकसक्थम्.

१—( सू. ९९ ) नौ-शब्दान्त द्विगूहून टच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—द्वयोः नावोः समाहारः द्विनावम्.

१—( सू. १०० ) अर्ध शब्दाच्या पुढील जो नौ शब्द तदन्त तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—नावः अर्धम् अर्धनावम्.

१—( सू. १०१ ) खारी-शब्दान्त द्विगूहून आणि अर्ध शब्दाच्या पुढील जो खारी शब्द तदन्त तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त विकल्पानें होतो. उदा०—द्वयोः खार्योः समाहारः द्विखारम्, द्विखारि. खार्या अर्धम् अर्धखारम्, अर्धखारी.

द्वित्रिभ्यामञ्जलेः ॥ ५ । ४ । १०२ ॥]

अनसन्तान्नपुंसकाच्छन्दसि ॥ ५ । ४ । १०३ ॥

अनसन्तान्नपुंसकाच्छन्दसि वेति वक्तव्यम् । ब्रह्मसामम् । ब्रह्मसाम । देवच्छन्दसम् देवच्छन्दः ॥

[ब्रह्मणो जानपदाख्यायाम् ॥ ५ । ४ । १०४ ॥

कुमहद्भ्यामन्यतरस्याम् ॥ ५ । ४ । १०५ ॥

द्वंद्वाच्चुदषहान्तात्समाहारे ॥ ५ । ४ । १०६ ॥

अव्ययीभावे शरत्प्रभृतिभ्यः ॥ ५ । ४ । १०७ ॥

अनश्च ॥ ५ । ४ । १०८ ॥

नपुंसकादन्यतरस्याम् ॥ ५ । ४ । १०९ ॥

नदीपौर्णमास्याग्रहायणीभ्यः ॥ ५ । ४ । ११० ॥

झयः ॥ ५ । ४ । १११ ॥

गिरेश्च सेनकस्य ॥ ५ । ४ । ११२ ॥]

---

(सू. १०३) अन् किंवा अस् हे वर्ण शेवटीं असलेला जो नपुंसकलिंगी शब्द तदन्त तत्पुरुषाहून वेदामध्यें हा समासान्त अच् प्रत्यय बिकल्पानें होतो, असें म्हणावें. उदा०—ब्रह्मसामम्, ब्रह्मसाम; देवच्छन्दसम्, देवच्छन्दः.

---

१—(सू. १०२) द्वि व त्रि या शब्दांच्या पुढील जो अञ्जलि शब्द तदन्त द्विगूहून टच् प्रत्यय समासान्त विकल्पानें होतो; परंतु तेथें तद्धित प्रत्ययाचा लुक् झालेला नसावा. उदा०—द्वयोः अञ्जल्योः समाहारः द्व्यञ्जलम्, द्व्यञ्जलि.

१—(सू. १०३) अन् किंवा अस् हे वर्ण शेवटीं असलेला जो नपुंसकलिंगी शब्द तदन्त तत्पुरुषाहून वेदामध्यें टच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—हस्तिचर्मे जुहोति. देवच्छन्दसानि.

१—(सू. १०४) अमुक देशांतला असा विशेष रूपानें प्रसिद्ध असलेला जो ब्राह्मण तद्वाचक ब्रह्मन् शब्द अंतीं असलेल्या तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त होतो, अर्थातच देशवाचक शब्द पूर्वपद असला पाहिजे. उदा०—सुराष्ट्रे ब्रह्मा सुराष्ट्रब्रह्मः.

१—(सू. १०५) कु आणि महत् यांच्या पुढील जो ब्रह्मन् शब्द तदन्त तत्पुरुषाहून टच् प्रत्यय समासान्त विकल्पानें होतो. उदा०—कुब्रह्मः, कुब्रह्मा, महाब्रह्मः, महाब्रह्मा.

१—(सू. १०६) च-वर्गांतील वर्ण तसेंच द्, ष् आणि ह् हे वर्ण शेवटीं असलेला जो समाहार द्वंद्व त्याहून टच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—वाक्त्वचम्, छत्रोपानहम् इत्यादि.

१—(सू. १०७) शरद् वगैरे जे शब्द तदन्त अव्ययीभावाहून टच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—उपशरदम्.

१—(सू. १०८) अन् शब्द शेवटीं असलेल्या अव्ययीभावाहून टच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—उपराजम्.

१—(सू. १०९) अन् शब्द शेवटीं असलेला जो नपुंसकलिंगी शब्द तो ज्या अव्ययीभावामध्यें उत्तरपद आहे त्याहून टच् प्रत्यय समासान्त विकल्पानें होतो. उदा०—उपचर्मम्, उपचर्म.

१—(सू. ११०) नदी पौर्णमासी आणि आग्रहायणी हे शब्द अंतीं असलेल्या अव्ययीभावाहून टच् प्रत्यय समासान्त विकल्पानें होतो. उदा०—नद्याः समीपम् उपनदम्, उपनदि. उपपौर्णमासम्, उपपौर्णमासि. उपाग्रहायणम्, उपाग्रहायणि.

१—(सू. १११) झय् प्रत्याहारांतील वर्ण शेवटीं असलेल्या अव्ययीभावाहून टच् प्रत्यय समासान्त विकल्पानें होतो. उदा०—उपसमिधम् उपसमित्.

१—(सू. ११२) गिरि-शब्दान्त अव्ययीभावाहून टच् प्रत्यय समासान्त विकल्पानें होतो. उदा०—उपगिरम् उपगिरि.

बहुव्रीहौ सक्थ्यक्ष्णोः स्वाङ्गात्षच् ॥ ५ । ४ । ११३ ॥

किमर्थं षच्प्रत्ययान्तरं विधीयते न टच्प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते ॥ अत उत्तरं पठति ।

षचि प्रत्ययान्तरकरणमनन्तोदात्तार्थम् ॥ १ ॥

षचि प्रत्ययान्तरं क्रियते । किं प्रयोजनम् । अनन्तोदात्तार्थम् । अनन्तोदात्ताः प्रयोजयन्ति । चक्रसक्थम् चक्रसक्थी ॥

[ अङ्गुलेर्दारुणि ॥५।४।११४॥]

द्वित्रिभ्यां ष मूर्ध्नः ॥५।४।११५॥

किमर्थं मूर्ध्नः षः प्रत्ययान्तरं क्रियते न षच्प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते ।

मूर्ध्नश्च षवचनम् ॥ १ ॥

किम् । अनन्तोदात्तार्थमित्येव । द्विमूर्धः त्रिमूर्धः ॥

अप्पूरणीप्रमाण्योः ॥५।४।११६॥

---

( सू. ११३ ) येथें षच् असा निराळा प्रत्यय कशाकरितां सांगितला आहे? तो सांगावयास नको. कारण मागून टच् प्रत्यय चालू आहे त्याची येथें अनुवृत्ति करितां येईल. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतातः—

( वा. १ ) येथें षच् हा निराळा प्रत्यय मुद्दामच केला आहे.

त्याचा काय बरें उपयोग ?

ज्या ठिकाणीं हा समासान्त प्रत्यय केल्यानंतरही अन्त उदात्त होत नसतो त्या ठिकाणीं त्याच्या पुढें स्त्रीलिंगी ङीप् प्रत्यय (४।१।१५) न होतां ङीष् प्रत्यय ( ४।१।४१ ) होऊन एकंदर तो स्त्रीप्रत्ययान्त शब्द अन्त-उदात्त झाला पाहिजे हा उपयोग होय. उदा०—चक्रसक्थम्, चक्रसक्थी.

( सू. ११५ ) येथें मूर्धन् शब्दाहून ष असा निराळा प्रत्यय कशाकरितां सांगितला आहे ?

तो सांगावयास नको. कारण, मागून षच् प्रत्यय चालू आहे.त्याची येथें अनुवृत्ति करतां येईल.

( वा. १ ) मूर्धन्--शब्दान्त समासाहून ष प्रत्यय येथें निराळा सांगितला आहे.

मग पुढें काय ?

पुढें असें कीं निराळा ष प्रत्यय हा अनन्तोदात्तार्थच सांगितला आहे. उदा०—द्विमूर्धः. त्रिमूर्धः. ( सू. ११३ वा. १ पहावें )

---

१—( सू ११३ ) स्वाङ्गवाचक जे सक्थि किंवा अक्षि शब्द तदन्त बहुव्रीहीहून षच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—दीर्घे सक्थि यस्य स दीर्घसक्थः; विशाले अक्षिणी यस्य स विशालाक्षः.

२—गौरसक्थ शब्दामध्यें अन्त उदात्त विकल्पानें (६।२।१९८) होतो. तो जेव्हां केला नाहीं त्यावेळीं.

३—चक्र या शब्दाच्या शेवटीं क्र हें अक्षर असल्यामुळें तेथें तो विकल्प (६।२।१९८) येत नाहीं. तेव्हां येथें चक्रसक्थी याच्या ऐवजीं गौरसक्थी हें उदाहरण घ्यावें.

१—( सू. ११४ ) अङ्गुलि-शब्दान्त जो बहुव्रीहि त्याहून षच् प्रत्यय समासान्त होतो. त्या प्रत्ययान्त शब्दापासून दारु म्हणजे लाकूड या अर्थाचा बोध होत असला पाहिजे. उदा०—ब्द्यङ्गुलम् दारु.

१—( सू. ११५ ) द्वि किंवा त्रि या शब्दापुढील जो मूर्धन् शब्द तदन्त बहुव्रीहीहून ष प्रत्यय समासान्त होतो. उदा०—द्विमूर्धः त्रिमूर्धः. येथें ' दित्रिभ्याम्०' ( ६।२।१९७ ) यानें विकल्पानें अन्त उदात्त होतो. तेव्हां एकदां अनन्तोदात्त म्हणजे पूर्वपदप्रकृतिस्वरानें आद्युदात्त होतो. षच् अनुवृत्त आणून त्याचेंच विधान केलें असतें तर ' चितः १ ( ६।१।१६३ ) यानें त्या विकल्पाचा बाध होऊन नित्य अन्तोदात्त झाला असता.

१—( सू. ११६ ) पूरणप्रत्ययान्त स्त्रीलिंगी शब्द आणि प्रमाणी हा शब्द हे अंतीं असलेल्या बहुव्रीहीहून अप् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—कल्याणी पञ्चमी यासां रात्रीणां ताः कल्याणीपञ्चमाः

**अपि प्रधानपूरणीग्रहणम् ॥ १ ॥**

अपि प्रधानपूरणीग्रहणं कर्तव्यम्। प्रधानं या पूरणीति वक्तव्यम्। इह मा भूत्। कल्याणी पञ्चम्यस्य पक्षस्य कल्याणपञ्चमीकः पक्षः॥ अथेह कथं भवितव्यं कल्याणी पञ्चम्यासां रात्रीणामिति। कल्याणीपञ्चमा रात्रय इति भवितव्यम्। रात्रयोऽत्र प्रधानम्॥

**नेतुर्नक्षत्र उपसंख्यानम् ॥ २ ॥**

नेतुर्नक्षत्र उपसंख्यानं कर्तव्यम्। पुष्यनेत्राः मृगनेत्राः॥

**छन्दसि च ॥ ३ ॥**

छन्दसि च नेतुरुपसंख्यानं कर्तव्यम्। बृहस्पतिनेत्राः सोमनेत्राः॥

**मासाद् भृतिप्रत्ययपूर्वपदाट्ठज्विधिः॥ ४॥**

मासाद्भृतिप्रत्ययपूर्वपदाट्ठज्विधेयः। पञ्चकमासिकः षट्कमासिकः दशकमासिकः॥

**[ अन्तर्बहिर्भ्यां च लोम्नः ॥ ५। ४। ११७॥]**

**अञ् नासिकायाः संज्ञायां नसं चास्थूलात् ॥ ५। ४। ११८॥**

---

( सू. ११६ वा. १ ) ह्या अप् प्रत्यय सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'प्रधानपूरणी' ग्रहण करावें. म्हणजे पूरणीला प्राधान्य असेल तरच अप् प्रत्यय होतो असें म्हणावें. कारण, कल्याणी पञ्चमी यस्य पक्षस्य कल्याणपञ्चमीकः पक्षः येथें अप् प्रत्यय न झाला पाहिजे.

आतां कल्याणी पञ्चमी यासां रात्रीणां ताः येथें अप् प्रत्यय होतो किंवा नाहीं?

अप् प्रत्यय होऊन 'कल्याणीपञ्चमाः रात्रयः' असेंच रूप व्हावें; कारण येथें रात्रींनाच प्राधान्य आहे.

( वा. २ ) नक्षत्रवाचक जो नेतृ शब्द तदन्त बहुव्रीहीहून अप् प्रत्यय समासान्त होतो असें उपसंख्यान करावें. उदा०-पुष्यनेत्राः, मृगनेत्राः रात्रयः.

( वा. ३ ) वेदामध्यें नेतृ-शब्दान्त बहुव्रीहीहून अप् प्रत्यय समासान्त होतो, असें उपसंख्यान करावें. बृहस्पतिनेत्राः, सोमनेत्राः.

( वा. ४ ) भृति-प्रत्ययान्त पूर्वपदाच्या पुढील जो मास शब्द तदन्त बहुव्रीहीहून स्वार्थी ठञ् प्रत्यय होतो असें म्हणावें. पञ्चकमासिकः, षट्कमासिकः दशकमासिकः.

---

रात्रयः. बहुव्रीहीमध्यें अन्य पदार्थ प्रधान असतो येथें अनेक रात्री हा अन्य पदार्थ आहे, आणि पञ्चमी या पूरण-प्रत्ययान्त शब्दाचा अर्थ जो पांचवी रात्र तो अन्य पदार्थ रात्रींपैकींच एक आहे. त्यामुळें येथें पूरणीला प्राधान्य आहे. कल्याणपञ्चमीकः पक्षः येथें पक्ष म्ह० पंधरवडा. त्यांत जरी ती पांचवी रात्र आहे तरी स्वतःच्या रात्रि या रूपानें नाहीं. तेव्हां तेथें पूरणीला प्राधान्य नाहीं.

२—पुष्य नक्षत्र आहे नेतृ म्हणजे नायक ज्यांचें अशा रात्री. पौष महिन्यांतील रात्री ह्या पुष्य नक्षत्रावर असतात. त्या रात्रींमध्यें संध्याकाळीं पुष्यनक्षत्र उगवतें व सूर्योदयाचे वेळीं मावळतें.

३—येथें पञ्चक वगैरे पूर्वपदांमध्यें पञ्चन् या शब्दाहून भृति या अर्थी कन् प्रत्यय (५।१।५६) झाला आहे.

१—( सू. ११७ ) अन्तर् व बहिस् या शब्दांच्या पुढील जो लोमन् शब्द तदन्त बहुव्रीहीहून अप् प्रत्यय समासान्त होतो. उदा०— अन्तर्लोमः, बहिर्लोमः.

१—( सू. ११७ ) नासिकाशब्दान्त बहुव्रीहीहून अच् प्रत्यय समासान्त होतो, आणि नासिका शब्दाला नस् आदेश होतो; तो प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. आणि तो नासिका शब्द स्थूल शब्दाच्या पुढें नसावा. उदा०—द्रुरिव नासिका यस्य द्रुणसः. येथें णत्व (८।४।३) झालें आहे.

खरखुराभ्यां च नस्वक्तव्यः । खरणाः खुरणाः ॥

शितिना अर्चना अहिना इति नैगमाः । शितिनाः अर्चनाः अहिनाः ॥

**उपसर्गाच्च ॥ ५ । ४ । ११९ ॥**

वेर्ग्रो वक्तव्यः । विग्रः ॥

**[ सुप्रातसुश्वसुदिवशारिकुक्ष-चतुरश्रैणीपदाजपदप्रोष्ठपदाः ॥ ५ । ४ । १२० ॥**

**नञ्दुःसुभ्यो हलिसक्थ्योरन्यतरस्याम् ॥ ५ । ४ । १२१ ॥**

**नित्यमसिच् प्रजामेधयोः ॥ ५ । ४ । १२२ ॥**

**बहुप्रजाश्छन्दसि ॥ ५ । ४ । १२३ ॥**

**धर्मादनिच् केवलात् ॥५।४।१२४॥**

**जम्भासुहरिततृणसोमेभ्यः ॥ ५ । ४ । १२५ ॥**

**दक्षिणेर्मा लुब्धयोगे ॥५।४।१२६॥**

---

(सू. ११८) बहुव्रीहीमध्यें खर व खुर या शब्दांच्या पुढील नासिका शब्दाला नस् आदेश होतो असें म्हणावें. उदा०—खरणाः म्हणजे सरळ नाकाचा मनुष्य. खुरणाः म्हणजे पसरट नाकाचा मनुष्य.

शितिनस्, अर्चनस् व अहिनस् या शब्दांमध्यें नासिका शब्दाला नस् आदेश होतो असें वैदिक लोक म्हणतात. उदा०—शितिनाः, अर्चनाः, अहिनाः.

(सू. ११९) वि शब्दाच्या पुढील नासिका शब्दाला ग्र आदेश बहुव्रीहीमध्यें होतो असें म्हणावें. उदा०-- विगता नासिका यस्य विग्रः; म्हणजे नकट्या नाकाचा मनुष्य. ( ख्य आदेशही होतो असें म्हणावें. विख्यः ).

---

१—( सू ११९ ) उपसर्गाच्या पुढील जो नासिका शब्द तदन्त बहुव्रीहीहून अच् प्रत्यय समासान्त होतो. आणि नासिका शब्दाला नस् आदेश होतो उदा०—उन्नता नासिका यस्य उन्नसः.

१—( सू. १२० ) सुप्रात, सुश्व, सुदिव, शारिकुक्ष, चतुरश्र, एणीपद, अजपद, आणि प्रोष्ठपद हे शब्द अच्–प्रत्ययान्त निपातन केले आहेत. कांहीं ठिकाणीं इतर कार्येंही निपातनामुळेंच होतात. शोभनं प्रातः अस्य सुप्रातः. शोभनं श्वः अस्य सुश्वः; श्वः म्हणजे उद्यांचा दिवस. शोभनं दिवा अस्य सुदिवः. शारीप्रमाणें ज्याचें पोट आहे तो शारिकुक्ष होय; शारि म्हणजे सोंगटी. चार कोपरे ज्याला आहेत तो चतुरश्र म्हणजे चौकोनी. हरिणीप्रमाणें ज्याचे पाय आहेत तो एणीपद. बोकडासारखे ज्याचे पाय आहेत तो अजपद. बैलासारखे ज्याचे पाय आहेत तो प्रोष्ठपद.

१—( सू. १२१ ) नञ्, दुस् आणि सु यांच्या पुढील जो हलि किंवा सक्थि शब्द तदन्त बहुव्रीहीहून अच् प्रत्यय समासान्त विकल्पानें होतो. हलि म्हणजे मोठा नांगर. न हलिः. यस्य अहलः अहलिः इत्यादि.

१—( सू. १२२ ) नञ्, दुस् किंवा सु यांच्या पुढील जो प्रजा किंवा मेधा शब्द तदन्त बहुव्रीहीहून असिच् प्रत्यय समासान्त नित्य होतो. उदा०—नाहीं प्रजा ज्याला तो अप्रजाः, नाहीं मेधा ज्याला तो अमेधाः इत्यादि.

१—( सू. १२३ ) वेदामध्यें ‘ बहुप्रजस् ’ असा शब्द निपातन केला जातो. बह्वी प्रजा यस्य बहुप्रजाः.

१—( सू. १२४ ) धर्म–शब्दान्त जो द्विपद-बहुव्रीहि त्याहून अनिच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—कल्याणकारक आहे धर्म ज्याचा तो कल्याणधर्मा.

१—( सू. १२५ ) सु, हरित, तृण आणि सोम या शब्दांच्या पुढील जो जम्भ शब्द तदन्त बहुव्रीहीहून अनिच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—शोभन आहे जम्भ ज्याचा तो सुजम्भा. जम्भ म्हणजे भक्ष्य पदार्थ किंवा दन्त.

१—( सू. १२६ ) दक्षिणेर्मा असें अनिच्-प्रत्ययान्त निपातन केलें आहे. दक्षिण बाजूला आहे ईर्म म्हणजे व्रण ज्याच्या असा मृग. ही मृगाची स्थिति व्याधासंबंधानेंच झाली असली पाहिजे.

**इच् कर्मव्यतिहारे ॥ ५।४।१२७ ॥**
**द्विदण्ड्यादिभ्यश्च ॥ ५ । ४ । १२८ ॥**
**प्रसंभ्यां जानुनोर्ज्ञुः ॥ ५।४।१२९ ॥**
**ऊर्ध्वाद्विभाषा ॥ ५ । ४ । १३० ॥]**
**ऊधसोऽनङ् ॥ ५ । ४ । १३१ ॥**

ऊधसोऽनङि स्त्रीग्रहणम् ॥ १ ॥

ऊधसोऽनङि स्त्रीग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । महोधाः पर्जन्य इति ॥

**[ धनुषश्च ॥ ५ । ४ । १३२ ॥**
**वा संज्ञायाम् ॥ ५ । ४ । १३३ ॥**
**जायाया निङ् ॥ ५ । ४ । १३४ ॥]**
**गन्धस्येदुत्पूतिसुसुरभिभ्यः ॥ ५ । ४ । १३५ ॥**

गन्धस्येत्त्वे तदेकान्तग्रहणम् ॥ १ ॥

गन्धस्येत्त्वे तदेकान्तग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । शोभना गन्धा अस्य सुगन्ध आपणिक इति ॥ अथानुलिप्ते कथं भवितव्यम् । यदि तावद्यदनुगतं तदभिसमी-

( सू. १३१ वा. १ ) ऊधसोऽनङ् या सूत्रामध्यें स्त्री-ग्रहण करावें. कारण महोधाः पर्जन्यः येथें हा अनङ् न झाला पाहिजे.'

( सू. १३५ वा. १ ) हें जें गन्ध शब्दाच्या अकाराला इत्त्व सांगितलें आहे तेथें ' तदेकान्त ' असा शब्द घालावा म्हणजे तो गन्ध पदार्थ आणि अन्य पदार्थ हे दोन निरनिराळे दिसूं नयेत. कारण शोभनाः गन्धाः म्हणजे गन्धयुक्त पदार्थ आहेत ज्याचे असा दुकानदार या अर्थी सुगन्धः आपणिकः असें रूप होतें; तेथें इत्त्व न झालें पाहिजे.

आतां अनुलेपन केलेला देवदत्त ,असा अर्थ विवक्षित असेल तर तेथें इत्त्व होतें कीं नाहीं ?

ज्या ठिकाणीं अंगाला लाविलेलें केशर वगैरे पदार्थ अगदीं पातळ असल्यामुळें

---

१—( सू. १२७ ) क्रियाविनिमय विवक्षित असतांना जो बहुव्रीहि (२।२।२७) होतो त्याहून इच् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—केशेषु केशेषु गृहीत्वेदं युद्धं प्रवृत्तं केशाकेशि.

१—( सू. १२८ ) द्विदण्डि वगैरे शब्द इच् प्रत्यय समासान्त करून साधावे. उदा०—द्विदण्डि प्रहरति. ज्या प्रहारामध्यें दोन काठ्या घेतल्या आहेत असा प्रहार करतो असा अर्थ आहे.

१—( सू. १२९ ) बहुव्रीहीमध्यें प्र आणि सम् यांच्या पुढील जो जानु शब्द त्याला ज्ञु आदेश होतो. प्रकृष्टे जानुनी यस्य प्रज्ञुः; ज्याच्या दोन जानूंमध्यें अंतर प्रमाणापेक्षां ज्यास्त असतें तो म्हणजे फेंगडा हा अर्थ आहे. त्याप्रमाणेंच संज्ञु म्हणजे ज्याचें कमी अंतर असतें तो.

१—( सू १३० ) ऊर्ध्व शब्दाच्या पुढील जो जानु शब्द त्याला बहुव्रीहि समासामध्यें ज्ञु आदेश विकल्पानें होतो. उदा०—ऊर्ध्वे जानुनी अस्य ऊर्ध्वज्ञुः, ऊर्ध्वजानुः.

१—( सू. १३१ ) ऊधस्-शब्दान्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या सकाराला अनङ् आदेश समासान्त होतो. उदा०—कुंडासारखी आहे ऊधस् म्हणजे कास जिची त्या गाईला कुण्डोध्नी म्हणतात.

१—( सू. १३२ ) धनुस्-शब्दान्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या सकाराला अनङ् आदेश समासान्त होतो उदा०—गाण्डीव नांवाचें आहे धनुष्य ज्याचें तो गाण्डीवधन्वा. अर्जुन हा अर्थ आहे.

१—( सू. १३३ ) धनुस्-शब्दान्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या सकाराला अनङ् आदेश विकल्पानें होतो, परंतु तो शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—शतधन्वा, शतधनुः.

१—( सू. १३४ ) जाया-शब्दान्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या आकाराला निङ् असा आदेश समासान्त होतो. उदा०-पार्वती जाया यस्य पार्वतीजानिः शिवः. येथें जाया शब्दांतील यकाराचा लोप (६।१।६६) झाला आहे

१—( सू. १३५ ) उत्, पूति, सु आणि सुरभि या शब्दांच्या पुढील जो गन्ध शब्द तदन्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या अकाराला ऱ्हस्व इकार आदेश होतो. उदा०—उद्गतः गन्धः यस्य सः उद्गन्धिः इत्यादि.

क्षितं सुगन्धिरिति भवितव्यम् । अथ यत् प्रविशीर्णं सुगन्ध इति भवितव्यम् ॥

[ अल्पाख्यायाम् ॥ ५।४।१३६ ॥

उपमानाच्च ॥ ५ । ४ । १३७ ॥

पादस्य लोपोऽहस्त्यादिभ्यः ॥ ५ । ४ । १३८ ॥

कुम्भपदीषु च ॥ ५ । ४ । १३९ ॥

संख्यासुपूर्वस्य ॥ ५ । ४ । १४० ॥

वयसि दन्तस्य दतृ ॥ ५।४।१४१ ॥

छन्दसि च ॥ ५ । ४ । १४२ ॥

स्त्रियां संज्ञायाम् ॥ ५ । ४ । १४३ ॥

विभाषा श्यावारोकाभ्याम् ॥ ५ । ४ । १४४ ॥

अग्रान्तशुद्धशुभ्रवृषवराहेभ्यश्च ॥ ५ । ४ । १४५ ॥

ककुदस्यावस्थायां लोपः ॥ ५ । ४ । १४६ ॥

---

अंगापेक्षां निराळे दिसत नसतील तेथें सुगन्धिः देवदत्तः असें होतें, आणि ज्या ठिकाणीं ते घट्ट लाविले असल्यामुळें खपल्या पडतात अशा ठिकाणीं इत्त्व करूं नये. तेथें सुगन्धः देवदत्तः असेंच रूप होतें.

---

१—(सू. १३६) अल्प या अर्थाचा जो गन्ध शब्द तदन्त बहुव्रीहींतील शेवटींच्या अकाराला ऱ्हस्व इकार आदेश होतो. उदा०—सूपगन्धि भोजनम् म्हणजे ज्या भोजनांत वरण अगदींच थोडें असतें असें.

१—( सू. १३७ ) उपमानवाचक पूर्व पदाच्या पुढील जो गन्ध शब्द तदन्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या अकाराला ऱ्हस्व इकार आदेश होतो उदा०—पद्मस्येव गन्धोस्य पद्मगन्धिः.

१—( सू १३८ ) हस्तिन् वगैरे शब्द सोडून इतर अशा उपमानवाचक पूर्वपदाच्या पुढील जो पाद शब्द तदन्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या अकाराचा लोप होतो. उदा०—व्याघ्रस्येव पादौ यस्य स व्याघ्रपात्.

१—( सू. १३९ ) कुम्भपदी वगैरे शब्दांमध्यें पादशब्दान्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या अकाराचा लोप होतो उदा०—कुम्भस्येव पादौ यस्याः सा कुम्भपदी. या गणामध्यें स्त्रीलिंगीच शब्दांचा पाठ आहे. तेव्हां पुंल्लिंगी कुम्भपादः असेंच होतें; लोप होत नाहीं.

१—( सू. १४० ) संख्या शब्द किंवा सु शब्द यांच्या पुढील जो पाद शब्द तदन्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या अकाराचा लोप होतो उदा०—द्वौ पादौ यस्य द्विपात्, सुपात्.

१—( सू. १४१ ) संख्या किंवा सु यांच्या पुढील जो दन्त शब्द त्याला दतृ असा आदेश बहुव्रीहीमध्यें होतो. परंतु वय गम्यमान असलें पाहिजे. उदा०—द्वौ दन्तौ यस्य द्विदन् दतृ आदेशाचा ऋकार इत्संज्ञक आहे. म्हणून नुम् (७।१।७०) झाला आहे.

१—( सू. १४२ ) वेदामध्यें बहुव्रीहीचें उत्तरपद अशा दन्त शब्दाला दतृ आदेश होतो. उदा०—उभयदत आलभन्ते.

१—( सू. १४३ ) बहुव्रीहीचें उत्तरपद अशा दन्त शब्दाला दतृ आदेश होतो परंतु तो शब्द कोणाची तरी स्त्रीलिंगी संज्ञा असला पाहिजे. उदा०—अयोदती नाम काचित्.

१—( १४४ ) बहुव्रीहि समासामध्यें श्याव व अरोक या पूर्वपदांच्या पुढील दन्त शब्दाला दतृ आदेश विकल्पानें होतो. उदा०—श्यावदन्, श्यावदन्तः; अरोकदन्, अरोकदन्तः, श्याव म्हणजे धुरकट. अरोक म्हणजे निस्तेज.

१—( सू. १४५ ) अग्रशब्दान्त शब्द, तसेंच शुद्ध, शुभ्र, वृष, आणि वराह हे शब्द यांच्या पुढील दन्त शब्दाला दतृ आदेश बहुव्रीहीमध्यें विकल्पानें होतो उदा०—कुड्मलाग्रदन्, कुड्मलाग्रदन्तः, शुद्धदन्, शुद्धदन्तः इत्यादि.

१—( सू. १४६ ) ककुदशब्दान्त बहुव्रीहीच्या शेवटच्या अकाराचा लोप होतो, वयोवस्था गम्यमान असतांना. उदा०—असंजातं ककुदम् यस्य असंजातककुत्. ज्याला वशिंड आलें नाहीं असा लहान बैल.

**त्रिककुत्पर्वते ॥ ५ । ४ । १४७ ॥**
**उद्विभ्यां काकुदस्य ॥५।४।१४८ ॥**
**पूर्णाद्विभाषा ॥ ५ । ४ । १४९ ॥**
**सुहृद्दुर्हृदौ मित्रामित्रयोः ॥ ५ । ४ । १५० ॥**
**उरःप्रभृतिभ्यः कप् ॥५।४।१५१॥**
**इनः स्त्रियाम् ॥ ५ । ४ । १५२ ॥**
**नद्यृतश्च ॥ ५ । ४ । १५३ ॥ ]**
**शेषाद्विभाषा ॥ ५ । ४ । १५४ ॥**

शेषादित्युच्यते कः शेषो नाम । याभ्यः प्रकृतिभ्यः समासान्तो न विधीयते स शेषः॥ किमर्थं पुनः शेषग्रहणं क्रियते । याभ्यः प्रकृतिभ्यः समासान्तो विधीयते ताभ्यः कब्मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । ये प्रतिपदं विधीयन्ते ते तत्र बाधका भविष्यन्ति । अनवकाशा हि विधयो बाधका भवन्ति सावकाशाश्च समासान्ताः। कोऽवकाशः । विभाषा कब्यदा न कप्सोऽ

(सू. १५४) येथें शेषात् असें म्हटलें आहे. पण शेष म्हणजे काय ?[2]

ज्या शब्दाहून समासान्त सांगितला नाहीं तो शब्द येथें शेष पदानें घ्यावयाचा आहे.

पण येथें शेष शब्दच मुळीं कशाकरितां उच्चारला आहे ?

ज्या शब्दाहून समासान्त कोणता तरी सांगितला आहे तेथें हा कप् प्रत्यय न झाला पाहिजे.

हा शेष शब्दाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, विशेष शब्द उच्चारून जे समासान्त सांगितले आहेत ते त्या ठिकाणीं ह्या कप् प्रत्ययाचा बाध करून होतील.

पण ज्या विधींना कोठेंही अवकाश नसतो ते दुसऱ्या विधींचा बाध करतात, आणि ह्या समासान्तांना तर अवकाश आहे.

तो अवकाश कोठें बरें आहे ?

---

१—(सू. १४७) पर्वत अर्थ गम्यमान असताना त्रिककुत् असे निपातन केलें आहे. त्रि आणि ककुद या शब्दांचा बहुव्रीहि केला असतां शेवटच्या अकाराचा लोप झाला आहे ज्याला वशिंडासारखीं तीन शिंगें आहेत असा पर्वत हा अर्थ आहे.

१—(सू. १४८) उत् आणि वि यांच्या पुढील जो काकुद शब्द तदन्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या अकाराचा लोप होतो. उदा०—उद्गतं काकुदं यस्य उत्काकुत्, विकाकुत्. काकुद म्हणजे टाळू.

१—(सू. १४९) पूर्ण शब्दाच्या पुढील जो काकुद शब्द तदन्त बहुव्रीहीच्या शेवटींच्या अकाराचा लोप विकल्पानें होतो. उदा०—पूर्णं काकुदं यस्य पूर्णकाकुत्, पूर्णकाकुदः.

१—(सू. १५०) मित्र या अर्थीं 'सुहृद्' आणि शत्रु या अर्थीं 'दुर्हृद्' असे शब्द येथें निपातन केले आहेत. सु व दुर् या शब्दांचा हृदय शब्दाबरोबर बहुव्रीहि समास केला असतां त्या हृदय शब्दाला हृद् आदेश झाला आहे.

१—(सू. १५१) उरस् वगैरे शब्द उत्तरपद असलेला जो बहुव्रीहि त्याहून कप् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—व्यूढम् उरः यस्य स. व्यूढोरस्कः. ज्याचें हृदय विशाल आहे असा मनुष्य.

१—(सू. १५२) इन् हे वर्ण अंतीं असलेल्या बहुव्रीहीहून स्त्रीलिंगी कप् प्रत्यय समासान्त होतो. उदा०—बहुस्वामिका नगरी.

१—(सू. १५३) ज्याचें उत्तरपद नदीसंज्ञक (१।४।३) शब्द किंवा ऋकारान्त शब्द आहे अशा बहुव्रीहीहून कप् प्रत्यय समासान्त होतो उदा०—बहुकुमारीक ग्रामः, बहुकर्तृकः ग्रामः

१—(सू. १५४) ज्या बहुव्रीहीहून कोणताच समासान्त सांगितला नाहीं त्याहून कप् प्रत्यय समासान्त विकल्पानें होतो. उदा०—शोभनपुत्रकः देवदत्तः.

२—'उक्तात् अन्य शेषः' म्हणजे 'पूर्वी सांगितलेल्याहून निराळा' असा शेष शब्दाचा अर्थ आहे. तेव्हां येथें उक्त असा पूर्वी सांगितल्यापैकीं कोण घ्यावा असा संशय येतो.

वकाशः । कपः प्रसङ्ग उभयं प्राप्नोति परत्वात्कप्प्राप्नोति। तस्माच्छेषग्रहणं कर्तव्यम्॥ किं पुनरिदं शेषग्रहणं कबपेक्षम्। यस्माद् बहुव्रीहेः कन्न विहित इति। आहोस्वित्समासान्तापेक्षम्। यस्माद्बहुव्रीहेः समासान्तो न विहित इति। किं चातः । यदि विज्ञायते कबपेक्षमनृचःबह्वृच इत्यत्रापि प्राप्नोति अथ समासान्तापेक्षमनृक्कं साम बह्वृक्कं सूक्तमिति न सिध्यति। अस्तु कबपेक्षम्। कथमनृचः बह्वृच इति। विशेष एतद्वक्तव्यम्। अनृचो माणवे बह्वृचश्चरणाख्यायामिति। इद तर्ह्यूधसोऽनङि स्त्रीग्रहणं चोदितं तस्मिन्क्रियमाणेऽपि प्राप्नोति ॥ एवं तर्हि नैव कबपेक्षं शेषग्रहणं नापि समासान्तापेक्षम्।

---

हा कप् प्रत्यय विकल्पानें सांगितला आहे. तेव्हां ज्या वेळीं हा कप् प्रत्यय होत नाहीं त्या वेळीं त्या समासान्तांना अवकाश आहे. आणि जेव्हां कप् होतो त्या वेळीं दोघांचीही प्राप्ति येते. त्यांमध्यें त्या समासान्तांचा बाध करून परत्वास्तव कप् प्रत्यय होऊं लागेल, म्हणून येथें शेष शब्द उच्चारला पाहिजे.

पण अगोदर येथें शेष शब्दाचा अर्थ ठरवितांना कप् प्रत्ययच फक्त उक्त म्हणून धरावयाचा, म्हणजे ' ज्या बहुव्रीहीहून पूर्वीच्या कप् प्रत्यय सांगणाऱ्या तीन सूत्रांनीं कप् प्रत्यय प्राप्त होत नाहीं अशा बहुव्रीहीहून हा वैकल्पिक कप् प्रत्यय होतो ' असा अर्थ करावयाचा अथवा सर्वच समासान्त उक्त धरून ' ज्या बहुव्रीहीहून पूर्वीच्या कोणत्याही सूत्रानें समासान्त प्राप्त होत नाहीं अशा बहुव्रीहीहून हा वैकल्पिक कप् प्रत्यय होतो ' असा अर्थ करावयाचा ?

या दोन अर्थांमध्यें फरक काय बरें ?

जर कप् प्रत्यय उक्त धरून ' शेष या पदाचा अर्थ ठरविला तर अनृचः बह्वृचः इत्यादि ठिकाणींही कप् प्रत्यय होऊं लागेल. बरें, आतां जर समासान्त सर्व उक्त धरून शेष पदाचा अर्थ ठरवावा तर अनृक्कम् साम बह्वृक्कम् सूक्तम् येथें प्रकृत सूत्रानें कप् प्रत्यय होत असता तो होणार नाहीं.

तर मग कप् प्रत्यय उक्त धरूनच शेष पदाचा अर्थ ठरवावा.

पण तसा अर्थ घेतला तर अनृचः व बह्वृचः येथें कप् प्रत्यय होऊं लागेल त्याची वाट काय ?

तेथें ' अनृचः माणवे ' म्हणजे माणवक अर्थ असतांना अनृच असा ऋच्-शब्दान्त बहुव्रीहीहून अ प्रत्यय होतो; तसेंच बह्वृचश्चरणाख्यायाम् म्हणजे विशेष शाखेचा संबध दाखवावयाचा असतांना बह्वृच असा ऋच्-शब्दान्त बहुव्रीहीहून अ प्रत्यय होतो, अशीं विशेष वचनें करावीं.

तर मग ' ऊधसोऽनङि स्त्रीग्रहणम् ' ( ५ । ४ । १३१ वा. १ ) असें मागें म्हटलें आहे, तसें म्हटलें तरी तेथें प्रकृत सूत्रानें कप् प्रत्यय होऊं लागेल हा दोष येतोच.

तर मग आतां शेष पदाचा अर्थ ठरवितांना कप् प्रत्ययही उक्त धरूं नये. आणि समासान्तही उक्त धरू नये. तर हा जो

---

३—येथें जरी समासान्त अ प्रत्यय ( ५।४।७४ ) होत आहे तरी येथें पूर्वीच्या नित्य कप् प्रत्यय सांगणाऱ्या तिन्ही सूत्रांची प्राप्ति नसल्यामुळें अनृच व बह्वृच हे शब्द शेष पदानें घेतां येतील.

४—तेव्हां अर्थातच त्या विशेष वचनांनीं प्रकृत सूत्राचा बाध होत असल्यामुळें दोष येणार नाहीं.

५—कारण अनङ् हा समासान्त सांगितला तरी तेथें पूर्वीच्या नित्य कप् सांगणाऱ्या तिन्ही शास्त्रांची प्राप्ति नसल्यामुळें अनङाचें उदाहरण शेष पदानें घेतां येतें.

किं तर्हि । अनन्तरो यो बहुव्रीह्यधिकारः सोऽपेक्ष्यते । अनन्तरे बहुव्रीह्यधिकारे यस्माद्बहुव्रीहेः समासान्तो न विहित इति । कथमनृचः बह्वृच इति । वक्तव्यमेवैतदनृचो माणवे बह्वृचश्चरणाख्यायामिति ॥

[ न संज्ञायाम् ॥ ५ । ४ । १५५ ॥

ईयसश्च ॥ ५ । ४ । १५६ ॥

ईयस उपसर्जनदीर्घत्वं च ॥ १ ॥

ईयस उपसर्जनदीर्घत्वं चेति वक्तव्यम् । बह्व्यः श्रेयस्योऽस्य बहुश्रेयसी । विद्यमानश्रेयसी ॥

पुंवद्वचनात्सिद्धम् ॥ २ ॥

पुंवद्भावोऽत्र भवतीयसो बहुव्रीहौ पुंवद्वचनामिति ॥

वन्दिते भ्रातुः ॥ ५ । ४ । १५७ ॥

ऋतश्छन्दसि ॥ ५ । ४ । १५८ ॥

नाडीतन्त्र्योः स्वाङ्गे ॥५।४।१५९॥

---

जवळचा ( ५ । ४ । ११३ ) बहुव्रीहि अधिकार चालू आहे तो धरावा म्हणजे ह्या जवळच्या बहुव्रीहि अधिकारामध्यें सांगितलेला समासान्त ज्या बहुव्रीहीहून होत नाहीं त्या बहुव्रीहीहून कप् प्रत्यय विकल्पानें होतो असा याचा अर्थ होईल

तरी पण अनृचः व बह्वृचः येथें हा कप् प्रत्यय होऊं लागेल हा दोष येतो तो कसा घालवावा ?

तेथें ' अनृचो माणवे ' आणि ' बह्वृचश्चरणाख्यायाम् ' अशीं वचनें करावींच.

( सू. १५६ वा. १ ) ईयस् प्रत्ययाच्या पुढील जो स्त्री-प्रत्यय तदन्त उपसर्जनाला दीर्घ होतो असें म्हणावें. उदा०— बह्व्यः श्रेयस्यः यस्य बहुश्रेयसी; विद्यमानश्रेयसी.

( वा. २ ) पुंवद्भावानें हें सिद्ध होत आहे. ' ईयसो बहुव्रीहौ पुंवद्वचनम् ' ( १ । २ । ४८ वा. ३ ) या वचनानें येथें पुंवद्भाव होत आहे.

---

६—कारण अनृच. व बह्वृचः येथें जो समासान्त अ प्रत्यय ( ५।४।७४ ) होतो तो ह्या चालू असलेल्या बहुव्रीहि अधिकारांतील नव्हे. अनङ् आदेश ( ५।४।१३१ ) हा चालू असलेल्या बहुव्रीहि अधिकारांतील असल्यामुळें तो शेष पदानें घेता येत नाहीं. म्हणून तेथें प्रकृत सूत्रानें कप् प्रत्यय होत नाहीं.

१—( सू. १५५ ) बहुव्रीहि समास होऊन सिद्ध झालेला शब्द जर कोणाची संज्ञा असेल तर तेथें कप् प्रत्यय होत नाही. उदा०—विश्वे देवा अस्य विश्वदेवः.

१—( सू. १५६ ) ईयस्—प्रत्ययान्त जो बहुव्रीहि त्याहून कप् प्रत्यय होत नाहीं उदा०— बहवः श्रेयांसः यस्य स बहुश्रेयान्. बह्व्यः श्रेयस्यः यस्य स बहुश्रेयसी. येथें ' नद्यृतश्च ' ( ५।४।१५३ ) यानेंही प्राप्त झालेला कप् प्रत्यय होत नाहीं.

२ — येथें ' गोस्त्रियो. ' ( १।२।४८ ) यानें ऱ्हस्व होऊन भलतेंच रूप होईल तें न व्हावें या करितां येथेंही दीर्घ सांगितला आहे.

१—( सू. १५७ ) भ्रातृ—शब्दान्त बहुव्रीहीहून कप् प्रत्यय होत नाहीं; परंतु तेथें भ्रात्याची प्रशंसा असली पाहिजे. उदा०— शोभनः भ्राता यस्य स सुभ्राता.

१—( सू १५८ ) वेदामध्यें ऋकारान्त बहुव्रीहीहून समासान्त कप् प्रत्यय होत नाहीं. उदा०— हता माता यस्य स हतमाता

१—( सू. १५९ ) स्वाङ्गवाचक जे नाडी आणि तन्त्री हे शब्द तदन्त बहुव्रीहीहून समासान्त कप् प्रत्यय होत नाहीं. उदा०— बह्व्यः नाड्यः यस्य सः बहुनाडिः कायः; बहुतन्त्रीर्ग्रीवा; तन्त्री म्ह. शिरा. तन्त्री हा शब्द स्त्रीलिंगी आहे. परंतु स्त्री—प्रत्ययान्त नव्हे म्हणून ऱ्हस्व ( १-२-४८ ) होत नाहीं.

निष्प्रवाणिश्च ॥ ५ । ४ । १६० ॥]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये पञ्चमस्याध्यायस्य चतुर्थे पादे प्रथममाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

॥ पञ्चमोऽध्यायः समाप्तः ॥

---

याप्रमाणें श्री भगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या पांचव्या अध्यायाच्या चवथ्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें व पादही समाप्त झाला. पांचवा अध्यायही समाप्त झाला.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

शम्

---

१—( सू. १६० ) येथें निष्प्रवाणि असें निपातन केलें आहे. येथें निस् आणि प्रवाणी या शब्दांचा बहुव्रीहि समास होऊन शेवटच्या ईकाराला ऱ्हस्व ( १ २ ४८ ) झाला आहे. प्रवाणी म्ह. विणण्याचे साधन. तें नुकतेंच ज्यांतून बाहेर पडलें आहे म्हणजे अर्थात् नुकताच विणलेला पट असा अर्थ आहे.

अध्याय ५ पाद ४ समाप्त.

